— सुकन्या, सुकलत्र, सुगृहिणी, सुमाता —

माझी पत्नी

सौ. शांताबाई

जिच्या सहकार्यामुळेंच अंगीकृत कार्यें पूर्ण व यशस्वी झालीं

तिला सप्रेम समर्पण

## श्री. स. आ. जोगळेकर यांचे साहित्य :

१ मानवी कर्तव्यें.
२ जोसेफ मॅझिनी
३ स्वातंत्र्याचीं मूलतत्त्वें
४ देवगिरी.
५ घारापुरी.
६ सह्याद्रि.
७ सिंहासनबत्तिशी.
८ शृङ्गारनायिका
९ गाथासप्तशती

# पुरस्कार

श्री. जोगळेकर यांनी संपादित केलेल्या या गाथासप्तशतीचा पुरस्कार करताना महाराष्ट्राचा एक अभिमानी म्हणून मला जितका आनंद होत आहे, तितकाच या महत्त्वाच्या ग्रंथाचा महाराष्ट्रीयांना परिपूर्ण परिचय करून देण्याचे श्रेय गेली चाळीस वर्षे ज्यांचा माझा अकृत्रिम स्नेह आहे त्या माझ्या स्नेह्यांनी घेतले म्हणून मला अभिमानही वाटत आहे. सुमारे पस्तीस वर्षांपूर्वी मी महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाचे अध्ययन करीत होतो. त्या वेळी राष्ट्रीय भावनेच्या सर्वस्वी आहारी जाऊन ते मानवी कर्तव्याचा उहापोह करीत असल्यामुळे भारताच्या प्राचीन इतिहासाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन थोडासा अनास्थेचा होता. वयोमानामुळे म्हणा किंवा आजूबाजूच्या परिस्थितीकडे पाहून, वर्तमान काळाबद्दल अनास्था व भविष्यकाळाबद्दल नैराश्य वाटू लागल्यामुळे भूतकाळाकडे आस्थेने, कौतुकाने व संशोधक बुद्धीने पाहण्याची प्रवृत्ति निर्माण होणे साहजिक आहे. श्री जोगळेकर हे प्राचीन इतिहासाच्या क्षेत्रात वावरू लागले तेव्हांपासून त्यांच्या एतद्विषयक उद्योगाबद्दल मी त्यांचे नेहमीच कौतुक करीत आलो आहे. वाट चुकलेला एक स्नेही मार्गावर आला या भावनेने! प्राचीन इतिहासाच्या क्षेत्रातील श्री. जोगळेकर यांच्या हालचालींपैकी गाथासप्तशतीवरील हा सर्वांगपरिपूर्ण ग्रंथ ही सर्वात महत्त्वाची मोहीम आहे. श्री. जोगळेकरांच्या 'सह्याद्री' चे सर्वत्र कौतुक झाले. सरळ रस्त्याने जाताना काही प्रेक्षणीय असे दिसले म्हणजे त्याचेच निरीक्षण करण्यात रमून जावे अशी काही भक्तींना ओढ असते. सह्याद्रि वाचताना मला या गोष्टीची आठवण झाली. गाथासप्तशतीचे संपादन करताना मात्र श्री. जोगळेकर अगदी सरळ मार्गाने गेलेले आहेत. आपला ग्रंथ सर्वांगपरिपूर्ण करण्याचे ध्येय त्यांनी गाठलेले आहे. महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास, समाजव्यवस्था, लोकरीति वगैरे आनुषंगिक विषयांच्या विस्तृत विवेचनासह महाराष्ट्राचा हा आद्य ग्रंथ महाराष्ट्राच्या अभिमान्यांच्या हाती देऊन श्री. जोगळेकरांनी महाराष्ट्राची अपूर्व सेवा केली आहे यात संशय नाही.

हाल सातवाहनाचा काळ कोणताही असो, गाथासप्तशती हा महाराष्ट्राचा आद्य ग्रंथ आहे यात संशय नाही. या ग्रंथात महाराष्ट्राची सर्व वैशिष्ट्ये प्रकट

झालेली आहेत संस्कृत ही अखिल भारतात पण्डिताची व कवींची भाषा मानली जात असे काव्यादि ग्रंथ संस्कृततच लिहिण्याची प्रथा होती आणि देवादिकांचीं व प्रेषितांचीं अवतारकृत्यें अगर राजवंशांचे पराक्रम व प्रेमलीला हेच काव्याचे विषय असत त्या काळात महाराष्ट्री गाथाकवींनीं स्वतंत्र पायंडा पाडला महाराष्ट्री प्राकृत भाषेंत महाराष्ट्राच्या ग्रामीण जनतेचें समकालीन जीवन हा वर्ण्य विषय घेऊन त्यानीं केलेल्या काव्यनिर्मितींतून प्रतीत होणारे महाराष्ट्राचे गुण आजही दृग्गोचर झाल्यावाचून रहात नाहात संस्कृत साहि त्यावरील आपल्या विख्यात ग्रथात डॉ कीथ यानीं गाथासप्तशतीबद्दल पुढील उद्गार काढले आहेत

Even as it is it has a closeness to life and common realities which is hardly to be seen in Sanskrit this may be a characteristic of the Maharashtra people who even to day have a certain homeliness and a rough good sense

त्या काळीं इतिहास म्हणजे राजाच्या पराक्रमाचें वर्णन अशी महाराष्ट्री याची समजूत नव्हती राजाच्या प्रासादात व लीलांतच काव्य संभवतें असें ते समजत नव्हते ग्रामीण जनतेंतही, घरोघरी, खरें प्रासादिक काव्य आढळतें, अशी त्याची निष्ठा होती हें महाराष्ट्राचें एक वैशिष्ट्यच मानलें पाहिजे अन्य प्राकृत भाषांत किंवा अन्य प्रदेशात असे प्रयत्न झालेलेच नाहीत ग्रामीण जनतेच्या जीवनावर, त्यांच्याच भाषेंत रचलेला असा गाथासप्तशती हा एकमेव ग्रंथ आहे भारतातील सुसंस्कृत पण्डिताच्या प्रशंसेचा हव्यास न बाळगता, राजकुलांच्या विक्रमांचें वर्णन करण्याचा स्वार्थसाधक उपक्रम टाकून, शेतावर राबणाऱ्या आणि रानावनात राहणाऱ्या ग्रामीण व वन्य जनतेवर आपली काव्यप्रतिभा केंद्रित करणारे कवि महाराष्ट्रातच निर्माण झालेले आहेत गाथा-सप्तशतीचा संपादक हाल सातवाहन हा राजा होता त्यानें स्वत व त्याच्या पदरीं असलेल्या कवींनीं या संग्रहांत समाविष्ट झालेल्या गाथा लिहिल्या असतील, कदाचित् ग्रामीण जनतेंत प्रचलित असलेल्या गाथांवर थोडाबहुत संस्कार करून त्यानें त्या संकलित केल्या असतील कसेही असो त्याचा महाराष्ट्री

प्राकृताबद्दलचा अभिमान आणि ग्रामीण जनतेच्या जीवनाबद्दलची आस्था या गाथांतून पदोपदीं प्रत्ययास येते सातवाहनाच्या संस्कृत भाषेच्या अज्ञानाची आणि प्राकृत भाषांच्या पुरस्काराची पण्डितांनीं पदोपदीं कुचेष्टा केलेली आहे परंतु असल्या कुचेष्टांनीं मिष्याचा अगर भीक घालण्याचा महाराष्ट्रीयांचा त्या वेळीं तरी स्वभावधर्म नव्हता संस्कृत काव्याला सर्वस्वीं अपरिचित असें एक क्षेत्र हाल सातवाहनानें कवींना उपलब्ध करून दिलें याचें श्रेय सर्वस्वीं त्याच्या महाराष्ट्रीयत्वालाच आहे संस्कृत पण्डितांना प्राकृत गाथासप्तशतीच्या गुणांची ओळख पटण्यास कितीतरी वर्षें, नव्हे शतकें लागलीं अखेरीस

अविनाशिनमग्राम्यमकरोत् सातवाहन ।
विशुद्ध जातिभि कोश रत्नैरिव सुभाषितै ॥

असे उद्गार काढून बाणभट्टानें काव्य वाङ्मयातलें गाथासप्तशतीचें योग्य स्थान निश्चित केलें व तें पण्डितांच्या निदर्शनास आणून दिलें

पण महाराष्ट्रीयांचें तरी त्यांच्या या आद्य ग्रंथाकडे कोठें लक्ष होतें? सातवाहन राजे हे महाराष्ट्रीय होते कीं आन्ध्र या विषयीं खुद्द आधुनिक महाराष्ट्रीयांना शंका आहेत सातवाहनांचा उल्लेख आन्ध्र म्हणून आलेला आहे हें खरें, पण तें केव्हा? पुराणांतील वंशावळी निर्माण अगर निश्चित झाल्या किंवा त्यांचें अखेरचें संस्करण झालें तेव्हा त्यावेळीं सातवाहन राजे हर्षांच्या आन्ध्र प्रांतावर राज्य करीत होते हें निश्चित यामुळेंच त्यांचा उल्लेख आन्ध्र राजे म्हणून झालेला आहे सातवाहनांचे सगळ्यांत जुने शिलालेख महाराष्ट्रांत आहेत त्यांचीं नाणीं महाराष्ट्रांत आढळतात, त्यांची राजधानी पैठणला होती, गाथासप्तशती महाराष्ट्री प्राकृतांत लिहिलेली आहे व तींत महाराष्ट्रीय ग्रामीण जनतेचें जीवन वर्णिलेलें आहे या सर्व पुराव्यांचा साकल्यानें विचार केला तर सातवाहन राजे हे महाराष्ट्रीयच होते यावद्दल शंका रहात नाही

श्री जोगळेकर यांनीं संपादित केलेल्या गाथासप्तशती या ग्रंथानें महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाकडे जनतेचें लक्ष वेधलें जाईल अशी आशा करण्यास हरकत नाहीं श्री जोगळेकर यांचा हा ग्रंथ इतका परिपूर्ण आहे कीं त्याला प्राचीन महाराष्ट्राचा लोकेतिहास—History of the People म्हणण्यास

हरकत नाहीं. इतिहासाची सामान्य कल्पना म्हणजे राजांच्या वंशावळी व त्यांच्या युद्धांचे वृत्तांत. आजपर्यंत इतिहासानें जनतेकडे बरेंच दुर्लक्ष केलेलें आहे. महाराष्ट्रानें मात्र जनतेच्या जीवनाकडे डोळेझांक केलेली नाहीं असें गाथासप्तशतीवरून दिसून येतें. गाथासप्तशती वाचतांना महाराष्ट्रांतील दोन हजार वर्षांपूर्वीच्या ग्रामीण जनतेच्या जीवनाचीं चित्रें चित्तासमोर उभीं राहतात. येथें ग्रामीण जनतेच्या राहणीचें वर्णन आहे, त्यांच्या देवांचें व उत्सवांचें वर्णन आहे, त्यांच्या आहारविहाराचे उल्लेख आहेत, त्यांच्या आशा-आकांक्षा सशब्द झालेल्या आहेत. क्वचित् प्रसंगीं कांहीं गाथांतील शृङ्गार विशिष्ट संस्कृतीच्या कांहीं लोकांना न रुचण्यासारखा आहे, हें खरें. पण दोन हजार वर्षांपूर्वीच्या ग्रामीण जनतेच्या शब्दचित्रांत अधून मधून शृंगाराच्या छटा व्यक्त होणें साहजिक आहे.

श्री. जोगळेकरांनीं सातवाहनकालीन समाजाचें चित्र महाराष्ट्रीय जनतेपुढें मांडलें आहे. गेल्या दोन हजार वर्षांत आमच्या सामाजिक जीवनांत झालेलीं परिवर्तनें, परचक्रांमुळें आमच्या जीवनांत झालेला फरक, आमच्या जीवनाचीं तात्त्विक मूल्यें वगैरे विषयांचा त्यांनीं परामर्ष घेतला असता तर विषय अधिक रंगला असता. पण अगोदरच विस्तार वाढलेला; शिवाय तें थोडेंसें अप्रयोजक व अप्रस्तुतही झालें असतें. महाराष्ट्राच्या ग्रामीण जनतेच्या उत्क्रांतीचें परिपूर्ण चित्र श्री. जोगळेकर हेच पुढें केव्हां तरी आपणांस दाखवतील अशी आपण आशा करूं या.

संगम : पुणें.
३१।३।५६

विद्यासागर सदाशिव बखले.

---

# दोन शब्द :

गाथासप्तशतीच्या संपादनाचा उद्योग कोणत्या मुहूर्तावर हातीं घेतला, कोण जाणें. अध्ययनाला सुरवात केव्हां झाली तेंही आतां आठवत नाहीं. १९४० सालीं तापानें फणफणलों होतों, तेव्हां भ्रमांत हाच विषय चालला होता, असें सांगतात. या कामाला लागलों तेव्हांपासून आप्तेष्टांना व आश्रयदात्यांना पारखा झालों. एकलकोंडा झालों, हा उद्योग पुरा व हातावेगळा होण्याला इतकीं वर्षें लागणार आहेत व व्यावसायिक नुकसानीही सोसावी लागणार आहे असा अंदाज होता तर कदाचित् तो हातींही घेतला नसता; मीच काय, प्रकाशकांनीं व मुद्रकांनींही; हातानें आम्हां सर्वांचेच हाल केले; पण त्याच्याच पुण्याईनें सर्व माणसें घरचींच मिळाल्यामुळें काम पुरें झालें. घरचीं माणसें झालीं तरी त्यांना किती त्रास द्यावयाचा याला कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं! पण झालें गेलें होऊन गेलें. या उद्योगांत इतकीं वर्षें एवढा गढलों होतों कीं आता तो पुरा झाल्यामुळें जणूं बेकार झालों आहे असें वाटत आहे!

माझे मित्र श्री. विद्यासागर वराळे यांनीं या विषयाशीं माझा प्रथम परिचय करून दिला तेव्हां त्यांनीं व मींही विद्यापीठाची पहिली पदवीही संपादन केलेली नव्हती. पुढें आम्हीं दोघांनींही पदवीसयी संपादन केली. ते संशोधन-कार्यांत पडणार आणि मी राजकीय बेकारींत काळ कंठणार अशीं चिन्हें दिसत होतीं पण कालप्रभावामुळें दोघांचें ही भवितव्य बदललें. सुमारें वीस वर्षांत सर्व पहिल्या दर्जाची वकीली करून ते न्यायाधीश झाले व आतां सेवानिवृत्तीच्या मार्गावर आहेत आणि त्यांनीं तेव्हां माझ्या मनांत पेरलेलें बीज आणि नंतर डॉ. सुखथनकरांनीं स्थानांतर-रोपण केलेलें रोप आतां सुमारें पस्तीस वर्षांनीं फलधारणा करीत आहे! हा दोष त्यांचा म्हणूनच माझ्या या प्रयत्नाला त्यांनीं पुरस्कार लिहावा यांत विशेष औचित्य आहे. मी सातवाहनांच्या इतिहासाचें अध्ययन सुरू केलें तेव्हांपासून .किती-कदां तरी आम्हीं याविषयीं चर्चा केल्या आहेत. शिवाय, डॉ. रामकृष्ण भांडारकर व डॉ. सुखथनकर यांच्या तोलीचा त्यांचा सातवाहन या विषयाचा

व्यासग व अधिकार आहे, फार काय, डॉ. केतकराना महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास लिहिण्याची प्रेरणा त्याच्या एतद्विषयक लेखामुळेंच झालेली आहे १। विद्वानाचा पुरस्कार मिळाला हें माझें भाग्य व मैत्रीची कृतकृत्यताही! याबद्दल त्याचे आभार मानण ही ही कृतघ्नता होईल'

या कामांत मला अनेक मित्रानें साह्य झालेलें आहे विख्यात सशोधक महामहोपाध्याय डॉ. मिराशी एम्. ए, पी एच्. डी, यानीं मला अनुपलब्ध व हवी असलेली माहिती तत्परतेनें पुरविली आहे डॉ. मोरेश्वर दीक्षित, एम्. ए, पी एच्. डी, यानीं मजबरोबर गाथासप्तशतीचीं हस्तलिखितें वाचून गाथा कवाचीं वेळोवेळीं मागेंपुढें असलेली नावें निश्चित केलीं आहेत आणि अनेकदा आपल्या सशोधनाचा फायदा घेऊ दिला आहे अभ्यासाची बैठक अगोदर कोण मोडतो तें पाहू अशा इर्ष्येनें त्यानीं मजबरोबर काम केलें भाडारकर ओरियटल रिसर्च इन्स्टिट्यूटचे डॉ. गोडे, एम्. ए, डी लिट्. यानीं मला लागतीं ता हस्तलिखितें व ग्रथ दीर्घकालपर्यंत वापरू दिलें आहेत प्रसगविशेषीं इतर सशोधकाच्या तातडीच्या मागण्या डावलूनही, इतकेंच नव्हे मला अज्ञात असे अनेक सदर्भ काढून दिले आहेत माझे मित्र श्री दत्तात्रय श्रीधर मराठे, बी ए, एल्. एल्. बी, वकील यानीं डॉ. वेबर याची गाथासप्तशतीची जर्मन आवृत्ति सबध वाचून मला समजावून सागितलेली आहे श्री शालिग्राम एम्. ए या सस्कृत पण्डितानीं गृहकृत्याच्या पद्धतीनें गाथाचें भाषातर मजकडून करवून घेतलें डॉ. वसत गजानन राहुरकर यानीं अनेक निवळ व भ्रष्ट प्राकृत अशा गाथा समजावून सागितल्या श्री अनतराव करदीकर यानीं भाषातर वाचून अनेक सूचना केल्या, पण त्या वेळा तो भाग छापून झालेला अस लेमुळें मला त्याचा योग्य तो उपयोग करून घेता आला नाहा श्री कव यानीं शब्दकोश तपासून दिला श्री दीनानाथ दलाल, श्री रामभाऊ देशमुख व श्री रॉय किणीकर यानीं तर गाथासप्तशती माझ्या हातून पुरी होईल किंवा नाहा याबद्दल आपसात पैजा लावल्या होत्या असें ऐकतों उद्योगाबद्दल प्रशसा करणारापेक्षा विलबाबद्दल निर्भर्त्सना करणाराची आपुलकी व सख्या अधिक! आमचे श्री यशवतराव जोशी व सगमचे श्री माधवराव पटवर्धन याचा तर

मी अत पाहिला अलीकडे तर आम्ही एकमेकाना टाळू लागलों होतों ! या सर्व मित्रांचें मी अत करणपूर्वक आभार मानतों

प्रस्तावना, भाषांतर व टीका यातील अनेक दोषांची मला आता विशेष जाणीव होत आहे कांहीं सागावयाचें हात तें राहून गेलें काहीं दुबार सांगितलें गेलें पुढील आवृत्तीचा योग आल्यास ते दूर करीन सर्वच टीकाकारांचीं मतें प्रकाशित होतात असें नाहीं, जीं प्रकाशित होत नाहात तीं उपेक्षा करण्याच्या लायकीचीं असतात असेंही नाहीं कोठें कांहीं दोष आढळल्यास वाचकांनीं ते माझ्या निदर्शनास आणण्याची कृपा करावी अशी विनति आहे

शालिवाहन शकाच्या वर्षप्रतिपदेस या ग्रंथाचें प्रकाशन होत आहे हा योगायोगच म्हटला पाहिजे, कारण या शकाची प्रस्थापना गोतमीपुत्र सातकर्णीनें केलेली आहे

माझी ही कृति महाराष्ट्राला प्रिय होईल अशी आशा आहे

स भा जोगळेकर

# अनुक्रमणिका

शरीर-खण्ड :

शरीर-खण्ड :

# गाथासप्तशती

## उपोद्घात

### ( १ ) प्रस्तावनेचा प्रस्ताव :

महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाचा व प्राकृत भाषेतील एखाद्या ग्रंथाचा अभ्यास माझे हातून होईल असा योग माझ्या कुंडलींत असल्याचें भविष्य एखाद्या ज्योतिष्यानें पंधरा सोळा वर्षांपूर्वी वर्तविलें असतें तर त्याची गणना मी पढतमूर्खांत किंवा खुशामती लफंग्यात केली असती. कारण महाविद्यालयीन अध्ययनात हे माझे विषय नव्हते आणि चरितार्थासाठी स्वीकाराव्या लागलेल्या पेशामुळें व्यासंगशक्ति तोंवर आटून गेली होती. शिवाय, वय वाढलें म्हणजे नवे मित्र जोडता येत नाहीत, त्याचप्रमाणें ताजे अभ्यासविषयही संपादन करता येत नाहीत. म्हणून वाटतें, केवळ योगायोगामुळें किंवा पूर्वजन्मानुबंधामुळें मी या विषयाकडे वळलों.

माझे सन्मित्र श्री. विद्यासागर वसले यांनी पंडित भगवानलाल इंद्रजी सुवर्णपदक मिळविलेला Sātavāhanas & Contemporary Kṣatrapas हा निबंध ( J. B. B. R. A. S N. S : Vol III ) त्याच्या मुद्रणानंतर मी वरवर वाचला होता आणि सुमारें तीस बत्तीस वर्षांपूर्वी त्यांचे सहवासात गाथासप्तशतींतील काही सुभाषितांचें रसग्रहण केलें होतें. अशा परिस्थितींत प्रेयसंप्रयोगोन्मादामुळें म्हणा किंवा अंतर्यामांतील सुप्त वा विस्मृत प्रवृत्तींच्या प्रेरणेमुळें म्हणा, 'निर्णयसागर'नें काव्यमालेंत छापलेली गाथासप्तशतीची एक जीर्ण मुद्रित प्रत मी पुण्याच्या जुन्या बाजारात खरेदी केली. सदर पुस्तकाच्या मूळ मालकानें समासात जागोजाग इंग्रजी, मराठी टीपा लिहिलेल्या होत्या. वाटलें, बरें झालें, विषय समजण्याला अनायासें सोबत मिळाली, प्राकृत गाथांची भाषा बोजड नाही, विषय साधे व रसिकाला रुचण्याजोगे आहेत; शिवाय मदतीला संस्कृत छाया व टीका आहेतच. पुष्कळवेळा प्रयत्न केला तरीही गाथा समजेनात व ज्या समजल्या त्यांचें स्वारस्य उमजेना. म्हणून या वेळीं, आणि

फक्त या वेळींच नव्हे, स्वतःच्या अज्ञानाची लाज वाटली मानवी संस्कृतीचा मूलाधार असलेल्या संस्कृत या विषयाची उनाड विद्यार्थी दशेत उपेक्षा केली याबद्दल पश्चात्ताप वाटला आणि हौसेनें हातीं घेतलेला हा ग्रंथ नाइलाजानें बाजूला ठेवला.

आणि माझ्या आयुष्यात एक अवचित घटना घडली नसती तर तो तसाच, भविष्यकाळा, फुरसतीच्या वेळीं, आता यापुढें ही अपेक्षित फुरसत केव्हा मिळणार कोण जाणे, वाचावयासाठीं म्हणून बाजूला ठेवलेल्या इतर अनेक ग्रंथांबरोबर पडून राहिला असता

मध्यंतरीं, कसा कोण जाणे, मला प्राचीन व मध्ययुगीन नाणीं गोळा कर ण्याचा छंद लागला स्वाभाविक छांदिष्टपणात ही भर पडली प्रचलित नाण्याचा संग्रह करण्याचे व्यसन लागण्यापूर्वीच, आणि माझ्या मतें सुदैवान, पण आप्तेष्टांच्या मतें शापपूर्वक दुर्दैवानें, ते मला अजूनही जडलेलें नाहीं, मी मुद्राराक्षसाच्या आहारी गेलों जुन्या नाण्याच्या नावाखालीं मी पुष्कळ भंगार जमविली त्यावरील लेख वाचता येत नव्हते, म्हणून तीं दुर्मिळ व ऐतिहासिक महत्वाचीं आहेत अशा भ्रमात होतों पुढें मुद्राशास्त्रावरील ग्रंथ आणि तोंवर जमविलेल्या नाण्यावरील लेख वाचले, तेव्हां तीं सामान्य आहेत तें प्रत्ययास आलें या हिर मोडानतर त्यापैकीं बऱ्याच नाण्याची विल्हेवाट लावली औदार्याच्या आविर्भावानें, संशोधनोत्तेजनाच्या निमित्तानें काहीं इष्टमित्राना देऊन टाकलीं, काहीं मोडीत घातली, तेवढीच प्रापचिक कामाला आलीं एवढें मात्र झालें कीं या छंदामुळें हिंदुस्तानच्या प्राचीन व मध्ययुगीन इतिहासाची उजळणी झाली आणि मुद्रा-शास्त्राचीं मूलतत्त्वें अवगत झालीं नतर जुनीं नाणीं आणि भारतीय स्फूर्ति स्थानाच्या सान्निध्यात जागृत होणाऱ्या संवेदनाचें संपादन करणासाठीं मी नव्या हिरीरीनें उठावणी केली या ना त्या निमित्तानें, केव्हा कामासाठीं तर केव्हा कामें बुडवून कधीं स्वतःच्या खर्चानें तर कधीं पक्षकारांनीं सोपविलेल्या कामगिरीच्या निमित्तान काजीवरमपासून पेशावरपर्यंत प्रवास केला आणि शेकडों नाणीं जमविलीं इतिहासाची निश्चित माहिती असावी म्हणून मी कालानुक्रमवार आणि ऐतिहासिक घटना आणि मुद्रा व शिल्पकृत्यें याचे बाबतीत तपशीलवार असे राजघराण्याचे समांतर स्तभाचे तक्ते तयार केले अधिकृत

इतिहासप्रथारून हे तक्ते सहज पुरे करता येतील आणि या पद्धतीनें हिंदुस्थानचा इतिहास कोणी तयार केलेला नसल्यामुळे आपण सहजासहजा मैलोग्र होऊन जाऊ, अशी भोळी आकांक्षा मी मनाशी बाळगली होती प्राथमिक याद्या तयार झाल्या व त्यात तपशील नमूद होऊ लागले, तेव्हा प्रत्ययास आलं, कीं हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासातल्या सूक्ष्मच नव्हे, स्थूल बाबतीतही एका पंडिताचा दुसऱ्याशी मेळ नाही सर्वांचं विवेचन तात्पुरतं तर्कशुद्ध वाटे. निखळमान्य अशा या पण्डिताच्या भिन्न मताची व मतभिन्नतेच्या कारणाची माहिती नमूद असावी म्हणून तक्त्यातील खणात तपशील भरू लागलों. तेव्हां प्रामाणिकपणे सामाज्यामोंवतीं व्यूह निर्माण झाले. ते परस्परांशीं झगडू लागले आणि त्यात गुरफटून मी गाधळून गेलों.

एखाद्या मंत्राची बीजशक्ति किंवा प्रक्रिया अवगत नसताहि केवळ चाळा म्हणून तो जपावा आणि यदृच्छेनें हा जप शास्त्रोक्त व पर्वकाळीं होऊन गुरुदर्शन होण्यापुरती सिद्धि प्राप्त व्हावी, असा अकल्पित प्रकार या बाबतीत झाला

प्राचीन नाणीं गोळा करीत असताना मला महाराष्ट्रात जागोजाग सातवाहनाचीं काहीं नाणीं मिळालीं होतीं पुराणात व हिंदुस्थानच्या देशी विदेशी इतिहासात सातवाहनाना आन्ध्र ही संज्ञा दिलेली आहे गतानुगतिकत्वानें माझ्या तक्त्यातील एतद्विषयक स्तंभावर मीं हेच शीर्षक लावलें होतें माझ्याकडे काहीं प्राचीन नाणीं आहेत व त्यात सातवाहनाचींहा नाणीं आहेत असं समजल्यावरून तीं पाहण्यासाठीं येथील भाण्डारकर ओरिएन्टल रिसर्च इंस्टिट्यूटचे प्रमुख व विख्यात संशोधक डॉ सुकथनकर हे एके सकाळीं माझ्या एका स्नेह्याबरोबर माझकडे आले आंतरराष्ट्रीय कीर्तीचे विद्वान आपण होऊन माझकडे आले, मी हुरळलो त्यानीं माझीं नाणीं पाहिलीं व तक्ते पाहिले औपचारिक अभिनंदनानंतर झालेल्या संभाषणावरून माझ्या तुटपुंज्या ज्ञानाची व गाढ अज्ञानाची त्याना कल्पना आली आठवतें कीं माझ्या तक्त्यातील आन्ध्र या शीर्षकावर बोट ठेवून ते म्हणाले, ' सातवाहन हे आन्ध्र नव्हते, त्याच्या राजवटीशी संबद्ध असलेले पौराणिक व साहित्यिक उल्लेख, शिलालेख, शिल्पकृत्यें व मुद्रा आणि गाथासप्तशती वगैरे किती तरी साधन आजवर उपलब्ध झालेलीं आहेत, या उपेक्षित कालखण्डावर तुम्हीं आपलें लक्ष केंद्रित करा आणि शक्य तर त्याचा इतिहास लिहा '

गायासप्तशतीचें नाव निघताच मी चमकलों अप्राप्य द्राक्षामुळे आलेल्या सारख्या आविर्भावानें म्हणालों, मी तर ऐकलें की तो केवळ उत्तान लावण्याचा संग्रह आहे जणू मी एक आर्य पण्डित व 'संस्कृति संरक्षक' आहे आणि या मुळेंच तो मी आजवर वाचला नव्हता !

हा प्रवाद खरा नाहीं, ते म्हणाले : गायासप्तशती हा प्राकृत वाङ्मयातील आद्य व अग्रगण्य ग्रंथ आहे, प्राचीन व बहुमोल सुभाषिताचा संग्रह आहे, प्राचीन महाराष्ट्राच्या ग्रामीण जीवनाचें प्रामाणिक प्रतिबिंब त्यात उमटलेलें आहे, विद्वानानीं त्याची स्तुति केलेली आहे, साहित्यशास्त्रज्ञानीं त्यातील वचनें उध्दृत केलेलीं आहेत, अनेक रसिक पण्डितानीं त्यावर टीका लिहिल्या आहेत, तुम्हीं नीट वाचून पहा, म्हणजे गाथाचें महत्त्व व स्वारस्य प्रत्ययाला येईल

त्या दिवशीं हें बोलणें तेवढ्यावरच राहिलें मी म्हटलें, त्याचे मार्ग वेगळे, आपले वेगळे कोठें अज्ञाताचा शोध लावणारा दर्यावर्दी व कोठे रुपाय्यावरला हेलकरी ! पुन्हा कधीं भेटलेच तर हवापाण्याच्या गोष्टी करून वा व्यवसायाची शिष्ट सबब सागून वेळ मारून नेऊ पण प्रसंग आला तेव्हा तें जमलें नाहीं दुसऱ्या काहीं निमित्तानें ते मजकडे आले असता सातवाहनाचा विषय काढून जणू खणपटीलाच बसले अभ्यासासाठीं नेमून दिलेल्या गृहकृत्याबाबत चुकार विद्यार्थ्यानें उडवाउडवी करावी, तसें माझें वर्तन पाहून त्याना उद्वेग वाटलाचें दिसल कोण कोणासाठीं व कशासाठीं व्याकुल होतो !

आणि त्याच वेळीं महाराष्ट्राच्या प्राचीन, विशेषत सातवाहनाच्या इतिहासाचा व गाथासप्तशतीचा अभ्यास करावयाचा मी निश्चय केला

सातवाहनांचें मूलस्थान The Home of the Sātavāhanas हा या विषयावरला माझा पहिला लेख त्याची जुजबी कागदावर टंकमुद्रित केलेला प्रत मी त्याच्या हातीं दिली तेव्हा त्याना किती समाधान वाटल म्हणून सागू ? हा लेख वाचून पाहिल्यानतर तो त्यानीं ॲनल्समध्यें छापावयाचें ठरविलें आणि मला तस सागितलें तेव्हा मी म्हणालों,

आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या महापण्डिताचे संशोधनात्मक लेख आपल्या नियतकालिकात यतात त्याच्या पक्तींत बसण्याची माझी पात्रता आहे किंवा नस हे तुम्हा ठरवावयाच आहे या लेखावरून मला कोणी महामूर्खात काढलें तर त्याच अपयश पर्यायानें तुमच्यावर येणार

आलेल्या त्रुटित हस्तलिखिताचा अभ्यास करून त्यांनी 'शालिवाहन व शालिवाहनसप्तशती' हा निबंध मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीपुढे ता १९।३।१८७३ रोजी वाचला तो पुढे सदर संस्थेच्या नियतकालिकात प्रसिद्ध (J B B R A S' Vol. X, pp 128-38) झाला. यानंतर डॉ रामकृष्ण भांडारकरांनी मुंबई गॅझेटीयरसाठी लिहिलेल्या Early History of the Deccan (Goverement Central Press 1884) या ग्रंथात या विषयाचे आणखी विवेचन केलें श्री नारायण विष्णु बापट यांनी या ग्रंथाचे मराठीत भाषांतर (दखनचा प्राचीन इतिहास . १८८७) केलें. त्यात ते सांगतात, "प्राचीन महाराष्ट्रींत . सप्तशती नामक ग्रंथ . पद्यरत्नावलीच्या तऱ्हेचा असून त्यात बहुतकरून शृंगारपर ..पद्याचा संग्रह आहे. अन्ध्रभृत्याच्या कारकीर्दीत विद्याग्रंथकलापाची समृद्धीची स्थिति होती आणि प्राकृत भाषाचा व विशेषेकरून महाराष्ट्रीचा फार करून पहिल्यानेंच लोक ग्रंथ लिहिण्याचे कामीं उपयोग करू लागले असावे असा बेधडक सिद्धांत करण्यास बाध नाहीं."

महाराष्ट्राला गाथासप्तशतीच्या अंतरंगाचा पहिला परिचय करून देण्याचें श्रेय श्री. राजारामशास्त्री भागवतांचें. प्रथम ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालेला त्यांचा 'प्राकृत भाषेची विचिकित्सा' हा निबंध अलीकडे पुस्तकरूपात उपलब्ध झाला आहे त्यातील चोवीस पानें या विषयाला दिलेली आहेत त्यात त्यांनीं गाथासप्तशतींतील सोळा गाथा उध्दृत केल्या आहेत, तद्भव (३०), तत्सम (६३) व देशी (११२) शब्दांचा कोश दिला आहे, संपादक, लेखक व लेखिका यांबद्दल चर्चा केली आहे, तत्कालीन धार्मिक, सामाजिक व सांस्कृतिक स्थितिबद्दल गाथांतील उल्लेखावरून निघणारे निष्कर्ष नमूद केले आहेत माझ्या माहितीप्रमाणें मूळ ग्रंथाबद्दल दुसऱ्या कोणीही आजवर एवढे व इतकें चांगलें विवेचन व रसग्रहण केलेलें नाहीं शास्त्रीबुवा सांगतात, "सेतुबंधाच्या भाषेंत जसा व जितका कृत्रिमपणा आढळतो तसा व तितका साधेपणा सप्तशतींत आढळतो' गाथांतील साध्या उक्तींवर शृंगाराचा आरोप आलेला पाहून ते खवळून विचारतात, "शृंगाराची कावीळ झालेल्या आलंकारिकांनी जी भलतीच वाट दाखविली त्या वाटेनें प्राकृत ग्रंथावर संस्कृत टीका करणारे भट्ट व शास्त्री डोळे मिटून गेले, ही अंधपरंपरा दांडगी नव्हे काय?"

पुरातत्त्वभूषण श्री. राजवाडे आणि विद्याभूषण श्री. बुले यानीं अनुक्रमे 'सरस्वतीमंदिर' व 'विविधज्ञानविस्तार' या नियतकालिकांतून गाथासप्तशतींतील गणपती या विषयाची चर्चा केली. यानंतर बऱ्याच वर्षांनीं हाच वाद श्री. बुले शास्त्री (वागीश्वरी : वर्ष १, अंक १) व श्री. अग्रबुद्ध (वागीश्वरी : वर्ष ३, अंक १) यांचे दरम्यान झाला. त्याचा समारोप महामहोपाध्याय प्राचार्य मिराशी याना 'गाथासप्तशतीचा काल' या लेखात (युगवाणी : १९४६. मार्च) केला. हा वाद अनेक वर्षे चालला. पण तो सामान्य मराठी वाचकाच्या डोक्यावरून गेला आणि गाथासप्तशतीचें स्वारस्य त्याना अनुभवावयाला मिळालें नाही.

श्री प्र वॉ. कानिटकर यानीं 'विविधज्ञानविस्तारा'तून (वर्ष ६१ : अंक २ व ३) 'गाथासप्तशतींतील सुभाषितें' मराठी भाषांतरासह प्रसिद्ध केलीं. त्याचाच 'प्राकृत काव्यें व गाथासप्तशती' हा लेख 'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकें'त प्रसिद्ध झालेला आहे. १९४५ च्या 'दीपावली' वार्षिकांत मी 'गाथासप्तशती' या लेखात रससहृदयाच्या धर्तीनें या ग्रंथाचा ओझरता परिचय करून दिला. 'मौज' च्या १९४६ च्या दिवाळी अंकात श्री. वनहट्टी याना 'महाराष्ट्राचें पहिलें अमृतमधुर काव्य' ह्या लेखात या विषयाचा परामर्ष घेतला. त्यात त्यानीं केलेलें काहीं गाथांचें समवृत्त भाषांतर आलेलें आहे. 'वेद्याचें प्रेम विजयी होवो' (झंकार : १९४८, दिवाळी अंक), 'श्यामला' (दिपावली : १९४९), 'मद्यपान' वाङ्मयशोभा : मार्च, १९५०) आणि 'संकेत व संकेतस्थानें' (दीपावली : १९५१) या लेखांत गाथासप्तशतींतील त्या त्या विषयावरील उल्लेख एकत्रित करून त्यांची चर्चा मी केलेली आहे.

नियतकालिकाचें आयुष्य मर्यादित असतें, यामुळें असे लेख काळाच्या उदरात गडप होऊन जातात.

म्हणूनच म्हणावें लागतें कीं गाथासप्तशतीच्या बाबतीत सामान्य मराठी वाचकाचें ज्ञान जवळ जवळ शून्याकार आहे. गाथा या नामार्थावरून बोगाम वाटतें कीं हा सतवाङ्मयाचा प्रकार असावा आणि सप्तशती या नामार्थावरून बोगाम वाटतें कीं हा देवीवाङ्मयाचा ग्रंथ असावा! आणि आता तर काय. श्री. जोशी हे या ग्रंथाचें प्रकाशन करीत असल्यामुळें हे गैरसमज काहीं काळापर्यंत बळावण्याचा किंवा यामुळें ते टाकाविदय होण्याचा संभव आहे!

## ( ३ ) गाथासप्तशतीच्या मुद्रित व हस्तलिखित प्रती आणि टीका :

### मुद्रित प्रती

गाथासप्तशतीला पहिला मुद्रणसंस्कार देण्याचे श्रेय डॉ. वेबरचें, आणि या ग्रंथाचा सांगोपांग अभ्यास करण्याचेंही त्यांनी. गाथासप्तशतींतील ३७० गाथा १८७०साली Uber das Saptacatakam des Hala या नावानें लाइप्झिग येथें प्रसिद्ध केल्या १८७२ व १८७४ या सालांत आणखी काही गाथा मिळवून त्या त्यांनीं Zeitschrifter Deutschen Morgen landischen Gasellschaft या जर्मन नियतकालिकांतून (26 pp 735 foll) प्रसिद्ध केल्या गाथासप्तशतीची संपूर्ण आवृत्ति त्यांनीं १८८१साली लाइप्झिग येथून Das Saptacatakam Des Hala या नावानें प्रसिद्ध केली गाथासप्तशतीच्या मुद्रित प्रतींत वेबरची आवृत्ति अग्रगण्य आहे कालानुक्रमाच्या व शास्त्रशुद्धतेच्या दृष्टीनेंही ही आवृत्ति सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं अनेक हस्तलिखित प्रतींचा साधारण देवानें 'मुक्तावली' या नावानें 'वज्जा' पद्धतीनें मांडणी केलेल्या गाथासप्तशतीचा आणि कुलनाथ, गंगाधर व पीतांबर यांच्या टीकांचा उपयोग केलेला आहे त्यांनीं गाथासप्तशतीचे दोन भाग केलेले आहेत पहिल्या अधिकृत भागांत ६९८ गाथा दिल्या आहेत, उत्तरार्धांतील गाथा अनधिकृत किंवा प्रक्षिप्त आहेत संपादकाच्या नावाचा उल्लेख करणाऱ्या अंतिम गाथांचाही पहिल्या भागांत समावेश केल्यामुळें गंगाधराच्या प्रतींत आढळणाऱ्या ६९७ ते ६९९ ह्या गाथा त्यांना उत्तरार्धांत घालाव्या लागल्या आहेत उत्तरार्धांतील क्र ७०१ व ७०२ या गाथा त्यांना अनुक्रमे कुलनाथ व पीतांबर यांच्या सटीक प्रतांवरून घेतल्या आहेत, क्र ७०३ ते ७९३ या गाथा गाथासप्तशतीच्या वेगवेगळ्या हस्तलिखितांवरून, क्र ७९४ ते ८०८ या गाथा साधारणदेवाच्या मुक्तावलीवरून, क्र ८०९ ते ९४७ आणि क्र ९४८ ते ९५९ या गाथा अनुक्रमें गाथासप्तशतीच्या पहिल्या व दुसऱ्या तेलगु प्रतांवरून आणि क्र ९६० ते ९९४ या गाथा अलंकारशास्त्रावरील वेगवेगळ्या ग्रंथांवरून घेतलेल्या आहेत क्र १ ते ९६५ या गाथांचे हस्तलिखितांत आढळून येणारे सूक्ष्म प्राकृत व छायांतील स्थूल संस्कृत पाठभेदही त्यांनीं दिले आहेत क्र ९६६ ते ९९४ या गाथांचे पाठभेद

त्यानीं दिलेले नाहीत गाथांच्या संस्कृत छाया त्यांनीं दिलेल्या नाहीत कोठें कोठें संस्कृत टीकांतील उतारे दिले आहेत जागोजाग टीपा दिल्या आहेत आणि काहीं गाथांचे जर्मन भाषांतरही केलं आहे विस्तृत प्रस्तावना, वेगवेगळ्या हस्तलिखितांतील गाथांच्या क्रमांकाचा मेळ घालणारीं कोष्टकें, गाथारंभाची सूचि आणि संपूर्ण शब्दसूचि या वैशिष्ट्यांमुळे हा ग्रंथ सर्वांगपरिपूर्ण आहे

हिंदुस्थानात गाथासप्तशती प्रथम प्रसिद्ध करण्याचें श्रेय निर्णयसागरचें पंडित दुर्गाप्रसाद व श्री पणशीकरशास्त्री यांनीं संपादित केलेला गाथासप्तशती गंगाधरभट्टाच्या भावलेशप्रकाशिका या टीकेसह निर्णयसागरनें काव्यमालेत ( क्र २१ ) प्रसिद्ध केला ही प्रत चार हस्तलिखितांवर आधारलेला असून त्यांतील पाठभेद मुद्रित आवृत्तीत नमूद केलेले आहेत संपादकांनीं सातवाहन या शीर्षकाखालीं लिहिलेली संस्कृत प्रस्तावना व गाथांची अकारवारीने केलेली अनुक्रमणिका ग्रंथास जोडलेली आहे या प्रतीची द्वितीयावृत्ति १९११ सालीं प्रसिध्द झाली आहे पंडित मथुरानाथ शास्त्री यांनीं लिहिलेला संस्कृत छाया आणि स्वतंत्र व विस्तृत प्रस्तावना व टीका यासह मूळ गाथासप्तशती निर्णयसागरनेंच मुद्रित व प्रसिध्द केली आहे पंजाब युनिव्हर्सिटीच्या लायब्ररींतील हस्तलिखिताच्या आधारानं लाहोरचे श्री जगदीशलाल यांनीं संपादिलेली गाथासप्तशती प्रथम ओरिएन्टल कॉलेज मॅगेझीनमध्यें आणि नंतर ग्रंथरूपानें प्रसिद्ध झाली आहे मूळ हस्तलिखित त्रुटित आहे चवथ्या शतकातील शेवटच्या १४, पाचव्या शतकातील १००, सहाव्या शतकातील ५५ व सातव्या शतकातील ९८ एवढ्याच गाथा या प्रतींत दिलेल्या आहेत या गाथांवरील हारितात्र पीतांबराची अप्रकाशित टीका या प्रतींत दिलेली आहे आरंभीं विवेचनात्मक प्रस्तावना व अखेरीस गाथांची वर्णानुक्रमसूचि जोडलेली आहे

## हस्तलिखितें

गाथासप्तशतीचीं हस्तलिखितें हिंदुस्थानात काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत जागोजाग उपलब्ध झालेला आहेत आपल्याला मिळालेल्या हस्तलिखितांचें पृथक्करण करून वेबरनें विधान केलं आहे ( Vorwort p xxvii ) कीं गाथासप्तशतीचे क्रमांत कमी सहा भिन्न पाठ प्रचलित आहेत, त्यामधील भिन्नता गाथांच्या संख्येंत व मांडणींतही आढळून येते, सर्व प्रतांना साधारण अशा गाथांची संख्या ४३० आहे आणि गाथासप्तशतीचा मूळचा गाभा एवढाच आहे

हाल सातवाहनानें एक कोटि गाथा जमविल्या व त्यांतून सातशें निवडून त्याचा कोष केला, असा अतर्गत पुरावा आहे. अर्थात् मूळ गाथा सातशेंच असल्या पाहिजेत.

गाथासप्तशतींतील सुभाषितें सकीर्ण स्वरूपाच्या आहेत, वर्गीकरणाच्या कोणत्याही पद्धतीनें त्यांची बांधणी केलेली नाहीं म्हणून नकला करणारांना किंवा करविणाराना जणू सपादकाचे अधिकार मिळाले या अधिकारात मुळातल्या काहीं गाथा वगळून त्यांचे जागीं त्यांनीं आपल्या, आपल्या आवडीच्या किंवा स्थानिक प्रचारातल्या गाथाचा आपल्या प्रतींत समावेश केला. वेबरच्या आवृत्तीतील उत्तरार्धांतील अनेक गाथा उत्तरकालीन आहेत आणि त्यांचें अंतर्याम व वृत्तादि बाह्यागही मुळाहून भिन्न आहे हें सहज दिसून येतें. हस्तलिखिताच्या युगात ग्रथाची अधिकृत आवृत्ति उपलब्ध नसता त्याची लोकप्रियता व प्रसार जितका अधिक तितके पाठ व पाठभेद आणि प्रक्षिप्त भाग अधिक

साधारणदेवानें ' मुक्तावलि ' या नांवानें सपादित केलेल्या गाथासप्तशतीतील गाथाची मांडणी ' वज्या ' पद्धतीनें केलेली आहे. वर्गीकरणाची ही पद्धत उघड उत्तरकालीन आहे वज्या या सज्ञेचें स्पष्टीकरण वज्जालग्गात दिलेलें आहे

एक्कत्थे पत्थावे जत्थ पढिज्जन्ति पउरगाहाओ ।
त खलु वज्जालग्ग वज्ज त्ति य पद्धई भणिया ॥

वज्या ( वज्जा दे = पद्धई = पद्धति ) म्हणजे एकाच विषयावरील वचनाचा सग्रह करण्याची पद्धति. कवींद्रवचनसमुच्चयाच्या प्रस्तावनेंत डॉ थॉमस सांगतात की वज्जा, वज्या व वर्ग हे शब्द समानार्थी ( Bibliotheca Indica No 1309. Ed F W Thomas ) आहेत वज्जालग्ग, कवींद्र-वचनसमुच्चय, सुभाषितावली, सूक्तिमुक्तावली वगैरे मध्ययुगीन सुभाषित-संग्रहाची मांडणी याच धर्तीची आहे

साधारणदेवाच्या मुक्तावलीतील वर्गीकरण येथ देता वेबरच्या आवृत्तीतील विखुरलेले सदर्भ गोळा करून प्रथम अक्षरानुक्रमानें जुळवून हें कोष्टक तयार केलें आहे कसाराचा मुद्रारला माझ्या प्रतीशीं जुळविलेला आहे

वेबरला उपलब्ध झालेल्या तेलग प्रतीची माडणी वज्यापद्धतीचीच आहे, पण मुक्तावलीहून हें वर्गीकरण वेगळें आहे आणि माडणीची पद्धतही वेगळी आहे. चार पाच विषयावरील मिळून एकदर शभर अशा गाथांचीं सात शतकें या प्रतींत आहेत इतर प्रतींत न आढळणाऱ्या अशा बऱ्याच गाथा या प्रतींत मिळालेल्या दिलेलीं आहेत तेलग प्रतीची शतकवार माडणी अशी आहे ( १ ) जोक्कार (जयकार), णमाग्गार ( नमस्कार ), सुहासिअ (सुभाषित), अन्नावरस (अन्यापदेश ),मुद्धणववहू (मुग्धा नववधू ),होन्तवहुआ ( भविष्यत् वधू ) ( २ ) इत्थिआवण्णण ( इत्थिआ=स्त्री ), सुरआणुराअ ( सुरतानुराग ) ( ३ ) विरहपद्धति. ( ४ ) दूईवअण ( दूतीवचन ), गामीण ( ग्रामीण ), कुलवहू ( कुलवधू ) ( ५ ) अडअणा ( असती ), अभिसारिआ ( अभिसारिका ), वेसा ( वेश्या ), जरई ( वृद्धा ), करमरा ( बन्दिना ) ( ६ ) पणअक्लहपद्धई ( प्रणयकलहपद्धति ). ( ७ ) खण्डिआ ( खण्डिता ), पुप्फवई ( पुष्पवती ) गब्भिणी ( गर्भिणी ), वाही ( व्याधस्त्री ), उड्डवण्णण ( उडुवर्णन )

## टीका

गाथासप्तशतीवरील अनेक टीका आजवर उपलब्ध झालेल्या आहेत. ऑफ्रेख्टच्या यादींत पुढील टीकाकाराचीं नावें नमूद केलेलीं आहेत ( १ ) कुलनाथ, (२) गगाधर, (३) पीताबर, ( ४ ) प्रेमराज, ( ५ ) भुवनपाल आणि ( ६ ) साधारणदेव पीताबराच्या टीकेंत पुढील टीकाकाराचा उल्लेख आलेला आहे ( ७ ) कुलपति, ( ८ ) चैतन्य, ( ९ ) भट्ट, ( १० ) भट्ट राघव आणि (११) भोजराज डॉ रामकृष्ण भाडारकराना (१२) आजड या टीकाकाराचा उल्लेख केलेला आहे ( Report on the Search for Sanskrit Manuscripts during the years 1887 1891 p 20 ) पजाब युनिव्हर्सिटीच्या लायब्ररींत ( १३ ) माधवयज्व मिश्रानें लिहिलेल्या 'तात्पर्यदीपिका' नांवाच्या टीकेच हस्तलिखित आहे (*GathaSapta Sati* Jagadish Lal Shastri Intro p 15) यापैकीं गगाधर व पीतांबर याच्या टीका मुद्रित झालेल्या आहेत ( १४ ) पण्डित मथुरानाथ शास्त्री याची अर्वाचीन टीका निर्णय सागरनें प्रसिद्ध केली आहे पीताबर व गगाधर याना आणखी काहीं टीका

उपलब्ध होत्या असें त्याच्या टीकातील उल्लेखावरून दिसतें, मात्र या टीका-काराचीं नावें त्यानीं दिलेलीं नाहींत, पण ' इति टीकान्तरे ' ' इति प्राचीन टीका ' असे हवाले दिले आहेत.

गाथासप्तशतीचा टीकाकार कुलनाथ, कुलनाथदेव व कुलबालदेव हे एकच असें त्याच्या टीकाच्या भिन्न प्रतींवरून दिसते या टीकेचें एक हस्तलिखित भांडारकर इन्स्टिट्यूटच्या संग्रही आहे [ गाथा कोश No. 386 of 1888-89 New No 30 गाथासंख्या ७०० ] या संग्रहात श्री भुवनपालाची ' छेकोक्तिविचार-लीला , व श्री प्रेमराजाची ' साहित्यजन्मावनि ' या टीकाच्या त्रुटित प्रती (अनुक्रमें No.245 of 1880-81, गाथासंख्या ६००, No 181 of 1879-80 New No ३० गाथा संख्या ४४०) आहेत. श्री भुवनपाल हा जैन असावा कारण सहाव्या शतकावरील टीकेच्या आरभीं त्यानें जिनाला वदन केलेल आहे. आपल्या टीकेंत प्रेमराजानें स्वत बद्दल माहिती दिली आहे ती अशी श्री क्षत्रिय श्री सहगिल (सहिगल,सहिगिल) वंशोद्भव श्री प्रयागदासात्मज (प्रियागदासात्मज) श्री प्रेमराज '

टीकाची संख्या हे मूळ ग्रंथाची लोकप्रियता अजमावण्याचें एक साधन आहे काव्यप्रकाशावरील ७२ टीकाची यादी महामहोपाध्याय श्री काणे यानीं (Sāhitya-Darpaṇa. Index p. clxv-clxvi) दिली आहे पण काव्यप्रकाश हा ग्रंथ सूत्रमय असून समजण्यास अवघड आहे गाथासप्तशतीची भाषा सोपी व विषय सुबोध आहेत म्हणून विद्यार्थ्यांच्या नव्हे, रसिकान्या आग्रहामुळें किंवा स्वयस्फूर्तीनें या टीका लिहिण्यात आल्या असल्या पाहिजेत, हें उघड आहे

गाथासप्तशतीच्या टीकाकारात भट्ट गंगाधर हाच विशेष विख्यात व लोकप्रिय आहे कारण त्याच्याच टीकेच्या अनेक हस्तलिखित प्रती जागोजाग उपलब्ध झालेल्या आहेत गंगाधराच्या देशकालाबद्दल काहाही माहिती उपलब्ध नाहीं, एवढेंच पंडित दुर्गाप्रसाद यानीं आपल्या प्रस्तावनेंत सागितलें आहे त्याच्या टीकेवरून त्याच्याबद्दल थोडीफार माहिती मिळू शकते, ती अशी :

पण्डित दुर्गाप्रसाद याना जयपुर येथ उपलब्ध झालेल्या 'गाथासप्तशती'वरील गगाधराच्या टीकेच्या हस्तलिखितावर 'नेत्ररामदृभूशाके ( १५३२ ) लिखित' असा लेखनकाल नमूद आहे हा आकडा सवताचा आहे असे मानले तर या प्रतीचा लेखनकाल १५९१ इ हा येतो गगाधराने टीकेत वापरलेल्या ग्रथावरून त्याच्या काळाची वरील मर्यादा ठरविता येते अनेकार्थ, अमरकोश, देशी, मेदिनी व हारावली या कोशाचा त्याने टीकेत जागोजाग वापर केलेला आहे पैकी मेदिनी हा कोश चवदाव्या शतकाच्या अखेरीस तयार झाला असावा असा डॉ भाडारकराचा अदाज (मालतीमाधव प्रस्तावना १८७५ पृ.१३)आहे या उल्लेखावरून निष्कर्ष निघतो की गगाधराचा काल पधरावें किंवा सोळावें शतक हा असावा क्र ४९८ या गाथेत 'झिल्ली' हा शब्द आलेला आहे टीकेत गगाधर सागतो "झिल्ली 'झींगुर' इति कान्यकुब्जभाषया प्रसिद्ध कीटविशेष ।' यावरून वेबर निष्कर्ष काढतो की तो मध्यदेशातील अगर कनोजचा रहिवासी असावा ( Vorwort p xxxiv ) तो वैदिक-धर्मानुयायी व शैव असावा दाक्षिणात्यामध्यें प्रचलित असलेली मातुलकन्या परिणयाची प्रथा त्याला माहीत नसल्यामुळें वाटतें की तो यजुर्वेदी असावा गाथेचा विषय, प्रसग, नायक व नायिका याचा प्रास्ताविक परिचय करून दिल्यानतर गगाधर गाथेचा आशय थोडक्या शब्दात सागतो, श्लेष असेल तर त्याची फोड सागतो त्याने प्राकृत भाषेचा व व्याकरणाचा चागला अभ्यास केला होता त्याने टीकेत प्राकृत व्याकरणातील नियम उध्दृत केले आहेत आणि देशी शब्दाचे अर्थ साधार दिले आहेत, यावरून त्याच्या काळात वाचकाना प्राकृत व्याकरण अवगत नव्हतें व देशी शब्द प्रचारात राहिलेले नव्हते असें दिसतें त्यानें साहित्यशास्त्राचा चागला अभ्यास केलेला होता पिङ्गल व मातृगुप्ताचार्य या प्राचीन लेखकाचा आणि काव्यप्रकाश व साहित्यदर्पण या मध्ययुगीन ग्रथाचा त्यानें उल्लेख केलेला आहे त्यानें कामशास्त्राचहि अध्ययन केलें होतें रतिरहस्य, कामसूत्र व अनङ्गरग या ग्रथाचा त्यानें उल्लेख केलेला आहे त्याने टीका लिहिली तेव्हा त्याच्यासमोर गाथासप्तशतीचे अनेक पाठ व टीका होत्या, असें दिसतें गाथासप्तशतीतील वचन शृगारिक आहेत असें गृहीत धरून त्यानें टीका लिहिलेली आहे तरीहि त्याच्यापूर्वी होऊन गेलेल्या आलकारिकाच्या

मानानें त्यानें पुष्कळच सयम दाखविला आहे विद्वानाना न समजण्यासारखें किंवा सागण्यासारखें असें गाथासप्तशतींत काहीं नसल्यामुळे त्यानें आपली भावलेशप्रकाशिका ही टीका रसिकासाठीं, सुसस्कृत रसिकासाठीं लिहिलेली आहे असे तिच्या स्वरूपावरून दिसतें

## ( ४ ) गाथासप्तशतीच्या या आवृत्तीची मांडणी व वैशिष्ट्यें :

वेगवेगळ्या मुद्रित आवृत्तींवरून व लिखित प्रतींवरून अभ्यास करीत असताना आलेल्या अडचणी आणि महाराष्ट्रातील अभ्यासकाच्या आणि सर्वसाधारण व रसिक वाचकाच्या अपेक्षा विचारात घेऊन मीं या आवृत्तीची मांडणी थोडी वेगळी केलेली आहे माझ्या मांडणीचा व या आवृत्तींतील वैशिष्ट्याचा तपशील येथें सागतों

( १ ) क्रमाक प्रत्येक गाथेच्या आरभा घातले व अखेरीस शतकातर्गत क्रमाक दिले आहेत प्रत्येक पानावर आतल्या वरच्या कोपऱ्यात त्या पानावर सुरू होणाऱ्या गाथेचें शतक व शतकातर्गत क्रमाक दिलेले आहेत हिंदुस्थानात सर्वत्र काव्यमाला प्रत वापरण्यात येत असल्यामुळें तातील अनुक्रम मी स्वीकारलेला आहे हस्तलिखिताच्या वेगवेगळ्या प्रतात गाथाचे अनुक्रम वेगवेगळे आहेत वेबरनें त्याच्या मुकाबल्याचीं कोष्टकें दिलीं आहेत ( २ ) प्राकृत गाथा व त्याच्या ( ३ ) सस्कृत छाया याचा मुकाबला मी बहुधा गगाधराशीं ठेवला आहे ( ४ ) माझ्या आवृत्तातील क्र ७०१ पासून ९९५ पर्यंतच्या गाथा वेबरच्या जर्मन आवृत्तावरून घेतल्या आहेत वर नमूद केलेल्या कारणा मुळें अनुक्रम तोच असला तरी क्रमाक तेच आले नाहींत मुकाबला पहाणाऱ्या वाचकाच्या सोयीसाठीं या गाथाच अखेरीस वेबरचे क्रमाक दृत्तींत दिले आहेत ( ५ ) वबरने कोणत्याही गाथाच्या छाया दिल्या नाहींत उत्तरार्धातील गाथापैकीं ज्याच्या छाया मला अलकारवाङ्मयात उपलब्ध झाल्या त्या मी दिल्या आहेत ( ६ ) क्र ९९५ ते १००६ या गाथा प्रबन्धचिंतामणीवरून [ ( १ ) पुरातन प्रबन्धसग्रह सिंधी जन ग्रथ माला २) The Prabandha Chintamani C H Tawney Bibliotheca Indica ] घेतलेल्या आहेत.

या गाथा हालानें गाथासप्तशतीसाठीं संपादन केल्या असा तेथें उल्लेख आलेला आहे गाथासप्तशतीच्या कोणत्याही हस्तलिखित अगर मुद्रित प्रतींत या गाथा नाहीत (७) प्रत्येक गाथेला मी अन्वर्थक संज्ञा दिली आहे त्यामुळें काहीं ठिकाणा टीकेचा संक्षेप करणें शक्य झाले आहे (८) मराठी संज्ञासमोर इंग्रजी शीर्षकें दिलीं आहेत ती मुख्यत्वेंकरून परदेशी वाचकासाठीं आहेत इंग्रजी व मराठी संज्ञा समानार्था आहेतच असें नाहीं (९) गाथाचें मराठी भाषांतर शक्य तितकें सोपें केलेलें आहे मुळात नसलेला पण समजुतीसाठा अवश्य असलेला भाग कंसात घातला आहे निरुपयोगी अशा एकाही शब्दाची योजना करावयाची नाहीं, अभिप्रेत अर्थ शक्य तितक्या कमी शब्दात व्यक्त कराव याचा अशा कटाक्षानें गाथाचा रचना केलेली असल्यामुळें भाषांतर करणें वेळोवेळीं फार अवघड वाटल (१०) भाषांतरापुढें वेगळ्या परिच्छेदात टीका दिलेली आहे संस्कृत गाथ्यावरील टीकाकार अन्वयार्थ सागतात मीं या पध्दतीचा स्वीकार केलेला नाहीं गंगाधराची टीका त्रोटक आहे आणि पंडित मथुरानाथ शास्त्री याची अति विस्तृत गाथासप्तशतींतील सर्वच गाथा शृंगारिक आहेत असं गृहीत धरून त्याचा कमा अर्थ लावण्यासाठीं टीकाकारानीं व गाथा उध्दृत करणाऱ्या साहित्यशास्त्रकारानीं जणू परस्परागीं स्पर्धा माडलेली आहे उलट पक्षीं प्रत्येक गाथेंत काही गंभीर नीतितत्त्व आहे असें गृहीत धरून पीतांबरानें टीका लिहिली आहे माझी टीका अशी एकागी नाहीं, आधुनिक पद्धतीनें लिहिलेली आहे, संयमानं लिहिलेली आहे गाथासप्तशतीवरील संस्कृत टीका वाचल्या असतील त्यानाच माझ्या संयमाची प्रचीति जागोजाग येईल मी शृंगाराचा परिपोष उत्तानात होऊ दिलेला नाहीं तरीही काही प्रतिष्ठित मजकर सभ्यतेच्या मर्यादा ओलाडल्याचा आरोप करताल या संयमामुळें काहीं रसिकाचा अपेक्षाभंग होईल हें मी जाणून आहे (११) माझ्या टीकेंत मीं सर्व उपलब्ध टीकांचा उपयोग केलेला आहे (१२) प्रत्येक गाथेचे मला महत्त्वाचे वाटले तेवढेच पाठभेद पादटीपात नमूद केले आहेत कितीही क्षुल्लक असला तरी प्रत्येक पाठभेद साधार नमूद करावयाचाच ही आधुनिक संशोधकाची पद्धत मी स्वीकारली नाहीं सामान्य वाचकाना व अभ्यासू वाचकानाही त्याचा कारसा उपयोग होत नाहीं प्रारंभीं (१३) विस्तृत व विवेचक उपोद्धात दिलेला

आहे आणि असरास अनेक परिशिष्ट जोडलेली आहेत पैकी ( १४ ) गाथाच्या आरंभाची अकारानुक्रमें अनुक्रमणिका ( ११ ) अलंकाराचें शोधक, ( १ ) कवि-कवयित्री याची नामसूचि आणि ( १७ ) शब्दकोश हीं विशेष महत्त्वाचीं आहेत गाथेच्या आरंभींच पाठभेद असला तर तो ही वेगळें आपल्या अनुक्रमणिकेत नमूद केला आहे ही पञ्जत मुळगांवकरून हस्तलिखिताचा अभ्यास करणा राना व अन्य ग्रंथातील सदर्भाचा पडताळा पाहणारानाच सोयीची आहे ता मा स्वीकारली नाहा मा वापरलेल्या मुद्रित व हस्तलिखित प्रतात मिळालीं तेवढीं लेखक लेखिकाचा सर्व नावें मी परिशिष्टात दिलेली आहेत पीतांबर व भुवनपाल याना नमूद केलेलीं नावें कोठ जुळतात, कोठ जुळत नाहींत आज नाहा उद्या लागाला तरा त्याचा उपयोग होणें शक्य आहे अशा खात्री झाली, म्हणूनच ह कोष्टक तयार केल आहे अलंकाराच्या व्याख्या तेवढ्या थोडक्यात दिल्या आहेत विस्तार टाळण्यासाठीं अधिक विवेचन केलेलें नाहीं कोणी कोणता गाथा कोणत्या अलकाराचे उदाहरण म्हणून उदाहृत केलेली आहे याचा तपशील कोष्टकात दिलेला आहे गाथासप्तशतींत आलेल्या प्रत्येक शब्दाची सूचि वेगरन सदर्भासह दिलेली आहे, बऱ्याच शब्दाचे अर्थ दिलेले नाहींत सत्र देशा व निवडक प्राकृत असे शब्द त्याच्या अर्थासह मी माझ्या शब्दकोशात दिलेले आहेत विस्तार टाळण्यासाठीं सर्व सदर्भ मात्र दिलेले नाहात मराठातील प्रचलित शब्द व वाक्प्रचार याशा यापैकी काहींचा सबध मा जुळविलेला आहे मी प्राकृत भाषेचा व व्युत्पत्तिशास्त्राचा सशास्त्र अभ्यास केलेला नाहीं यामुळ काही प्रमाद अजाणतेपण झालेले असण्याचा संभव आहे

देवानें दिली तेवढी बुद्धि दैवानें दिल्या तेवढ्या वळात केंद्रित करून शक्य तेवढे परिश्रम करून माझ्या मत शक्य तितका सर्वांगपरिपूर्ण अशी ही गाथा सप्तशतीची मराठी आवृत्ती मी आज महाराष्ट्र-सरस्वतीच्या चरणीं ठेवात आहे यातील वैगुण्यें कोणी निदर्शनास आणल्यास तीं दूर करण्यास आणि कोणा आणखी एखादा दिशा दाखविल्यास आणखी परिश्रम करण्यास मी राजी आहे गाथासप्तशती अमृतमधुर आहे ही प्राकृत माधुरी मराठीच्या नगरा वाहून आणणाऱ्या पाणक्याच श्रेय मिळालें तरी तेवढें मला पुरें आहे या ग्रंथाच्या वाचनान महाराष्ट्रात गातवाहन या महाराष्ट्राच्या आद्य महा वशाच्या इतिहासाबद्दल अधुकशीही जिज्ञासा व अभिमान उत्पन्न झाला तर माझे दुबळे हात गगनाला पोंचले असें समाधान मला होईल

## ( ५ ) प्राकृत भाषा व सारस्वत :

### प्राकृत भाषांची उत्क्रांति :

गाथासप्तशती महाराष्ट्री प्राकृतात गाथावृत्तात रचलेली आहे.

प्राकृत भाषा अनेक आहेत, देशकालपरत्वें आणि जातिधर्मपरत्वे प्राकृत भाषा सस्कृतोद्भव आहेत असें मानण्याकडे आधुनिक संशोधकांचा कल आहे संशोधक सांगतात, प्राकृत ही संज्ञा प्रकृति किंवा प्रकृत या संस्कृत शब्दापासून सिद्ध झालेली आहे. प्रकृति म्हणजे मूल कारण, मूल धर्म, मूल स्थिति, मूल स्वभाव, मूल स्वरूप रुद्रटाच्या ( इ स. ८०० ते८५० ) काव्यालंकाराचा टीकाकार नमिसाधु ( लेखनकाल इ स. १०६८ ) सांगतो : (काव्यालंकार : निर्णयसागर. पृ. १३ ) "प्रकृतेति। सकलजगज्जन्तूना व्याकरणादिभिरनाहितसंस्कार. सहजो वचनव्यापार. प्रकृति.। तत्र भवं सैव वा प्राकृतम्।" प्राकृत म्हणजे सस्कृतीच्या संस्कारापासून व व्याकरणाच्या नियंत्रणापासून अलिप्त अशी सामान्य जनतेची स्वभावसिद्ध बोलभाषा. उलटपक्षीं संस्कृत ही आर्यांची, शिष्टांची, सुसंस्कृतांची पण्डितांची, देवांची, व्याकरणाच्या नियमानीं बांधलेली भाषा. प्रकृति या शब्दाच्या प्रजा या अर्थावरून ( उदा : राजा प्रकृतिरञ्जनात् प्राकृत म्हणजे प्रजेची भाषा असा अर्थ लावण्यात आलेला आहे उलटपक्षीं संस्कृत ही राज्यकर्त्यांची, राजदरबारची, यज्ञशाळेची, मंत्राची भाषा यावरून या दोन्ही भाषा एकाच काळा प्रचलित असल्या पाहिजेत असें अनुमान निघतें. प्राकृतसंजीवनीत सांगितलें आहे, "प्राकृतस्य तु सर्वमेव संस्कृतं योनि ।" उलटपक्षीं डॉ. गुणे सांगतात ( An Introduction to Comparative Philology. p. 161 ) कीं संस्कृत व प्राकृत याचें कुळ वेगळा आहेत भिन्न मूलत्वाचा सिद्धान्त टिकण्यासारखा नाहीं. दोन्ही भाषांवर एतद्देशीय अन्य भाषांचे संस्कार झालेले आहेत संस्कृत शब्दांची प्राकृत रूपं कशीं करावीत हव प्राकृत व्याकरणकार सुस्तरीत्या सांगतात, जनव्यवहाराच्या ओघांत अपभ्रंश कसे होतात त्याचें विवेचन करीत नाहींत ( Gaudavaho Shri S P Pandit Introduction : p. lvi ) श्री राजारामशास्त्री भागवत (संस्कृत व प्राकृत : पृ १५-६ ) सांगतात, "प्रकृति हा शब्द संस्कृत

भाषेचा वाचक नाही " त्याच्या मतें " प्राकृत हा शब्द संस्कृतांत जें काही रोजचें व्हिवाटींतलें असेल त्यास लावतात प्राकृतात प्राकृत हा शब्द पाअड असा लिहितात या शब्दाच प्रगट असें संस्कृतांत भाषांतर होतें त्या अर्थी पाअडभाषा म्हणजे प्रगट अर्थात ज्या गूढ व सुबोध केलेल्या नव्हेत त्या भाषा असा मूळचा अर्थ असावा '

वररुचि हा प्राकृत भाषाचा आद्य व्याकरणकार त्याच्या काळाबद्दल वाद आहे तो पाणिनीचा समकालीन असणं अशक्य नाहा ( वेँ वेतरर प्राचीन महाराष्ट्र, पृ ३१४ ) महाराष्ट्री, पैशाची, शौरसेनी व मागधी या चार प्राकृत भाषाचा त्यानें प्राकृतप्रकाश व्याकरणात विचार केलेला आहे. ख्रि पू तिसऱ्या शतकापासून ख्रिस्तोत्तर अकराव्या शतकाच्या अखेरीपर्यंतचें बौद्धाचें धार्मिक व लौकिक साहित्य पाली या प्राकृत भाषत रचलेल आहे श्वेतांबर जैनाचें धार्मिक साहित्य अर्धमागधींत आहे व लौकिक साहित्य जैन महाराष्ट्रींत आहे "महाराष्ट्रीच्या या पोटभेदाला ही संज्ञा .श्री जेकोबी यानी हेमचंद्राच्य वचनाच्या अनुरोधानें दिलेली आहे हेमचंद्र सागतो अकृत्रिमस्वादुपदा परमर्थामि धायिनीम् । सर्वभाषापरिणता जैनी वाचमुपास्महे ॥ (काव्यानुशासन १-१ परपरा सागते की चंद्रगुप्त मौर्याचे काळात मगध देशात पडलेल्या दीर्घकालीन दुष्काळात जैनाचा एक जथा जीवधारणार्थ थेर भद्रबाहूच्या नेतृत्वाखाली दक्षिणत स्थायिक झाला होता, त्याच्या येथील वास्तव्यात त्याच्या भाषेवर महाराष्ट्री प्राकृताचे संस्कार झाले आणि मगधात परतताना त्यानीं ते बरोबर नेले, यामुळ हा पोटभेद निर्माण झाला भद्रबाहूच्या शिष्यानीं धर्मप्रसारार्थ हिंदुस्थानात सर्वत्र सचार केला आणि त्यांच्याबरोबर महाराष्ट्रीचा सर्वत्र प्रसार झाला

संस्कृत ही अल्पसख्य आर्यांची भाषा ती बहुजनसमाजाची भाषा कधींही नव्हती, एवढेंच नव्हे, धार्मिक कृत्यासाठीं संस्कृताचा उपयोग करणाऱ्या आर्यांचें घरगुती सामान्य व्यवहार प्राकृतातूनच होत असत, असे अनुमान करण्यास जागा आहे तस नसतें तर यज्ञदीक्षा पुरी होईपर्यंत प्राकृत बोलता कामा नये असा दण्डक सूत्रकाराना घालता नसता आर्यसंस्कृति ही मुख्यत्वकरून संस्कृतज्ञ ब्राह्मणक्षत्रियाची संस्कृति आर्यांच्या वसाहतीबरोबर आर्यसंस्कृतीचा

सर्वत्र फैलाव झाला असे सांगण्यात येतें हें विधान मर्यादित स्वरूपातच स्वीकारलें पाहिजे. वसाहतीमुळे आर्यसंस्कृतीची पेठें जागोजाग प्रस्थापित झाली आणि भोंवतालच्या आर्येतरांवर आर्य संस्कृतीचे स्पष्ट संस्कार झाले, हें व एवढेंच खरें. परिस्थितीच्या अनुरोधानें आर्यांनी समाजधारणेचे सिद्धान्त उत्क्रान्त केले आणि आर्येतरांवर आपल्या संस्कृतीचे संस्कार करून त्यांना भारतीय संघटनेंत समाविष्ट करून घेण्याचा हेतुपुरःसर प्रयत्न केला, हेंही खरें. अल्पगण्य प्राचीन आर्यांनी योजिलेला भारताच्या आर्यीकरणाचा प्रयत्न यशस्वी झाला नाहीं. संस्कृत भाषेच्या अज्ञानामुळें आणि वन्य संस्कृतीच्या प्रादुर्भावामुळें बहुसंख्य आर्येतरांना आर्यांच्या धर्मकृत्यांचा व तत्वज्ञानाचा अर्थबोध झाला नाहीं, यामुळे त्यांच्या प्रभुत्वाला मान्यता देणाऱ्या प्रजेमध्येंही आर्यसंस्कृतीबद्दल औदासीन्य होतें. शिवाय बहुजनसमाजापासून धुरीणत्वाच्या आविर्भावानें, पण वस्तुतः उच्चवर्णत्वाच्या अभिनिवेशानें शक्य तावर अलग व अलिप्त राहण्याच्या आर्यांच्या वृत्तीमुळे विषादही होता.* पृथक क्षत्रियांच्या उठावणीमुळें ब्राह्मण-क्षत्रियांची पुरातन पुरोहित व राजघराणीं कोलमडू लागला व आर्यांचा दरारा ओसरू लागला, तसतशी या औदासीन्यावर व विषादावर वैमनस्याची छटा येऊ लागली. आर्य संस्कृतीचा तोंवर फारसा फैलाव झाला नव्हता अशा मगध देशात महावीर व गौतम यांनीं जैन व बौद्ध धर्मांची स्थापना केली. या धर्मांच्या तत्वामध्यें एवढें साम्य आहे कीं तीं कोणी कोणापासून उचलली याबद्दल अनुमान करणें अशक्य आहे. आर्यांना तत्वतः अगम्य अगर अज्ञात असे या नव्या धर्मांत काहींही नव्हतें. बहुजनसमाजाला आकलनीय अशा सनातन तत्त्वाचें गौरवपूर्ण गुरूच्चारण होत, त्याला ज्याबद्दल आत्मीयता नव्हती, विस्मय विषाद होता, अशा काही वैदिक विधाच्या शीघ्रेच्चाटणाचा उपहासपूर्ण प्रेरणा होती. शिवाय हे धर्म जन्मजात उच्चनीच भावापासून अलिप्त होते आणि प्राकृतांतून प्रेरित होते, म्हणून ते बहुजनसमाजात त्वरेनें प्रसृत झाले. या धर्मांची व प्रचारकांची प्रवृत्ति सत्ता व संपत्ति यांच्या केंद्रीकरणाला पोषक असल्यामुळे नवक्षत्रिय राजांनीं व नवोदित वैश्यांना त्यांचा स्वीकार केला. बौद्ध व जैन धर्मांच्या आक्रमक प्रसारामुळे वैदिक धर्म आणि संस्कृत संस्कृति काहीं काळपर्यंत स्तिमित झाली.

राजाश्रयाला चढावलेल्या या धर्मांच्या प्रवर्तकानीं राजकीय पारतंत्र्याचाही पुरस्कार चालविलेला पाहून खवळलेल्या ब्राह्मणक्षत्रियांनी खि. पू. दुसऱ्या-शतकात पतंजलीच्या प्रेरणेनें संघटित होऊन पुष्यमित्र शुंग व पहिला सातकर्णी सातवाहन यांच्या नेतृत्वाखाली धर्मानें बौद्ध पण जातीनें भारताला परकीय अशा यवनराज मीनंडर विरुद्ध उठावणी केली व यवन सत्तेचा उच्छेद केला. भारताचें हें पुनरुत्थान जेवढें राजकीय तेवढेंच धार्मिक व सांस्कृतिकही होतें खि पू. पहिल्या शतकात दुसऱ्या सातकर्णीनें मालवगणाच्या सहकार्यानें माळव्यात जैनानीं आवाहन करून आणलेल्या शकाचा उच्छेद केला खिस्तोत्तर पहिल्या शतकात गोतमीपुत्र सातकर्णीनं महाराष्ट्रात व सौराष्ट्रात क्षहरातांचा उच्छेद केला. या महत्कृत्याच्या मानानें चंद्रगुप्त विक्रमादित्यानें चवथ्या शतकाच्या अखेरीस केलेलें सौराष्ट्र क्षत्रपांचे उच्चाटण दुय्यम दर्जाचे वाटतें या काळात सातवाहनानीं महाराष्ट्रात महाराष्ट्री प्राकृताचा पुरस्कार केला, या भाषेच्या मातृभूमीला महाराष्ट्र हें अभिधान यथार्थ ठरेल असें कर्तृत्व केलें

सुमारे साडे पाचशे वर्षांच्या या काळात ब्राह्मण क्षत्रियानीं आर्य संस्कृतीच्या पुनरुज्जीवनार्थ व अभ्युदयार्थ अनेक उपायांचा अवलंब केला. बहुजनसमाजाला आस्तनीय असा भागवत धर्म त्यानीं उत्कात केला. बेसनगर येथील हेलिओ-डोरसचा स्तंभलेख आणि नाणेघाटातील राणी नायनिकेचा लेख याला साक्ष आहेत. हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवर हिंदी-यवनांची राज्यें होतीं हे लोक मूळचे मूर्तिपूजक. या भागात स्थायिक झाल्यावर त्यानीं बाद्ध मूर्ति निर्माण केल्या व कुषाणानीं त्याच्या व गांधारातील मूर्तींच्या प्रतिकृति आर्यावर्तात आणल्या महायानाच्या जोडीनें वैदिकानींही या काळात अनेक सगुण देवदेवता मूर्ति व माहात्म्यें यासह निर्माण केल्या प्रचारामुळे भ्रष्ट व दुष्काळामुळे उध्वस्त झालेल्या धर्मवचनांचें बौद्धानीं व जैनानी परिषदा भरवून शुद्धीकरण केलें वैदिकानींही या काळात आपल्या स्मृतींचे व इतिहासपुराणांचें संशोधन व संपादन केलें त्यानीं संस्कृत भाषेला राजाश्रय मिळविला परदेशात स्वतःचें आसन स्थिर करण्यासाठीं हरप्रयत्न करण्यास सज्ज असलेले अल्पसंख्य परकीय लोक एतद्देशीय सुसंस्कृतांचा पाठिंबा मिळविण्यास उत्सुक असतात या न्यायानें

प्रथम सौराष्ट्र क्षत्रपानी संस्कृत भाषेला राजाश्रय दिला पुढे तर संस्कृत भाषेचा पुरस्कार हें आभिजात्याचे लक्षण मानण्यात येऊ लागलें चंद्रगुप्त विक्रमादित्याच्या कारकीर्दीत उज्जयिनीत संस्कृत भाषला अभिजात भाषेचें स्वरूप प्राप्त झालें भोजदेव सरस्वतीकण्ठाभरण (२ १५) विचारतो काल श्री साहसाङ्कस्य के न संस्कृत वादिन ? राजदरबारीं व रसिकांकडून मिळालेल्या प्रोत्साहनामुळें भासाच्या काळातली स्मितवती संस्कृत भाषा कालिदासाच्या काळात विलासवती झाली

वैदिक संस्कृतीच्या पुनरुत्थापकानीं प्रारंभी संस्कृतच्या जोडीनें प्राकृताचा ही पुरस्कार केलेला दिसतो शकांचा उच्छेद करणाऱ्या माळव्याच्या नाण्यावरील लेख संस्कृतात आहेत आणि वैदिक धर्मानुयायी सातवाहनाचे शिलालेख प्राकृतात आहेत सातवाहनानीं संस्कृत भाषेचा पुरस्कार वधाच केलेला दिसत नाही त्याच्या संस्कृत भाषेच्या अज्ञानाबद्दल ( मोदकं देहि राजन्, मोदकै परिताडय माम् । ), प्राकृत भाषेच्या पुरस्काराबद्दल ( श्रूयते च कुन्तलेषु सातवाहनो नाम राजा, तेन प्राकृतभाषात्मकमन्त पुर एवेति समान पूर्वण । राजशेखर काव्यमीमांसा ) त्याच्या संस्कृत उत्पत्तीबद्दल आणि राजघराण्या रातरिवाजाबद्दल ( कर्तर्या कुन्तल शातकर्णि महादेवी मलयवती जघान । वात्स्यायन कामसूत्र ) अनेकांना त्याचा उपहास केलेला आहे सातवाहनानीं महाराष्ट्री प्राकृताचा पुरस्कार केला म्हणूनच हालावर प्राकृत सरस्वती प्रसन्न झाली. निसर्गच कोपला तर सातवाहनाचा शिल्पकृतयें कोलमडतील व त्यात कोरलेले त्याचे शिलालेख नष्ट होतील तराही त्याची उज्जल कीर्ति गाथासप्तशतीच्या अजरामर रूपात चिरजीव राहील ह मात्र निश्चित

महाराष्ट्री प्राकृताचें मूलस्थान कोणतें, या विषयीं संशोधकाचे एकमत नाहीं मागधी व अर्धमागधी या मगधाच्या भाषा आाण शौरसेनी ही शूरसेनाची इत्यादि समीकरण त्याना मा य आहेत, पण महाराष्ट्री ही महाराष्ट्राची भाषा हें मात्र त्याना कबूल नाहीं कोणी सागतात प्राकृत भाषाना जा ता नावें प्राप्त झाली तेव्हा महाराष्ट्र या नावाचा देशच अस्तात आलेला नव्हता, कोणी सागतात, त्या काळीं माहाराष्ट्र हें नाव धारण करणारे लोकच अस्तित्वात नव्हते, कोणी सागतात हिंदुस्थानातील सर्व देशात या भाषत लेखन झालेलें असल्यामुळ तिचा सबध विशिष्ट प्रदेशाशीं जोडता येत नाही

कोणा सागतात, वररुचीच्या प्राकृत व्याकरणातील महाराष्ट्री ही संज्ञाच प्राशस्त आहे सारेंच विलक्षण! आरंभी सवच प्राकृत भाषा ज्या त्या प्रदेशातील रहिवाशाच्या बोलभाषा होत्या वैयाकरणानीं व साहित्यिकानीं त्याच बाह्याग व अतरग निर्मळ व उज्ज्वळ केल जैनाच्या धर्मप्रसाराच्या व सातवाहनाच्या सत्तेच्या साहचर्यांत महाराष्ट्रीचा हिंदुस्थानभर प्रसार झाला हाल सातवाहनाचा सत्तसई व जयवल्लभाचा वज्जालग्ग हे सुभाषित-कोश, आणि प्रवरसेन वाकाटकाचें रावणवहो व वाक्पतिराजाचें गउडवहो हीं महाकाव्य, हे महाराष्ट्री प्राकृतातील मुख्य ग्रथ होत पैकीं सत्तसई व रावणहो हे ग्रथ नि सशय महाराष्ट्रात निर्माण झालेले आहेत महाराष्ट्री प्राकृतात उत्कृष्ट व अफाट वाङ्मय असलें पाहिजे असं या ग्रथावरून अनुमान करता येत म्हणूनच सस्कृत साहित्यशास्त्रकाराना व आलकारिकाना महाराष्ट्रीला प्राकृत भाषामध्यें अग्रस्थान दिलें महाकवि दण्डी काव्यादर्शात ( १ ३४ ) सागतो " महाराष्ट्राश्रया भाषा प्रकृष्ट प्राकृत विदु । " म्हणूनच महाराष्ट्री प्राकृत हा महाराष्ट्रीयाचा एक अभिमानविषय आहे मूलत ही भाषा महाराष्ट्राचीच, हें नि सशय शिवाय प्रचलित मराठीशीं महाराष्ट्रीचें निकटच नातें व साम्य आहे हें अनेक उदाहरणावरून व व्युत्पत्तीवरून सिद्ध करून (श्री घाटगे Mahārāstri Language & Literature Journal of the University of Bombay Vol IV Part VI p 31 ) दाखविण्यात आलेलं आहे

## प्राकृत भाषा

प्राकृतात प्रचलित असलेल्या शब्दाचे तीन वर्ग पडतात तत्सम, तद्भव व देशी सस्कृत शब्द जसेच्या तसे प्राकृतात घेतले जातात, ते तत्सम, उदा० अर्जाक्ष सुदर वर्णलोप, वर्णागम किंवा वर्णपरिवर्तन याहा सिद्ध झालेले ते तद्भव, उदा०आर्य=आरअ, इर्ष्या=ईसा आरभीं सस्कृत शीं यत्किंचितही सबध नसलेले आणि बहुजनसमाजाच्या वापरातले ते देशी, उदा० तुप्प=घृत बुद=शूकर प्राकृतात प्रचारात असलेले तत्सम शब्द पाहिले असता ते मूलत मृदु आहेत असं दिसून येत तद्भव शब्द सिद्ध करताना मूळच्या कठोर वर्णांना नरम

स्वरूप देण्यात येते देशी शब्द साधारणत कठोरवर्णविरहित व जोडाक्षर रहित असतात सुकुमोच्चारप्रवणतेमुळ कोणाला प्राकृत भाषा मधुर वाटते तर कोणाला ( श्री चिंतामणराव वैद्य ) ती पुळपुळीत वाटते 'भिन्नरुचिर्हि लोकाः' हेंच खरें

प्राकृत वाङ्मयात देशी शब्द जागोजाग आढळतात कारण हें वाङ्मय बहुशीं बहुजनसमाजाचे किंवा बहुजनसमाजासाठी निर्माण केलेले आहे प्राकृतात देशी शब्द कधीं स्वाभाविकपण आलेले असतात, तर कोठें प्राचीनत्वाचा आभास अगर प्रादेशिकत्वाचा आविर्भाव निर्माण करण्यासाठी त्याची योजना कृत्रिमपणें केलेली असते देशी शब्दाची विपुलता हें प्राकृताच्या प्राचीनत्वाचें एक लक्षण आहे प्राकृतावर संस्कृतची छाप पडू लागली तसतशी त्यात विविध प्रकारची कृत्रिमता येऊ लागली जयवल्लभानें वज्जालग्गात उध्दृत केलेली गाथा पहा

> देसियसद्दपलोट्ट महुरक्खरछन्दसंठिय ललियं ।
> फुडवियडपायडत्थ पाइअकव्व पढेयव्व ॥२८॥
> [ देशीशब्दपर्यस्त मधुराक्षरच्छन्द संस्थित ललित ।
> स्फुटविकटप्रकटार्थं प्राकृतकाव्य पठनीय ॥ ]

" प्राकृत काव्यात देशी व मधुर शब्द पुष्कळ असतात त्याचा छद गोड असतो व अर्थ स्पष्ट असतो असे हें प्राकृत काव्य प्रत्येकानें वाचावें "

संस्कृत शब्दाना प्राकृत रूप मिळतें तेव्हा त्याना मार्दव व माधुर्य प्राप्त होतें देशी शब्दामुळे प्राकृतात जिव्हाळा येतो या लाडिकपणामुळें प्राकृत भाषेवर संस्कृत पडितही लुब्ध झालेले आहेत संस्कृत व प्राकृत भाषांची तुलना करताना राजशेखर कर्पूरमंजिरात ( निर्णयसागर १ ८ ) सागतो

> परुसा सक्कअबधा पाउअबधो वि होइ सउमारो ।
> पुरिसमहिलाण जेत्तिअमिहन्तर तेत्तिअमिमाण ॥
> [ परुषा संस्कृतगुम्फा प्राकृतगुम्फोऽपि भवति सुकुमार ।
> पुरुषमहिलाना यावदिहान्तर तेषु तावत् ॥ ]

"संस्कृत कठोर व प्राकृत सुकुमार, राकट पुरुष व नाजूक स्त्री यामध्यें आहे तेवढें अंतर संस्कृत व प्राकृत यामध्यें आहे"

गउडवहो या महाकाव्यातील वाक्पतिराजाचे प्राकृत भाषेच्या गुणांबद्दलचे उद्गार ( ९ ९२-९७ ) उध्दृत करण्याजोगे आहेत

> णवमत्थ-दसण संनिवेस-सिसिराओ बन्ध-रिद्धीओ ।
> अविरलमिणमो आ भुवन बन्धमिह णवर पययम्मी ॥
> सयलाओ इम वाया विसन्ति एत्तो य णेन्ति वायाओ ।
> एन्ति समुद्दंचिय णेन्ति सायराओच्चिय जलाइं ॥
> हरिस विसेसो वियसावओ य मउलावओ य अच्छीण ।
> इह बहि-हुत्तो अन्तो मुहो य हिययस्स विप्फुरइ ॥

*अभिनव आशय, समृद्ध रचना आणि मृदु शब्दमाधुर्य या बाबतींत प्राकृत सर्व भाषांत श्रेष्ठ आहे जलह सागरापासून निर्माण होतें व तें सागरातच जाऊन मिळतें त्या प्रमाणें सर्व भाषा प्राकृतातून निर्माण होतात व प्राकृतातच विलीन होतात प्राकृतापासून अंतःकरणाला अनिर्वचनीय आनंद होतो, आनंदाने नेत्र विकसित होतात व वृत्तींनि मुकुलित ही होतात "*

## प्राकृत सारस्वत

प्राकृत साहित्याचा विस्तार अफाट व अथांग आहे, धार्मिक व लौकिकही. पैकीं बौद्धांचें बरच वाङ्मय प्रसिद्ध झालेले आहे जैनांचे अलीकडेच मोठ्या प्रमाणावर प्रसिद्ध होऊं लागलें आहे बौद्धांच्या व जैनांच्या देशी व परदेशी देवस्थानांत अद्याप अनेक अज्ञात ग्रंथ आहेत हें वाङ्मय प्रसिद्ध होईल तेव्हां हिंदुस्थानच्या इतिहासातील अनेक समस्या उलगडतील असा भरवसा वाटतो बौद्ध धर्म नष्टप्राय झाल्यानंतर प्राकृत भाषेचें व वाङ्मयाचें संरक्षण व संवर्धन करण्याचें श्रेय मुख्यत्वेंकरून जैनांचें यांत संशय नाहीं.

गाथासप्तशती, हरिविजय, दहमुहवहो गउडवहो व लीलावई हे लौकिक प्राकृत साहित्यातले मुख्य काव्य व कोश ग्रंथ होत आख्यान व माहात्म्यें आणि स्फुट कविता व कथानकें यांची तर गणतीच नाहीं धार्मिक प्राकृत

पाहिजेत साहित्यशास्त्रावरील संस्कृत ग्रंथात प्राकृत गीतांचा अनेक उदाहरणें उद्धृत केलेलीं आहेत यावरून निष्कर्ष निघतो कीं या काळात संस्कृतप्रमाणच प्राकृत भाषा हाही विद्यार्थ्यांच्या अध्ययनाचा व पण्डितांच्या अध्यापनाचा विषय झालेला असावा यामुळें महाराष्ट्री प्राकृताचा भाषिक दर्जा सुधारला, हें खर, पण यामुळें ही प्राकृत भाषा बहुजनसमाजाच्या बोलभाषेपासून दूर दूर गेली, हेंही तितकेंच खरें बोलभाषाच्या उपेक्षेच्या काळात व्यावहारिक अपभ्रंशाच्या सरसरामुळें मध्ययुगात प्रादेशिक भाषा उत्क्रांत झाल्या अकराव्या शतकाच्या सुरवातीस इस्लामी आक्रमणें सुरू झालीं व या कालखंडात एतद्देशीय राज्यें एकामागून एक कोलमडलीं यामुळे पण्डिताचा व साहित्यिकाचा राजाश्रय तुटला आणि संस्कृतिप्रेषणाची परंपरा खुटली या अंधकारयुगात वैदिक पण्डिताना व जैन मुनींनीं मृतप्राय संस्कृत व प्राकृत भाषाच्या अध्ययनाची *परंपरा धुगधुगीत का होईना, जिवंत ठेवली, यावद्दल त्याना कितीहि धन्यवाद* दिले तरी ते पुरे पडणार नाहींत

## गाथा

गाथासप्तशतींतील सुभाषितें गाथा वृत्तात रचलेलीं आहेत. वेदांतील मंत्र मुख्यत सात वृत्तात रचलेले आहेत त्या व्यतिरिक्त गाथा हें वृत्तही वेदकाळीं प्रचारात होतें ऋग्वेदात गाथाचे उल्लेख आढळतात गाथाच्या योगानें ऋत्विज सामाचा महति गातात ( १ १६ ४ ) सूयचे मंगलवस्त्र जणू गाथानीं अलंकृत केलेलें होतें ( १० ८५ , ) ऋचा या रैभी व गाथा या मानुषी असें ऐतरेय ब्राह्मणात (७ १८) सांगितलेलें आहे शतपथ ब्राह्मणात पुष्कळ गाथा आहेत, त्यात राजाच्या यज्ञाच्या गाथा साररूपानें सांगितलेल्या आहेत मैत्रायणी संहितेत ( ३ ७६ ) सांगितले आहे की लग्नप्रसंगी गाथा गात असत यावरून गाथा हें भावगीताचे मूळ स्वरूप असावे असे दिसते काठकसंहिता ( १४ ५ ) व तैत्तिरीय ब्राह्मण ( १ ३ २ ७ ) यात गाथांचा व गाथागायकाकडून दान घेणाराचा निषेध केलेला आढळतो

छन्दशास्त्रात ( ८ १ ) पिंगलाचार्य सांगतात 'अत्रानुक्तं गाथा।' या सूत्रावरील टीकेत हलायुध सांगतो 'अत्र शास्त्रे नामोद्देशेन यन्नोक्तं छन्द,

प्रयोगे च दृश्यते, तद्गाथेति मंतव्यम्। " रत्नशेखरसूरींनें छन्दकोशांत गाथा-लक्षण सांगितलें आहे:

> सामन्नेणं बारस अठ्ठारस बार पनरमत्ताओ।
> कमसो पायचउक्के गाहाए हुंति नियमेण ॥
> गाहाइ दले चउचउमत्तमा सत्त; अठ्ठमो दुक्लो।
> एयं बीयदले वि हु नवरं छठ्ठोइ एकगलो ॥

भा. कोलब्रुक साभतात: ( A. R. X 400 ) की प्राकृतांत जी गाथा ती संस्कृतांत आया डॉ. गोरे यांनी वज्जालग्गाच्या प्रस्तावनेत ( p vii ) गाथेचें साधारण मांडणी दिली आहे ती अशी:—

प्रथम चरण: ४ + ४ + ४ / ४ + ४ + ५ – ५ किंवा ५५५५ + ४ + –
द्वितीय चरण: ४ + ४ + ४ / ४ + ४ + ५ + ४ + –

गाथासप्तशतीच्या उत्तरार्धांत आर्यागीति ( ७०७ ) गीति ( ८०८, ८४५, ८५४, ८७४, ९३०, ९५०, ९५४, ९६५, ९७१ ), उद्गीति ( ९३७ ) व उपगीति ८०६, ९०१, ९०९, ९३९, ९५८ ) हीं वृत्तेंही आलेलीं आहेत.

वृत्तदर्पणांत या मात्रागणवृत्तांचीं लक्षणें दिलेलीं आहेत तीं अशीं:—

> आर्येच्या प्रथमपदीं, द्वादश मात्रा तशाच तिसऱ्याला।
> अष्टादश दुसऱ्याला, आणिक चवथ्यास पंचदश ॥ ६३ ॥
>
> गीतीच्या प्रथमपदीं, द्वादश मात्रा तशाच तिसऱ्याला।
> दुसऱ्या पादीं अठरा, मात्रा असती तशाच चवथ्याला॥ ६४ ॥
>
> उपगीतीच्या पहिल्या तिसऱ्यादी द्वादशाचि मात्रा।
> दुसऱ्या आणिक चवथ्या मात्रा पादात पंधराची ॥ ६५ ॥
>
> उद्गीतीच्या पहिल्या तिसऱ्यादी द्वादशाचि मात्रा।
> दुसऱ्या पादीं पंधा, चवथ्या पादांत येति अष्टदश ॥ ६६ ॥
>
> पहिल्या चरणीं बारा मात्रा दुसऱ्यांत सात आणि तेरा।
> उभयदलीं हे रीती जाण तिला म्हणति सुज्ञ आर्यागीती॥ ६७ ॥

आर्या - मात्रा : प्रथमचरण १२ १८ द्वितीय चरण १२ १५

| | | | | |
|---|---|---|---|---|
| गीति | ,, | १२ १८ | ,, | १२-१८ |
| उपगीति | ,, | १२-१५ | ,, | १२-१५ |
| उद्गीति | ,, | १२-१५ | ,, | १२-१८ |
| आर्यागीति | ,, | १२-२० | ,, | १२-२० |

**गाथाप्रशंसा**

प्राकृत काव्याची प्रशंसा करताना वज्जालग्गात (क्र ३१) जयवल्लभ सांगतो

पाइअकव्वस्स नमो पाइअकव्वं च निम्मियं जेण ।
ताहं चिअ पणमामो पढिऊण य जे वियाणन्ति ।।

"प्राकृत कवितेला नमन असो प्राकृत कवींना नमन असो त्याचप्रमाणें प्राकृत कवितांचें पठण करणाऱ्या व त्याचं स्वारस्य जाणणाऱ्या मर्मज्ञाना नमन असो "

गाथांच्या सौंदर्याची प्रशंसा करताना जयवल्लभ सांगतो --

अद्धक्खरभणियाणं नूणं सविलाससुद्धहसियाइं ।
अद्धच्छिपेच्छियाइं गाहाहि विणा ण णज्जंति ।। ९ ।।

"ओठातल्या ओठात लाडिकपणें घोळलेले अर्धस्फुट बोल, विलासोन्मुख मुग्धेचें स्मित आणि अपाङ्गावलोकन याचें स्वारस्य प्राकृत गाथाच्या परिशीलनाचेंच प्रत्ययास येतें "

गाथाचं स्वरूप प्रेयसीसारखेंच असतें मालंकृत, सुलक्षण व सौरभपूर्ण (१०), गाथाचें अतर्याम आणि महिलाचें अतःकरण याचें मर्म रसिकानाच उमजतें (११), वरकामनाप्रमाणेंच दृढपरिचयावाचून गाथा आपलें अतर्याम प्रकट करीत नाहीत ( १२ ), गाथा सारेच गातात, मात्र त्याच्या रसाचा आस्वाद विदग्धानाच घेता येतो ( १४ ) संस्कृत काव्य नागरी, तर प्राकृत काव्य, विशेषतः गाथा, या ग्रामीण, हें खरें, पण गाथाचें रसग्रहण ग्राम्य वृत्तीनें करता कामा नये विदग्धता हीच ग्राम्य व ग्रामीण यामधील विभागरेषा गाथांची भाषा

प्राकृत व विषय शृंगारिक, यामुळें ही सीमारेषा तरल असणार, हें उघड आहे. त्याचें पठण व ग्रहण संयमानेंच केलें पाहिजे. जयवल्लभ (वज्जालग्ग. क्र.१५) सांगतो :

गाथा रुवइ वराई सिक्खिज्जन्ती गवारलोएहिं ।
कीरइ लुञ्चपलुञ्चा जह गाई मन्ददोहेहिं ॥

"अडाणी गवळी धार काढूं लागला म्हणजे गाय लाथा झाडते; त्याचप्रमाणें गावढळ गवई एखादी गाथा ग्राम्यपणें गाऊं लागला म्हणजे बिचारी जणू रडते !"

गाथासप्तशतीची प्रतिज्ञा यौवनानें रसरसलेल्या ग्रामतरुणीच्या उद्गारांत सशब्द ( क्र. ७०२ ) झालेली आहे. जणूं गाथा मूर्तस्वरूप धारण करून म्हणते: "मी खेडेगावांत जन्मले व गावढ्यांतच लहानाची मोठी झाले; आतां मी नगरात आलें आहे; नागरी रीतिरिवाज मला माहीत नाहींत, पण माझ्या अंगीं असलेल्या *गुणांची व शक्तींची मला जाणीव आहे. या शहरी स्त्रियांच्या पतींना* मी माझ्या नादीं लावीनच लावीन; तरच मी खरी. मग काय व्हावयाचें असेल, तें होवो."

काय होणार ? लावणी आर्येचा पराभव करणार !
गाथांच्या प्रशस्तीनंतर जयवल्लभ विचारतोः–
ललिते महुरक्खरए जुवईजणवल्लहे ससिंगारे ।
सते पाइअकव्वे को सक्कइ सक्कयं पढिउं ॥

"ललित व मधुर, शृंगारिक व युवतिजनप्रिय अशा गाथा उपलब्ध असताना संस्कृत काव्ये कोण पाहणार ?"

गाथासप्तशतीत ( क्र. २ ) कामशास्त्राची कोरडी चर्चा करणाऱ्या पंडिताना विदग्धा नायिकेनें असाच प्रश्न विचारलेला आहे; पर्यायानें या प्रश्नाचें उत्तरही तेथेंच आलेलं आहे. कोरडी शास्त्रचर्चा कोण करतात ? निर्लज्ज; लब्धप्रतिष्ठित व स्वमतुष्ट, आत्मवंचित व जीवन-विन्मुख ! अशा अहमन्य व स्वयंभु पण्डितम्मन्यांना शिक्षा कोणती ? गाथासप्तशतीत या गुन्ह्याला शिक्षाही सांगितलेली ( क्र. ८०९ ) आहे. कोरडे जीवन जगणें, हीच या अपराधाला शिक्षा ! जन्मठेप अंधारकोठडीहून भयंकर !

## ( ६ ) गाथासप्तशतीचे साहित्यांतील स्थान :

प्राकृत साहित्यात गाथासप्तशती अग्रगण्य आहे, भारतीय ललितवाङ्मयात गाथासप्तशतीला अग्रस्थान देण्यात येतें कालक्रमानुसार आद्यस्थान व गुण-क्रमानुसार अग्रस्थान. कोणत्याही गणनेप्रमाणें आणि कोणत्याही परिमाणान

गाथासप्तशतीचीं हस्तलिखितें काश्मीर-नेपाळपासून मलबार-तेलगणापर्यंत जागोजाग विपुल प्रमाणात उपलब्ध झालेलीं आहेत प्राकृत जनाप्रमाण सुसंस्कृतांवरहा गाथासप्तशतीनें मोहिनी घातलेली आहे साहित्यशास्त्रावरील काही प्रसिद्ध ग्रंथाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही ग्रंथावर गाथासप्तशतीइतक्या टीका झालेल्या नाहीत दुसऱ्या कोणत्याही ग्रंथातून गाथासप्तशतातल्या इतके उतारे अलकाराचा उदाहरण म्हणून साहित्यशास्त्रकाराना उध्दृत केलेल नाहात

महाकवि बाणभट्ट ( सातव्या शतकाचा प्रथमार्ध ) यानें हर्षचरिताच्या प्रास्ताविक भागात गाथाकोशाचा उल्लेख केला आहे

> अविनाशिनमग्राम्यमकरोत्सातवाहन ।
>
> विशुद्धजातिभि कोश रत्नरिव सुभाषितै ॥

या वचनाचें मराठी भाषातर महामहोपाध्याय प्रा मिराशी यानीं केल आहे ( युगवाणी - मार्च १९४९ ), तें असें " एखादा राजा अत्यत शुद्ध जातीच्या रत्नानीं खेडेगावात न होणारा असा अक्षय्य निधि करतो, त्याप्रमाण सातवाहन राजानें अत्यत निर्दोष अशा व जातिछदात रचलेल्या सुभाषितानीं अविनाशी व सोज्वळ असा कोश रचला " राजलोक आपल्या खजिन्यात निर्दोष व व मौल्यवान रत्नाचा सग्रह करून ठवतात, असे रत्नकोश नष्ट झाले व होतील, पण सुभाषित रत्नाचा हा कोश चिर जीव आहे तस पाहिले तर राजाचा खजिना हाही ग्राम्य असतो, कारण गावोगावच्या रहिवाशाकडून गोळा करण्यात आलेल्या करभारानेच खजिन्याची भरती होत असते सात-वाहनान खेड्यापाड्यात राहणाऱ्या कवींचीं ग्रामीण जीवनाचीं वचनें एकत्रित करून हा कोश सपादिला यात समाविष्ट झालेल्या गाथा खेड्यापाड्यात निर्माण झालेल्या असल्या तरी त्या ग्राम्य नाहींत, हीं सुभाषित प्राकृतात रचलेलीं असलीं तरी तीं ग्राम्य नाहींत, त्याची जाति विशुद्ध आहे, अशी बाणभट्टाची

ग्वाही आहे गुप्तकालात संस्कृत भाषेला व साहित्याला राजाश्रय मिळाला आणि कवींची व पंडिताची परंपरा प्रस्थापित झाली संभवनीय आहे की याच सुमारास प्राकृत भाषेचा व साहित्याचा उपहास आणि संस्कृत भाषेच्या अज्ञानाबद्दल प्राकृत जनाची हेटाळणी करण्याची प्रथा राजदरबारात व पंडित सभेत सुरू झालेली असावी गाथासप्तशतींतलीं वचनें रम्य असलीं तरी ग्राम्य आहेत, कारण ती प्राकृतात रचलेली व त्याचे विषय ग्रामीण असल्यामुळें तीं अभिजात नाहींत व त्याची जाति भ्रष्ट आहे, असे आक्षेप तत्कालीन विद्वानांनीं घेतले असावेत आणि बाणभट्टानें वरील वचनानें त्याचें खंडन खणखणीत शब्दात केलेलें असावें असें दिसतें संस्कृत शृंगार तेवढा शिष्ट आणि प्राकृत शृंगार मात्र ग्राम्य अशी विकृत वृत्ति त्या काळात प्रादुर्भूत झालेली असावी देशी भाषा व त्यातील वाङ्मय, विशेषत जानपद वाङ्मय, याबद्दल अव्वल इग्रजींत एतद्देशीय परप्रत्ययनेय विद्वानाची अशीच वृत्ति होती, आता ती बदलली आहे, कारण बाणभट्टाच्या तोडीच्या विद्वानानीं त्याचा पुरस्कार केलेला आहे ही सर्व परिस्थिति विचारात घेऊन बाणभट्टाच्या वचनाचा मी करतों तो अर्थ असा : " ग्राम्यतेपासून अलिप्त व निर्दोष अशा अभिजात सुभाषितरत्नाचा अविनाशी कोश सातवाहनानं केला "

सम्राट् हर्षवर्धन हा आपल्या कारकीर्दीच्या प्रत्येक पाचव्या वर्षी प्रयाग येथें 'मोक्ष महापरिषद' भरवून आपला सर्व खजिना दानधर्मानें रिकामा करीत असे हर्षानं बाणाला विपुल संपत्ति दिल्याचा उल्लेख हर्षचरितात आहे काव्यप्रकाशावरील सारसमुच्चय या टीकेंत रत्नकठानें या पुरस्काराची क्षणभङ्गुरता व बाणभट्टाच्या कृतीची चिरजीविता वर्णिलेली आहे

हेम्नो भारशतानि वा मदमुचा वृन्दानि वा दन्तिना।
श्रीहर्षेण समर्पितानि कवये बाणाय कुत्राद्य तत्॥
या बाणेन तु तस्य सूक्तिनिकरैरुट्टङ्किता कीर्तय ।
ता कल्पप्रलयेऽपि यान्ति न मनागमन्ये परिम्लानताम् ॥

रुद्रसूरि, उद्योतनसूरि ऊर्फ दाक्षिण्यचिन्हसूरि यानें कुवलयमाला हा ग्रथ इ स. ७७८ च्या सुमारास रचला त्यात तो सागतो

पालित्तसयालाहणछप्पणगयर्माहनायसद्देण ।
सपुद्दमुद्दभारद्दत्त व्व कहता पय देमि ॥ अ२-५१ (
निम्मलगुणेण गुणगुरुयएण परमत्थरयणसारेण ।
पालित्तयेण हालो हारेण व सहइ गोट्ठीसु ॥
चक्कायजुवलसुहया रमत्तणरायहसकयहरिसा ।
जस्स कुलपव्वयस्स व वियइइ गङ्गा तरङ्गमई ॥
भणियविलासवइत्तणचोक्किल्ल जो करेइ हलिए वि ।
कव्वण किं पउत्थे हाले हालावियारे व्व ॥
पणईहिं कइयणेण व भमरहि व जस्स जायपणर्एहिं ।
कमलायरो व्व कोसा विलुप्पमाणो वि हु न झीणो ॥

ह्या वचनाचा आशय असा हालाला महाराष्ट्री, मागधी व शौरसेनी या तीन पाली भाषा प्रिय होत्या, तो प्राकृत कवाचा आश्रयदाता होता, राजसमेंतील कवींच्या सहकार्यानें त्यानें असा अक्षय्य गाथाकोश केला कीं निरतर उपयोगानेंही तो विलुप्यमान झाला नाही

गौडकवि अभिनन्द यानें रामचरित नावाचें महाकाव्य लिहिले आहे वेबरने त्याला नवव्या शतकात माडलें (Vorwort p xxv) आहे मध्ययुगीन चरित्रकोशकारानी अभिनन्द या नावाच्या दोन व्यक्ति कल्पिल्या आहेत एक योगवासिष्ठसार व कादबरीसार या ग्रथाचा कर्ता आणि दुसरा रामचरिताचा कर्ता, पैकीं पहिला अभिनन्द हा धर्मपालाच्या वशांतील विक्रमशीलाचा मुलगा हारवर्ष याचा आश्रित होता त्याला ते नवव्या शतकात माडतात आणि रामचरिताच्या कर्त्याला ते अकराव्या शतकात माडतात अभिनन्द या नावाच्या दोन व्यक्ति होत्या असें कल्पिण्याचें कारण नाहीं, कारण रामचरितात कर्त्यानें हारवर्षाचीच स्तुति केलेली आहे या प्रशस्तींत तो सागतो

नम श्री हारवर्षाय येन हालादनन्तरम् ।
स्वकोष कविकोषानामाविर्भावाय सभृत ॥ ६।९३ ॥

हाल सातवाहनानतर हारवर्षानेंच सुभाषितकोश सपादन केला असें या वचनावरून दिसतें यापुढें अभिनन्द सागतो

हालेनोत्तमपूजया कविवृष श्रीपालितो लालित ।
ख्यातिं कामपि कालिदासकृतयो नीता शकारातिना ।।
श्रीहर्षो विततार गद्यकवये बाणाय वाणीफलम् ।।
सद्य सत्क्रिययाभिनन्दमपि च श्री हारवर्षो ऽग्रहीत् ।। २२ -१०० ।।

शकारि विक्रम व श्रीहर्ष यांच्याप्रमाणे हाल हाही राजा होता आणि त्याचा आश्रित पालित याची गाथासपादनाचे कामीं हाल ला मदत होती, ही परपरा अभिनदाला अवगत होती या अर्से वचनावरून दिसतें

यानतरचा गाथासप्तशतीचा महत्त्वाचा उल्लेख राजशेखरानें ( इ ८८० ते ९२० ) केलेला ( भगदत्त जल्हण विरचिता सूक्तिमुक्तावली Gaekwad's Oriental Series पृ ४३ ) आहे तो सागतो

जगत्या ( पृथिव्या ) ग्रथिता गाथा सातवाहनभूभुजा ।
व्यधुर्धृतेस्तु विस्तारमहोचित्रपरपरा ।।

' सातवाहन राजानें अनेक ठिकाणाहून गाथा जमवून त्यचा सग्रह केला यामुळें लोकाचा आनद सकोच पावला नाही, उलट विस्तार पावला केवढी ही आश्चर्याची परपरा ! '

ठाण्याच्या शिलाहाराचा आश्रित सोड्ढल या कायस्थ कवीनें ( इ स १०२५ ते १०५० ) ' उदयसुदरी ' कथेंत हालाचा उल्लेख केलेला आहे तो असा

हाले गते गुणिनि शौम्भराभ्रभूयुरुच्छिश्रवान्मजदा कृतिनस्तथामी।
यत्रस्य न म लघतरनिश स्मरन्ता हेत्यक्षर प्रथममेव पर विदान्त ।।

मेरुतुगाचार्यानें जन्न १३३ इ ) प्रबन्धचिंतामणीत हाल सातवाहनाच्या गाथासपादनाबाबतची परपरा सागितली आहे

हारो वणीदण्डो रयट्टुगणठियाइ तहय ताउ त्ति।
सालाहणेण गहिया दहकोडिहिं च चउगाहा ॥

सालाहणान दहा कोटि मुद्रा देऊन कोशासाठीं चार गाथा घेतल्या ( Bibliotheca Indica C H. Tawney, p 18 ) या परपरत सात वाहनकालान वस्तुस्थीत निवेदन केलेली आहे की मेरुतुगकालीन

अपेक्षा ध्वनित केल्या आहेत हें निश्चित करण्यास साधन नाही कोशरचनेची पूर्वतयारी म्हणून हालानें एक कोटी गाथा जमविल्या व त्यातून सातश निवडल्या असा उल्लेख क ३ या गाथेत आलेला आहे

अनुसरण हा प्रशंसेचा परिणाम होय हे जर खरे तर गाथासप्तशती हा ग्रंथ आद्वितीय आहे असे म्हटले पाहिजे कारण दुसऱ्या कोणत्याही ग्रंथाचे गाथासप्तशतीइतके अनुकरण आजवर झालेले नाही

जयवल्लभाचा वज्जालग्ग हा प्राकृत सुभाषित-संग्रह, गोवर्धनाचार्याची संस्कृत आर्यासप्तशती आणि बिहारीलाल याची सतसई हे ग्रंथ गाथासप्तशतीच्या नमुन्यावर रचलेले आहेत

वज्जालग्ग हा प्राकृत सुभाषितांचा संग्रह अलीकडेच संपूर्ण स्वरूपात (Vajjālaggam Bibliotheca Indica Ed Dr Julius Laber Fasc I 1914, II 1923 III 1944) प्रसिद्ध झालेला आहे. या संग्रहाचें संपादन जयवल्लभ नावाच्या श्वेतांबर जैनानें केलेले असून त्याची संस्कृत छाया रत्नदेवानें वि स १३९३ मध्यें लिहिली असल्याचे एका हस्तलिखितात नमूद आहे जयवल्लभाविषयी काहींही माहिती उपलब्ध नाहीं वाक्पतिराजाच्या गउडवहो या महाकाव्यातील उतारे वज्जालग्गात घेतलेले आहेत या काव्याची निर्मिति स ७०० ते ७२५ च्या सुमारास झाली असली पाहिजे, असे श्री पण्डित (Gaudavaho Introduction p c) यानी निश्चित केले आहे यावरून वज्जालग्ग हा संग्रह त्यानंतरचा असला पाहिजे असे ठरते वज्जालग्गाच्या मुद्रित प्रतीत ७९५ सुभाषितें आहेत काहीं हस्तलिखितात 'सत्तसयग्गो समत्तो' 'सत्तसयम्मि' अशा शब्दयोजना आढळतात यावरून जयवल्लभाच्या मूळ संग्रहात गाथासप्तशतीत घालून दिलेल्या प्रथेनुसार सातशेच सुभाषितें असली पाहिजेत असे दिसतें वज्जालग्गाचे संपादक सांगतात कीं या संग्रहातील सुभाषितें मुख्यत्वेंकरून शृंगारिक असली तरी जयवल्लभानें मानवी जीवनाच्या इतर अंगाचा परामर्ष हालापेक्षा अधिक घेतला आहे हें विधान वस्तुस्थितीला धरून नाही उत्तान व ग्राम्य गाथांचा ही समावेश वज्जालग्गांत झाला आहे वज्जालग्गात सुभाषितांची मांडणी सज्जा पद्धतीनें केलेली आहे गाथासप्तशतीतील सुभाषितांची अशीच वर्गीकरण केलेली आवृत्ति उपलब्ध झालेली आहे वज्जालग्गांतील सुभाषितें ९५ शीर्षकाखालीं विभागलेली आहेत यापैकी २१

पद्धतींत गाथासप्तशतींतील ८२ गाथा समाविष्ट केलेल्या आहेत, यांपैकी ६३ प्रथमार्धांतील आहेत

या सग्रहात समाविष्ट झालेल्या गाथांचा तपशील येणेंप्रमाणे --

(१) अनग ४३० (२) अवराग (विरहपीडिता) ५७, १७८, १९४, १९८, २२०, ३७१, (३) असती ९, १९७, ६६१, ८७१, ८७३, (४) इन्दिन्दिर ७४९, ८९३, (५) कुट्टिनीशिक्षा १,३, २८, (६) गज ३८३, (७) गाथा ८०९ (८) ग्रीष्म ७०, (९) दारिद्र्य ६७१, (१०) दुर्जन २५३, ६८६, (११) दूती १८९, (१२) धीर २८८, ७४०, (१३) प्रभु २४३, (१४) प्रवसित ४६, ३९९, (१५) प्रस्तावना २ (१६) प्रावृट् ७२४, (१७) प्रियानुराग ३७१, ६२१, (१८) प्रेम १३, २३६, ७८०, ८२३, (१९) मान ४५, ३७४, ४३२, ९२९, (२०) मित्र २१३ (२१) यान्त्रिक ५१४, (२२) रुद्र ४५५ (२३) लावण्य २७८, ९६३, (२४) वसत ३११, ५७४, (२५) व्याध ११९, १२०, १०३, ५९७, ९४५, (२६) विदग्ध ७१५, ८७७ (२७) विन्ध्य ८१४ (२८) विरह ५८, १९०, २०६ २०८, ४७५, (२९) शरद् ५६२, (३०) शिशिर ६९८, (३१) सज्जन २५०, ३१९, (३२) सती ३६, ५९, ८६० (३३) साहस २८२, (३४) सुगृहिणी ३८, ४७२, (३५) सुरत २०९, ५४७, (३६) स्तन २६८, ३९५ ६६९, (३७) स्नेह ७४३ (३८) हृदयसवरण ३८, २०२, ४०१, (३९) हृदयाली ८१०, ९१०

आर्यासप्तशतीचा कर्ता गोवर्धनाचार्य (इ स १०७५ ते ११२५) हा बगालच्या राजा लक्ष्मणसेन याच्या पदरी कवि होता आर्यासप्तशती या नावावरून दिसत कीं मूळ ग्रथात सातशें आर्या असल्या पाहिजेत श्री विष्णु प्रसाद भण्डारी यांनीं सपादिलेल्या व चौखम्बा सस्कृत सीरीजमध्ये प्रसिद्ध झालेल्या प्रतींत ७६३ आर्या आहेत या सप्तशतींतील आर्या शृगारिक असून गोवर्धनाचार्यानें स्वत च लिहिलेल्या आहेत म्हणजे विषय जवळ जवळ गाथासप्तशतीसारखाच असून कर्तृत्वपद्धति मात्र भिन्न आहे या ग्रथात आर्या अकारानुक्रमानें माडलेल्या आहेत हाल सातवाहन व गाथासप्तशती याबद्दल प्राचीनकविसंकीर्तनभागात गोवर्धनाचार्य सागतो

हालाभ्युदयितो गाथासमुदायो रसविशेषपूर इव ।
अध्यक्षीकृतमात्रो नाधत्ते कस्य परितोषम् ॥
प्राकृतमयं निबन्धं वितन्वता शालवाहनन्रपेण ।
काव्यानामितरेषां साद्विकृतिरेवं कथितमर्थात् ॥

'सतसई' चा कर्ता बिहारीलाल (इ. स. १६०३ ते १६६३) हा जयपूरच्या जयसिंह राजाच्या दरबारी कवि होता. सतसईच्या लक्ष्मीवेङ्कटेश्वर प्रतींत ७२३ गाथा आहेत. मूळ ग्रंथात सातशेच दोहे असावेत असें नांवावरून दिसतें शिवाय 'करे सातसै दोहरा सुकवि बिहारीदास,' असा ही दोहरा आहे हे दोहरे मुख्यत्वेंकरून शृंगारिक आहेत. सतसई हे व्रजभाषेचें भूषण मानण्यांत येतें. सदर आवृत्तीचे संपादक पण्डित ज्वालाप्रसाद मिश्र विचारतात: "ऐसा कौन भाषाका रसिक है जिसको इस सतसईके दो चार दोहे स्मरण न हों!" हा ग्रंथ प्रचलित भाषेत असला तरी त्याची रम्यता व्यक्त करण्यासाठीं पण्डितांनीं त्यावर आजवर विसाहून अधिक टीका लिहिल्या आहेत.

## ७ गाथ सप्तशतीचें अलंकार-वाङ्मयांतील स्थान:

संस्कृतात साहित्यशास्त्रावर असख्य ग्रंथ आहेत. अभिनव साहित्यसिद्धान्त उत्क्रान्त करण्याचा आणि अलंकारांची निर्मिति, वर्गीकरण व विवेचन करण्याचा साहित्यशास्त्रज्ञांचा उद्योग इस्लामी आक्रमणापर्यंत चालू होता. विख्यात साहित्यिकांना व पाठशाळांना राजाश्रय असे. मुसल्मानी आक्रमणामुळें लहानमोठीं स्वराज्यें बुडालीं आणि संस्कृत अध्ययनाची व अध्यापनाची परंपरा तुटली; देशाचें सांस्कृतिक जीवन उध्वस्त झालें आणि सामान्य जनतेचें श्वापदीकरण झालें. या शापात वरप्रदानही होतें; कारण या अंदाधुंदींतूनच प्रचलित देशी भाषा व सारस्वत उत्क्रान्त झालीं.

साहित्यशास्त्रकारांनीं सिद्धान्तांचें व अलंकारांचें विवेचन करतांना प्रचलित वाङ्मयातील उदाहरणें दिलेलीं आहेत दण्डी व रुद्रट या आद्य साहित्यशास्त्रज्ञांनीं आपल्या विख्यात ग्रंथात अलंकारांची संस्कृतच उदाहरणें दिलीं आहेत. प्राकृतोत्तम महाराष्ट्रीशी दण्डीचा परिचय होता. सेतुबंधाचा उल्लेख त्यानें 'सूक्तिरत्नाना सागर' असा केलेला आहे. आपले ग्रंथ प्राकृतापासून अलिप्त

ठेवावयाचे असा त्यांचा जणू सकल्पच होता आनन्दवर्धनानें ध्वन्यालोकात स्वतंत्र सिद्धान्ताची स्थापना केली आणि उदाहरणादाखल प्राकृत गाथा व श्लोक उध्दृत करण्याची प्रथा सुरू केली या वरून या काळात प्राकृत हा साहित्यिकाचा अभ्यासविषय झाला असावा असें अनुमान होतें उत्तर कालीन साहित्यशास्त्रकारानीं त्याचें अनुकरण केलें या सर्वांनी गाथासप्तशतीचा मोठ्या प्रमाणावर उपयोग केलेला आहे सर्वात अधिक गाथा भोजदेवानें सरस्वतीकण्ठाभरणात उध्दृत केलेल्या आहेत

अलकारशास्त्रावरील ठळक अशा बारा ग्रथात उध्दृत केलेल्या गाथासप्तशतीतील गाथाचे कोष्टक परिशिष्टात दिले आहे कोष्टकात समाविष्ट केलेल्या ग्रथाची नोटक माहिती येथें पुढें दिलेली आहे या बारा ग्रथात मिळून गाथा सप्तशतातील गाथाचे ५ ० उल्लेख आलेले आहेत पैकीं ३३४ उल्लेख प्रथमार्धातील गाथाचे आहेत आणि १९६ उत्तरार्धातील कोष्टकात दिलेले किरकोळ उल्लेख या गणनत धरलेले नाहीत या भागातून वज्जालग्गात अनुक्रमें ३ व २। गाथा घेतलेल्या आहेत त्याच गाथा अनकाना उध्दृत केलल्या असल्यामुळ द्विरुक्ति वगळली असता दिसतें कीं वज्जालग्गासह या तेरा ग्रथात प्रथमार्धातील २५८ व उत्तरार्धातील ११० अशा ३६८ गाथा उध्दृत केलेल्या आहत

याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं गाथासप्तशतीतील एवढ्याच गाथा सालकार असून बाकीच्या सामान्य आहेत गाथासप्तशतीच्या टीकाकारानीं इतर अनेक गाथातील अलकाराचें दिग्दर्शन केलेले आहे त्याचा समावेश या कोष्टकात केलेला नाहीं रसिक वाचकानाही इतर गाथातील अलकाराचा प्रत्यय सहजा येण्यासारखा आहे सस्कृत आलकारिकानीं दुसऱ्या कोणत्याही प्राकृत ग्रथातून एवढे दाखले घेतलेले नाहींत गाथासप्तशतातून घेतले आहेत ते दाखले पाहिले असता दिसून येतें का त्यातील अलकार सहजस्फूर्त आहेत या गाथा अलकाराच्या स्पष्टीकरणासाठी सहेतुक घडवलेल्या नाहींत काश्मीरपासून तेलगणापर्यंत आणि नवव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत सस्कृत पण्डिताना जोपासना केलेल्या अलकारशास्त्राला गाथाशप्तशतीनेंच एवढीं सरस व समर्पक उदाहरणें पुरविलीं आहेत एवढ भाग्य दुसऱ्या कोणत्याहा सस्कृत वा प्राकृत ललित ग्रथाला लाभलेलें नाहा

## दुसऱ्या परिशिष्टांत समाविष्ट केलेल्या अलंकारग्रंथांच्या माहितीचें कोष्टक :

| क्र | ग्रंथकार | ग्रंथ | काळ शक | देश | उल्लेखसंख्या |  |  |
|---|---|---|---|---|---|---|---|
|  |  |  |  |  | प्रथमार्ध | उत्तरार्ध |  |
| १ | आनंदवर्धन | ध्वन्यालोक | ८४० ते ८७० | काश्मीर | १५ | १३ | कारिका, वृत्ति व उदाहरणें असे या ग्रंथाचे तीन भाग आहेत. कालानुक्रमाच्या स्वतंत्र सिद्धांतस्थापनेच्या दृष्टीनें साहित्यशास्त्रांत ध्वन्यालोकाला आग्रस्थान दिलें जातें. |
| २ | धनंजय | दशरूपक | ९७४ ते ९९४ | महाराष्ट्र, कर्नाटक | ८ | ७ | हा मुंज राजाच्या विद्वत्सभेचा सभासद होता. |
| ३ | भोजदेव | सरस्वती-कंठाभरण | १००५ - १०५४ | माळवा | १३३ | २६ | ग्रंथांत १५०० उदाहरणें दिलीं आहेत. |
| ४ | मम्मट | काव्यप्रकाश | अरराते | काश्मीर | ७ | ७२ | अलंकारसाहित्यांतील अग्रगण्य ग्रंथ. यावर सुमारें ७१ टीका उपलब्ध आहेत. निर्मिति ११०० चे सुमारास. |
| ५ | हेमचंद्र | काव्यानुशासन | अकरावें शतक | सौराष्ट्र | १६ | ११ | ध्वन्यालोक व काव्यप्रकाश यांच्या अनुरोधानें केलेला ग्रंथ. |

| क | ग्रथकार | ग्रथ | काल शतक | देश | उल्लेखसख्या | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | प्रथमार्ध | उत्तरार्ध | |
| ६ | रुय्यक | अलकारसर्वस्व | बारावें | काश्मीर | ४ | ६ | प्रमाणग्रथ यात अलकाराचे सर्व मान्य वर्गीकरण केल |
| ७ | मखुक | साहित्य मीमासा | प्रथमार्ध | ,, | २० | १३ | रुय्यकाचा शिष्य याला मख, मखक, लक असेंहि म्हटलेलें आहे |
| ८ | शोभाकर | अलकार रत्नाकर | बारावें वा तेरावें | ,, | ४५ | १५ | |
| ९ | नरेंद्रप्रभसूरि | अलकार महोदधि | १२२६ | गुजरात | २२ | ३१ | |
| १० | विश्वनाथ | साहित्यदर्पण | चवदावें | ओरिसा | १ | ७ | लेखक कलिंग राजाचे पदरी अधिकारी असावा |
| ११ | गोविंदठक्कुर | काव्यप्रदीप | पधरावें, उत्तरार्ध | मिथिला | ७ | ४७ | |
| १२ | विश्वेश्वर | अलकार कौस्तुभ | सुमारें १७०० | ५३ | १० | | |

## ८ गाथासप्तशतीची भौगोलिक पार्श्वभूमि :

गाथासप्तशतींतील भौगोलिक, स्थळद्योतक व दिशावाचक उल्लेख आणि त्यावरून निघणारे निष्कर्ष याचा या प्रकरणात विचार करावयाचा आहे. यांपैकी काही उल्लेख संदर्भानुसार प्रासंगिक, पौराणिक किंवा सांकेतिक स्वरूपाचे असल्यामुळे त्याबाबत तपशीलात जाण्याचे कारण नाहीं इतर उल्लेखाबाबत विषयानुरोधानें जरूरापुरता तपशील देतों

### १ नद्या

गिरिनदी गिरिणई (३७) गिरिनदीला पूर आलेला असून भोंवऱ्यात कदम्बाची दहाळी उडत बुडत आहे असें वर्णन क्र ३७ या गाथेंत आलेलें आहे. हा उल्लेख विशिष्ट नदीला अनुलक्षून केलेला आहे कीं केवळ डोंगरातून झपाट्यानें वाहणारी अनामिका नदी अभिप्रेत आहे[१] ही नाशिक व खानदेश जिल्ह्यातून वाहणारी व तापीला मिळणारी गिरणा नदी असावी असें माझें अनुमान आहे. खानदेशात कदम्ब (Gazetteer of the Bombay Presidency Khandesh p 25) क्वचितच आढळतात, मात्र नाशिक जिल्ह्यात पेठच्या आसमन्तात सह्याद्रीच्या जगलात हीं झाडें खूप (Gazetteer of the Bombay Presidency Nasik p 18) आहेत गिरणेचा उगम याच जगलात हातगडच्या दक्षिणेस झालेला आहे सटाणा व हातगड यांशीं सातवाहनाचें साहचर्य पूर्वीच कल्पिण्यात आलेलें आहे अरणा, तिरणा, दारणा, अशा 'णा' कारान्त नद्यांचीं नावे विशेषत याच भागात आढळतात अरणि (दे) = मार्ग, अर्णस् = प्रवाह, अणा (एट्रस्कन) = नदी आणि णई = नदी यांपैकी कोणत्या मूळाशीं या 'णा'चा सबध जोडावयाचा[?]

गोदावरी : (५८, १०३, १०७, १७१, १७०, १८९, १९३, २११, १५५, ८७९, ९४९, ९५८) गोआवरी, गोदा, गोला, गोलाई, गोलणइ, गोलावइ या नावांनी गोदावरीचे उल्लेख गाथासप्तशतींत आलेले आहेत. सातवाहनाच्या इतिहासात गोदावरीचें स्थान विशेष महत्त्वाचें आहे सातवाहन युगांतील शिलालेखात गोवर्धन व नाशिक यांचे उल्लेख आलेले आहेत गोदातीरीं पैठण येथ तर

त्याची राजधानी होती. गोदावरी त्र्यंबकेश्वरानजीक उगम पावते व सुमारे नऊशें मैलांच्या प्रवासानंतर कोकानाडाजवळ पूर्व सागराला मिळते. नाशिक जिल्ह्यात ही नदी डोंगराळ भागातून वाहते आणि मराठवाड्यात मदानातून. डोंगराळ भागातला तिचा प्रवाह अरुंद आहे. मराठवाड्यात तिचे पात्र रुंदावते पण महापूर नसेल तेव्हा उतारावरून ते ओलांडता येतें. माजरेशीं संगम झाल्यानंतर तिचें पात्र अधिक विस्तृत होतें व त्यातून तिचा प्रवाह बारमहा वाहत असतो. शबर पर्वतापर्यंतचा तिचा प्रवास सह्याद्रीच्या पठाराच्या उतारावरून होतो. या पर्वताच्या खिंडातून पार होऊन आन्ध्रदेशांत प्रविष्ट झालेला तिचा प्रवाह फक्त नौकागम्य आहे. ही वैशिष्ट्यें लक्षात घेऊन गाथासप्तशतीत तिचा कोणता भाग उल्लेखिलेला आहे याचा निर्णय घेतला पाहिजे.

क्र. ८८९ या गाथेतील गोदावरी गिरिवाहिनी आहे. तिच्या काठावर येथें आणि क्र. १०३, ९४९ व ९५८ या गाथामध्यें नैसर्गिक कुंज आहेत. क्र. १७५ या गाथतील गोदावरीच्या कांठावरील अरण्यात सिंहाची वस्ती आहे. क्र. १०७ व १९३ या गाथात गोदावरीचा प्रवाह उतारावरून ओलांडण्याचे उल्लेख आहेत. क्र. २३१ या गाथेंची साहसी नायिका भर रात्री गोदावरीचा पूर एकटी तरून गेलेली आहे. या प्रमाणावरून अनुमान करता येतें की या गाथातील गोदावरी ही नाशिकच्या डोंगराळ व मराठवाड्याच्या मैदानी भागातून वाहणारी आहे. क्र. ५८ मधील गोदावरी ही पैठणची आहे. तुलनेसाठी कोऊहलाच्या लीलावई (संपादक डॉ. आदिनाथ नेमिनाथ उपाध्ये - भारतीय विद्याभवन, सिंघी जैन ग्रंथमाला क्र. ३१) या प्राकृत महाकाव्यामधील प्रतिष्ठानवर्णनातील क्र. ३१ ही गाथा पहा.

मरहट्ठिया-पओहर-हलिद्द-पारिंपिंजरखुवाहीए।
धुव्वंति जत्थ गोला णईए नहियंसिच पाव

या दोन्ही गाथातील साम्य लक्षात घेतलें म्हणजे क्र. ५८ मधील गोदावरी ही पैठणचा आहे असा खात्री पटते. लीलावईत हालाचा संबंध सप्तगोदावरीशीं जोडण्यात आलेला आहे, पण ही कथा केवळ कल्पित व उघड उत्तरकालीन आहे. हालाच्या अर्थात् सारस्वतमंडलाला फार तर पैठणपर्यंतचीच गोदावरी माहीत

होती असी निष्कर्ष या उल्लेखावरून निघतो मुद्रा, शिलालेख इत्यादि साधना वरून दिसत की शककर्ता गौतमीपुत्र सातकर्णी (इ स ७, ते ९१) व वाशिष्ठीपुत्र पुळुमावि इ स ९१ ते ११९) याच्या कालापर्यंत सातवाहनाचा आन्ध्र देशाशा राज्यकर्ते या नात्याने प्रत्यक्ष सबध आलेला नव्हता

तापी तावी: (२३९) तापीचाउगम मध्यप्रातात सातपुड्यान्या पठारा वर होतो सुमारे साडेचारशे मैलाचा प्रवास करून ती सुरतेपासून सतरा मैलावर खंबायतच्या आखाताला मिळते मध्यप्रातातील तापीचा प्रवाह दाट जगलातून व खोल दरीतून वाहता व ब्हाणपुराजवळ ती मोकळ्या मैदानात येते खान-देशात तापी दोन्यान्या एका बाजूस सातपुडा व दुसऱ्या बाजूस सातमळा या पर्वतश्रेणि आहेत तापीचा प्रवाह सातपुड्याला खेटून वाहतो डागचे डोंगर ओलाडल्यानतर तापी गुजराथच्या मैदानात प्रवेश करते क्र २३९ या गाथेतील तापीतट तिच्या कोणत्या भागातील आहे यावद्दल अनुमान करता येत नाही येथे तापीतटाला 'पवित्र' हें विशेषण जोडलेले आहे तें विचारात घेण्याजोग आहे कारण गोदातटाला अनुलक्षून असे विशेषण गाथासप्तशतीत कोठेंही योजलेले नाही, इतकेंच नव्हे, गाथा-सप्तशतींतील गोदावरीचे तट विलासोत्तेजक व शीलखडक आहेत महाभारता तील पयोष्णीचच तापी ह मध्ययुगान नाव आहे असें श्री पार्जिटर याच अनुमान आहे (Ancient Indian Historical Tradition) गोदावरीचे धार्मिक माहात्म्य व पावित्र्य पुराणोत्तरकालीन असाव असें अनुमान करण्यास जागा आहे पुराणिकाना प्रचलित दतकथाच सकलन व सपादन गुप्त काळात केलेले असावे असा सशोधकाचा कयास आहे तो मान्य केला तर गोदावरी व तापी या नद्याच्या किनाऱ्यावरील प्रदेशाना अनुलक्षून योजलेल्या विशेषणा-वरून गाथासप्तशतीच सपादन गुप्तपूर्वकालीन आहे हें पर्यायान सिद्ध होतें

नर्मदा गाथासप्तशतींत नर्मदेचे उल्लेख णम्मआ (५४८, ७१४) व रेवा (५७८,५९९) या दोन्ही नावाना आलेले आहेत कारणातही रेवा नावाची नदी रोदज्य जवळ आहे तिच्यावरूनच रेवदडा ह नाव पडलेलें आहे असे त्या ठिकाणचे लोक सागतात (भरतखण्डादर्श श्री सहस्रबुद्धे, पृ ७६) गाथासप्तशतीला

ही रेवा अभिप्रेत असेल असे वाटत नाही. नर्मदेचा उगम अमरकंटकच्या पहाडात होतो आठशें मैलाच्या प्रवासानतर ती खंबायतच्या आखातात मिळते रेव् = उडी मारणें, या संस्कृत धातूवरून हें नाव पडलेलें असावें असें अनुमान आहे तिच्या प्रवाहात अनेक धबधबे आहेत, पैकीं कपिलधारा व धुवाधार हे विशेष विख्यात आहेत. नर्मदेचा भेरूळ पर्वतातील नागमोडी, निरुंद व जागोजाग बुडी घेणारा प्रवाह पाहिला म्हणजे वाटतें कीं ही अवखळ नागकन्या अल्लड व जगली समवयस्क मैत्रिणीच्या सळसळणाऱ्या चाळाच्या तालावर दऱ्याखोऱ्यातून गिरक्या घेत घेत, पाणी उडवीत व फुलें उधळीत, ठेचाळत धावत आहे जबलपुराजवळ नर्मदेची संगमरवरी दरी आहे शुभ्र उंच किनारे अरुंद मध्य आणि अथाग व गडद निळें पाणी, नर्मदेचें हे वैशिष्ट्य आहे व तें अद्वितीय आहे वाटतें कीं जणू बाल्य व यौवन याच्या सामारेषेवर श्वेतवसनधारिणी श्यामला मुग्धा उभी आहे! सुमारें दोनशें मल लाबीचें पहिलें मळईचें थोर समृद्ध करून नर्मदेचा प्रवाह विन्ध्य सातपुडा यांच्या कैचींतल्या दरींत शिरतो आकारमाधाता या स्थानापासून सुमारें शभर मैल लांबीचें तिचें दुसरें मळई मैदान सुरू होतें या भागात कधीं विन्ध्य तर कधीं सातपुडा, केव्हा दूर सरतात तर कोठ तिच्या आगचटीस जातात त्याना अखेरचें झिडकारून नर्मदा आपल्या तिसऱ्या मळई मैदानात गुजरातेत प्रविष्ट होते उत्तर व दक्षिण हिंदुस्थानची भागरेषा आणि लगतच्या प्रदेशाची भाग्यरेषा म्हणून नर्मदा भौगोलिक दृष्ट्या महत्त्वाची आहे जणू विधात्यानें अक्षांशाशीं समांतर अशी ही रेषा ओढलेली आहे! त्याहून अधिक महत्त्व तिला धार्मिक दृष्ट्या आहे नर्मदेचे किनारे शैव मंदिरानीं गजबजलेले आहेत, कारण नर्मदा ही मध्य हिंदुस्थानला शंकराची देणगी आहे नर्मदेच्या काठीं परशुरामानें हैहयाचा, सूर्यवंशी मांधातृनें मौनेय गधर्वांचा, शालिवाहनानें विक्रमादित्याचा व पुलकेशि चालुक्यानें हर्षवर्धनाचा पराभव केला, यामुळें हिचें ऐतिहासिक माहात्म्यही मोठें आहे पुराण.तरीं नर्मदेचें धार्मिक माहात्म्य वर्णिलेलें असलें तरी गाथासप्तशतींत त्याचा सुगावा लागत नाहीं. क्र. ५४८ या गाथतील नर्मदा ही क्रीडानुकूला, सहनशीला स्त्री आहे सुबंधूनें वासवदत्तेत (पृ १०२) रेवेबद्दल असेच उद्गार काढले आहेत (रेवया प्रियतमयेव प्रसारित वीचिहस्तयोपगूढ ।)

विन्ध्य हा रेवेचा प्रियकर त्याला ती लाटाच्या रूपानें आवेशानं आलिंगीत आहे नर्मदेचा प्रवाह जलक्रीडेला विशेष अनुकूल असल्याचें क्र ५७८ या गाथेंत सूचित केलें आहे मदनसक्त रेवेच्या सरहस आलिंगनाचें वर्णन वासव दत्तेत आलेलें आहे क्र ५९९ या गाथेंत नर्मदेच्या साहचर्यांतील स्त्रीचें साहस सांगितलेलें आहे गोदावरीच्या बाबतात अशीच क्र २३१ ही गाथा आहे

मुरला (८७०) या गाथेंतील मुरला ही नदी केरल प्रांतांतली आहे असें वेबरनें सांगितलें आहे सूक्ष्म तपशील देणाऱ्या सरकारी नकाशात मला ता सापडली नाहीं गाथाकोशसंपादनासाठीं देशोदेशीचे कवि हाल सातवाहनानें आमंत्रून आणले होते अशा कथा आहे या गाथेचा कवि केरल प्रांतातील होता म्हणून त्यानें स्वत ला प्रिय असलेल्या या नदीचा उल्लेख केलेला असावा, असें समजावयाचें कीं काय ? वस्तुत ह्या उल्लेखाचे बाबतात फारस खोलात शिरण्याचें कारण नाहीं, कारण तो गाथासप्तशतीच्या प्रक्षिप्त उत्तरार्धातील व व तेलग प्रतातील आह तरीही आपण सर्व बाजूनीं विचार करीत असल्यामुळें हा उल्लेख डावलता येणार नाहीं

रघुवंशात मरुलेचा उल्लेख ( ४ ५४-५५ ) आलला आहे —

> भयोत्सृष्ट विभूषाणा तेन केरलयोषिताम्
> अलकेषु चमूरेणुश्चूर्णप्रतिनिधीकृत ॥
> मरुला मारुतोध्दूतमगमत्कैतक रज
> तद्योधवारबाणानामयत्नपटवासताम् ।

यावरील टीकेंत मल्लिनाथ सागतो, ' मरुला नाम केरलदेशेषु काचिन्नदी । कालिदासाच्या या नदीचें नाव मरुला आहे तरीही तें मुरला आहे असें अनेक आधुनिक टीकाकारानी गृहीत धरल आहे कारण केरल प्रदेशाला मुरल अशी वैकल्पिक सज्ञा आहे उत्तररामचरिताच्या तिसऱ्या अकांत विष्कंभकात तमसा व मुरला या नद्याच्या देवताचा प्रवेश आहे पचवटींत आलेल्या रामचंद्राच्या रक्षणाविषयीं सावध राहण्याबद्दल अगस्त्य ऋषीचा पत्नी लोपामुद्रा हिनें गोदावरीला मुरलेबरोबर निरोप पाठविलला आहे तमसेच्या तीरावर वाल्मीकि ऋषींचा आश्रम होता (रामायण बालकाण्ड अध्याय २) भवभूति ही

( उत्तररामचरित २-२ ५ ) असेंच सांगतो दंतस्थानीं अगस्तीचे आश्रम नगर व नाशिक जिल्ह्यात जागजागा माडलेले आहेत, आणि वाल्मिकीचें मूलस्थान पुणे जिल्ह्यात वाल्हे येथ. तमसा नदीचा उगम पुराणात ऋक्ष्यवत ( मत्स्य ११३·१२५ ), ऋक्ष ( मार्कण्डेय ५४ २० ) पर्वतावर माडलेला आहे 'महाराष्ट्राचा वसाहतकाल' या लेखमालेंत ( ऐतिहासिक विविध विषय लेखांक १२ ) श्री राजवाडे यानीं खानदेशातील तामसवाडी या खेड्याचा संबंध तमसा नदीशीं जोडलेला आहे पण त्या भागात या नावाची नदी नाहीं हैद्राबाद राज्यात आदिलाबादनजीक तामसी नावाचें गाव आहे, पण या नावाची नदी नाहीं तमसेची सखी मुरला ही पंचवटीजवळ गोदावरीला मिळणारी एखादी नदी असावी, असें डॉ बेलवलकर उत्तरराम चरिताच्या मराठी भाषांतरात ( पृ १३२ ) सांगतात या विवेचनावरून स्पष्ट होतें कीं मुरलेचा शोध खानदेश, नासिक व नगर या भागातच केला पाहिजे

महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासात अश्मक व मूलक या प्रदेशाचे उल्लेख वारवार येतात अयोध्येतील राज्यक्रांतीमुळें सूर्यवंशायाना राज्यत्याग करून दक्षिणापथात अज्ञातवासात काळ काढला त्यांचेंच अश्मक व मूलक राजांच्या नावावरून या प्रादेशिक संज्ञा पडलेल्या असाव्यात हे प्रदेश पैठणच्या आसमंतात असल्याचे अनेक दाखले प्राचीन बौद्ध साहित्यात आढळतात अवंतीसुदरीकथेत प्रेहरा व मुरला याचा जोड उल्लेख आलेला आहे या नद्यात अपरान्तातील हत्ती विहार करीत, असें तेथें सांगितलें आहे म्हणून या नद्या अपरान्तातील असाव्यात असा श्री राघवन् (आन्ध्र ओरिएन्टल् रिसर्च मद्रास युनिव्हर्सिटी भाग ५ विभाग २ ) यानीं कयास केला आहे अपरान्तात घाटमाथ्यावरील मावळ भागाचाहि समावेश होत असे या नद्यापैकी प्रहरा ही घटप्रभा किंवा मलप्रभा असावी असा श्री सरकार ( Select Inscriptions Vol I p 453 ) यांचा अदाज आहे मला वाटतें प्रेहरा ही प्रवरा असावी प्रवरेच्या काठचे मराठी लोक तिचा उल्लेख पेहरा असाच करतात या अनुरोधानें मुरला ही प्रवरेला मिळणारी मुळा हीच होय असें ठरतें. मुळा या नावाच्या नद्या नगर व पुणे जिल्ह्यात आहे पुणें

जिल्ह्यांतली मुळा मुळशी पेठ्यांत उगम पावते व पुण्यानजीक मुठेस मिळते; त्याचा मुळा-मुठा हा जोडप्रवाह दौंडनजीक भीमेला मिळतो. नगर जिल्ह्यांतली मुळा हरिश्चंद्रगडाजवळ उगम पावते व नेवाशानजीक प्रवरेला मिळते आणि त्यांचा जोडप्रवाह कायगांव टोक्याजवळ गोदावरीला मिळतो. या दोन मुळा नद्यांच्या दरम्यानच्या प्रदेशाला अनुलक्षून मूलक ही संज्ञा असावी असें वाटतें. मुळे, मुळ्ये, मुळीक वगैरे आडनांवें मराठी लोकात, अनेक पोटजातींत, विशेषतः ह्याच भागांत आढळतात. याचें मूळ कारण हेंच असावें असें वाटतें. कृष्णराज राष्ट्रकूटाच्या ताम्रपटांत ( भारत-इतिहास-संशोधक-मंडळ : इतिवृत्त : शके १८३८ ) मुइल नदीचा उल्लेख आलेला असून त्यांत ही नदी पूनक विषयात माडलेली आहे. प्रवरा व मुळा या नद्याच्या खोऱ्यातील वस्ती फार प्राचीन आहे. श्री. पारखी ( आमचा नगर जिल्हा : पृ. ७३ ) सांगतात : 'मूळ रहिवाशांची ती मुळा व आर्यांनी वस्ती केली ती प्रवरा.' पुणें जिल्ह्यांतील मुळा नदीच्या काठाजवळ असलेल्या माण या गांवीं नागरट करीत असतांना माझ्या एका पक्षकाराला आढळलेलीं व त्याच्या कृपेमुळें मला मिळालेलीं क्षत्रप नाणीं माझ्या संग्रहीं आहेत. गोदावरी व प्रवरा यांच्या खोऱ्यांतील प्रागैतिहासिक व सातवाहनकालीन अवशेष नुकतेच उजेडांत आलेले आहेत. या साधनांच्या अनुरोधानें महाराष्ट्राच्या वसाहतीबाबतच्या व प्राचीन इतिहासाविषयींच्या अनेक सिद्धांताचा फेरविचार करावा लागणार आहे.

मला वाटतें क्र. ८७० या गाथेंतील 'मुरला' हा पाठ हस्तदोषजन्य असावा. क्र ६९६ या गाथेंत 'मुइल्लओ'= मूलकः असा शब्द आलेला आहे. या शब्दाला 'मुरुल्लिओ' असा पाठभेद वेबरनें दिलेला आहे. यावरून वाटतें कीं क्र. ८७० या गाथेंतील मूळ उल्लेख 'मुइला'= मुळा असा असावा.

मूळ गाथेंत मुरला नदीच्या वळणांचा उल्लेख केला आहे. नगर जिल्ह्यातली मुळा अशीच नागमोडी आहे : "Its bed throughout is tortuous and deep and the surface of the vally is cut by vast fissures formed by the mountain torrents that dash into the main stream. Passing the town of Kotul it takes a bend to the south winding between the rocky precipices

at the foot of Baleshwar It then.. persues a mean easterly course between Sangamner and Parner .It then takes a sudden turn to the north east and enters the plain of Rahuri. and joins the Pravara at the village of Sangam" (Bombay Gazetteer, Ahmednagar, p 8) वळणामुळें संकेताला योग्य अशा आडोशाचा मूळ गायेंत आलेला उल्लेख किती यथार्थ आहे याची या अधिकृत वर्णनावरून खात्री पटते हा उल्लेख मुळेच्या उगमाच्या आसमंतातील भागाला अनुलक्षून केलेला असला पाहिजे

यमुना (६६९) हिमालयात जम्नोत्रीनजीक उगम पावणारी यमुना प्रयाग येथें गंगेला मिळते गंगेचा वर्ण धवल व यमुनेचा श्यामल गाथासप्तशतींतील यमुनेचा उल्लेख केवळ सांकेतिक आहे आणि त्यांत तिचा वर्ण नमूद केलेला आहे

## (२) पर्वत

मन्दर (४७५) महाभारतात मन्दर पर्वत हिमालयश्रेणींत, मेरूच्या पूर्व दिशेस (अनुशासन पर्व अ १९, द्रोणपर्व अ.९४,वनपर्व अ १६२) असल्याचें सांगितलें आहे श्री नन्दलाल दे हे याची ओळख भागलपुरानजीकच्या एका पर्वताशीं (Geographical Dictionary of Ancient and Medieval India p 124) पटवितात मन्दर पर्वतावर कुबेराची वस्ती आहे (वनपर्व १६३ ३६), विष्णूनें कांसवाचें रूप धारण केलें, मन्दर पर्वत पाठीवर घेतला व समुद्रात प्रवेश केला, नंतर देवदानवांनीं मन्दराला वासुकीचे वेढे देऊन समुद्र मंथन केलें, अशी कथा आहे क्र ४७५ या गायेंतील मन्दर पर्वताचा उल्लेख केवळ सांकेतिक आहे

मलय (४९७, ५४२) भारतात सात कुलपर्वत आहेत त्यापैकीं मलय हा सर्वांत दक्षिणेकडचा हा सह्याद्रीचा मलबारांतील भाग तो कावेरीच्या दक्षिणेस कन्याकुमारीपर्यंत पसरलेला आहे त्याचा आकार प्रौढेच्या स्तनासारखा आहे असें कालिदास (रघुवंश ४ ५१) सांगतो हत्ती व नाग, चंदन व वेलदोडे याबद्दल, तसेच त्यावरून उत्तरेकडे वाहणाऱ्या थंडगार वाऱ्याबद्दल (कुमारसंभव ८ २५)

मलयाची प्राचीन काळापासून ख्याति आहे. हे सुगंधि थडगार वारे भारतांतील प्रेमी जनाना प्रिय वाटतात आणि विरही जनाना दुःसह; जणू त्यावरील विषारी नागांच्या फूत्कारासारखे! गाथासप्तशतींतील मलयाचा उल्लेख केवळ सांकेतिक आहे.

विन्ध्य : ( ७०, ११५, ११६, ११७ ५७७, ६३१, ७८८ ): येथें विन्ध्य ह्या विषयाचे विवेचन विशेष विस्तारानें केलेलें आहे. कारण गाथासप्तशतींत त्याचे अनेक उल्लेख आलेले आहेत. ग्रंथरचनेच्या स्थलनिर्णयाच्या दृष्टीनें हा विषय विशेष महत्त्वाचा आहे. संदर्भाच्या अनुरोधानें विन्ध्याद्रीची ओळख मी इन्ध्याद्रीशीं पटविलेली आहे.

भारताच्या सप्तकुलाचलांत विन्ध्याद्रीचें स्थान सह्यादि इतकें महत्त्वाचें आहे. विन्ध्यश्रेणि पश्चिमेस खंबायतच्या आखातापासून पूर्वेस बंगालच्या उपसागरापर्यंत व उत्तरेस दिल्लीच्या तटबंदीपर्यंत पसरलेली आहे असें कोणी ( Asiatic Researches:XIV 382 ) सांगतात. खुद्द विन्ध्याचल हें स्थान संयुक्त प्रांतात मिर्झापुरानजीक गंगातीरीं आहे येथे विन्ध्येश्वरीचें पुरातन मंदिर आहे. शाक्त मताच्या प्रसारामुळें विन्ध्याद्रीच्या मर्यादा एवढ्या विस्तृत मानण्यात आलेल्या असणें संभवनीय आहे. सामान्यतः विन्ध्याद्रीचा विस्तार अमरकंटकपासून अलीराजपुरापर्यंत आहे असें मानण्यात येतें.

वेदकालीन आर्यांना विन्ध्य पर्वताची माहिती नाहीं. गंगा-यमुना दुआबात त्याच्या वसाहती फैलावल्यानंतर विन्ध्य ही आर्यावर्ताची दक्षिण सीमा मानण्यात येऊं लागली ( वसिष्ठ धर्मसूत्र · १. ७ ). दक्षिणापथात आर्यांच्या वसाहती संहिताकालात झालेल्या असाव्यात. अपरान्तात भृगु, मध्यभागात गौतम व वसिष्ठ आणि विदर्भांत अगस्ति यांच्या नेतृत्वाखालीं आर्यांच्या वसाहती महाराष्ट्रात झालेल्या आहेत. गोत्राचा प्रादेशिक प्रादुर्भाव आपणाम निश्चित करता आला तर या वसाहतींच्या संदर्भाचे धागेदोरे सापडूं शकतील. आन्ध्र, पुण्ड्र, शबर वगैरे विश्वामित्राच्या बहिष्कृत पुत्राची कथा ऐतरेय-ब्राह्मणात आलेली आहे. आर्यावर्तातून हद्दपार झालेल्या या जमाती विन्ध्य पर्वताच्या परिसरात स्थायिक झाल्या. विश्वामित्राच्या व अगस्तीच्या कथात ऐतिहासिक,

भौगोलिक व सामाजिक सर्व सामावलेली आहेत विश्वामित्राच्या काळापर्यंत आर्यांचा दक्षिणापथात प्रवेश झालेला नव्हता उचीच्या बाबतींत मेरूशीं स्पर्धा करणारा विन्ध्य कुशीवर वलडला, म्हणजे ज्वालामुखींच्या उद्रेकात सह्याद्रि जन्मला तेव्हा विन्ध्य भूमींत खचला ही घटना उत्तरकालीन असणें समाध्य आहे भूगोलशास्त्रज्ञ सांगतात कीं विन्ध्य हा स्वतन्त्र पर्वत नसून गगा-यमुना मैदानाची कड आहे, माळव्याच्या पठाराची भिंवई आहे नर्मदेच्या दक्षिण किनाऱ्यावरून तो उत्तुग तटवदीसारखा दिसतो आणि विन्ध्याच्या कडेवरून नर्मदा ही या तटवदीलगत खटकात खोदलेल्या खदकासारखी दिसते। अगस्तीची पत्नी लोपामुद्रा ही विदर्भाची राजकन्या अगस्ति दक्षिणेंत आला तेव्हा त्याच्याबरोबर सरक्षणासाठीं क्षत्रियाचीं अठरा आणि वसाहतींसाठीं व सवर्धनासाठीं शेतकरी व धनगर याचीं अनेक कुलें होतीं या परपरावरून अनुमान करता येतें कीं अगस्तीनें दक्षिणापथात विदर्भातून प्रवेश केला आणि प्रथम तेथें सस्कृतीचें बीजारोपण केलें पुढें अगस्ति तामीळ प्रातात गेला तेथील प्रदेश अवर्षणापासून मुक्त करण्यासाठीं लोपामुद्रेनें कावेरीचें रूप धारण केलें, म्हणजे आर्यांच्या आघाडीवरल्या या टोळीनें या भागांत जागोजाग बधारे घालून पाटपाण्याची व्यवस्था केली

हल्लीं जो पर्वत विन्ध्य या नावानें ओळखला जातो त्याला पूर्वीही हेंच नाव होतें किंवा कसें, हा प्रश्न वादग्रस्त आहे विन्ध्य श्रेणींतील वेगवेगळ्या भागाना निरनिराळीं नावें होती (१) ऋक्ष, ऋक्षपाद, ऋक्षवान् आणि ऋष्यवत किंवा ऋक्षवत, (२) पारिपात्र किंवा पारियात्र, आणि (३) विन्ध्य आता या तीन्ही पर्वतांची श्रेणी विन्ध्य या एकाच नावानें ओळखली जाते या पर्वतांबद्दचे आधारग्रथांतील उल्लेख गोंधळलेले आहेत वनपर्वांतील ऋक्षवान् (६१ २३-२४) हा सातपुडा असावा. प्रा मिराशी याचें असेंच मत आहे श्री नन्दलाल दे (पूर्वोक्त - Map of Ancient India) हे ऋक्ष पर्वत मगधाच्या पश्चिम दक्षिण सीमेवर मांडतात आणि विन्ध्य पर्वत हिरण्यवाहा उर्फ शोण नदीच्या उत्तरेस नर्मदेचा उगम ऋक्ष पर्वतात होतो असें ब्रह्माण्ड, मार्कण्डेय व वायु या पुराणात सांगितलेलं आहे, तर विष्णुपुराणात तिचा उगम विन्ध्य पर्वतात दिलेला आहे नर्मदा व तापी याच्या दरम्यानच्या पर्वतश्रेणीला

ऋक्षवत आणि माही व वेत्रवती याच्या मधल्या श्रेणीला पारियात्र अशी नावें हिंदुस्थानच्या केंब्रिज इतिहासाच्या प्राचीन भागात (भाग पहिल्यातील नकाशा-मध्यें) दिलेली आहेत. दक्षिणापथात प्रविष्ट होण्यापूर्वी आर्यसंस्कृतीचा विशेष उत्कर्ष संयुक्त प्रातात झालेला असल्यामुळे त्या भागाला सोडून अशा प्रदेशातून आर्यांनी विदर्भांत प्रवेश केला असला पाहिजे. अर्थात् ह्या काळात विन्ध्य ही सज्ञा या श्रेणीच्या पूर्वभागाला अनुलक्षून वापरण्यात येत असली पाहिजे. केंब्रिज इतिहासात हा ह्या भागातच मांडलेला आहे. पारियात्र म्हणजे यात्रेची मर्यादा ( भरतस्थलादर्श श्री सहस्रबुद्धे पृ १२६ ), कारण शिष्ट आर्यांनी दक्षिण भारत हा बहिष्कृत मानलेला प्रदेश। पारियात्र हें कारुश व मालव याचें वसतिस्थान असें वायुपुराण ( Wilson II III. p. 133) सागतें या गोंधळातून निर्णय घेण्याला एकच साधन आहे, तें ही दुबळें आहे. या पर्वतापासून निघणाऱ्या नद्यांचा तपशील पुराणात दिलेला आहे; त्यांच्या नावांपैकी विश्वसनीय व आद्य कोणती या वादात न शिरता या नद्यांबद्दलच्या बहु व बुद्धिमान्य अशा उल्लेखाच्या अनुरोधानेंच या सज्ञा निश्चित केल्या पाहिजेत.

पुराणातील नद्यांच्या प्राचीन सज्ञाची ओळख प्रचलित नावाशी अनेक साधनांच्या साह्यानें पटविण्यात आलेली आहे. श्री. पार्जिटर ( Ancient Indian Historical Tradition ) सागतात पुराणातील पर्णाशा ही माळव्यांतली बनास ( पृ. २७९ ) आणि चर्मण्वती, वेत्रवती व शुक्तिमती या अनुक्रमें ( पृ. २५९ ) चंबळ, वेटवा व केन. वेत्रवती व शुक्तिमती याचे दरम्यानची धसान ही दशार्णा ( भारतवर्षीय भूवर्णन. श्री. पंडित पृ. २५२ ), तमसा ही तोंस ( Wilford Asiatic Researches: XIV. 396 ). श्री. नन्दलाल दे आणि डॉ. रॉयचौधरी ( Political History of Ancient India)यानीं पुढील ओळखी पटविल्या आहेत तापीला मिळणारी पूर्णा ही पयोष्णी, पैनगगा ही निर्विन्ध्या, वैनगगा ही वेण्वा, वर्धा ही भद्रा. या ओळखी जमेस धरल्या म्हणजे दिसून येतें की ह्यी उत्तर पर्वतश्रेणीला विन्ध्य हें नाव देण्यात येतें त्याच्या पश्चिम भागाला पारियात्र व पूर्व भागाला ऋक्षवान् अशी नावें पुराणरचनाकाळांत प्रचलित होती आणि अमरकंटक श्रेणीपासून महादेव श्रेणीपर्यंतच्या पर्वतांना विन्ध्य हें नाव होतें.

| पुराण | ऋष्यवत, ऋक्ष, ऋक्षपाद किंवा ऋक्षवान् पर्वतांत उगम पावणाऱ्या नद्या | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वायु | करतोया | चित्रकूटा | तमसा | दशार्णा | नर्मदा | शुक्तिमती | शोण | विपाशा | महानदी | |
| ब्रह्माण्ड | करमोदा | ,, | | ,, | ,, | शक्तिमती | ,, | विपाश्या | ,, | |
| मार्कण्डेय | ,, | ,, | ,, | ,, | ,, | शुक्तिमती | ,, | विपाशा | | |
| मत्स्य | | ,, | ,, | ,, | | ,, | | | | |
| विष्णु | | | × | | × | × | × | × | × | तापी, पयोष्णी, निर्विन्ध्या. |

| पुराण | पारिपात्र किंवा पारियात्र पर्वतात उगम पावणाऱ्या नद्या | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वायु | वेत्रवती | सिंधु | अवन्ती | शिप्रा | परा | विदिशा | चर्मण्वती | मही | वेदवती | वेदस्मृति | वृत्रघ्नी | |
| ब्रह्माण्ड | देत्रवती | ” | ” | ” | | ” | ” | ” | ” | देवस्मृति | वातघ्नी | |
| मार्कण्डेय | वेत्रवती | ” | ” | ” | पारा | ” | | | ” | वेदस्मृति | वृत्रघ्नी | |
| मत्स्य | ” | ” | ” | ” | ” | विपुशा | | | वेणुमती | ” | ” | नर्मदा |
| विष्णु | ” × | × | | × | | | × | × | | ” | | |

विन्ध्य पर्वतांत उगम पावणाऱ्या नद्या :

| पुराण : | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वायुः | तापी | पयोष्णि | मद्रा | निर्विंध्या | तोया | निषधा | वेण्वा | वैतरणी | कुमुद्वती | महागौरी | दुर्गा | |
| ब्रह्माण्डः | " | " | सिप्रा | " | " | | वेणा | " | " | " | " | |
| मार्कण्डेय. | " | " | " | " | | निषधावती | " | " | " | " | | |
| मत्स्यः | " | " | शिप्रा | " | " | ऋपभावती | " | " | " | " | दुर्गता | |
| विष्णु. | × | × | × | × | | | × | | | | | नर्मदा |

कोष्टकांसंबंधीं खुलासा : पुराणांत आढळलीं तींच नांवें येथें दिलीं आहेत. अपवादात्मक उल्लेख उभ्या जाड रेषेबाहेर दिले आहेत. यापैकीं ज्या नद्या सोबतच्या नकाशांत आहेत त्यावर × चिन्ह केलेलें आहे.

अजठा श्रेणीलाच चादोर, इन्ध्याद्रि, इन्ध्याद्रि, सह्याद्रि व सातमाळ अशी वैकल्पिक स्थानिक नावें आहेत इन्ध्याद्रि हें तिचें सर्वांत प्राचीन नाव. ही सह्याद्रीची शाखा असून तिचा विस्तार नाशिक जिल्ह्यातील मनमाडपासून यवतमाळ जिल्ह्यातील पैनगगा व वर्धा याच्या सगमापर्यंत आहे. औरगाबाद जिल्ह्यात या श्रेणीला अजठा आणि परभणी व निजामाबाद जिल्ह्यात सह्याद्रि म्हणतात नाशिक जिल्ह्यातला या श्रेणीचा भाग चादूर श्रेणी या नावानें ओळखला जातो. गाथासप्तशतीतला विन्ध्याद्रि हा अर्वाचीन इन्ध्याद्रि ही ओळख पटली म्हणजे गाथासप्तशतीचें रचनास्थान निश्चित होते. या श्रेणीच्या आसमानजीक अजठा येथें व आसपास सातवाहनकालीन लेणीं आहेत व दक्षिणेस गोदातीरा प्रतिष्ठान उर्फ पैठण ही त्याची राजधानी आहे, आणि तिच्या अतानजीकच्या चादा जिल्ह्यात सातवाहनाची विशिष्ट धर्तीची नाणीं मिळालेलीं आहेत. प्राचीन काळापासून विदर्भ हें महाराष्ट्राचें सस्कृतिसवर्धन क्षेत्र आहे. या भागातले अनेक कवि हाल सातवाहनाच्या सारस्वत मडलात समाविष्ट झाले असले पाहिजेत आणि त्यानींच आपल्या गाथात या पर्वताचीं जिव्हाळ्याचीं वर्णनें केलीं असलीं पाहिजेत

## ( ३ ) संकीर्ण, साकेतिक व पौराणिक उल्लेख.

गाथासप्तशतींत सकीर्ण व साकेतिक स्वरूपाचे आणि पौराणिक असे अनेक भौगोलिक उल्लेख आलेले आहेत. क्र ४९१ व ९४७ या गाथामध्यें सरोवराचे उल्लेख आहेत आणि क्र ८, ११०, ३९१, ४१४, ४९१, ७१४ व ९४७ यामध्यें ग्रामतडागांचे आहेत ग्रामतडाग हें कोंकण व मावळ भागाचें वैशिष्ट्य आहे क्र ४७१ मध्य पावसाळ्याच्या आरभीं हस मानस सरोवराकडे धाव घेतात असा उल्लेख आहे. हा उल्लेख केवळ साकेतिक आहे ब्रह्मदेवानें मनानें हें सरोवर निर्माण केलें म्हणून त्यास मान, मानस हें नाव पडलें ( गोडबोले भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश ) अशी परपरा आहे हेमाम्भोज नावाचीं सुवर्णकमलें फक्त मानससरोवरात फुलतात असा कालिदासान ( रघु १३·६० ) सागितलें आहे दर पावसाळ्याच्या आरभीं हस मानससरोवराकडे जातात असा आपल्या कवींचा सकेत आहे. दक्षिणेकडून मानस

सरोवरावर अनेक हंस आलेले आपण प्रत्यक्ष पाहिले असल्याचें श्री. मूरक्राफ्ट (Asiatic Researches, XII: 466) सांगतो. अर्थात् हा हंसांच्या स्थलांतराचा संकेत केवळ काल्पनिक आहे, निरीक्षणावर आधारलेला नाही, असें मानण्याचें कारण नाही. क्र. ६७९ या गाथेंत सैन्धव पर्वताचा सांकेतिक उल्लेख आहे. सॉल्ट रेंज ही पर्वतश्रेणि पंजाबांतील झेलम, शाहपूर व मियानवाली या जिल्ह्यांत पसरलेली आहे. सैन्धवाचा हा जगांतला सर्वांत मोठा साठा आहे. या भागांतले लोक स्वयंपाकासाठीं मिठाऐवजीं सैन्धवच वापरतात. तांबूस पांढुरक्या रंगाच्या ह्या पर्वताचे उतार नापीक, निर्वृक्ष असले तरी ते उन्हांत चमकतात व चांदण्यात शीतल भासतात.

कुब (४४३), दुग्धसागर (३८८, ४७५), नरक (८७२), लंका (३११), मज (११२), स्वर्ग (१२५,१६७) व क्षीरोद (११७) हे पौराणिक-भौगोलिक उल्लेख केवळ सांकेतिक स्वरूपाचे आहेत.

गाथासप्तशतींत दुग्ध व क्षीर यांव्यतिरिक्त समुद्राचे ५ उल्लेख आलेले आहेत. गणपतीनें सोंडेनें सागर शोषला (क्र. ४०३) व देव-दानवांनीं समुद्रमंथन केलें (क्र. ५५३), हे दोन उल्लेख पौराणिक आहेत. क्र. ७५४ व ९७६ हे उल्लेख सांकेतिक आहेत. क्र. ७४० मध्यें समुद्रपर्यटन करणाऱ्या जहाजावरील टोलकाठांचा उल्लेख आलेला आहे. पूर्वसातवाहनांचें राज्य पश्चिम समुद्रालगतच्या अपरान्तांत होतें हें निश्चित. या भागांतील बंदरांतून परदेशांशीं मोठा दर्यावर्दी व्यापार चालू होता हेंही निश्चित. हा उल्लेख महत्त्वाचा आहे. हालानंतर गौतमीपुत्र सातकर्णीच्या कारकीर्दींत सातवाहनांचें साम्राज्य पश्चिम समुद्रापासून पूर्व समुद्रापर्यंत पसरलेलें होतें हें पाण्डव लेण्यांतील त्याच्या लेखांवरून निश्चित ठरतें. टोलकाठ्या असलेल्या जहाजांच्या प्रतिमा पूर्व किनाऱ्यालगतच्या भागांत आढळणाऱ्या सातवाहन-मुद्रांवर मिळालेल्या आहेत. सातवाहनांचा सामुद्री संबंध या उल्लेखावरून स्पष्टपणें सिद्ध होतो.

दिशांपैकीं फक्त दक्षिण दिशेचे उल्लेख (क्र. ९७ दक्षिणानिल, क्र. ४४३ दाक्षिण, क्र. ५७१ दाक्षिण) आहेत. क्र. ५७१ मध्यें हंस मानसमरोवराकडे जातात त्याप्रमाणें राजाचे शत्रु त्याचें अनुकरण करतात, असा उल्लेख आहे. हंसांचा

हा प्रवास दक्षिणेकडून उत्तरेकडे आहे हें स्पष्ट आहे हा राजा दाक्षिणात्य असून त्याचे शत्रु उत्तरेकडे पलायन करते झाले, असा निष्कर्ष या उल्लेखात सूचित आहे असें मानावयास प्रत्यवाय नाहीं

**निष्कर्ष :**

गाथासप्तशतींतील भौगोलिक उल्लेखावरून काहीं निष्कर्ष निघतात

गाथासप्तशतींत दक्षिण भारतातील नद्याचे व पर्वतांचे उल्लेख आढळत असले तरी यमुना, विन्ध्याचल व व्याधजीवन याविषयींच्या उल्लेखावरून या प्रथाची रचना उत्तर भारतात झाली असली पाहिजे असें निश्चित ठरतें, असा श्री माथुर (नागरी प्रचारिणी पत्रिका. वर्ष ५६ अक ३-४. सवत २००८ केशव स्मृति अक 'गाथासप्तशती–उसका रचनाकाल और रचयिता', पृ ७७) याचा सिद्धान्त आहे ते सागतात कीं गाथासप्तशतींत उत्तर हिंदुस्थानातील 'पर्वतीय भूभाग, सिंचाई और खेती के तरीकों, वहा उत्पन्न होनेवाली फसलों और वनस्पतियों, झीलों और व्याधों, अनार्य जाति की युवतियों के प्रसग, विन्ध्याचल और अरवली पर्वत की घाटियां तथा उनमें बसनेवाली भील और व्याध जातियों के जीवन के यथार्थ चित्र प्रस्तुत" होत असल्यामुळें हा सिद्धान्त निश्चितपण प्रस्थापित होतो, असें त्याचें विधान आहे हा सिद्धान्त किती फोल आहे ह वरील विवेचनावरून लक्षात आलें असेलच असा भरवसा वाटतो

गाथसप्तशतींतील निर्दिष्टापैकीं बहुतेक स्थानें महाराष्ट्रातील आहेत अन्य स्थानाचे आहेत तसे हे उल्लेख सांकेतिक नाहींत गाथासप्तशतींतला विन्ध्यादि हा इन्ध्यादि, गिरिणई ही गिरणा आणि मुरला ही मुळा नगर व पुण या जिल्ह्यातील मुळाच्या दरम्यानचा प्रदेश तो प्राचीन मूळक देश नद्यापैकीं बहुसख्य उल्लेख गोदावरीचे आहेत गाथासप्तशतीच्या काळात गोदावरीपेक्षा तापीला धार्मिक माहात्म्य अधिक असावें गोदावरीच्या सौन्दर्यातल्या व इन्ध्याद्रीच्या परिसरातल्या कवींनी गाथासप्तशतीच्या रचनेत विशेष आस्थेन व प्रामुख्यान भाग घेतलेला असावा गाथसप्तशती हा दाक्षिणात्याचा, महाराष्ट्री याचा सुभाषित कोश आहे ६ यावरून निश्चित ठरतें गाथासप्तशतीच्या

उत्तरार्धात हिमाचे उल्लेख आलेले ( क ७६८ व क्र ८९३ ) आहेत दक्षिणेंत जन्मलेल्या या गाथातील हिमाचे उल्लेख वेबरला विलक्षण वाटले आहेत रामायणकाळीं या भागात दण्डकारण्य होतें आणि मध्ययुगातही येथे दाट जंगल होतें सह्याद्रीच्या घाटमाथ्यालगतच्या भागात हल्लींही अधून मधून पाण्याच्या पृष्ठभागावर बर्फाचा तवग जमण्याइतकी कडक थंडी पडते अणकाईचा डोंगर हा इन्ध्याद्रीचाच एक भाग आहे या डोंगरावर धुक्याचें हिमकणात रूपांतर होऊन डोंगर हिमवर्षावान आच्छादून गेल्याचें वृत्त नुकतेंच प्रसिध्द ( सकाळ ता १३।१।१९५४ ) झालेलें आहे यावरून या उल्लेखात अनैसर्गिक अगर अवास्तव असे काहीं नाहीं असें दिसून येईल अर्थात् गाथासप्तशतातील भौगोलिक उल्लेख तिच्या महाराष्ट्रीयत्वाला पोषक असेच आहेत

## ९ गाथासप्तशतीतील वन आणि उपवन श्री :

गाथासप्तशतीत फुलाफळाचें, वृक्षलताचे व शेतीवाडीचे अनेक उल्लेख आलेले आहेत साहजिक आहे कारण रानावनात प्रत्यहीं हिंडणाऱ्या, त्याच्या आसा मतात राहणाऱ्या व शेतवाडीत जातीनें काम करणाऱ्या श्रमिकाचीं व ग्रामीणाची या गाथा हीं भावगीतें आहेत. उल्लेखित वनस्पतींपैकीं बहुतेक स्थूलमानानें आपल्या परिचयाच्या आहेत, पण आपली माहिती उडती असते, शिवाय तेव्हा प्रचलित असलेल्या काहीं सज्ञाचे अर्थ आता बदलले आहेत, हवामानातल्या बदलामुळें काही वनस्पति नामशेष झालेल्या आहेत गाथातील अभिप्रेत मर्म उमजण्यासाठीं त्याची निश्चित माहिती असणें अवश्य आहे शिवाय या चर्चेतून काहीं निष्कर्ष निघण्याचाही संभव आहे या प्रकरणात उल्लेखित वनस्पतींची माहिती संकलित करून दिली आहे, शास्त्रोक्त वर्गीकरणानुसार नव्हे, अकारवारीनें.

अङ्कोल्ल ( अङ्कोट ३१३, अङ्कोल्ल ४९७, ७७१, ७७२, ७७३ ) Alangium Decaptalum (Lamrck.) Alangium-hexapetalum, Erycibe paniculata ) अमरकोशात व देशीनाममालेंत हा शब्द नाहीं अङ्केल्लि व कङ्केल्लि या देशी शब्दाचा अर्थ अशोक, तो या गाथाना अभिप्रेत नाहीं, फार तर क ३१३ मधील उल्लेख अशोकाचा असेल, इतरत्र कङ्केल्लि

हाच शब्द मूळ स्वरूपात आलेला असल्यामुळें हस्तदोषानें हें स्वरूप आलेलें असणें संभवत नाहीं टीकेंत गगाधर सागतो, अङ्कोल्ल म्हणजे अङ्कोट. अमरकोशात याचा अर्थ निकोचक (अक्षोट कर्परालौ द्वौ अङ्कोटे तु निकोचकः।) असा दिलेला आहे अक्षोट म्हणजे अक्रोड निकोचक म्हणजे पिस्ता अकोट व अक्षोट हे एकच असें वेबर सागतो. तें बरोबर नाहीं शिवाय त्याची अकोल्लाशीं ओळख पटत नाहीं हिंदुस्थानात अक्रोडाचीं झाडें फक्त हिमालयाच्या उतारावर वाढतात व पिस्त्याचीं झाडें कोठेंही आढळत नाहींत जायफळालाही अक्रोड हें वैकल्पिक नाव असल्याच सशोधकानीं (Talbot Forest Flora of the Bombay Presidency Vol II p 489) नमूद केलेलें आहे अङ्कोल्लाचीं झाडें घरोघर, अगणात (क ४९७) व परसात (क ३१३) असल्याचें गाथा सागतात गगाधर सागतो "अङ्कोटो गृहवाटिकायामेव प्रायशो भवतीति प्रसिद्धि ।" गाथासप्तशतीचें सपादन झालें त्या भागात व काळात शीतप्रदेशातले हे वृक्ष उपलब्ध असणं अशक्य आहे सबब गाथातील अङ्कोल्लाची ओळख परिचित अकोटाशींच पटविली पाहिजे हीं झाडें हिंदुस्थानातील बहुतेक प्रातात (वनौषधि गुणादर्श १ २) विशेषत दक्षिणापथात (Barnett Cyclopaedia) आढळतात अकोल किंवा अकोट हें झाड कटकयुक्त किंवा कटकरहितही असतें त्याचीं पानें दोन बोटें रुद व कण्हेरीच्या पानासारखीं ५ ते ६ इंच लाबीचीं असतात फुलें पाढरीं किंवा पिवळीं (Talbot, Forest Flora Vol. II p. 281) असतात कोंकणात, घाटालगतच्या पावसाळी जगलांत उगवणाऱ्या झाडाचीं फुलें सुवासिक असतात (पूर्वोक्त Wightiana variety) इतरत्र अङ्कोलाचीं झाडें आढळत नाहींत मार्च, एप्रिल व मे या महिन्यात हीं फुलें फुलतात व फुलाच्या हगामात झाड पर्णहीन असतें (Descriptive Botanical List Witt p 129) अक्रोडाला किंवा पिस्त्याला सुगधी कळ्या व फुलें येत नाहींत, अकोटाला येतात या सुगधी कळ्याचे व फुलाचे उल्लेख क ४७१, ७७२ व ७७३ या गाथांत आलेले आहेत क. ७७१ या गाथेंत वसतात रस्तोरस्तीं उडणाऱ्या पानाचा उल्लेख आहे तो महत्त्वाचा आहे श्री विट् यानीं या झाडाच हे वैशिष्ट्य नमूद केलेल आहे या

प्रमाणावरून गायातील अङ्कोल्ल हा अक्रोड किंवा पिस्ता नव्हे, अकोट होय, असें निश्चित होतें याला शृंगारवेल असेंही वैकल्पिक अभिधान आहे

अशोक ( असोअ ७,४०५ वङ्केल्ली २७९, ४०४, ७४८ व वञ्जुल ४२२, पैकीं वञ्जुल याचा अर्थ वोरू किंवा अशोक असा आहे ) Jonesia Asoca, Polyalthia longifolia श्री टाल्वट याना ( Forest Flora Vol I p 457) अशोकाला Saraca, Linn ही सज्ञा दिलेला असून त्याची देशी नाव अशोक व जास्वद अशा दिलेलीं आहेत देशीनाममालेत अकेल्लि ( १ ७ ) व वङ्केल्लि ( २ १२ ) या देशी शब्दाचा अर्थ अशोक असा दिलेला आहे श्री आपटे सागतात ( महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका वर्ष २१ अक २ ) 'कंकेल्लि म्हणजे अशोक असा समज आहे, पण तो योग्य आहे अस दिसत नाही ककेलि म्हणजे सकेश्वर असें असावें याचें नांव कोणी सकासूर किंवा शकासूर असेंही सागतात' *गाथासप्तशताला अभिप्रेत असलेला वङ्केल्लि* म्हणजे अशोकच शकासुराचीं पानें तोकडीं असतात आणि अशोकाचीं लाव व अणकुचीदार आणि शोभिवत, कुरळीं व नाजूक असतात अशोकाच्या पानाचें सौंदर्य अद्वितीय ( क्र २७९ ) असतें, म्हणूनच सुदरींच्या बोटाना वङ्केल्लि पल्लवाची उपमा ( क्र ४०४ ) देण्यात येते अशी उपमा सकासुराच्या बाबतात सभवत नाहीं अशोकाचा बाधा उच, रेखीव व डबदार असतो तो सर्व ऋतूत भरदार व हिरवागार असतो त्याची छाया गर्द असते उन्हाळ्यात त्याला भगवीं, नारिंगी पिवळीं व लाल फुल येतात मोसमाच्या भरांत तो बुडख्यापासून शेंड्यापर्यंत फुलानीं डवरलेला असतो अशोक हें हिंदुस्थानचें वैशिष्ट्य व वनस्पतिसृष्टीचें भूषण आहे सर विल्यम जोन्स सागतो, फुललेल्या अशोकाचें मनोहारित्व वनस्पतिसृष्टात अद्वितीय आहे याच्या फुलाच्या दर्शनानें स्त्रिया उत्तेजित होतात असें अशोककल्पात सागितलेलें आहे या स्वरूपसुदराला दोहद-सकेतानुसार तरुणीचे पादप्रहार सहन करावे लागतात *किंबहुना, अशा पादपूजेशिवाय हा शुभ फुलतच नाहीं! अशोक एवढा विदग्ध* व समयज्ञ की अशा प्रहारानीं चिडण्याऐवजीं तो बहरून येतो, कारण, या तरुणी त्याला पीडा यावयास उद्युक्त झालेल्या नसतात, त्या क्रीडेच्या

भरात उत्तेजित झालेल्या असतात! अशोकदोहदाला लायक व सज्ज अशा तरुणी क्रीडेसाठीं कधींही फिरकत नाहीं अशा गद्य आवारातल्या अशोकांना कधीं फुलें आलेलीं आपण पाहिलीं नाहींत असे त्या भागात हयात व्यतीत केलेले वृद्ध सांगतात प्राचीन व मध्ययुगीन वाङ्मयात व जीवनात अशोकाला महत्त्वाचें स्थान होतें त्याच्या मोहिनीचा प्रत्यय ऋग्वेदातील ऋचापासून आढळतो अशोकाचें फूल शंकराचें विशेष आवडतें अशोकाच्या नावाशीं संबद्ध असलेले अनेक उत्सव हिंदू समाज पाळतो. गौतमबुद्धाचा जन्म अशोक वृक्षाखालीं झाला अशीं आख्यायिका असल्यामुळे बौद्धहि त्याला पवित्र मानीत अशा या सुंदर वृक्षाला आपण अलिकडे पारखे झालो आहोंत, हें मात्र खरें

आम्र (१९, ६२, ९७, १४३, ३३१, ३९६, ४९९, ५४२, ५४३, ५८५, ५९५, ६६६, ७७७, ८२०, ९९४) Magnifera Indica: उल्लेखाच्या संख्येवरून दिसतें की आम्रवृक्ष हा गाथाकवींचा अत्यंत आवडीचा वृक्ष आहे साहजिक आहे अशोकाचे अंगी असलेलें बहुतेक सर्व गुण आम्रवृक्षाचे अंगीं आहेत, शिवाय याचे अंगीं असे काहीं गुण आहेत कीं ते त्याचे अंगी नाहींत अशोक हा फक्त शोभिवंत वृक्ष आहे आणि आम्र हा उपयुक्त अशोकाचें सौंदर्य केवळ निसर्गसिद्ध आहे सहेतुक संवर्धन, संगोपन व सन्निवेश करून मनुष्यानें आम्राच्या नैसर्गिक गुणाची अभिवृद्धि केलेली आहे अशोकाप्रमाणेंच आम्र हेंही हिंदुस्थानचें वैशिष्ट्य आहे, कारण, हिंदुस्थानात आहे तितकी आमराई दुसऱ्या कोणत्याही देशात नाहीं, विशेषत महाराष्ट्राचें व अपरान्ताचें, कारण, येथें होतो तसा आंबा इतरत्र कोठेंहि पैदा होत नाहीं संस्कृत वाङ्मयात आम्रवृक्षाचे अनेक उल्लेख आढळतात आणि अनेक धार्मिक विधींमध्यें आंब्याचीं पानें व मंजिऱ्या आवश्यक मानलीं जातात आंब्याच्या मुख्य जाती तीन जंगली रायवळ, बागायती इरसाल आणि कलमी जंगलात अवघड जागीं असलेल्या झाडावरील आंब्याचा मुलानें धरलेला हट्ट (क्र ५९५) हा उल्लेख रायवळ आंब्याचा आहे आणि क्र ५४३ या गाथतील उल्लेख इरसाल आंब्याचा आपक्वो रसालोऽसौ सहकारोऽतिसौरभ । या अमर

कोशातील वचनाच्या आधारानें श्री आपटे ( म सा प वर्ष २१ अक २ ) सागतात की चूत हा रसाचा आंबा आणि सहकार हा कलमी दोन झाडाचा जोड करून झालेला तो सहकार, ही कल्पना आकर्षक आहे पण निराधार आहे कलमी आंब्याची पैदास फार उत्तरकालीन आहे गाथाकवानी चूत [ क्र १७, १४३, ५४२, ५८५, ८२० ] व सहकार [ क्र ३३१, ७७७, ७७९, ९९४ ] हे शब्द समानार्थी म्हणून वापरलेले आहेत त्यात काही भेदभाव केलेला दिसत नाही आंब्याची नवी पालवी तांबूस व सुवासिक असते ती विरही प्रवाशाना कामदेवाच्या भाल्यासारखी [ क्र ५८५ ] भासते कालिदासानें आम्राङ्कुराची तुलना वसताच्या बाणाशी [ ऋतु ६ १ ] केलेली आहे आंब्याच्या मोहोराचा सुगध गर्द असतो, हगामात त्याचा घमघमाट रानावनात दरवळतो, भ्रमर त्यामुळे उन्मत्त होऊन भ्रमण करतात, कोणी सहकारमजिरी धारण केली तर त्याच्या भोवतीहि, आणि कोकिळा कूजन करतात आम्र मजरीच्या दर्शनानें व सुगधानें स्त्रीपुरुषाच्या अगीं उन्माद सचारतो, म्हणूनच मदनाच्या पचबाणात आम्रमजरीला स्थान मिळालेलें आहे गाथातील नायक व नायिका अवतस म्हणून सहकारमजिरी धारण करतात गुप्तकालात मद्यें सुगधित करण्यासाठीं आम्रमजिराचा उपयोग करण्यात येत असे आंब्याची कोंवळी पानें व मोहोर कलशात घालून शुभ शकुनासाठी समोर ठेवावयाची प्रथा गाथासप्तशतीच्या रचनाकालातही प्रचलित [ क्र १४३ ] होता अजूनही मगलकार्यात त्याची योजना केलेली असते

एरण्ड ( २५७ ) Ricinus Communis एरण्डाचें झाड असतें व झुडूपही याची लागवड तेलासाठी व पेंडीसाठीं मुख्यत्वेंकरून मळई जमीनात करण्यात येते गाथासप्तशतींतील एरण्ड जगली जातीचा, कुपणालगत यदृच्छया वाढलेला आहे एरडाचा व्यावहारिक उपयोग इतका व असा आहे कीं कोणी कधी काव्यात त्याची योजना करील अशी कल्पनाही होत नाहीं ! नाही म्हणावयास हितोपदेशात ( १ ६९ ) ' यत्र विद्वज्जनो नास्ति श्लाघ्यस्तत्राल्पधीरपि । निरस्तपादपे देशे एरण्डोऽपि द्रुमायते ॥ असा तिरस्कार व्यक्त करण्यासाठीं एरण्डाचा उपयोग केलेला आढळतो आणि ' उच वाढला एरण्ड, तरी

षाय होईल इक्षुदण्ड । ' या वाक्प्रचारात पण गाथास्त्रीची दृष्टि अशी दूषित नाही एरंडाच्या विस्तीर्ण पानाची तुलना कवानें हालिकवधूच्या विशाल स्तनाशी केलेली आहे हाताचा चोट जराशा तळव्याच्या बाजूला वांकविली म्हणजे होतो तसाच एरण्डाच्या पानाच्या आकार असल्यामुळे या उपमेत आवाहना चीही सूचना आहे असे टीकाकार सांगतात तें कसेंही असो, एरण्डाचा येथील उल्लेख अपूर्व व अद्वितीय आहे यात शंका नाही

कदम्ब ( ३७, १७७, ३१४, ५६५, ६३६, ७०६ ) Anthocephalus, Nauclea purpursa, Stephegyne कदम्ब, कदम, कलम, कलव सौंदर्याच्या दृष्टीनें कदम्बाचा क्रम अशोकाच्या खालोखाल लागतो अशोकात जसा रक्ताशोक (मेघदूत २ ११) तसा कदम्बात रक्तकदम्ब ( विक्रमोर्वशीय ४ ६० ) हीं झाडं हिंदुस्थानांत सर्वत्र आढळतात त्यांची वाढ फार झपाट्यानें होते असल कदम्बाचें झाड साठ ते ऐंशी फूट उंच वाढतें मेघाचा पहिली गर्जना ऐकली कीं कदम्बाना कळ्या येतात आणि पावसाची पहिली सर पडली कीं त्या फुलूं लागतात ( मेघदूत १ २५, विक्रमोर्वशीय ४ ३० ) श्री आपटे सांगतात ( म सा प वर्ष २१ अंक २ ) " कदम्बाचीं फुलें बारीक असून गोटीवजा शाखाग्रावर अनेक अशीं उगवतात, एकंदर दृश्य टाचण्या टोचलेल्या गोटीसारखें दिसतें ' कुसुमाग्र या गाथेची ( क्र १७७ ) कवियनी असुलढी सांगते, कदम्बाचीं फुलें कामदेवाच्या गलोलातील गोळ्यासारखीं दिसतात। या फुलांचा रंग नारंगी असतो सफरचंदाएवढ्या गेंदानीं सारें झाड भरून जातें तेव्हा त्याची शोभा अवर्णनीय असते ताज्या मद्याच्या सुगंधाशीं या गेंदाच्या सुवासाची तुलना झालेली आहे या फुलापासून पूर्वी मद्यार्क काढीत असत ही. मेरु पर्वतावर फुलणाच्या चार मुख्य छायावृक्षात कदम्बाला स्थान आहे कृष्ण लीलाशीं याचा निकट संबंध आहे बलराम हा विख्यात मद्यपी त्याच्या आवडत्या अन्नावरून त्याला हलधर असें नाव होतं यावरून कदम्बाला हलिप्रिय असेही नाव मिळालेलें आहे प्रसव झाल्या असता तान्ह्या मुलाचें संरक्षण व अप्रसव झाल्या त्याचा असता घात करणाऱ्या मातृकापैकीं एकीचा वस्ती कदम्बा वर असते या देवतेचें पूजन व प्रसवन कम्यामाठीं कदम्बाच्या फ्रिमाची ये जा असते आणि अभिमरणाशाठीं संकेतस्थान म्हणूनही कदम्ब पुष्प कामी जनाना

उत्तेजित करतात, म्हणून तो मुमुक्षूंना वर्ज्य आहे दक्षिण महाराष्ट्रातील कदम्ब या प्राचीन व मध्ययुगीन आणि कदम या अर्वाचीन ऐतिहासिक कुलाचा संबंध कदम्ब वृक्षाशीं असल्याच दंतकथा सांगते

कमल Nelumbium ( Coerulem नील, Speciosum आरक्त व श्वेत, Loutc), अरविन्द (५७४) आरक्त वा नील, सूर्यविकासी, इंदीवर (८४४) नाल, सूक्ष्म ( इन्दीवरलक्ष्मीस्तस्या वर वर्णीय ), उत्पल ( १४०, १५०, १७६, ५३४, ७१९ ) नील ( उत्क्रान्त पल मासम् ), कदोट्ट ( ६२२ ) नील कमल ( ७८, ११०, २०९, २५६, २६९, ३४३ (आरक्त), ४०५, ४७१, ४९५, ६०४, ६४१, ७२९, ७६७, ८१०, ८२०, ८८०, ९७७, ९८३, ९८४), कमलतंतु ( ९४, ), कमलदल ( ८५८, ९८४ ), कमल व सूर्य ( ३४३, ४९५ ६०४, ७४७, ९८३ ), कुमुद ( ५६१ ) शुभ्र, हिंवाळ्यात बहर, चंद्रविकासी ( यौ मोदते ), कुमुद व चंद्र ( ७४७ ), कुवलय ( ५, ३२३ ) नाल, ( कु = कुटिल, वलय = वर्तुल कमळाच्या पाकळ्या त्याच्या अक्षावर वाटोळ्या, पायऱ्याप्रमाणें रचलेल्या असतात, ही रचना हें कमळांचे वाशिष्ट्य तिला अनुलक्षून कु शब्द योजलेला ( श्री आपटे म. सा प: वर्ष २१ अंक ३ ) दिसतो ) तामरस ( ३४३ ) आरक्त, नलिनी ( ६१९ ), पङ्कज ( १, ६, ३१७ ), पुण्डरीक ( ६२४ ) शुभ्र, नक्षत्रविकासी ( पचविंश ब्राह्मण १८ ९ ६ ), बिसना ( ४ ( शुभ्र ), ८ ), बिसनीपत्र ( ४ ), मृणाल ( ३८३, ८४४ ) सरोरुह ( ७२५ )

कमलाला आहेत तेवढीं नावें हिंदुस्थानातल्या दुसऱ्या कोणत्याही फुलाला नाहीत साहजिक आहे, कारण कमलाच्या आहेत तेवढ्या जाती दुसऱ्या कोणत्याही फुलाच्या नाहींत कमलाच सारच विलक्षण इतर फुलं जमिनीवर उग वणाऱ्या वृक्षवेलांवर फुलतात, कमल हे उगवतें पङ्कात, पण तें स्वत पङ्कापासून अलिप्त असतें, कोरडें दिसल तरी सरस असत पाण्यावर उमलतें, पण कधींही ओलेत नसतें ! गाथासप्तशतीत कमलाइतके उल्लेख दुसऱ्या कोणत्याही फुलाच्या वाट्याला आलेले नाहीत साहजिक आहे कारण संस्कृतप्रमाणेंच प्राकृत कवींचेंही हें अत्यंत आवडतं फूल कमळाचं मूळ कधीं नष्ट होत नाही, म्हणून हे सृष्टीचें

प्रतीक असं प्राचीन भारतीय मानीत, म्हणूनच जगदुत्पत्तिकर्ता ब्रह्मदेव याचे आसन विष्णूच्या नाभिकमलाचे ठायी ( क्र ८१० ) ठेवलेलें आहे असल्या पौराणिक गोष्टी भाकड वाटत पण सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी भूमिगत झालेल्या कमलाच्या बीजाला अलीकडेच एका शास्त्रज्ञानें फुलविल्याचा वृत्तान्त नुक्ताच प्रसिध्द झालेला आहे देवदानवाना समुद्रमथन केलें तेव्हा लक्ष्मी निघाली, तीही कमलातून म्हणून जेवढा नावे कमलाला तेवढा कमलेला ! म्हणून कमल हे समृद्ध जीवनाचें प्रतीक ब्रह्मदेवाप्रमाण बुध्द व महावीर यांचीही आसनं कमलावर आहेत सूर्य, गणपति वगैरे हिंदू देवदेवताच्या हाती कमल असतें अवलोकितेश्वराला पद्मपाणी असं नाव आहे म्हणून कमल हें पावित्र्याच प्रतीक आरक्त कमल हें लक्ष्मीचें आसन आणि शुभ्र कमल हें सरस्वतीच म्हणून कमल हें संस्कृतीचें प्रतीक प्राचीन व मध्ययुगीन भारतीय शिल्पकृत्यातील कमलाची योजना पाहिली म्हणजे हें पटतें कमलाच्या मुख्य जाती दोन स्थलकमल व जलकमल स्थलकमल म्हणजे कल्हार गाथासप्तशतींत याचा उल्लेख नाही जलकमलाच्या जाती दोन सूर्यविकासी व चंद्रविकासी सामान्यत कमल हें सूर्यविकासी व कुमुद हें चंद्रविकासी पुण्डरीक हें नक्षत्रविकासी असल्याचें पचविंशब्राह्मणात सांगितलेलें आहे खरें असो, खोटं असो, कल्पना किती रम्य आहे ? अगदी कल्पनेसारखी तरल आहे ! वर्णपरत्वें कमलाच्या जाती चार नील, पीत रक्त, श्वेत पिवळ्या किंवा सुवर्णवर्ग कमलाचा उल्लेख गाथासप्तशतींत आलेला नाहीं महाराष्ट्राच्या जन्म दारिद्र्याचें हेंही एक प्रमाण ! सामान्यत सूर्यविकासी कमलें आरक्त, नील किंवा शुभ्र भरदार असतात आणि चंद्रविकासी कमलें पांढरी व नाजूक असतात सांगतात कीं प्रारंभीं साराच कमलें शुभ्र होतीं कामदेवाच्या शरानें विद्ध झालेल्या शंकराच्या रक्ताचे बिंदु ज्यावर पडले तीं आरक्त झालीं ! कामशर सुगंधित असतात म्हणूनच जणू आरक्त कमलही विशेष सुवासिक असतात ! नीलोत्पलही सुगंधी असत हा नीलवर्ण त्याला गौरीच्या दृष्टिक्षेपानें प्राप्त झाला का काय ? नील उत्पलानें मय ( क्र ५३४ ) व नील कन्दोट्टान जउ ( क्र ६२२ ) सुगंधित होत कमळाचीं पानें पाण्याखाली असतात व त्याना थाळीसारखा कडा असतात या पानांच्या फाकळ्यामध्य हवसाठीं मोकळी असते. म्हणून तीं पुष्कळ वजन तोलून धरू शकतात काश्मीरात या

सरोवरांत कमळाची पानें एवढी मोठीं होतात आणि तीं इतकी दाट असतात की त्याच्या सपाटीवरून पाणकोंबड्या या तीरापासून त्या तीरापर्यंत खुशाल वावरत असतात. कमल हें जसे सौंदर्याचें प्रतीक तसे कमलदल हें कोमलतेचें प्रतीक कमळाच्या देठात हवेकरिता पोकळी व पाण्याकरितां वाहिन्या असतात दांडा पाण्याबाहेर काढला की त्यातील पाणी झिरपून जातें व तो लगोलग सुकून जातो (क्र. ३८३). कमळाच्या तळ्याच्या निळ्या पृष्ठभागावर पहाटे तरंगणाऱ्या धुक्याच्या तवगातून हिरव्यागार पानांमधून उमललें मुख उचलणारी कमळाची डेरेदार कळी पाहिली म्हणजे वाटते की दूरवरच्या निळ्या डोंगरावरल्या गर्द झाडीच्या झुपक्यातून जणू मानवी भक्तिभावाचें प्रतीक अशा मंदिराच्या शुभ्र शिखराचे दर्शन होत आहे ! थोड्या वेळानंतर फुलाचे रंग स्पष्ट होतात. वाऱ्याच्या तरंगाबरोबर डोलणारी भरदार पण सुकुमार आणि टवटवीत व बहुरंगी कमळें पाहिली म्हणजे वाटते कीं या कोणी जल वा पाताल देवता, नागकन्या वा अप्सरा आम्हा मर्त्यांना मोहिनी घालावयाला आलेल्या असून आवाहन करीत आहेत ! डेरा घेऊन पाण्याच्या किंवा परडी घेऊन फुलाच्या निमित्तानें, पण वस्तुतः संकेतासाठीं, तळ्याच्या पाळीं अवेळीं घुटमळणाऱ्या ग्रामतरुणी तडागांतील कमलाच्या सौंदर्याने स्तिमित होतात आणि त्यांची नजर कशी चुकवावयाची या विचारानें विस्मित होतात वाटतें, कमलाच्या विकासाचा सूर्यचंद्रांशीं असलेला संबंध विचारात घेऊन त्या आपल्या संकेताची वेळ ठरवीत असाव्यात !

करंज:—( १२१, १६७, ५५३ ) Pongamia Glabra : हें मध्यम आकाराचे रानझाड आहे हीं झाडें छायेसाठीं रस्त्याच्या कडेवर आणि जमिनीला धर रहावा म्हणून शेतांच्या बांधावर किंवा नदीकाठीं लावतात. समुद्रकिनाऱ्यालगतही हीं झाडें पुष्कळच असतात मे ते जुलईपर्यंत करजाला फुलें येतात करंजाच्या काड्याचा उपयोग दंतधावनासाठीं ( क. ५५३ ) करण्यांत येत असे. हा उपाय अष्टाग–हृदयांत ( सूत्रस्थान : अ. २-१ ) प्रशंसिलेला आहे विशेषत. नदीकाठच्या करंजाची छाया सर्व ऋतूंत गर्द व गार असल्यामुळे आणि त्याच्या फांद्या खालवर लोंबत्या असल्यामुळें स्वैरिणींना हें संकेतस्थान दिवसां उजेडीं विशेष सोयीचे वाटत असे. करंजाचे व्यावहारिक

उपयोगही अनेक आहेत त्याच्या बियाचें तेल निघतें व उरल्या भुसकटापासून पेंड पैदा होते डॉ. एडवर्ड जॉन वॉरिंग सांगतो कीं देशी वैद्यकात या तेलाला फार महत्त्वाचें स्थान ( Pharmacopœia of India p 79 ) आहे करञ्जवृक्षावर उद्भिज-सृष्टीच्या मातेचा निवास असतो संतानाच्या प्राप्तीसाठीं व रक्षणासाठी ( Sexual Life in Ancient India Dr. Meyer Vol II p 560) स्त्रिया या देवतेचें पूजन करतात ही सबब स्वैरिणींना मोठी सोयीची वाटे त्यांच्या रहदारीमुळे भोंदू धार्मिकाची करंजाभोंवतीं लुडबुड असे।

कवठ—( ५७९, ९४१ ) Feronia Elephantum कवठाचा झाड दक्षिणेंत व गुजराथेंत फार झाड कांटेरी असतें कवठाचें कवच कठीण असतें आणि पिकलेल्या फळाचा वास उग्र असतो कमलाचा मद सुगंध व मार्दव आणि कवठाचा गर्द दर्प व खरखरीत त्वचा याची तुलना करताना कवीनं सुसंस्कृत व उत्तम आणि ग्रामीण व अधम नायिकामधील भेद व्यक्त केला आहे, आणि त्यामधील फरक रसिकाला अतर्ज्ञानानें व अरसिकाला अनुभवान प्रत्ययास येतो असें सूचित केल आहे

काश —( ४३४ ) Saccharum Spontaneum काश म्हणजे कांस गवत सर्द व सखल किंवा खोल व काळ्या जमिनींत अगर नदीकाठीं तें उगवतें तें हत्तीसारख जिवट असतें तराईच्या पाणथळ जमिनी सरून काढण्यासाठीं आर्यांनीं हिमालयाच्या पायथ्याशा या गवताची लागवड केली असें उल्लेख आढळतात याच्या फुलाना चामरपुष्प म्हणतात तीं पांढरी असतात पावसाळ्यानंतर लगेच तीं फुलू लागतात या फुलेरी गवताचे दांडे दीड दोन पुरुष उंच वाढतात आणि त्याचे तुरे हातभर उंचीचे असतात त्यावरून वाऱ्याचा लकेर वाहू लागली कीं दूरवरून व उंचावरून पहाणाराला नदीच्या खळखळत्या पाण्यासारखा शोभा दिसते हिंदी वाङ्मयात ही उपमा प्रसिद्ध ( Commercial Products of India Watt p ९ ७ ) आहे गाथा सप्तशतीत उल्लेखिल्या काशपुष्प तुऱ्यासारखीं नगारांत अशीं वाजतें पाव

साळ्याचे अखेरीस माळावर उगवणाऱ्या दुधाणीच्या सूक्ष्म व शुभ्र गवती फुलाचा तर हा उल्लेख नसेल ?

कुब्ज — (५३९) Jasminum sambac हलायुध सांगतो, कुब्ज म्हणजे गिरिमल्लिका शब्दार्णव व अर्जुन व गीर्वाण कारात कुडा असे अर्थ दिलेले आहेत हें एक डोंगरी झुडुप आहे फुलें पावसाच्या आरंभीं फुलतात तीं रंगानें पांढरीं, सुवासिक व धाटानें कण्हेरीसारखीं असतात यक्षानें आषाढांत मेघाची पूजा कुब्ज पुष्पानीं केली असा उल्लेख मेघदूतांत (१४) आढळतो, कोंकणांतले लोक मात्र या फुलाची मागणी करतात याच्या शेंगांत जवाएवढ्या बिया असतात त्याना इंद्रजव म्हणतात गुजराथेंत हें झुडूप याच नावानें ओळखलें जातें

कुन्द (४९६, ५९०) Jasminum hirsutum—pubescens कुन्दाचा वेल चमेलीसारखा असतो आणि फूल रानमोगरीसारखें त्याहून किंचित लहान असतें त्याचा वास उग्र असतो मालती व मोगरी याच्या मानानें कुंद अगदींच सुमार वाटतो कालिदास कुन्दाच्या सौंदर्याचा निर्देश करतो, पण त्याच्या गंधाबद्दल (ऋतुसंहार ६, २३) शब्दही काढीत नाहीं वसतात या फुलाना भर असतो असे वनौषधि गुणादर्शांत सांगितलेलें आहे कवियानें मृगाङ्कलक्ष्मी (क ४९६) मात्र सांगते कीं शिशिरात गंधरहित कुन्दाची वृद्धि होते मध्यप्रांतात फेब्रुवारी, मार्च व एप्रिल या महिन्यात कुन्दाला फुलें येतात (Descriptive Botanical List of C. P Witt p 143) आणि कोंकणात डिसेंबर, जानेवारी व फेब्रुवारी या महिन्यांत (Forest Flora Talbot Vol II, p 189) येतात या आधारावरून या गाथेची लेखिका कोंकण भागातली असावी असें अनुमान करण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं

कुरवक (५२१९) Baleria (Buxiflora, Longiflora, montana, Prionitis वगैरे कुरवक म्हणजे कोराटा कुरन्टी कोरान्टी दक्षिणेंत सर्वत्र आढळते कोंकणात व घाटमाथ्यावर हें झुडूप बरेंच मोठें होतें (Forest Flora II 335)

कोराटीला गुलाबी, निळी, पांढरी, भगवी फुलें येतात. कोरांटीचें सर्वांग काटेरी असतें. मेघदूतांत यक्षाच्या बागेंत माधवीच्या मण्डपाभोंवतीं कुरवकाचें कुंपण ( १ : ७५ ) आहे. कोरांटीची फुलें वसतांत बहरतात. रंगीबेरंगी व शोभिवंत असलीं तरी तीं गंधहीन असतात; मात्र खुडल्यानंतर तीं लवकर कोमेजत नाहींत; म्हणून वेणींत माळण्यासाठीं स्त्रियांना तीं फार आवडतात. अलकेतल्या स्त्रिया कुरवकाची फुलें वेणींत गुंफीत ( मेघः १.१६ ). इतकी ही आवड प्राचीन आहे. दोहद संकेतानुसार ही फुलें तरुण स्त्रियांना फुलवावयाची असतात. ऋतुसंहारात ( ६ १८ ) कालिदास सांगतोः

> कांतामुखद्युतिजुषामपिबोद्गताना
> शोभा परा कुरवकद्रुममंजरीणाम् ।
> दृष्ट्वा प्रिये सहृदयस्य भवेन्न कस्य
> कंदर्पबाणपतनव्यथितं हि चेतः ।।

हें वचन उध्दृत करून श्री. आपटे सांगतात ( म. सा. पः वर्ष २१ अंक २ ): " कोराटीचें फूल पंचप्रदेली असतें. त्याच्या पाकळ्या अंशतः जुळलेल्या असतात. शेवटचा सुटा भाग नीट उमलल्यावर ओठासारखा दिसतो. फुलाच्या मध्यावरचे केसर ओंठालगतच्या दांतासारखे दिसतात याच कल्पनेनें शास्त्रज्ञही या फुलाला ' ओष्ठपुष्प ' म्हणतात " पुरुषांनाही हें फूल आवडतें याचें हेंच तर कारण नसेल ? क्र. ६ या गाथेतील कुरबक हांसेने लावलेला आहे. या गाथेंत कुरबक-दोहद सूचित आहे. लाडक्या पण काटेरी झाडाला फुलें यावीत म्हणून प्रियेनें त्याला आलिंगन यावें, ही प्रियकराची इच्छा किती निर्दय आहे !

कुसुम्भः ( १४५, ३६२, ५४५. ) Carthamus tinctorius; Sapindaceol – Schleichera trijuga कुसुम्बाचा जंगली वृक्ष खुजट व काटेरी असतो आणि खोंपराएवढें काटेरी झुडपही असतें, मैदानी वृक्ष साठ ते सत्तर फूट उंच वाढतो. हा वृक्ष मूळचा चीन व जपान ( Commercial Products of India' Watt. P. 979 ) देशातला. तेथें त्याची लागवड

तेलासाठी करतात येथून त्याची आयात उत्तर हिंदुस्थानात झाली असावा त्याच्या पानापासून काळसर रग तयार होतो आणि बियापासून तेल निघते. क्र ३९६ या गाथतील कुसुम्भ हा वृक्ष आहे आणि तो काटरी आहे हे त्यातील वर्णनावरून स्पष्ट दिसते कुसुम्भाचे झुडूप आपले शेतकरी करडई या नावाने ओळखतात याचे फूल रगाने तांबूस पिंवळ व आकाराने झेंडूएवढे असते त्यात केशरासारखे तंतु असतात वाळविलेल्या फुलापासून कापड रंगविण्यासाठी कुसुंबी रग तयार करतात आणि बियापासून तेल काढतात मध्यप्रातात रायपूर, छिंदवाडा भागात आणि मुंबई प्रांतात खेडा व कर्नाटक भागात करडईची लागवड मुख्यत रगासाठी करण्यात येते, आणि पुणे, नगर, सातारा, बेळगाव, विजापूर व धारवाड या जिल्ह्यात तेलाकरिता कुसुम्भपुष्पं या गाथेत (क्र १४५) फुलाचा आणि कुचुकी या गाथत (क्र ५४५) कुसुंबी रगाचा उल्लेख आहे कुसुम्भारुण दुकूलाचा उल्लेख कालिदासानें (ऋतुसंहार. ६.४) व जगन्नाथ पण्डितानेंहि केलेला आहे कार्तिकी पौर्णिमेच्या रथोत्सवासाठी प्राचीन भारतीय स्त्रिया आपली तलम वस्त्रें या रगात रगवून घेत असत (Cultural History of India Chandra Chakraberty p 364) गाथासप्तशतीतील कुसुम्बाचा रजपूत कुसुम्ब्याशी काहीहि सबध नाही कुसुंब्याचा रग कुसुंबी असतो, मात्र तो अफूच्या बोंडाचा मादक अर्क असतो

केतकी (७७९) Pandanus Odoratissimus केवडा पाणथळ जागेत उगवतो त्याची लाबच लांब व दाट बेटे असतात कोंकणात केवड्याची झुपर्णे असतात यांत पाढरा व पिंवळा, अशा दोन जाती असतात पाढऱ्या जातीला केतक म्हणतात व पिवळ्या जातीला केतकी केतकाचा भर श्रावणात आणि केतकीचा माघ फाल्गुनात. श्री आपटे सागतात (म. सा प वर्ष २१ अक २) केतकीत नर व मादी फुले वेगवेगळ्या झाडावर येतात, नर फुलाचा सुगध विशेष असतो केवड्याच्या तुऱ्याभोंवती हिरवी काटेरी पाती असते तुऱ्याच्या पोटातल्या कणिसात परागाचे गुच्छ असतात केवडा उमलला म्हणजे वाऱ्याच्या झुळकीबरोबर हे पराग इतस्तत उडतात केवड्याचा सुगध गर्द व मस्त असतो केतकीच्या वनात नागाची वस्ती असते, अशी समजूत आहे

कोसम्ब (१९) 'कोशाम्रो वृक्षविशेष ' असें गाथासप्तशतीचा एक टीकाकार (Weber, p 9) सांगतो कोशाम्र म्हणजे कुसुम्भ आणि कोशाम्र म्हणजे लाल रान आंबा असं निघंटरत्नाकरात ( भाग १, पृष्ठ ८२, सांगितलें आहे श्री. पदे यांनीं कोशाम्राची ओळख कोशिंबाशी पटविलेली आहे ( वनौषधि गुणादर्श भाग २, पृष्ठ ७० ) ते सांगतात, हीं झाडें डोंगराळ प्रदेशात होतात, विशेषत कोंकणात महाराष्ट्र शब्दकोशात कोशिंबाची व्युत्पत्ति दिलेली आहे, ती अशी स कोशी + आम्र, कोशाम्र, प्रा कोसंब मराठी कोशी + आंबा सुलभ विश्वकोशात सांगितलें आहे कीं हें लाखेचें झाड आहे. याच्या बियांचे तेल निघतें जंगली लोक याचीं फळें खाण्याकरिता गोळा करतात याच्या कोंवळ्या पानावर लाखेचे किडे पोसतात क्र १९ या गाथेंत उद्धरलेल्या वासराचा वर्ग वर्णन करण्यासाठीं कोशाम्राच्या कोंवळ्या कोंबाची उपमा दिलेली आहे रुजलेल्या आम्रकोशातून निघालेल्या कोंवळ्या पानाचा रंग असाच तांबडा असतो भाषांतरात मी हाच अर्थ स्वीकारलेला आहे कोकम, रातांम्बा ( Guttiferae Indica ) या डौलदार व शेलाट्या वृक्षाशीं ही कोसम्बाची ओळख पटविणें शक्य आहे याचीं पानं कोंवळीं असताना लाल असतात ( Forest Flora I 90 )

खाजरी ( ५३२ ) Cowhage, Cowitch, Mucuna pruritus मूळ शब्द कइकच्छु = कपिकच्छु असा आहे गंगाधरानें प्रतिशब्द शूकशिम्बि दिलेला आहे निघंटरत्नाकरात कुहिली आणि वनस्पतिगुणादर्शांत कुहिरी = मर्कटी म्हणाया पाऊस सुरू झाला कीं हीं रोपें रानात उगवतात, पुढें त्याचे वेल मोठे होऊन झाडावर किंवा कुंपणावर चढतात वेलाच्या पानाच्या बाजूस लांब देठ फुटून त्यास फुलाचा तुरा येतो एका तुऱ्यात वास पचवीस फुलें असतात या फुलांना बोटाएवढे शेंगाचे घास लागतात दर घोसात पाच ते दहा शेंगा असतात शेंगावर काटे असतात ते अंगाला लागले कीं आग होते, जागा सुजते महेगुहरीच्या शेंगाची भाजी करतात राजनिघंटी- धूम्रपुष्पा हा झुडपं पावसाळ्यात उगवतात त्याचे पानांवर कुसें असतात तीं अंगाला लागला तर आग होते गाथाकवाला कुहिरीच अभिप्रेत आहे हें गाथेतील व वनस्पतीच्या वर्णनावरून स्पष्ट दिसते

गुंज (३१०) Abrus precatorius गुंजेचें झुडूप असतें आणि वेलहि असतो गुंजा तीन रंगाच्या असतात लाल व शुभ्र गुंजाचा डोळा काळाभोर व फूल गुलाबी असतें, काळ्या गुंजेचा डोळा पांढरा व फूल शुभ्र असतें, लाल गुंजा (रति = १ ७५ ग्रेन) वजनासाठीं वापरतात गुंजा विषारी असतात त्यांच्या चूर्णाच्या सूक्ष्म सुया करतात त्या शरीरात टोंचल्या म्हणजे मनुष्य किंवा जनावरही दगावतें ह्याची प्रतिक्रिया सर्पविषासारखी असते जंगली जमाती गुंजांच्या माळा गळ्यात घालतात, गाथासप्तशतीच्या काळात घालत होते, आजही घालतात भडक रंगाच्या आकर्षणामुळें त्यांना मोत्यांची काय किंमत? शिवाय मोतीं त्यांना निसर्गत प्राप्त होण्यासारखी नसतातही

चन्दन (२८८, ८८५, ९२०) Sandal Santalum album चन्दनाचीं झाडें मुख्यत्वेंकरून हिंदुस्थानात, त्यातल्यात्यात विशेषेंकरून नाशिकच्या दक्षिणेचा महाराष्ट्राचा कृष्णप्रस्तरप्रदेश, कर्नाटक, म्हैसूर व कूर्ग या भागात आढळतात नीलगिरीवर प्रचण्ड चन्दनाचीं जंगलें आहेत, म्हणूनच प्राचीन वाङ्मयात मलयगिरी व चन्दन यांचें साहचर्य आढळतें हिंदुस्थानातून चन्दनाची निर्यात प्राचीन काळापासून, मोठ्या प्रमाणावर होत आहे युरोपात उत्कृष्ट चन्दन चीनमधून येत असे प्राचीन उल्लेख आढळतात वस्तुत तें चंदन हिंदुस्थानातलें असे व येथच तें जहाजावर चढविण्यात येत असे, त्याची वाहतुक चिनी जहाजातून होत असे म्हणून हा प्रवाद सुरू झाला (Commercial Products of India Watt, p 976) खुष्कीच्या मार्गानेंहि गांधार प्रांतातून हिंदी चन्दनाची निर्यात होत असे असें सर ऑरेल स्टेन यांना (Ancient Khotan pp 447, 452) सिद्ध केलें आहे चदन व लिंब यांची जात एकच गुणदोष वेगळे चन्दनाचें झाड उंच व सडपातळ असतें व त्याच्या फांद्या अवनतमुखी असतात हिंदुस्थानात देवपूजेसाठीं आणि उन्हाळ्यात व विरहात शीतलतेसाठीं चन्दनाचें गंध अंगाला लावीत, असे अनेक उल्लेख प्राचीन वाङ्मयात आढळतात गाथासप्तशतींतही असा उल्लेख (क्र २८८) आहे मध्ययुगीन वाङ्मयातील विरहसंतापशमनार्थ होणारे चंदनाच्या योजनेचे उल्लेख काल्पनिक व सांकेतिक वाटतात चन्दनाच्या खांबाभोंवतीं लपेटलेल्या लतेंत सर्प आश्रयास असतें हा संकेत 'भुजग'

(क्र ९७०) या गाथत आढळतो 'निलाजरी' (क्र ८८५) या गाथेतील ओंडका चन्दनाचा असावा पूजेसाठी उगाळलेले चन्दन आता आपण थाळात किंवा वचोळ्यात ठेवतों. गाथाकाळात तें शराशुक्तांत ठेवण्यात येत असावे असें 'मङ्गल' (क्र १) या गाथतील उल्लेखावरून दिसत

जाभूळ —(१८०, १८९ ५३१) Black plum Eugenia Caryophylla a, Jambolana हिंदुस्थानात जाभळाचे वृक्ष सर्वत्र आढळतात प्राचीन भारतीयांनीं भूपृष्ठाची वाटणी सात महाद्वीपात केली होती जम्बुद्वीप हें त्यातील आद्य व केंद्रवर्ती पुराणांनुसार भरतखंड जम्बुद्वीपात आहे, जम्बुद्वीप म्हणजेच भरतखंड असे बौद्ध मानतात हिंदुस्थानच्या पाच विभागापकीं जम्बुद्वीप हा एक भाग मान आहे असें जेन मानतात मेरु पर्वताच्या दक्षिणेस व निषध पर्वताच्या उत्तरेस सुदर्शन नावाचा एक प्रचंड जम्बुवृक्ष असून त्यावरूनच 'जम्बुद्वीप' हें नाव सिद्ध झालें आह अस पुराणाच विधान आहे (Cultural History from the Vayu-Purana Patil p 305) नर्मदा नदी जम्बुवनातून वाहते आणि परिणत जम्बूफलामुळें दशार्ण देशाची काति श्यामल भासते असें कालिदास (मेघ १२३) सागतो जाभळाचा वृक्ष फार मोठा वाढतो रानजाभळ बारीक व जाभुळकीं असतात आणि रायजाभळें मोठीं व काळामोर, भुंग्यासारखीं (क्र ५३१) पावसाळ्याच्या सुरुवातीस जाभळें परिपक्व होतात जाभळीच्या झाडात पाणी शुद्ध करण्याचा गुण आहे जाभळाचा शिरका औषधि आह गोव्याकडे जाभळाचें रुचकर मद्य तयार करतात 'उच्छिष्टग्रहण' या गाथत (क्र १८९) जाभळाच्या उटण्याचा उल्लेख आहे ह उटणें जाभळाच्या रसाचे, कढवून केलेल असाव, असें वाटते हा क्पाय प्रयोग मला उपलब्ध झाला नाहीं रतिरहस्यांत (१५ ८५) गात्रगन्धदूरीकरणोपाय दिलेला आहे

> कुकुभकुसुमजम्बूदललोध्रैरुद्वर्तनं च समभागैः ।
> हरति निदाघे विहित धर्मादिजदेहदौर्गन्ध्यम् ॥

कुकुभाचा (अर्जुन) फुल आणि जाभळाचीं व लोध्राचा पानें यांचें चूर्ण समभाग घेऊन त्याच उटणें अगास लावलें असता घामामुळें येणारी दुर्गंधि नष्ट

होते घाम फार येऊ नये म्हणून अक्रोडाचें अगलित फूल व जांभूळ समभाग वाटून उष्णकाली अगास लावावें, असा उपाय अनङ्गरङ्गात (७ ४६) सांगितलेला आहे. जांभळाची वी अंगाला लावली असता घामोळ्या नाहींशा होतात व अंग स्वच्छ होत असें वनौषधि गुणादर्शात सांगितलें आहे जांभळाचे हे गुण फार प्राचीन काळापासून आपल्याला माहीत आहेत असे वरील गाथेवरून दिसतें

ताल ( ३९८ ) Palmyra ताल म्हणजे ताड हीं झाडें डागरावर व रानात आपोआप वाढतात आपल्याकडील ताडाचा सोट चाळीस ते पन्नास हात सरळ वाढतो सिंहलद्वीपातले सोट शभर सवाश हात उंच वाढतात. ताडाचीं पानें दुधात उकळून वाळवतात व तीं सुकल्यावर नीट कापून त्याचा उपयोग लिहावयासाठी करतात हिंदुस्थानात जें काहीं प्राचीन वाङ्मय उपलब्ध झालें आहे तें ताडपत्रावरच कोरून लिहिलेलें आहे ताडाचीं पिकलेलीं फळ पिवळींधमक सोनेरी असतात, निबर झाल्यावर तीं काळीं पडतात एकेका ताडफळात तीन ताडगोळे असतात. कोंवळ्या ताडगोळ्याचा गर लोण्यासारखा मृदु व शुभ्र आणि शहाळ्यासारखा चवदार असतो त्यातलें पाणी आचमनाइतकेंच असलें तरी फार मधुर असतें रामायणात सीतेच्या स्तनांची ताडगोळ्याशीं तुलना केलेली आहे ! ताडापासून ताडी निघते ताजी ताडी मधुर व माफक मादक असते, आंबलेली ताडी कडक असते ताडाचीं झाडें मूळचीं मध्य पश्चिम आशियातली, असीरिया व बाबिलोन देशातली ताडी हें असुराचे (Assyrians) आवडतें पेय, मात्र सुराच्या पुरस्कारामुळे तिला सुरा हें नांव प्राप्त झालें ! उज्जयिनीतनरीक प्रद्योत राजाचें ताल्द्रुमाचें सोनेरी वन होतें, असे मेघदूतात ( १ ३३ ) सांगितलें आहे पानीनें, हें वन तडगोळ्यासाठीं लावलेलें नव्हते गाथासप्तशतींत तालमयाचा उल्लेख नाहीं तालवृत्ताचा आहे ताडाचे कोंब फुलासारखे नाजूक व सुंदर असतात

दारु ( १०१ ) दारु म्हणजे देवदार किंवा ओंडका रघुवंशात व कुमारसंभवात देवदाराचे अनेक उल्लेख आलेले आहे हीं झाडें मुख्यत्वकरून हिमालयाच्या उतारावर वाढतात महाराष्ट्रात देवदार नाहीत 'अस्थिर हृदय (क्र १०५ ) या गाथेंतील ओंडका देवदाराचा नाहीं, मामुली आहे

नवमालिका ( २८१ ) Jasminum:—नवमालिका म्हणजे नव-मल्लिका. मोगरा, वेलमोगरी नवमालिका हीच सप्तदला असें अमरकोशाचे काहीं टीकाकार सांगतात. एकेरी मोगऱ्याला [ मोतिया ] पांच पाकळ्या असतात; वटमोगऱ्याला पाकळ्यांचे थर असतात. मोगऱ्याला कामदेवाच्या पंचबाणांत स्थान मिळालेले आहे. मोगरीचें फूल देखणें व भरदार असतें, त्याचा सुगंध गर्द व मांसल [ क्र. २८१ ] असतो सदृश फुलांच्या माळेंत गुंफलें तरी तें अद्वितीय दिसतें, इतरांना हताश करतें !

निंब(३०,२४८,८७२) Margosa; Melia Azadirachta:–हीं झाडें हिंदुस्थानांत सर्वत्र वाढतात; विशेषतः महाराष्ट्र व कर्नाटकच्या जंगलात. झाडें ४० ते ५० फूट उंच असतात. याची पानें कांगोरेदार असतात; पांढरीं, बारीक फुलें व निंबोळीं धमक फळें येतात. फळाना लिंबोणी म्हणतात. ही फळें फक्त सर्वभक्षक कावळे [ क्र. २४८ ] खातात. निंबामुळें आजूबाजूची जागा निरोगी होते. त्याची छाया दाट असते. जुनाट निंबाला चन्दनासारखा वास येतो. हा वृक्ष एवढा जिवट असतो कीं तोडला तरी पुन्हा आपोआप वाढतो. निंब सर्वरोगपरिहारकारक असल्यामुळे वैद्य त्याला कल्पतरु म्हणतात. पिंपळ व लिंब याची मैत्री असते. जेथे एक तेथे बहुधा दुसरा असतोच. वनौषधि गुणादर्श-कर्ते मांनतात कीं लिंब कडू असल्यामुळे त्याला कीड लागत नाहीं मान क्र ३० या गाथेंत लिंबावरील किड्याचा उल्लेख आढळतो अरसिक अधमतेची व अहंकारी तिरस्काराची परिसीमा व्यक्त करण्यासाठी हा प्रयोग केलेला असावा.

पलाश ( ३०८, ३११, ५८८, ७७५ ) Butea Frondosa:—पलाश किंवा किंशुक [ क्र.६८८ ] म्हणजे पळस. हीं झाडें हिंदुस्थानात सर्वत्र आढळतात; जंगलात व मैदानातही. जमीन कितीही निकस असली तरी तेथें पळस रुजतो व वाढतो वैदिक वाङ्मयापासून पळसाचे उल्लेख आढळतात. धार्मिक व याज्ञिक विधींमध्यें पळसाच्या समिधा असतात पळसाला वसतात कोंवळी पालवी फुटते हीं पानें सुवर्णाच्या कानासारखी लालसर [ क्र. ७७५ ] असतात 'पळसाला पानें तीन' अशी म्हण आहे हीं पानें ब्रह्मा, विष्णु व महेश याची प्रतीकें आहेत. पळसाचीं फुलं लाल नारंगी असतात. तीं पोपटाच्या

चोंचीसारखीं दिसतात, म्हणून पोपटाला किंशुक हें वैकल्पिक नाव आहे [किंचित्शुक इव शुकतुण्डसदृशपुष्पत्वात्तभात्व] फुल दिसतात सुंदर, पण त्यांना वास नसतो क्वचित् पांढऱ्या फुलाचाही पळस दिसतो पळसाच्या फुलांचा बहर बसतात मार्च एप्रिल या महिन्यात असतो पाश्चिमात्यांना पळसाला जंगलाची ज्वाला ( Flame of the forest ) अशा सशा दिलेला आढळते एखाद्या जंगलात पळस पुष्कळ असले व ते उन्हाळ्यात फुलले म्हणजे रानाला जणू वणवा लागला आहे असे वाटते जंगलात वणवा पेटला होता, बिचाऱ्या हरणाला मात्र वाटले की पळसाचें रान फुलले [क्र ५८८] आहे! पळसाच्या फुलापासून पिवळा धमक रंग तयार होतो मात्र तो कच्चा असतो, म्हणूनच हा रंग उत्सवप्रसंगा, विशेषत कामदेवाच्या उत्सवात, एकमेकाच्या अंगावर उडविण्यासाठी वापरण्यात येत असे पळसाच्या लाखेपासून तयार केलेलें रंगीत रोगण प्राचीन भारतातील स्त्रिया नखलेपन [ Nail polish ] म्हणून वापरीत असत [Cultural History of India Chakraberty p 362 पळस शुभ समजतात, पतिगृहीं जाताना वधूच्या रथाच्या चाकांना पळसाच्या लाखा बांधण्याचा रिवाज होता [ Racial History of India Chakraberty p, 82 ], आणि अशुभही, क्र ३०८ या गाथेत कीरमुखसदृश फुलांनी डवरलेल्या पळसाची तुलना समर्पकपणे बौद्ध भिक्षुसंघाशी केलेली आहे प्रवासाला निघतसमयी बौद्ध भिक्षूचें दर्शन अशुभ होय, असे टीकाकार सांगतात, पण ही समजूत गाथाकालीन की टीकाकालीन हें समजण्यास साधन नाहीं

पाटल —( १४, ४६८ ४६९, ६११ ) Bignonia Suaveolens प्रस्तावनेसाठी पाटल वृक्षाबद्दल माहिती मिळवीत असता दिसून आलें की अर्वाचीन आधारग्रंथात ही संज्ञा फार ढिलाईने वापरण्यात येते प्राकृत व संस्कृत वाङ्मयात पाटल वृक्षाचे अनेक उल्लेख आढळतात त्या काळात कोणता वृक्ष निश्चितपणे अभिप्रेत होता हे समजण्यास साधन नाहीं डा विल्यम रॉक्सबर ( Botanical Observations on Select Indian Plants p 182 ) यांनी पाटलीचा प्रचलित नांवे दिलीं आहेत संस्कृत-अमोघा, श्री स्थानवृन्त, प्राकृत—पारला,पारलि,पारूल बंगाली भाषात अभिध न(संपादक

श्रीशार्नंदमोहन दास ) या कोशात पाटल याचा अर्थ पुन्नागपुष्प पाटला म्हणजे पारूल, गाछ = पुष्पवृक्षविशेष, पाटलि म्हणजे पारूलगाछ Bignonia Suaveolens, याच्या जाति दोन-श्वेत व पीत असा दिलेला आहे श्री एडवर्ड बाल्फरयाच्या Cyclopaedia of India and of Eastern and Southern Asia या कोशात सदर्भ पाहिला असता दिसते की Bignonia या सदरात विशिष्ट वनस्पतिवर्गातील वृक्षाच्या सात जातींचा हिंदी मराठी नावासह तपशील दिलेला आहे ( पैकीं ज्या मराठी नावाचा तपशील हातीं असलेल्या कोशात आढळला नाही त्यावर फुली केली आहे ) त्यापैकीं सहा जाती आपल्याकडे आढळतात, त्या अशा ( १ ) हिंदी-Padal, Sammi मराठी-×Keersel ×Tuatuka हीं झाडें दक्षिणत गोदाकाठीं आणि एडाळा व पारघाटात मुबल्क आहेत वृक्ष पवित्र मानतात उन्हाळ्यात व पावसाळ्यात सुवासिक फुल येतात ( २ ) हिंदी Mulin, Sori, मराठी Tetoo ( निघटरत्नाकरात टेंटू = लोध्र या कोंकणी झाडाचा उल्लेख आहे ) हीं झाडें मुबई इलाख्यात घाटाखालीं आढळतात पावसाळ्याच्या सुरवातीस फुलें येतात ( ३ ) मराठी ×Wurrus हीं झाडे कोंकणातील डोंगराळ भागात, घारापुरी बेटांत व पाच्छापूरच्या जगलात आढळतात उन्हाळ्याच्या सुरुवातीस सुदर फुलें येतात ( ४ ) Bignonia Suaveolens बगाली-पारूल, हिंदी Sammi मराठी Parul सस्कृत-कालागरु, कृष्णवृक्ष पाटलि निघटरत्नाकरात कृष्णवृताचा अर्थ लोध्र असा दिलेला Descriptive Botanical List मध्यें Stereospermum च्या Chelonoides या जातीला पिंवळसर लाल Suaveolens या जातीला किरमिजी व Xylocarpum या जातीला पिंवळसर पाढरी फुलें येतात असें सागितलेले आहे आणि सर्व जातींना पदल पदर, परळ हे मराठी प्रतिशब्द दिलेले आहेत हीं झाडें सह्याद्रीच्या घाटावर वाढतात विशेषत कानडा जिल्ह्यात या झाडाची उची सुमार बारा फूट असते व बुध्याचा परीघ सुमारें दाड फूट असतो याच्या फाद्या जमानीपासून बारा फुटावर असतात याला मोठा किरमिजी फुलें येतात ( ५ ) हिंदी-Bohira Reora मराठा Rukt Reora ( रक्तरोडा, रोहडा, रोहिडा ) हें झाड विशेषत खानदेशमध्ये बागलाणात

आढळले. फुले मोठी, नारिंगी, निर्गंध असतात (६) मराठी-Khurseng (महाराष्ट्र शब्दकोशात सुरशिंग-शिंगाचा उल्लेख आहे) आता निघंटरत्नाकरातील अर्थ देतों : पाटल = पुन्नाग, सुरपुन्नाग = सुरंगी, साष्टी प्रांतात उडी या नावाने प्रसिद्ध, पाटला = पाडळ, विन्हई, ताम्रपुष्पी, रक्तपाडळ, रक्तलोध्र. पाटलिना = रक्तरुण्हेर वनौषधिगुणादर्शकर्ते सांगतात (भाग ४ पृ ७२): "हे झाड फार दुर्मिळ आहे धारवाड जिल्ह्यात सिरसी येथे पाडळीचे झाड आहे हे झाड लावल्यापासून यास सहा-सात वर्षांनी फुले येऊ लागतात हे फुल फार सुकुमार असून सुवासिक आहे. हे लाली रंगाचे असते पारिजातकाप्रमाणे दाट फुले येतात" श्री आपटे सांगतात, (म. सा प, वर्ष २१ अंक,२) पाटलाला अनेकदली पाने व तुतारीच्या आकाराची फुले येतात वनौषधिगुणादर्शात पाडळाची माहिती दिलेली आहे. पाटलि, पाटला, मोघा, मधुदूति, फलेरुहा, कृष्णवृन्ता, कुबेराक्षि, कालस्थाली, काचस्थाली, अतिवल्लभा, ताम्रपुष्पी हीं वेलपाडळींचीं संस्कृत नावें आणि पाटला, सिता, मुष्कक, मोक्षक, घंटापाटलि, काष्टपाटला हीं वृक्षपाडळींचीं अथवा श्वेतपाडळींचीं नावें आहेत. या संकलित उल्लेखावरून आणखी घोटाळा होतो हें खरें पण अगेरीण पाटल वृक्षाची ओळख डॉ. वाळकर यांच्या यादींतील क्र. ४ या वृक्षाशीं पटविण्यात हरकत नाहीं. कारण या झाडाच्या फांद्या जमिनीपासून बऱ्याच उंचावर असल्यामुळें त्यावर चढणें अवघड असतें चढेल तो पडेल (क्र. ४६८) या गाथेंत पाटलाचें वर्णन "निष्पाण्डुरारोह" असें आलेलें आहे. गाथासप्तशतींत पाटलाचे चार उल्लेख असले तरी हे झाड त्या काळींही दुर्मिळ असावें 'सधान' (क्र ८६९) या गाथेत ग्रामणीच्या परसांतील पाटलाचा उल्लेख आलेला आहे. त्या गाथांत हे एकच झाड असावें असें सदर्भावरून दिसतें. श्री रोड्सबर सांगतात की पाटलपुष्पें उपलब्ध असली की गन्ध व मधु लुब्ध भ्रमर इतरत्र भ्रमत नाहींत हा गुण पाटलपुष्पांचे अंगी आहे किंवा कसें या बद्दल मला माहिती नाही. सुरङ्गीचे अंगी हा गुण आहे हें मात्र निश्चित मदान सुगंधासाठीं आम्रमंजिरी व पाटलपुष्पें घालीत असत (रघुवंश : १९.४६). भ्रमणशील भ्रमराचें व निजमहिलाग्रस नायकाचें साधर्म्य पाटलाच्या नव बर्ष

शकेल अशी ग्वाही शालिवाहनान दिलेली आहे [ क्र. ६१९ ] या सर्व उल्लेखा वरून त्या काळीही हें फूल दुर्मिळ असावे असे वाटतें.•

फलिणी (९३७) Aglaia Roxburghiana फलिणी म्हणजे प्रियङ्गु (देशीनाममाला १ ३२) प्रियङ्गु या शब्दाचे कोशात अनेक अर्थ दिलले आहेत प्रियङ्गु हा वृक्ष आहे व लताही आहे सह्याद्रींत हीं झाडें पुष्कळ आहेत त्याना वसतात फुलें येतात लतेला पिंवळी फुलें येतात. त्याच्या पाकळ्या सुट्या असतात केसर मयुक्त असून त्याची नळी बनलेली असते फुलें लहान, सुबक व सुवासिक असतात [ श्री आपटे म रा. प वर्ष २१ अक २ ] गाथासप्तशतींतील उल्लेख वृक्षाचा नसून लतेचा आहे.

बकुल (६३) Mimusops Elengi हा वृक्ष हिंदुस्थानात सर्वत्र आढळतो स्वर्गलोकींच्या पुष्पवृक्षांत पुराणानी बकुलाला स्थान दिलें आहे गोपींना आकर्षित करण्यासाठीं श्रीकृष्ण बकुळीच्या झाडाखाली बसून मुरली वाजवी, नादमुग्ध गोपी बकुलाच्या कक्षेत आल्या की गधमुग्ध होऊन आत्मार्पणाला सज्ज होत ! बकुलवृक्ष विस्तीर्ण व चिरश्यामल, म्हणून तो बागेंत शोभतो. वृक्ष प्रचड आणि पुष्प सूक्ष्म व सुकुमार, पिंवळसर पाढरी, तारका सारखीं चक्राकार, त्याचा गध मधुर व गर्द, त्याच्या मधोमध छिद्र असतें यामुळें त्याच्या माळा लगोलग गुफता येतात आणि त्या पुष्कळ दिवस टिकतातही, हाताळल्या तरी चुरगळत नाहींत, कोमेजत नाहींत, निर्गंध होत नाहींत म्हणून सुगधलुब्धाना त्या फार आवडतात वाऱ्याच्या प्रत्येक झुळकीबरोबर बकुळ फुलें ढाळतो व त्याचा सुगध आसमतात दरवळतो बकुळीचीं फुलें मोरळ्यावर आहेत तोवर विगलित होत नाहींत, कोंदटलीं कीं सुकट होतात, एवढेंच बकुळी [क्र ६३] या गाथेंत कवीनें सूक्ष्म धाग्यात ओवलेल्या बकुळीच्या फुलाची तुलना धाग्याला लटकलेल्या कोळ्याशीं केलेली आहे, ती किती समर्पक आहे !

बेल (७९) Ægle marmelos मूळ गाथेंत मालूर हा शब्द आहे या देशी शब्दाचा अर्थ कवठ गगाधरानें बिल्व असा अर्थ दिलेला आहे वर्ण्य विषयाला दोन्ही अनुकूल आहेत. बेलफळाचीं झाडें हिंदुस्थानात सर्वत्र होतात

या वृक्षाची छाया शातल व आरोग्यकारक असते विष्णूला जशी तुळशीपत्र तशा शंकराला बिल्वदळ. बिल्व त्रिदल हे योनीचें प्रतीक असल्यामुळे लिंग-पूजेत त्याचा उपयोग करण्यात येतो (Racial History of India Chandra Chakraberty p. 84) बेलाला उन्हाळ्यात फुलें येतात आणि बेलफळ पावसाळ्यात पक्व होतात ऊर्ध्वपातनक्रियेने सिद्ध केलेलें बिल्वजल गुलाबपाण्यासारखें वापरतात बिल्वपात्र वापरलें तर धन प्राप्त होतें असें वायु पुराणात (७५ ३-४) सांगितलेलें आहे

बोर (२०० २४० ४१९) Zyzyphus jujuba बोरीचीं झाडें हिंदुस्थानात सर्वत्र आढळतात बोर आंबटगोड असल्यामुळे पोरांना फार आवडतात बोरें सेवन केल्यानें नष्ट झालेली कांती पुन्हा प्राप्त होते (वायु पुराण ९० ९२) कोनाड्यातल्या गोफलातून घरंगळलेल्या बोराला हुंगल्याच राग लागलेल्या मुलानं कोंवळ्या दातानीं व्रण केल्याचा उल्लेख [क्र २००] अत्यंत रम्य आहे.

मधूक (१०३, १०४, १५९, २३९ ८७१, ९५८) Bassia latifolia मधूक म्हणजे महुआ, मोह मोहाचा जंगली झाड हिंदुस्थानात सर्वत्र होतात, क्वचित् जिरायती जमिनीत त्याची लागवडही करतात महाराष्ट्राच्या कृष्णप्रस्तर प्रदेशातही तो वाढतो. मार्च व एप्रिल आणि नोव्हेंबर व डिसेंबर या महिन्यात त्याला फुलें येतात मोहाच्या फळाचें तेल काढतात दिव्यात जाळण्यासाठी व खाण्यासाठी या तेलाचा उपयोग होतो या तेलाला वास असल्यामुळे लबाड व्यापारी तुपात भेसळ करण्यासाठी त्याचा मोठ्या प्रमाणावर उपयोग करतात वसंतात मधुकाच्या फुलांना बहर येतो समग तापविलेल्या दुधावरल्या सायी सारखा त्याचा रंग असतो प्रत्येक फांदीच्या शेवटाला फुलांचे झुपके लागतात प्रत्येक झाडाला दोन ते चार मण फुलें येतात फुलांच्या दांड्यात मधुर रस असतो पाणी ताजा फुलं तशीच खातात पोणा वाळविलेली फुलें शिजवून इतर अन्नाबरोबर खातात गूळ-साखरेऐवजी अन्नात गोड आणण्यासाठी त्याचा उपयोग करण्यात येतो वाळविलेल्या फुलांच्या पिठाच्या भाकरी करतात इतके महत्त्व मानतो मोहाची वाळविलेली फुलें मुरविलेल्या अन्नाशी

सारखा लागतात बाबर आत्मचरित्रात सांगतो कीं हिंदू लोक हा फळें बेदाण्यासारखीं खातात याच्या फुलापासून साखर सहज तयार होते देहूताच्या व जंगली जमातींच्या निष्काळजीपणामुळें आणि शेती व जंगल खात्यांच्या दुर्लक्षामुळें मोहाच्या झाडाची संख्या साल‍ोसाल कमी होत आहे यामुळें गरीबाचें अन्न व दुग्धमद्य उत्पन्न कमी होत आहे मोहाचा लागवड वाढवली तर जंगली जमातींना तीस ते चाळीस टक्के अधिक अन्न मिळेल असा एका शास्त्रज्ञाचा अंदाज आहे मोहाच्या फुलापासून मद्य तयार होतें ते फार त्वरेनें तयार होऊं शकतें व विशेष कडक असतें सुश्रुतांत या मद्याचा उल्लेख आहे मध्यहिंदुस्थानात मोहाचीं झाडें विपुल असल्यामुळें तेथें या मद्याचा प्रसार विशेष आहे वन्य जमातींमध्ये हातभट्टीचें मोहाचें मद्य विशेष प्रिय आहे त्याचा कडकपणा पुरत नाहीं म्हणूनच कीं काय कोण जाणे, हे लोक त्यांत धोतऱ्याचें मिश्रण करतात ! गाथासप्तशतींत नदीकाठच्या मधूकाच्या सौंदर्याचीं अनेक वर्णनें आहेत आणि ही फुलं वेचण्याचें काम बहुधा स्त्रियाच करीत असत असें दिसतें ही फुलें देवपूजेसाठीं वेचलीं जात नव्हतीं हें खास, मग तीं अन्नासाठीं गोळा केलीं जात असोत किंवा घरगुती मद्यनिर्मिती साठीं ! अगर संकेतस्थानाभोंवतीं घोटाळण्यासाठीं सबब म्हणून !

मरुबक ( ६७७ ) Artemisia Indica मरुबक म्हणजे मरवा हें झुडूप फार तर वीत दीड वीत उंच वाढतें याचीं पानें मेथीसारखीं असतात तीं फार सुगंधी असतात याला तुरेही येतात देखण्या फुलांच्या गुच्छांत किंवा गजऱ्यांत सुगंधासाठीं मरव्याची डिक्षी गुंफतात मरव्याच्या अंगप्रत्यंगाला सुगंध येतो, हें कवीचें विधान [ म ६७७ ] अगदीं यथार्थ आहे

माधवी [ ३२२ ] ही लता आहे उद्यानात माधवीचे मांडव असतात पानाचे काठ नागमोडी असतात फुलें पांढरीं, पाच सुट्या पाकळ्यांचीं असतात प्रत्येक पाकळीवर पिवळा ठिपका असतो चैत्रांत फुलांचा भर असतो तो वैशाखांत ओसरतो

मालती [९२,४२६,४४२,४४४,६१९,७४८,७४९,७१५ ९७९] मालतीचा वेल असतो लावल्यापासून दोन अडीच वर्षांनीं फुलं येतात तीं सूक्ष्म व शुभ्र आणि नाजुक व सुवासिक असतात उन्हाळ्यात फुलांना भर येतो मालतीच्या

सुकुमार वल्लीच्या सुगंधानें व सौंदर्यानें भ्रमराला संभ्रम होतो [ क्र. ७४९ ]; तो तिला हळुवारपणें उमलवतो [ क्र. ४४२ ] आणि तिच्यातील मकरन्दाचें सेवन करतो मालतीविषयीं मधुकराची आसक्ति इतकी कीं तिच्या अंगीं मधु आहे तोंवर तो तिला सोडीत नाहीं [क्र. ६१९, ७४८, ९७९]; पण मालतीचा प्रियकर एवढा कृतघ्न कीं तिनें फलधारण केलें कीं लगेच तो तिचा त्याग करतो [ क्र. ९२ ] आणि चचलपणें इतरामागें [क्र. ६१९] भ्रमण करू लागतो !

वड ( ९४, १९६, २६३, २९४, २९५, ३७२, ५५६, ६७० ): Ficus Indica : वड हिंदुस्थानात सर्वत्र आढळतात. वड व पिंपळ हे दोन्ही छायावृक्ष. वडाला दरसाल नव्या पारंब्या फुटतात, त्या जमिनींत शिरतात व रुजतात. यामुळें वडाचा विस्तार सारखा वाढत असतो; मूळचा बुंधा नष्ट झाला तरी पारंब्यांच्या आधारावर व पोषणावर वटवृक्ष जिवंत राहतो. हिंदुस्थानातील सर्व वृक्षामध्यें वडाचाच विस्तार व आयुष्य फार असतें. नर्मदेच्या मुखाजवळचा कबीरवड सुमारें साडेतीनशें वर्षांचा आहे. वाईजवळच्या वडानें सुमारें चार एकर जागा व्यापलेली आहे. हिंदू लोक वटवृक्ष पवित्र मानतात, कधींही पाडीत नाहींत. वड व पिंपळ यांचीं झाडें देवळांजवळ स्थापून त्यांभोंवतीं पार बांधतात या पारांवर पुष्पाला व भूमिगत पारंब्यांना टेंकून ग्रामदेवतांच्या शिळा ठेवलेल्या असतात. ही प्रथा सातवाहनकाळांत प्रचालित होती असें गणपती ( क्र. ३७२ ) या गाथेंतील वटयक्षाच्या वैकल्पिक उल्लेखावरून दिसतें. गावसीमेवरील वटवृक्षांवर मुंजा, वेताळ वगैरे क्षुद्रदेवतांची वस्ती असते. या देवतांच्या व वृक्षाच्या पूजेच्या निमित्तानें स्वैरिणींना त्याकडे जा ये करतां येत असे. पारंब्या पुष्कळ असल्यामुळें जागोजाग व एकामेकांपासून अलिप्त, एकान्ताला सोईस्कर अशी पुष्कळ स्थळें त्यांना तेथें उपलब्ध असत. पार हें खेडेगांवातलें एक सार्वजनिक सभास्थान असते; वटवृक्षाच्या आधारानें मांडलेल्या दुष्ट देवतांच्या शिळांप्रमाणेंच पारावर गांवच्या पुढाऱ्यांची बैठक असते. परके प्रवासी वगैरे मुक्काम करीत. त्यांनाही स्वैरिणी हातोहात पटवीत असत असें गाथांवरून दिसतें.

विषकन्दुरी ( ७१० ): Hardia dumetorum. निघंटु रत्नाकरांत विषकंदर याचा अर्थ हिमवंट (भाग १ : पृ. ३३६) असा दिलेला आहे. ही

उची सुमारें साठ फूट व बुध्याचा परीघ आठ ते दहा फूट असतो याचीं पानें आवळीसारखीं असतात पालवी हिरवीगार, दाट असते उन्हाळयात फुलतो फुलें पिंवळसर किंवा गुलबट रगाचा असतात त्याच्या पाकळ्या अगदी ल्हान व पातळ असतात मध्यभागी पिंवळसर व हिरवट आणि लाब व विपुल केसराचा झुपका असतो शिरीषाचें फूल मूळचें नाजूक, केसरामुळे तें अधिकच सुकुमार दिसतें भारतीय पुष्पसृष्टीत शिरीष हें सर्वांत नाजूक फूल शरीरानें व सुगधानेंही नुसता हात लागला कीं घडी विस्कटावी व कोमेजावें इतकें सुकुमार, कामिनीच्या काना वरून टळलें तरी गालावरील स्वेदबिंदूच्या आधारानें तरगत राहील ( रघुवश १६ ४८ ) इतकें हलकें विदग्ध प्रियकराच्या नि श्वासानेंही कोमेजावें इतकें हळवें ! मग दुर्विंधानें तें हाताळलें तर त्याची अवकळा ( क्र ५६ ) होणारच !

शेफालिका (४१२, ९५३ ) Vitex Negundo शेफालिका हा वृक्ष कीं वेल ? त्याचीं फुलें नील का शुभ्र ? "शेफालिका तु सुवहा निर्गुण्डी नालिका च सा । सितासौ श्वेतसुरसा भूतवेशी " असें अमरकोशात ( वनौषधिवर्ग ७० ) सांगितलेलें आहे निर्गुंडीच्या मुख्य जाती दोन कृष्ण व शुभ्र शेफालिका, सुवहा, निर्गुण्डी व नालिका हीं चार नाव काळ्या निर्गुंडीचीं आणि श्वेतसुरसा व भूतवेशी हीं पाढया निर्गुंडीचीं अमरकोशांत निर्गुण्डी बद्दल आणखी एक ( वनौषधिवर्ग ६८ ) वचन आहे 'अथ सिन्दुक । सिन्दुवारेंद्र सुरसा निर्गुण्डान्द्राणिकेत्यपि । ' सिन्दुक, सिन्दुवार, इद्रसुरस, निर्गुण्डी व इद्राणिका हीं पाच नावें निर्गुण्डीचा पैकी पहिलीं तीन पुल्लिंगी व शेवटचीं स्त्रीलिंगी अमरकोशाच्या व्याख्यासुधा टीकेत ( निर्णयसागर पृ १७२ ) 'सिन्दुवार श्वेतपुष्प सिन्दुक सिन्दुवारित । नीलपुष्प शीतसहो निर्गुण्डी नीलसिन्धुक ' हें अनामिक आणि निर्गुण्डी नीलशेफाल्या सिन्दुवारद्रुमेऽपि च । ' हें मेदिनीकोशातील, अशीं वचनें उदाहृत केलेलीं आहेत यावरून दिसतें कीं सिन्धुवार हा वृक्ष असून त्याचा फुलें पांढरीं असतात डॉ रॉक्सबर्ग सागतात ( Botanical Observations on Select Indian Plants p 72 ) कीं शेफालिकेचीं फुलं पाढरीं असून त्याचे देंठ गडद नारिंगी असतात सायकाळ झाली कीं त्याचा गर्द सुगध आसमतात लाबवरही पसरतो रात्रीं उमललेलीं फुलें सकाळीं गळून पडतात कोणी

सागतात कीं पारिजातक म्हणजेच शेफालिका पण हीं फुलं वेगवेगळीं आहेत वनौषधिगुणादर्शांत शेफालिकेचें वर्णन नाहीं, निर्गुण्डीच आहे " निर्गुंडीचें झाड सुमार दीड दोन पुरुष उंच वाढतें हीं झाडं सर्वत्र प्रसिद्ध आहेत. निर्गुडींत साधी व धानी असा दोन जाति आहेत धानी निर्गुडीचीं फुलं निळ्या रंगाचा असून पानें कातरल्यामारखीं असतात साध्या निर्गुडीस पाढऱ्या रंगाचीं बारीक फुलें येतात फुलें काळीं येतात ती काळी निर्गुण्डी " रानटी लोक निर्गुण्डीस वणई म्हणतात श्री विर् सागतात, ( Descriptive Botanical List p 185 ) कीं निर्गुड, निर्गुडीचें झुडुप ५ ते १० फूट उंचीच असतें, फुलं निळसर असतात, बारीक फळेंही येतात, जून ते डिसबर पर्यंत झुडपावर फुलं असतात पानेंही सुवासिक व औषधि असतात श्री टाल्बट ( Forest Flora II 853 ) सागतात हीं झुडपें मुंबई इलाख्यात सर्वत्र आढळतात, तीं पड जमिनींत, नदीनाल्याकाठीं वाढतात व कुंपणासाठीं लावतात, त्यावर वर्षभर फुलं असतात श्री आपटे सागतात ( म. सा प २१ २ ) " शेफालिका ही जाई-जुई किंवा त्याच गणगोत्रातली दुसरी एखादी वेली आहे शेफालिका म्हणजे निर्गुण्डी असें कोणी म्हणतात त योग्य नव्हे " निघंटरत्नाकरात ( भाग १ पृ ३६२ ) शेफालिकेला ( काळी, रान, श्वेत ) निर्गुण्डी प्रतिशब्द दिलेला आहे गाथा कवींना अभिप्रेत असलेला फुलें मात्र झुडपाचींच असलीं पाहिजेत, हीं झुडप कुंपणाचीं असावीत अस दिसतें

षट्पर्ण (८८१) Alstonia निघण्टरत्नाकरांत षट्पर्ण हा शब्द नाहीं, सप्तपर्णाला सातवीण हा अर्थ दिलेला आहे घाटमाथ्यावर व कोंकणात हीं झाडें पुष्कळ आहेत वनौषधिगुणादर्शांत सांगितलं आहे वृक्ष मोठमोठे होतात हे कोंकण प्राता पुष्कळ आहेत, एका देंठास सात पानें असतात, या पानाचा आकार सावरीच्या पानांमारखा लाबट असतो मुळातील उल्लेख अस्पष्ट आहे

सप्तला ( ६१९ ) Jasminum arborescens सप्तला म्हणजे (वनमालिनी),नेवाळी (रानमोगरी) ही जुईसारखीच एक वेल आहे हिचीं पान फुलं जुईपेक्षा मोठीं असतात फुलं एप्रिल व मे महिन्यात येतात देशी नाममालेत (८४) सत्तली म्हणजे शेफालिका अस सांगितलेलें आहे नवमालिका पहा

हरिद्रा [८५७] Erinocarpus Nimmonii, Guttiferoe Spicata हें झाडें सह्याद्रीच्या जगलात व कोंकणपट्टींत आढळतात भीमाशंकरच्या जगलात हीं झाडें पुष्कळ आहेत (Forest Flora I 96) झाड साधारणत मध्यम उचाचें असतें कधा तें सत्तर फुटापर्यंत वाढतें याचा फुल पिंवळा असतात व फळात पिंवळसर रस असतो ऑगस्ट ते सप्टंबरपर्यंत फुलाचा बहर असतो याच्या हल्दू (Adina cordifolia) आणि हळदबेर (Chloroxylon Swietenia) या जातांचें लाकूड हा पिंवळ धमक असतें (Descriptive Botanical List p 43,139) हळदबेराचीं झाडे सातपुड्याच्या जगलात पुष्कळ आहेत

हलाहल (६०) हलाहल हा सर्पविशेष, त्याचप्रमाण वनस्पतिविशेष आहे वैद्यकीय शब्दकोशात या विषारी वनस्पतीचें वर्णन आढळतें ते असें " विषविशेष ज्याचीं फळ व कद गोस्तनासारखीं व वर्णावरून काळीं असतात व ज्याचे आसपास वृक्षादिक उत्पन्न होत नाहींत व ज्याचा वास घेतला असता प्राणी मरतो " गाथेंत किंवा शब्दकोशात अधिक तपशील मिळता तर अभिप्रेत हलाहल वनस्पतिविशेष आहे कीं सर्पविशेष आहे, हें निश्चित करता आलें असतें, सद्दर्शनी मात्र सर्पविशेष अभिप्रेत असावा असं दिसतें

निष्कर्ष गाथासप्तशतींत उल्लेखिलेल्या बहुतेक सर्व वनस्पति हिंदुस्थानात सर्वत्र आढळतात, मात्र त्यात थोड्याच अशा आहेत कीं ज्या केवळ दक्षिणापथात आणि त्यातही इकडील डोंगराळ भागातच आढळतात

गाथासप्तशतीत उल्लेखिलेले बहुतेक सर्व वृक्ष वन्य आहेत आम्र, कदम्ब, करञ्ज, मधूकादि वृक्षाच्या छाया फळाफुलासाठी वस्तीलगत व नदीकाठीं जमीन सुपर्णा बोपविण्यासाठीं लावीत असत अकोट व पाटल अगणांत आणि वेळूचीं बेटें परसांत लावीत असत एरण्ड, शेफालिका इत्यादि क्षुद्रपाचीं सुपर्णे अगणा भोवतीं असत पराङ्गतच्या मोकळ्या आवारात पुष्पलता व मरुबकादि क्षुप लावीत असत फक्त कुरबक हौसेसाठी लावलेला दिसतो

सह्याद्रीच्या उतारावरल्या पूर्व पश्चिम भागांत, मावळात व कोंकणांत, पैठियानें आढळणाऱ्या वनस्पतींचे अनेक उल्लेख गाथात आलेले आहेत [illegible] तालवृक्ष आणि शेलवाशी व वेळूचीं बेटं [illegible]

वैशिष्ट्य आहे यावरून अनुमान करता येतें कीं असे उल्लेख ज्या गाथात आलेले आहेत त्याचे कर्ते या भागातील रहिवासी असावेत ज्या अर्थी स्थानिक वैशिष्ट्य दर्शविणाऱ्या अशा गाथाचा या सुभाषितकोशात समावेश झालेला आहे त्या अर्थी अनुमान करता येते की या कोशाच्या संपादकाचाही या प्रदेशाशी प्रत्यक्ष संबंध असला पाहिजे

## (१०) गाथासप्तशतींतील पशु, पक्षी व प्राणी

संस्कृत व प्राकृत साहित्यिकाना पशुपक्ष्याचीं ऋतुमानानुसार वर्णनें करण्याची व त्याचे दाखले देण्याची मोठी हौस गाथासप्तशतींतील गाथा हीं ग्रामीण गीतें असल्यामुळें त्यात पशुपक्ष्याचे अनेक उल्लेख यावेत ह साहजिक आहे यापैकीं क्वचित् काहीं उल्लेख साहित्यातील तत्कालीन प्रवृत्ताच्या अनुरोधानें सांकेतिक असले तरी बहुसंख्य उल्लेख नैसर्गिक व वास्तविक आहेत हे उल्लेख ग्रामीण वातावरणाचा आभास उत्पन्न करण्यासाठी अर्वाचीन कवि करतात तसे कृत्रिम नाहींत, दृढ परिचय व सूक्ष्म निरीक्षण यामुळ निश्चितपणें माहीत असलेलीं, स्थानिक पशुपक्ष्याचीं नैसर्गिक वैशिष्ट्यें गाथाकर्तींनीं मार्मिकपणें, सहृदयतेनें व साहजिकपणें दिग्दर्शित वा सूचित केलेलीं आहेत त्याची थोडीबहुत माहिती येथें देतों

### ( १ ) पशु

अस्वल अच्छभल्ल (देशीनाममाला १ ३७) १०९ रिक्ख (रिच्छो देशी नाममाला ७ ६ ऋक्ष) ७३६ *अच्छभल्ल ह्या देशी शब्दापासून अस्वल हा मराठी* शब्द सिद्ध झाला असावा विन्ध्य पर्वताच्या ऋक्ष या वैकल्पिक नावावरून अनुमान होतें कीं या भागात अस्वल पुष्कळ असावीत सातपुड्याच्या जगलात अजूनही अस्वलें पुष्कळ आहेत अस्वलें पिकाच्या फार नास करतात मोहाचा मादक फुलें खाऊन उन्मत्त झालीं कीं तीं माणसावरही हल्ला चढवितात हिंदुस्थानातील अस्वलें करड्या काळ्या रगाचीं असतात अस्वलाचें मास व चरबी हा खाण्याला फार चागला असतात असें सागतात क्र १०९ मधील अस्वलाची हत्या त्याच्या चरबीसाठीं किंवा पिकाचा विध्वसक म्हणून झालेली असावी जळून गेलेला पेंढा अस्वलाच्या वाह्यांगासारखा काळाभोर आणि शेकोटाचा पेटता भाग त्याच्या

अतर्भागासारखा लालभडक असल्याचें येथें विधान आहे. क्र. ७३६ मधील अश्वलाचा उल्लेख केवळ सांकेतिक आहे.

कमठ (४१४)= कासव विहिरींचें व तळ्याचें पाणी स्वच्छ रहावें म्हणून त्यांत कासवें सोडतात. दुष्काळांत तळीं आटतात तेव्हां त्याच्या तळाला तडे त्यासारख्या भेगा पडतात, अशा वेळीं कासवाच्या पाठीसारख्या तळीं कोरडीं पडलीं कीं मासे मरतात व कासवें तडफडतात. या लक्षणावरून हीं ओवी पठारालगतच्या भागातली असावीत असें वाटतें.

कण्हसार कृष्णसार=काळवीट (७४). मृग सदराखालीं पहा.

कुत्रा (मण्डल ६६४, ६८७, सुणअ, शुनक १३८, १७१, ७४९, ६८६, ७१९) कुत्रा व मनुष्य यांची मैत्री फार प्राचीन आहे. तरीही वागणूक गलिच्छ असल्यामुळें कुत्रें अपवित्र मानण्यात येतें. क्र. १७५ या गाथेतील कुत्रें सिंहानें मारलेलें आहे, हें कुत्रें शिकारी नसून शुक्रें असावें. क्र. १८४ मधील कुत्रें हुशार आहे. क्र. ७४९ मधील कुत्रें गोंडा घोळणारें आहे. कुत्र्याची जात इमानी खरी, पण त्याचें इमान त्याला खायला प्यायला घालील त्याच्यापुरतेंच मर्यादित असतें, मग तो घरधनी असो किंवा चोरकामुक (क्र. ६६२) असो. क्र.६८६ व ६८७ मध्यें श्वानाच्या इंद्रियांचे उल्लेख आलेले आहेत. ते जेवढ्या शिष्टाईचे आहेत तेवढेच उपरोधिक आहेत. या गाथा वाचतांना कांहीं स्वघोषितशिष्टांना नाक मुरडण्याचा मोह होईल, पण तो त्यांनीं आवरावा. यांत अश्लील असें कांहींही नाहीं. हा प्रकार हर हमेशा हरएकाच्या दृष्टीस पडतो. येथें केवळ कामगाधू लोंचट वृत्तीच्या दाखविण्यासाठीं हा समर्पक दृष्टांत दिलेला आहे.

गवा (७२६) संदर्भानुसार हा उल्लेख सांकेतिक आहे. गवा म्हणजे रानटी बैल. दाट जंगल असेल तेथेंच गवे आढळतात. मध्यप्रांत व म्हैसूर या भागांतील जंगलांत आजही गव्यांचे थवे भेटतात. सातपुड्यांत व पूर्वेच्या घाटांत गवे पुष्कळ आहेत. गोदावरीच्या दक्षिणेस गायकवाडांच्या प्रवाह ' विष्णु दिग्द ' मधून गेलेला आहे. त्या भागांत असलेल्या गव्यांवरूनच या पर्वतांना हें नाव मिळालेलें आहे.

गाढव=रासभ (८१) अज्ञानी, इमानी, कामसू, भारवाहक म्हणून अत्यंत उपयुक्त असूनही हें जनावर वेडें व बुद्धिहीन मानलें जातें व उपेक्षित-

शून्य म्हणून विचार सदैव सर्वांच्या तिरस्कारास पात्र झालेलें आहे कुंभार, परीट, बेलदार व भटक्या जमाती भारवाहनासाठीं गाढवाचा भरपूर उपयोग करतात आणि काम झाल्यावर उकिरड्यावर सोडून देतात.

गाय व बैल (गाय २७१, ४१०, ४६१, ६०९, ६३७, ६३८, ७९५, ८०६, तर्णक १९, बैल २८, २७५, ४६०, ६३८, ८०६, ८१४, ९५२, वछआ ७२६ ) मनुष्यानें माणसाळविलेल्या जनावरात गाय व बैल याना अग्रस्थान आहे दूध व त्यापासून होणारे पदार्थ, मास आणि शेतकाम यासाठीं त्याचें संवर्धन फार प्राचीन काळापासून होत आहे वेदात जागोजाग गाईची महति वर्णिलेली आहे तरीही त्या काळात उच्च दर्जाच्या पाहुणचारासाठीं गोमास वापरण्यात येत असे उच्चवर्णीयामधील प्रसगविशेषा गोमासभक्षणाची प्रथा भागवत धर्माच्या प्रसारानतर लुप्त झाली असावी खि पू दुसऱ्या शतकात महाराष्ट्रात भागवत धर्माचा प्रवेश झालेला होता अस नाणेघाटातील नायनिकेच्या लेखावरून दिसतें गाथासप्तशतीतील कृष्ण व गाई याबद्दलचे उल्लेख या निष्कर्षाला पोषक आहेत महाराष्ट्रातील अनेक शिवमदिराच्या प्रस्थापनेच्या दतकथा गोपूजेशीं सबद्ध आहेत आणि महाराष्ट्रमाता गोदावरी हिचें नाव गाईंच्या समृद्धीशीं, म्हणूनच का काय कोण जाणे, गाथासप्तशतीत रेडे व म्हशी याच्या अनुषगानें खाटकाचा उल्लेख आलला असला तरी गोमासाचा उल्लेख आलेला नाहीं क्र १३८ मध्यें हिंवाळ्यात वस्तुविनिमय पद्धतीनें बैल खरेदी केल्याचा उल्लेख आहे यावरून असे व्यवहार हिंवाळ्यात होत असत असा निष्कर्ष काढावयास प्रत्यवाय नाहीं या दिवसात बैलांना शेतात काम नसतें आणि शेतकऱ्यापाशीं खरेदीचा साधनें भरपूर असतात चार पुष्ट बैल व पाच घागरी दूध देणारी गाय सग्रहीं असणें हें शतकऱ्याच्या सपन्नतेचें लक्षण मानण्यांत येत ( क्र ८०६ ) असे शेतकरी लोक आपलें गोधन उघड्यावर ( क्र ८१४ ) किंवा गोठ्यांत ( क्र ४६०, ६०९, ६३८ ) बाधीत असत जनावराचा गोठा घरापासून स्वतत्र ( क्र ५६० ) असावा क्र २७१ मधील बैल ओझ्याचा आहे क्र ९५२ या गाथेंत बैलाची कोणाऱ्याही शेतात चोरून घुसण्याची खोड चोरजारमुकाच्या अनुरोधानें व्यक्त केलेला आहे चागल्या बैलाला चागली गाय मिळेल अशी तरतूद तत्परतेनें ( क्र ६३८ )

करण्यात येत असे. गाई दुधासाठी पाळण्यात येत ( क्र ४६२, ६३७, ८०६ ) त्याच्या दुधाचें परिमाण दोहन करणाऱ्या गवळ्याच्या कौशल्यावर अवलंबून (क्र ४६२, ६३७) असतें. रोजच्या परिचयामुळ गाई, बैल व खोंड यांच्या खोडी गाथाकर्वीना तपशीलानें माहीत आहेत बैल मारका असला तरी गाय त्याच्या शिंगावर आपली खाजरी पापणी निर्भयपणें घासते (क्र ४६०), गवताच्या कोंवळ्या व तोंटक्या कोंनाना दात लागत नसला तरी त्यावरून गाईबैल जीभ फिरवतात ( क्र ७९५ ) आणि उडारलेल वासरू कान उभारून मन मानेल तेथें घुमतें ( क्र ११ ), हे उल्लेख मार्मिक व सूक्ष्म निरीक्षणाचे द्योतक आहेत

गेंडा (७३६) संदर्भानुसार हा उल्लेख सांकेतिक आहे. हिमालयाच्या पायथ्याच्या दलदलीच्या प्रदेशात हल्लींही गेंडे वावरताना दिसतात सातपुड्याच्या जंगलात गेंडे पाहिलेले लोक अजून आहेत बंदुका प्रचारात येण्यापूर्वी गेंड्याची शिकार फार साहसाची असे. त्याच्या कातड्यावर तरवार चालत नाहीं, म्हणून त्याच्या ढाली करतात. रसविन्मुखतेचे प्रतीक म्हणून एका शीर्षकासाठीं मी गेंड्याची योजना ( क्र ८९४) केलेली आहे

चितळ : ६२९ . मृग सदराखालीं पहा.

चित्ता : ( ७५५ ) दीवि म्हणजे चित्ता हें जनावर हिंदुस्थानात आणि सह्याद्रीच्या जंगलात सर्वत्र आढळतें मराठी लोक चित्त्याला बिबळ्या म्हणतात. त्याचे अंगीं वर्णनीय असे वैशिष्ट्यें अनेक आहेत आणि शेतकऱ्याना त्याचा उपद्रव पुष्कळ होतो असें असूनही गाथासप्तशतींत त्याचा एकच उल्लेख यावा आणि तोही उत्तरार्धांत असावा, याचें आश्चर्य वाटतें हा चित्ता शिकारी तर नसेल ?

पाठीण. पाडीण (८१४) : मत्स्यविशेष. तळीं आटलीं की हे मासे फडफडतात हा मासा प्रचण्ड असल्याचा उल्लेख कथासरित्सागरांत आहे मत्स्याहाराचा उल्लेख गाथासप्तशतींत नाहीं

माकड. ( कई ५३१, मक्कड १७१, वानरी ५३२; हरी ९ ) : नर व वानर या शब्दांत आहे त्याहून अधिक सादृश्य कपि व कवि या अर्थाच्या कइ या प्राकृत शब्दांत आहे ! माकडें मोठी धूर्त असतात असा लोककथा

आहेत, मराठी म्हणी मात्र त्याच्या अविवेकाच्या द्योतक आहेत गाथासप्तशतींत वर्णिलेल्या माकडचेष्टा अधीर प्रियकराच्या बाबतींत प्रेयसींना वारंवार अनुभवावयास मिळतात! हीं वर्णनें गाथाकर्त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणाचीं द्योतक आहेत

माजर (२८,) धान्याची नासधूस करणाऱ्या उंदराच्या नाशासाठीं मांजरें घरोघर पाळतात एका घरीं पाळलेलें माजर सहसा दुसऱ्या घरा जात नाहीं, पण त्याच्या अगा कुत्र्याचें इमान नसत त्याचें घ्राणेंद्रिय फार तीव्र असतें माजराची नजर दिवसा दुधावर, रात्रीं उंदरावर यामुळ दुधाच्या बाबतींत माजर अश्वत्थाम्यासारखें कधींही फसत नाहीं

मुगूस (७७५) ॲरिस्टॉटल, प्लिनी, स्ट्राबो वगैरे प्राचीन शास्त्रज्ञानीं व प्रवाशाना मुंगसाचें उल्लेख केलेले आहेत इजिप्त व हिंदुस्थान या देशात सर्पांचे शत्रु म्हणून मुंगस पाळण्यात येतात तीं सापाचा, तसाच कोंबड्याचीं व कबूतराचीं अंडीं खातात सापाचें विष त्याना बाधत नाहीं अशी समजूत आहे, ती खरी नाहीं सापावर हल्ला चढवितात तेव्हाच्या त्याच्या हालचाली इतक्या चपळ व आवेशी असतात आणि तीं सापाला अशा जागीं धरतात कीं त्याना साप सहसा डसू शकत नाहा डसला तर तींही वाचत नाहात

मृग (कृष्णसार = काळवीट २५, कुरङ्ग ६०१ पुसिअ ६२९, मृग २८०, २८७, ४६६, ६१८, ९८० मृगाक्षि ४०६, मृगी २८७, ६१, ७५७, हरिण १८८, ५१४, ६२९) यापैकी क्र २८०, ४६६ व ९८० हे उल्लेख मृगलाछन चद्राला अनुलक्षून आहेत चापल्य, सौंदर्य व युग्मनिष्ठा हीं मृगाचीं वशिष्ट्यें आहेत श्री वारफर (सायक्लोपीडिया I 116) सागतात कीं मृग निष्ठनें एकपत्नीव्रता असतात गगायमुनाच्या खोऱ्याव्यतिरिक्त हरणें हिंदुस्थानात सर्वत्र आढळतात विशेषत विन्ध्याद्रि व सह्याद्रि याच्या पठारावर सुमारें पन्नास वर्षांपूर्वी हरणाचे कळपच्या कळप माळरानावर जागोजाग भेटत महायुद्धाच्या काळात कातडा व मास यासाठा शिकाऱ्यानीं त्याचा जवळ जवळ उच्छेद केलेला आहे गोंडी भाषेंत मृगाला भिरकुर व मृगीला भीर म्हणतात मराठवाड्यातील भीर हे ग्रामनाम यावरून तर पडल नसेल ? हरणें मोकळ्या जगलात वस्तीस असतात आणि पोटापाण्यासाठीं माळरानांवरून कळपा-

रूळपाना भटकतात चितळ दिवसा जगलात पाण्यानजाक वस्तीला असत आणि रात्रा आजूबाजूला चरत नगर जिल्ह्यातील चितळी हे ग्रामनाम यान्च्या त्या भागातील समृद्धावरून तर पडल नसेल? हरणाचा गति इतकी शीघ्र असते की शरार शाबूत आहे तोंवर शिकारी कुनेही त्याना पकडू शकत नाहात यासाठा दक्षिण महाराष्ट्रातले शिकारी लोक शिकविलेल्या चित्याची योजना करतात जस चापल्याचें तसच प्रीतीच्या एकनिष्ठेचें हरण हे प्रतीक आहे क्र २८७, ५९४ व ७१७ या गाथात मृग व मृगी याची परस्परावरील प्रीति व्यक्त झालेली आहे, आणि क्र ५८८ मध्यें हरिणाचा भोळेपणा काळवीटाची ऐट अवर्णनीय असते गाथासप्तशतीच्या काळात काळवीट उजवीकडून आडवा गेला तर कार्यसिद्धि होणार नाहीं असें मानून प्रवासी घराकडे परत (क्र ७५) जात असत त्या काळात जातिवत शिकारी हरणाची, विशेषत चितळाची शिकार करणें कमीपणाचें (क्र ६२९) मानीत क्र ६०१ या गाथेंत क्रौंचवधाच्या तोडीचा करुण प्रसग वर्णिलेला असून सदर्भानुरोधानें त्या काळीं प्रचलित असलेल्या अहिंसा तत्त्वाचा पुरस्कार केलेला आहे

मेस (मेंढा ८१४) लोकर, कातडें व मास यासाठीं व खतासाठीं मढर पाळतात महाराष्ट्राचें वातावरण समशीतोष्ण असलें तरी उष्णतेकडे झुकणार असल्यामुळें येथें उत्कृष्ट मेंढराची पैदास होत नाहा मेंढराचें निवासस्थान उघड्यावरच असतें या गाथेंतील उल्लेख केवळ सांकेतिक आहे

रण्णुदुर = रानउदीर (७६३) रानात, शेताच्या बाधात रानउदीर बिळ करून राहतात ते उभीं पिक कुरतडतात आणि पीक तयार झाल्यानतर लोंब्या कुरतडून गोळा केलेल्या धान्याचा साठा हिवाळ्यासाठीं आपल्या बिळात करून ठेवतात दुष्काळ पडला किंवा पडावयाचा असला म्हणजे ते माजतात हा शेतकऱ्याचा मोठा शत्रु, आणि सर्प हा या उदराचा शत्रु

रानडुक्कर (४०२) भोण्डी (थुडीरो, भुन्ो = सूकर देशीनाममाला ६.१०६) रानडुक्कर हा शेतकऱ्याचा फार मोठा शत्रु शरीरानें ओबडधोबड असला तरी त्याची चव मोठी चोखदळ असते शेतातले उत्तम, मधुर, परिपक्व ऊसादि तेवढेच तो खातो रात्रीं केव्हांही शेतात घुसतो आणि खातो त्याहून नासधूस जास्त करतो भक्षेन ब्याकुळ झाला असता दिसला उमेदी राखणदाराला न

जुमानतां उसासारख्या दाट पिकात तो बेधडक घुसतो याचें मास फार चवदार असतें व मादक असते म्हणून मुमडीचा घोंगा पत्करून याची शिकार करण्यात येते वसतपूजेच्या दिवशीं रानडुकराची शिकार करणें धार्मिक कर्तव्य होय असें रजपूत मानतात ही प्रथा शकांच्या समर्गानें राजस्थानात सुरू झालेला असावी असें काहा सशोधकाच मत आहे

रेडा व पाडी : ( महिस = रेडा ५४९, ५५१, ५६०, ५८४, ६८०, ७१४ पाडी= महिषावत्स ६५ सैरह = रानरेडा १०२, ७३६ ) दूध, वाहतूक व शेतकाम यासाठीं खेडूत व शेतकरी लोक रेडे व म्हशी पाळतात गाईपेक्षा म्हैस जास्त व दाट दूध देते आणि बैलापेक्षा रेडा जास्त वजन ओढू शकतो शिवाय खूर पसरट असल्यामुळें त्याचे पाय चिखलात रुतत नाहात, म्हणून भातशेतीच्या भागात रेड्याचा वापर जास्त होतो या जातीला पाणी (क ५८०), चिखल (क ५६०) व दमट छाया (क ५००) फार आवडतात चिखलामुळें त्याच्या शरारावर चिलटें सारखीं घोंगावत ( क ५६० ) असतात उन्हात त्याच्या तोंडातून सारखी लाळ गळत ( क ५५१ ) असते खेडूत आपल्या आवडत्या रेड्याच्या गळ्यात घटांच्या माळा ( क १०२ ) बाधीत क ५८४ या गाथेंत रेड्याच्या उदराचा भेद केलेला आहे व क ५८० या गाथेंत कसायाचा उल्लेख आलेला आहे यावरून गाथासप्तशतीच्या काळात माहिष माससेवनाचा प्रघात असावा असें वाटतें

वाघ ( वग्घ = व्याघ्र ९४५, सद्दूल = शार्दूल ७३६ ) चित्याप्रमाण वाघाचेही उल्लेख थोडे आहेत साहसी व्याध वाघांची शिकार त्यांच्या आकर्षक कातड्यांसाठीं करीत असावेत आणि तीं त्याच्यापासून खरेदी करण्याकरिता वाणी त्याच्या घरोघर जात असावेत असें क ९४५ या गाथेवरून दिसतें

शरभ ( सरभ ७४२ ) हा प्राणी काल्पनिक आहे व हा उल्लेख साकेतिक आहे याचें शरीर सिंहासारखें असून त्याला हत्तीसारखी सोंड व सुळे असतात आणि पाठीच्या कण्याला तरवारीसारखी धार असते, असें त्याचें वर्णन आढळतें दक्षिण हिंदुस्थानातील मदिरातील शिल्पात याच्या प्रतिमा वारवार दृष्टीस पडतात

सिंह (पचानन १००५, सिंह १७१, ९७०) एका काळीं हिंदुस्था नातील सर्व जंगलात सिंह होते, आता ते फक्त गीरच्या जंगलात राहिले आहेत वाघ हा जसा जंगलचा राजा तसा सिंह हा माळरानाचा राजा गोदावरीच्या परिसरात असे माळ पुष्कळ आहेत क्र १७१ या गाथेंत सांगितल्याप्रमाणे या भागात सिंहाची वस्ती असणे अशक्य नाही म्हणूनच अजंठ्याच्या लेण्यात सिंहाचा अनेक चित्रें रंगविण्यात आलेलीं आहेत सिंहाला पचानन (पंच आनन यस्य) म्हणतात, कारण त्याचा जबडा नेहमीं उघडा असतो अशा विक्राळ प्राण्याच्या अयाळाला स्पर्श (क्र ९७०) करण्याला कोण धजावणार?

हत्ती—(११६, १०१ १७३, २५८, २६०, ३८३, ४५४, ५२६, ५४८, ६३०, ६४० ७३६, ७८० ७८३, ७८४, ७८५, ७८६, ८१४, ९१९, ९४९) गाथासप्तशतींत पशूंपैकीं सर्वांत अधिक उल्लेख हत्तीचे आलेले आहेत दक्षिण आशिया व आफ्रिका या भागातच हत्ती आढळतात विशिष्ट प्रदेशात विशिष्ट पशु विशेष उपयुक्त असतात घोडा हें वाहन मैदानचें आणि गाढव हें खडकाळ डोंगराच, उंट हे वाहन रणाचें आणि हत्ती हें अरण्याचें दण्ड कारण्यात दाट अरण्य होते, म्हणूनच गाथासप्तशतींत हत्तीचे पुष्कळ उल्लेख आलेले आहेत क्र ११६ या गाथेंत विन्ध्य पर्वतात वावरणाऱ्या हत्तीच्या कळपाचा उल्लेख पुलिंदाऱ्या साहचर्यांत आलेला आहे, क्र ७८० या गाथें तील हत्ती विन्ध्य पर्वताचा त्याग करून भातशेतीच्या भागात गेल्याचा उल्लेख आलेला आहे आणि क्र ५४८ या गाथेंत हत्तींचा कळप नर्मदेच्या डोहात उन्मत्तक्रीडा करीत असल्याचे वर्णन आलेले आहे विन्ध्याद्रीचें इन्ध्याद्रीशी समीकरण केले असता हीं वर्णनें गाथासप्तशतीच्या जन्मभूमीशीं जुळतात नर्मदेच्या खोऱ्यात हत्तींचे अश्मीभूत सांगाडे (श्री बाल्फर सायक्लोपीडिया I 1040) सापडलले आहेत खानदेश गॅझेटीयर कर्ते (p 29) सांगतात "सतराव्या शतकापर्यंत खानदेशाच्या उत्तर भागातील अरण्यात जंगली हत्तींची निपज मोठ्या प्रमाणावर होत असे मोगलाच्या स्वाऱ्या, तापी खोऱ्यातली वर्दळ आणि नागरखाली येणाऱ्या जमीनीचा विस्तार या कारणा- मुळें या भागातील हत्ती नष्टप्राय झालले आहेत' बौद्ध शिल्पात व अजंठ्याच्या

चित्रपटात हत्तीला प्रमुख स्थान आहे प्राचीन हिंदी व ग्रीक आणि मध्य युगीन हिंदी सैन्यात हत्तींचा उपयोग मोठ्या प्रमाणावर झालेला आहे नेत्याच्या वाहनासाठीं आणि झड्यांच्या व डक्यान्या ( क ७२६ ) धारणा साठीं, शत्रूवर चालून जाण्यासाठीं आणि अवजड युद्धास्त्रें ओढण्यासाठीं हत्ती रानात (क ६४०, ७८२) राहतात किंवा राजवाड्यात (क ८१४) हत्ती नेहमीं कळप ( क ११६, ५४८, ७८०, ७८४, ७८५, ७८६ ) करून राहतात लहान कळपात आठ ते दहा आणि मोठ्या कळपात सत्तर ते ऐंशीं हत्ती असतात सर्वांत बलिष्ठ व हुपार असतो तो कळपाचा पुढारी होतो कळपावर सकट आलें की त्याला स्वत चा मद आवरून सर्वांचें सरक्षण ( क ७८५ ) कराव लागतें जिव्हालौल्याच्या आहारीं जाणाराला नेतृत्व ( क ७८२ ) मिळत नाहीं पुढाऱ्याच्या नेतृत्वा खालीं कळप क्रीडा ( क ५४८ ) करतो हत्तीचें गडस्थळ धडक देण्याएवढें मजबूत व विशाल ( क १२३, ९३३ ) असतें निरतर व पृथुल स्तनयुग्माशीं गजकुभाची तुलना ( क २५८, २६० ) नेहमीं करण्यात येते हत्तीच्या कपाळाला दोहो बाजूना छिद्रें असतात त्यातून मद ( क ७८५, ७८६ ) स्रवतो इतका कीं त्यामुळें त्याचें गडस्थळ ओलें होतें ( क ६४० ) हा मद सुगधी असतो समोगेच्छा जागृत आहे तोवरच हत्ताला मदस्राव ( क ७८६ ) होतो मद आला कीं हत्ती धुद होतो व झाडाना टकरा ( क ११६ ) मारतो हत्तीच्या गडस्थळात मोतीं असतात अशी समजूत ( क १७३, २६० ) आहे ती निराधार आहे हत्तीला पाण्यात डुबण ( क ५४८ ) आणि गवतानें, चिखलानें व धुळीनें सर्वांग माखण ( क ५२६ ) फार आवडतें यामुळें हत्ती चिखलात फसतात (क ४५४) हत्तीला ऊन सहन होत नसल्यामुळें शक्य तेव्हा तो आपल गडस्थळ ओलें ठेवण्याचा प्रयत्न करतो ( क ६४० ) हत्ती सोंड्या उपयोग हातासारखा ( क ४५४ ) करतात पृथुलनितंबिनीच्या मांड्याची सोंडेशा तुलना ( क ९१६ ) करण्यात येते वनगज एवढा अजस्र व सशक्त पण ता केवळ शाकाहारी ( गवत क ५२० भात क ७८२ व मृणाल क ३८३ ) असतो हत्ताचें हत्तिणीवर फार प्रेम ( क ३८३, ४५४ ) असत हत्तींची शिकार हस्तिदतासाठीं होते व्याधापासून वाणी हस्तिदत खरेदी

करतात आणि विक्रीसाठी संग्रही (क्र. ९४५) ठेवतात पुलिंद हत्तींची शिकार धनुष्यबाणानीं (क्र ११६) करतात रानांत वणवे पेटवून शिकारी हत्तींना घेरतात (क्र. ७८४) क्र. ७८१ या गाथेत हत्ती पकडण्याची एक तत्कालीन पद्धत सांगितलेली आहे. एक खड्डा खणावयाचा, इतका खोल की त्यातून हत्तीला बाहेर पडता येऊ नये, त्यात एक गवती हत्ती उभा करावयाचा, इतका हुबेहूब की तेथे छावा रतलेला आहे असे जवळपास येणाऱ्या हत्तीला वाटावें, त्या खड्डयावरची पोकळी काटक्यांनीं व गवतानें आच्छादून टाकावयाची, नंतर हत्ती तिकडे वळवावयाचे आणि खड्डयात हत्ती अडकला कीं त्याला पकडावयाचें. म्हैसूर-कर्डील जंगलांतील हत्तींना शिकविलेल्या हत्तींच्या साह्यानें फसवून लाकडी टट-वदीच्या खड्डयात आणवून पकडण्यात येतें. गाथासप्तशतीतील उपरोक्त युक्तीचीच ही सुधारलेली व विस्तारलेली आवृत्ति आहे, हें स्पष्ट आहे असे फसवे उपाय योजण्यात येतात, म्हणूनच अनुभवी हत्तिणीनें छाव्याला उपदेश केला आहे (क्र. ७८३) कीं तुझें कुल उच्च व शरीर सशक्त असले तरी आणि म्हणूनच विश्वासघातकी मानव तुला कधी बंधनात अडकवतील याचा नेम नाहीं, म्हणून सावध रहा, केवळ दैवावर विसंबू नकोस.

## (२) पक्षी :

कावळा : (१०२, १३४, १६२, २०५, २४८, ५६३, ७०५, ७४०) हिंदुस्थानातील पक्ष्यांमध्यें कावळ्याची जात बहुसंख्य असून अत्युच्च पर्वत-शिखराव्यतिरिक्त इतरत्र सर्वत्र ते आढळतात, विशेषत मनुष्यवस्तीच्या आसपास रक्ताश्रावर ताव मारणारे, क्षतावर चोंच मारणार, कृष्णवर्ण व लोचट, म्हणून त्यांची तुलना दुर्जनाशीं करण्यात येते, आणि हंसाची सज्जनाशीं हंस व सज्जन हे अल्पसंख्य आणि काक व दुर्जन हे बहुसंख्य असा, रुढीचा रिवाजच (क्र ७०५) आहे श्री सलीम अली (The Book of Indian Birds) यांनीं केलेलें कावळ्यांच्या गुणदोषांचें वर्णन नमूद करण्यासारखें आहे "His intelligence & boldness, coupled with an infinite capacity for scenting and avoiding danger carry him triumphantly through a life of sin and wrong doing. His thieving propensities are in a great measure redeemed by his effecient

service as a scavenger " गायाक्वींनीं हे गुणदोष मार्मिकपणें दिग्दर्शित केलेले आहेत गृहिणीनें ठेवलेला बळी आपल्यासाठींच आहे व तो ग्रहण करण्यात कांहीं धोका नाहीं हें सर्वांनें माहीत असलें तरी त्याभोंवतीं वागटी पटलेली पद्धाताच कावळ्याची सावधगिरी जागृत (क्र २०५) होते प्रियकर व प्रेयसी याची प्रेमसमाधि लागलेली पाहून त्याच्या हातातील भिक्षापात्रावर झडप घाल ण्याचा हुशारी व हिंमत (क्र १६२) त्याचें अर्गी असते या सर्वभक्षकाला वारवार तिरस्कारपूर्वक हाकून लावलें तरी तो लाचटपणें घिरट्या घालीत (क्र १२४) राहतो व प्रसगविशेषीं झडप घालून जेवत्या ताटातलें अन्न उडवतो, कुष्टिणीचें जिणें असेंच असतें, हें या गाथेंत मोठ्या मार्मिकपणें सांगितलेलें आहे. दारोदार व स्मशानात बळी खाणारा कावळा चिरकाल जगतो असें हीं तेथें विधान आहे कावळा चिरंजीव असतो अशी सामान्य समजूत आहे, पण ती खरी नाहीं कावळ्याचें दर्शन व स्पर्श अशुभ मानण्यात येतात

कुक्कुड : कोंबडा (५८२, ६९८) : अगदीं अलीकडेपर्यंत गावगाड्यातल्या फक्त हलक्या जातीं कोंबड्या पाळीत असत इतका किफायतशीर धदा दुसरा नाहीं पहाट झाली कीं कोंबडा आरवतोच गाढ झोपेंत असणारानाही जाग विण्याइतक्या तीव्र स्वरात

जलरङ्कुण पाणकोंबडी (५७८) नद्या व तळा यान्या काठावरल्या व लगतच्या झुडपाच्या जाळींत याची वस्ती असते परक्याचा चाहूल लागताच त्या आडोशाला लपतात या सामान्यत स्तब्ध असतात पण सगमान्या हगामात मात्र (कुवाक् कुवाक् कु कु कु कु) सशब्द होतात

पारवा (पारावअ ६८) Dove व Pigeon या दोन्ही शब्दाना कपोत व पारावत हे सस्कृत (कबूतर व पारवा) प्रतिशब्द आढळतात पारवा म्हणजे निळं कबूतर हेच येथें अभिप्रेत आहे असें दिसतें सकरामुळें त्यान्यातहा बहुरग आढळतात हिंदुस्थानात पारवा हा कावळ्याइतकाच परिचित आहे त्याच्या अगा असतात ते दुर्गुण मात्र याच्या अगा नसतात माणसाळलेले पारवे मनुष्यवस्तात घराच्या छपरांनजीकच्या कानाकोपन्यात घरटा घालतात आणि भर बाजारातही थव्यानें निर्भयपण दाणे टिपतात श्री सलाम अली

सागतात (पूर्वोक्त पृ २९२) जुनाट विहिरी, पडक्या इमारती, डोंगरी किल्ले व तुटलेले घडे हा पारव्यांची आवडता वसतिस्थानें होत, येथ पारवे दिवसा उजेडा सारखे घुमत असतात, कोणाची चाहूल लागताच ते स्तब्ध होतात क ६४ मध्य पडक्या देवळात पारवा घुमत आहे आणि त्याचें घुमण हेंच निर्विघ्न एकांताचें आश्वासन आहे वरील वर्णनाच्या अनुरोधानें पाहिलें असतां हें चित्र किती वास्तविक आहे तें प्रत्ययास येत

पोपट (कीर ७५, ३०८, ८६६, ८१५, पुंसुअ (नर) ५६२, सूअ (शुक) २६३) हिरवे पोपट हिंदुस्थानात सर्वत्र आढळतात नराच्या गळ्याभोंवता (क ५६२) गळेसरासारखी लाल पट्टी असते पोपट ल्हान ल्हान थव्याथव्यानें राहतात पोपटाचा थवा पारव्यापेक्षा ल्हान असतो राहून त्याचे साधिर वसतिस्थान असतें सध्याकाळ झाली की चोहोंकडून त्याचे थव्याच्या थवे सुघस्थानाकडे रात्रीच्या विश्रांतीसाठीं लोटतात एकेका झाडावर जणू पानागणिक पोपट (क २६३) असतात पोपटाचा चीत्कार स्वरात पारव्यापेक्षा तार असतो तयार होत आलेल पीक (भात क ८१५) व पाडाला आलेलीं फळ यावर पोपट निर्वाह करतात खातात त्यापेक्षा नासधूस (क ८१५, १००३) जास्त करतात त्याचें उड्डाण आकर्षक व डौलदार असत झाडाच्या ढोलात बांधलेल्या घरट्यात माद्या अंडीं घालतात व नर घरट्याचें रक्षण करतात (क ५६२), घरट्यावर किंवा पिलावर घाला आला असता त्या कर्कश चीत्कार करतात क ७५ व २६३ या गाथात त्याच्या उड्डाणाच मार्मिक वर्णन केलेलें आहे

बलाआ: बलाका, बगळा बगळा (४ ४३०) बलाका या शब्दाचा प्रवर्गी अगदी अर्थ आहे बगळ्याच्या काहीं जाता आता हिंदुस्थानात स्थायिक झालेल्या आहेत येथ दिसतात त्यापैकी बहुसंख्य बगळे लडक तिबेट वगैरे भागातून हिवाळ्याच्या सुरवातीस थव्याथव्यानीं हिंदुस्थानात येतात आणि उत्तर हिंदुस्थानात आसामपर्यंत व दक्षिण हिंदुस्थानात म्हैसूरपर्यंत पसरतात आणि उन्हाळ्याच्या सुरवातीस थव्याथव्यानीं उत्तरेकडे जातात पक्षयानें हनानी पर्यटन हें प्राणिशास्त्रातलें मोठें कोडें आहे नद्यांच्या किनाऱ्यावर किंवा तळ्याच्या काठांनजीक बगळे दिवसभर हुलक्या घेतात (क ४), मात्र

चोणाची चाहूल लागली की स्थलांतर करतात, किंवा उथळ पाण्यावर आळसात तरंगत राहतात आणि मध्याकाळ झाली की जागे होऊन अन्नाच्या शोधाला निघतात आभाळातून उडताना त्याचे थवे त्रिकोणव्यूह (क ४३५) रचून (पारफर सायक्लोपीडिया I 836) किंवा सरळ रेघत उडतात

भ्रमर (अलि (Black bee) ४३५, ५७४, छप्पय (हेम १२६५) ८१३, भ्रमर (Large black bee) ७८, ३३१, ३६०, ३८७, ४२०, ४४४, ५३१, ५४३, ५९०, ५९१, ६१३, ६६६, ७४८, ७४९, ७८६, ७९०, ८८०, ९७९, मधुकर (Large black bee) ३७, ९२, १२८, १३९, ४४२, ५०१, ६१९, ६४१, ७५१) अलि ह्या जातीचा भ्रमर हा भ्रमर व मधुकर याहून आकाराने लहान असावा असें कोशातील अर्थावरून दिसतें अलि, भ्रमर व मधुकर याचा अर्थ lover = प्रियकर, libertine = लपट असाही दिलेला आहे भ्रमर या शब्दाला ‘तरुण पुरुष’ असाही अर्थ आहे म्हणजे हे सारे नर आहेत! क ९२, १३९ व १३६ आणि क ३३१ व ६६९ यामधील भ्रमर हे छेलबटाऊ असणें संभवनीय आहे क ४४२, ४४४, ५९०, ६१३, ६१९, ७४९ व ७५१ यामध्यें भ्रमराचें लपट पुरुषाशीं असलेल साम्य सूचित केलेलें आहे प्राकृत व संस्कृत कवींना भ्रमर हें चाचल्याचें प्रतीक मानलेलें आहे आणि त्याच चांचल्य हा दोष त्याचा नसून त्याचें कारण फुलाची नीरसता, असें सांगण्यात (क १२९) आलें आहे वस्तुत एका फुलाचे केसर दुसऱ्याच्या कोशात प्रस्थापित करीत राहणें हें त्याचें नैसर्गिक कार्य, यामुळ फुलाच्या वंशाचें वर्धन होतें पण यामुळेंच बिचाऱ्यावर लपटतेचा आरोप आलेला आहे पुष्पधारी वृक्षवेलींनीं फलधारण केलें का त्याचें नियोजित कार्य सपतें आणि म्हणून तो त्याकडे पुन्हा फिरकत नाहीं यामुळें बिचा यावर कृतघ्नते चाही आरोप आलला (क ९०) आहे, इतकेंच नव्हे, प्रेयसाच्या मातेविषयाही कामुक अभिलाषाचा (क ७४९)। फक्त एकाच कवीन त्याला स्थिर प्रीतीचें श्रेय (क ३७) दिलेलें आहे भ्रमराचा वर्ण निळा (क ४२०) व काळा (क १६१) अलिकुलाची तुलना सुंदरीच्या मुखावर डोलणाऱ्या केसांशीं (क ७८) व कृष्णमणिमेखलेशीं (क ५७४) केलेला आहे क १६१ मधाल ‘अधाराची गाठ हा प्रयोग व नवकवानाही अकल्पित वाटल। सौंदर्यवटा

या अलीकडे रूढ झालेल्या डौलदार शब्दाला 'भ्रमरालक' असा यथार्थ शब्द प्राचीनांनीं योजलेला आहे! भ्रमर वसंतांत झंकार करूं लागतात (क्र. १२८, ५४३) आणि हिंवाळ्यात मिटलेल्या कमळांत छपून (क्र. ८१३) राहतात असें गाथाकवी सांगतात. ज्या अर्थी भ्रमर कमलाला सोडून केवडा-भोंवतीं घोंगावतो त्या अर्थी त्याला नैसर्गिक गंधज्ञान असतें, पण अनुभवाचे अभावीं स्पर्शज्ञान मात्र नसतें असा कवींचा निष्कर्ष (क्र. ६४१) आहे. भ्रमराला कोणतीं फुलें आवडतात? अशोक (क्र ४२२, ७४८), कदम्ब (क्र. ३७), कमल (क्र. ७८, ३८७, ४५५, ५६१, ६४१, ८१३, ८८०), केतकी (क्र. ९७९), पाटला (क्र. ६१९), मालती (क्र. ९७, ४४२, ४४४, ७४८ ७४९) व मोहोर (क्र. ३३१, ५४३, ६६६, ७८६, ९७९). स्त्रियांच्या सुगंधी निःश्वासावर (क्र. ३३६) आणि हत्तींच्या मदावरही (क्र. ७८६) तो लुब्ध असतो. मंजरी, कमल व मालती या त्याच्या विशेष लाडक्या दिसतात. मधुकर हा लंपट खरा. पण त्याची लंपटता सामान्य नाहीं; कलिकास्वादाविषयी तो विशेष उत्सुक (क्र. ९७, ४४२, ४४४, ५९०, ६१३, ७४९, ७५५) आहे! यासाठी तो कलिकेचें संगोपनही (क्र ७५५) करतो. कलिकेशीं पहिल्या समागमाचे वेळीं कधीं तो प्रशंसनीय कौशल्य (क्र. ४४२) दाखवितो आणि कधीं निर्दय भासतो (६१३)! कोण सुखावलें व कोण दुखावलें, हें सारें कामोत्सुकाच्या तपोमानावरच अवलंबून नसतें काय? कारणपरत्वें भ्रमराला विधातें दंगही करतां येतो क्र ५३१ मधील भ्रमर माकडाला चावला आहे आणि क्र. ८८० मधील भ्रमर कमलाचा वास घेणाऱ्या सुंदरीच्या ओठाला! प्रेम विलासात मग्न असतांना कोणी व्यत्यय आणला तर प्रेमी मत्सर होणारच, आणि अशा परिस्थितीत स्वत्वभान कोण व कसें सांभाळणार? जो प्रेम करतो तो कष्टाद्युःखांतून जाण्याला सिद्ध (क्र. ९७९) असतोच. इतकेंच नव्हे, प्रेमभग झाला असता आत्मार्पणालाही (क्र ७४८). कोणी बलात्काराने यांचें (मंजिरीचें) अपहरण केलें तर तें भ्रमराला सहन होत नाही. मग तो एखा पामर (क्र. ३३१) असो किंवा पोपट (टेलपटाउ) असो, त्याचा पाठलाग करून भ्रमर त्याला हैराण करील' असे गाथासप्तशतीतील भ्रमराचे गुणदोष आहेत.

मधमाशी (मधुमक्षिका ६३४) : मधमाशी मध गोळा करते, कोणी यत्किंचितही उपद्रव दिला तर त्याला पटकन चावते जाणते सांगतात की ज्या चावत नाहीत त्या मधही गोळा करीत नाहीत त्याना मधाची चवच नसते की काय कोण जाणे ! क्र ८८० मधील भ्रमर सुंदरीच्या ओठाला चावलेला आहे आणि क्र ६३४ मधील मधमाशी तरुण भिल्लाच्या ओठाला त्याचा तिच्या दंशामुळें ओठ सुजला आणि हें पाहून त्याची मत्सरग्रस्त प्रेयसी रुसून फुगली ! भ्रमर व मधुमक्षिका यांना असा पतिव्रताचा करण्याची प्रेरणा निसर्गानेच दिलेला आहे की काय ? मात्र तशी प्रेरणा आहे असें गृहीत धरून स्त्रियांनी मधमाशांच्या आगचटीस जाण्याचें साहस करू नये !

मोर (मोर, मयूर) ३९४, ५५९, ६३६, सिहि (शिखिन् = शिरावर तुरा असलेला) ५२, १७३, साहेबाला पाखराची पारख इतकी की तें कोंबड्याला कॉक् म्हणतात आणि मोराला पीकॉक् ! सुदृदर्शनी ह अनभिज्ञतेचें लक्षण वाटत पण हा निष्कर्ष बरोबर नाहीं सिंध, सरहद्द व आसाम याशिवाय हिंदुस्थानच्या सर्व प्रदेशात मोर आढळतात. त्याची वस्ती सामान्यत खुरटीं झाड व पुष्कळ नद्यानाले असलेल्या जंगलात असते त्यांच्या थव्यात एका मोराला चार लांडोरी असतात, एका कोंबड्याला मात्र दहा माद्या लागतात, एवढें या जातींत बहुपत्नीकत्व आहे ! मोराला सुंदर तुरा व पिसारा असतो बिचारी लांडोरी मात्र भुंडी असत कोंबडा व कोंबडी यात असाच फरक असतो, एवढ या जातींत साम्य आहे मोर आपल्या पिसाऱ्याचा उपयोग प्रियाराधनासाठीं करतो मनुष्य जातींत मात्र सारेंच उलटें ! मोर हा सर्पांचा शत्रु आणि मोर हें कार्तिकेयाचें वाहन आभाळात ढग जमले व पाऊस सुरू झाला की मोराला अतिशय हर्ष होतो व तो नाचू लागतो समर्थ व्याध मोराची शिकार करीत नाहीं लपटतेमुळें दुबळ्या झालेल्या व्याधाला मात्र हीच शिकार मिळते आणि त्याची अल्लड नववधू मोरपिसाचे अलंकार धारण करण्यातच फुशारकी (क्र १७३) मिरवते क्र ६३६ मधील मोर नदीकाठच्या रम्य वातावरणामुळें आनंदित होऊन नाचत आहेत आणि क्र ५५९ मधील मोर मेघगर्जनेमुळें क्र ३९४ मधील मोर मान उंच करून गवतावर लटकलेले पावसाचे थेंब टिपून घेत आहे ! मोरपिसाचा झुपका जादूटोण्यासाठीं वापरतात (श्री वाल्फर मायक्रो-

,

ेडिया III 167) क्र ५७२ मधील 'मोहनपिच्छिरा' या उल्लेखावरून गाथासप्तशतीच्या काळातही ही समजूत प्रचलित होती असें स्पष्ट दिसतें या गाथेच्या नायिकेच्या कुरळ्या व भुरळ्या केसात रंगीबेरंगी फुलें माळलेला असावीत, म्हणूनच त्याना मोरपिसाऱ्या गजऱ्याची शोभा प्राप्त झाली '

सउण, सउणि=शकुन, शकुनि (२२०,२८५,८०४) शकुन म्हणजे सामान्य पक्षी, किंवा गिधाड, घार यासारखा मासभक्षक पक्षी क्र २२० व ८०४ मधील पाखरें पजरस्थ आहेत यावरून तीं सारिका जातींतील असावीत असें वाटतें क्र २२० या गाथेंत छिद्रातून डोकावणाऱ्या पाखराची दीनवाणी अवस्था वर्णिलेली आहे आणि क्र ८०४ मधील पाखरू तर चाडालाच्या हाता पडलेलें आहे वस्तुत तेच त्याचे लालनपालन जास्त जिव्हाळ्यान करतात क्र. २८५ मधील सउण हा मासभक्षक असावा जें प्राप्त होईल तें ज्याना चालतें व नेहमीं मिळतें त्याना चिंता कशाची ?

सारिका सारिआ (५५२,५८९) सारिका म्हणजे मैना, साळुकी यांच्या अनेक जाती आहेत पैकी पहाडी मैना ही सह्याद्रीचा घाटमाथा, छोटा नागपूर व हिमालयाच्या पायथ्यालगतच्या टेकड्यांच्या भागात विशेषेंकरून आढळते त्या मैनेचें वर्णन करताना श्री सलीम अली (पूर्वोक्त. पृ ११६) सागतात "This Myna is much prized as a cage bird It is a mimic of exceptional merit, becomes very tame, and soon learns to reproduce the human voice & speech with astonishing clarity" क्र ५५२ व ५८९ या गाथातील सारिकाच्या या गुणामुळेंच नायिकेवर लज्जेचा प्रसग ओढवलेला आहे क्र ५५२ मधील सारिका जें ऐकलें तें बोलते क्र ५८९ मधील सारिका विलक्षण आहे, ही तर जें पाहिलें तेंही सागते ! सारिकेचे हे गुण माहीत असूनही त्याना रतिगृहांत ठेवाव्याच कशाला? वात्स्यायन (कामसूत्रम् अधिकरण १ अध्याय ४ सूत्र १२) सागता 'तस्य (रतिगृहस्य) बहि क्रीडाशकुनिपञ्जराणि ।' शकुनिपञ्जर वासगृहाच्या बाहेर टागावेत असें त्यानें सागितलें आहे न स्वच्छतेच्या दृष्टीनें या गाथाच्या नायिकावर आलेल्या प्रसगाची वात्स्यायनालाही कल्पना आलेली दिसत नाहीं !

हस हसी राजहस -राजहसी (मराल ७१४, रायहस ६२४, रायहसी ६७०, हस ११०, ४३१, ६६८, ६७६, ७३०, ९४६, ९४७, हसी ९४०)

मराठ, हस व राजहस या पक्ष्यांविषयीं प्राकृत व सस्कृत साहित्यिकाच्या कल्पना अतिरंजित आहेत हे हस सज्जनाप्रमाण अल्पसंख्य (क्र ७०५) असून सौजन्याप्रमाणें वर्णानें शुभ्र असतात, ते कमलाचे तंतु भक्षण करतात (क्र ९४६), आकाशात जसा चद्र (क्र ७१४) तसे हे ग्रामतडागात (क्र ११०) व सरोवरात (क्र ९४०) तरंगतात आणि त्याना नीरक्षीरविवेक (क्र ६७६) असतो हीं वर्णनें केवळ काल्पनिक व सांकेतिक आहेत हस व राजहस (Swan, Royal Swan,) हे पक्षी हिंदुस्थानात आढळत नाहीत श्री. बाल्फर (पूर्वोक्त III 787) सागतात कीं हसाच्या अनेक जातींपैकीं Cygnus musicus, Hooper Swan या एकाच जातींतले हस क्वचित् दक्षिण आशियापर्यंत येतात, फक्त नेपाळात व तेथेंही एकदाच तो पहाण्यात आलेला आहे श्री आपटे यानीं आपल्या सस्कृत इग्रजी कोशात हस या शब्दाला Swan, Goose, Duck, Flamingo हे इग्रजी प्रतिशब्द दिले आहेत, आणि राजहस याला Falmingo, White Goose with red legs and bill, आणि इग्रजी सस्कृत कोशात Duck व Goose याना कलहस, कादब, चक्रवाक, हस वगैरे प्रतिशब्द दिले आहेत मृच्छकटिकाच्या काळातही (५ ६) हस अदृश्य झालेले होते फ्लेमिंगो हे पक्षी हिंदुस्थानात सर्वत्र, विशेषत खारट पाण्याच्या तळ्याच्या आसपास आढळतात, विशेषत राजस्थानात, साभर सरोवराच्या आसपास आणि कच्छच्या रणात या रणांतच ते अडा घालतात अर्थात् क्र ४७१ या गाथेंत वर्णिल्याप्रमाण ते पावसाळ्याचे सुरवातीस मेघगर्जनेनें विव्हल होऊन उत्तरेस मानससरोवराकडे धाव घेत नाहींत Bar headed Goose हा पक्षी हिंवाळ्यात हिंदुस्थानात येतो आणि मार्चच्या सुमारास उत्तरेकडे लडाक व तिबेटकडे परतूं लागतो आपल्याकडले बळीवाचे ढग गडगडू लागले की त्याचें स्थलांतर (क्र ४७१) सुरू होतें. हे तिकडेच अडा घालतात त्याचे थवे त्रिकोण व्यूहात किंवा सरळ रेषेंत उडतात

(३) क्षुद्र प्राणी व सर्प

कोळी (मक्कड [देशीनाममाला ६ ११९ ] २३८) स्वत निर्माण केलेल्या धाग्याला लटकणारा सूक्ष्म कोळी बकुळीच्या फुलासारखा दिसतो चिलट

(मसअ = मशक ५,०), झिल्ली (४१४) रातकिडा, रानकिडा, झिंगुर (धान्य-घुण्ज), निंबकीट णिम्बईड (८७०) हा किडा कडु लिंबावरला आहे त्याने दुसरा रस कधीं चाखलेलाच नसतो, म्हणून जो उपलब्ध व ज्याची सवय त्यातच त्याला स्वारस्य वाटतें विंचू विन्छुअ [हेम ११२८] (२३७) सर्व उष्ण प्रदेशात विंचू असतात विंचू चावला असता दंशाला झटके देणें ही प्रतिक्रिया अत्यंत नैसर्गिक आहे सर्प (अहि ५७ ,णाअ नाग=९७०, फणमणि ९७०, फणा २४०, भुअग भुजग=५५१, ४०, ८०३, ९२०, हलाहल ६२) सारेच सर्प विषारी नसतात क्र ५११ मधील भुअग हा निर्विष असावा. येथें नमूद केले त्यापैकीं अहि, नाग व हलाहल हे निःसंशय विषारी आहेत ज्याना फणा असते ते सारे विषारी असतात हलाहल हा सर्प आकारानें क्षुद्र पण विषारानं भयंकर असतो नागाच्या शेपटीला फणा फुटणें ही कल्पना फारच भयप्रद आहे पूर्वजांनी भूमींत पुरून ठेवलेल्या संपत्तीचे सर्प संरक्षण करतात ही समजूत सर्वत्र आढळते कारण अशा आख्यायिका जुनाट व ओसाड वाड्याबाबत असतात आणि सर्पांचें वास्तव्यही अशाच ठिकाणीं असते चंदनाच्या वृक्षा भोवती नागाचा विळखा असतोच आणि नागाच्या फणात मणी असतो, या समजुती सार्वत्रिक असल्या तरी तेवढ्या विश्वसनीय नाहींत छेल्यटाऊ, परदारागमक किंवा विषयी पुरुषालाही भुजग अशी संज्ञा आहे सादूरी (शार्दूरी= बेडकी ३११) पावसाळ्यात साचलेल्या पाण्यांमध्ये बेडूक दिसतातच या गाथेतील बेडकीचे आसन यथार्थ आहे हरिआल = (१) सुग्या न पारा प्राणी झाडाच्या व वाघाशी असलेल्या गुल्पाच्या जाळींत याच वास्तव्य असतें.

निष्कर्ष उत्तरेकडील पर्वतश्रेणींना हिंदुस्थानचा प्रदेश आशियापासून अलग केला आहे पशुपक्ष्यांच्या हालचालींना अडचण होईल असे नैसर्गिक अडथळे असले तरी सर्वस्वी प्रतिबंधक होईल अशी परिस्थिति नाही काश्मीरचे पठार पठार हिमालयाच्या पायथ्यालगतची दमट दलदल व राजस्थान । कोरडे वाळवंट इत्यादि अपवादात्मक प्रदेशाव्यतिरिक्त हिंदुस्थानांतील सर्व प्रदेशांना साधारणत सर्व पशुपक्षी सामान्य आहेत, फरक आहे तो त्यांच्या पोटजातींत व संख्येत

काश्मीरच्या खोऱ्यातील हिम पर्वताच्या पायथ्याशी सिंधु नद्यांच्या पात्रातील मुरम वगैरे उत्खननावरून गाथाप्रसारांपैकी महाराष्ट्रापर्यंत आणि देशात

आलेले आहेत. पशुपक्ष्यांच्या उल्लेखाच्या पुराव्यावरून असा आक्षेप अद्याप घेण्यात आलेला नाही, पण असा वाद कोणी उपस्थित केलाच तर त्याचे परस्पर निरसन होईल अशी माहिती या प्रकरणात संकलित केलेली आहे.

गाथासप्तशतींत नमूद झालेली परिस्थिति कमींत कमी पंधराशें व जास्तींत जास्त दोन हजार वर्षांपूर्वीची आहे. त्या काळात येथें घनदाट अरण्यें होतीं, अर्थात् पशुपक्षांच्या अधिक जाती येथे अस्तित्वात होत्या आणि त्याची संख्या-ही जास्त होती गाथासप्तशतींत अशा कोणत्याही पशुपक्ष्यांचे उल्लेख नाहीत की ज्यावरून तिच्या महाराष्ट्रीयत्वाला बाध येईल. आश्चर्य वाटतें ते फक्त अश्वाच्या अनुल्लेखाबद्दल.

गाथासप्तशतीच्या निर्मितीचें श्रेय कोणी काश्मीरला देतात, पण महाराष्ट्रा-प्रमाणें तेथली तळीं कधींही कोरडीं पडत नाहींत आणि तेथें हत्ती अजियात नाहींत हे श्रेय राजस्तानचें, असा दावा अलीकडेच कांहीं संशोधकांनीं मांडलेला आहे, तेथेंही हत्ती नाहीत महाराष्ट्रातील माळरानात व जंगलात आता सिंह व हत्ती नाहींत, हें खरें, पण त्या वेळीं ते येथेंही होते व असले पाहिजेत असा निष्कर्ष काढण्यास भरपूर पुरावा आहे गाथासप्तशतीच्या संपादकाचा जन्म ज्या कुलांत झाला त्याच्या नाण्यांवर क्वचित् सिंह व आरंभापासून अखेर पर्यंत हत्ती याच पशूंच्या प्रतिमा आहेत

## ११ गाथासप्तशतींतील ग्रामीण व नागरी जीवन .

ग्राम ( ८, ४३, ६७, ७७, ९४, १०९, ११०, १२९, १३८, १६४, १६८, २२९, २४१, २९४, २९५, ३१६, ४०२, ५०१, ५१७, ५३५, ५४५, ५५३, ५५६. ६००, ६३५, ६३६, ६४८, ७०२, ७०९, ७४५, ७५०, ७७१, ८०३, ८२०, ८७०. ८७१, ८७३ ८७८, ८८१, ९५१, पल्ली : ३१, नगर ७७, १६३, १९४, ७०२, ७३५ )

खेडें ( Village ), ग्राम ( Town ) व शहर ( City ) हें आधुनिक वर्गीकरण मुख्यत्वेंकरून लोकसंख्या व व्यवसाय यांच्या अनुरोधानें करण्यात येतें. पल्ली, ग्राम व नगर या संज्ञा गाथासप्तशतींत आढळत असल्या तरी उल्लेखांच्या संदर्भावरून या वर्गांत मूलभूत भिन्नता आहे असें दिसत

नाही त्याच्या लोकसंख्येबद्दल अनुमान करण्याजोगाही पुरावा नाही आर्थिक, नैसर्गिक व सांस्कृतिक परिस्थितींच्या आणि आधुनिक प्रमाणांच्या आधाराने जीं लक्षणें नगरांचीं म्हणून निश्चित करावीं तीं क्वचित् ग्रामाच्याही बाबतीत योजलेली दिसतात काहीं अपवाद सोडले तर मध्ययुगीन राजधान्या व गेल्या शतकातील आर्थिक क्रान्तीच्या पूर्वी सामान्यत सर्वत्र अशीच परिस्थिति होती

गाथासप्तशतींतील व्याधादि वन्य जमाती जंगलात (क्र १२१) अगर स्थानिक रस्त्यालगत स्वतंत्र झोपड्यात (क्र. ११९) रहात शेतीवर अवलंबून असणारे जमीन-मालक व जमीन मजूर खेड्यापाड्यातून रहात आणि हगामाच्या दिवसात खोपट्यात (क्र ७६४) किंवा मळ्यावर (क्र ६८९) रहात आर्य (क्र ९२७) व वैश्य (क्र ६०३), विट (क्र ९३९) व वेश्या (क्र. ९६८), कलाल (क्र २२७) व कलावन्त (क्र ७३२) आणि पण्डित (क्र २) व श्रीमंत (क्र ७३३) इत्यादि उच्चवर्णीय व परोपजीवी लोक सामान्यत शहरात रहात

गाथासप्तशतींतील ग्रामाच्या विस्ताराबद्दल अनुमान करण्याजोगा थोडा बहुत पुरावा मिळतो क्र ३१ मधील पल्ली हें छोटें व वदिस्त म्हणजे डोंगरगाव असावें क्र ७०४ मध्यें उल्लेखिलेलें ग्राम बरेंच मोठें असावें कारण येथील रस्त्यावरून विमनस्कपणें चाललेला ग्रामस्थ आपलं घर चुकला आहे. क्र ६३५ व ६३६ मधील ग्रामें हीं रम्य गिरिग्रामें आहेत त्या शेजारून निर्झर खळखळ वहात आहेत, गर्द राईतले कदम्ब फुलांनी टवटवले आहेत, गाव जणू वाटूच्या दाट बेटात लपलें आहे आणि त्यातील छोटीं गवती घरें गर्द पानांच्या कुंपणाआड क्र ८७० मधील ग्राम हही डोंगरगावच असावं कारण येथें गावानजीक वळणदार नदी आहे आणि वळणावळणावर वाटूचीं बेटें आहेत हें वर्णन मराठीतल्या कोकणातच लागू पडतें क्र ६३५ या गाथेंत सांगितल्याप्रमाणें आणि तेथ सांगितलेल्या कारणासाठीच नव्हे डोंगरगावचे रहिवासी खरोखरीच धन्य आहेत

वेदकालीन ग्रामाप्रमाणें गाथासप्तशतीच्या काळातही गावेंही वदिस्त असावीत क्र ७०५ या गाथेत ग्रामसीमेवरील तृणपल्याचा उल्लेख आहे रात्री अपरात्री गावांमधून पाडळणाऱ्या अनोळखी चोराचिल्टांसाठी हें

चुजगावण असावें निदान धामधुमीच्या काळात ग्रामसीमावर पहारेकरी असावेत असे यावरून अनुमान होते ग्रामसीमपर्यंत शेतें (क्र १६८, ४०२) असत ग्रामसीमेलगत ग्रामांगण (क्र ५५६) असे आणि तेथेंही पहारेकरी (क्र ५५५) असत ग्रामांगणालगत ग्रामतडाग (क्र ८, ११०, ३९१) ४१४, ४९१, ७१४, ९४७) व पाणवठे (क्र ८७४), देवकुल (क्र १०९) व वटवृक्ष (क्र २९४, २९०, ५०६) आणि वटवृक्षाखालीं विहिरी (क्र २९४) असत

ग्रामांगण ही ग्रामोत्सवाची जागा आणि मल्लयुद्धाची (क्र ६८५) प्रसंगविशेषीं शत्रूला तोंड देण्यासाठीं गावकऱ्यांनी एकत्र होण्याची गावातलें सार्वजनिक स्थानें जवळपासच असले पाहिजेत ग्रामसीमेवरील महावटाभोंवतीं पार बांधलेले असावेत असे क्र ९४ मधील उल्लेखावरून दिसतें देवकुल हें सुसंस्कृत आर्यांचें आणि वटवृक्ष हें प्राकृत जनांचें पूजास्थान अर्थात वडाच्या पारावर टवाळ कुणाळाची वर्दळ असावयाचीच परक्या प्रवाशाचा मुक्कामही वडाखालीं (क्र २६३) पडत असे ग्रामतडागांत बहुधा कमळें असत क्र ८ मधील तळें हें ग्रामाचें मंडन आहे तळ्यावर व पाणवठ्यावर आणि असेल तेथें नदीवर, सकाळ संध्याकाळ स्त्रीपुरुषांचा वर्दळ असावयाचीच क्र २९४ या गाथेतील वडाखालच्या विहिरीवर पाण्यासाठीं राग लागलेली आहे, आणि आपण अशी कल्पना करून बसलों आहोंत की राग लावण्याची प्रथा साहेबान दुस या महायुद्धात सुरू केलेली आहे! तळीं आटण्याच्या (क्र ४१४, ६०६) आणि गांवात एखादीच विहार असण्याच्या उल्लेखावरून वाटतें कीं हा खेडीं घाटमाथ्यालगचीं असावींत त्या काळात मद्यपानावर राजकीय निर्बंध नव्हते तरीही क्र ३२७ या गाथेंतील दारूचा पिठा गावा बाहेर, चांडालाच्या वस्तींत मांडलेला आहे पानकुंभप्रमाणेंच स्मशानही (क्र ४०८ ५३६) ग्रामांगणाच्या आसपास अगर नदीतीरीं असावींत *

खऱ्यातल रस्ते अरुंद (क्र २४१) खडकाळ (क्र ३१) व नागमोडा (क्र ८०३) आहेत गावांतलें सांडपाणी रस्त्यावरूनच वहात असावें आणि त्याना निचऱ्याची व्यवस्था नसावी यामुळे हे रस्ते चिखला (क्र ६२३ ७६० ७ १) आहेत पावसाळ्यात जिकडे तिकडे पाणीच पाणी होते तेव्हा मार्गांचा

साठीं आणि अग्निशालेसाठीं स्वतंत्र खोल्या असे गाथासप्तशतींतील घरें पाहून विस्तृत आहेत, पण त्याची उभारणी जवळ जवळ अशीच आहे

सुस्थितींतल्या लोकांच्या घरांत निरनिराळ्या उपयोगासाठीं स्वतंत्र खोल्या आहेत. घरांच्या भिंती (कुड्ड क ३५, १७०, २०६ ४०८, ७३२, ७४१, भित्ती क २१७) कुडाच्या (कुड्डक = लतागृह [देशी २ ३७]) आहेत क १३५ मधील भिंतांत कोनाडा आहे यावरून तो विटांची असावा असे वाटतें इट्ट = घराभोवतालचा वेतागवताचा तट्टा, यावरून वीट हा शब्द सिद्ध झाला असावा या भिंती सारवून आतून बाहेरून गिलावा केलेल्या असत क ३५ मधील भिंतीवर कुलवधूनें लक्ष्मणाचें चरित्र लिहिलें किंवा रंगविलें आहे क १७०, २०, व ४०८ मधील भिंतींवर विरहिणींना पतीच्या प्रवासाचे दिवस मोजण्यासाठा चिन्हें काढलेली आहेत क २१७ व ७३२ मधील भिंतींवर चित्र काढलेलीं किंवा काढावयाचीं आहेत क ७४१ मधील भिंतीला स्वागतोत्सवार्थ सफेती दिलेली आहे भिंतींत दारें (क १४०, २६२, ७९४, ९५४) आहेत या दरवाजाना अडसर (क ३२२) व कड्या (क ९५९) आहेत उन्हाच्या झळा घरांत येऊ नयेत म्हणून दारें दाबून (क ७९४) घेण्यात येत असत हीं दारें बुटकीं व अरुंद असावींत क ९५४ मधील पाण्याचा घडा दारावर आपटून फुटलेला आहे या दाराना (क ५२५) उंबरा (देहली [देशी १ ९५] = द्वार के नीचे की लकडी पा स म) असे उंबराचें लाकूड अतिशय चिवट असत त्याच्या तक्त्यावर कुऱ्हाडीचे घाव घातले तरी ते एकाएकीं फुटत नाहीत (वनौषधि गुणादर्श भाग १ पृ ६७), म्हणून उंबराचा तक्ता वापरण्यात येत असल्यामुळें उंबरा हा शब्द सिद्ध झाला असावा क २-२ या गाथेंतील द्वारावर तोरण आहे तोरण म्हणजे, "द्वार का अवयव विशेष, बहिर्द्वार फूल या पत्तों की माला जो उत्सव में लटकाई जाती है" (पा स म) याच गाथेंत वदनमालिकेचाही उल्लेख आहे हीं आपण वदनमालिकेलाच तोरण म्हणतों येथें हा अर्थ घेता येणार नाही तोरण हें भारतीय शिल्प पद्धतीचें एक वैशिष्ट्य आहे तोरणाचे उत्कृष्ट नमुने सांची येथील स्तूपाच्या भोंवतालच्या वेदिकेत चारी दिशांना अभिमुख असे आहेत अशा तोरणा-वरूनच द्वारप्रकोष्ठाची (porch) प्रथा सुरू झाली लेण्यांच्या व घराच्या

किंवा घरासमोरच्या अंगणाच्या दरवाजावर तोरणासारखी उभारणी असलेला भाग असून त्यामध्ये गवाक्षें व त्यालगत आतील अंगास गच्ची असे रस्त्यावरील रहदारीची मौज पहाण्यासाठीं घरातले स्त्रीपुरुष येथें वसत असत प्रसंगविशेषीं त्याचा नगारखान्यासाठींही उपयोग होत असे उत्सवप्रसंगीं तीं माळानीं अलंकृत करण्यात येत असत मराठी खेड्यात या व जुनी वस्ती असलेल्या गावातल्या वाड्यामध्यें ही व्यवस्था दिसून येते या गाथेंतील तोरणाचा असाच अर्थ घेतला पाहिजे काहीं गाथात घराच्या वेगवेगळ्या भागाचे उल्लेख आलेले आहेत ओलिन्दक ( अलिन्दर = ओसरी, देवडी क २५४ ) येथें परक्या पाहुण्याचा (क २५४, ६६७) मुक्काम असे घरधन्याच्या बैठकीची जागा घराच्या आघाडाला, देवडीनजीक, चौकानजीक असे आणि अन्तेउर (क ९७४) = अन्त पुर घराच्या अतर्भागात असे क ५५२ या गाथेंतील रतिगृहात मैनेचा पिंजरा टागलेला आहे अग्निप्रज्वलनाचे वेळीं खोलात धूर कोंडल्यामुळें झाले या अधाराचा उल्लेख क ७२८ व ७२९ या गाथात आलेला आहे या वरून या खोलीला खिडकी किंवा धुराडें नसावें असें दिसतें ओवाल्अ=ओवडा ओवाडा या गृहप्रकाराचा उल्लेख क ७५४ या गाथेंत आलेला आहे ओवडा म्हणजे गावाबाहेर शेतात धन्याची राहण्याची जागा गाथासप्तशतींत गोठ्याचे अनेक उल्लेख आलेले आहेत. (गिट्ठि क. ६३८, गोट्ठ क ४४७, ६०९) हे गोठे घरालगत पण स्वतन्त्र असावेत खेड्यातल्या क्षुद्र शेतकऱ्याच्या घरातले गोठे ओसरी लगत गुडघ्याएवढ्या खालच्या पातळीवर असतात शेतकरी थोडा बहुत सुधारला म्हणजे त्याच्या घराच्या मांडणींत स्वतन्त्र गोठा हा पहिला महत्त्वाचा फरक होतो अर्थात् गाथासप्तशतींतील गोठे हे पामरगृहातले नाहींत रेड्यानें शिंग हलविल्यामुळें चाळलेल्या चिखलाचा क्षवार क ५६० या गाथेंत वर्णिलेला आहे क ४४७ मधील गोट्ठ याचा अर्थ ' गाई चरण्याचा जागा ' (एतरेय ब्राह्मण ३ १८ १४) किंवा 'सामाजिक मिश्र समेलन (आचारांग सूत्र २ १ ३ २४५) असाही होऊ शकेल गाथासप्तशतींतील घरावरील छपरें (धांच्छअ- ओच्छोअअ क ६२१, पडल क, ६३, ३१५, ५४०) गवताच्या पेंढ्यानीं ( क १०९ पलाउ = पेंढा, क ३३० सिप्पिर = तृणविशेष ) किंवा पत्रानीं शाकारलेलीं असत. सिप्पिर यावरूनच छप्पर हा शब्द सिद्ध झालेला असावा

पाइअसद्दमहण्णवात पडल ( देशी ६ ७ ) या शब्दाचा अर्थ ' मिट्टी का बना हुआ एक प्रकार का खपडा जिससे मकान छाये जाते हैं' असा दिलेला आहे, अर्थात् पडल म्हणजे कउल पडळ = शेतातली कौलारू झोंपडी, हा शब्द यावरूनच सिद्ध झाला असला पाहिजे देशीनाममालेच्या शब्दार्थकोशात मात्र पडल याचा अर्थ edge of thatch असा दिलेला आहे गाथासप्तशतीच्या काळात घरें कवलानीं शाकारलीं जात हें निश्चित हीं कवलं चपटा व लांबट असून त्याच्या पृष्ठभागावर दोन भोंकें व खालच्या अंगास कडा असत आड्याच्या लाकडात तीं मेखा मारून बसविलेली असत कन्हाड वगैरे ठिकाणीं झालेल्या उत्खननात अशीं कवलें मिळालेलीं आहेत मंगलोरी कवलाचें हें मूळ स्वरूप आहे क्र १७०, ५४० व ६२१ मधील छपरें पावसाळ्यात गळत आहेत क्र १७० मधील छप्पर झंझावातानें उडालेलं आहे क्र ६०१ मध्यें कवलें ढळल्यामुळें गळत्या लागल्या आहेत या घराची ही अवस्था घर धन्याच्या गैरहजेरींत झालेली असल्यामुळें शाकारणीसारखी काम घरच्या पुरुषमाणसानीं करावयाचीं असत असें दिसतें ग्रामातील घरापेक्षा नगरातील घरें प्रशस्त ( क्र ७७ ) आहेत श्रीमंताचीं घरें हमरस्त्यावर चौकात (क्र ३६) आहेत व्यापाऱ्याचीं घर चित्रानीं अलंकृत ( क्र ७३२ ) केलेलीं असत ग्रामाप्रमाणेंच नगरातही भरवस्तींतलीं घरें एकमेकांना खेटून आहेत यामुळें ग्रामदाहाप्रमाणें च ( क्र १६३, २२९, ५३५, ७०९ ) नगरदाहाचेही प्रसंग ओढवत असत ग्रामदाह किंवा परचक्र अशा प्रसंगीं गावकरी परस्पराशी सहकार्य करीत आणि पुरुषाच्या बरोबरीनें स्त्रिया काम ( क्र. २२९ ) करीत गाथासप्तशतींतल्या घरात सामानसुमान मात्र फारसें दिसत नाहीं.

बैठकीसाठीं आसन्दिका ( क्र ६९७ ) आणि चितळ हरणाचें ( क्र ६०९ ) या वाघाचें कातडें ( क्र ९४५ ) वापरीत राजाचें यज्ञसमयींचें आसन या अर्थानें आसन्दिका हा शब्द शतपथ ( ३ ३ ४ १०५ ) ब्राह्मणात वापरलेला आहे अथर्वातल्या आसन्दिकेची उची एक वीत आणि लांबी रुंदी एक एक हात असे, तिची बैठक मुंज गवताची विणलेली असे. यज्ञासारख्या प्रसंगी बैठकीवर व्याघ्रासन पसरीत वेत्रासनालाही आसन्दिका हेंच नांव होतें जातकांतील आसन्दिका झोंपण्यासाठीं ( जातक १ २०८ ) व बैठकीसाठीं ( विनय १

१९०, २ १४० ) वापरलेली आहे श्रीमताच्या घरीं झोपण्यासाठीं नक्षीदार पलंग ( पल्यङ्क—पर्यंक विनय . २ १६३ सयुक्त १ ९० ) असत क ९०४ मधील शय्या मनकावर आहे गाथासप्तशतींतील स्त्रीपुरुष गाथावर ( सअण क १३३, ६६७, ९०० ) झोपतात क ९०४ मधील शय्या पतीच्या हाल चालीमुळें उचसपल झालेली आहे यावरून या गादीला मध्यें फारसे टाके नसावेत असें वाटत श्रीमताच्या घरीं अनोळखी पाहुण्याना अगणात गवताच्या शय्येवर झोपावें ( क ३७७ ) लागे क ६६६ मधील विछान्याभोंवती गन्धहरण मच्छरदाणी आहे चुल्लवग्गात ( S B E Vol XX p 102 ) मच्छरदाणीचा उल्लेख आलेला असल्याचें श्री गोडे यानीं ( Mosquito Net in Egypt & Mosquito Curtain in India Bharatiya-Vidya Dec 1947 ) दाखवून दिलेलें आहे धान्य भरडण्यासाठीं घिरीट ( क ७९४ ) कांडण्यासाठीं मुसळ ( क ५०१ ) व पाखडण्यासाठीं सुपें (क ५५७) घरोघर आहेत पाणी आणण्यासाठीं व साठवण्यासाठीं मातीचे घडे (कुड क २२९, २६०, ८७४ कुम्भ क ६५४, ८५१ घट क ९५४ ) आहेत याचा आकार चाळू घग्गावरसा वाडोळा ( क २६० ) किंवा राजणागारसा उभट ( क ६५४ ) असावा पाणी आणताना घडा खांद्यावर ( क ९५४ ) ठेवीत गाथासप्तशतीतले कलश ( क १४०, १४३, २५६, २८०, ५०७, ५७१, ५७६, ८०७ ) हे मात्र धातूचे असावेत क ५०७, ५७१, ५७६, ८०७ मधील कलश हे निधान कलश असून क १४० व १४३ हे शकुनासाठीं दारात ठेवलेले मंगलकलश आहेत क ८७ मधील कलश सुवर्णाचा असून त्यात रत्नें आहेत व त्याच्या तोंडावर बाळी मोहोर केलेला आहे क ८३१ मध्यें मगरपासणानूर तीर्थग्रहण केल्याचा उल्लेख आहे मराठीत व गुजरातीत पातल हा शब्द आजही भांडें या अर्थात प्रचारात आहे गातवाहनकालीन लोक पूजेसाठीं मौल्यवान उपकरणें वापरीत क ४ या गाथेत मरकतभाजन व धारातुकि ( क ३०० ) यांचा उल्लेख आहे मरकतभाजन हे पाचू जडवलेलें तबक असावें धारातुकि म्हणजे धारेची वाटी क ३०० मधील धारातुकीत सिंदूर ठेवलेला आहे कर्पूरमंजरी बौद्ध दीपात डॉ मनमोहन घोष (कलकत्ता युनिव्हर्सिटी प्रत पृ १४२) सांगतात

Sippi is a boat shaped vessel used in Puja for offering water क ४ मधील शक्तिसिप्पीचा आकार अर्घ्यासारखा असावा मद्य ठेवण्यासाठीं स्फटिकपात्र (क ९२७) व पिण्यासाठीं चषक (क ७१०, ९११, ९२७) या पात्राचा उपयोग झालेला आहे वेदकालात मद्यपानासाठी कारोतर नावाचें कातडी भाडें वापरीत लोखंडी पत्र्यावर घण मारून पेल्यासारखा आकार दिलेलें भाडें पुढें वापरात ( ज्ञानकोश प्रस्ता पृ ४६६ ) आलें गाथासप्तशतींतील चषक काचेचे असणें सभवनीय आहे भिक्षा वाढण्यासाठी चट्टुक (क १६२) व घेण्यासाठीं करक या पात्राचा उल्लेख आलेला आहे चट्टुक (देशी चट्टू ३ १, दारुहस्त Wooden Spoon ) हें भाडें लाकडी असून त्याचा आकार थाळीसारखा किंवा पळीसारखा असावा पाइअसद्दमहण्णवात करक या शब्दाचे अर्थ 'हड्डी, पानदान, छोटी पेटी' असे दिलेले आहेत आणि देशीनाममालेंत (२ ११) याचा अर्थ भिक्षापात्र=begging bowl असा दिलेला आहे हें ही लांकडाचें असावें असें याच शब्दाच्या ' अशोक ' या अर्थावरून दिसतें

गाथासप्तशतींतील घरात प्रकाशासाठी दिवे ( दीअ, दीव, क १३५, २२२, २६४, ३३३, ४१५, ५४७ ७१६, ८३०)लावीत हे दिवे पणतीसारखे भाजलेल्या मातीचे किंवा लामणदिवा अगर समई यासारखे उघड्या ज्योतीचे असावेत, कारण क २२२ मधील दिव्याची ज्योत विरहिणीच्या अश्रूंना व क ८३० मध्यें तिच्या नि श्वासानीं विझलेली आहे या दिव्यासाठीं तेल (तेल्ल क १३१, ५४७) वापरीत तेल – तैल म्हणजे तिळाचें तेल दिव्यासाठीं व अभ्यगस्नानासाठीं तिळाचें तेल घटात ठेवीत, असे उल्लेख अनुक्रमें अथर्व वेदात व शाखायन आरण्यकात आलेले आहेत या दिव्याना वाती ( वत्ति क २६४ ) असत पेटत्या वातींचीं मु वें काळीं ( क ७१६ ) असत, त्याच्या काजळानें कोनाड्याला काळिमा ( क १३५ ) येई आणि प्रकाश वाढविण्या साठीं वात पुढें पुढें सरकविण्यांत ( क २६४ ) येत असे दिवा विझवावयाचा तो हाताच्या झटक्यानें, पण अपवादप्रसगीं उदा चौर्यरतगोपनार्थ ज्योत फुकर (क ३३३) घालूनही विझवण्यात येत असे सुरत रसिकमात्र अनुनयप्रसगीं किंवा सुरतसमयीं दिवा तेवता (क २६४, ५४७) ठेवीत. क ५४७ मधील दिव्याची रसिकता अद्वितीय आहे तरुण सुरत पाहताना तो इतका तन्मीन झालेला आहे

श्रीं तो तेलाचा असूनही तें सफल तरी त्याची ज्योत तेवत आहे। मेघदूतातील रत्नदीपाहून हा अधिक रसिक आहे. संस्कृत व प्राकृत साहित्यांत त्याला तोड नाही।

ग्राम व नगर यामधील राहणींत क्वचित् थोडाबहुत फरक असलेला दृष्टीस येतो. नगरात बाजार भरत आणि त्यासाठी आजूबाजूच्या प्रदेशातले वन्य लोक (क्र. ७८८) तेथें जमत असत. बन्दिशाला (क्र. ५४) व यज्ञशाला (क्र. २२७) यासारखी राजकीय व सांस्कृतिक स्थानें बहुश: नगरातच असत. ग्रामाप्रमाणेंच नगरातही चोराची धास्ती (क्र. ५८) असे. नागरकाना ग्राम-तरुणींबद्दल विशेष आकर्षण (क्र. ७०७) वाटे. नागरकाची लैंगिक वृत्ति विकृत (क्र. ७३१) असावी असें वाटतें. ग्रामातील गैरसोयी व दारिद्र्य आणि तेथील रसील लावण्याचा व शिक्षित शृंगाराचा अभाव यामुळे नागरी राहणीला चटावलेल्या चोखंदळाना ग्रामीण जीवन रुचत नाही. बहुधा अशानींच त्याना कुग्राम (क्र. ५७, १०९, २१६), दग्धग्राम (क्र. ६००) व हतग्राम (क्र. १६४, ८०३) या नावांनी आणि तेथील रहिवाश्याना लबाड (छउल क्र. ८७८), पामर (दरिद्री क्र. १६५), छुत्रे (शुनकप्रचुर क्र. १३८) व हलिकनन्दन (नागरगर्ह्यः क्र. ६००) या विशेषणानीं शापपूर्वक तिरस्कारलें आहे. कारण येथील जेवणात तूपमीठ (क्र. २१६) मिळत नाही आणि झोपण्याला बिछाना (क्र. ८०३) नाही, कारण येथें आजाऱ्याना वैद्य (क्र. ६००), भिकाऱ्याना भिक्षा (क्र. ८८३) आणि व्यभिचारिणींना परपुरुष (क्र. ४, ८, ८८१) मिळत नाही। पण येथें जें मिळतें तें काय कमी आहे? गाथाकवि सांगतात, येथ चित्तवेधक निसर्गसौंदर्य (क्र. ६३६, ८३०) आहे, ज्यांचे पयोधर उत्तुंग आहेत अशा गांवरान तरुणी उपलब्ध (क्र. ८७३) आहेत आणि मोहक असे अनेक संकेतस्थानें (क्र. ६३०) ही आहेत।

## निष्कर्ष :

गाथासप्तशतीच्या निर्मितीच्या काळांत महाराष्ट्रात व अन्यत्र विस्तीर्ण शहरें व संपन्न बंदरें आणि व्यापारी व लष्करी ठाणीं अस्तित्वांत होती. जनतेचें सहकार्य, व्यापाऱ्यांची संपन्नता आणि राजसत्तेचें सामर्थ्य, शिल्पशास्त्रांची

योजकना, कारागिराचें कौशल्य आणि आश्रयाच सातत्य यांचा द्योतक अशीं लेणावळे गटातील लेण्यासारखीं सांस्कृतिक महत्कार्यें पूर्वी झाललीं होतीं व त्या काळात चालू होता , पण गाथासप्तशतींत त्याचा मागमूसही लागत नाहीं कारण ह्या गीतें ग्रामीण आहेत, तीं ग्रामीण कवींनीं ग्रामीणासाठीं रचलेलीं आहेत

गाथासप्तशतींतील ग्रामीण व नागरी जीवनाच्या बाह्यांगाच्या निरीक्षणा वरून दिसतें कीं तत्कालीन बहुसंख्य जनता वन्य व ग्रामीण आहे, कीं ग्रामस्थाचा परिचय नागरसापेक्षा वन्यांशीं अधिक आहे ग्राम व नगर यामधील फरक दर्शविणाऱ्या आधुनिक लक्षणाचा येथें मागमूसही लागत नाहीं नागरी जीवनाचा जमाती व व्यवसाय यांशीं समन्वय होत नाहीं

गाथासप्तशतातील ग्रामाची माडणी व त्याभोंवतालची वनश्री, त्यातील नागमोडी व चिखली रस्ते, येथील घराची मांडणी व आकारणी, त्याभोंवतालचीं अगणें व कुपणें आणि त्यातील वृक्षलता, ग्रामातील पाणवठ्याची माडणी व उन्हाळ्यातील पाण्याची टंचाई या व इतर लक्षणावरून दिसतें का हा ग्रामें आहेत तो भाग डागरी व पावसाळी असला पाहिजे मी महाराष्ट्राचा जो भाग पाहिलेला आहे त्यावरून वाटतें कीं हीं खेडी, ग्रामें व नगरें मावळांतील असावींत

## १२ गाथासप्तशतींतील कौटुम्बिक जीवन :

गाथासप्तशतींतील कुटुम्बातील घटकाचा वंशवेल येणप्रमाण



गृहपतिः

( गहवइ क्र. १०७, १७२, २९७, ६००, ७८७; गेहवइ. क्र. ९५२; घरवइ : क्र. ९५१, घरसामि: क्र १३०, २५८, ६६२, घरिल्ल. क्र.७३१ )

देशीनाममालेंत ( २·१०० ) गहवइ या शब्दाचा अर्थ ग्रामीण villager असा दिलेला आहे. पाइअसद्दमहण्णवात याचा अर्थ गृहस्थ, गृही, संसारी असाही दिलेला आहे. प्राकृतांत वइ या शब्दाचे अर्थ पति ( क्र. ६६ ) आणि वृति = कुंपण ( क्र. ९६ ) असे आढळतात. गहवइ हा शब्द दोन्ही अर्थांनी अन्वर्थक आहे. हा कुटुंबाचा धनी ( क्र. २९० ) व रक्षणकर्ताही ( क्र. ९५२ ). घरधनी हा शब्द ग्रामीण मराठींत नवरा व सासरा या दोन्ही अर्थांनी रूढ आहे. क्र. १३० या गाथेंत घरिणीच्या व क्र. २५४ मध्यें सुनेच्या साहचर्यांत आलेल्या गृहस्वामीचे अर्थ अनुक्रमें नवरा व सासरा असेच घ्यावे लागतात. क्र. ६६२ मधील गृहस्वामी इतका खुळा आहे की घरच्या स्वारिणीनें पोसलेला सुना त्याच्याच अंगावर भुंकतो, आणि क्र. २९७ मधील गृहस्वामी इतका मुग्ध की त्याची व्यभिचारिणी जाया आपल्या प्रियकराशीं त्याची गळाभेट घडविते, क्र १७० मधील गृहपति हातीं घटा घेऊन लायक रेडा शोधीत आहे आणि क्र २५४ मधील गृहपतीनें मनाई केली तरी सुनेच्या इमान्यानें अंगीं धिटाई आलेला परका पाहुणा ओसरीवर दडपून पथारी पसरीत आहे. क्र. ९५२ मधील गृहपतीची घरादारावर व शेतवाडीवर करडी नजर आहे. त्याच्या मालमत्तेवर उघड आक्रमण करावयास कोणी धजावत नाही आणि चोरटें आक्रमण करणाराचाही थरकाप होतो. क्र ७८७ मधील गृहपति असा जबर-दस्त आहे आणि गावांत व आसमंतांत त्याचा इतका दरारा आहे की त्याच्या नुसत्या नामोच्चारानें वाटसरूंचा थरकाप होतो व त्यानें तरवार उपसली की चोराचिलटांची दाणादाण होते गृहपति स्वतः शेतीवाडीवर अंगमेहनत करीत नाही. ही कामें तो हलिकाकडून करून घेतो जातकुळींत व व्यवसायांत साम्य असल्यामुळे सामान्य हलिकांशी त्याचे नात्याचे संबंध आहेत. क्र. ६०० या गाथेची नायिका नागरी गृहपतीची कन्या व ग्रामीण हलिकनंदनाची पत्नी आहे. दरिद्री हलिकाला कन्या देण्यात त्याला कमीपणा वाटत असावा, सासरीं मुलीची कुचंबणा होऊं नये म्हणून तिच्या दिमतीला माहेरची पाठराखीण

आलेली दिसते गृहपतीचा उनाड मुलगा ( क्र १०७ ) किंवा या हलिक स्नुषाच्या आगचटीस जातो आणि क्र ९११ मधील गृहपतिसुतेला कोणी आवरू शकत नाहीं

गाथासप्तशतींत ससुर ही सज्ञा एकदाच ( क्र ९५३ ) आलेली आहे हा नायिकेचा सख्खा सासरा असणे संभवनीय आहे अथर्ववेदात श्वशुर हा शब्द अनेक वचनात ( १४ १ ४४ ) आलेला आहे यावरून डॉ इरावती कर्वे निष्कर्ष काढतात की पतीचा पिता, चुलता, आजा इत्यादि वडील धाऱ्याना अनुलक्षून ही सज्ञा वापरण्यात येत असावी गाथासप्तशतींत गुरुजन ( क्र ३६१, ३७०, ३९३, ४८४, ५८९, ६१६, ८१६, ८४५ ९८१ ) ही सज्ञा अनेक वेळा आलेली आहे या उल्लेखापैकीं क्र ५८९, ६१६ व ८१६ यामध्यें त्याना फक्त गुरु म्हटलेलें आहे हे गुरु व गुरुजन अथर्वातील ससुरासारखे दिसतात कुटुबीयाशीं त्यांचें नातें कोणतें तें निश्चित करता येत नाहीं गुरुजनाच्या आधीन असलेला पति ( क्र ८४५ ) नायिकेच्या मर्जीनुसार वागत नाहीं त्यान्या उपस्थितींत नायिकेला नवऱ्याकडे ( क्र.३६७ ) किंवा प्रियकराकडे ( क्र ९८१ ) मान वर करून पाहण्याची सोय नसते, किंवा अश्रु ढाळण्याचीही सवलत ( क्र ४८४ ) नसते प्रत्येक कुटुबात अशीं ठाकुरकी गाजवणारी जुनाट खोड व बाऊगुळ असतातच

गाथासप्तशतींत पिता ( पिइ, पिउ ) ही सज्ञा आलेली नाहीं. पतीचे अनेक उल्लेख आलेले आहेत दइअ दयित (क्र ७, १५, ४८, ५९, ७४, १००, १८८, २७०, २९२, ३०२, ३९७, ४३३, ४३७, ४५३, ४६७, ६२२, ६५०, ८२८, ८३४, ८३९, ९१०, ९२७ ९२८, ९२९) पइ पति (क्र १, ११, १३, ३६, ५४, ५५, ६९, १५९ १९७, २००, २३७, २४०, २९३, २९७, २९९, ३०१, ३२४, ३३५ ३४६, ३६७, ४७२, ४९८, ५२८, ५४९, ५९७ ६०५, ६०३, ६८६, ७०२, ७२४ ७३९, ७६१, ८०२, ८२४, ८४३, ८५७, ८६२, ८८७, ८८१) पिअ प्रिय या नावानें आलल्या उल्लेखाचे क्रमाक मुद्दामच दिलेले नाहींत भत्तार ( क्र ३९० ) ही सज्ञा एकदाच आलेली आहे क्र १९७ मधील तरुणीचा पति वृद्ध आहे आणि क्र ५९७ मधील मध्यम वयस्क व्याधानें नवतरुणी बायको केलली आहे विषमवयस्काच्या

विवाहाबद्दल तत्कालीनांना वैषम्य वाटत नसावें असे दिसते. पति प्रवासाला गेल्यामुळें मी घरांत एकटीच आहें, असे निवेदन क्र. ३३५ या गाथेत आहे. या व क्र १५९,२९७,६२१ वगैरे गाथांवरून निष्कर्ष निघतो की गाथासप्तशतींतील कुटुंबाचा विस्तार सामान्यतः मर्यादित होता. नवराबायकोच्या कुटुंबांत संसाराचीं उदाहरणें कित्ती तरी गाथांतून दाखवितां येतील.

गाथासप्तशतींत देवर=दीर मात्र बहुत ठिकाणीं आलेले आहेतः (दिअरः क्र. ३१३, ७२९, ८७०; देअरः ७६५, ९५७; देवरः क्र. २८, ३५, ५९ ४६९, ५७०, ६८८, ८६६ ). देवर म्हणजे नवऱ्याचा धाकटा भाऊ. दीरभावजयांच्या अनुरक्तीचे अनेक उल्लेख गाथांत आलेले आहेत. क्र. ७२९ व ८७० येथे त्यांचा अनुनय सुरुवातीस सुरू झालेला आहे. क्र. ७२९ मधील देवराला सतीचें साध्य आहे. क्र. ८७० ची नायिका स्वतःच देवराला प्रोत्साहन देत आहे. क्र. २८, ३१३, ५७०, ६८८ मधील भावजयींचा दिराशीं प्रेमसंबंध चालू आहे. क्र. २८ मधील त्यांच्या प्रीतींत विकृतीही आहे. क्र. ३५ व ५९ मधील नायिका देवराच्या अनुनयाला प्रतिकूल आहेत. क्र. ३५ ची नायिका त्याला सन्मार्गावर आणण्याचा यत्न करीत आहे आणि क्र. ५९ ची नायिका केवळ कुटुंब-विघटन टाळण्यासाठी देवराच्या दुर्वर्तनाचा परिस्फोट करीत नाही. या दोन्ही नायिका त्या त्या कुटुंबात नव्यानेंच आलेल्या दिसतात. क्र. ६८८ मधील नायक कार्यसिद्धीनंतर नायिकेला पराङ्मुख झालेला असला तरी त्याला टाकून बोलण्याइतकी व ते ऐकून घेण्याइतकी अनुरक्ति अद्याप उभयतांमध्यें अवशिष्ट आहे. क्र ७६५ मधील देवरानें उपभुक्त भावजयीची आशा सोडलेली आहे व तिच्या अपत्याची तरतूद करण्यासाठी दुसऱ्याला मध्यस्थी करावी लागत आहे.

गाथासप्तशतींतील कुटुंबव्यवस्था पितृप्रधान असल्यामुळें येथे जांवयाचें प्रस्थ फारसें दिसत नाहीं. क्र ६८३ व ८१६ या गाथांतील जामात अकस्मात व भर दुपारी सासुरवाडीला आलेले आहेत. क्र ६८३ या गाथेतील दीनकुमार स्वतःच्या पत्नीशी भेट सायंकाळपर्यंत व्हावयाची नाहीं. क्र. ८१६ मधील नायिकेला तर पतीशीं मान वर करून पाहण्याची सवलत नाही. क्र. ८०० मधील हरिकनन्दन आमांताना त्यांच्या पत्नीची पटावरील चरणरागमात्र दिसते. क्र. ७७७ मधील कुणाचा दीर लावलेला असूनही न पोसणारा

नुजाम्या हा गृहपतीचा घरजावई असावा असे वाटतें. पुत्राच्या विपयासकृतीचा माता निषेध करते ( क्र. ६३०, ६६३ ), पण जावयाच्या विपयासकतींचें मात्र सासू कौतुक ( क्र. ५०७ ) करते ! मुलगा व जावई यांच्याविषयींच्या तिच्या वृत्तींत एवढा फरक होण्याचें कारण एवच, आपल्या पुत्रावर कुटुंबाच्या पोषणाची जबाबदारी आहे याची मातेला जाणीव असते आणि जावयाच्या बाबतींत तशी काळजी करण्याचें सासूला प्रयोजन नसतें. शिवाय मुलगा आईला सांगूं शकत नाहीं अशीं रहस्यें देहधर्माच्या साम्यामुळ आई व मुलगी यामध्यें चर्चिलीं जातात.

क्र ६९७ या गाथेंत लेहड्ढ या शब्दाला लम्हड्ढ असा पाठभेद आहे. मध्य-हिंदुस्थानातील वन्य जमातींत घरजावयाला लम्हट ऊर्फ लामसेन अशी संज्ञा आहे प्रा. व्हेरियर एल्विन यानीं आपल्या ग्रथात या प्रथेचा उल्लेख केलेला आहे, पैकीं Myths of Middle India ( पृ. ४७६-७ ) मधील या प्रथेच्या उद्गमाबद्दलची गोंड लोककथा येथें देतों. " मदनगट येथें तोण्ड देवर आपल्या श्रीमद्द रहात असे त्याना एक कन्या होती मुलगी वयात आली तेव्हा आईबाप म्हातारे झाले होते त्यानीं विचार केला, मुलीला कोणाला तरी विकावी व मिळतील त्या पैशातून संसार चालवावा तोण्ड देवर जावयाच्या शोधाला लागला. कोसमगट येथें महकासुर देव नावाचा इसम रहात होता त्याला एक मुलगा होता त्याचें नाव लामसेन. देवरानें सारी हकीकत महकासुराला सांगितली त्यावर महकासूर म्हणाला, तू मुलीला विकूं नको, माझा मुलगा लामसेन तुझ्या घरीं बारा वर्षे राहील व काम करून घर चालवील, मुलीबद्दल मी तुला पैसा देणार नाहीं आणि मुलामुलीला मासरीं आणणार नाहीं, त्यांचें लग्न लावून दे, म्हणजे दोघेही काम करून तुम्हा उभयताना पोटाला घालतील देवरानें हें कबूल केलें व लामसेनाचें आपल्या मुलीशीं लग्न लावलें. तेव्हापासून घरात लामसेन ठेवण्याची प्रथा सुरू झाली." पूर्वी त्याला सासुरवाडीस बारा वर्षे काम करावे लागे आता तीनच वर्षे करावें लागतें या मुदतीनंतर त्याला बापाच्या घरी सपत्नीक जाता येतें. वन्य जमातींत जातरिवाजानुसार घरजावयाला सासरीं मजुरी करावी लागते आणि नागरिक घरजावई हा लाडक्या कन्येच्या हौसेसाठीं किंवा एकुलत्या कन्येचा

विरहव्याप्त ती सुनेच रक्षण करते ( क्र ३३६ ) आणि वसतात दरवळणाऱ्या सु धाना तिच्या चित्ताची चलबिचल होऊ नये म्हणून (क्र ४९७,) तिला घराबाहेर पडू देत नाहीं क्र ८६९ मधील सासू साठ आहे ती सुनेकडून दिवसभर इतकें काम करून घेते कीं विचारीला क्षणाचीही उसत मिळत नाहीं, पण या सुनेला ज्या कारणासाठीं मोकळीक हवी होती तें विचारात घेतल म्हणजे सासूची करणी योग्य होती असच दिसून येतें तरुण सुनेच्या आहारीं गेलेला विषयासक्त पुत्र कृश व कुटुंबाचा भार पेलण्यास असमर्थ झालेला पाहून तिला विषाद व भवितव्याबद्दल काळजी ( क्र ६३० ) वाटते आणि भुऱ्या बटा सैल सोडणाऱ्या नाचऱ्या सुनेबद्दल तिहाइताजवळही उपालम्भोद्गार ( क्र ९४५ ) काढावयास ती कमी करीत नाही एकूण गाथासप्तशतींत उपासमार, कटुवचनें, मारहाण वगैरे सासुरवासाचीं जीं कुप्रसिद्ध लक्षणें त्याचा मागमूसही आढळत नाहीं

गाथासप्तशतींत अत्ता ( क्र ८, ११०, २९५, ४६९, ४९७, ५४२, ५४९, ५४२, ५४७, ६५१, ६६३, ६६७, ६७४, ८०१, ८६९ ), पिउच्छा ( क्र ११० २९५, ५९८, ५३७ ), माउच्छा ( क्र ६४८,७७९ ) आणि मामि ( क्र ९३, ९७, १०४, २०४, २४६, २६४, २९४, ३४४, ४३१, ४१०, ५०६, ५१२, ५५१, ६०८, ८४२ ) हे प्राकृत शब्द अनेक वेळा आलेले आहेत छायत व टीकाकारानीं अत्ताचा प्रतिशब्द व अर्थ सासू असाच सामान्यत दिलेला आहे देशीनाममालेंत ( १ ५१ ) अत्ताचे अर्थ माता, सखी, सासू असे दिलेले आहेत थोधर-भाषा-कोशात हिंदी अत्ताचा अर्थ स्वत ची मोठी बहीण किंवा आईची बहीण असा दिलेला आहे मराठी आते ही बापाची बहीण क्र ४९७ २४९ ५५७, ६६३ व ८६९ या गाथातील अत्ता ही निश्चितपणें सासू आहे पिउच्छा ही बापाची आणि माउच्छा ही आईची बहीण पिउच्छा ही संज्ञा गाथासप्तशतींत अनेक वेळा आलेली असल्यामुळें अत्ता या संज्ञेचा अर्थ भिन्न असलाच पाहिजे वस्तुत माउआ म्हणजे माता किंवा सखी, सहेली ( देशी नाममाला ६, १४७ ), तरीही क्र ४२३ मधील माउआला छायत मातृष्वसा असा प्रतिशब्द दिलेला आहे मामि ( मम्मि, मम्माणि ) या शब्दाचा अर्थ देशी नाममालेंत ( ६ ११२ ) आईच्या भावाची

पायक्षी असा दिलेला आहे छायेंत मामीला मातुलानि हा प्रतिशब्द दिलेला आहे क्र १२४, २०४, ४३१, ४५० व ५०६ मधील मामि ही प्रत्यक्ष मातुलानि, निदान नायिकेच्या नात्यातली असणें शक्य आहे इतरत्र ती नायिकेची दूती किंवा सखा आहे गाथासप्तशतींत माआ ( क्र ४००, ५०७ ७३५ ), माइआ ( क्र ८११ ), माउआ ( क्र २४०, २८५, ४७३ ) व माए ( क्र ४३, १५९, १९५, ५४८, ५८९, ७८५, ८०१, ८८३ ) हे मातृवाचक शब्द आलेले आहेत क्र २४०, ४००, ५०७, ७३५ व ८८३ मधील माआ व माउआ या निश्चितपणे माताच आहेत अन्य माता या मानलेल्या माता आहेत

गाथासप्तशतींत आतोरा, मामा व मावशी यांचे उल्लेख नाहींत शिवाय अत्ता, पिउच्छा, माआ, माउआ व मामि या संज्ञा ढिलाईनें वापरलेल्या आहेत यावरून वाटतें कीं या संज्ञा सामान्यतः सांकेतिक असाव्यात त्याच्या जगी सगळा मुक्त नायक-नायिकांचें दूतीकार्य करणाऱ्या मध्यस्थ त्यांना कोण त्याही नावानें संबोधिलें तरी अर्थ एकच व्यभिचाराचें तंत्र जाणणारे साग-रात कीं या संज्ञा त्या जगात आजही वापरात आहेत ' त्यामध्यें भेद एवढाच कीं अत्ता पिउच्छा, व माआ या वयस्क असाव्यात आणि माउच्छा व मामि या समवयस्क।

गाथासप्तशतींत गृहिणीवाचक संज्ञा अनेक आहेत गेहिणी ( क्र ८२५ ), घरसामिणी (क्र ७३१), घरिणी (क्र ११, १३, ३६, ३८ १०७, १३०, २०५, २६१, २९१, ३८२, ४०९, ४७२, ५३८, ५६५, ५९५, ६०१, ८६२ ) जाया ( क्र ६, ३१, ४७, ८४, १६६, २००, २२२, २२८, २८३, ३१२, ३३७, ३७३, ३८६, ३९९, ४१७, ५०० ५७०, ६३९, ७६६, ७१८, ८२६, ८३०, ९५७, ९६१ ) णववहू = नववधू ( क्र ४७९, ५६९, ६४६, ६४७, ७२६, ९८४ ), बाला (क्र ७२७ ९७७ ) मुद्धा = मुग्धा (क्र. १५, १०७, ३८२, ४३३, ४६५, ५०४, ५३३, ६७८ ) क्र. ७३१ मधील घरसामिणी हा कांही तरी गृहस्वामिनी नाही, मालकिणीचा आव आणणारी पाहुणी आहे. त्याचप्रमाणें क्र ३६ मधील घरिणी हा शब्द नायिकेच्या राहत्या घराला अनुलक्षून योजलेला आहे जाया व घरिणी यामध्यें फरक करावयाचाच झाला

तर सागता येईल व सामान्यत जाया ही मध्या, तरुणी आहे आणि घरिणी ही प्रौढा, जाया ही दोहदिनी व विलासिनी आणि घरिणी ही पुत्रवती व गृहकार्यव्यापृता या विधानाला अपवादही आहेत क्र २०० मधील जाया पुत्रवती आहे अपत्याना जन्म देते ती जाया, असाच या शब्दाचा अर्थ आहे त्याचप्रमाण क्र ११ व २९१ मधील घरिणाना अद्याप गाभीर्य आलेले नाही

गाथासप्तशतीत सवती (क्र ७०, १०६, १७३, २१२, २७५, ४४९, ५२८, ५५७, ५८६, ७१२, ९२१, ९७४, ९७५) जागोजाग आढळतात वर क्रसात उल्लेखिलेल्या क्रमाकात त्याचे नामपूर्वक उल्लेख आलेले आहेत, इतर अनेक गाथात त्याचा सदर्भ आलेला आहे या उल्लेखावरून या काळात बहु-पत्नीकत्व रूढ होतें असें दिसतें साधारणत सवतींची नादणूक असणारी कुटुम्बें आर्थिक सुस्थितीत असावीत असे वाटत सामान्यत या सवती सजातीय आहेत क्र ७९ मधील सवतींपैकी ज्येष्ठ जाया आर्या असून तिच्या सवती अन्य व सामान्य जातीय असाव्यात असे वाटतें त्यामध्यें आर्या आपलें वर्चस्व सामाळून आहे क्र २४ या गाथेच्या नायकानें अगोदरपासून अन्यत्र विन्हाड थाटलेलें असून केवळ लोकाचारासाठीं किंवा आवश्यक धर्मकार्य म्हणून त्यानें सजातीयतेशीं निष्प्रेम विवाह केलेला दिसतो सवतींपैकीं काहीं विवाहित आहेत (क्र २४) व काहीं रखेल्या (क्र ३३७) आहेत क्र ४७९ मध्यें नायकाच्या द्वितीय विवाहाचा उल्लेख आलेला आहे, नववधूविषयीं वाट-णाऱ्या औत्सुक्यामुळ त्याला प्रथम गृहिणीच्या सगतींत सुख लागत नाहीं कोठें या सवती एका घरात नादतात (क्र ११२) तर कोठें त्याचीं बिऱ्हाडें वेगळीं (क्र २४, ४३, १३०) आहेत सवतींपैकीं कोणी आवडत्या असतात व कोणी नावडत्या (क्र ५२३) एखाद्या पत्नीला एखाद्या दुसऱ्या सवतीचा भार सोसावा लागतो आणि कोठें बिचारीला अनेकींचा (क्र २७१), प्रथम गृहिणी नावडती झाली (क्र ५८३) किंवा कुरूप (क्र ३८२) अगर शरीरानें अवजड झाली म्हणजे तिचा पति तरुण (क्र ५१८), भरदार (क्र ५१८) वा लवचिक (क्र ११२) नववधूशी विवाह (क्र ४७९), करी. नववधूसग नायकाला आरभीं सुखकर वाटतो पण त्यामुळ त्याला दौर्बल्य (क्र १२०, १२१, १७३) येतें व यामुळें सवती तिच्यावर रुष्ट असतात

आणि त्या नवऱ्याजवळ तिच्या नाचरेपणाबद्दल व अन्यासक्तीबद्दल गाऱ्हाणीं व चुगल्या करतात. सवतीच्या प्रादुर्भावामुळें पत्नीला पतीचें दर्शन क्वचित् (क्र. ७२), आजारपणीं समाचारासाठीं म्हणून (क्र ५०, ५१), केवळ दाक्षिण्य म्हणून (क्र ८५), दिवसा उजेडीं, पहाटेस (क्र ६५३) किंवा अस्तमानींच (क्र १३०) व्हावयाचें. यामुळें अनायास घरीं परतलेला पति फिरून बाहेर पडणार नाहीं याविषयीं दूरदर्शी गृहिणी विशेष दक्ष (क्र १३०) असत. बहुवल्लभाच्या स्त्रियांची दुर्दशा काय सांगावी? त्याना अश्रु ढाळीत (क्र. ५२८), उसासे टाकीत (क्र.१४७), एकीमेकींच्या उराळ्या पाराळ्या काढीत (क्र १७९, ७१२), दु खमाण्डारात (क्र ९२५) आयुष्य कंठावें लागतें. सपत्नीरोष हें ससारी स्त्रियांचें मह्द्दुःख होय, असें भूरिदत्त जातकात (जातक : भाग ६. पृ १६०) नागीनें सांगितलें आहे तें अगदीं खरें आहे. याचा ताप त्याना होतो, तसाच तो त्यांच्या यजमानालाही सोसावा लागतो. या जंजाळात गुरफटलेल्या बिचाऱ्याला जागोजाग चहाड्या (क्र. ५५७), टोमणे (क्र ६५३) व दुर्वचनें (क्र १७९) ऐकून घ्यावीं लागतात. हें भोगावें लागत असूनही पुरुष जणूं काचऱ्या व काटेरी पायबंदांच्याच शोधांत असतो !

गाथासप्तशतीच्या क्र. ९५२ या गाथेंत क्षेत्रसंकेत आलेला आहे. स्त्री हें क्षेत्र आहे असें येथें सांगितलेलें आहे. हा क्षेत्रसंकेत सकृद्दर्शनीं भासतो तितका हास्यास्पद किंवा घृणास्पद नाहीं. असा कोण मूर्ख शेतकरी आहे कीं जो दुसऱ्याला आपल्या शेतांत नांगरणी पेरणी करू देईल? दुसऱ्याच्या शेतांत पेरणी करणाराची तुलना व गणना प्राचीनानीं धान्याला ठोंबे मारणाऱ्या महामूर्खांत केलेली आहे. वंशशुद्धि करावयाची ती कुलपरंपरेंत खंड पडू नये म्हणून, स्त्रीक्षेत्रात बीजारोपण करावयाचें तें धर्मकार्य म्हणून, पुत्रोत्पादनामुळें गृहस्वामीला व गृहस्वामिनीला सद्गति प्राप्त व्हावी म्हणून. अशी या क्षेत्र-संकेताची भूमिका आहे. या क्षेत्रावर आक्रमण होऊं द्यावयाचें नाहीं, झालेंच तर त्याचें निवारण करावयाचें व प्रमादविशेषीं शुद्धीकरण करावयाचें, हा संकेत प्रगमनशील व बुद्धशाली भारतीयाना प्राचीन काळापासून माहीत आहे. दुर्दैवामुळें संसारात नांदावयाला नालायक झालेल्या गृहिणीला हद्दपार करावयाचा

(क्र ७६) जे उरले नाहींत ते युद्धाचा अवलंब करून आपल्या अपहृत स्त्रियाना चोराच्या (क्र ५२७) व शत्रूच्या (क्र ५४, ५५) तावडींतून सोडवताल, यात नवल काय? आणि सोडवतील कशासाठीं? कुटाळाच्या दुर्वचनावर विसंबून त्याचा त्याग करण्यासाठीं? नव्हे क्षेत्र रक्षणासाठीं, संवर्धनासाठीं!

गाथासप्तशतींतील गृहिणीचें जीवन व दिनचर्या हीं पाहाण्यासारखीं आहेत लग्नाच्या वेळीं तिचें वय जाणतें (क्र ६४२, ६४३) असतें क्र २९८ ची नायिका विवाहासाठीं आतुर झालेली आहे ही सुशिक्षित (क्र २७, ३५, २४४ ८२७, ८३५) आहे ती पतीला पत्रें लिहिते व त्याचीं पत्र वाचते नि शब्दपणें रिदळणाऱ्या कुमारीच्या वागणुकींत लग्नानंतर संसाराच्या जबाबदारीची जाणीव झाल्यामुळ गांभीर्य (क्र ६०६) येते रात्रीं जागरण झालेलं असल तरा कुलवधू सकाळीं उठून कामाला (क्र २३) लागते उजाडण्यापूर्वी उठणार नाहीं ती नव याची लाडकी असला तरा निंदेला पात्र (क्र ७१२) होते झाडलोट झाल्यानंतर ती स्नान (क्र ७९, ८०) करते व स्वयंपाकाला (क्र १३) लागते माहेरवासिनी मात्र उशीरा आंघोळ (क्र, ६८३) करतात ती रन्धनकर्मांत निपुण (क्र १४) आहे ती आल्यागेल्याला भिक्षा (क्र १६२) वाढते, पाकसिद्धीनंतर काकबली (क्र २०५) देते घरधनी शेतावर गेलेला असला तर त्याला व कामगाराना न्याहारी (क्र ६९२) पोंचविते मुहूर्ताच्या दिवशी ती नांगराची पूजा (क्र १६५) करते आणि जरूरीप्रमाणें शेतांत काम (क्र ६९० ) व राखण (क्र ६९०, ६९१, ८९५) करते तिला दळण (क्र ३८८, ७९४), कांडण (क्र ५५७) करावें लागतें पाणवठ्यावरून पाणी आणावें (क्र ८७४, ८७५) लागतें दिवसभर ती कामाधामांत (क्र ८६८, ८६९) गुरफटलेली असते असें असूनही दुपारीं जरा आडवी झाली तर ती आक्षेपाला व निंदेला (क्र ६५, ६६) पात्र होते पति बाहेर गेलेला असला तर त्याची मार्गप्रतीक्षा करीत ती दारात उभी (क्र १४०, २५६, २६२) राहते व तो घरीं येताच त्याचें स्वागत (क्र ३१२) करते, त्याचें पादप्रक्षालन (क्र १३०) करते पति वृद्ध असला तरी ती त्याचा संसार आनंदानें व आपखुषीनें (क्र २९३) चालविते,

स्वत च्या सुखदुःखांची उपेक्षा करून त्याच्या यशानें आनंदित (क्र. ६८५) होते. पतीचें चित्त अन्यत्र गुंतलेलें असलें तरी ती आपला क्रोध मनात जिरवते, तो अश्रूंनीही (क्र. ८६३) व्यक्त करीत नाही, त्याला संतुष्ट करून त्याची धन्यासक्ति (क्र. १३०) आचरते, इतकेंच नव्हे, त्याच्या जिवासाठी दौत्यही (क्र. ८४) करण्यास सिद्ध असते. त्याच्या विपरीत हौसाही (क्र. २२, ८४) ती पुरविते. असह्य परिस्थितींतही ती पातिव्रत्य (क्र. ३५) सांभाळते. स्वतःच्याच नव्हे, शेजारणीच्याही शीलाचीही ती काळजी (क्र. ३६, ३९) वाहते. आपल्या कुटुंबाची विपन्नावस्था (क्र. ४७२) ती प्रकट होऊं देत नाही. कुटुम्बाची दुर्गति असेल तर खर्च टाळण्यासाठी ती गरोदरपणी आपले डोहाळेही मनांतल्या मनांत (क्र. २९०, ४७२) जिरवते. कुटुम्बाचा भार धारण करण्यासाठी ती आपल्या हौसांवर जलाञ्जलि (क्र. ६०६) देते आणि कुटुंबीयांशी सहकार्य करते व स्वतः धोका पत्करून कुटुम्बविघटन (क्र. ५९) होऊ देत नाही. अधून मधून माहेरची ओढ लागत असली (क्र. ८७०) तरी ती सासरच्या जीवनाशीं इतकी समरस होते कीं सासरची दुर्गति असतांना माहेरची माणसें सणावाराचे दिवशीं थाटमाट करून भेटावयास आलीं तर तीं सहेतुकपणें आपल्याला हिणवण्याला आलीं आहेत असें मानून (क्र. ३८) ती त्यांच्यावर रागावते. पति प्रवासात असतांना ती वेणीफणी करीत नाही (क्र. २९), डोळ्यात अंजन घालीत नाही. (क्र ८६४). अशा प्रकारें ती कौटुम्बिक कर्तव्याचें पालन करते व सहनशक्तिनें सुखदुःखांचा समन्वय (क्र. १४०, ५१०, ८६०, ८६३) करते म्हणून संसार सुखाचा होतो. एकत्र कुटुम्बातील स्त्रियांनी अविनयाच्या मूर्खपणापासून अलिप्त असावें एवढीच गृहपतीची मागणी (क्र ८६०) असे. संसाराचें सुख सुखशांतर अवलंबून असल्याची (क्र. ९६९) गाथाकारांना जाणीव होती. या संसारांत स्त्रियांना इष्ट तेवढें स्वातन्त्र्य नव्हतें असेंही म्हणता येणार नाही. क्र. ८६१ या गाथेंत सांगितलं आहे या ज्या कुटुम्बांतील स्त्रिया मोकळ्या मनानें बोलतात, अकृत्रिमपणें वागतात. निर्विकारपणें हंसतात व निष्पापपणें वावरतात तीं कुटुम्बें धन्य होत.

गाथासप्तशतीतील कौटुम्बिक जीवनांत वात्सल्याचा अनेक उदाहरण

आढळतात क्र ११ मधील छोटा मुलगा बापाच्या पाठीवर बसून घोडा घोडा खेळत आहे क्र २०० मधील चिरंजीवाना नुकतेच दोन दात आल्ले आहेत व त्यानीं ते शरावर उमटवले आहेत आणि आईबाप त्याचे कौतुक करीत आहत क्र २०० मधील वर्णन कवीच्या सूक्ष्म व मार्मिक निरीक्षणाचें द्यातक आहे या प्रसगाच्या अनुराधानें गाथास्वानी कलेल मनोविश्लेषण आजच्या नवकवींनाही चकित करील क्र ४०९ मधील प्रसग असाच आहे, पुत्राच्या स्पर्शानें मातेचा एक स्तन पान्हवतो आणि पतीच्या स्पर्शानें दुसरा रोमाचित होतो वात्सल्य व शृगार याचें असें संमिश्रण इतरत्र क्वचितच आढळेल कौतुक चाल्ल आहे तोंवर ठीक आहे, पण ऐन वेळीं लाडक्या पुत्रानें भोंकाड पसरलें तर मात्र तो आपली एवा धपाट्यातून ( क्र ४०० ) सुटत नाहा जणू असा धपाटा खाल्ल्या शिवाय त्याला सुटाची झोंपच येत नाहीं ! आईबापाना अशीं हैराण करीत नाहीत तीं मुल कसचीं ? शेतकऱ्याला खरा आनद केव्हा व कशानें होतो ? पाण्यान भरलेल्या ग्याचरातलें साळीचें पीक गुढघ्याएवढें वाढलेल दिसत तेव्हा कारण यापुढें तें अवर्षणामुळ सुकणार नाहीं अशी त्याचा खात्री होत क्र ५६७ या गाथत अशा शेताची अत्यत अन्वर्थक अशी तुलना घरच्या दुधावर पासलेल्या, गुडघ्याएवढ्या वाढलत्या आणि चित्तलानें मारलेल्या हरिणपुत्राशी केली आहे पित्याच्या गैरहजेरींत व विपन्नावस्थेंत माता पुत्र चें रक्षण करते ( क्र ५३८, ६२१ ) आणि यासाठीं स्वनाशाचीही पर्वा ( क्र १०२ करीत नाहा क्र ५९५ मध्यें मुलानें आईजवळ घेतलेल्या जगली आब्याचा हट्ट हा प्रसग अत्यत हृदयद्रावक आहे

वर नमूद केलेल्या नातेवाइकाच्या उल्लेखावरून गाथासप्तशतीतील कुटुब सस्थेबद्दल अनेक महत्त्वाच निष्कर्ष निघतात

गाथासप्तशतींतिल गृहपति हा सामान्य ग्रामाण किंवा हलिक नाहा समाजात त्याला विशिष्ट दर्जा आहे त्याचा हा दजा प्राचीनानाही मान्य आहे गृहपति ही सज्ञा वदकालापासून रूढ आहे आणि ती तेथ व इतरत्र वळोवेळा विशिष्ट वेगवेगळ्या अर्थांनीं वापरण्यात आली आहे गृहपति ( Master of the Household ऋ ६ ६३ २, अथर्व १९ ३१ १३), जनपति (Chieftain or Families ऋ १ १८५ ८), विश्पति (Lord of the Clan :

ऋ : ७. ५५. ५ ) या संज्ञा वेदांत आढळतात. डॉ. इरावती कर्वे सांगतात, गृहपति हा कुटुंबाचा पति, शास्ता, कुटुंबातील सर्वांत वडील पुरुष ( Kinship Terminology & Kinship Usage in Rgveda & Atharva Veda : Annals. XX 126). अर्थशास्त्रात ( अधि. २ अध्याय ३५ ) कौटिल्य सांगतो : "समाहर्तृप्रदिष्टाश्च गृहपतिकव्यञ्जना येषु ग्रामेषु प्रणि-हितास्तेषां ग्रामाणां क्षेत्रगृहकुलाग्रं विद्युः । मानसञ्जाताभ्यां क्षेत्राणि भोगपरि-हाराभ्यां गृहाणि वर्णकर्मभ्यां कुलानि च । तेषां जङ्घाग्रमायव्ययौ च विद्युः । प्रस्थितागतानां च प्रवासावासकारणमनर्थ्यानां च स्त्रीपुरुषाणां चारप्रचारं च विद्युः । " = " शेतें व घरें यांच्या मर्यादा आणि त्यावरील मालकीहक्क, सरकारी कर व त्यांत देण्यात आलेली सूट, गावांतील माणसें व गुरेंढोरं यांची संख्या आणि कुटुम्बाच्या जाति व व्यवसाय आणि त्यांचे उत्पन्न व खर्च, यांचा स्थानिक दप्तरांत नमूद केलेला तपशील बरोबर आहे किंवा कसें हें बातमीदारानें गृहपतीचा वेष धारण करून पडताळून पहावें. गावांत नव्यानें आलेल्या व गाव सोडून जाणाऱ्या लोकांवर नजर ठेवावी आणि त्यांच्या येण्याजाण्याची कारणें शोधून काढावीत, त्याचप्रमाणें आलेल्यांपैकी अनिष्ट व अनर्थकारक कोण आणि परसत्तेचे हेर कोण यांची खात्रीलायक बातमी काढावी. " या अर्थी खरोखरे गृहपति असेच उद्योग करीत असावेत असा श्री. कांगले यांचा कयास ( पूर्वोक्त २.५० ) आहे.

अर्थशास्त्रात नमूद असलेली लक्षणं गाथासप्तशतीतील सर्वच गृहपतींच्या ठायी आढळत नाहीत. येथे गृहपति ही संज्ञा थोडी ढिलाईनें वापरलेली आहे. तरी आहेत त्या उल्लेखांचा सारासार विचार करता दिसून येतें कीं गाथासप्तशतीतील गृहपति हा अर्थशास्त्रातील व्यवस्था अमलात येण्याच्या पूर्वीचा असावा. या गृहपतीचा आर्थिक व सामाजिक दर्जा सामान्य शेतकऱ्याहून व परधन्याहून श्रेष्ठ असावा. ग्रामव्यवस्थेतील त्याचा दर्जा ग्रामणीच्या खालो-खाल असावा. गृहपति हा मोठा जमीनदार व जबर अंमलदार असावा. महाराष्ट्रांत जातकुळीच्या श्रेणीत विशिष्ट कुळांना उच्च दर्जा देण्यात येतो. त्याप्रमाणें गृहपति हें मूळ स्वरूप असावं. अर्थशास्त्रांतले गृहपति परतात सर्व उद्योग व उचापती इत्यादी गावकऱ्याचे स्वयंभू पुढारी या नात्यानें त्यांचिक

मातबर शेतकरी करीत असतात याचींही मुलें काहीं काळपर्यंत उडारतात आणि जातीनें शेती किंवा शेतकाम करणाऱ्या स्त्रीपुरुषाना व सामान्य हलि काना उपद्रव देतात उद्दीम उद्योग करून, लष्करात किंवा सरकारात नोकरी करून अथवा स्वार्थासाठीं किंवा प्रतिष्ठेसाठीं अधिकाऱ्याकडे वळण वाघून सामान्य कुणबी गबर व जबर झाला म्हणजे त्याचें घराणें प्रथम श्रेष्ठ कुळींतील कन्येचें ग्रहण व नतर उच्च कुळात कन्येचें दान या साधनाना कालातरानें श्रेष्ठ जातकुळांत समाविष्ट होऊं लागतें असा प्रकार आजही घडत असलेला दिसतो या श्रेष्ठ कनिष्ठ भावाचें मूल स्वरूप या गृहपतींत पहावयास मिळतें

गाथासप्तशतींतील कुटुंबाचा विस्तार मर्यादित असला तरी या कुटुंबव्यव स्थेंत हिंदु एकत्रकुटुंबसस्थेचीं लक्षणें निश्चितपणें आढळून येतात गाथासप्त शतींतील कुटुंबावर गृहपतीची सत्ता आहे पतीच्या मागून कुटुम्बाचा चरि तार्थ चालविण्याची जबाबदारी कुटुंबातील कर्ता पुरुष या नात्यानें आता पुत्रावर आहे अशी त्याच्या मातेची अपेक्षा [क्र ६३०, ९४१] आहे ग्रामणीचीं कामें त्यान्या अनुपस्थितींत व त्याच्यानतर त्याचा पुत्र [क्र. ३१, ६२८] चालवतो भावाभावामध्यें भाडणें झाल्यास त्याचें पर्यवसान कुटुम्ब-विघटनात होईल अशी जाणीव क्र ५९ या गाथेच्या नायिकेला आहे कुटुम्बें मोडतात तीं स्त्रियाच्या वागाळयामुळें, याचीही गाथाकाराना जाणीव आहे. क्र. ११३ या गाथेंत पित्याच्या कर्जाचा वारसा पुत्राकडे आलेला आहे अर्थात् हें कुटुंब पितृप्रधान असलेंच पाहिजे हिंदु एकत्र कुटुंबाचीं हीं वैशिष्ट्यें लोक गीतात समाविष्ट झालेलीं आहेत, यावरून तीं तत्कालीन समाजाच्या अतर्मनात अनुस्यूत झालेलीं होती, याचा प्रत्यय येतो

गाथासप्तशतींतल्या अनेक तरुणी स्वैरिणी असल्या तरी त्यान्या उल्लेखान्या सख्येवरून तत्कालीन कुटुंबसस्था व्यभिचारानें बरबटलेली होती, अगर समाजाला शुचिर्भूत व सुसस्कारांची जाणीव नव्हती असा निष्कर्ष काढता येणार नाही सामान्यत गाणीं होतात तीं असामान्याचींच होतात आणि जीं गाणीं रगतात व रुचतात तीं प्रेमाचींच असतात त्यातलें प्रेम वैवाहिक आहे कीं विवाहबाह्य आहे ह्याचा विचारही रसिकाच्या मनात साधारणत येत नाहीं म्हणून अशा उल्लेखावरून विशेषत जानपद व स्फुट गीतातील रगी

येरगी वचनावरून समाजस्थितीबद्दल सामान्य विधानें करणें साहसाचें ठरण्याचा संभव आहे गाथांत वर्णिलेली गृहिणीची दिनचर्या, पतिपत्नींची परस्परावरील प्रीति, कौटुम्बिक जीवन आणि वात्सल्य यांचे उल्लेख विचारांत घेतले असता त्यांना पटतें की तत्कालीन कुटुंबसंस्था जिवंत व सुविभूत होती या कुटुंबातील स्त्रियांचें स्थान भोगदासींचें नव्हतें ज्या कुटुंबातील स्त्रियांना मोलकरिणीसारखें किंवा भोगदासीसारखें वागविण्यांत येतें तेथें गाथाकर्त्यांना वदनपूर्वक वर्णिलेलें कौटुम्बिक सौख्य अशक्य आहे त्यांनीं वर्णिला आहे तशी परिस्थिति असेल तें कुटुम्ब भाग्य व उद्याही सुनीच गणलें जाईल

आर्यांच्या वसाहतींचें क्षेत्र विस्तृत होऊं लागलें तसतशा आपल्या अल्पसंख्यात्वाच्या अडचणी त्यांना अधिकाधिक जाणवूं लागल्या वसाहतींच्या प्रदेशांत ते अल्पसंख्य असले तरी ते संघटित व सुसंस्कृत आणि शस्त्रास्त्रांनी सज्ज होते म्हणूनच प्रथम बहुसंख्य आदिवासींचा विरोध मोडून किंवा शमवून आणि नंतर त्यांना समाजव्यवस्थेत समाविष्ट करून घेऊन ते वसाहती प्रस्थापित व प्रवृत्त करूं शकले जेते हे नेहमीच अल्पसंख्य असतात त्यांच्या आक्रमक व भ्रमणशील जुगांत पुरुषांपेक्षा स्त्रिया कमी असतात यामुळें स्थायिक झाल्यानंतर अन्य वर्गांतील स्त्रियांशीं विवाहबद्ध होणें किंवा विवाहबाह्य संबंध ठेवणें त्यांना भाग झालें वर्णसंकरामुळें आर्यांचें अस्तित्व व व्यक्तिमत्व अभिमान नष्ट होऊं नये म्हणून त्यांनीं अशी प्रथा प्रस्थापित केली असावी कीं ज्येष्ठानें आर्यशा विवाह करावा आणि कनिष्ठानीं अनार्यांशीं नम्बुद्रि ब्राह्मणांत ही प्रथा अद्यापि अस्तित्वांत आहे आर्यांची प्रतिष्ठा कायम रहावी म्हणून प्राचीन आर्यांना कुटुंबातील विधवांना देवराबरोबर लैंगिक संबंध ठेवण्याची मुभा दिली असावी देवराला विधवा र ना आपल्या शयनावर बोलावते असा उल्लेख ऋग्वेदांत ( १० ४० २ ) आहे त्याचप्रमाणें दिरानें भावजयीला मृताजवळून परावृत्त करावें व पुनर्विवाहाचें आश्वासन द्यावें असे उल्लेख ऋग्वेदांत ( १० १८ ८ ) व अथर्ववेदांत ( १८ ३ २ ) आढळतात

राजानीय स्त्रियांच्या तुटवड्यामुळें बहुभर्तृकता (polyandry एका स्त्रीवर अनेक पुरुषांना वैवाहिक हक्क असणें ) ही पद्धत अस्तित्वांत आली असावी एका स्त्रीचा अनेक भावांशीं विवाह होणें ही भ्रातीय बहुभर्तृकता द्रौपदीचा

पांच पाण्डवाशीं विवाह हें भ्रातीय बहुभर्तृकतेचें ठळक उदाहरण आहे मातेच्या आज्ञेची सबब निर्माण करून उत्तरकालीन इतिहासकारांनीं या बहुभर्तृकतेला मुरड घातली आहे महाभारतात वारवार उल्लेखिलेली नियोगाची प्रथा ही आर्यांच्या पतिष्ठेच्या अहंकारावर व भ्रातीय बहुभर्तृकतेच्या रिवाजावर आधारलेली असावी वधूचा विवाह विशिष्ट वराशीं होतो, हे खरें, त्याचप्रमाण ती वराच्या कुळात दिली जाते ( गौतम धर्म सूत्र २ १०.२७ ) हेंही तितकेच खरें कुटुंबाची मालमत्ता कुटुंबाबाहेर जाऊ द्यावयाची नाहीं, त्याचप्रमाणें कुटुंबातील विवाहित स्त्री परक्या घरीं जाऊ द्यावयाची नाहीं, अशी कुटुंबप्रमुखाची भावना असे प्रजोत्पादनाविषयीं पति असमर्थ असला किंवा पुत्रप्राप्तीपूर्वी मृत झाला तर त्याच्या पत्नीनें किंवा विधवेनें नियोगाच्या मार्गानें संतति निर्माण करावी, जास्तीत जास्त तीन पुत्र प्राप्त होईपर्यंत नियोगाचा अवलंब करावा आणि नियोग करावयाचा तो पतीच्या बंधूकडून किंवा पतीच्या कुटुंबातील इतर नातेवाईकाकडून करवावा, असे नियोगाचे नियम महाभारतकालात अस्तित्वात होते, " नारी तु पत्यभावे वै देवर वृणुते पतिम् " ( महाभारत : १.१२ १० ) महाभारतातील अनेक योद्धे नियोगपद्धतीनें जन्मलेले आहेत नियोग पद्धतीचा एक परिणाम असा झाला कीं दीर आपल्या भावजयीकडे आणि भावजया दिराकडे सभाव्य सभोगदृष्टीनें पाहू लागल्या आणि या वृत्तीचा आगाऊ प्रात्यक्षिकें कौटुम्बिक व्यभिचारात दिसू लागलीं हे दुष्परिणाम स्पष्ट दिसू लागले तेव्हा समाजसुधारक या प्रथेचा विरोध करू लागले आपस्तंब व बौधायन यानीं या बाबतीत पुढाकार घेतला मनूनं या आचाराला पशुधर्म ( ९.६६ ) म्हटलें खि पू चवथ्या शतकापासून खिस्तोत्तर दुसऱ्या शतकापर्यंत नियोग पद्धतीच्या पुरस्कर्त्यांनीं सुधारक स्मृतिकाराच्या निषेधाला दाद दिला नाहीं पुढें ही पद्धत माग पडू लागली आणि सहाव्या शतकाच्या सुमारास ( The Position of Woman in Hindu Civilization Dr Altekar. p 173 ) ती लुप्तप्राय झाली

नियोगाचा रिवाज मोडला व त्याची जागा ' दियेरवटू ' नें घतली डॉ इरावती कर्वे ( मराठी लोकांची संस्कृति पृ १६५ ) सागतात जेठाणी ही ज्येष्ठ भ्रात्याची पत्नी ती विधवा झाली कीं तिचा पुनर्विवाह धाकट्या दिरा

सींच व्हावयाचा, गुजरातेंत प्रचलित असलेल्या या प्रथेचें नाव दियेरवट. महाराष्ट्रातील अनेक वन्य व नागरी जमातींत ही प्रथा चालू आहे. त्याचें कोष्टक मीं 'सह्याद्रीं'त ( पृ. ४६९ ) दिलें आहे. दीर्घकालीन परंपरा व आनुवंशिक संस्कार यामुळे देवरानुरक्तीची भावना जणूं समाजाच्या रक्तात उतरली आहे असे वाटतें. दीरभावजयामधील प्रेमसंबंध फार प्राचीन काळापासून देशोदेशीं विख्यात आहेत बंगाल्यात त्याचेमध्यें चालणारे हास्यविनोद, नर्मशृंगार व प्रेमविभ्रम हे प्रेक्षकाच्या, वाचकाच्या किंवा श्रोत्याच्या चित्तवृत्ति प्रक्षुब्ध करतील इतके उत्तेजक असल्याचें एका बंगाली लेखकानेंच ( Racial History of India Chandra Chakraverty p.350 ) नमूद केलेलें आहे. मराठी समाजात व जानपद वाङ्मयात जवळ जवळ अशीच परिस्थिति आहे, वास्तव जीवनाला पराङ्मुख असलेल्या आधुनिक वाङ्मयात तें तसें आहे म्हणून या प्रथेचे पडसाद उमटलेले आढळत नाहींत मराठी लावण्यातील 'भाऊजी' हा शब्द स्त्रीच्या तोंडीं असतो तेव्हा तो नवऱ्याच्या थाकल्या भावाला, बहिणीच्या नवऱ्याला अगर आतेमामे भावंडाना अनुलक्षून भावी वर किंवा भूतपूर्व प्रियकर या नात्याने किंवा संबंधानें योजलेला असतो त्याचप्रमाण वहिनी हा पुरुषानें वापरलेला शब्द भावाची बायको, बायकोच्या भावाची बायको आणि आते-मामे बहिणी याना अनुलक्षून आपल्या व त्याच्या प्रेमसंबंधाच्या अनुरोधानें योजलेला असतो पुरुषाला मेहुणी म्हणजे ( देशीनाममाला · ६·१४८ ) बायकोची बहीण, बायकोच्या भावाची बायको किंवा मामाची मुलगी आणि स्त्रीला मेहुणा म्हणजे मामाचा किंवा आतेचा मुलगा अगर नवऱ्याच्या बहिणीचा नवरा. मेहुण हा शब्द मैथुन यापासूनच सिद्ध झालेला आहे मेहुणा व मेहुणी याचा प्रेमसंबंध हा भागिनेय बहुभर्तृकतेचा अवशेष आहे एका कुटुंबातील एकाचा दुसऱ्या कुटुंबातील एकीशीं विवाह झाल्यामुळें तिच्या बहिणीवरही त्याला वैवाहिक हक्क प्राप्त होणें ही भागिनेय-बहुभर्तृकता, पण त्याचे भाऊ व तिच्या बहिणी यानाही एकमेकावर वैवाहिक हक्क प्राप्त होत दक्षिणेंतील रेड्डी जमातींत नवऱ्याच्या सर्व नातेवाइकांना, विशेषत त्याच्या सर्व भावाच्या बधूना बधूवर वैवाहिक हक्क मिळत असत. दक्षिणेंतील तुडा या जमातीत एका कुटुंबातील सर्व बधूंचे विवाह दुसऱ्या कुटुंबातील सर्व

भगिनींबरोबर होत असत, विशेषत वडील भावाची पत्नी त्याच्या धाकट्या भावाना उपलभ्य असे आणि वधूच्या कनिष्ठ भगिनी मेहुण्याना. वराची मिरवणूक माडवासमोर येईल त्या वेळी त्याचा भाऊ वधूबरोबर खोलीत कोंडलेला असला पाहिजे व त्यानेंच तिला विवाहमण्डपात आणली पाहिजे असा रिवाज खोंट जमातींत आहे. पश्चिम सातपुड्यांतील कोर्कु या जमातींत रिवाज आहे की लग्नपूर्वी दीरानें वधूला एकातीं सात वेळा आलिंगिलें पाहिजे. लग्नापूर्वी दिरानें एकातात वधूशीं अश्लील गोष्टी केल्या पाहिजेत असा रिवाज शबर या वन्य जमातींत प्रचलित आहे. या व अशा अनेक वन्य परंपरांचे सस्कार मराठी मनावर झालेले आहेत. प्राचीन गायासप्तशतींतील आणि अर्वाचीन लावण्यातील दीरभावजय आणि मेहुणामेहुणी याच्या प्रेमाची गाणीं या संस्कारांना व वृत्तीला आणि अनुनयप्रथेला साक्षी आहेत.

सामान्यत आपले विवाह हे मातापित्यानीं पडून आणलेले असतात. कोठला वर व कोठली वधू? परस्पराचाही विवाहपूर्व परिचय नाहीं, मग माहेर-सासरच्या मडळींची ओळखदेख कशी असणार? यामुळ नव्या नवरीला सासरच्या अपरिचित वातावरणात आरंभीं कोंडल्यासारखें वाटतें सासूसासरा, गुरुजन, थोरले व धाकटे दीर आणि जावानणंदा वगैरे मानाच्या नातेवाइका-बरोबर नववधूनें किती आदबीनें वागलें पाहिजे याबाबत प्रत्येक कुटुबात प्रचलित असलेल्या अनेक अलिखित निर्बंधाच्या काटेकोर अमलबजावणीमुळें तिला गुदमरल्यासारखें वाटणें अपरिहार्य आहे दिवसाउजेडीं नवऱ्याबरोबर उघडपणें बोलण्याची तिला मनाई असे, एवढेंच नव्हे, त्याच्याकडे मान वर करून पाहण्याचीही तिला चोरी असे. अशा परिस्थितींत नव्या नवरीशीं कोण हसणार, खेळणार? एखादी चुणचुणीत छोटी नणद? त्या तर अव्वल चहाडखोर! अझून अरुड असलेले धाकटे भाऊजी? होय. शेण्डेफळ म्हणून ते तर सर्वांचे लाडके या भाऊजींचे आणखी लाड तीच करणार, त्याचे हट्ट हीच पुरविणार, त्याना कुरवाळणार व विश्वासात घेणार त्याची मर्जी साभाळणें हिला भाग, कारण त्याच्या भलावणीमुळेंच हिला सासरच्या मडळाची सहानुभूति सपादन करता यणार समवयस्क असल्यामुळें दीरभावजयांना हसता हुदडताना एकमेकाच्या आगचटीस जाण्यास सबबी व सवड मिळणार,

यामुळें स्नेहाचें पर्यवसान सलगींत आणि वात्सल्याचें पर्यवसान व्यभिचारांत होत असावें असें वाटते.

येथा या शब्दाला छायेंत जवळ जवळ सर्वत्र श्वश्रू हा प्रतिशब्द दिलेला आहे. अत्ता हें संबोधन सामान्यतः सांकेतिक अर्थानें वापरलेलें असलें तरी हा प्रकार सर्वस्वीं निरर्थक आहे असें मानता येणार नाही. मला वाटतें, यावरून महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या मातुलकन्यापरिणयप्रथेचा सुगावा लागतो.

महाराष्ट्रीय ब्राह्मणामध्यें सातपुड्याच्या परिसरात शुक्ल यजुर्वेदी माध्यंदिन बहुसंख्य आहेत आणि सह्याद्रीच्या परिसरात ऋग्वेदी देशस्थ. आत्या, मामा व मावशी यांच्या अपत्यांचे विवाह माध्यंदिनांत होत नाहींत. ऋग्वेदी देशस्थात मामाच्या मुलीशीं लग्न होतें, इतकेंच नव्हे, दक्षिण महाराष्ट्रात व कर्नाटकात आतेच्या व बहिणीच्या मुलीशींही लग्न करण्याचा रिवाज आहे. मातृप्रधान कुटुंबपद्धतीचा हा अवशेष असणें शक्य आहे. महाराष्ट्रांतील बहुसंख्य जमातींत मामाच्या मुलीशा लग्न करण्याचा प्रघात जवळ जवळ सार्वत्रिक आहे. बालादित्य सूत्रात व बौधायन स्मृतीत मातुलकन्या विवाहाचे उल्लेख आहेत. दक्षिणापथात ही प्रथा सार्वत्रिक असल्याचा उल्लेख दसवेयालियचूर्णीत (१·१७) आहे. महाराष्ट्रातल्या ज्या जमातींवर यजुर्वेदाची छाप आहे तेथें भ्रातृहीन व मामेबहीण यांच्याशीं विवाह होत नाहींत, जेथे मराठी ऋग्वेदी देशस्थाचें वर्चस्व आहे तेथें मामे बहिणीशीं विवाह होतात आणि कर्नाटकी ऋग्वेदी देशस्थाचा प्रभाव आहे त्यांमध्यें आतेबहिणींशींही. कारण बहुजन समाजाचा धर्म हा बव्हंशी पुरोहितानुसारी असतो.

पितृप्रधान व मातृप्रधान कुटुंबपद्धतींच्या समन्वयाचें मातुलकन्यापरिणय हें प्रतीक आहे. या प्रथाश्रित विवाहामध्यें मामू ही बापाची बहीण असल्यामुळें पून मामूस अत्ता म्हणतें या उल्लेखावरून दिसतें की गाथासप्तशतीच्या काळात सातपुड्याच्या परिसरातही महाराष्ट्राच्या कुटुंबसंस्थेवर यजुर्वेदी माध्यंदिनांची छाप पडलेली नव्हती

निष्कर्ष:

गाथासप्तशतीतील गृहपति हा मराठी बहुजनसमाजांतील आजच्या खेड्यातील थेट कनिष्ठ मानाचा आद्य प्रणेता असावा. या गृहपतीच्या स्वरूपा-

वरून तो अर्थशास्त्राच्या अगोदरचा असावा असें दिसतें अर्थशास्त्राची अलीकडची कालमर्यादा खिस्तोत्तर ३०० च्या सुमाराची आहे असें अनेक प्रमाणावरून डॉ कीथ सांगतात ( Classical Sanskrit Literature p. 105 ). अर्थात् गाथासप्तशती हा ग्रंथ त्या पूर्वीचा असला पाहिजे असें या प्रमाणावरून ठरतें

गाथासप्तशतींतील एकत्र कुटुंबाचा विस्तार मर्यादित आहे. सुपीक व मैदानी भागातील शेतें विस्तीर्ण असतात, मोठ्या प्रमाणावरला व्यापार व भांडवली उद्योगधंदे शहरात चालतात मोठी शेती, मोठा व्यापार व मोठे धंदे चालतात तेथील एकत्र कुटुंबाचा विस्तारही मोठा असतो अशी परिस्थिति महाराष्ट्रात त्या काळात नव्हती किंवा ज्या भागात नव्हती तेथें गाथासप्तशतीची निर्मिति झाली असली पाहिजे

गाथासप्तशतींतली वधू विवाहाच्या वेळा जाणती झालेली आहे गौतम ( १८.२० ) सांगतो कीं ऋतुप्राप्तीनंतर तीन महिन्याचे आंत कुमारीचा विवाह केलाच पाहिजे. बौधायन ( ४ १.१४ ) व वसिष्ठ ( १७ ५९ ) हे ही मर्यादा आणखी तीन वर्षांपर्यंत वाढवतात कन्येचा विवाह ऋतुप्राप्तीनंतर फार दिवस लांबणीवर टाकू नये असा धर्मसूत्रकाराचा आग्रह आहे. मला वाटतें परकीयाच्या आक्रमणामुळें ही मर्यादा हळू हळू कमी कमी होऊ लागली असावी. खि पू. पहिल्या शतकात भारतावर शकांची आक्रमणें सुरू झालीं हेरोडोटस् सांगतो ( ४.१०४ ) शक जमातींतल्या सर्व स्त्रिया सर्व पुरुषांना उपलभ्य असत त्यांनीं भारतातही याच आचाराचा अवलंब केल्यामुळें त्यांचा ज्या ज्या प्रांतात प्रवेश झाला त्या त्या भागात कन्यांची लग्नाची वयोमर्यादा कमी कमी होऊ लागली ई स १०० च्या सुमारास कुमारिकांचे विवाह ऋतुप्राप्तीपूर्वी करण्याची प्रथा भारतात रूढ होऊ लागली ( डॉ. अळतेकर पूर्वोक्त पृ ६६ ) आणि इ. स २०० च्या सुमारास बालविवाह सर्वत्र प्रचारात आले ( पूर्वोक्त पृ ८२ ) अर्थात् गाथासप्तशतींत नमूद झालेली परिस्थिति यापूर्वीची आहे

## १३ गाथासप्तशतींतील धार्मिक जीवनः

हा विषय अनेक दृष्टीनीं महत्त्वाचा आहे एतद्विषयक उल्लेखावरून आपणास हिंदू देवदेवतांच्याच्या उत्क्रान्तीविषयीं आणि गाथासप्तशतीच्या कालाविषयीं

कांहीं अनुमान काढतां येतील, तत्कालीन धार्मिक आचार व प्रचलित समजुती समजतील सामाजिक व वैवाहिक जीवनाशीं संबद्ध असलेले आचार व उत्सव यांचा येथें ओझरताही उल्लेख केलेला नाहीं, त्याची चर्चा प्रस्तावनेच्या त्या त्या विभागात करीत आहे प्रथम गाथाकर्त्यांनीं उल्लेखिलेल्या देवदेवतांची सविस्तर माहिती अकारविल्हेनें देतों आणि अखेरीस तत्कालीन धार्मिक जीवनाची चर्चा

## ( १ ) देवः

अग्नि अग्गी अग्नि ( क्र १६२, ३२१ ), अग्निदहनण अग्निप्रदहन ( क्र ७२१ ), वडवग्गी वडवाग्नि ( क्र ४०३ ), सिही शिखिन् ( क्र १४ ), हुअवहः हुतवह ( क्र २११ २२७ )

अग्नि हा आद्य वैदिक देव आहे ऋग्वेदाचा आरंभच अग्निसूक्तानें झालेला आहे, कारण आद्य वैदिक संस्कृति ही प्राधान्येंकरून यज्ञसंस्कृति आहे अग्नि हा देवांनीं सामान्य मानवासाठीं ( ऋ १ ३६ १० ) म्हणून निर्मिलेला असला व त्याला त्यांनीं मानवाचें चक्रवर्तित्व ( ऋ ६ ७ १ ) दिलेलें असलं तरी तो विशेषत आर्यांचा पुरस्कर्ता आहे, तो आर्यांचा मार्गदर्शक ( ऋ १.५९.२ ) आहे व त्यांच्या उत्कर्षाचें प्रतीक ( ऋ ८ ९२ १ ) आहे तरीही आर्यांच्या वसाहतीचें क्षेत्र विस्तृत होत गेलें तसतसें अग्नीचें महत्त्व कमी कमी होत गेलें आणि इन्द्राचें माहात्म्य वृद्धिंगत होऊं लागलें अग्नि हा गृहस्थांचा व यज्ञाहुतींचा देव आणि इंद्र हा लोकांचा व आक्रमकांचा देव, हें याच कारण असावें असें वाटतें पुढे ऋग्वेदाच्या उत्तर भागात अग्नीच माहात्म्य ओसरलेलें दिसतें इतर देवदेवतांहून मानवी जीवनाशीं अग्नीचा संबंध विशेष निकटचा मनुष्यानें अग्नीला माणसाळवलें आणि अग्नीनें माणसाला त्यानें कुटुंबसंस्था स्थिर केली, म्हणून अग्नि हा आद्य गृहपति ( ऋ १ ६० ४ ) व मानवाचा मित्र ( ऋ १ १४१ ४ ) म्हणून ग १६३ या गाथेत अग्नीला चदम म्हटलेलें आहे अग्नि हा मर्त्यांचा रक्षणकर्ता ( ऋ ६ ८.७ ) व अमित्रांचा संहारकर्ता ( ऋ ६-८-५ ). क्र ७२१ या गाथेत अग्नीला अमित्रदहन म्हटलेलें आहे देवांसाठीं यज्ञांतील हवींचें हा वहन करतो ( १ १४०.२ ), म्हणून त्याला हुतवह म्हणताम

अग्नाचें हें अभिधान क्र २११ या गाथेंत आलेले आहे हा मृत देहांचं दहन करतो (१० १६ १–१४), म्हणून त्याला यमराजाचा मित्र म्हणतात क्र ३२१ या गाथेंत अग्नच्या या कार्याचा उल्लेख आलला आहे अग्नि हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र आणि समुद्रातला अग्नि वडवाग्नि हा बृहस्पतीचा पुत्र वडवाग्नि समुद्रात राहून त्याचें जल शोषून घेतो जलात प्रज्वलित होणाऱ्या अग्नीचे उल्लेख वेदात ( ऋ १० ४५ १, अथर्व १३ १ ५० ) अनेक आलेले आहेत अग्नीला वार्धक्य कधाही प्राप्त होत नाहीं ( १ ५८ २ ), तो वयस्क, मन्दप्रकाश झाला असें दिसतें न दिसतें तोंच तो फिरून तरुण तेज पुञ्ज ( २ ४ ५ ) होतो अग्नाची व्याति उज्वल आणि आसक्ति अनिवार, सदैव अतृप्त, जों जों भक्ष्य द्याव तों तों तो अधिकाधिक प्रज्वलित होतो, म्हणून कामविकाराला कामाग्नि ( क्र ७९३ ) म्हटलेले आहे आणि अग्नीला पारदारिक कल्पिलेलें आहे ऋग्वेदात वधूचें चतुष्पतिकत्व ( १० ८५ ४०–४१ ) सांगितलेलें आहे प्रथम सोम, नतर गधर्व, पुढ अग्नि आणि अखेरीस मानव, पैकी सोम व गधर्व यांच्या पाळ्या शैशवांत येत असल्यामुळ अग्नि हाच कुमारिकाचा पहिला भोक्ता वैवाहिक विधींमध्यें वधू अग्नींभोंवतीं प्रदक्षिणा घालते, त्यावरून ही कल्पना निघालेली असावी ( ज्ञानकोश प्रस्तावनाखण्ड २ वेदविद्या पृ ३५ ) अग्नीच्या कल्पित पारदारिकत्वाचा पुराणांनी परिपोष केलेला आहे एकदा यज्ञप्रसगीं सप्तर्षींच्या स्त्रिया दृष्टीस पडतांच हा मोहित झाला त्या याच्या वाऱ्यालाही उभ्या राहीनात म्हणून हा निराश होऊन देहत्याग करण्यासाठीं अरण्यात गेला दक्षकन्या स्वाहा हिची त्याजवर प्रीति होती ती त्याच्या मागोमाग वनांत गेली आणि सप्तर्षींच्या स्त्रियाचा रूपें क्रमाक्रमानें धारण करून तिने अग्नाला सतुष्ट केलें अग्नाला आहुती देताना 'स्वाहा' अशी घोषणा करावी लागते, ती हिच्याच साठीं मात्र वसिष्ठपत्नी अरुंधतीचें रूप तिला धारण करता आल नाहीं, कारण ती तपस्विनी व महापतिव्रता होती मार्कण्डेय पुराणांत सांगितलें आहे कीं माहिष्मती नगरीचा राजा नीलध्वज याची कन्या स्वाहा, ही यज्ञप्रसंगी अग्नि फुकविण्याला मदतीत येत असे, तिजवर अग्नि आसक्त झाला, इतका कीं इतराना फुंके मारूनही तो प्रज्वलित करता येईनासा झाला, तिच्या लालचुट ओठांतून निघणाऱ्या सुगंधित

नि श्रामाशिवाय तो फुलेनासा झाला, म्हणून आपली कन्या त्याला अर्पण करणें राजाला भाग झालें, याचा मोबदला म्हणून अग्नीनें राजाला आतिथ्य केलें आणि नागरिकांना लैङ्गिक स्वातन्त्र्य दिलें ( Sexual Life in Ancient India Dr Myer p 118 ) क्र १४ या गाथत अग्नीच्या पारदारिकत्वाचा उल्लेख आलेला आहे, सप्तर्षीच्या स्त्रिया व नीलध्वजाची कन्या यांमांवतीं तो असाच घोंगावलेला आहे

क्र २११ या गाथेंत हुतवह व वरुण यांचा उल्लेख जोडीनें आलेला आहे वरुणाचा हा उल्लेख सांकेतिक आहे वरुण हा सुवर्णाशीं संबद्ध असावा असें दिसतें हा सुवर्णाच्या निवासस्थानात राहतो ( १·१३६ २ ) व सुवर्णाची वस्त्रें परिधान करून ( १ २५.१३ ) सुवर्णाच्या सिंहासनावर ( ५ ६७.२ ) आरोहण करतो वरुण हा जलाचा स्वामी ( २.२८ ४ ) त्याचा भाऊ अग्नि ( ४ १.२ ) हा पारदारिक व तरुणीचा स्वामी म्हणून त्या उभयतांच्या कृपेनें सोन्याच्या कडदोऱ्याला नायिकेच्या जघनावर आरोहण करण्याचें भाग्य लाधलेलें आहे अग्नि व वरुण यांविषयींचे हे वैदिक संकेत गाथाकवींना माहीत आहेत गाथा सप्तशतीत त्यांची कोठें पूजा झालेली नाही

जैनांनीं दिक्पाल म्हणून आग्नेयी अग्नि स्वीकारलेला ( Jain Iconography Bhattacharya p 149) आहे बौद्धांची उठावणी प्राधान्येंकरून वैदिकांच्या यज्ञसंस्कृतीविरुद्ध असल्यामुळें त्यांनी बहुजनसमाजासाठी निर्मिलेल्या जातकादि ग्रंथात अग्नीची भरपूर मस्करी केलेली आहे एक जातककथा सांगते एकदा एका ब्राह्मणानें अग्नात तूप ओततें, यामुळें आग भडकली व विस्ताची झोंपडी जळून गेली आणि विचारतो, अशा या अग्नाच्या आराधनेनें स्वर्गप्राप्ति कशी होणार ? जो स्वत पापी आहे व जो परोपर पारमिर्द करतो त्याला देव म्हणून कम भजावयाचें ? ( Pre Buddhist India—Ratilal Mehta p 132 ) बौद्धांच्या अशा प्रचारामुळें निर्माण झालेली अग्नीच्या विषयींची उपहासवृत्ति क. २११ या गाथेंत प्रगट झालेली आहे या गाथेवरून या गाथेचा काल हा बौद्ध जातकांच्या उत्तरकालीन क्र १०३ ही गाथा रचलेली असावी कारण तेथें प्रमदादाहक अग्नालाही वन्ह्य म्हटलेलें आहे. वैदिक देवतामध्ये वरुणाचें स्थान अग्नि व इन्द्र यांच्या तोडीचें आहे बौद्धादि

यज्ञात पुष्कळ सर्पे राहिलों आहे, राष्ट्र बदलतें हें मला आता पटलें आहे, अग्नि, सोम वरुण हे सुद्धा अंत करणातून टळतात, म्हणून मी इन्द्राचा स्वीकार करतों" आर्यांनी मिळविलेल्या विजयाचा आनंद व्यक्त करण्यासाठीं शिवा आर्यांच्या वसाहतींची प्रस्थापना जाहीर करण्यासाठीं यज्ञसमारंभ साजरे करण्यात येत असत आर्यांच्या वसाहती चोहीकडे झाल्यानंतर यज्ञाचें प्रयोजनच नाहीसे झालें पुढें बुद्धयुगात ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या पीछेहाटीमुळें यज्ञसंस्था आणखी मागसली आणि यज्ञदेवतें अनाथ झाली पैसें इन्द्राला जैनांनी व बौद्धांनी दत्तक घेतर, त्याच्या गधर्व अप्सरामह जैनांच्या दैवतायतनात व शिल्पांत इन्द्र व इन्द्राणी यांना महत्त्वाचें स्थान आहे बौद्धांच्या स्वर्गातील देवांचा शक्र शक्र-इन्द्र हा अग्रणी आहे, या स्वर्गांत सपन्न प्रासाद आहेत, रम्य उपवनें व त्यात स्वच्छन्दानें क्रीडा करणाऱ्या सुदर अप्सरा आहेत, इतकेंच नव्हे, पौराणकाच्या इन्द्राप्रमाणें बौद्धांचा इन्द्रही श्रमण ब्राह्मणाच्या तपश्चर्येनें स्थानभ्रष्ट होऊ शकतो। अशोकानंतर राजाश्रयाच्या अभावा बौद्धांची भरभराट काही काळपर्यंत ओसरली आणि पतञ्जलीच्या नेतृत्वाखाली शुंगसातवाहनांनी यज्ञसंस्थेच पुनरुज्जीवन केल नाणघाटातील सातवाहनाच्या देवकुलातील शिलालेखात (ल्युडर्स क्र १११२) प्रजापति, इन्द्र, वरुण इत्यादि वैदिक देवतांना अभिवादन केलेलें आहे त्याचप्रमाणें सातवाहन कालात इन्द्रध्वज महोत्सवही होत असत असें अनुमान तरी या दैवतांचें माहात्म्य एकदां जे ओसरलें तें हळू हळू आजिवात नष्ट झाले

ऋग्वेदातील सर्व दैवतांमध्यें इन्द्रालाच स्पष्ट, साकार स्वरूप प्राप्त झालेलें आहे त्याचें शरीर व आयुधें, सवयी व व्यसनें दिनचर्या व पराक्रम यांची तपशीलावर वर्णनें ऋग्वेदात आढळतात एवढेंच नव्हे इन्द्राच्या मूर्तीचे ही उल्लेख आढळतात पहा "हा माझ्या इन्द्राला दहा गाई देऊन कोणी विकत घेईल ? हे विकत घेणारांना, जेव्हा ता तुमचे शत्रु ठार करील तेव्हा हा तुम्ही मला परत द्या" (४ २४ १०) "हे वज्रयुक्त इन्द्रा, कितीही मोठी किंमत मिळाली तरी मी तुला कोणालाही देणार नाही हजाराला नाही, दहा हजाराला नाही, अपरिमित मत्ति दिली तरी मी तुला कोणालाही देणार नाही" (८ १ ५) माहेंजेदर निपाऱ्याच्या हिंदी सैन्याच्या आघाडीचा उंच काठीवर

उभी केलेली कृष्ण किंवा इन्द्र याची लाकडी मूर्ति असें असे, असे प्राचीन पाश्चात्य प्रवासी ( Cambridge History of India Vol. I : p. 366 ) सांगतात.

क्र ८५८ या गाथेंत इन्द्राच्या लाकडी मूर्तीचा उल्लेख आहे. या गाथेचें मर्म समजण्यासाठीं इन्द्राचें चारित्र पाहिलें पाहिजे. इन्द्र हा अगीसारखाच पारदारिक. पुलोमा ह्या दैत्यकन्येचे ठायीं अद्वितीय लैङ्गिक आकर्षण होतें, म्हणून इन्द्रानें तिच्याशीं विवाह केला. लग्नापूर्वी यानें तिचा उपभोग घेतला होता असें तैत्तिरीय ब्राह्मणात सांगितलेलें आहे. स्कन्द पुराणांत सांगितलें आहे कीं इन्द्र एकदा बलिराजास जिंकून उतथ्याचे आश्रमात गेला असतां त्याच्या सुंदर स्त्रीवर यानें बलात्कार केला. हा वेष धारणात प्रवीण होता. गौतमाचा वेष घेऊन यानें अहिल्येचा उपभोग घेतला. वाचक्नवि मुनीची स्त्री मुकुंदा ही रुक्मांगद राजावर मोहित झाली होती, हें समजताच यानें रुक्मांगदाच्या वेषानें तिच्याशीं संभोग केला, अशी कथा गणेशपुराणात आहे. यानें गुरुपत्नीलाही सोडलें नाहीं. इन्द्रलोकांतील व स्वर्गांतील अप्सरा सदैव सेवेला, असूनही मर्त्य लोकांतील स्त्रियांच्या उपभोगाविषयीं इन्द्र उत्सुक असतो. याची ही अशी कीर्ति असल्यामुळें या गाथेच्या लेखकाला वाटलें कीं हालिक सुंदरीच्या स्पर्शानें त्यांच्या लाकडी मूर्तीलाही अंकुर फुटतील ! पण नाहीं. इन्द्राची असली तरी ही मूर्ति अगदीं लाकडी ठरली !

कृष्ण :- कृष्णाच्या व त्याच्याशीं संबद्ध असलेल्या व्यक्तींच्या व प्रसंगाच्या उल्लेखाचे चार वर्ग पडतात : ( १ ) खुद्द कृष्ण व त्याचीं अन्य अभिधानें : कण्ह = कृष्ण ( क्र. ८९. ११२. ११४. ४४७. ९६८ ), दामोअर = दामोदर ( क्र. ११२ ), माहव = माधव ( क्र. ४४३ ), ( २ ) विष्णूशीं सदृश असें कृष्णाचें अभिधान : महुमहण = मधुमथन ( क्र. ४२५, ६५५ ), पैकीं फक्त क्र. ६५५ हा उल्लेख कृष्णाचा आहे, ( ३ ) कृष्णाचा गोतवळा : जसोआ = यशोदा ( क्र. ११२. ६५५, ९६८ ), राहिआ = राधिका ( क्र ८९ ); ( ४ ) कृष्णाचे परिजन गोवी = गोपी ( क्र. ११४, १२८, ६५५ ) : वअवहू = व्रजवधू ( क्र. ११२ ), वल्लवी = बल्लवी. ( क्र. ८९ )

कृष्णकथा मराठी वाचकाच्या चांगल्या परिचयाची आहे. तरी जरूरीपुरता कांहीं तपशील येथें दिला पाहिजे.

माधवाच्या सहकार्यानें भीम प्रबळ झाला व त्यानें कुरुनाथाला उजव्या पायानें लाथ मारली, असा उल्लेख क्र. ४४३ या गाथेंत आलेला आहे. द्रौपदीवस्त्रहरण प्रसंगीं दुर्योधनानें आपलें डावें अंग उघडें केलें होतें, तेव्हां भीमानें त्याची डावी मांडी फोडण्याची प्रतिज्ञा केली होती. कौरवपाण्डव महायुद्धात दुर्योधनाचें भीमाचें गदायुद्ध झालें ते वेळीं भीमाचा पाडाव होण्याचा प्रसंग आला असता कृष्णाच्या सूचनेवरून अर्जुनानें डावी मांडी थोपटून भीमाला त्याच्या प्रतिज्ञेची आठवण करून दिली. भीमानें ती खूण ओळखली आणि गदेच्या प्रहारानें दुर्योधनाच्या दोन्ही मांड्या फोडल्या व त्यास लोळविलें आणि नंतर त्याच्या मस्तकावर डाव्या पायानें लाथ हाणली व त्याचें मस्तक डाव्या पायानें तुडविलें महाभारताच्या शल्यपर्वांतील यावद्दलचा उल्लेख स्पष्ट आहे. क्र. ४४३ येथें मात्र भीमानें कुरुनाथाला उजव्या पायानें लाथ मारलेली आहे. या विसंगतीचा उलगडा होत नाहीं महाभारतात असा पाठ कोठेंही नाहीं.

दक्षिण या शब्दाच्या अर्थाबद्दल संशय नाहीं. ज्यांच्या परिभ्रमणांचा प्रवाह प्रथम पश्चिमेकडून पूर्वेकडे वहात होता त्यांनी दक्षिण दिशा व उजवी बाजू यांचा समन्वय करावा हें स्वाभाविक आहे. उजव्या पायाची लाथ डाव्यापेक्षा जास्त जोरदार, ही वस्तुस्थिति आणि डाव्या पायाची लाथ जास्त अपमानकारक, ही समजूत माझे मित्र श्री. अनंतराव करंदीकर या बाबतींत एक पर्याय सुचवितात: मूळ गाथेंत किंवा छायेंत पाद हा शब्द नाहीं, भीम हा वायूच्या प्रसादानें कुंतीला प्राप्त झालेला पुत्र, त्यानें कुरुनाथाला झपाटलें; भीमाचें दाक्षिण्यवाताशीं सादृश्य दाखविणें हा या गाथेचा उद्देश आहे; शिवाय दक्षिण ही यमाची दिशा, यावर येथें उत्तर की दक्षिण, उजवी की डावी - हा प्रश्न उपस्थित होत नाहीं

क्र ६५५ मध्यें कृष्णाला महुमहण = मधुमथन म्हटलेलें आहे वस्तुत हें अभिधान विष्णूचें आहे या बाबतची कथा अशी मधु व कैटभ हे असुर ब्रह्मदेवाच्या तमोगुणापासून उत्पन्न झाले तपश्चर्येच्या सामर्थ्यानें ते देवांनाही अजिंक्य झाले. या दैत्यांशी विष्णूनें पांच हजार वर्षे युद्ध केलें व शेवटीं त्यांना मांडीवर घेऊन त्यांचा वध केला. मधुमथनाची कथा हरिवंशात ( भविष्यपर्व अध्याय १६ ) आलेली आहे कृष्ण व विष्णु यांचे ऐक्य या काळांत प्रस्थापित झालेलें होतें असें या उल्लेखावरून दिसतें.

क्र ९१८ मध्ये पाचजन्य शखांचा उल्लेख आलेला आहे. सादीपनीनें कृष्णाला वेदविद्या शिकविल्या व गायत्री मत्राचा उपदेश दिला गुरुदक्षिणा म्हणून सादीपनीला त्याचा समुद्रात गडप झालेला मृत पुत्र दत्त हा कृष्णानें परत आणून दिला शखरूप धारण करून समुद्रात राहणाऱ्या सह्लाद दैत्याचा पुत्र पचजन ह्याचा या वेळीं वध करून कृष्णान त्याच्या अस्थींपासून पाचजन्य शख बनविला व तो बरोबर आणला अशा कथा आहे

कृष्णकथा मराठी वाचकाच्या चागल्या परिचयाची असली तरी कृष्ण आणि गोपी व राधा, तसेंच कृष्ण व भागवत धर्म अगर सप्रदाय याविषयींच्या आपल्या कल्पना अस्पष्ट असल्यामुळें या उपागाची चर्चा थोड्याबहुत विस्तारानें केली पाहिजे कृष्णाचा गोपींबरोबरचा प्रेमसबध जातकात व महा भारतांत आलेला नाहीं, उत्तरकालीन पुराणात व हरिवशात आलेला आहे राधेचें नाव प्रथम नवव्या शतकात (श्री चतर्जी Bulletin of theSchool of Oriental Studies Vol VIII pp 457-466 ) ऐकू येतें असे उल्लेख गाथासप्तशतींत आलेले आहेत सबब असे उल्लेख असलेल्या गाथा प्रक्षिप्त असल्या पाहिजेत, तसें नसेल तर सपूर्ण ग्रथ उत्तरकालीन असला पाहिजे •असा काहीं सशोधकाचा निष्कर्ष आहे या आक्षेपाचें निराकरण कर ण्यासाठींही याबाबतचा तपशील पाहिला पाहिजे

गाथासप्तशतीच्या वेगवेगळ्या अकरा हस्तलिखिताचें वर्गीकरण करून श्री वेबर यांनी गाथाच्या उल्लेखानुल्लेखाचें एक कोष्टक ( पृ ३५६ ते ३७१ ) तयार केलें आहे गोपी व राधा यांचे उल्लेख असलेल्या गाथांपैकीं क्र, ८९, ११२ व ११८ या गाथा नऊ आणि क्र ४४७ व ६५१ या चार हस्तलिखि तांत आलेल्या आहेत अस या कोष्टकावरून दिसून येतें पहिल्या तीन गाथा नाहींत तीं हस्तलिखितें क्षुद्र आहेत या सर्व गाथा गगाधरानें दिलेल्या आहेत. सबब या पाच गाथा प्रक्षिप्त आहेत असा उदार पक्ष करून विवाद्य मुद्याला बगल देतां येत नाहीं

कृष्ण व वासुदेव आणि भागवत धर्म यांची परपरा फार पुरातन आहे ऋग्वेदात (८ ७४ ३ ४) आगिरस कृष्णाच्या सूक्तांत कृष्णाचा उल्लेख आलेला आहे कौशीतकी ब्राह्मणांत (३० ९) आणि छादोग्य उपनिषदांत

(३.१७.६) देवकीपुत्र कृष्णाचा उल्लेख आहे. ऋग्वेदाच्या सहाव्या मंडलातील ३५ व ३६ ही सूक्तें नर या ऋषीची आणि पुरुषसूक्त हें नारायणाचें. उत्तरकालात नर ऋषीचा समन्वय अर्जुनाशीं व नारायणाचा वासुदेव कृष्णाशीं केलेला आहे. यज्ञादि बाह्य साधनानीं परमेश्वराचें ज्ञान होण अशक्य आहे, ह्या विचारक्रान्तींतून औपनिषदिक ज्ञानमार्ग निर्माण झाला आणि निर्गुणोपासक ज्ञानमार्ग हा बहुजनसमाजाच्या आटोक्याबाहेरचा आहे असें प्रत्ययास आल्यामुळें त्यांच्यासाठीं सगुणोपासक भक्तिमार्ग वासुदेव कृष्णानें स्थापन केला. भागवत धर्म हें यज्ञसंस्थेविरुद्ध व वैदिक दैवताविरुद्ध बंड आहे. भागवतांत व पुराणांत कृष्णाच्या इंद्राबरोबर झालेल्या युद्धाचे उल्लेख आहेत. भगवान् कृष्णाचा भागवत धर्म ख्रि. पू. पंधराव्या शतकाच्या सुमारास उदयास आला असावा असा डॉ केतकराचा अभिप्राय आहे. ख्रि. पू. आठव्या शतकाच्या सुमारास पाणिनीनें अष्टाध्यायींत (४.३ ९५-९९) वासुदेवाच्या भक्तिसंप्रदायाचा उल्लेख केलेला आहे. त्या अर्थी यापूर्वीच कृष्णाला दैवताचें स्वरूप प्राप्त झालें असलें पाहिजे असें श्री. ग्रीयर्सन (I A : 1908 p. 258) यांचें मत आहे. बाविसावा तीर्थंकर अरिष्टनेमि याचा कृष्ण वासुदेव हा पुतण्या होय, असा उल्लेख उत्तराध्ययन सूत्रात आलेला आहे. ख्रि. पू. चवथ्या शतकात प्रचलित असलेल्या धर्माचा उल्लेख बौद्ध सुत्तनिपातावरील निद्देस या टीकेंत आलेला आहे. यांत वासुदेवाच्या संप्रदायाचा निर्देश केलेला असून तो तुच्छ मानलेला आहे. धर्मसंस्थापक वासुदेव कृष्ण आणि महाभारतातील पाण्डवसखा कृष्ण हे भिन्न आहेत असें प्रा. मॅकडोनेल यांचें मत (History of Sanskrit Language : p 457) आहे. मथुरेच्या आसपास स्थायिक असलेल्या शूरसेनामध्यें प्रचलित असलेल्या कृष्णरूपी विष्णूच्या पूजेचा उल्लेख आद्य मौर्यांच्या दरबारातला ग्रीक वकील मेगॅस्थेनिस यानें (मॅक्‌क्रिंडल: पृ. २०१) केलेला आहे. ख्रि. पू. तिसऱ्या व दुसऱ्या शतकातील शिलालेखांत (नाग्री, घोसुंडी व बेसनगर) वासुदेव व संकर्षण यांच्या भक्तांचा उल्लेख आलेला आहे. संकर्षण हा वासुदेवाचा सहचर असें पाणिनी सांगतो. संकर्षण व बलराम हे एकच असें कांहीं आधार सांगतात. कृष्णाप्रमाणें बलरामाच्याही पूजेचे उल्लेख आढळतात. वैष्णव आगमानुसार हीं नारायणाचीं रूपें आहेत. घोसुंडी व बेसनगर येथील

शिलालेखांवरून दिसतें की परकीयानाहि भागवत धर्माचा स्वीकार करता येत असे. बौद्धाप्रमाणें भागवतांनी या परावर्तनप्रथेचा उपयोग राजकीय कारणासाठीं किंवा पुरस्कारासाठीं करून घेतलेला दिसत नाहीं शुंग व कण्व घराण्यांत अनुक्रमें भागवत व वासुदेव नावाचे राज्यकर्ते झालेले आहेत खि पू दुसऱ्या शतकात पतंजलीनें महाभाष्यात ( ४ ३.९८ ) कृष्ण वासुदेवान्या सांप्रदायाचा उल्लेख केलेला आहे

खि. पू तिसऱ्या शतकाच्या सुमारास भागवत धर्म महाराष्ट्रात बद्धमूल झाला होता यावद्दल निर्विवाद पुरावा उपलब्ध आहे सातवाहन कुलातल्या दुसऱ्या राजाचें नाव कृष्ण होतें तें पौराणिक वशावळींत, त्याचप्रमाणें नाशिकच्या पाण्डवलेण्यात नमूद आहे. हें लेणें बौद्ध आहे नाणेघाटातील सातवाहनाच्या देवकुलातील नायनिकेच्या यज्ञलेखात आरंभीं सकर्षण वासुदेवाना आणि वैदिक दैवतानाही वदन केलेलें आहे यावरून आद्य सातवाहन हे धर्मानें वैदिक पण वृत्तीनें भागवत होते असा निष्कर्ष निघतो त्याचप्रमाणें या काळात वैदिक व भागवत धर्मांचा समन्वय झाला होता असेंही ठरतें शिवाय या उल्लेखावरून सातवाहनाच्या धार्मिक सहिष्णुतेचाही खुलासा मिळतो महाराष्ट्रातील सातवाहनाचे उत्तराधिकारी वाकाटक व त्याचे समकालीन उत्तरार्यावर्तातील गुप्त सम्राट हे तर स्वतःला परमभागवत, परमवैष्णव म्हणवितात ह त्याच्या शिलालेखावरून व नाण्यावरून स्पष्ट दिसतें

ऋग्वेदात यदूचा उल्लेख एकवचनी ( १ १०८ ८ वगैरे ) आणि यादा अशा अनेकवचनीही आलला आहे इतिहासपुराणानुसार यदु हा ययातीचा ज्येष्ठ पुत्र यदूचे वशज ते यादव शुक्राचार्यांच्या शापामुळें ययातीला वार्धक्य आलें त्यानें मागितलेलें तारुण्य त्याला देण्याचें यदूनें नाकारलें म्हणून ययातीनें त्याचा राज्याधिकार नष्ट केला तरी पुढें यदूला त्याच्या राज्याचा काही भाग मिळाला मात्र ययातीन यदूला राज्यभ्रष्ट केल्यामुळें यदूच्या कृष्णादि वशजाना गवळी म्हणत, कारण यादवजन हे गोपालन करीत यादवजन यमुनेच्या परिसरात मथुरेपासून प्रयागपर्यंत स्थिरावले आणि कृष्णाच्या नेतृत्वाखालीं सौराष्ट्रात व गोमत पर्वताच्या परिसरात काही आधारानुसार भोज व भीमक हे यदुच भाऊ भोजाचे वशज सौराष्ट्र अवन्ति व विदर्भ या भागात स्थायिक झाले विदर्भ उर्फ भीमक उर्फ भीष्मक हा विदर्भाचा आद्य राज्यकर्ता,

पार्गिटर याना ययातीला मनूपासून सहाव्या व विदर्भाला चाळीसाव्या पिढीत मांडला आहे (A I H T : pp 144-6) त्याची राजधानी कुण्डिनपूर येथें होती हा रुक्मिणीचा पिता व कृष्णाचा सासरा रुक्मी हा भीमकाचा पुत्र. यानें भोजकट येथ राजधानी स्थापन केली कृष्ण व रुक्मिणी याचा पुत्र प्रद्युम्न याचा विवाह रुक्मीची कन्या शुभांगी हिजबरोबर झाला आणि प्रद्युम्नाचा पुत्र अनिरुद्ध याचा विवाह रुक्मीच्या नातीशी झाला संकर्षण, वासुदेव, प्रद्युम्न व अनिरुद्ध या चौघावर व्यूहसिद्धात आधारलेला आहे विदर्भाचा दहावा वंशज भीमरथ, याचे नाव भीमरथी उर्फ भीमा या नदीस मिळालेले आहे भोज व महाभोज याचे सातवाहनकालीन शिलालेख अपरान्तात मिळालेले आहेत कृष्णाच्या काळात यादव स्थायिक झाले होत त्याच प्रदेशात अर्वाचीन काळात यादवांच्या सत्तेचा उदय झाल्ला आहे नवव्या शतकात सेउणचद्र यादवानें सेउण देशात, अर्वाचीन खानदेशात सेउणपुर येथें मांडलिकी राजधानी स्थापन केली आणि दहाव्या शतकात तैलप चालुक्याच्या वतीने नर्मदेच्या परिसरात परमाराचा पराभव केला कर्नाटकातील होयसळ बल्लाळ हेही यादवच आहेत एकूण इतिहासपूर्व कालापासून महाराष्ट्रात यादवाचा प्रवेश व प्रसार झालेला आहे या गोपालानीं राधाकृष्णाच्या व कृष्णगोपींच्या प्रेमाच्या लोकगीतांचा प्रसार या भागात केला असला पाहिजे मातुलकन्यापरिणय हें यादव सस्कृतीच्या महाराष्ट्रावरील प्रभावाचे द्योतक व गमक आहे

सातवाहन कालात महाराष्ट्रात अभीर जमात प्रविष्ट झालेली आहे महाभारतात (९ ३७ १) अभीर पश्चिम राजपुतान्यात मांडलेले आहेत पाणिनीच्या काळात अभीर सिंधत होते आणि अशोककालात सौराष्ट्रात गुडा शिलालेखात (E I XVI 235) माळव्याच्या रुद्रसिंह क्षत्रपाचा सेनापति रुद्रभूति अभीर याचा उल्लेख आहे खि पू पहिल्या शतकात अभीर पश्चिम भारतात वसले असावेत असा पेरिप्लसवरून दिसते विष्णुपुराणात (Wilson II III. p 182 5) अभीर सौराष्ट्रात व परियात्र पर्वताच्या परिसरात मांडलेले आहेत आणि मार्कण्डेय पुराणात (५७ ३५ ३६) अपरान्तात यज्ञश्री सातवाहनानंतर महाराष्ट्राची राजसत्ता अभीराचे हातीं गेली असावी असें पाण्डव लेण्यातील ईश्वरदत्ताचे शिलालेखावरून दिसतें याचे पूर्वज हे क्षत्रपाचे सेनापति असावेत असा पडित भगवान लालाचा अदाज आहे (J B. B R A S 1890:

p 631) पुराणात अभीराचे सात ते दहा राजे निर्देशित करून दिलेले आहेत व त्याना ६७ वर्षांचा राज्यकाल दिलेला आहे त्याचा राजधानी नाशिकच्या आसपास असावी अभीर या अभिधानाचा अर्थ गवळी असा आहे असें डॉ हेरास सागतात ग्वालेर, गाविलगड, गोवळकोंडा, गोवळकोट वगैरे स्थानें हीं अभीराच्या प्रसाराचीं द्योतक आहेत मला तर वाटतें कीं गोदावरीचें गोला हें प्राकृत प्राचीन अभिधान अभीर गोपालाच्या माहात्म्याचें द्योतक असावें गोदावरीच्या आसमंतात आणि गिरणा तापी व प्राणहिता याच्या खोऱ्यात इसवीहीं अभीराची वस्ती आहे त्याच्या प्रभावामुळेंच गोदावरी या अभिधानाचा सबध ग ईशीं जोडण्यात येऊ लागला असावा श्री राजारामशास्त्री भागवत सागतात कीं अभीर हे अवैदिक व गाईची पूजा करणारे आणि ब्राह्मण हे वैदिक यज्ञ सस्थाभिमानी व गाईची हत्या करणारे या अवैदिक-वैदिकाचा सघर्ष तात्त्विक, धार्मिक, बौद्धिक व राजकीय पार्श्वभूमीवर झाला असला पाहिजे इंद्रध्वज महोत्सवाचे ऐवजीं कृष्णानें पर्वत व गाई यांचा उत्सव करण्याचें ठरविलें तो फसावा म्हणून इद्रानें अतिवृष्टि केली तेव्हां कृष्णानें गोवर्धन पर्वत उचलून धरला आणि आपल्या अनुयायाचें रक्षण केलें या कथेचें मर्म या सघर्षाचें द्योतक आहे अभीराच्या तत्त्वज्ञानाला बौद्ध अहिंसाधर्माचा पाठिंबा मिळाला आणि अहिंसाप्रधान व सहिष्णु भागवतधर्माचा त्या काळात विजय झाला अभीर हे बलदेव-कृष्णाचे पूजक त्यानीं कृष्णलीलेच्या काही कथा बरोबर आणल्या व स्वत च्या वृत्तीच्या द्योतक अशा काहीं प्रेमकथा निर्माण केल्या व प्रसृत केल्या वैदिक दैवताना मान्यता न देणाऱ्या जमातींना सामावून घेण्या साठीं त्याच्या अवैदिक दैवताना पौराणिकानीं योजिलेल्या एकीकरणाच्या प्रचड सघटनेंत समाविष्ट करून घेतलें आणि सामान्य ग्रामीणाना व नागरी रसिकांना रुचताल अशा राधाकृष्णाच्या प्रेमकथा उत्तरकालीन कवींनीं निर्माण केल्या गाथासप्तशतींत कृष्णाचे राधा व गोपी यांशीं सबध असलेले प्रसग असे व आहेत क्र ७०५ या गाथेंत अभीरी बळजोरीचा उल्लेख आहे एकाद्या मराठी गवळणींत साजतील असे हे उद्गार आहेत धनुर्धर अर्जुनाच्या सरक्षणाखालीं असलेल्या यादव स्त्रियाचही ज्यानीं अपहरण केलें ते काय अशा एकाकिनीला सोडतील ?

गणपती गणवई = गणपति क्र ३७२, गणाहिवई=गणाधिपति क्र ४०३ गाथासप्तशतीतील दैवतांपैकी गणपतीचे बाबतीत कालनिर्णयाचे मुद्यावर संशो-धकामध्ये जें रण माजलें होतें तें मुख्यत्वेंकरून क्र. ३७२ मधील उल्लेखावरून. कारण गणपति हें दैवत प्राचीन नाहीं असा विद्वानांचा अभिप्राय आहे आणि येथें तर गणपति हा देव, त्याची मूर्ति व पूजा असा तिहेरी उल्लेख आहे हा उल्लेख उच्छिष्ट गणपतीची उपासना करणाऱ्या वाममार्गी गाणपत्याचा असावा असें मत श्री राजारामशास्त्री भागवत ( प्राकृत भाषेची विचिकित्सा पृ ७६ ) यानीं मांडले आणि वाममार्गी तान्त्रिक-संप्रदाय अर्वाचीन असल्यामुळे गाथा-सप्तशती हा ग्रंथ सातवाहनकालीन नसून गुप्तोत्तर-कालात व नवव्या शतकाच्या सुमाराचा असावा असा कांहीं संशोधकांनीं निष्कर्ष काढला गणपति हें दैवत शालिवाहन शकाच्या पहिल्या शतकात अस्तित्वात होतें, असें उपरोक्त गाथाच्या अनुरोधानें प्रतिपादन करणारे लेख पुरातत्त्वभूषण श्री राजवाडे यानीं सरस्वती मंदिर या त्रैमासिकात ( आश्विन व माघ शके १८२७ ) प्रसिद्ध केलें या गाथा प्रतिष्ठित, मातृपितृसपक्ष व निश्चितवयस्क आहेत असें त्याचें म्हणणें होतें. या लेखांना विद्याभूषण श्री कृष्णशास्त्री घुले याना विविधज्ञानविस्तारात ( जानेवारी व जून १९०६ ) उत्तर दिलें आणि गणपतीच्या उल्लेखामुळें गाथा सप्तशती हा ग्रंथ तेराशें वर्षांपलीकडे जात नाही असें मत मांडलें यानंतर अनेक वर्षांना हा वाद पुन्हा सुरू झाला श्री घुलेशास्त्री यानी पूर्वपक्ष केला ( वागीश्वरी वर्ष १, अंक १ ) आणि श्री राजवाडे यानीं गाथासप्तशती व हाल सातवाहन यांच्यासंबंधीं केलेली विधानें अविश्वनीय आहेत असा एक नवा मुद्दा मांडला या लेखाला श्री अप्रबुद्ध यानीं आवेशपूर्ण उत्तर (वागीश्वरी वर्ष २ अंक १ ) दिलें या उत्तराला शास्त्रीजींनीं दिलेलें प्रत्युत्तर वागीश्वरी-तच प्रसिद्ध झालेलें आहे

श्री घुलेशास्त्री यांच्या विचारसरणीचा गोषवारा असा

ऋग्वेदात गणपति हा शब्द आढळतो, पण त्या काळीं गणपतीची पूजा होत होती असें या उल्लेखावरून सिद्ध होत नाहीं मैत्रायणी संहितेंत व नारा-यणोपनिषदात गजाननाची गायत्री आहे आणि महाभारतात गजाननाचे उल्लेख आहेत, ते प्रक्षिप्त आहेत या काळात गणपति हें नाव महादेव या अर्थानें रूढ होतं मानवगृह्यसूत्रातील उल्लेखावरून दिसतें कीं विनायक हो

क्षुद्रदेवता असून ती अपायकारक आहे. मूळ विनायक अनेक होते, गुह्यसूत्रात त्याची संख्या चारावर आली आणि याज्ञवल्क्य स्मृतींत त्याचे एकीकरण होऊन त्याला अम्बिकेच्या मांडीवर बसविण्यात आलें, म्हणून त्याचे पितृपद महादेवाला मिळालें. या वेळीं त्याला दोनच हात होते व अद्याप त्याला शुंडा चिकटविण्यात आलेली नव्हती. रु द्रगुप्तच्या शिलालेखांत गणपति नाग या राजाचें नाव आलेलें आहे व ललितविस्तारात गणपतीचा उल्लेख आहे पण त्याची पूजा होत होती असें या उल्लेखावरून सिद्ध होत नाहीं. गणपति ही देवता सहाव्या शतकाच्या सुमारास उत्कर्षात आली असें खुद्द डॉ. भांडारकर सांगतात, तेंच बरोबर आहे अर्थात या उल्लेखावरून गाथासप्तशतीचा काळ सहाव्या शतकाच्या पुढचा ठरतो

श्री अप्रबुद्ध यांनी केलेल्या उत्तरपक्षाचा गोषवारा असा :

अंबिकापुत्र विनायकाचें सकटनिवारणार्थ दूर्वादिकांनीं अर्चन करावें असें याज्ञवल्क्य सांगतो. याचा काल तिसरें शतक गणपतीची पूजा त्यापूर्वी दोन तीनशें वर्षे तरी अस्तित्वात असली पाहिजे. महायान पंथाचा आद्य प्रवर्तक राहुलभद्र याला श्रीकृष्ण व गणेश याच्या उपासना माहीत होत्या असे लो- टिळकांनीं तिबेटी ग्रंथाच्या आधारानें गीतारहस्यात दाखवून दिलेलें आहे. याचा काल ख्रि पू. दुसरें शतक अर्थात् गणपतीची उपासना कमींत कमी त्या कालपर्यंत जाते सबब गाथासप्तशती हा ग्रंथ बेधडक दुसऱ्या शतकांत ठेवतां येईल.

या वादाची भूमिका गाथासप्तशतीच्या कालनिर्णयाशींही संबद्ध असल्यामुळे या विषयाची चर्चा थोड्याफार तपशीलानें करणें अवश्य आहे.

वैदिक दैवतात गणपतीला स्थान नाहीं ऋग्वेदातील 'गणानां त्वां गणपतिं' हा उल्लेख आलेला आहे त्या सूक्ताची ( २ २३.१ ) देवता बृहस्पति किंवा ब्रह्मणस्पति ही आहे आणि 'नि सु सीद गणपते गणेषु त्वाम् आहु ' हा उल्लेख आलेला आहे त्या सूक्ताची ( १० ११२ ९ ) देवता इंद्र ही आहे ऐतरेय ब्राह्मणातील उल्लेखही ( १ २१ ) याच देवताना उद्देशून आलेला आहे या विधानावरील टीकाच्या आधारानें डॉ दिवेकर ( महाराष्ट्र विस्तार: वर्ष २० अंक ४ ) सांगतात. " देवतेस म्हणत वर्दळही असोत, अत्यंत विद्वान्, गणाचा

गणपति, विघ्नांपासून रक्षण करणारा व कोणतेंही कर्म ज्याशिवाय होत नाहीं अशी एक देवता ऋग्वेदकाळीहि मानलेली होती " उपनिषद् कालापर्यंत बृहस्पति हीच ज्ञानाचा देवता होती गणपतीला हें स्थान बऱ्याच उशीरा मिळालेलें आहे बृहस्पतीच्या हातीं परशु असे, तो पुढें गणपतीच्या हातीं आला, यावरून या दोन्ही देवतांच्या मुळाशीं एकच कल्पना असली पाहिजे, किंबहुना गणपति हें बृहस्पतीचेंच उत्क्रांत स्वरूप असले पाहिजे असा श्री. राव ( Elements of Hindu Iconography Vol I. Part I. p 45 ) यांनीं निष्कर्ष काढला आहे उत्तरकालीन पुराणांनी या परशूचा संबंध परशुरामाशीं जोडलेला आहे यजुर्वेदांत गणपतीचें कार्य रुद्राकडे गेलेलें आहे हें दिवेकर सांगतात ( पूर्वोक्त ) ' ऋग्वेदकालीं जें मुख्यत्व गणाधिपत्य बृहस्पतिविंवा इद्रासारख्या देवाकडे होते ते यजुर्वेदकाला विघ्नकूर रुद्राकडे आलें मैत्रायणी संहितेंत ( २ ६ १ ) गाणपत्याचा उल्लेख आहे तैत्तिरीय आरण्यकात (१० १ ५) 'तत्पुरुषाय विद्महे वक्रतुडाय धीमहि तन्नो दन्ति प्रचोदयात्' हा मंत्र आलेला आहे मानवगृह्यसूत्रात विनायक हा चार देवतांचा संघ आहे या समूहातून उत्तरकालांत गणपति-विनायक हें एकमेव दैवत उत्पन्न झाले. बौधायन धर्म सूत्रात (२ ५) एकदन्त, लम्बोदर, वक्रदन्त, हस्तिमुख वगैरे विशेषणें गणपतीला लावलेलीं आहेत याज्ञवल्क्य स्मृतींत ( १ २७१ ) पुढील वचन आढळतें.

विनायकः कर्मविघ्नसिध्यर्थं विनियोजित
गणानामाधिपत्येच रुद्रेण ब्रह्मणा तथा ॥

पुरुषार्थांचीं साधनें जीं कर्में त्यांत विघ्नें करण्याकरितां विनायकास पुष्पदन्तादि गणाच्या आधिपत्याचे ठायीं योजिलेलें आहे, अर्थात् विनायक ही दुष्ट देवता कर्मांत विघ्न आणणारी असून पूजादिकांच्या योगानें संतुष्ट केली असतां विघ्नाचा नाश करणारी आहे गणपतीला" विघ्नहर्त्या इष्ट दैवताचें स्वरूप पुराण कालांत प्राप्त झालेलें आहे सर्व उपलब्ध पुराव्यावरून डॉ भांडारकर निष्कर्ष काढतात की याज्ञवल्क्यानें वर्णिलेलें गणपति-विनायकाचें स्वरूप हें त्याचें आद्य स्वरूप असावें, विनायकाच्या शांतीच विधि ख्रिस्तपूर्वकालीन असावेत आणि पुराणांतलें स्वरूप त्याला गुप्तोत्तर कालात, सहाव्या शतकाच्या सुमारास प्राप्त झालेलें असावें ( वैष्णविझम् ॲण्ड शैविझम्' पृ १४९ व २११ )

या व तत्सम पुराव्यावरून श्री खरे ( मूर्तिविज्ञान पृ १५० ) सांगतात वेद-काळीं यज्ञमार्गी लोकामध्ये दोन परंपरा असाव्यात, पैकीं ऋग्वेद, बृहदारण्यक वगैरेंच्या पंथामध्यें गणपतीला महत्त्व नव्हतें, उलट मैत्रायणी संहिता, अथर्व वगैरेंना प्रमाण मानणाऱ्याच्या पंथांत वैदिक दैवतांप्रमाणेंच रुद्रकुटुंबांतील देवतानाही प्रामाण्य होतें आणि बौधायन सूत्रांत गणप्रतीप्रमाणेंच अनेक देवतांच्या मूर्तींचे उल्लेख आलेले आहेत, त्यावरून त्या काळींही गणपतीच्या मूर्ति होत्या हें निश्चित

व्यासांनीं महाभारत सांगितलें व तें गणपतीनें लिहिलें अशी कथा महाभारताच्या प्रस्तावनेत आहे याबाबत अनुमान करण्यांत आलेलें आहे कीं विनायक ही एक प्राचीन एतद्देशीय जमात असावी, या जमातींतील कोणा व्यक्तीनें लेखनपद्धति शोधून काढली असावी आणि या सांस्कृतिक कार्याबद्दल त्याचा नायक गणपति ह्याला देवपद देण्यात आलें असावें महाभारताच्या दाक्षिणात्य प्रतींत मात्र ही कथा आढळत नाहीं, सबब ती प्रक्षिप्त असावी असा संशोधकांचा कयास आहे तंत्रमार्गानें ही दंतकथा स्वीकारलेली आहे शिवानें गायत्रीतंत्र सांगितलें व तें गणपतीनें लिहिलें ( महानिर्वाणतंत्र अॅव्हॅलॉन पृ ४. टीप ) याचें प्रतीक म्हणून कोठे त्याच्या हातीं पोथी दिलेली आढळते पुराणकारांनीं गणपतीच्या निर्मितीबद्दल अनेक कथा दिलेल्या आहेत सोमेश्वराची पूजा व यात्रा करणारांना शंकरानें स्वर्गप्राप्तीचा हमी दिल्यामुळें वस्तुत ज्यांचें मरणोत्तर स्थान नरकांत त्यांची स्वर्गांत गर्दी झाली. इंद्रादि देवांनीं याबद्दल तक्रार केला असतां त्यानें पापी भक्तांना दिलेला शब्द परत घेण्याचें नाकारलें तेव्हा देव पार्वतीकडे गेले स्वर्गप्राप्तीची इच्छा करणाऱ्या नालायकांच्या निवारणासाठीं तिनें स्वत च्या शरीरावरील उटण्यापासून विघ्नेश्वराची निर्मिति केली आणि स्वर्गप्राप्तीसाठीं केवळ सोमेश्वराच्या यात्रेवर विसंबणाऱ्यांच्या मार्गांत विघ्नें उत्पन्न करण्याची कामगिरी त्याजवर सोंपविली, मात्र जे तुझी शांति करतील त्यांना साह्य कर असाही आदेश त्याला दिला शिव तप करीत असतां त्याच्या कपाळातून प्रकट झालेल्या दिव्य तेजाचें गणपति हें मूर्त स्वरूप आहे असें वराहपुराणांत सांगितलें आहे याप्रमाणें गणपति हा आपल्या सहकार्याशिवाय निर्माण झालेला पाहून पार्वतीनें त्याला शाप

दिला कीं तुझें पोट देवरें होईल व तुझें मस्तक हत्तीसारखें येटव होईल पार्वती स्नान करीत होती व गणपति द्वाररक्षण करीत होता, त्यानें शंकरालाही मज्जाव केला, म्हणून शंकरानें याचें मस्तक तोडलें पार्वतीच्या सांगण्यावरून शंकरानें त्याच्या धडावर इंद्राच्या ऐरावताच्या पुत्राचें मस्तक बसवून त्याला सजीव केलें गणपतीच्या गजमुखाचें स्पष्टीकरण करण्यासाठीं पुराणात आणखी एक कथा सांगितलेली आहे हिमालय पर्वतावर हत्ती व एक हत्तीण याची क्रीडा पाहून आपणही त्याच्या रूपात क्रीडा करावी अशी शंकरपार्वतींना इच्छा झाली त्यांनीं तशी क्रीडा केली व त्यांना गणपति झाला या व अशा आणखी अनेक दंतकथांचा विचार केला असता दिसून येतें कीं परस्परविरोधी धार्मिक समजुती गणपतीच्या निर्मितीच्या मुळाशीं आहेत वैदिक व अवैदिक समाज व समजुती याचा संघर्ष समेट व संकर या दैवतात सामावलेला आहे

गणपतीला बौद्धानांही आपल्या देवतांमध्यें स्थान दिलेलें आहे गणपतिहृदय या नांवाचा मंत्र खुद्द बुद्धानें आनंद भिक्षूला राजगृह येथें सांगितला अशी दंतकथा आहे ( Nepalese Buddhist Literature Mitra p 89 ) या मंत्रात गणपतीचें ध्यान वर्णिलेलं आहे खि पू तिसऱ्या शतकात सम्राट् अशोकाची कन्या चारुमती हिनें नेपाळात पशुपतिनाथाच्या मंदिराच्या उत्तरेस गणेशाचें देवालय उभारलं अशी नेपाळी दंतकथा आहे, पण ही कथा विश्वसनीय नाहीं असा संशोधकांचा अभिप्राय ( South Indian Images Sastri p 168) आहे महायान पंथाचा आद्यप्रवर्तक राहुलभद्र याला श्रीकृष्ण व गणेश यांच्या उपासना होत्या बुद्धाच्या परिनिर्वाणप्रसंगीं मूषकवाहन गणपति हजर असल्याचें उत्तर गुप्तकालीन शिल्प सारनाथ येथें आहे ( Iconographie Buddhique de l' Inde A Foucher ' Pl xxx ) अमरावती येथेंही गणपतीची बसलेली मूर्ति प्राप्त झालेली आहे

या प्रकारची तांत्रिक गणपतीचा संबंध अरबस्तानशीं त्याचाही विचार केला पाहिजे

'प्राकृत भाषेची विविधि रूपं' ही लेखमाला 'न्यायमूर्तींच्या घरणी काहि रेलो माऊ' या शीर्षकाखाली प्रथमानें प्रसिद्ध झाली त्या काळांत प्राकृत हा

तिरस्कारानें यांदे उडविण्याचा विषय होता प्राकृत भाषा व साहित्य याना अलीकडेच विद्वानांची व विद्यापीठाची मान्यता मिळालेली आहे दरम्यानच्या काळात श्री राजवाडे यांचे लेख सरस्वतीमंदिरात प्रसिद्ध झाले यापैकी पहिल्या लेखात ते म्हणतात " या गाथेंत केवळ साधाच गणपति उल्लेखिलेला नाहीं तर वाममार्गी गाणपत्य ज्या उच्छिष्ट गणपतीची पूजा करतात त्या सकलमन कामना पुरविणाऱ्या देवतेचा उल्लेख केलेला आहे ' श्री धुले शास्त्री यांनीं हीं विधानें मान्य केलीं, कारण त्याना गाथासप्तशतीचें प्राचीनत्व नाकारावीत करावयाचें होतें प्राचीन ऐतिहासिक युगाच्या अखेराच्या सुमारास तन्त्रमार्ग निर्माण झाला व मध्ययुगात त्याचा विशेष प्रचार झाला असें साधारणपणें सर्व संशोधक मानीत उच्चार व पुनरुच्चार यामुळ या विधानाला सिद्धान्ताचें स्वरूप आलेल आहे तान्त्रिक दैवतें व त्याची पूजा हीं क्रमात कमी वैदिक दैवतें व त्याची पूजा याच्याइतकीं पुरातन आहेत किंबहुना शाक्त दैवतें हींच आद्यदैवतें आहेत, असा तन्त्रमार्गीयाचा आग्रह आहे उभय पक्षाची अतिशयोक्ति वगळली असतां दिसून येतें कीं तन्त्रमार्ग हा कमींत कमी खि पू दुसऱ्या शतकाइतका प्राचीन असला पाहिजे उच्छिष्ट-गणपति, कुलार्णव तन्त्र व महानिर्वाण तन्त्र या तन्त्र ग्रथांच्या आधाराने गणपतीबद्दलची संकलित माहिती येथें देतों

तन्त्रमार्गांत गणपतीला महत्वाचं स्थान आहे कुलार्णव तन्त्रात त्याला गजमुख म्हटलेलें आहे महानिर्वाणात गणपतीचें ध्यान सांगितलं आहे त्याचा वर्ण शेंदरी असून त्याला तीन डोळे आहेत, मस्तकावर चद्रकला आहे व सोंडेंत मधाचा कुभ आहे, एक वरदहस्त असून बाकीच्या हातांत शख, पाश व अंकुश आहेत वाममार्गी शाक्तानी गणपती । शिवपार्वतीहून अधिक महत्त्व दिलेल आहे ब्रह्मचारी गणपतीला पौराणिकानीं बुद्धि व सिद्धि या भार्या दिलेल्या आहेत तन्त्रमार्गी गणपतीची लक्ष्मी ही भार्या किंवा शक्ति शाक्त गणपतीचे पाच मुख्य प्रकार आहेत उच्छिष्ट-गणपति ऊर्ध्व-गणपति पिंगल गणपति महागणपति व लक्ष्मी-गणपति नवनीत गणपति, सतान गणपति, स्वर्ण गणपति व हरिद्रा गणपति हे प्रकारही काहीं आधारग्रथांत नमूद आहेत त्यांचीं लक्षणं सांगितलीं आहेत, तीं अशीं

| मूर्ति | वर्ण | नेत्र | हस्त | हातीं- | शक्ति |
|---|---|---|---|---|---|
| उच्छिष्ट- | लाल | — | ४ | डाळिंब, वीणा, कमळ, पाश, अंकुश, मोदक, धनुष्य बाण | विवस्त्र आलिंगित. |
| ऊर्ध्व- | पिंवळा | — | ६-८ | उंसाचें धनुष्य, कपीस व फुलांचा बाण | आलिंगित |
| पिंगल- | ,, | — | ६ | आंबा, ऊस, कल्पकता, लाडू | श्री व समृद्धि या शक्ति |
| महा- | लाल | — | ८,१०, १२ | उंसाचें धनुष्य, डाळिंब व कर्णाम | आलिंगित. |
| लक्ष्मी | शुभ्र | — | ४,६,८ | पोपट, कल्पकता, बाण, कमळ | पीतवर्ण शक्ति, हातीं कमल. |
| हरिद्रा | पिंवळा | ३ | ४ | ( उपासकाच्या दंडावर तप्तमुद्रांकित एकदन्त गजमुखाचें चिन्ह ) | |

आनंदतीर्थांच्या शंकरदिग्विजयात ( दहावें शतक ) सांगितलें आहे कीं उच्छिष्ट गणपति पंथाचे शाक्त भक्त मूर्तीची पूजा डाव्या हातानें करतात, जातिभेद मानीत नाहींत, स्त्रीसंभोगाचे बाबतींत कोणताही निर्बंध जुमानीत नाहींत, तान्त्रिक उपासक पूजा करताना 'नग्ननारिरत', 'नारीयोनिरसास्वाद' अशा गणपतीचें ध्यान करतात, ह्या पूजेचें पुण्य 'स्वयोनिवत्' गोपनीय आहे. उच्छिष्टगणपत्युच्छिष्टचाण्डालिन्युपासना ( संपादक श्री गोविंद परशुराम शास्त्री, प्रकाशक : श्री वेंकटेश्वर स्टीम मुद्रणालय शके १८२९ ) या पोथींत उच्छिष्टगण-पतीचीं ध्यानें दिलेलीं आहेत, तीं अशीं -

चतुर्भुजं रक्ततनुं त्रिनेत्रं
पाशाङ्कुशौ मोदकपात्रदंतौ ॥
करैर्दधानं सरसीरुहस्थम्
उन्मत्तमुच्छिष्ट गणेशमाडे ॥

ॐ शरान्धनुः पाशसृणी स्वहस्तैः
दधानमारक्त सरोरुहस्थम् ॥
विवस्त्रपत्न्यां सुरतप्रवृत्तम्
उच्छिष्टमम्बासुतमाश्रयेहम् ॥

वेगवेगळ्या कार्यांच्या सिद्धीसाठीं उच्छिष्ट गणपतीच्या पूजेचे वेगवेगळे विधि सदर पोथींत सांगितलेले आहेत; त्यापैकीं कांहीं येथें देतों:

"अभिलषितबालाचिवस्त्रोपरि गणेशं संस्थाप्य प्रत्यहमष्टोत्तरशतं जपेत् दिनत्रयादाकर्षयति। तं गणेशं नद्यां नीत्वा प्रक्षाल्य स्वमुखाद्वारचतुष्टयं प्रक्षाल्य तस्मात् पतितं किंचिदुदकं भाडे निक्षिपेत्। तदुदकं ये पिबन्ति ते सर्वे वश्य भवंति। तं गणेशं ताम्रे रौप्ये वा निक्षिप्य कादिवधनादिक्रियो वश्या भवन्ति शत्रुगणः स्तंभीभवति।" इत्यादि.

शिलालेखांतील स्पष्ट उल्लेखाच्या आधारानें पाचव्या शतकापूर्वी निश्चितपणें मांडतां येईल अशी गणपतीची मूर्ति अद्याप उपलब्ध झालेली नाहीं. पण अनुमानानें शकपूर्व काळांत मांडतां येतील अशा गणेशमूर्ति अलीकडे मिळाल्या आहेत. पेड्ड मुडियम् व पेरंवर येथ उत्खननात मिळालेल्या मूर्ति शकपूर्वकालांतील असल्याचें संशोधकानीं निश्चित केलेलें आहे (A. S I: Annual Report: 1905-6 & 1908-9). अमरावती येथील सातवाहनकालीन स्तूपाभोंवतालच्या कठड्यावर एक मूर्ति आहे. तिच्या मस्तकावर महासर्पाचें वेटोळें किंवा द्रव्याची थैली आहे. तिचे डोळे, कान व अधर निःसंशय हत्तीसारखे आहेत. तिचें पोट ढेबरें आहे. पण तिला सोंड मात्र नाहीं. ही मूर्ति गणपतीचीच असलेबद्दल श्री. बर्गेस, श्री. कुमारस्वामी व श्री. डुब्रेल याचें एकमत आहे ही मूर्ति गणपतीचें यक्षोद्भव व सुचविते. सिंहलद्वीपातील मिहिंतले येथील स्तूपानजीक गजमुख गणपतीची मूर्ति उत्खननात मिळालेली (Ganeśa: A Getty: Pl. XXII C.) आहे. हें शिल्पकृत्य पहिल्या, फार तर दुसऱ्या शतकातील असावें असें आसपासच्या शिलालेखावरून ठरतें. कुशान राजा हुविष्क याच्या नाण्यावर (इंडियन म्युझियम-कलकत्ता) ब्राह्मी लिपींत 'गणेश' अशीं अक्षरें आहेत. (J. A. S. B. 1897: Part I; p. 8 Pl. I) असें श्री. व्हिन्सेंट स्मिथ याचें म्हणणें आहे मात्र अन्य

संशोधकांनीं याचें वाचन 'भवेश' असें केलेलें आहे शिवाय त्यावरील मूर्ति शिवाची आहे वाचन बरोबर असेल तर कांहीं बिघडत नाहीं, कारण शिव व गणेश हे आरंभीं एकच होते असा डॉ. विंटरनीट्झ याचा सिद्धांत आहे अथर्वशीर्ष उपनिषदांत रुद्र व विनायक हे एकच होत असें वचन आहे रुद्रानें विनायक निर्मिले असें याज्ञवल्क्यानेंही सांगितलेलें आहे भूमार येथें गणपतीची पांचव्या शतकांतील अद्वितीय मूर्ति आहे या मूर्तीला सोंड आहे पण ती अगदीं लहान आहे पोट सामान्य आहे किरीटाला घंटा लावलेल्या आहेत आणि छातीवर घंटाची माळ रुळत आहे या मूर्तीची चर्चा करताना डॉ. आनंद कुमारस्वामी (Yakśa Part I pp 7 14) यांनीं एक तिबेटी दंतकथा सांगितलेली आहे वैशालीचा द्वारपाल मेला व राक्षस झाला त्यानें नागकन्यांना दृष्टान्त दिला कीं माझी प्रतिमा द्वारपालाच्या जागेवर स्थापन करा तिच्या गळयांत घंटाची माळ घाला, गावावर संकट आलें कीं या घंटा आपोआप व आपाळ वाजूं लागतील यामुळ नागकन्यांना संरक्षणाची तयारी करावयास पुरेसा अवसर मिळेल नागकन्यांनी तसे केलें व यामुळे त्यांना शत्रूचा अचानक उपसर्ग झाला नाहीं या मूर्तीच्या गळयांत असलेल्या घंटाच्या माळेवरून ते निष्कर्ष काढतात कीं हें गणपतीचें यक्षस्वरूप आहे कारण शहराच्या प्रवेशद्वारानें संरक्षणाचें काम यक्षाकडे सोंपविलेलें असे

गणपतीला गजमुख धर्मसूत्र कालात प्राप्त झाले (बौधायन २ ५) उंदीर हा रुद्राचा पशु असें श्रौतसूत्रांत सांगितलेलें आहे गणपति रुद्रापासून अलग झाला तेव्हां हें वाहन त्याला प्राप्त झालें गणपतीचें मुख व वाहन यावरून अनुमान करण्यात आलें आहे कीं या दैवताचा वन्य पशुपूजकांशीं (Religion & Folk lore of Northern India Crooke p 287) संबंध असला पाहिजे गणपतीच्या वाहनावरून त्याचा सूर्याशीं संबंध जोडण्यांत आलेला आहे (Gubernatis Zoological Mythology p 68) त्याच्या हातांतील पाश व ऊस वगैरे लक्षणावरून निष्कर्ष काढण्यात आला आहे कीं हें दैवत शेतकरी लोकांचें असावें गणपतीच्या एकदन्त या अभिधानाचें भाषांतर 'नांगराचा फाळ' असें ही होऊं शकतें, यावरून हा समृद्धि-देव असावा असही अनुमान (I A XXXV Nov

1906 ) करण्यांत आलेलें आहे 'गणेश' या प्रबन्धाच्या लेखिका मिस् ॲलीस् गेट्टी यांचें अनुमान आहे कां हें दैवत द्राविडांनीं स्वतन्त्रपणें निर्माण केलेलें असावें तामीळ भाषेंत गणपतीला पिळ्ळैयर असं नाव आहे पिळ्ळै म्हणजे बालक, पिळ्ळयर म्हणजे अभिजात बालक पळ्ळु व पेळळ या द्राविडी शब्दाचा अर्थ दात हस्तिदत या पाली शब्दाचा अर्थ हत्तींचें पिल्लू या शब्दावरून लेखिका निष्कर्ष काढतात कीं गजमुख गणपति ही दैन्य द्राविडांची एक स्थानिक देवता होती आणि आर्य संस्कृतीशीं संसर्ग होण्यापूर्वीच त्यानीं ती उत्क्रांत केलेली होती

जीवसृष्टींतल्या दुसऱ्या कोणत्याही पशूनें हत्तीएवढी मनुष्यावर छाप टाकलेली नाहीं विशाल देह व विराट शक्ति, कुशाग्र बुद्धि व आजीव निष्ठा यांचें हें प्रतीक म्हणूनच प्राचीन भारतीय मुद्रांवर, युद्धसाहित्यांत आणि दंत कथामध्यें हत्तीला प्रमुख स्थान दिलेलें आढळतें, म्हणून गणपतीला देवपूजनांत अग्रस्थान मिळालें आहे सिंह व वाघ हे दिसावयाला अधिक आकर्षक असले तरी ते स्वभावतः हिंस्र असल्यामुळें व त्याना माणसाळवणें अशक्य असल्या-मुळ त्याचा समावेश अतिरन्याव्यतिरिक्त कोणाच्याही दैवतात होऊ शकला नाहीं म्हणूनच, मला वाटतें, नृसिंह हा अवतार विशेष लोकप्रिय झाला नाहीं वाघ व सिंह यावर मनुष्याला प्रभुत्व गाजवितां येत नाहीं म्हणून ती शक्ति मनुष्यानें आपल्या देवताना दिली आणि या हिंस्र श्वापदाना त्यांच्या वाहनाचा दर्जा दिला अश्व हें वेग व चापल्य यांचें प्रतीक असलें तरी तो इतका माणसाळतो कीं त्याच्याबद्दल कोणालाही दरारा वाटत नाहीं, म्हणून हयग्रीवरूपी विष्णूला पूजास्थान प्राप्त झालें नाहीं ग्रामदैवतामध्यें व खुद्द रामायणात मारुतीचें स्थान महत्त्वाचें असलें तरी आर्यांच्या व सुसंस्कृत नागरिकांच्या दैवतात त्याचा दर्जा दुय्यम आहे आर्यांचे अनार्यांशीं संघर्ष झाले, पण एकमेकाचा उच्छेद करणं अशक्य आहे हें प्रत्ययास आल्यामुळें आणि दोघानाही याच भूमींत नांदावयाचें असल्यामुळें त्याना परस्पराशीं समेट केला वैदिक दैवतें मागासलीं आणि पौराणिक दैवतें पुढें सरसावलीं हें याचें प्रत्यंतर अनार्यांचं आर्यीकरण करताना आर्यांनीं अनार्यांच्या दैवताचेही आर्यीकरण केलें आणि त्यांपैकीं काहींच्या गायत्री निर्माण केल्या आपल्या

प्रतिष्ठेच्या वृक्षांखालच्या वन्य व स्थानिक ग्रामेशाचा समावेश आर्यांनी आपल्या दैवताच्या विराट समूहात करून घेतला, त्यांच्या विषयीच्या प्राथमिक कल्पना संकीर्ण केल्या व प्रचलित दंतकथा अधिक आकर्षक केल्या. जंगली जमातींची गजशिला, असंस्कृत शेतकऱ्यांचा कृषिदेव आणि नागरिकांचा द्वारपाल, शूद्रांचा लम्बोदर यक्ष व आर्यांचा बृहस्पति यांच्या संमिश्रणांतून गणपतीचें पौराणिक स्वरूप उत्क्रांत झालेले आहे असें या विवेचनावरून दिसून येईल.

गणपतीच्या मूर्ति केव्हांपासून रूढ झाल्या? या बाबतींत डॉ. भांडारकरांनी केलेल्या विधानानंतर बरेंच संशोधन झालेले आहे. मिस् गेट्टी यांच्या प्रबन्धाच्या प्रस्तावनेंत प्रो आल्फ्रेड फाउशर सांगतात.

"The almost complete absence of ancient documents relating to Ganeśa is somewhat disconcerting. Yet must one necessarily succumb to the habitual failing of the philologist whose learned candour leads one to infer that all things have their beginning from the time of their first mention in the texts? Such a conclusion would be absurd... One must be as short sighted as a bookworm to deduce from the lack of any mention of Ganeśa in the early epics, that the God did not exist before the fourth or fifth century of our era... Whoever is experienced in the ways of that country knows well that by then the Elephant-god had already behind him century upon century, if not thousands of years, of silent waiting at the foot of the sacred tree of the pre-Aryan village, standing on the roughly built platform which he shares, with the other rustic deities Those more or less shapeless stones, once bathed in the blood of human victims and today still smeared with vermilion were so deeply rooted in an unfathomable past that the aristocracy of the new gods, introduced by the immigrant Aryans, were compelled to adopt them in some form or other." Had they not come to terms with them they would soon have found themselver estranged from the worship of the populace and their priests deprived of

gifts and followers It is probable that the Brahmins, the chosen interpreters of the Divine Will, submitted to this but reluctantly, yet; as Manu himself must admit, 'in all things, necessity constitutes law' ( गणेश प्रस्तावना पृ १७ )

प्राध्यापक महाशयाचा विधानाचा गाभतारा असा "गणेशाचा उल्लेख आद्य प्रथात नाही, हें खर, पण पहिला उल्लेख आढळतो तेथेंच त्याची उत्पत्ति झाला असे मानणे अदूरदृष्टीच व हास्यास्पद ठरेल पढीकपण्डित हे प्रथाधारांचे बाबतींत वाळरीइतके अदूरदृष्टि असतात प्राथिक आधाराचे अभावीं चवथ्या किंवा पाचव्या शतकापूर्वी गणपति अस्तित्वातच नव्हता असें मानणें योग्य होणार नाही त्यापूर्वी कितीतरी शतक तो ओबड धोबड स्वरूपात अस्तित्वात असला पाहिजे या काळात त्याचें वास्तव्य वटवृक्षाच्या पारावरील ग्रामदेवता-मध्य असावें त्याच्या मूर्तीवर शेंदूर चोपडण्यात येतो हा रुधिराभिषेकाचा अवशेष असावा हिंदुस्थानात वसाहतीसाठीं आलेल्या आर्यांनीं अशा स्थानिक दैवताचा समावेश आपल्या दैवतात करून घेतला नसता तर ते बहुजनसमाजाच्या धर्मभावनाशी समरस होऊं शकले नसते " आर्यांनीं ही प्रथा कनिष्ठ सांस्कृतिक पातळीवर असलेल्या बहुमख्य अनार्यांच्या अनुरंजनासाठीं केली कीं त्याच्या आर्यीकरणाऱ्या नियोजित कार्यक्रमानुसार, हा मुद्दा विवाद्य आहे

या चर्चेच्या अनुरोधाने गाथासप्तशतीतील गणपतीकडे पाहिलें असतां केवळ या उल्लेखावरूनच हा प्रथ अर्वाचीन ठरविता येणार नाहीं या मुद्याबाबत पढीकपण्डितांचेंही समाधान होईल अशी मला आशा आहे प्राध्यापक महाशयाच्या विधानांतील "at the foot of the sacred tree—" 'पवित्र वृक्षाच्या पारावर' या शब्दाकडे मी वाचकांचें लक्ष मुद्दाम वेधू इच्छितों, कारण गाथा सप्तशतीतील गणपतीचा उल्लेख असाच आहे विशेषत दक्षिण हिंदुस्थानात अशा ओबडधोबड गणपतींच्या मूर्ति उघड्यावर रस्त्याच्या कडेला चवाठ्यावर, वृक्षाखालीं किंवा त्याच्या पारावर नागशिलांचे जोडीनें मांडलेल्या असतात असें श्री राव याना ( पूर्वोक्त भाग २, पोटभाग १ पृ १७७ ) दाखवून दिलें आहे

गणपतीबद्दल ज्ञानकोशकारांनी ( ग १४ ) काढलेला निष्कर्ष येथ देतों "ही देवता वेदपूर्वकालीन आहे वेदांत मानवसंस्कृतीच्या देवता आहेत व पुराणात

सूतसंहितीच्या देवता आहत. सूतसंस्कृति मानससंस्कृतीहून जुनी आहे आणि मानवधर्म नष्ट होण्यापूर्वी प्रातसत्या या स्वरूपात विकास पावला आणि या विकासकाळीं मानसंस्कृति आणि सूतसंस्कृति यांचें म्हणजे वैदिक व पौराणिक धर्मांचे एकीकरण हात होत आणि यामुळें मैत्रायणीसारख्या साहतातून पौराण-दैवताचा उल्लेख येतो पण त्या पौराण दैवताचे अस्तित्व त्याहूनहि जुन आहे "

येथवर केलेल्या विवेचनाच्या अनुराधान गाथासप्तशतातील उल्लेखाची तपासणा केला असता दिसून येत का यथाल गणपति व गणाधिपति हा वैदिक, बौद्ध किंवा पौराणिक नाहीं आणि तांत्रिक किंवा उच्छिष्ट तर नाहाच नाहा भव भूतीनें मालती माधवात गणपतीला नमन केलल आह हें वर्णन उत्तरकालीन व सर्कीर्ण आह त्याशा तुलना केली असता येथाल गणपतीचे स्वरूप प्राचीन अस त्याचें परत उच्छिष्ट गणपतीचे उपासक सुरतप्रवृत्त दैवताचें ध्यान करतात, हें तर पण एवढ्यावरून क ३७२ मधील गणपताचा उल्लेख शाक्त ठरत नाहीं गणपतीची मूर्ति उशाला घऊन स्नान समोगाला प्रवृत्त व्हावें असा विधि उच्छिष्ट गणपतीच्या बाबतींत कोठेंही सांगितलला नाहीं गावाच्या शिवेपा-कडच्या वडाच्या झाडाखालीं तारुण्यात शिदळपणा करणाऱ्या एका उनाड स्त्रीनें वृद्धपणीं हे उद्गार काढलले आहेत गणपतीची मूर्ति तिनें जाणून बुजून किंवा विधि म्हणून उशाला घेतलेली नाहा यासाठी तिला गाणासाठी चालली असती शिवाय गणपतीची शाक्त किंवा ब्राह्मणी मूर्ति उशीसारखी वापरण अशक्य आह यास ठीं अनुभवाची किंवा सशोधनाचा जरूर नाहीं नायिकेनें उशीसाठीं वापरलेली मूर्त सपाट शिला असावी, या शिलवर काहीं आकृति कोरलेली असलीच तर ती अगदीं प्राचीन व प्राथमिक अवस्थतील असली पाहिजे हे उघड दिसतें

क ४०, या गाथेंत गणपतीन सांडेन पाणी ओढून समुद्र कोरडा केल्याचा व त्यामुळ वडवाग्नि भडकल्याचा उल्लेख आहे पुरुषार्थाच्या गणशांकात ( भाद्र पद १८५७ ) गणपतीच्या सहस्रनामाचा अभ्यास या लखात गणपतीचा अब्धिभूम्याग्निबलघ्न, समुद्रमथन व वराहदन्ताध्वस्त मैथुनदिल या नावाच विवरण करताना सांगितल आह की हा समुद्रावरील शत्रूच्या आश्रय घलाचा नाश करण्यास समर्थ असल्यामुळ त्याला ही नाव मिळालेली आहेत समुद्रांत अग्नि

लपल्याचा उल्लेख ऋग्वेदात व महाभारतात आहे पण तेथें किंवा अन्यत्र त्याच्याशीं गणपतीचा संबंध आलेला मला आढळला नाहीं

श्री वेबर यानीं वापरलेल्या दहा भिन्न हस्तलिखितांतीं (क्र.) प्रतींत क्र ३७२ आणि सात प्रतींत क्र ४०३ या गाथा आलेल्या आहेत यावरून क्र ४०३ ही गाथा हालाच्या मूळ संग्रहात समाविष्ट नसावी असा प्रा मिराशी (युगवाणी मार्च १९४५) यांचा अंदाज आहे क्र ४०३ ही गाथा मला तेवढी संशयास्पद वाटत नाहीं

क्र ३७२ या गाथेंतील गणपतीचा पण्डितानीं रंगविलेला वाद मूळ गाथेच्या पहिल्या ओळीचे पाठभेद विचारांत घेतले असता सहज समळ सुटणार आहे हे पाठभेद असे

जो सीसम्मि विइण्णो मज्झ जुआणेहि गणवई आसि[२]।

१ वटजक्खो, वडवक्खवे, वडरूखे = वटयक्षो, वटवृक्षो

२ साधारणदेवाच्या प्रतींतील पाठ वडजक्खो जो मह सीसअम्मि दिण्णो पउरजुआणेहि। भाण्डारकर इन्स्टिट्यूटमधील भुवनपालाच्या हस्तलिखितात आहे तो पाठ असा वडजारवो जो उरिससयम्मि दिन्नो मुद्ध जुआणहिं।

या गाथेवरील टीकेंत वटयक्षाबद्दल साधारण देव सांगतो वटयक्ष वटतले स्थापित क्षेत्रपालादि प्रतिमा। तेलग प्रतींतील टीका समानार्थी आहे पूर्वम् यौवनदात् वन्स्य अथ स्थिते यक्षागारके या यक्षप्रतिमा उपाधानीकृत्य सुरभि सम बहुलकाल सुरतसुख अनुभूय, इदानीम् विगलित यौवनमदा तामेव दैवतमिति पूजयामि।

वटवृक्ष हें सुरक्षित व सोइस्कर संकेतस्थान असल्याचा उल्लेख क्र ९४ या गाथेत आलेला आहे वडाला अनेक पारब्या असतात व त्याची छाया थंडगार व अंधारी असते वडाचीं झाडें बहुधा गांवाबाहेर, निर्जन मार्गात किंवा नदीच्या काठेवर असतात, म्हणून दिवसाउजेडींही संगमोत्सुक प्रेमिकांना या स्थानाचा आश्रय प्रिय वाटे, विशेषत ग्रामीण हलिकाना व पशुपालकांना हिंदुस्थानात वृक्षपूजा फार प्राचीन काळापासून सर्वत्र प्रचलित आहे 'कठड्यातलें झाड' (Tree in Railing) हें चिन्ह अनेक प्राचीन मुद्रांवर आढळतें वटपौर्णिमे सारखे सण हें या प्रथेचें मध्ययुगीन स्वरूप आहे यामुळें स्त्रियांनाही या

स्थानाचा आश्रय सुलभ असे. क्षेत्रपालादि ग्रामदेवतांच्या शिला बहुधा पारावर वडाच्या बुंध्याला लावून ठेवलेल्या असतात. यक्षपिशाचादि वन्यावाईट दैवतांची वस्तीही अशाच जागी असते. फार प्राचीन काळापासून यक्ष हे भारताच्या ओळखीचे आहेत. ऋग्वेद व अथर्ववेद आणि ब्राह्मणे व उपनिषदें यांत त्यांचे उल्लेख आढळतात. श्री. हीलब्रँट सांगतात की ही संज्ञा आरंभी मानवाच्या आध्यात्मिक शत्रूची द्योतक होती; नंतर तिला अलौकिक सामर्थ्य व उच्च स्थैर्य प्राप्त झालें. यक्षाचे तीन प्रकार आहेत श्री, कुबेर व कामदेव यांसारखीं सर्वमान्य दैवतें; शाक्यवाहन व सातगिरी यासारखीं देशाचीं व कुळाचीं दैवतें, स्थानिक दैवतें, ज्यांचें कर्तृत्व ग्रामसामेच्या किंवा त्यांनीं आश्रय घेतलेल्या वृक्षाच्या कक्षेच्या बाहेर प्रत्ययास येत नाहीं. स्थानिक यक्ष स्त्रियांच्या चारित्र्यावर नजर ठेवतात आणि कधी स्वत च कुमारिकांना भोगतात ( उत्तराध्ययन चूर्णिः पृ. ८९ ). किती जणांनी या समजुतीचा फायदा घेतला असेल तें यक्षच जाणोत !

भटक्या टोळ्यांचे देव स्थानिक व स्थायिक नसतात ( Keith: Religion & Philosophy of the Vedas p.185 ). असल्यास तर अशा देवांच्या मूर्ति प्रतीकात्मक, वजनांत हलक्या व हलविता येण्यासारख्या, म्हणून आकारानें आटोपशीर अशा असल्या पाहिजेत. यक्ष व यक्षी यांच्या अजस्र व सुंदर मूर्ति कोरण्याची प्रथा मौर्य कालात सुरू झाली. मात्र अशा मूर्ति विशेष विख्यात अशाच स्थानीं आढळणार हें उघड आहे. भटक्या टोळ्या स्थायिक होऊन शेती करूं लागल्या म्हणजे क्षेत्रपालादि स्थानिक व स्थायिक दैवतें निर्माण होतात. जसे लोक तसे त्यांचे देव. या न्यायानें खेडवळांचे देव ओबडधोबडच असणार. मग ती मूर्ति आर्यांच्या संसर्गानें उदयास आलेल्या गणपतीची असो किंवा आदिवासींना भयप्रद म्हणून पूज्य वाटणाऱ्या नागाची असो. अशा दैवतांच्याशिला आज ही खेड्यापाड्यातून आढळतात गाथासप्तशतीतील प्रस्तुत सहिराला अभिप्रेत असलेला वटयक्ष अशाच स्वरूपाचा असला पाहिजे

राज्यपाल सातगिरी यक्षापासून सातवाहनांचा संभव झाला असा एक सिद्धांत आहे. सातवाहनांना गणपति हें दैवत त्याच्या विविध स्वरूपांत माहीत असलें पाहिजे. ठेंगोट्या यक्षाच्या अनेक मूर्ति उत्खननांत उपलब्ध झालेल्या आहेत. गणपतीही यक्षजन्य व गजरूप असल्यामुळें त्याचें

हें लक्षण यालो मिळालेलें आहे. सातव्या सातवाहन राजाचें नांव लंम्बोदर असें आहे. हें नांव त्याला त्याच्या पोटाच्या आकारावरून मिळालें असावें असें अनुमान करतां येणार नाहीं.

प्रजापती=पआवई : क्र. ९६३; ब्रह्मन्=वह्मः क्र. ८१०; विहि : = विधि क्र. २०७; २३५, ४२५, ९७६. क्र. ६५६ व ७८३ या गाथांत विधि हा शब्द दैव या अर्थानें आलेला आहे. वेदांतील उल्लेखानुसार ( ऋ. १०.१२१ ) विधि हा सृष्टीचा निर्माता. म्हणूनच क्र. ९८० या गाथेंत त्याला ठेर-स्थविर म्हटलेलें आहे. त्याचे उल्लेख व श्रेय हीं उत्तरकालीन दिसतात. ब्रह्मदेवाची निर्मिति याच्याही नंतर झालेली आहे. ब्राह्मण व सूत्र वाङ्मयांत प्रजापतीला विशेष महत्त्व प्राप्त झालेलें दिसतें. या काळात प्रथम ब्रह्मदेव व बृहस्पति ( ऐ ब्रा. १.१९ ) आणि नंतर प्रजापति व ब्रह्मदेव एकरूप ( आ.गृ. सू : ३.४) झालेले दिसतात. ब्राह्मणकारांनीं प्रजापति अनेक कल्पिले आहेत. क्र. ९६३ या गाथेंत ह्याच कल्पनेची सूचना आहे. येथें वर्णिलेलें त्याचें कार्य क्र. २०७ मधील विधीच्या कार्याशीं सदृश आहे. प्रजापति व ब्रह्मदेव, दोघेही लंपट. प्रजापति हा स्वत च्या कन्येवर मोहित झाल्याच्या कथा ऐतरेय ( ३.३३; ५.२ ) व शतपथ ( १.७.४ ) ब्राह्मणांत आलेल्या आहेत. पण तीं उघड रूपकें आहेत. प्रत्यक्ष पिता संभोगार्थ मृग रूप धारण करून मृगी रूप धारण केलेल्या कन्येच्या मागें लागलेला पाहून रुद्र खवळला आणि त्याच्यावर बाण सोडण्यासाठीं नेम धेणार तोंच प्रजापतीनें विनवणी केली व पशुपति करण्याचें आश्वासन दिलें म्हणून रुद्रानें त्याचा वेध केला नाहीं अशी कथा आहे आणि ती मृग, रोहिणी व व्याध यांना अनुलक्षून आहे ब्रह्मदेवही असाच. यानें आपल्या अर्धांगापासून शतरूपा नावाची रूपवती स्त्री निर्माण केली. ती याला प्रदक्षिणा घालूं लागली. तेव्हा तो मोहित झाला मानसपुत्र भोंवतीं असल्यामुळें तिच्याकडे मान वळवून डोळे भरून पाहता येईना, म्हणून यानें चार बाजूंना शिरें निर्माण केलीं आणि ती आकाशमार्गे निघाली तेव्हा वर आणखी एक जटाधारी पांचवें शिर निर्माण केलें. हें शिर शंकरानें डाव्या पायाच्या आंगठ्याच्या नखानें खुडलें. एकदां ब्रह्मदेवानें प्रभासक्षेत्रीं यज्ञ केला. त्याची पत्नी सावित्री यज्ञमंडपात वेळेवर आली नाहीं. यज्ञकर्मास विलंब होऊं नये म्हणून याच्या सांगण्यावरून

इद्रानें एक गवळ्याची पोर आणली  ती गायत्री या नावानें ब्रह्म्याची स्त्री झाली या यज्ञात शंकरानें बरीच धामधूम करून मानाचें स्थान मिळविलें यज्ञसमा सीच्या सुमारास सावित्री तेथें आली  असा प्रकार पाहून ती खवळली  तुझी कोणी पूजा करणार नाहीं, असा तिनें ब्रह्म्याला शाप दिला  तुम्ही लोभी व परान्नपुष्ट व्हाल, पाप्यांकडून यज्ञाला जाल आणि द्रव्यसंचयासाठीं यत्न कराल असा तिनें ब्राह्मणाना शाप दिला  ती यज्ञमंडपातून निघून गेल्यानंतर गायत्रीनें या शापताना वर दिले  ही कथा स्कन्द पुराणात (७ १ १६५) आहे प्रजापति व ब्रह्मदेव याचे, ब्राह्मणाचें व त्याच्या या देवाच माहात्म्य नष्ट झालें आणि त्याचा उच्छेद सामान्य पशुपालाच्या पशुपति या देवानें केला  आणि प्रत्यक्ष ब्रह्मदेवाला गवळ्याची पोर पत्नी म्हणून स्वीकारावी लागली या कथाभागावरून ब्राह्मणाचें ओसरत व सामान्य जनाचें वाढतें सामर्थ्य प्रत्ययास येतें गाथासप्तशतींत या देवताना पूजेचा मान नाहीं आणि त्याचें कर्तृत्व सांकेतिक आहे

**मदन** अणङ्ग=अनङ्ग क्र २३३ (-निवास), २६० (-गज) ७४२ (-राग), ५९४ (शर), **काम** क्र १४८, १७७ (गुडिआघणु=गुटिकाधनु), ३२६ (-शर), ४७३ (-चाप), ५८५ (हत्थभङ-हस्तमल), ९४३ (आउह=आयुध) चाव क्र ४७३, ९८, कुसुमचाप क्र. ९८६ कुसुमबाण क्र ९८२, कुसुमाउह=कुसुमायुध क्र ९४६, मअण-मयण=मदन क्र २१० (-शर) ३६५ (-बाण) ३८१ (-शर), ४४१ (बाण) ५४४ (-उत्सव) ५७२ (-अग्गी=अग्नि) ५८१ (-छुहा=क्षुधा) ७५८ युद्ध ८०७ (-मुद्दा=मुद्रा) ९८६ (-चाप), **मअरद्धअ**=मकरध्वज क्र १०१, वम्मह=मन्मथ क्र १७६, ८८४ (-विलास), ९४८ सर=स्मर क्र ९९२

काम हा ब्रह्मदेवाचा पुत्र  तो त्याच्या हृत्कमलापासून निर्माण झाला ऋग्वेदात (१० १२९) सांगितलें आहे  प्रथम मनोरूप बीज उत्पन्न झालें आणि मनाचें ठायीं काम उत्पन्न झाला अथर्ववेदात (३ २५) कामदेवाचा मंत्र आहे "कामशर प्रखर आहेत, त्याना आसक्तीचा दंड आहे, उत्कण्ठेचे पंख आहेत व संकल्पाचा काण्ड आहे त्याना तुझें हृदय विद्ध केलें म्हणजे त्या या प्रखर उष्णतेनें तुझे आठ धोरडे होतील, जणू मी चाबकाने फटकारल्याप्रमाणें तू आपला पिता

व पति यांचा त्याग करून मजकडे येशील, तुझी प्रतिकारशक्ति नष्ट होईल व तूं मला वश होशील." तारकासुरानें तप केलें व अमरत्व मागितलें असतां ब्रह्मदेवानें हें नाकारलें व सात दिवसाच्या शिशुहस्तें मरण येईल असा त्याला वर दिला. यामुळे तो मस्त झाला. शंकराच्या औरस पुत्राच्या हातून मरण यावें असा देवाचा संकेत होता. या वेळीं शंकर विधुर होता. त्याची प्रथम पत्नी सती हिनें दक्षयज्ञांत देहत्याग केला होता. पुढें तिनें हिमालयाच्या पोटीं जन्म घेतला. सतीच्या वियोगामुळे शिवाचें कामचेतन्य नष्टप्राय झालें होतें. शंकर-पार्वतींचा परिणय व्हावा एतदर्थ देवांच्या विनंतीवरून कामदेवानें शंकराला शरविद्ध करून त्याच्या चित्तात कामप्रेरणा निर्माण करण्याचें मान्य केलें यानें बाण सोडला. त्याला संवेदना होतांच त्यानें खवळून तृतीय नेत्र उघडला. त्याच्या प्रखर तेजानें कामदेवाच्या शरीराचें भस्म झालें. पण देवांचा हेतु साधला. शंकरपार्वतींचें प्रेम जमलें, त्यांचा विवाह झाला, त्यांच्या पोटीं स्कन्द आला व त्यानें तारकासुराचा वध केला. क्र. ७५८ या गाथेंत मदन-शंकर युद्धाचा उल्लेख आहे. तेव्हां पासून काम हा अनङ्ग झाला. याला अङ्ग नसलें तरी ज्यांना तें आहे त्यांच्याहून याचें सामर्थ्य अधिक आहे. याला मदनराज (क्र. ८०७) म्हटलेलें आहे यानें त्रैलोक्य (क्र. ९८६) जिंकलें आहे. याला शरीर नाहीं, तरी त्याच्या आगमनाची चाहूल लागतांच स्तन वृद्धिंगत होतात (क्र. ९४८) आणि ही आपल्या कर्तृत्वाची खूण म्हणून मदनराज त्यावर मोहोर (क्र. ८०७) करतो! कवींनी कल्पिलें आहे की स्मराचा वर्ण श्यामल (क्र. ९९२) आहे, त्याचें धनुष्य कुसुमांचें (क्र ९४६) आहे आणि बाणही कुसुमांचेच आहेत. कोणी सांगतात हें धनुष्य नागकेशराच्या फांदीचें असतें (Chandra Chakravarty : Cultural History of the Hindus : p 870) आणि रतिरहस्यकार (१-१) सांगतात, तें उंसाचें असतें व त्याची दोरी भ्रमरपंक्तीची असते. त्याचेपाशीं पांच बाण असतात. क्र. १०० मध्यें कामाला पुरिकाधनु म्हटलेलें आहे. कोणी सांगतात—

अरविंदमशोकं च चूतं च नवमल्लिका।

नीलोत्पलं च पंचैते पंचबाणस्य सायकाः॥

पैकीं क्र ९९४ मधील धाराधी आम्रमंजिरी आहे. हे शर मृदु खरे, पण ते असें विलक्षण की (क्र ३२५, ३२६) त्यांची प्रखरता स्पर्शापूर्वी अताच

पाडते आणि त्यांनीं झालेली जखम सुखावह ! मदन हा पुष्पधन्वा व त्याचे शर कुसुमांचे, कारण रतीचें सुगंधाशीं साहचर्य आहे. क्र. ५८५ मध्यें त्याच्या हातीं भाला आहे. कपोत हें त्याचें वाहन आणि त्याच्या ध्वजावर मकर (क्र. १०१) हें चिन्ह; कपोत, कारण सदैव कूजन करणारा कपोत हा खरा कामवेडा आहे. आणि मकर, कारण त्याचे अंगीं विलक्षण कामसामर्थ्य आहे. अशी समजूत आहे.

पुराणांत कोठें सांगितलें आहे की मदन हा विष्णु व लक्ष्मी यांचा पुत्र. लक्ष्मी समुद्रमंथनातून निर्माण झाली तशीच ग्रीकांचा मदन इरॉस याची आई ॲफ्रोडीट ही समुद्राच्या फेंसातून प्रकट झाली. रोमन मदनाची माता व्हीनस् ही रतिदेवता आहे, सबब लक्ष्मीसारखी सती नाहीं, ती अनेक देवांशीं रत होते म्हणून असती आहे. मदनाची पत्नी रति ही मात्र सती आहे ! आपल्याकडे पटामी व वेरूळ येथें कामदेवाच्या मूर्ति आहेत.

राम व लक्ष्मणः राम, सौमित्री = (लक्ष्मण): क्र. ३५. रामकथा मराठी वाचकाच्या चांगल्या परिचयाची आहे आणि येथें अभिप्रेत असलेलें वैशिष्टयही. लक्ष्मण हा सुमित्रेचा मुलगा, म्हणून त्याला सौमित्र म्हटलेलें आहे. लक्ष्मण हा आदर्श धनिष्ट भ्राता. प्राचीन रिवाजाप्रमाणें वडील भावाच्या पत्नीवर अगर विशेषतर धाकट्या भावाचा डोळा व हक्क असावयाचा. म्हणूनच मायामृगाच्या प्रसंगीं सीता याला टाकून बोलली असावी. पण यानें तिच्याकडे मान वर करून पाहिलें सुद्धां नाहीं. पुढें ऋष्यमूक पर्वतावर वानरांनी दाखविलेल्या सीतेच्या अलंकारांपैकीं नूपुर तेवढे यानें ओळखले या मेढी तो म्हणाला.

नाहं जानामि केयूरे, नाहं जानामि कुंडले ।
नूपुरे त्वभिजानामि नित्यं पादाभिवन्दनात् ॥

मी नेहमीं सीतामाईच्या पायां पडत असल्यामुळें मला तिचे नूपुर तेवढे ओळखतात. क्र. १५ च्या नायिकेनें हाच प्रसंग भिंतीवर रंगविलेला असावा. क्र १११ या गाथेंत लंकेचा नाटेनिक उल्लेख आलेला आहे. ध्यानधारणेतील रामाचा उल्लेख आदरपूर्ण आहे.

वि. पृ. सनाच्या सहाव्या शतकांत रामकथा नाटकांत अतिशयोक्त होती, निश्चित वाल्मीकीनें रामायण रचलें असें श्री विंटरनित्झ यांचें मत (History of Indian Literature Vol I. pp. 509-510) आहे. ही

कथा गाथासप्तशतीच्या काळांत रामायणाच्या स्वरूपांत महाराष्ट्राच्या बहुजन समाजाला अवगत होती हें या उल्लेखांवरून ठरतें. रामायणाच्या स्वरूपांत, असें म्हणण्याचें कारण हें की दशरथजातकांत रामकथा विकृत स्वरूपात मांडलेली आहे जातकात सीता ही रामलक्ष्मणाची सखी बहीण आहे आणि राम व सीता यांचा विवाह तीं हिमालयांतील वनवासाहून परत आल्यानंतर झालेला आहे दशरथ जातकातील कथा जाणून बुजून विकृत आहे हें निःसंशय, कारण जयदिस जातकांत रामाच्या दण्डकारण्यांतील वनवासाचा आणि वेस्सतर जातकात राम व सीता हीं पतिपत्नी असल्याचा उल्लेख आलेला आहे. नाशिकच्या पाण्डवलेण्यातील गोतमी बालश्रीच्या लेखात ( नाशिक गॅझेटीयर पृ ५५० ते ५५४ ) रामाच्या पराक्रमाचा व तेजाचा उल्लेख आलेला आहे या वरूनही वरील अनुमानाला बळकटी येते पातिव्रत्य व एकपत्नीव्रत यांचीं प्रतीकें म्हणून सीतारामाच्या भक्तीचा पंथ मात्र उत्तरकालीन असून तो व्यभिचारी राधाकृष्णाच्या विकृत स्वरूपात प्रचलित झालेल्या भक्तिपंथाला आव्हान म्हणून अस्तित्वात आला असावा

वामनः वामण = वामन = क्र ४०६ ४२५, याशीं संबद्ध त्रिविक्रम = क्र ४११, बळि क्र ४०६, समुद्रमंथन क्र.( क्षीरोद ) १७७, दुद्धसमुद्द ३८८, ४७५, अमृत क्र ४९३, कौस्तुभ क्र १५१.

वामन हा विष्णूचा पाचवा अवतार हरि व विष्णु हे एकच. हरीचा वामन हा अवतार, याची गाथाकवींना स्पष्ट कल्पना (क्र ४०६)आहे विष्णूनें तीन पावलांत जग व्यापलें व जेथें पाऊल ठेवलें तेथें सद्धर्माची स्थापना केली असा उल्लेख ऋग्वेदात ( १ २२ १७-१८ ) आलेला आहे येथें बळीचा उल्लेख आलेला नाहीं यज्ञप्रसंगीं देव व दैत्य यांचें जागेबद्दल भांडण झालें असतां वाम ाचे आकाराएवढी जागा त्यांना देण्याचें दैत्यांनीं कबूल केलें, तेव्हां विष्णु जमीनी वर निजला व पडल्या पडल्या एवढा वाढला का त्यानें सर्व पृथ्वी व्यापून टाकली अशी कथा ऐतरेय ब्राह्मणात आलेली ( १ २ ५ ) आहे तैत्तरीय संहितेत सांगितलें आहे कीं ( २ १ ३, २ ४ १२ २ ) बळीनं घेतलेलें राज्य वामनानें इंद्राला परत मिळवून दिलें बळी हा दैत्याचा राजा, हिरण्यकशिपूचा पणतू त्याला नृसिंहानें ठार केल व याला वामनानें नामोहरम केलें या वरून या दोन अवतारांत दोनच पिढ्यांचें अंतर दिसतें बळीचा पुत्र बाणासुर व

त्याची कन्या उषा. हिच्याशीं कृष्णाचा नातू अनिरुद्ध यानें गांधर्वविधीनें विवाह केल्यावरून दैत्य व यादव यांमध्यें युद्ध झालें. या युद्धांत कृष्णानें भाग घेतला होता. वामन व कृष्ण यांमध्यें परशुराम व राम हे दोन अवतार होऊन गेले. अवताराच्या योजनेनुसार या दोघांना आपआपलें अवतारकार्य करण्यास काळाची फारशी सवडच रहात नाहीं शुक्राचार्यांच्या सांगण्यावरून यानें स्वारी करून स्वर्गाचें राज्य मिळविलें. यानें इंद्राची संपत्ति हरण केली, पण तो ती नेत असता ती समुद्रांत पडली. ती बाहेर काढण्यासाठीं विष्णूच्या सूचनेवरून देव याला शरण आले म्हणून दैत्यांनीं देवांशीं सहकार्य करून समुद्रमंथन केलें. मंथनाच्या सुरुवातीस देवांनीं दैत्यांना मंदर पर्वताभोंवतीं गुंडाळलेल्या नागराजाच्या मु ाची बाजू देऊन त्यांना विशेष उपसर्ग होईल अशी युक्ति केली आणि अखेरीस रत्नें त्यांच्या हातीं लागूं दिलीं नाहींत, इतकेंच नव्हे, अमृताच्य बाबतीतही त्याची वंचना केली या मंथनातून चौदा रत्नें निघालीं, असें कांहीं आधार सांगतात आणि कांहीं चोवीस रत्नांची यादी देतात. या रत्नांचा (क्र. ४७५) व त्यांतील अमृत, कौस्तुभ व लक्ष्मी यांचा उल्लेख गाथासप्तशतीत आलेला आहे. कौस्तुभ हा चिंतामणि विष्णूनें हृदयावर धारण केला आणि त्यानेंच लक्ष्मीचाही स्वीकार केला. अमृताचे बाबतींत फसगत झाल्यामुळें देव व दैत्य याच मोठें युद्ध झालें या युद्धांत इन्द्रानें वज्र फेकून बळीचा वध केला. पण शुक्राचार्यांनें त्याला सजीव केलं. यानंतर यानें पुन्हां स्वर्ग जिंकला व विश्वविजयार्थ शंभर अश्वमेध केले. नर्मदातीरीं भृगुकच्छ येथें अखेरच्या यज्ञ चालू असतां विष्णु वामनरूपानें यज्ञस्थानीं आला. बळीनें त्याची पूजा केली व वा ी तरी मागावें असी त्याला विनंति केली. वामनानें तीन पावलें जमीन मागितली. शुक्राचार्यांनें अतिथीचें कपट ओळखलें व बळीला सूचना दिली. ती धिक्कारून यानें वामनाच्या हातावर उदक सोडलं. लगेच वामनानें विराट् स्वरूप धारण केले व दोन पावलांत ब्रह्मांड व्यापलें हें पाहतांच कांहीं दैत्य वामनावर धांवले. बळीनें त्यांचे निवारण केले. तोंच प्रभावें गांभीर्य ओळखून गरुडानें बळीला वरुणपाशानें बद्ध केलें. नंतर वामनानें तिसरें पाऊल ठेवण्यास जागा मागितली. यावर बळी म्हणाला, तूं कपटानें मोठा झालास, मी वचन फिरणार नाहीं. नंतर वामनाला पाऊल ठेवण्यासाठीं बळीनें त्याच्यापुढें मस्तक नमविलें. मग वामनानें त्याच्या मस्तकावर पाय ठेवला त्यामुळें बळी पाताळांत

दडपला गेला नंतर वामनानें बळीचें राज्य मनुपुत्रांना दिलें व दैत्यांना हाकून लावलें. बळी हा चिरजीव आहे. तो तेव्हांपासून पाताळांत वायकांबरोबर फांसे खेळत बसला आहे. त्रिविक्रमाचीं तीन पावलें हीं सूर्योदय, माध्यान्ह व सूर्यास्त यांचीं द्योतक असावीत असें कांहीं संशोधकांचें म्हणणें आहे.

शंकर: गौरी-हृदयदयित क ४६७, पशुवह: क १,६९, प्रमथाधिप= प्रमथाधिप क ४४८, रुद्द=रुद्र क ४५५, वासुकी क ६९, हर क ७०० ७५८ ९८५ ऋग्वेदांत रुद्रावर तीन सूक्तें आहेत. तेथ त्याचें स्वरूप लोकोपकारक (१ ११४ ३) आहे आणि लोकघातक (१ ११४ १०) ही. त्याला गाथापति, पशुपति (अथर्व ११ २ ९, शतपथ १ ७ ३ ८) व त्र्यंबक (७ ५९ १२) म्हटलेलें आहे. प्रजापतीनें दुहितृगमन केलें तेव्हां रुद्र त्याला शिक्षा करण्यासाठीं धावला असतां याला पशुपतित्व प्राप्त झालें. शिवाचें वाहन ऋ त्याच्या पशुपतित्वाचें द्योतक आहे (ऐ ब्रा ३ ३३) त्र्यंबक याचा अर्थ कोणी त्रिनेत्र असाही करतात. अग्म्यान निर्माण केलेल्या अप्सरेकडे हा मोहित होऊन पहात आहे असें दिसताच पार्वतीनें त्याचे डोळे झांकले, तेव्हां याच्या कपाळावर तिसरा डोळा (स्कन्द ६ १५३) निघाला. प्रमथ हा एक गण असून रुद्र हा त्याचा अधिपति आहे. रुद्राचें प्रमथाधिप हें अभिधान गुप्त कालानंतर लुप्त झालें. बेबरनें पमहादिव व डॉ. गोपलाचारि यानीं (Early History of Andha Country. p 128) परमहादिव = परमताधिप असे पाठ दिलेले आहेत. याची वृत्ति तामस असून हा गजचर्मासारखें अमंगल व वासुकीसारखे भयप्रद पदार्थ धारण करतो. कापालिक हे याचे अनुयायी. तपश्चर्या करीत असतां मदनानें याच्या चित्तांत विकार निर्माण केला, म्हणून यानें आपल्या तृतीय नेत्रांतील अग्नीनें त्याला जाळलें. हा अमंगल व शिश्नदेव, म्हणून ब्रह्मदेवादि शिष्ट देव याला हीन लेखीत. दक्ष हा याचा सासरा. उच्चनीच भावाच्या अभिनिवेशानें त्यानें याचा अपमान केला, तेव्हां यानें त्याचा यज्ञ उध्वस्त केला व त्याचा वध केला. ब्रह्मदेवाच्या यज्ञांत यानें जबरदस्तीनें भागाचें स्थान मिळविलें. यानें त्रैलोक्यांतील गंधर्व व किन्नर यांच्या स्त्रियांवर मोहिन्यस्त्रप्रयोग करून त्यांसह कैलासावर क्रीडा केली. हें समजतांच पार्वतीनें त्यांना चोपलें व शाप दिला. म्हणून त्या चांडाळ व म्लेच्छ योनींत जन्माला आल्या. या कथा व त्यांत नमूद झालेलीं लक्षणें यावरून रुद्राच्या उत्क्रांतींतील काहीं टप्पे ओळखतां येतात. रुद्र हा शिष्ट यज्ञ-

करयांचा देव, विनायकाप्रमाणेंच आरंभीं विघ्नकारक व नंतर विघ्नहारक, तामसी व विलासी. आर्यांच्या भटक्या टोळ्या स्थिरावल्यानंतर त्याला पशुपतित्व प्राप्त झालें. यामुळे व त्याच्या रागीटपणामुळें त्याचा दर्जा हिणावला व यज्ञादि समारंभांत त्याला जबरदस्तीनें स्थान मिळवावें लागलें. मोहेंजो दारो येथें उपलब्ध झालेल्या अतिप्राचीन मृत्तिकामुद्रावर योगींद्र पशुपतीची मूर्ति आढळते आणि सिंध प्रदेशात उत्खननात जागोजाग दगडी शिवलिंगें व योनि मिळालेल्या आहेत. सर जॉन मार्शल यांनी या पशुपतीला प्रोटो-शिव अशी संज्ञा दिलेली आहे. यावरून या काळात रुद्रपूजेचा लिंगपूजेशीं समन्वय झाला असावा असें दिसतें. डोंगरी प्रदेशात शिवपूजा व मैदानी मुलखात विष्णुपूजा प्रचलित असल्याचें मेगॅस्थेनिस ( ईलियट : २·१३७ ) सांगतो सम्राट् अशोक हा आरंभीं शैव ( डॉ. स्मिथ : Early History of India . p 185 ) होता. पतंजलीनें ( ५·२·७६ ) शिवभागवताचा उल्लेख केलेला आहे. सातवाहनाचे समकालिन उत्तर हिंदुस्थानी सम्राट कुशान यांच्या नाण्यावर शंकराची प्रतिमा आढळते. शिव हा बहुजनसमाजाचा देव होता आणि प्राचीन द्रष्ट्यानीं योजिलेल्या आर्यीकरणाच्या संघटनेंत त्याला व त्याच्या अनुयायांना शिष्ट देवतांत व समाजात स्थान मिळालेलें असावें, असा यावरून निष्कर्ष निघतो. कान्हेरी, कार्ले, कुडा व जुन्नर येथाल लेण्यांतील शिलालेखात महादेव, शिव व स्कन्द या नावाच्या अनेक व्यक्ति आढळतात. स्कन्द व शिव हीं नामांधे असलेले राजे पुढं सात-वाहन घराण्यात ( ५ स्कन्दस्तम्भि, ११ स्कन्दस्वाति, २० शिवस्वाति, २५ शिवश्री व २६ शिवस्कन्द ) होऊन गेलेले आहेत यावरून गाथासप्तशतीच्या काळात शिवपूजा प्रचलित होती व शिवाच्या लोकांना अवगत होत्या असा निष्कर्ष काढावयास प्रत्यवाय नाहीं

शंकराचो उभारणीच संकीर्ण आहे वैदिक रुद्राचें रौद्र स्वरूप गाथासप्तश-तीत राजय झालेल आहे शंकर हा वृत्तीनें सालस नरा, परंतु दक्षकन्येच्या भावना गामाळण्याविषयी तो दक्ष ( क १९ ) आहे. शंकर हा अपरिग्रह वृत्तीनें स्मशानांत राहणारा, पण पार्वतीकडून प्रेरणा मिळतांच आत्मप्रस्तांना त्यांची योग्यायोग्यता विचारात न घेता त्यास कल्याणासाठीच्या त्याच्या गारुलेपरुरुचा अनेक कथा संस्कृत व प्राकृत वाङ्मयांत जागोजाग आढळतात. त्याची ही वृत्ति क ४१७ या गाथेत व्यक्त झालेली आहे. म्हणूनच त्याला दर्प

गौरीहृदयेश म्हटलेलें आहे असें वाटतें. संस्कृत सारस्वताच्या अभिजात कालांत कालिदासानें वर्णिलेले शंकरपार्वतीचे विलास (क्र. ४५५) येथे मूळ स्वरूपांत पद्यावयास मिळतात. शंकर हा जसा भोगी तसाच योगी; म्हणूनच त्याचें मदनाला आव्हान (क्र. ७५८) आहे. शंकर हा देवाधिदेव खरा, पण तोही सूर्याचें ध्यान करतो व गायत्री जपतो (क्र. १.४४८.७००), म्हणून हाल सातवाहन हा बाबत शैव भासला तरी तो सूर्योपासक असला पाहिजे असें अनुमान होतें.

सूर्यः सूः क्र. १. ३४, ३३२, ६५३, ७०० : सर्व प्राचीन संस्कृतींनी सूर्याला देवत्व दिलेलें आहे. सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं गायत्री मंत्राचा जप करून सूर्याचें ध्यान करावयाचें आणि त्याला अर्घ्य द्यावयाचें, हा त्रैवर्णिकाचा सन्ध्याविधि हिंदुस्थानांत वैदिक काळापासून (तै. आ. २.२) प्रचलित आहे. प्रजापतीची कन्या संज्ञा ही सूर्याची पत्नी तिला सूर्याचें तेज सहन होईना म्हणून तिनें स्वतःची प्रतिमा अशी छाया ही स्त्री उत्पन्न केली आणि पतीची सेवा व मुलांचें पालन करावयाची कामगिरी तिजवर सोंपवून संज्ञा उत्तर कुरु देशात अज्ञातवासांत राहू लागली. छायेच्या सापत्न भावामुळें संज्ञेच कृत्रिम सूर्याच्या लक्षात आलें. या छायेचा क्र. ३४ या गाथेतील छायेशीं कांहीं संबंध नाहीं सूर्य हा मूळचा अवयवहीन, त्याला त्वष्ट्यानें सुदर रूप दिलें, पण तें कंबरेपर्यंतच दिलें. म्हणून याला अंतरिक्षांतलें दैनिक परिभ्रमण रथारूढ होऊनच करावें लागतें.

क्र. १६ या गाथेंत चंद्राला अमृतमय, गगनशेखर व रजनीमुखतिलक म्हटलेले आहे. क्र. ९८० या गाथेंत संध्या ही चंद्राची प्रिया असल्याचें सांगितलेलें आहे. पुराणानुसार सन्ध्या ही ब्रह्मदेवाची मानसकन्या; देहत्यागानंतर ती अरुन्धती झाली. क्र. ९८० मधील सन्ध्येचा हिच्याशीं कांहीं संबंध नाहीं. चंद्र हा अमृतमंथनातून निघाला. दक्षानें याला आपल्या सत्तावीस कन्या दिल्या. त्याचीं नांवें पुढें नक्षत्रांना मिळालीं. त्याचा पुत्र बुध व त्याला बृहस्पतीची पत्नी तारा हिजपासून झाला. चंद्र हा अंतरिक्षांतील नक्षत्रांचा व पृथ्वीवरील औषधींचा राजा. क्र. ३४६ या गाथेत उदयसमयीं चंद्राला फुलें वाहण्याच्या प्रथेचा उल्लेख आहे. उगवत्या चंद्रावर फुलें उधळण्याचा विधि मला अन्यत्र आढळला नाहीं.

क ५९८ या गाथेत राहूचा उल्लेख अम्बुपिसाअ=अम्बुपिशाच या देशी नावानें आलेला आहे समुद्रमन्थनानंतर सुरांनीं असुरांना वगळून अमृत पान सुरू केलें तेव्हा राहूनें प्रच्छन्नरूपानें अमृतपानास सुरवात केली, परंतु तें अमृत याच्या गळ्यापर्यंत उतरलें न उतरलें तोंच याचें कपट व मूळचें दैत्य रूप सूर्यचंद्राच्या ध्यानीं आलें त्यानीं हें विष्णूला सांगितलें लगेच विष्णूनें याचा शिरच्छेद केला. तरीही हा अमर झाला तेव्हापासून तो सूर्यचंद्राना ग्रासतो. त्याच्या शिराला केतु म्हणतात व धडाला राहू पुराणात राहूला- स्वर्भानु (विष्णु १२१) म्हटलेले आहे. स्वर्भानु असुराच सूर्य ग्रहणादि प्रताप ऋग्वेदात (५·४०·५-९) वर्णिलेले आहेत पौर्णिमेच्या चंद्राला ग्रासणाऱ्या पिशाचाला गाथासप्तशतींत अम्बुपिसाअ म्हटलेलें आहे असुर वेगळे, पिशाचें वेगळीं ह्या पिशाच्याची वस्ती पाण्यात असते अशी गाथाकवींची समजूत होती असें दिसते अर्थात् वैदिक स्वर्भानु व पौराणिक राहू यांशीं याचा उच्चार अगर कल्पनादि साम्यां खेरीज कोणताही संबंध नाहीं हे पिशाच लांडग्याच्या रूपानें चंद्रसूर्यांना मारतें व आरडा ओरडा केला असता भयभीत होऊन पळतें अशी प्राचीन जर्मनांची समजूत होती आणि ग्रहणप्रसंगीं ते जमावानें आरडाओरडा करीत असत (A Biographical Dictionary of Puranic Personages, Akshaya Kumari Devi, p 2) आपल्याकडेही ग्रहणाच्या वेळीं असाच आरडा होता हें पिशाच आर्यांचा भारतात प्रवेश होण्यापूर्वीचें असावें असें यावरून अनुमान करण्यास प्रत्यवाय नाहीं

सूर्याच्या रथाला सात घोडे आहेत असें प्रतीकात्मक विधान ऋग्वेदात (८·७२·१६) आहे म्हणून सूर्याला सप्तवाहन म्हणतात सातवाहन हें कुलनाम आहे. तसेंच व्यक्तिनामही आहे ही संज्ञा सप्तवाहन या अभिधाना-पासून निर्माण झालेली असावी असे माझे म्हणणे आहे तें मी अन्यत्र (ॲनल्स . भांडारकर इन्स्टिट्यूट भाग ४७ पृ २३७-२४७) विस्तारानं मांडलें आहे. अनेक सातवाहन राजांच्या नावांत अन्त्यपर्यांत वारंवार आढळणाऱ्या वर्णे या शब्दात त्यांचें सूर्यजनकत्व सूचित होतेंसे दिसते गाथासप्तशतीच्या आरंभींच्या गाथेत पशुपतीला वंदन केलेले आहे, पण पुढे पशुपति हा सूर्याचें ध्यान करीत आहे यावरून सूर्य हें सातवाहनांचें कुलदैवत असावं असा निष्कर्ष निघतो आणि तो माझ्या वरील सिद्धान्ताला पोषक आहे

हरि : क्र १५१, ४०६, ४११, ८१०, ९८२ हरि व विष्णु हे एकच ऋग्वेदात विष्णुचा उल्लेख थोड्याच सूक्तात (१.१५४, १५५, १५६, ७ १०० इ) आलेला आहे लोकाना राहण्यासाठीं पृथ्वी योग्य व्हावी म्हणून विष्णूनें त्रैलोक्यात तीन पावलें ( ८-१२ २७ ) टाकलीं. ऋग्वेदातील विष्णूचें वर्णन सूर्याशीं जुळतें ब्राह्मणोपनिषद् काळात विष्णूचा यज्ञाशीं ( मै. उ ६ १६ ) समन्वय होऊ लागला याच काळात ब्रह्मा, विष्णु व महेश्वर हें त्रैरूप निश्चित झालें विष्णूच्या अवतारसंकेताचें मूळ ऋग्वेदांतही आढळतें क्र ४०६ व ४११ या गाथात वामनरूपी हरीचा उल्लेख आलेला आहे समुद्रमथनातून निघालेल्या रत्नापैकीं कौस्तुभ व लक्ष्मी हीं विष्णूला प्राप्त झालीं त्यांचा उल्लेख क्र १५१ व ९८२ या गाथात आलेला आहे विष्णूच्या नाभींतून निघालेल्या कमळात ब्रह्मदेवाचें आसन असतें, याला चार तोंडें असल्यामुळें त्याची नजर चुकविणें अशक्यप्राय असतें, कारण देव डोळे झांकीत नाहींत त्याला आपला प्रणयप्रसंग दिसू नये म्हणून लक्ष्मीला बिचाऱ्या बेसावध विष्णूचे डोळे झाकावे लागले, कारण विष्णूचे डोळे झाकले म्हणजे त्रैलोक्यात अंधार होतो या सर्व संकेताचा उल्लेख क्र ८१० या गाथेंत आलेला आहे लक्ष्मीला वाटतो तसा संकोच विष्णूला वाटत नाहीसें दिसतें प्रसन्नराघवाच्या नान्दींत जयदेव सांगतो, विष्णूनें एका हातानें ब्रह्मदेवाच्या कपाळीं पुण्यवर्णावली काढली आणि त्याच वेळीं दुसऱ्या हातानें लक्ष्मीच्या स्तनावर कस्तुरीनें मकराकार नक्षी काढली ! सारेंच विलक्षण ! समुद्रमथनानंतर विष्णूनें मोहिनी रूप धारण केलं ही कथा क्र ९८२ या गाथेंत सूचित आहे असं वाटतें

## २. देवता

गाथासप्तशतींत देवाप्रमाणें कांहीं देवताचे उल्लेख आलेले आहेत क्र ११४ या गाथेंत गृहदेवतेचा उल्लेख आहे घरोघर रोज गृह-देवतांची पूजा होत असे व त्याच्या गळ्यात ताज्या व सुगंधी फुलांची माळ घालण्यांत येत असे, असें या उल्लेखावरून दिसतें लक्ष्मीचे (लच्छी क्र ४२, १५१, ३८८, ५७४, ५७७, ८१०, ९८७ ) उल्लेख अनेक आहेत पैकीं क्र ५७४, ५७७ व ९८७ या गाथांत अनुक्रमें मधुमासलक्ष्मी, प्रावृड्लक्ष्मी व जयलक्ष्मी याचे उल्लेख आहेत क्र ४२ मधील लक्ष्मी ही अभ्युदय व ऐश्वर्य यांची द्योतक आहे समुद्रमथनातून

लक्ष्मी निर्माण झाली ही कथा गाथाकर्त्यांना माहीत होती तिची गौरता वृद्धिंगत करण्यासाठीच जणू तिला क्र ३८८ मध्ये दुग्धसमुद्रमंथनातून निर्माण केली आहे क्र ११९ व ८१० या गाथातील लक्ष्मी ही विष्णूच्या सान्निध्यात असून विपरीत रत करीत आहे क्र ८१० मधील लक्ष्मीनें आपला विलास परक्याला दिसू नये म्हणून विष्णूचा सव्य नेत्र झाकला आहे या लक्ष्मीची क्र ४५५ मधील पार्वतीशीं तुलना करण्यासारखी आहे. येथें पार्वतीनें कटी केलेली आहे. क्र ९७७ या गाथेंत वाणी=सरस्वतीचा उल्लेख आहे ब्रम्ह्यानें स्वत च्या अर्धांगापासून उत्पन्न केलेल्या शतरूपेलाच गायत्री, वाणी, सरस्वती व सावित्री हीं वैकल्पिक नावें आहेत असें काहीं आधारग्रंथ सांगतात ऋग्वेदात सरस्वतीचा उल्लेख ( ५ ४३.११ ) आलेला आहे. सिरि=श्री या देवतेचा उल्लेख क्र ७१, ७७६, ८१० व ९७१ या गाथात आलेला आहे पैकीं क्र ७१ व ९७१ या गाथातील उल्लेख जयश्रीचे असून क्र. ७७६ मधील उल्लेख मधुश्रीचा आहे. क्र ४६ या गाथेंत भअवइ णिसा=भगवति निशा व क्र. ८८७ या गाथेंत माण=मानदेवता यांचे उल्लेख आलेले आहेत या सर्व देवतापैकीं कोणाच्याही पूजेचा उल्लेख गाथासप्तशतींत आलेला नाहीं

अज्जा = आर्या, ( क्र १७२ ), उमा ( क्र ९८० ), गोरी = गौरी ( क्र.१, ४४८, ४६७, ७०० ), पव्वई = पार्वती ( क्र ६६, ४५५, ९८५ ) हरवहू = हरवधू ( क्र ९८५ ).

आर्या ही आदिमाया, जगदम्बा, दुर्गा अज्जा हें दुर्गेचे शांत स्वरूप (Jaina Life in Ancient India p 224) तिनें दक्षाच्या घरीं सतीरूपानें अवतार घेतला. त्यानें ती महादेवाला दिली. दक्षानें यज्ञ आरंभिला. महादेव अणग, म्हणून सतीला आमंत्रण गेलें नाहीं तरी ती यज्ञाला गेली. तेथें तिचा अपमान झाला तेव्हा तिनें यज्ञकुंडांत उडी घेतली. नंतर तिनें हिमालयाच्या उदरीं जन्म घेतला पर्वताच्या पोटी आली म्हणून तिला पव्वई = पार्वती हें नाव पडलें. पूर्वपतीची प्राप्ति व्हावी म्हणून तिनें तप आरंभलें तपानंतर तिला उमा हें नाव मिळालें. असीरियन भाषेंत उम्मा म्हणजे आई. ( Racial History of India. , Chandra Chakrabarty p 135 ) वायव्य सरहद्दीपलीकडील खट्टी जमातींत उम्मा

नावाचा मातृदेवता आहे अम्मा व उम्मा या एकच ( Religion of the Vedas Keith p. 199 ) जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणात ( ४२०.१२ ) उमेचा उल्लेख आलेला आहे पार्वतीचा वर्ण सावळा होता, म्हणून तिला काली हें नाव मिळाल एकदा शकरान तिच्या कृष्णवर्णाचा सबाधनपूर्वक उल्लेख केला तेव्हा ती चिडली नतर ब्रह्मदेवानें तिला गौरवर्ण दिला म्हणून तिला गौरी हें नाव मिळाले पार्वती नेहमीं शकराच्या सन्निध असते ( क्र १, ४४८, ७०० ) तिचा स्वभाव मोठा सशयी व मत्सरी शकर मोठा विलासी, आणि पार्वतीही ( क्र ४५५ ). तो कोठें इकडे तिकडे पहात आहे कीं काय यावर तिची दक्ष दृष्टि आहे आर्तांना साह्य करण्याविषयीं ती शकराला प्रोत्साहन देत ( क्र ४६७ ) असते अनेक प्राचीन व मध्ययुगीन कथा या सकेतावर आधारलेल्या आहेत क्र ४५५ मध्यें पार्वतीनें आपल्या ओठाना शकराचा तृतीय नेत्र झाकल्याचा उल्लेख आहे या नेत्राच्या निर्मितीची कथा महाभारताच्या अनुशासन पर्वांत उमामहेश्वरसवाद या अध्यायात आलेली आहे एकदा उमेनें महेश्वराचे नेत्र झाकल तेव्हा त्यावर अवलबून असलेलें जगाचें चैतन्य एकाएकीं नष्ट झाल तेवढ्यात शकराच्या भाऊप्रदेशातून एक महान् ज्वाला निघाली व तेथें प्रलयाग्नीसारखा भयकर तृतीय नेत्र निर्माण झाला बुद्धमूर्तीच्या कपाळावर दिव्य दृष्टीचें प्रतीक असें जें ऊर्ण रत्न असतें त्याच हें ब्राह्मणीकरण असावें, असा प्रो. हॅव्हेल ( Ideals of Indian Art p 51 ) यांचा अदाज आहे वस्तुस्थिति या विधानाच्या अगदीं उलट असण्याचा सभव आहे

क्र १७० मध्यें अज्जाघर असा उल्लेख आहे येथ देऊळ व मूर्ति याची स्पष्ट सूचना आहे गृहपतीन आपल्या मेलेल्या रेड्याच्या गळ्यातली मोठ्या पटाची माळ येथें लावलेली आहे यावरून दिसतें कीं ही ग्रामदेवता असावी आणि तिची मूर्ति ओबडधोबड किंवा केवळ शिलाखडाची प्रतीकात्मक असावी

शिवपार्वतीच्या कथामध्यें आर्य व अनार्य याच्या एकीकरणाचा, किंवा अनार्यांच्या आर्यीकरणाचा प्रयत्न प्रत्ययास येतो किंवा पुरोहितानीं व पौराणिकानीं आरंभिलेल्या अनार्यांच्या अनुरजनाचा

### ३. देवालये व मूर्तिपूजा :

गाथासप्तशतींत देवळाचे अनेक उल्लेख आलेले आहेत अज्जाघरः क्र. १७२, देअउलः क्र ६९, देउलः क्र. १०९, १९०. देउळ हा शब्द देवकुल ( कुल = घर ) पासून सिद्ध झालेला आहे मराठींत कोनाडा या अर्थानें देवळी हा शब्द वापरात आहे घराच्या भिंतींतला पहिला कोनाडा गृहदेवतांच्या स्थापनेसाठी ठेवण्यात आला, असें तर नसेल ? गाथासप्तशतींत आलेल्या देवळाच्या वर्णना वरून दिसतें कीं तीं विशेष विस्तीर्ण नसावीत कलाकृतींनी सजलेल्या वाधाव मंदिराची प्रथा उत्तरकालीन आहे. गाथासप्तशतींतील मंदिरावर शंकूच्या आधारानें उभारलेले बांधीव कळस ( क्र ६४ ) आहेत व त्याभोवतीं विस्तीर्ण पटांगणे ( क्र १९० ) आहेत या पटांगणात सार्वजनिक उत्सव होत असावेत, त्याचप्रमाणें ही गावकऱ्यांची जमण्याची जागा असावी देवळात प्रवाशाच्या मुक्कामाची कांहीं ( क्र १०९ ) सोय असावी कांहीं देवळाचा संकेतस्थानासाठीं उपयोग झालेला आहे, यावरून तीं गावाबाहेर असावींत आणि ठराविक वेळापेरीज तिकडे वर्दळ नसावी असें वाटतें क्र ६४ मधील देऊळ पडकें आहे. या अवस्थेला शकाचें आक्रमण जबाबदार होतें कीं काय ? कीं देऊळ बांधावयाचें व त्याच्या डागडुजीची तरतूद करून ठेवावयाची नाहीं ही आजची दुर्दैवी प्रथा तेव्हांही प्रचारात होती ?

गायासप्तशतींत मूर्तींचे उल्लेख फक्त तीन आहेत अज्जा, गणवई व सुरनाह पैकी अज्जेची मूर्ति आहे व ती देवळात आहे हें अज्जाघर या प्रयोगावरून निश्चित ठरतें. मेलेल्या रेड्याच्या गळ्यातील माळ अज्जाघरात ( क्र १७२ ) टांगलेली आहे त्याअर्थीं ही अज्जा ग्रामीण, शिलास्वरूपी असावी गणपतीची मूर्ति दगडी आहे व उशीसारखी वापरता येण्याजोगी हलकी व चपटी आहे. गणपतीच्या देवळाचा उल्लेख नाहीं ही मूर्ति पारावरची, शिलास्वरूपी असावी इंद्राची मूर्ति लाकडी व घरगुती आहे गृहदेवतेच्या मूर्ति घरोघर, देवळींत मांडलेल्या असाव्यात.

गायासप्तशतींत देवांचीं ध्यानें व प्रार्थना ( क्र ४८, ३१२ ) जागोजाग केलेली आहेत गणपति, त्रिविक्रम, पशुपति, रुद्र, वामन, विष्णु व सूर्य या देवांना गाथाकर्त्यांनी वंदन केलेलें आहे किंवा त्याचा जयकार

(क्र ३३२, ३५५, ४०६) केलेला आहे अशीच नमन मदनबाणाना (क्र ३२५) व प्रेमाला (क्र ४८४) केलेली आहेत यांपैकी मूर्ति अशी फक्त गणपतीची आहे अन्य नमनें मानसिक व सांकेतिक आहेत मूर्तीची प्रत्यक्ष पूजा अशी फक्त गृहदेवतेची (क्र १९४) झालेली आहे क्र १९६ मध्ये नागराच्या पूजेचा उल्लेख आहे गाथाकवींना पूजेची प्रथा माहीत होती हे निश्चित क्र १५० या गाथेत स्तनावरील नखक्षताची पूजा नीलकमळाना केलेली आहे आणि क्र ३४६ या गाथेंत चंद्रावर फुलें उधळलीं आहेत या गाथेला सरस्वतीकण्ठाभरणांत (निर्णयसागर पृ ६५४) अग्गी चंद्रक असें शीर्षक दिलेलें आहे सूर्याला अर्घ्य व अंजाली अर्पण (क्र १, ३३३, ३५५ ४७८, ७००) केलेल्या आहेत आणि इष्टदैवताचें मनपूर्वक ध्यान केलेलें (क्र ३३२, ७००) आहे प्रातसंध्या व सायसंध्या (क्र १, ७००) प्रचारात होत्या पूजेसाठीं मरकतभाजन व शंखशुक्ति (क्र ३, ३००) यांचा वापर होता मात्र ही पूजा घरगुती देवाची आहे मूर्तिपूजा ही संज्ञा हल्ली आपण ज्या अर्थानें वापरतों त्या अर्थानें ती गाथासप्तशतीच्या काळात अस्तित्वात नव्हती असें विधान करावयास प्रत्यवाय नाहीं मूर्तिपूजेचें हल्लींचें स्वरूप बौद्धधर्मांच्या महायान पथाच्या उत्तरकालीन आहे

## ४ दिव्ये व व्रतें, विधि व रिवाज

क्र २११ या गाथेंत अग्निरानाच दिव्याची सूचना आहे याचा तपशील मिताक्षरेंत (याज्ञवल्क्यस्मृति मिताक्षरासार वे शा स रा विष्णुशास्त्री बापट, पृ १९७ ९) दिलेला आहे "लोहाच्या शुद्धीकरिता चांगला तापविलेला लोहपिंड उदकात टाकून पुन अग्नीत घालून लाल करावा, नंतर पुन एकदा तसेंच करून तिसऱ्या वेळीं लाल झालेल्या त्याला शोध्याच्या दोन्ही हातावर ठेवावा त्यानें लोहपिंड ओंजळींत घेऊन सात मंडलातून सावकाश गमन करावें इतकें करूनही हात जळला नसेल तर तो शुद्धीस प्राप्त होतो" सोन्याचा अलंकार घडवताना तो वारंवार अग्नीत तापवावा व पाण्यात थंड करावा लागतो एवढ्यापुरताच या क्रियेचा दिव्याशीं संबंध आहे क्र १८५ या गाथेंत उल्लेखिलेलें सामसबल = श्यामशबल दिव्य असेंच आहे पण्डित मथुरानाथ शास्त्री टीकेंत सांगतात "श्यामशबल व्रतविशेष। पूर्वमशौ

प्रविश्य जले प्रविशते।'' यामुळे शरीराला अपाय झाला नाही तर व्रतकर्ता निर्दोष आहे असें समजावें.

क. ४४८ या गाथेत प्रमथाधिप शंकर कोशपान करीत आहे. शंकराचें प्रमथाधिप हे नाव उत्तरकालांत लुप्त झालेले आहे. या दिव्याचा तपशील याज्ञवल्क्यस्मृतीच्या व्यवहाराध्यायांत दिलेला आहे : देवानुग्रान्समभ्यर्च्य तत्स्नानोदकमाहरेत्। संश्राव्य पाययेत्तस्माज्जलं तु प्रसृतित्रयम्॥ ११२॥ अर्वाक् चतुर्दशादह्नो यस्य नो राजदैविकम्। व्यसनं जायते घोरं स शुद्धः स्यान्न संशयः ॥११३॥ दुर्गा, आदित्य, इत्यादि उग्र देवांचे गंध-पुष्पादिकांनी पूजन करून व त्यांना अभिषेक करून त्यांचें स्नानोदक आणावें हें जल अभिमंत्रित करून न्यायाधीशानें त्यांतील तीन ओंजळी जल शोध्याकडून पिववावें. धर्माचें आवाहन, सर्व देवतापूजन, होम, मस्तकावर प्रतिज्ञापत्र बांधणें, इत्यादि विधि यथाशास्त्र केल्यानंतर हें तीर्थपान करवावें. गोमयाचें मंडल करून व त्यात शोध्य पुरुषाला आदित्याभिमुख स्थापून कोशपान करवावें. जो ज्याचा भक्त असेल त्या देवाचें स्नानजल त्याच्याकडून पिववावें. तो सर्व देवाचे ठायीं समभाव ठेवीत असल्यास त्यास आदित्याचें तीर्थ पाजावें एखाद्याचा विश्वास यावा म्हणून, एखाद्याविषयी कांही शंका आल्या असतां त्यांच्या निवृत्त्यर्थ व चित्तशुद्धीकरता कोशपान द्यावें. पानकर्ता आस्तिक व व्यसनरहित असला तरच त्याला हें दिव्य करावयास सांगावें. महापातकी, वर्णाश्रमधर्मरहित, पाखंडी, कृतघ्न, नपुंसक, प्रतिलोमज, नास्तिक. मात्य इत्यादिकांकडून हें व्रत करवूं नये. इतर व्रतें व दिव्यें यांचा प्रत्यय तावडतोब येतो; पण कोशपानाच्या प्रत्ययाला अवधि लागतो हें दिव्य केल्यापासून चौदा दिवसांच्या आंत ज्याला राजाच्या निमित्तानें अथवा दैवी आपत्तीनें घोर व थोर दुःख होत नाही तो शुद्ध होय असें जाणावें. कोणत्याही देह-धानाला अल्पदु:ख होणे अगदी अपरिहार्य आहे. महादु:खही चवदा दिवसां नंतर झाल्यास काही दोष नाही. अल्प अपराधाला अल्प अवधि सांगितलेला आहे. कोशपानव्रताचा तपशील इतरत्र वेगळा दिलेला आहे : ज्यात देवाची प्रतिमा प्रतिबिंबित झालेली आहे असा जलाञ्जलीचें प्राशन यामुळे अपाय झाला नाही तर तो निरपराधी आहे असें समजावयाचें. कोशपान या गाथेत शुद्ध

शंकराने स्वत चें निरपराधित्व सिद्ध करण्यासाठीं ह्या दिव्याचा अवलंब केलेला आहे. संदर्भावरून वाटतें कीं येथें उल्लेखिलेलें तत प्रतिमा-प्रतिबिंबाचें असावें; याज्ञवल्क्यातील सवीर्ण स्वरूपाच्या दिव्याचें हें मूल स्वरूप असावें असें वाटतें.

क्क २०५ या गाथेंत काकबळीची सूचना आहे. प्रत्यक्ष उल्लेख पिंडाचा आहे, पण त्यावर नजर कावळ्याची आहे, म्हणून ह्या उल्लेख काकबळीचाच असला पाहिजे. वैश्वदेव म्हणजे रोज भोजनापूर्वी अग्नीला आहुति देण्याचा विधि, यानंतर उरलेल्या भाताचा पिंड काकबळी म्हणून घराबाहेर ठेवण्यात येत असे. कावळ्यानें पिंडाचें ग्रहण केल्यानंतर यजमानानें भोजन करावयाचें असा रिवाज होता. विप्रपरीक्षेसाठीं ही योजना असावी. मेघदूतात यक्षानें आपल्या पत्नीचें वर्णन (उत्तर : २५) 'बलिव्याकुला' असें केलेलें आहे. मल्लिनाथानें याचा अर्थ 'देवताराधनेषु व्याकुला व्यापृता वा' असा दिला आहे. श्री. वामनशास्त्री इस्लामपूरकरानीं आपल्या काव्यार्थदीपिका टीकेच्या टीपेंत (पृ. ११०) बलि म्हणजे पूजा असा अर्थ दिलेला आहे श्री. भार्गवशरण उपाध्याय (India in Kalidasa: p. 328) यांनी मात्र याचा अर्थ काकबळी असा घेतलेला आहे ते सांगतात : Kakabali was performed for the safety of a husband living in a distant land. The wife hung up flowers corresponding to the number of days her husband was expected to remain absent. She then threw them on the floor one by one to ascertain the number of days that they had passed alone ह्या अर्थ चूक आहे हें अगदीं स्पष्ट आहे. मला वाटतें त्याच हें स्पष्टीकरण उत्तरमेघातील सत्ताविसाव्या श्लोकातील 'देहलीदत्तपुष्पै.' यावरील असावें व तें अनवधानानें बलीचे जागीं आलें असावें. मेघदूतांतील बळींचा काकबळीशीं काहींही संबंध नाहीं. याज्ञवल्क्यस्मृतींत गृहस्थधर्म प्रकरणांत (मराठी भाषांतर : वे. शा. स. रा. विष्णुशास्त्री बापट : पृ ३२) सांगितलें आहे : " भूतयज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ ब्रह्मयज्ञ व मनुष्ययज्ञ या पांच यज्ञांस बलिकर्म, स्वधा, होम, स्वाध्याय व अतिथिसत्कार म्हणतात. स्वगृह्योक्त विधीनें वैश्वदेव होम करून त्यांतून राहिलेल्या अन्नानें भूतास बलि द्यावा. त्यानंतर आपल्या शक्तीप्रमाणें कुत्रें, चांडाल, कावळे, कृमि, पापी, रोगी, पतित इत्यादींकरिता भूमीवर अन्न ठेवावें.

क. ४९६ या गायेंत बळी देण्यासाठी गळ्यात माळा घालून चालविलेल्या रेड्याचा उल्लेख आलेला आहे मुसस्कृत आर्य यज्ञप्रसंगी अनेक बळी देत. अश्वमेध व पुरुषमेध हे यज्ञ त्या त्या बळीवरच आधारलेले आहेत आर्यांचे बळी मौल्यवान व यज्ञविधि सकीर्ण होते आणि ग्रामीणांचे बळी सामान्य व विधि धोपट, एवढाच फरक.

क १०४ या गाथेची नायिका जणू स्मशानात बाधवाच्या अस्थि गोळा करीत आहे. ही नुसती उपमा असली तरी तिला हा विधि अभिप्रेत आहे. घरी कोणी पुरुष मनुष्य नसल्यामुळे तिला हें कार्य करावें लागत आहे असें दिसत नाही. प्रेत जाळल्यानंतर अवशिष्ट अस्थि गोळा करून त्या एका पानात घाला वयाच्या व तें जमिनींत पुरावयाचे अशी पद्धत वैदिक काळात ( १० १८·१०· १३ ) प्रचलित होती असें वॉ विंटरनिट्झचें मत ( Religion des Vedas : p 571 ) आहे कौरवाच्या विधवानी श्राद्धादि कृत्यें केल्याचे उल्लेख महाभारतात आहेत. हें स्त्रियांचें कर्तव्य व अधिकारही. गुप्तकालीन स्मृतिकारानीं त्यांचा हा हक्क हिरावून घेतला.

क १६५ या गाथेंत शेतकऱ्याची घरधनीण नागराची पूजा करीत आहे. येथें जें पुण्यकृत्य चालले आहे त्याचें नाव सीतायज्ञ ऋग्वेद ( ४ ५७ ) व अथर्व वेद (४·१५) यात पृथ्वी व पर्जन्य यांची अनेक सूक्तें आहेत. नागरट सुरू करताना म्हणावयाचा तो मंत्र असा.

लाङ्गल पवीरवं सुशेवं सुमतित्सरु ।
उदित्कृषति गामविं प्रफर्व्यं च पीवरीम् ।
प्रस्थानवद्रथवाहनम् ॥
शुन. न फाला वितुदन्तु भूमिं ।
शुन कीनाशा अभियन्तु वाहान् ।
शुन पर्जन्यो मधुना पयोभि ।
शुनासीरा शुनमस्मासु धत्तम् ॥

" नांगर कसा असावा ? वज्राप्रमाणें तीक्ष्ण, अनायासें चालणारा, जमीन खोल किंवा उथळ असेल त्या मानानें तींत घुसणारा नागराचे फाळ जमीन चागली नागरोत शेतकरी बैल हाकीत त्यामागून चालोत. सराची न करता पोषक व मधुर उदकाची वृष्टि पर्जन्य करो. सूर्य व वायु कृषिकर्मांत सुख देवोत."

घृतेन सीता मधुना समक्ता
विश्वैर्देवैरनुमता मरुद्भ
उर्जस्वती पयसा पिन्वमाना
अस्मान्सीते पयसाभ्याववृत्स्व ॥

"नांगरलेल्या जमीनीवर तूप व मध शिंपडा विश्वेदेव व मरुद्गण मधुर होऊन जमीन सुपीक होवो जमीनीत गारवा व उदकाचा अंश राहून तेथूनच सामर्थ्य उत्पन्न होवो उदकाने जमीन पुष्ट होऊन विपुल अन्नधान्य उत्पन्न होवो"

गाथासप्तशतीत असा मन्त्रोच्चार झालेला नाही किंवा असे मन्त्र म्हणणारा पंडित इसम आसपास नाही तूप व मधही नाहीत तात्त्विक पूजाविधि तेवढा आहे

गोभिल गृह्यसूत्रात (S B E XXX IV 4 28) व बृहत्कल्पभाष्यात (३ ३,४७) सीतायज्ञाचे उल्लेख आढळतात सीता ही नांगराची व सुपीकी (म भा ७ १०५ १९) देवता निचा पूजा शेतात कोठेही (Social & Religious Life in the Grhya Sutras X 129) करावी असे सांगित लेलें आहे हा यज्ञ घरधनिणीनच करावयाचा (The Position of Woman in Hindu Civilization Dr Altekar p 284) रिवाज होता

क्र ४०७, ६३३, ८५९ व ८७, या गाथात सती-प्रथेचे उल्लेख आलेल आहेत या गाथाच्या नायिका उच्च वर्णाच्या आहेत क्र ४०७ व ६३३ या गाथातील उल्लेख गौरवपर आहेत आणि क्र ८५९ व ८७६ यातील उल्लेख कुचेष्टेचे भासतात ऋग्वेदात या प्रथेचा उल्लेख (१० १८ ८) आहे असे मानण्यात येते, पण ज्या पाठावरून हा निष्कर्ष काढण्यात येतो तो या प्रथेच्या उत्तरकालीन पुरस्कर्त्यांनी रूढ केला असावा असा श्री. मॅक्समुलर (Selected Essays on Language, Mythology & Religion I 335) यांचा अंदाज आहे ब्राह्मण, सूत्र व आद्य स्मृतिग्रंथात या प्रथेला आधार नाही रामायण (७. १७ १४) व महाभारत (११२. १,.७, १८ ५) या वीरमहाकाव्यात आढळणारे सतीचे उल्लेख अपवादात्मक व अविश्वसनीय आहेत. हेरोडोटसन सती प्रथेचा उल्लेख केलेला असून ती शक आदि जमातींत प्रचलित

(४,७१-७३) असल्याचें सांगितलेले आहे उत्तर व पूर्व भारतातल्या त्याच्या वसाहती फार प्राचीन आहेत. अलेक्झँडरच्या स्वारीनंतर मध्य आशियात राजकीय क्रांतीच्या वावटळी उठल्या यामुळें व नैसर्गिक आवर्तांमुळें स्थायिक जमाती भटक्या झाल्या ति पू पहिल्या शतकात शकाच्या आक्रमक टोळ्यांनी सिंध-पंजाबात राज्यें स्थापिली। येथून ते पूर्वकडे संयुक्त प्रांतात आणि दक्षिणेकडे राजपुतान्यात व सौराष्ट्रात विस्तारले जेथें त्यांच्या वसाहती व राज्य दीर्घकाळपर्यंत टिकली अगर जेथील बहुजनसमाजात ते समाविष्ट झाले त्या भागात सती, जोहार इत्यादि प्रथा प्रचलित झाल्या राज्यकर्त्यांशी संबद्ध असलेल्या वर्गातच राज्यकर्त्यांचे रिवाज पुरस्कारले जात त आणि राज्य दीर्घकालपर्यंत टिकले म्हणजे असे रिवाज बहुजनसमाजापर्यंत पोंचतात म्हणूनच या प्रथेचा पुरस्कार फक्त क्षत्रियांना केला व तो बहुजनसमाजापर्यंत पोंचलाच नाही महाराष्ट्रात कधीच उच्चाटन करित नाही म्हणून येथें ही चाल फारशी रूढ झाली नाही

## ५. विवाह

विवाह या विषयाला अनेक अंगें आहेत यामुळ या विषयाचें विवेचन अनेक शीर्षकाखालीं समाविष्ट होऊ शकते तसें तें येथें केलेंही आहे या विषयाची कौटुंबिक व सामाजिक बाजू पूर्वी सांगितली लैङ्गिक बाजू पुढे सांगेन, धार्मिक तिसरी बाजू येथे सांगतो तरीही सकर होणारच कारण या विषयाचें अर्से कोणतेंही अंग नाही की ज्याविषयी धर्मशास्त्रकारांना नियम केलेले नाहीत व निर्बंध घातलेले नाहीत साहजिक आहे कारण आमचें धर्मशास्त्र हेंच आमचें समाजशास्त्रही आहे

विवाहाच्या वेळी वधूचें वय प्रौढ आहे क्र ५१८ च्या नायिकेनें आपले हृदय प्रियकराला अर्पण केलेलें आहे आणि मनस्वित सवधान्या शक्यतेबद्दल साशकता निर्माण झाल्यामुळ ती बावरलेली आहे क्र ६४३ च्या नायिकेनें तर विवाहापूर्वी अनेकांबरोबर लैङ्गिक क्रीडा केलेली आहे कन्येचा विवाह ठरला का तिच्या मैत्रिणी विवाहमंगलगीत (क्र ६४३) गाऊ लागतात ही प्रथा आता फारशी प्रचारात नाही काही जातात लग्नापूर्वी वधूवरान्या घरच्या बायका गाणी म्हणत मिरवणुकीने जातात, पण ती गाणी मंगल

नमतात, भडवणीन्या स्वरूपाचा असतात विवाहान्या वेळा गायिका म्हणतात त्या मगलगीतात वरान्या गोत्राचा म्हणजे नावाचा उल्लेख करण्यात येत असे विवाहाचे वेळी मगलाष्टकें म्हणण्याचा मक्ता अगदा अलीकडेपर्यंत पुरोहिताना काबीज केला होता शिक्षणाच्या प्रसारावरोबर स्त्रियान्या स्वातन्त्र्याच्या मर्यादा विस्तृत होत आहेत आणि आता तर सुशिक्षिताच्या विवाहाच्या वेळा वधूवरान्या मैत्रिणींनीच मगलाष्टकं म्हणावयाची पद्धत रूढ झाली आहे क ६९ या गाथत शिवपार्वतीन्या विवाहाचा प्रसग वाणेला आहे पाणिग्रहणापूर्वी पशुपतीनें आपल्या हातावराल वासुकीचे कक्ण दूर केलें आहे वसुकी हा नागराज असला तरी त्याचें सान्निध्य लोकाचाराविरुद्ध व अमगल म्हणून

क ६४४ या गाथत चतुर्थीमगलाचे दिवशी होणाऱ्या देवकार्याचा उल्लेख आलेला आहे या गिघात ऋतुस्नात वधु गृहीत आहे सूत्रकाळापर्यंत रजोदर्शनानतर विवाह ( History of Child Marriage Dr Bhandarkar Z D M G Band 47 ) होत असत म्हणूनच सूत्रकाराना गर्भाधान हा स्वतत्र सस्कार माहीत नाहा सूत्रकाळात वधूवराची एकशय्या विवाहानतर चवथ्या दिवशी होत असे चतुर्थाकर्म किंवा चतुर्थामगल हा विवाहाच्या विधीतीलच एक अखेरचा आणि आवश्यक भाग होता ( आश्वलायन १ ११ १ १४, बौधायन १ ., १ ७, हिरण्यकेशी ३ ३ ११ ) या विधीचे दान भाग असत एक धार्मिक व दुसरा व्यावहारिक. विवाहानतर चवथ्या दिवशी अग्नि, वायु, चद्र व सूर्य याना आहुति द्यावयाच्या, हा धार्मिक विधि त्या रात्री वधूवराची एकशय्या व्हावयाची, हा व्यावहारिक विधि विवाहानतर तीन दिवसपर्यंत वधूवराना व्रतस्थ रहावें लागे व समवयस्क मित्रमैत्रिणीन्या सहवासात त्यांना परस्पराचा परिचय करून देण्यात येई या काळात त्यानीं एकाच खोलीत पण वेगवेगळ्या बिछान्यावर झोपावयाचें असा सक्त नियम ( The Position of Woman in Hindu Civilization Dr Altekar p 95 ) असे हे तीन दिवस ( नासदीयसूक्तभाष्य राजवाडे १ ३१३ ४ ) कामशास्त्राप्रमाण कन्या विस्रभगाचे, म्हणजे पुरुषान नवोढेला आलस्य, त्रास, दुःख, भ्रम, विषाद व

रति धारण करण्यास शिकविण्याचे होते होमहवनानंतर चवथ्या रात्री त्यांना पूर्ण एकांत मिळत असे या मताचा काळ अधिक असावा असे बोधायनाचें (१७०) मत होतें आणि मनोनिग्रहावर अतिशय ताण पडत असल्यामुळ ही मुदत आणखी कमी करावी असं अन्य सूत्रकाराचें कामसूत्राच्या तिसऱ्या अधिकरणाच्या दुसऱ्या अध्यायात वात्स्यायन सांगतो " विवाहबद्ध झाल्या नंतर वधूवरांनी तीन रात्री भूमीवर शयन करून ब्रह्मचर्य पाळावं एक सप्ताह पर्यंत मंगलवाद्य व गायन यासह स्नान करावें, एकत्र भोजन करावं आप्तेष्ट व नट वगैरेंचे दर्शन घ्यावं पहिल्या दहा रात्री वधूला एकांतात साम्य उप चारांनी विश्वासात घेण्याचा व ती संभोगास प्रवृत्त होईल असा प्रयत्न करावा चौसष्ट कलांचा उपदेश करावा बलात्कार काहीही करू नये चातुर्थिक होम झाल्यानंतर साक्षात् संभोगक्रियेनें नायिकेला न दुखविता संतुष्ट करावें" वात्स्यायनानें मांडलेलें मत दहा दिवसांचे आहे अर्थात् ते उत्तर कालीन आहे

गृह्यसूत्रकालानंतर म्हणजे खि पू चौथ्या शतकानंतर हिंदुस्थानातील राजकीय धार्मिक व सामाजिक परिस्थिति झपाट्यान बदलू लागली धार्मिक आवर्त व राजकीय परचक्रें यामुळे निर्माण झालेल्या अस्थिरतेच्या काळात घरात प्रौढ अविवाहित कन्या असणें असुरक्षित वाटू लागलें या परिस्थितीमुळें धर्मशास्त्र कार प्रतिपादू लागले की रजोदर्शनानंतर कन्यांना फार दिवस अविवाहित ठेवू नये जो तो आपआपल्या अनुभवाप्रमाणे मतप्रतिपादन करीत असल्यामुळें त्यांच्या अभिप्रायात एकवाक्यता आढळत नाही खिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या अखेरीस कन्यांचे विवाह इतक्या बालवयात होऊ लागले की वराची निवड करण्याची जबाबदारी सर्वस्वी वधूपित्यावर येऊन पडली (Dr Altekar पूर्वोक्त पृ ८०) बालविवाह प्रचलित झाल्यामुळें परिस्थितीच्या अनुरोधानें उत्तरकालीन स्मृतिकारांनी गर्भाधान हा नवा संस्कार निर्माण व रूढ केला सूत्रकारांना हा विधि माहीत नाही आणि स्मृतिकारांना चतुर्थीकर्म माहीत नाही म्हणून कोणी चतुर्थीकर्माचा अन्य अर्थ लावतात आणि कोणी त्याचा उल्लेख टाळतात (Dr Altekar पूर्वोक्त पृ ९६)

गार्ग्यायनसूत्रातील उल्लेख संक्रमण काळाचा आहे चतुर्थीमंगल या धर्म-

सूत्रकालीन वैवाहिक विधीचा उल्लेख येथ आलेला आहे, पण धर्मसूत्रकारांनी या विधीचे जे स्पष्टीकरण दिलेले आहे ते गाथेच्या संदर्भाशी जुळत नाही या विधीनंतर पत्नीच्या स्वत्वावरची म्हणून वधूवराची प्रीति गनागमोसुख अगार यास पाहिजे, पण येथे या विधीनंतर वियोग व्हावयाचा म्हणून वधूवर व्याकुलचित्त झाल्याचे आहेत या गाथेवरील टीकेत गदाधर सांगतो की " चतुर्थीकर्मनंतर जामाताने स्वगृही जावयाचा असा लोकव्यवहार " असल्यामुळे भावी वियोगाच्या दुःखामुळे तो व्याकुलचित्त झाला आहे मग हे चतुर्थीकर्म म्हणजे नुसतेच होमहवन करावयाचे की काय ? वैदिक काळात वधूवराची एकत्राच्या विवाहाच्या रात्रीच वरगृही होत ( ज्ञानकोश बुद्धपूर्व जग पृ ३०१ ) असे. गाथेतील संदर्भावरून दिसते की चतुर्थीकर्म समाप्त होईपर्यंत जावईबुवाचा मुक्काम वधूच्या गृहीच होत असे गाथासप्तशतीच्या काळात विवाहाच्या रात्रीच एकत्रग्या होत असती तर क्र. ४७० मध्ये आला आहे तसा आनंद पटाचा उल्लेख आला नसता क्र २४ या गाथेचा, विशेषत या गाथेवरील टीकेचा, आधार घेतला असता दिसून येते की गाथासप्तशतीच्या काळात चतुर्थीकर्मानंतर, म्हणजे होमहवनानंतर काही दिवसांनी, बहुधा वधूला एकदा रजोदर्शन होऊन गेल्यानंतर ऋतुशांतीचा विधि करण्याचा प्रघात कुलीन कुटुंबात रूढ झाला होता

या सर्व विधींसाठी पुरोहित अवश्य आहे हे मानलेच पाहिजे, पण प्रत्यक्ष पणे त्याचा उल्लेख मात्र कोठेही आलेला नाही

## ६ समजुती .

समाजाच्या सांस्कृतिक पातळीशी अबाधद्ध अशा भोळ्या समजुती प्रत्येक देशात, प्रत्येक कालखंडात आढळून येतात हे लक्षण बुद्धिवादानुसार दौर्बल्याचे, पण त्याचे मूळ संस्कारात असते, संकेतात असते गाथाकाराना समाजात प्रचलित असलेल्या काही समजुती सशब्द केलेल्या आहेत

देव नेहमी तरुण ( क्र ५९३ ) असतात ते आपले डोळे कधी मिटत नाहीत ( क्र १०८, ५९२ ) आणि विष्णूचा उजवा डोळा मिटला की सर्वत्र अंधार ( क्र ८१० ) होतो देव व दैत्य याबद्दल त्याच्या कल्पना होत्या तशा च

त्या आताही आढळतात. देवाची प्रार्थना केली कीं इष्टप्राप्ति (क्र ४६, ४८० ८३८) होते. दैवाची गति अगम्य (क्र. १३२, २१२, २४५, २७९, ६५६, ७८३, ८३८, ९३९) आहे. आपण कर्म करावयाचें, त्याचें फळ मिळणें न मिळणें दैवाधीन (क्र. २७९) असतें. क्र ६५६ मध्यें दैवाची सकाळ मुलाशीं केलेली तुलना अत्यंत हृद्य आहे. धर्माचें साहचर्य असतें तेंच विज्ञान (क्र. ९५१) होय व धर्मांतर बोलणें हें जाणत्याचें कर्तव्य (क्र १७८) होय अशी गाथाकवींची भावना आहे. धर्मात स्वारस्य वाटे दे अशी त्याची प्रार्थना (क्र ९८५) आहे. अमृतपान व स्वर्गातें राज्य ही सुखाची परिसीमा (क्र ८७२) आहे आणि व्यभिचाऱ्याला नरकवास भोगावा (क्र. ८७२) लागतो अशी त्याची श्रद्धा होती पाप (क्र. १८३), पुण्य (क्र. १७४), पूर्वपुण्याई (क्र. ९९) व पुनर्जन्म (क्र. ३७५, ४४१, ८१२, ८३८) यावर लोकांचा विश्वास आहे अन्तरच्या क्षणीं जी इच्छा करावी किंवा ज्याचें ध्यान करावें तीं पुढील जन्मीं तृप्त किंवा प्राप्त होतात अशी लोकांची श्रद्धा (क्र ३७५) होती अशाच कल्पनांचा परिपोष पुढें पुराणकारांनीं केलेला आहे शाप (क्र. ३२४, ४४०) व शपथ (क्र ३३३, ३५७, ५१८, ७००) याचे अनेक उल्लेख आहेत. मात्र येथें कोठेंही या संज्ञा गंभीर अर्थानें वापरलेल्या नाहींत, त्यात मुग्धेचा लाडिकपणा आहे, मध्येची सूचकता आहे शुभ व अशुभ शकुनावर लोकांची श्रद्धा आहे स्त्रीचा डावा डोळा लवणें (क्र. १३७) हें शुभ मानलेलें आहे. मालतीमाधवात हीच समजूत आलेली आहे व ती आजही प्रचलित आहे. मात्र प्रेयसीनें प्रियकराला उजव्या डोळ्यानें संकेत द्यावयाचा असतो. यासाठीच या शकुनाचा उल्लेख गाथाकवीनें केलेला आहे. कोणी प्रवासाला जाणार असेल तर त्याला शुभशकुनासाठीं दारात मंगल (क्र. १४०) व शुभसूचक (क्र. ५७१) प्रस्थानकलश मांडण्यात येत असे, तो जलपूर्ण असून त्यात कमळ (क्र २५६) किंवा आम्याची डहाळी अथवा मोहोर (क्र १४३) खोंवलेला असे यावरून दिसतें कीं तत्कालीन पुरुषांच्या प्रवासाचा प्रारंभ पावसाळ्याच्या व हिंवाळ्याच्या अखेरीस होत असावा, घरचीं शेतीचीं कामें उरकल्यानंतर अधिक द्रव्य संपादनार्थ घरचा पुरुष अन्यत्र जाण्याची रीत होती असें या संकेतावरून अनुमान होतें. प्रवासाला (क्र. २६१)

अंगळवार व विष्टीचे दिवस आणि पलाशकुसुमांचे व पर्यायानें बौद्धभिक्षूंचें दर्शन अशुभ (क्र. ३०८) मानण्यांत येत असे. आपण प्रवासांत असतांना कृष्णसार उजवीकडून डावीकडे गेला तर प्रवास किंवा यात्रा निष्फळ होणार असें मानून प्रवासी घराकडे परतत (क्र. २६) असत. दिवसा रजस्वलादर्शन (क्र ४८०) व स्वप्नात होलृदर्शन (क्र. ७२१) अशुभ मानीत. भुतांच्या अस्तित्वावर (क्र. ५५७) व महबाधेवर (क्र ३८६) लोकांचा विश्वास होता. यक्ष (क्र. ३७२) व विद्याधर (क्र. ४४६) यांच्या अस्तित्वावर व कर्तृत्वावर त्यांचा भरंवसा होता. मह हा शब्द शतपथांत जादूसारखा परिणाम करणारी शक्ति या अर्थानें योजलेला आहे (ज्ञानकोश : बुद्धपूर्व जग: पृ. १९६). मोरपंखात मोहनशक्ति (क्र. ५७२) असते अशी लोकांची कल्पना होती. हल्लीही फकीर–वैरागी मोरपंखाचा गुच्छ याच हेतूनें जवळ बाळगतात. हत्तींच्या गंडस्थळांत मोती (क्र. १७३) असतात, नागफणींत मणि (क्र. ९७०) असतो आणि भूमिगत संपत्ति सुरक्षित (क्र ५७६) असते अशी लोकाची समजूत होती.

**७ धर्मबंध :**

गाथासप्तशतींत वैदिक व वेदोत्तर दैवताचे व वीरदैवताचे, त्याचप्रमाणे यज्ञ-संध्यादि वैदिक संस्था व विधि यांचे उल्लेख जागोजाग आढळतात. या उल्लेखांच्या स्वरूपावरून दिसतें कीं तत्कालीन सुसंस्कृत समाज वैदिक धर्मानुयायी होता सुसंस्कृत व्यक्ति व कुटुंब हेच समाजाचें व धर्माचें धारण करतात. त्याचीं बहुजनसमाजावर छाप होती हें स्पष्ट दिसतें

गाथासप्तशतींत सुख्यत्वेंकरून ज्यांच्या भावना सशब्द झालेल्या आहेत त्या बहुजनसमाजात मात्र वैदिक दैवताचे माहात्म्य ओसरलेलें दिसतें. येथें अग्नि परदाराभोंवतीं घोटाळत आहे आणि प्रजापति सृष्टिनिर्मितीचें कार्य बाजूला ठेवून सुंदर स्त्रीची जडण करण्यात गढलेला आहे. अग्नि यज्ञस्थानीं, तसाच चाण्डालकुटींतही पेटतो, अशा गामीर्यहीन विधानानें अग्नीची अवहेलना केलेली आहे. हा बौद्धाच्या प्रचाराचा परिणाम असावा.

गाथासप्तशतींत भागवत व शैव संप्रदायांचा प्रसार झालेला आहे. शैवात कापालिक पंथ सुरू झाला आहे पण भागवतांत प्रेमपंथ अद्याप सुरू झालेला

नाहा विष्णूच्या वामन या एकाच अवताराचा उल्लेख आला आहे नव्याजुन्या दैवतावद्दल आवर्षक सगर भयानक कथा निर्माण होत आहेत, मात्र त्याना अद्याप पुराणातील सकीर्ण वा सघटित स्वरूप आलेले नाहीं दिव्यें व व्रतें आहेत पण पोटभरू पुरोहितानी आपला महिमा व उत्पिन्नासाठीं किंवा योगक्षेम चाल विण्यासाठीं उत्तर कालात निर्माण व पुराणात नमूद केलीं तशीं हीं व्रतें नाहींत

गाथासप्तशतींत नम्गी धार्मिकावद्दल जागोजाग तिरस्काराचे उद्गार काढलेले आहेत प्रेमसमिन्छु युगलाच्या सकेतात विघ्न आणणाच्या स्वर्गेच्छु धार्मिकाला क्र १६७ या गाथेंत शाप दिलेला आहे गोदातीरावरील निकुञ्जात निष्कारण धुडधुडणाऱ्या भित्र्या धार्मिकाला क्र १७१ या गाथेंत धमका दिला आहे मठात राहणारे धार्मिक महामूर्ख असतात अशी सूचना क्र ३४५ या गाथेंत आलेली आहे क्र ६०८ या गाथेंत परलोकव्यसनिकाचा निषेध केलेला आहे धर्माच्या नावानें भीक मागणाऱ्या भुक्कड धार्मिकाचा क्र ५५३ या गाथेत उपहास केलेला आहे क्र ८७२ या गाथेंतील स्वसतुष्ट धार्मिकाला कडु लिंबा वरचा किडा म्हटलेले आहे जें नशिबानें मिळाल त्यातच सुखसर्वस्व आहे, न आपल्याला शिकविण्यात आले तेवढेंच सत्य आहे असें मानणाराचा हा निषेध आहे क्र ५५३ मधील धार्मिक हा भिक्षेकरी असून पुरेशी भिक्षा पडत नाहीं अशी त्याची तक्रार आहे ज्याना त्याचा उपसर्ग होतो त्या त्याला भिक्षा काय म्हणून वाढतील? हे अतृप्त जीव धर्माच्या नावाखाली अन्याना व्यत्यय आणण्यातच समाधान मानतात, कारण त्याना जे सौख्य प्राप्त होत असत किंवा होणार असतं तें याना मिळण्याचा यत्किंचितही सभव नसतो व त मिळविण्याची याना हिंमत नसते म्हणून याची लुडबुड प्रेमिकाना असह्य होते हा धर्म नाहीं व शिष्टाचारही नाहीं अशी या गाथाची स्पष्ट सूचना आहे या गाथावरून निष्कर्ष निघू शकतो कीं त्या काळातही प्रेमिकाना उपसर्ग होण्या इतके हे नकली धार्मिक बोकाळले होते

क्र ४०८ या गाथेंत कापालिकेचा उल्लेख आलेला आहे ही स्मशानात आपल्या जाराच्या चितेंतली राख आपल्या अंगाला लावीत आहे कपालिन् म्हणजे शिव, हातीं करटा धारण करणारा शिव या स्वरूपातील शिवाचे जे भक्त ते कापालिक हा एक पाशुपत शैव पथ आहे एक माळ, एक अलवार

एक कुंडल, एक चूडामणी, राख व यज्ञोपवीत या सहा मुद्रिका ते धारण करतात ते धारण करतात ती माळ मानवी हाडाची असते व त्यांचें यज्ञोपवीत केसांचें असतें ते शरीराला चिताभस्म फासतात आणि नरकपालातून मद्य मांसादि खाद्यपेयाचे ग्रहण करतात पतंजलीनें ( ३.९९ ) शिव-भागवताचा उल्लेख केलेला आहे त्याला समकालीन असलेल्या लकुलीशानें पाशुपत पंथाची प्रस्थापना केली अथर्व परिशिष्टात व उपनिषदात ( मै.उ LXXXVII 22 432) त्याचा उल्लेख आलेला आहे वराहमिहिर, युआन च्वंग व भवभूति यांनी त्याचा उल्लेख केलेला आहे नाशकास कपालेश्वराच्या देवळात या पंथाचे जोगी आढळतात कापालिक महाव्रतींचा चरितार्थ चालण्यासाठी पुलकेशी चालुक्याचा पुतण्या नागवर्धन यांनें इगतपुरीजवळचें एक खेडें दान दिलेलें आहे.

क्र ७२२ या गाथेंत ( होड ) होत्याचा उल्लेख आलेला आहे हा उल्लेख सांकेतिक आहे स्वप्नात होत्याचें दर्शन अशुभ अशी स्वप्नाध्यायाची ग्वाही आहे यज्ञप्रसंगीं होत्यानें ऋग्वेदातील मंत्र म्हणावयाचे असतात या व्यतिरिक्त गाथासप्तशतीत ब्राह्मणाचा उल्लेख कोठेंही आलेला नाही क ६४४ मध्यें चतुर्था मालाचें देवकार्य चाललेलं आहे धार्मिक विधि करवून घेण्यासाठी तेथें पुरोहित हजर असलाच पाहिजे क्र १७५ या गाथेंत घरधनिणीनें कपाशीच्या शेतात नांगराची पूजा केलेली आहे ह्या सीता-यज्ञाचा उल्लेख पारस्कर-गृह्य-सूत्रात ( २ १७, ३ ८ १० ) आलेला आहे या यज्ञाचा अधिकार फक्त घरधनिणीचा आहे हें पुण्याहमंगल चालू आहे—परंतु आसपास ब्राह्मण दिसत नाही नसेलही, पूजाविधि अगदी साधा असल्यामुळे, असेलही, विषयाला अप्रस्तुत म्हणून त्याचा उल्लेख आलेला नसेल, इतकेंच वराहतकाला पासून आतापर्यंत ब्राह्मण हे अल्पसंख्यच आहेत, त्या काळात तर ते अत्यल्प संख्य असले पाहिजेत ग्रामीण जीवनाशीं त्याचा फारसा संबंध नव्हता असं दिसतें

गाथासप्तशतींत बौद्धाचा स्पष्ट असा एकच उल्लेख (क्र ३०८) आलेला आहे त्या काळात बौद्ध भिक्षु भगवीं वस्त्रें परिधान करीत आणि रानावनातून गमन भ्रमण करीत असें या उल्लेखावरून दिसतें येथें त्यांची तुलना पळसफुलाशीं केलेली आहे गावावर मानतो कें पलाशपुष्पाप्रमाणें बौद्ध भिक्षूंचें

दर्शन हा अपशकुन मानण्यात येत असे. क्र. ७२२ या गाथेत याचा उत्तरपक्ष केलेला आहे की काय? जनतेच्या मनावर बौद्ध भिक्षूंच्या प्रचाराचा पुष्कळ परिणाम झाला होता हें मान्य खरें. याचें प्रत्यंतर क्र ६०१, ६१८ व ६१९ या गाथांतील अहिंसेच्या पुरस्कारातहि दिसून येतें

८ निष्कर्ष :

गाथासप्तशतीतील दैवतें मूलत वैदिक आहेत त्यावर उत्तरकालीन संस्कार झालेले आहेत सुसंस्कृतांच्या या दैवताचें स्वरूप बहुजनसमाजाला आकलनीय व्हावें व आकर्षक वाटावें म्हणून त्याभोंवती कथांची प्रभावळ बुद्धिपुरःसर निर्माण करण्यात येत आहे व कांहीं ग्रामीण दतकथा निर्माण झालेल्या आहेत. त्याचप्रमाणें ग्रामीण व स्थानिक दैवतांचें आर्यीकरण होत आहे.

नाणेघाटातील सातवाहन गुफेतल्या नायनिकेच्या शिलालेखात सातकर्णीनें केलेल्या अनेक यज्ञाचे व तन्निमित्त मुक्तहस्तानें दिलेल्या दानाचे उल्लेख आहेत, या लेखात इंद्र व कुबेर या वैदिक आणि वासुदेव संकर्षण या भागवत दैवताना वंदन केलेलें आहे यावरून दिसतें का आद्य सातवाहन हे यज्ञसंस्थेचे पुरस्कर्ते होते व भागवत संप्रदायाचे अनुयायी होते आणि या लेखाच्या काळात महाराष्ट्रात वैदिकांचा भागवतांशीं समेट झाला होता

शुंग-सातवाहन युगात म्हणजे खि पू. दुसऱ्या शतकात पतंजलीच्या नेतृत्वाखाली यज्ञ-संस्थेचें पुनरुज्जीवन झालें, शुंग-सातवाहनानी एकजूट होऊन इंडोग्रीकांचा पराभव केला. नाणेघाटातील यज्ञलेख हे या विजयाचें प्रतीक आहे वैदिक व भागवत दैवतांच्या संघर्षाचे अनेक उल्लेख भागवत संप्रदायाच्या साहित्यात आढळतात; त्याच्या समन्वयाचा दाखला सातवाहनाच्या या आद्य लेखात मिळतो दुसऱ्या सातवाहन राजाचें नाव कृष्ण असें आहे आणि सोळाव्या राजाच्या नावाचें वैकल्पिक अन्त्यार्ध कृष्ण हेंच आहे असें आहे तरीही सातवाहनानी भागवत हें बिरुद धारण केलेलें नाहीं. कारण हा काळ मकमगाचा होता पुढें गुप्त-वाकाटक कालात तें रूढ झालेलें आहे

सातवाहन राजाच्या नामावळीवरून असेंही दिसतें कीं त्याच्या काळात उत्तरोत्तर दैवताना प्राधान्य येत आहे पशुपति हा मूळचा अनार्यांचा देव.

मोहेंजोदरो येथाल उत्खननात योगीश्वर पशुपतींची मुद्रा मिळालेली आहे अनेक मर्शोधकाच्या मते ही मुद्रा वैदिक आर्यांचा हिंदुस्थानात प्रवेश होण्याच्या पूर्वीची आहे त्यामुळे हडप्पाच्या उत्खननात लिंग व शाळुंकाही मिळालेल्या आहेत एकीकडे वैदिक रुद्राचा पशुपति शिवाशी व दुसरीकडे शिवाचा लिंग-पूजेशी समन्वय होत होता शिव हा पुरुष व लिंग हे त्याच प्रतीक आणि पार्वती ही प्रकृति व शाळुंका हे तिचे प्रतीक, ही कल्पना पौराणिक आहे गाथासप्तशतीत तिचा मागमूसही आढळत नाही यावरून गाथासप्तशतीचे पुराणपूर्वकालीनत्व सिद्ध होते गाथासप्तशतीतील अज्जा ही मात्र ग्रामीण मातृदेवता आहे आर्य व अनार्य यांच्या समन्वयाचे प्रतीक म्हणून मूळ प्रादेशीयाच्या बापदेवाला हा आर्या अर्पण करण्यात आलेली आहे की काय ?

गाथासप्तशतीत आरंभी व अखेरीस शिवाला नमन केलेली आहेत असे मुद्रदर्शना भासत असले तरी वस्तुत हा नमने सूर्याला केलेला आहेत सात वाहन हे अभिधान सूर्याच्या सप्तवाहन या संस्कृत नावाचे प्राकृत रूप आहे असे मास म्हणण आहे त्याला हे उत्तर पोषक आहेत.

मौर्यकालीन शिल्पात यक्षयक्षींच्या प्रतिमा वेगवेगळ्या स्वरूपात आढळतात खि पू दुस या शतकापासून महाराष्ट्रात लेणी कोरण्याची प्रथा सुरू झाली त्यात अशा व अन्य घताच्या मूर्ति आहेत नाणेघाटातील सातवाहनांच्या देवकुलात राजघराण्यातील व्यक्तींच्या मूर्ति कोरलेल्या होत्या ज्याचे कर्तृत्व सातवाहनांना देण्यात येते त्या साचाच्या दक्षिण तोरणावरही मूर्ति आहेत अर्थात् ख्रि पू दुसऱ्या शतकापासून महाराष्ट्रातील कारागिरांना मूर्ति कोर-ण्याची कल्पना अवगत असली पाहिजे तरीही येथाल सातवाहनकालीन शिल्पात व गाथासप्तशतीतही देवतांच्या मूर्ति आढळत नाहीत वायव्य सरहद्द, सप्तसिंधु व संयुक्त या प्रांतात इंडो ग्रीक व कुषाण राज्यकर्त्यांच्या अमदानीत बौद्धांना भव्य व सुंदर मूर्ति कोरण्याची व त्याची पूजा करण्याची प्रथा सुरू केली याचच पर्यवसान पुढे महायान पंथाच्या प्रस्थापनेत झाले बौद्धांच्या या प्रथेचा पुरस्कार पुढे वैदिक धर्मीयांनी केला मूर्तिपूजेचे हे लोण महाराष्ट्रात वाकाटक काळात आले गाथासप्तशतीत मूर्तिपूजा नाही त्या अर्थी हा कोश वाकाटकाच्या पूर्वीचा असला पाहिजे

गाथासप्तशतीतील काहीं दैवताचे उल्लेख संकीर्ण स्वरूपाचे असल्यामुळें हा कोश पुराणोत्तरकालीन असावा असा निष्कर्ष काहा संशोधक काढतात हा निष्कर्ष मिथ्याभारता नाहीं स्मृतींचा व महाभारताचा रचनाकाल निर्विवाद असला तरी तो पुराणपूर्व आहे हें निश्चित पुराणाची रचना साधारणत गुप्त काळात झाली हा सिद्धात मात्र बहुतेक संशोधकाना मान्य आहे आणि पुराण-कारानीं प्राकृत जनात प्रचलित असलेल्या दंतकथांचें संस्कृतीकरण केलें, हाही पौराणिकानीं विशिष्ट हेतूनें प्रेरित होऊन नव्या कथा रचल्या, अनेक स्थानिक दैवतांचें आत्मीकरण केल आणि नवीं माहात्म्यें व मतें निर्माण केलीं, हेंही निर्विवाद आहे त्यानीं समाजव्यवस्थेंत ब्राह्मणाना अग्रस्थान दिलें आणि धार्मिक कृत्यात त्याना पुरस्कार अपरिहार्य केला हीं लक्षणें आढळत नसल्या मुळें गाथासप्त शती हा कोश पुराणपूर्वकालीन असला पाहिजे

गाथासप्तशतीत उल्लेखिलेल्या दैवतापैकी अग्नि, इंद्र, प्रजापति, रुद्र, वामन,सूर्य व हरि हे वैदिक आहेत यापैकीं वामन हा अवतार सर्वांत प्राचीन, वेदकालीन आहे या दैवताच्या मूळ स्वभावाच्या अनुरोधानें बहुजनसमाजात प्रचलित झालेल्या काहीं दंतकथा येथें आढळतात पण त्याना अद्याप पुराणातले स्वरूप प्राप्त झालेले नाहीं प्रमथाधिप हें शंकराचें व अपर्णा हें पार्वतीचें–हीं अभिधान येथ आढळतात पुराणकालात तीं नष्टप्राय झालेलीं आहेत या काळातील ज्या पंथाला भागवत संप्रदाय अशी संज्ञा आहे त्याचें तत्त्वज्ञान सामान्य जनाना अनाकलनीय असल्यामुळें त्यानीं त्यातला भक्तिमार्ग तेवढा स्वीकारला महा राष्ट्रात कृष्णाचा विठ्ठल झाला भक्ति व प्रीति यांच साहचर्य आहे गाथासप्त शतींत आहेत तशीं गोपीगीतें अर्वाचीन वारकरी वाङ्मयातही आहेत राधेचा अन्यत्र समकालीन उल्लेख आढळत नाहीं म्हणून हा कोश नव्या शतकाइतका अलीकडे ओढणें समजस ठरणार नाहीं गणपति हें दैवत मुख्यत दाक्षिणात्य आहे अष्टविनायक महाराष्ट्रातच आहेत गोतमी वल्श्रीच्या लेखात रामाचा उल्लेख आलेला आहे या सर्व उल्लेखाचा विचार केला असता त्यावरून हा कोश अलीकडे ओढण्याला काहीं सबळ कारण आहे असें दिसत नाहीं

गाथासप्तशतींत जैन मुळींच नाहींत, बौद्ध क्वचित् आहेत

जैन सम्राट् कलिंगाधिपति खारवेल याच सातवाहनांशीं शत्रुत्व होतें आपण सातकर्णीचा आणि भोजराष्ट्रिकाचा पराभव केला असें तो आपल्या हाथीगुंफा

लेखात सागतो विशेष खोलात न जाता म्हणता येईल की या विधानाचा खरेपणा सशयास्पद आहे या स्पर्धेमुळे जैनाना येथील वातावरण प्रसाराला प्रतिकूल असावे आणि म्हणून त्याचा उल्लेख आलेला नसावा असे वाटते

हालाच्या काळात बौद्धाची निकृष्टावस्था झाली होती हा क्रान्तिकाल होता महाराष्ट्रावर क्षहरात क्षत्रपाची सत्ता होती त्याना सातवाहनाची सत्ता खिळखिळी केली होती त्यांचा नेता नहपान हा धर्माने बौद्ध होता हे त्याच्या लेण्यावरून दिसते मात्र या काळात बहुजनसमाजात बौद्धाना महत्त्व राहिले नव्हते असे दिसते कारण नहपान व त्याचा जावई उषवदात यानी जी दाने दिली ती मुख्यत्वेकरून ब्राह्मणांना दिलेली आहेत, त्याना सतुष्ट करण्याकरता, त्याचा पाठिंबा मिळविण्याकरता, निदान त्याचा विरोध विस्कळित करण्याकरिता पण याचा काहीं उपयोग झाला नाहीं लवकरच गोतमीपुत्राने क्षहराताचा समूळ उच्छेद केला, कुळाच्या, धर्माच्या व स्वातन्त्र्याच्या नावाने, ब्राह्मण्याच्या व चातुर्वर्ण्याच्या नावाने विजयोत्सवार्थ त्याने आद्य सातवाहनाप्रमाणे यज्ञ मात्र केले नाहीत गोतमी बलश्रीच्या लेखात महाभारत व रामायण यातील वीरद्वयाचे व वीरपुरुषांचे उल्लेख आलेले आहेत त्यावरून मध्यंतरीच्या काळात झालेल्या धार्मिक परिवर्तनाची कल्पना करता येते गाथासप्तशती हा कोश या सक्रमण काळातला आहे

अर्थात् गाथासप्तशतीतील धार्मिक उल्लेखावरून प्रस्तुत कोशरचनेचा काल पहिल्या शतकाच्या प्रथमार्धाच्या अखेरीस माडण्यास काहीही प्रत्यवाय नाही असेच प्रत्ययास येते

## १४. गाथासप्तशतीतील सामाजिक जीवन.

यथार्थदर्शन ( Positive Philsophy ) शास्त्राचा जनक ऑगस्ट काट ( १७९८-१८५७ ) याने समाजशास्त्र या सज्ञेची योजना प्रथम केली अर्थात् समाजशास्त्र हे सर्व शास्त्रात अल्पवयी आहे पण त्याचा प्रभाव तीन पावलात त्रैलोक्य व्यापणाऱ्या वामनासारखा आहे वर्षानुवर्षे त्याचा विस्तार वृद्धिंगत होत आहे अनुवशापासून अणुवशापर्यंत त्याची व्याप्ति आहे समाजशास्त्र म्हणजे समाजजीवनाचे शास्त्र अर्थशास्त्र राज्यशास्त्र वगैरे शास्त्राचा समाज शास्त्रात समन्वय होतो या प्रकरणाच्या शीर्षकात ही सज्ञा एवढ्या व्यापक

अर्थात योजलेल्या नाहा ग्रामीण, कौटुम्बिक व धार्मिक या सामाजिक जीव-नान्या अगाचा चर्चा झाली, आर्थिक, राजकीय, लैङ्गिक, सांस्कृतिक वगैरे अगाचा उहापोह पुढे होत आहे त्या व्यतिरिक्त अशा जा सामाजिक जीवनाचा अगें आहेत त्याचा विचार या प्रकरणात करावयाचा आहे आहार खाण व पिणें विहार—कालहरण, खेळ व उत्सव वस्त्रे व अलंकार, आचार व आरोग्य आणि जाता जमाती इत्यादि सामाजिक जावनाशा सबद्ध अशा विषयाची माहिती या प्रकरणात देत आहे

## ( १ ) आहार

अण्ण = अन्न क ८०८, इच्छू = उस : ७३४, उच्छू = उस : क ५४१, कन्जि = काजि : क २८६, कलम = साळा · क ६९०, ६९१, गुड = गूळ क ५१४, घिअ = घृत : क २२, ५१९ चणअ = चणे क ५५७, जव = यव क ४०२, तण्डुल = तादूळ क ६८९ तिल = तीळ क ८, ६२७, ६९१, ५२३, तुप्प = तूप क २८९, तुवरी = तूर क ३१८, दुद्ध = दूध क ६०७, ६३७, ७९५, ८०६, पहेणअ = प्रहेणक = मोदक क ६०३, ६४१, पाउ = न्याहारी क ६९२, पिट्ठ = पीठ क ३८८, ६२४, ६९९, ८००, मिट्ठ = मिष्ट, मृष्ट = मिष्टान्न क ७२, राइआ = राई = मोहरी क १७१, लड्डुअ = लाडू क ६४१ लोण = लवण क ३१६, व्रीहि क ९५२, सालि = साळी क ८, ९, ५६७, ७८२, ८१५ सिणेह = स्नेह = तूप क ३१६, ७७९, सिन्धव = सन्धव क ६७९

इतिहासपूर्व कालापासून भारतीयाचा आहार साधा आहे ऋग्वेदात धान्य, वीज व यव या तीनच उद्भिज अन्नधान्याचा उल्लेख आढळतो तैत्तिरीयात व बृहदारण्यकात दहा धान्याचा उल्लेख आहे दश ग्राम्याणि धान्यानि व्रीहि तादूळ ) यवास्तिलमाषा ( उडीद )। अणु ( वरी ) प्रियङ्गवो ( राळे ) गोधू माश्च मसूराश्च खल्वाश्च खल्कुलाश्च ( कुळीथ ) ॥ वैदिक वाङ्मयात भाताचा पहिला उल्लेख अथर्वात ( ६ १४० २ ) आढळतो ऋग्वेदात यवापासून सिद्ध केलेल्या पदार्थाचे व उत्तेजक पेयाचे अनेक उल्लेख आढळतात यज्ञ व सस्कार कर्मात यवाचे महत्त्व विशेष आहे तिळापासून तेल ( अथर्व १ ७ २ ) काढीत व ते मातीच्या घटात ( अथर्व २० १३६ १६ ) ठेवीत जात

यन आरण्यकात तेलाभ्यगाचा उल्लेख आहे आर्यांच्या कौटुबिक जीवनात व धार्मिक विधात तिल व तैल याना विशेष महत्त्व आहे प्रियङ्गु म्हणजे राळे (Watt Commercial Products of India p 988) श्री चक्र चक्रवर्ती (Cultural History of the Hindus p 330) यानी याचा अर्थ बाजरी असा दिलेला आहे ज्ञानकोशात (बुद्धपूर्व जग पृ २१४ गोधूमाचा अर्थ मका असाही दिलेला आहे

वैदिक ब्राह्मण व क्षत्रिय हे हिंसात्मक यज्ञसस्थेचे पुरस्कर्ते होते जसे लोक तसे त्याचे देव आर्य व त्याचे देव मासाचे भक्षण करीत अतिथि सत्कारासाठ व लग्नसमारभात (१० ८५ १३) गाय, बैल व बोकड मारीत आर्य लोक मासे शिजवून खात आणि अनार्य कच्चे मास खात (७ १०४ २) राक्ष साना घोड्याचे व माणसाचे मास (१० ८७ १६) सेवन केल्याचा उल्लेख (१० ८७ १६) आढळतो मयसभा प्रवेशाचे वेळी धर्मराजाने घातलेल्या प्रयोजनात ब्राह्मणाना वराहाच्या व हरिणाच्या मासाचा पक्वान्नें सेवन केलेले आहे मृगया हा क्षत्रियाचा खेळ होता व हक्कही होता मास भक्षणापासू परावृत्त होण्याची प्रवृत्ति महाभारत काळात बळावत चाललेली दिसते या प्रवृत्तीच प्रारभ वैदिक वाङ्मयातही आढळतो ऋग्वेदात गाईला अघ्न्या (८ १०१ १५ म्हटलेले आहे बैलाची किंवा गाईची हत्या हें ब्रह्महत्येसारखे महत्पाप आ असे महाभारतकालात मानण्यात येऊ लागलें बौद्ध व जैन धर्माच्या प्रसारामु नव्हे, गोपालकृष्णाच्या भक्तीच्या प्रसारामुळे ही आचार क्राति झाली, अ श्री वैद्य याचें मत (महाभारत उपसहार पृ ३६१-३६४) आहे यज्ञसस्थ मागसल्यानंतर ब्राह्मणानी मासाहार वर्ज्य केला आणि क्षत्रियानी मासा हारासबधत काही निबध स्वीकारले

इक्षु, इन्क्षु व उच्छु हे शब्द उस चावून रस चोखताना होणाऱ्या आवाजावरून सिद्ध झालेले असणे शक्य आहे उसाचा सर्वांत प्राचीन उल्लेख अथर्ववेदातील (१ ३४ ६) एका प्रेम मत्रात आढळतो प्रियकर म्हणतो "प्रिये, मज विषयी तुझ्या मनात अप्रीति उत्पन्न होऊ नये म्हणून मी तुझ्याभोवती उसाचें कुपण लावलें आहे " अले क्झाडरचा नाविक अधिकारी नेआर्कस सागतो या या देशात बोरुमारखी एक वनस्पति असून तिच्यात मधमाशाच्या माध्यमा शिवाय तयार झालेला मध मिळतो मौर्य दरबारातला मेगॅस्थनिस सागतो हे

बोरू जमीनीतले पाणी शोषून घेतात कडक उन्हात हें पाणी शिवत व त्यापासून मध तयार होतो स्त्रिनी व एरियन यांनी सच्छर, मच्छरीन या नावाने मर्करापिंडाचा उल्लेख केला आहे भरुकच्छ बंदरातून रोमकडे सच्छर निर्यात होत असे परदेशात हे पिंड दुर्मिळ व महाग असल्यामुळे त्याचा उपयोग त्यांच्या औषधी गुणधर्मासाठीच होत असे

गाथासप्तशतीत तांदूळ व यव या दोनच अन्नधान्यांचे उल्लेख आहेत कलम (कोलम), व्रीहि (देवभात) व शालि (साळी) या तांदळाच्या तीन जाती येथे आढळतात घिरीटार (क्र ७१४) भात भरडीत आणि उखळात कुटत (क्र ६२८, ८२०) किंवा जात्यावर दळत (क्र ३८८) धान्याचे पीठ करीत भाकरी भाजण्यापूर्वी पीठ आववीत (क्र ६९२) असावेत

यव, चणक व तूर यांचा एक एकच उल्लेख आहे क्र २८, माशील कांजी तांदळाची असेल किंवा यवाची चवीसाठी तीत मिठाचा खडा टाकलेला असेल किंवा शर्करेचा मिठाचा उल्लेख दोनदा आला आहे, पैकी सैन्धवाचा उल्लेख सांकेतिक आहे आणि दुसरा उल्लेख मिठाच्या अभावाचा आहे प्राचीन भारतात मीठ दुर्मिळ होतें ऋग्वेदात मिठाचा उल्लेख नाही अथर्वात एक एक उल्लेख आहे उत्तरकालीन ब्राह्मण ग्रंथात मीठ हा मौल्यवान पदार्थ गणलेला आहे हीच परिस्थिति गाथासप्तशतीच्या काळातही होती, असे या उल्लेखावरून अनुमान होतें सातवाहन कालात मिठाचा मक्ता सरकारी (E I VIII Nasik Inscriptions) होता अन्नाला गोडी आणण्यासाठी गुळाचा उपयोग (क्र ५५४) होत असे प्रहेणक मिष्टान्न व लाडू ही गोड पक्वान्नें उल्लेखिलेली आहेत, मात्र ती सुसपन्नानाच उपलब्ध आहेत असें स्पष्ट दिसतें क्र ५५७ या गाथेंत चणे भाजण्याचा उल्लेख आहे करञ्ज, तीळ व मोहरी ही तेलबाजें, आम्र, जम्बु व बोर ही वृक्षफळ आणि काकडी (तउसी क्र ५३४, वालुङ्कि क्र १०) व कोहळा (क्र ७६० ७९६) ही वेलफळे यांचे उल्लेख आलेले आहेत तसा स्पष्ट उल्लेख नसला तरी गाथाकालीन समाजातले काही वर्ग मांसाहारी होते हें निश्चित क्र ५२४ ६०१, ६१८ व ,२९ या गाथांत हरणांच्या शिकारीचे उल्लेख आलेले आहेत ही शिकार केवळ खेळ म्हणून होत असलेली दिसत नाही क्र ६८० मध्यें मांसकाचा उल्लेख आहे तो मद्यपाना हारात आहे यावरून अनुमान

हातें या त्या काळात या मांसाहारी मागणी होती वैदिक काळातहा ह मास वापरात ( Economic Life & Progress in Ancient India Bandopadhyaya p 197 ) होत क ५८२ व ६९८ या गाथात कोंबड्यान्या आरवण्याचे उल्लेख आहेत केवळ पहाटे जाग आणण्यासाठी आरवण्याकरिता ते पाळलेले असतील असे समजत नाही क ८१८ या गाथेत कमठ ( कासव ) व पाठीण ( = पाढीण = मत्स्याविशेष ) याच उल्लेख आहेत या व्यतिरिक्त आणि येथे ही मत्स्याहाराची सूचना नाही हें विलक्षण वाटतें कारण जेथ पाणी असते तेथें मासे असतातच उल्लेखा प्रमाण अनुल्लेखावरून निष्कर्ष काढण सहसा शक्य नसतें तरी यावरून असें दिसत की समुद्रान्या किंवा मोठ्या नद्यान्या काठी राहणान्या लोकांनीं गाथासप्तशतीन्या सांस्कृतिक योजनेंत विशेष भाग घेतला नसावा

गाथासप्तशतीतील अन्नाच्या उल्लेखावरून दिसतें की तत्कालीन लोकाचा आहार अगदीं साधा होता हा शब्दचित्रें ग्रामीण जीवनाचीं आहेत आणि आमचे नेहृत हे गरिबीत आयुष्य कठणारे कष्टाळू शेतकरी आहेत येथ ताद ळाच अनेक उल्लेख आलेले आहेत मिष्टान्नाच्या तीन उल्लेखांपैकी दोन मोदकाचे आहेत मोदकाची पारी तादळाची असते आणि सारण गूळखोबन्याचें किंवा रव्याचें असते यावरून हे लोक , तादूळ निपजणान्या भागाचे रहिवासी असावेत असे दिसतें मत्स्याहाराचा व नारळाचा अनुल्लेख व लवणाची दुष्प्राप्यता यावरून हे लोक समुद्रकाठचे नसावेत असे अनुमान होतें गगावतरणासारखीच गोदावरीची कथा पुराणात आलेली आहे उत्तर गगेच्या अवतरणाचें श्रेय भगीरथाला तरीं दक्षिण गगेन्या अवतरणाचे श्रेय गौतमाला गातमानें जल्द पिकणाऱ्या साळीची लागवड करून या भागातील रहिवाशाना दुष्काळात वाचवल अशी कथा आहे या कथेवरून दिसतें की आर्य वसाहतकारांनी या भागात साळीची लागवड सुरू केलेली असावी गाथामध्यें गोपालाचे गाईचे व दुधाचे अनेक उल्लेख आहेत पण गिल्लाराची सूचना नाहीं क ६३७ मधील घागरभर दूध देणाऱ्या गाईचा उल्लेख चमत्काराच्या सदरात मोडावा असा माडलेला आहे यावरून दिसतें की तत्कालीन गाव गावळातील हल्लीन्या गाईसारख्या अल्पदुधी असाव्यात साधारणत असे दिसतें की घरन्या बायकानीं दुपारी धिरीवर भात भरडावें सकाळी किंवा सायकाळी उखळात किंवा

त्यावर तांदूळ काढावे, कुटावे किंवा दळावे, भातभाकरीच जेवण घरा किंवा शेतावर, तुरीच्या आमटीबरोबर किंवा तिळाच्या तेलाबरोबर जेवावे स्वत गाय म्हैस पाळणावी तेव्हा दूध मिळावयाचे, स्वत शिकार करावी तेव्हा मास मिळावयाचे, अधूनमधून कण्यांच्या फाक्या मारावयाच्या, फक्त श्रीमंतांनी मिठाईचे सेवन करावयाचे, फक्त शहरच्या लोकांना स्वयपाकात सोंठ व जवणात तूप वापरावयाचे, असा त्या वेळचा साधा आहार होता यज्ञ किंवा राज्याय अगर सामाजिक उत्सव यांच्या निमित्तानं झडणाऱ्या मेजवान्यांचा येथ मागमूसही नाही येथे वेदकालीन समृद्धि नाही, महाभारतकालीन विविधता नाही आणि या दोहाचा कालीदासकालीन समन्वय नाही जसा देश तसे तेथले रहिवासी तसा तेथील लोकाचा आहार

## ( २ ) मद्य व मद्यपान

चषक=चषक क ९११ ( फलिह-स्फटिक ) ९२७ कुणमुरा क ९१३, पाणउडी=पानकुटी क ४२७ मइरा=मदिरा क ४७० ४४०, ८६५, ९२७, महुरस=मधुरस क ९७८ सरअ=सरक क ४३४ सीधु क ४४४ सुरा क ९७ १९७, ७१० क्रिया व मद्यपान क ९७, १९७, ४८०, ५१४ ५४४, ७४०, ७१० ८६६, ९११ ९२७, ९७८

अमरकोशात प्रचलित मद्याच्या चोवीस सज्ञा दिलेल्या आहेत प्रत्येक प्रांतिक भाषत आपणा अनेक सज्ञा आढळतात या सख्यावाहुल्यावरून त्याच्या प्राचीनत्वावरून सर जॉर्ज वॅट ( Economic Dictionary IV 4 258 ) यानी निष्कर्ष काढला आहे की मद्यनिर्मितीची कला भार तीयाना फार प्राचीन काळापासून अवगत होती आणि समाजाच्या सर्व वर्गांत मद्यपानाची प्रथा होती

वेदकाळात सोम व सुरा या मादक पयाचा उपयोग करण्यात येत असे पैकी सोमरस हा यज्ञप्रसंगी ऋत्विजाकडून आवाहनपूर्वक सिद्ध व सेवन केला जात असे सोमरस निर्माणाठीच तयार केला जात असे सुरा धान्यापासून ( Cambridge History of India I p 102 ), विशेषत यव व तांदूळ यापासून ( Hymns from Atharva Veda II p 192 ) तयार करण्यात यइ सोम व सुरा याचे निर्मात व विक्रे

एकत्र असत, असा निष्कर्ष यजुर्वेदातील सोमसुरा या जोड उल्लेखावरून ( वेद प्रकाश–श्री पाठक, पृ ३१५ ) निघू शकतो सुरा हें पेय अशास्त्र व विशेष उत्तेजक असल्यामुळें किंवा व्यापारी सोमरसात सुरेची भेसळ करीत असल्या मुळ, त्याना हीन लेखण्यात येत असावें असें वाटते यज्ञप्रसगी ऋत्विजहि अशी भेसळ करीत असत याविषयीं यजुर्वेदातील उल्लेख पाहा सुरे, मी तुला सोमरसाशीं युक्त करतों ( १९ १ ), सोमदेवा, सुरामिश्रित झाल्यानें तू तीव्र होऊन मद उत्पन्न करीत आहेस ( १९ ५ ) सोम हें सुरेचें व सुरा हें मान वाचें पेय, सोम हा पति व सुरा ही पत्नी, असा उल्लेख तैत्तिरीय ब्राह्मणात ( १ ३ ० ० ) आढळतो सुरा बलयुक्त आहे व सोम शात आहे असे यजुर्वेदात सागितलें आहे ( १९ ७ ) सोमाचा उपयोग मुख्यत्वरूकरून यज्ञ काळीं, नियमित व वरिष्ठ समाजात मित प्रमाणात होत असावा आणि केवळ व्यसनासाठी सुरेचा दुरुपयोग बहुजनसमाजाकडून केला जात असावा, म्हणू नच ऋग्वेदात सुरापानाचा निषेध करण्यात आलेला आहे पुढे आर्यांच्या वसाहतीचें क्षेत्र विस्तृत झालें, सोमवल्ली दुष्प्राप्य होऊ लागली आणि बदलत्या धार्मिक, आर्थिक व राजकीय परिस्थितीमुळें आर्यांचें अनार्यांबरोबरचें सघटन वाढू लागलें, तसतसें सुरापानाचें प्रमाण वाढू लागलें ऋग्वेदापेक्षा यजुर्वेदात सुरापानाचे उल्लेख संख्येनें अधिक व आसक्तींत तीव्र असे आढळतात पर-देशातून जल व स्थल मार्गानीं आक्रमक, व्यापारी व निर्वासित भारतात येऊन स्थायिक होऊ लागल्यानतर निरनिराळ्या देशात प्रचलित असलेल्या, वेग-वेगळ्या पदार्थांपासून मद्यें तयार करण्याच्या पद्धती येथील रहिवाशाना अवगत झाल्या आणि अधिकाधिक कडक, रुचिर व सुगधी मद्यें भारतात तयार होऊ लागलीं नि सारणाची (distillation) प्रक्रिया वाजसनेयी सहितेंत आढळते (Social and Religious Life in the Grihya Sutras Apte p 118 ) भट्टी लावून नि सारणानें दारू काढण्याची सुरवात परशुरामकालीन हैहय क्षत्रियान्च्या अमदानींत सुरू झाली, असा काहाचा कयास ( Origin and History of the Shaundi Caste, Saha p 105 ) आहे नि सारणप्रक्रियेमुळें मद्यनिर्माणपद्धतात झालेल्या क्रान्ताचा सामाजिक व आर्थिक असा परिणाम झाला का सोम व सुरा याचें निर्माते व विक्रेते याचे विभक्ती करण झाल या विभक्तीकरणाचा पहिला उल्लेख याज्ञवल्क्यसहितेंत ( १

१६४ ' २ ३६, ४० ) आढळतो मद्याची उत्तेजकता वाढविण्यासाठी त्याचा मिश्रण करण्याची पद्धत वेदकालापासून भारतीयाना माहीत आहे सुरा तयार करण व विकणें हा धदा करणाऱ्या वश्याला शौण्डिक अशी सज्ञा होती शुण्डा म्हणजे हत्तीची सोंड नि सारण यत्रात तयार झालेलें मद्य त्याच्या सोंडेसारख्या तोंडातून थेंबाथेंबानें गळतें हलक्याभारी मद्याची साठवण व नेआण करण्या साठीं प्राचीन काळा कातडी पखाली व बुधले वापरीत असत पखालीच्या सोंडेसारख्या मुखातून मद्य सुरईसारख्या भाजनात किंवा चषकात ओतण्यात येत असावें यावरूनच शुण्डा, शुण्डापान व शौण्डिक हे शब्द प्रचारात आलेले असणें सभवनीय आहे कलालाला देण्यात आलेली ध्वजवान् ही सज्ञा उत्तर कालीन असावी दारूच्या दुकानदारानें आपल्या दुकानावर विशिष्ट ध्वज लावला पाहिजे, असा कायदा होता ध्वज लावणें म्हणजे अपकीर्त्त ग्हरत घेण हा अर्थ या प्रयोगरून निघालेला असला पाहिजे ध्वजावरील चिन्हाचा सपशील मला अद्याप उपलब्ध झालेला नाहीं, पण मनुस्मृतीतील एका उल्लेखावरून ( ९ २७ ) हीं चिन्हें सुराभाजनाचीं असावीत असं वाटतें या ध्वजप्रयोगरून निष्कर्ष काढावासा वाटतो, की या काळात मद्याची निर्मिति व विक्रय करण्याचा धदा अगदी कनिष्ठ दर्जाच्या व्यक्तींच्या अथवा वर्णाच्या हाती गेलेला असावा

वेदकाळातील लोक सुरापान करीत होते हे निश्चित ऋग्वेदात सुरापानाचे दुष्परिणाम सागितलेले असून क्वचित् या व्यसनाचा निषेधहि केलेला आहे या व्यसनाच्या व्याप्तीचा महाभारतात मुबलक पुरावा आढळतो श्री चिंतामण-राव वैद्य ( श्रीमहाभारत-उपसहार, पृ ३७० ३७२ ) सागतात "भारतीय युद्धकाळा भारतीय आर्य मद्य पिणें अशास्त्र मानीत नव्हते इतकेंच नव्हे, तर मद्यपानाबद्दल ते पाश्चात्य आर्य—जर्मन लोकाप्रमाणेंच प्रसिद्ध होते या कामात यादव अग्रणी होते बलराम अतिशय दारू पिणारा होता श्रीकृष्ण सुद्धा मर्यादेनें मद्य पीत असे हें निर्विवाद आहे " यथाच्या अनुरोधानें येणाऱ्या धार्मिक व नैतिक वचेत मात्र मद्यपानाचा निषेध केलेला आढळतो हे भाग प्रक्षिप्त असावे असं अनेक सशोधकाचें मत आहे ( Position of the Ruling Castes in Ancient India Hopkins, p 121 )

मद्यपानाचे बाबतींत पुराणाइतक्याच स्त्रियाहि आघाड होत्या विवाहानतर नववधूनें अग्नि भिजेल इतक्या सुरेच तिच्यावर सिंचन करावें असा प्रघात,

कधी व्यसन म्हणून तर कधी कामोत्तेजक किंवा मार्दवर्धक म्हणून, कधी शिष्टाचार म्हणून तर कधी प्रियजनांच्या आग्रहामुळें स्त्रिया मद्यपान (रघु ७. ११, ऋतु ५. १०) करीत अग्निमित्राची राणी ईरावती मद्यपानानें झिंगल्याचें वर्णन मालविकाग्निमित्रात आहे शिव स्वत मद्य पितो आणि पार्वतीलाहि पाजतो (कुमार ८ ७७) अज तर इंदुमतीला स्वत त्या मुखातल्या मदिरेचा घोट पाजतो. सर्वसाधारण लोकांसाठीं असलेल्या रस्त्यालगतच्या गुत्त्याचा (सौण्डिआपण) उल्लेख शाकुंतलात (पंचमषष्ठाकमध्ये प्रवेशक) आढळतो. वरिष्ठ वर्गातील लोक मद्यपानासाठी स्वतंत्र पानभूमि (रघु ४. ४२) तयार करीत आणि उनाड स्त्रियासह ते तेथें चैन करावयास जात (रघु १९ ११)

वेदकाळातील लोक सोम व सुरा या पेयांचा उत्तेजनासाठी उपयोग करीत असत अगात तरतरी व मद येण्यासाठीं, युद्धात वीरश्री येण्यासाठी, प्रतिभेच्या विकासासाठी, वक्तृत्वाला भरती येण्यासाठी सोमाचा उपयोग होतो असे ऋग्वेदात सागितलें आहे अव्वल इग्रजातील सुधारक मद्यपानाचें समर्थन याच शब्दात करीत असत वैदिक वाङ्मयात कोठेंहि सोमपानाचा निषेध केलेला नाही कारण, मला वाटतें, सोम हें ब्राह्मणाचें पेय होते आणि आचारावर नियंत्रण घालण्याचा अधिकार ब्राह्मणाचे हाती होता ऐतरेय ब्राह्मणात राम भार्गवेयाचा विश्वंतराशी झालेला सवाद दिलेला (३५ २७) आहे क्षत्रियानी सोमाबद्दल आसक्ति बाळगू नये, असे प्रतिपादन करणारा राजा सागतो "सोमवल्ली फक्त ब्राह्मणाच्या उपयोगी आहे क्षत्रियाना सोमवल्लीचा उपयोग केला तर त्याची प्रजा ब्राह्मणाप्रमाणे दानप्रतिग्रह घेणारी, भटकणारी, दरिद्री व युद्धाला निरुपयोगी होईल' सोम हे पेय ब्राह्मणाचे, सोमवल्ली अगोदरच दुर्मिळ झालेली, अशा परिस्थितीत लढणाऱ्या क्षत्रियानी सोमरसाचें जबरदस्तीनें हरण करू नये किंवा वाटेकरी होऊ नये, म्हणूनच हे प्रचारात्मक उद्गार ब्राह्मणप्रेरित क्षत्रियामार्फत काढविलेले असावेत असे उघड दिसते सुरा हें पेय सोमाहून अधिक मादक सुरापानामुळें मनुष्य उन्मत्त होऊन देवादिकांची निर्भत्सना करण्यास उद्युक्त होतो सुरा व फासे हे दुर्व्यसना उत्पन्न करतात (ऋग्वेद ७ ८६ ६) असे सागून वैदिक ऋषीनी सुरापानाचा निषेध केलेला आहे

महाभारतात शुक्राचार्यांची कथा आहे सुरापानामुळे आचार्यांची प्रतिष्ठा

नष्ट झाली त्यांची निया शत्रूच्या आधीन झाली आणि त्यांच्या अनुयायांचा नाश झाला म्हणून त्यांनी स्वतः सुरापान बंद केले आणि ब्राह्मणांना मद्यपानाची मनाई केली ब्राह्मणांतर्फे ६ व्यसन शुक्राचार्यांनी फार प्राचीन काळीं, म्हणजे महाभारताच्या काळापूर्वी बंद केले असले पाहिजे असे श्री. वैद्य यांचे म्हणणे आहे (उपसंहार पृ ३७१) पुराणात रत्रियुगारंभाच्या धार्मिक राजकीय व सामाजिक परिस्थितीचें वर्णन केलेलें आहे ब्राह्मण व क्षत्रिय यांची स्पर्धा फार प्राचीन आहे ब्राह्मणाची प्रतिष्ठा क्षत्रियांना सले आणि क्षत्रियांचे सामर्थ्य ब्राह्मणांना, आणि या उभय तांची प्रतिष्ठा व सामर्थ्य हीं वैश्यशूद्रांना बुद्ध आणि महावीर यांना अवैदिक धर्मांची प्रस्थापना केली त्यांना व त्यांच्या अनुयायांनीं कधीं राजसत्तेच पाठबळ मिळवून तर कधीं प्रचलित राजसत्ता उलथून पाडण्यासाठीं आक्रमकांना आणवून क्षत्रियांच्या सत्तेचा उच्छेद केला वैश्यांनी व शूद्रांनी, आक्रमकांनी व धूर्तांनीं या सोईस्कर धर्मांचा स्वीकार केला वैश्यांची संपत्ति व शूद्रांची संख्या, या सामर्थ्यांच्या जोरावर त्यांनीं ब्राह्मणांची प्रतिष्ठा नष्ट केली स्वातंत्र्य ही राष्ट्राची प्रतिष्ठा या काळात माजलेल्या अदाधुदींमुळे भारताचे स्वातंत्र्य नष्ट होण्याची दुश्चिन्हें दिसू लागलीं म्हणून खि पू दुसऱ्या शतकात पतंजलीनें आणि नंतर स्मृतिकारांना राष्ट्राच्या व समाजाच्या सर्वांगीण पुनर्घटनेच्या योजना निश्चित केल्या ब्राह्मण क्षत्रियांना परकीय आक्रमकांचा उच्छेद अनेक वेळा करावा लागला राजकीय स्थैर्य स्थापन झाल्यानंतर समाजधारणेच्या दृष्टीनें धर्मशास्त्रात बीजरूपानें अस्तित्वात असलेल्या निर्बंधांची व्याप्ति प्रसंगानुरोधें वाढविण्यात आली आणि बदललेली परिस्थिति काबूत आणण्यासाठीं वेळोवेळा नवे नवे निर्बंध निर्माण करण्यात आले मद्यपानबंदी हा या योजनांचा एक भाग होता तत्कालीन परिस्थितीच्या अनुरोधानें ही बंदी ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन द्विजवर्गांवरच लादण्यात आली होती कारण याच वर्गांना सामाजिक प्रतिष्ठेची मातबरी होती स्मृतिकारांनीं निर्बंध निर्माण केले व कडक शासनें निश्चित केलीं, पण न्यायालयामार्फत त्यांची अमलबजावणी होत असावी असें दिसत नाहीं कारण हे निर्बंध अनिर्बंध होते, त्यांची निर्मिति व्यवहार्यतेच्या नव्हे, केवळ नीतितत्त्वाच्या अनुरोधानें करण्यात आलेली होती या अनधिकृत कायद्याचा राजसत्तेनें कधीच पुरस्कार केला नाही आणि बहुसंख्य प्रजेची

मान्यता त्यांना कधीच मिळाली नाही. सातव्या शतकात हिंदुस्थानात प्रवास करणारा युआनच्वंग महाराष्ट्र वर्णनात सांगतो ' युद्धाला निघताना सारे सैनिक मद्यपान करून धुंद होतात आणि म। एक माणूस शत्रूच्या दहा हजार सैनिकांना भारी होतो. सम्राट हर्षवर्धनहि ह्या शूरांचें राष्ट्र जिंकू शकला नाही. ' कायद्याची प्रतिष्ठा सामान्यतः त्याची अमलबजावणी करणाऱ्या सरकारच्या सामर्थ्यावर अवलंबून असते अस सर्वसाधारणपणे वाटते. तत्वतः प्रजेची संमति व सत्कार्य हेच कायद्याचे अधिष्ठान. स्मृतिकारांच्या निर्बंधाना हें कधीच लाधलें नाही. म्हणून दुर्बलांच्या मनोरथाप्रमाणे त्याच्या योजना कोलमडल्या. फक्त ब्राह्मणांनी ही नियंत्रणे बहुधा मानली. पण ती त्यांनीच निर्माण केली शिवाय ती त्यांच्याच प्रतिष्ठेसाठी निर्मिलेली आणि ते इतके अल्पसंख्य की या प्रयोगाच्या यश-अपयशाच्या सूक्ष्मापनात त्यांची मान्यता पासंगाहूनहि फरक पाडू शकत नाही. कौटिल्याने अर्थशास्त्रात नमूद केलेली नियंत्रणाची योजना अधिक यशस्वी झाली. त्याची योजना प्रातिनिधिक नव्हती. पण व्यवहार्य होती, आणि तिला राजसत्तेचे प्रामाण्य लाधलेले होते. एकीकडे प्राचीन व मध्ययुगीन, संस्कृत व प्राकृत ललित वाङ्मयातील नायक व नायिका आणि सामान्य पात्रेंहि मद्यपानानें धुंद होत असलेली दिसतात. तर दुसरीकडे स्मृतिकार मद्यपानावर कडक निर्बंध घालीत बसलेले दिसतात. संस्कृत ललित वाङ्मय हेहि पण्डितांना निर्माण केलेले असल्यामुळे त्यात जीवनाचे यथार्थ चित्र प्रतिबिंबित झालेले नाहीत असा आक्षेप घेण्यात येतो, प्रस्तुत विषयापुरता तरी हा अपवाद खरा नाही.

गाथासप्तशतीत स्पष्टपणे मद्यपानविषयक अकरा गाथा आहेत.

गाथासप्तशतीत मदिरा, मधुरस, सरक, सुरा व सीधु या मद्यांचा उल्लेख केलेला आहे. ही सर्व मद्यें पूर्वीपासून ज्ञात असलेली अशीच आहेत. यापैकी मदिरा, सरक व सीधु हा इक्षुमद्यें होत असे टीकाकार सांगतात. सरक ही संज्ञा द्राक्षमद्याची ही द्योतक आहे. गाथासप्तशतीच्या काळात ग्रीक व रोमन व्यापारी द्राक्षमद्य आणि अरबी व्यापारी खजुरीच्या मद्याची जलमार्गाने पश्चिम किनाऱ्यावर आयात करीत ( Commerce Between the Roman Empire & India. Warmington p. 265 ) असत. रिकामे रोमन मद्यकुंभ दक्षिण भारतात व महाराष्ट्रात जागोजाग उत्खननात मिळालेले आहेत.

मधुरस ही मोहाची आणि सुरा हा तांदुळाची (अष्टांगहृदय सूत्रस्थान ५ ६७ ६८) कदम्बाचा व मधुकाची पुष्प गोळा करण्यासाठी जाणाऱ्या नायिकाचे उल्लेख गाथासप्तशतींत अनेक ठिकाणी आलेले आहेत कदंबाच्या फुलापासून कादंबरी, वारुणी व हलिप्रिया ही मद्ये तयार होतात मोहाची फुलें जंगलांत मुबलक व त्याचे मद्य लवकर तयार होते व कडक असते, म्हणून ते जंगली जमातींना विशेष आवडते मधुकाची फुलें गोळा करणाऱ्या गाथासप्तशतीतील नायिका या वनवासिनी नसून नागरिका आहेत ज्याची फुलें त्या वेचतात त्यापैकी बहुतेक सर्व मधूक वृक्ष नद्यांचे काठांकाठांवर आहेत आणि फुलें गोळा करण्याऱ्या त्याऱ्या क्रियेत भुकेपेक्षा तहानच व्यक्त होत असल्याचा भास होतो यावरून वाटतें की त्या ही फुलें मद्याच्या निस्सारणाचे रसायन तयार करण्यासाठी गोळा करीत असाव्यात या सर्व उल्लेखावरून दिसतें की जेथें तांदूळ व उस पिकतात व मधूक फुलतात तेथे गाथासप्तशतीची रचना झालेली असावी

क्रमांक १३४ व ५४३ या गाथामधील उल्लेख सुगंधित मद्याचे असावेत साधारणत सर्वत्र लोकच सुगंधित मद्याचा उपयोग करीत कारण ताज्या मद्याचा उग्र दर्प नष्ट होण्यासाठी तें बराच वर्षेपर्यंत नीटपणे साठवून ठेवावें लागतें आणि नंतर त्यावर सुगंधी द्रव्यांची बरीच पुटं चढवावी लागतात क्रमांक १३४ या गाथेंतील मद्याला नीलोत्पलाचा सुगंध येत आहे

क्रमांक १९७ या गाथेंत जुन्या (जीर्ण) सुरेचा उल्लेख आहे जुन्या सुरेचा हा सर्वांत प्राचीन उल्लेख आहे कालिदासानेंहि 'पुराणशीधु'चा उल्लेख (रघु १६ ५२, ऋतु ४ ११) केला आहे "गुरुर्निदोष जनन नव जीर्णमतोऽन्यथा।" — 'नवें मद्य जड असून दोषत्रयाचा प्रकोप करतें, जुनें त्याच्या विपरीत आहे,' असं वाग्भटानें अष्टांगहृदयात (सूत्रस्थान–अध्याय ५ ६६) सांगितलं आहे निघंटरत्नाकरातील पुढील श्लोक (निघंटरत्नाकर दातार, ताम्हणकर, महाबळ व पाटील गुणदोष पृ ३१३) पहा 'जीर्णमद्य श्रामकं स्याद्दीपन रुचिकृल्लघु॥ सुगंधिवृष्यहृद्य च स्रोतसा च विशोधकं। लवणेनविना सर्व रसैर्युक्तं कफाहक। वात कृमीन् सर्वरोगान्नाशयेदिति कीर्तितम्॥" जुनें मद्य श्रामक, दीपक, रुचिकर, लघु, सुगंधि वृष्य, हृद्य स्रोतोविशोधक, लवण रसावाचून सर्व रसांनी युक्त व कफ, वायु, कृमि आणि सर्व रोग यांचा नाश करितें सर्वच मद्य मादक

असतात, पण मादकता या एकाच गुणावर मद्याचे मूल्य व दर्जा हा अवलंबून नसतात कोणाला इक्षुमद्य आवडेल तर कोणाला द्राक्षमद्य, कोणाला फक्त मोहाची दारू मिळू शकेल, तर कोणाला वृक्षमद्य परवडेल ज्याची त्याची रुचि भिन्न व प्रकृतिहि सर्वसाधारणत मद्य जेवढे ताजे तेवढे तें स्वस्त, मादक व जलाल तेवढ्या तीव्रतेनें तें घसा भाजतें आणि तेवढ्या त्वरेनें तें मद चढवितें मद्य जेवढें जुनें तेवढे तें महाग, तेवढी त्याच्या मादकतेची गति धिम्मी त्याची रुच सुखकर आणि त्याचा स्पर्श परिपक्वतेमुळे मृदु ताजें मद्य वातचक्रासारखें भिर भिरतें जमिनीवरील धूळ व कचरा वातचक्राबरोबर गिरक्या घेत आभाळांत उडतो, त्याचप्रमाणें ताज्या मद्यामुळें मनुष्यस्वभावातील हीनवृत्ति उत्तेजित होतात जुनें मद्य वाऱ्याच्या लहरींबरोबर डुलणाऱ्या पतंगासारखें आभाळात चढतें ! म्हणूनच मुरब्बी मद्यपी मुरलेली मदिरा पसंत करतात जीं मद्यें ताजेपणीं विशेष कडक असतात तींच जुनीं झालीं म्हणजे लुसलुशीत होतात जुना म्हणजे किती जुना? जाणते सांगतात, की ती सारणाने तयार केल्यापासून पन्नास वर्षांनीं ब्रँडीचे सर्व सद्गुण परिपक्व होतात आणि त्यानं तर लवकरच तिचा आस्वाद घेतला नाही तर तीहि थकते, वृद्ध होते ( Handbook of Wines Todd p 93-4 ) आणि अपेक्षाचें समाधान करण्यास अक्षम होते !

गाथासप्तशतीच्या अधिकृत आवृत्तीत सातशें व संकलित आवृत्तीत सुमारें एक हजार गाथा आहेत यापैकीं फक्त अकरा गाथामध्यें मद्यपानाचा उल्लेख आहे यापैकीं दहामध्यें स्त्रियांच्या मद्यपानाचा उल्लेख आहे उरलासुरला एक उल्लेख पानकुटीचा आहे क्रमांक ९७, १९७ २७० ५४४ ५५०, ५११ व ६२७ या गाथांच्या नायिका गृहिणी आहेत आणि क्रमांक ५३४ व ९७८ यांच्या नायिका स्वैरिणी आहेत क्रमांक २२७ व ७१० यांच्या नायिका वेश्या अगर गणिका असणें संभवनीय आहे

गाथासप्तशतीतील या नायिका मद्यपान करतात हें खरें, पण त्यापैकीं एकालाहि मद्यपानाचें व्यसन असावें असें दिसत नाहीं प्रियकराच्या अनुरञ्जना साठीं, मन्मथोन्माद यावा म्हणून किंवा प्रियकरानें आग्रह केला म्हणून त्या मद्यपान करतात क्रमांक ९७ या गाथेची नायिका प्रियकराच्या स्वागतासाठी

सज्ज होत आहे मन्मथोन्माद यावा म्हणून ती कविसंकेतानुसार आम्राङ्कुराचें दर्शन घेते, त्याचप्रमाणे सुरेचें सेवन करते क्रमांक ५३४ या गाथेची नायिका सरस मद्याच्या सेवनानें इतकी उन्मत्त झालेली आहे की ती सर्वस्वी विसदृश अशा नायकावर आसक्त झालेली आहे क्रमांक ८६६ या गाथेची नायिका मद्यपानामुळें एवढी उन्मत्त झाली आहे की आपल्या तोंडाला मद्याचा वास येत आहे किंवा कसें याची शहानिशा करण्यासाठीं ती नवऱ्याच्या समक्ष दाराशा लगट करीत आहे क्रमांक १७८ या गाथेची नायिका वृद्धा आहे तिला मधुरसाच्या सेवनानें जणु तारुण्याचा उन्माद आलेला आहे क्रमांक ७७० व ५५० या गाथांच्या नायिका मानिनी आहेत त्यांचा रुसवा नष्ट व्हावा व त्या उपभोगाला अनुकूल व्हाव्यात म्हणून नायकांनीं त्यांना स्वत च्या मुखांतल्या मदिरेचे घुटके पाजलेले आहेत चिमणीच्या घोटानें मद्यपान करावयाचें किंवा करवावयाचें ही मद्यपानाची एकांतांतील शृङ्गारिक पद्धत कुमार संभवात शंकरानें पार्वतीला याच पद्धतीनें व अनङ्गदीपनाच्या हेतूनें मद्य पाजलेलें आहे "मान्यभक्तिरथवा सखीजन सेव्यतामिदमनङ्गदीपनम्। इत्युदारमभिधाय शंकरस्तामपाययत पानमम्बिकाम्॥" ८ ७७॥ आणि रघुवंशात अजानें इंदुमतीला "मदिराक्षि मदाननार्पितं मधु पीत्वा रसवत्कथं नु मे। अनुपास्यसि बाष्पदूषितं परलोकोपनतं जलाञ्जलिम्॥" ८ ६८॥ क्रमांक ७१० व ९११ या गाथांतील नायकांनी मानिनी नायिकांना मद्याचे चषक दिले आहेत, तेवढ्यानें त्यांचें समाधान होत आहे असें दिसत नाहीं वर नमूद केलेलें अनुपान त्यांना हवें आहे कीं काय? क्रमांक ९२७ या गाथेंतील नायिकेच्या अधरावर स्फटिकचषकाचा आरोप केलेला आहे पूर्वी ते लालभडक होते, पण नायकानें त्यातील रस शोषून घेतल्यामुळें ते पांढरे फटक पडले आहेत। मद्यपानामुळें स्त्रियांना धुंदी येते व त्यांचें मुख सुगंधित होतें आणि धुंद सौंदर्य विशेष आकर्षक व उत्तेजक असतें असें क्रमांक ५४४ या गाथेवरून दिसतं पुष्पासवाच्या सेवनानें स्त्रियांची नजर चंचल होते व त्यांच्या सौंदर्याला अनुपमेय शोभा प्राप्त होते असे उद्गार कालिदासानें कुमारसंभवात ( ३ ३८ ) काढले आहेत जात्या कुरूप असलेल्या स्त्रियाहि मद्यपानामुळें सुस्वरूप दिसतात का काय? की अशा प्रसंगीं त्यांच्यावर सौंदर्याचा आरोप करणाराहि धुंदीत असावा लागतो?

सर्वसामान्य लोक चषकातून मद्यपान करीत असत असे क्रमांक ५१०, ६११ व ६०७ या गाथावरून दिसते. ऋग्वेदकाळीं दारू पिण्यासाठीं कातड्याचे भांडें वापरीत, त्याचें नाव कारोत्तर (बुद्धपूर्वजग, पृ ३५६) चषकाचा उल्लेख रघुवंशातहि (७ ४९) आढळतो. क्रमांक ६०७ या गाथेंतील चषक स्फटिकाचा आहे. अजंठ्याच्या लेण्यात मद्यपानाचे प्रसंग चित्रित केलेले आहेत. कोणी एकएकटे मद्यपान करीत आहेत आणि कोणी जोडप्यानें. येथें मद्याचा कुंभ व चषक दोन्ही पहावयास मिळतात. उत्खननातही त्याचे नमुने उपलब्ध झालेले आहेत.

क्रमांक २२७ या गाथेंत पानकुटीचा उल्लेख आहे. पानकुटी म्हणजे गुत्ता. गाथेंतील संदर्भ निश्चितपणें गुत्त्याचा निर्देश करीत नसल्यामुळें वेगवेगळ्या टीकाकारांनी निरनिराळे अर्थ दिलेले आहेत. गंगाधरानें 'चाण्डालकुटी', पण्डित मथुरानाथ शास्त्र्यांना 'मदिरापानकुटी'. श्री राजारामशास्त्री भागवतांना 'महाराचें घर किंवा पिठा' आणि वेबरने 'पर्णकुटी' असे अर्थ दिलेले आहेत. गंगाधरनें चाण्डालकुटी व भागवतांना महाराचें घर असे अर्थ दिले, कारण पाणी या देशी शब्दाचा अर्थ नीच जातीचा पुरुष (देशीनाममाला VI 38) असा आहे. पाण म्हणजे पान. मद्यपान असें पण्डितजांनी गृहीत धरलें आहे आणि वेबरनें पाण म्हणजे पर्ण हा अर्थ स्वीकारलेला आहे. अर्थशास्त्रात कौटिल्यानें गुत्त्याला पानागार असें अभिधान (अधि २, प्रक ४२) दिलें आहे. पानागारात स्वतंत्र खोल्या असाव्यात, त्यात बठकी व बिछाने, पुष्पपात्रे व पाण्याचे घडे असावेत अशी कौटिल्याची अनुज्ञा आहे. पानागाराच्या मालकाला त्यानें वणिक् म्हटलेले आहे. गाथासप्तशतीतील पानकुटी ही अर्थशास्त्रातील पानागाराहून खालच्या दर्जाची असावी असें उघड दिसतें. या पानकुटीचा रक्षक चाण्डाल असावा हें संभवनीय आहे. गाथासप्तशतीतील शब्दचित्र ग्रामीण जीवनाचीं आहेत. आमच्या खेडेगावात पाटलाच्या घरींही तूप-मीठ मिळण्याची पंचाईत, मग तेथल्या गुत्त्यात बठकी व पुष्पपात्रें चोहून मिळणार ? गाथा सप्तशतीत वर्णिले आहेत तसे झोंपडीतले गुत्ते डोंगराळ भागातल्या देशा पाड्यामध्यें अलीकडेपर्यंत दिसत असत. कौटिल्यानें वर्णिलेल्या पानागारात शौकीन लोक आपल्या दासींना किंवा रखेल्यांना बरोबर घेऊन जात असत,

गाथासप्तशतींतील पानकुटी अगदीं हलक्या दर्जाची असल्यामुळे वश्याहि तेथें जाण्यास धजत नसाव्यात

समाजाला व्यसनापासून परावृत्त करणारे सुसस्कृत लोक नेहमीच अल्पसख्य असतात त्यान्च्या चारित्र्यावर राष्ट्राची प्रतिष्ठा अवलबून असते मनुष्यमात्राची नैसर्गिक प्रवृत्ति सुखाकडे असते निवृत्तीचा मार्ग दाखविणारे समाजाला नेहमींच अप्रिय वाटतात व्यसनाच्या प्रादुर्भावामुळें जणु हतप्रभ झालेला मनु ( ५ ५६ ) सागतो न मासभक्षणे दोषो न मद्ये न च मैथुने। प्रवृत्तिरेपा भूताना निवृत्तिस्तु महाफला ॥ प्रवृत्ति हा दोष नसेल, पण निवृत्ति हें महत्पुण्य आहे, हें खास

( ३ ) विहार'

मनुष्य कितीहि उद्योगी असला तरी त्याला दररोज थोडाबहुत फावला वेळ असतोच मनुष्याला मनोरजन व विश्राति ही आवश्यक असल्यामुळे त्यासाठीं समाजनियत्रकानीं ज्या त्या विभागातील नैसर्गिक परिस्थितीच्या अनुरोधानें व या ना त्या निमित्तानें कांहीं दिवस राखून ठेवलेले असतात हा काल व्यतीत करण्याच्या साधनावरून समाज स्थितीबद्दल अनुमानें काढता येतात

या विषयाचे स्थूलमानानें तीन विभाग पडतात ( १ ) कालहरण, ( २ ) खेळ जगली, मैदानी व घरगुती आणि ( ३ ) उत्सव व सण शिवाय मर्दानी व जनानी असेही आणखी विभाग पडतात यांपैकीं कांहीं अन्य विषयाशीं सबद्ध असतात म्हणून या विभागात समाविष्ट होण्याजोग्या कांहीं विषयाची चर्चा त्यान्च्या अतर्यामीच्या अनुरोधानें अन्यत्र केली आहे उदाहरणार्थ आख्यान-कथन व श्रवण, हा उपाय सामान्यत कालहरणासाठीं योजण्यात येत असला तरी त्याचा समावेश सास्कृतिक प्रकरणात केला आहे, लताप्रहार ही क्रीडा असली तरी तिचा समावेश लैङ्गिक प्रकरणात केलेला आहे शिकार हा उत्तरकालीन नागरिकाचा जगली खेळ आहे, पण गाथासप्त शतींत हा वन्य जमातींच्या चरितार्थाचा व्यवसाय आहे सबब हा विषय आर्थिक प्रकरणात दिला आहे उत्सव व सण यांच अतर्याम धार्मिक किंवा

शास्त्रीतिय असल तरा त्याचें लौकिक स्वरुप व उद्दिष्ट मनोरंजन हेंच असल्या मुळे त्याची चर्चा याच प्रकरणात केलेली आहे

कालहरण :

उत्सव व क्रीडा वगळल्या तर तत्कालीनाना कालहरणाची फारच थोडी साधन उपलब्ध असल्याचें दिसून येत आधुनिक ग्रामीण जीवनाची सामान्यत अशीच अवस्था आहे त्यातल्या त्यात सुसंस्कृत अशीं जोडपीं, मग ता पति-पत्नी असोत किंवा प्रियकर-प्रेयसी, परस्पराचें सान्निध्यात असताना काल-हरण कसं करीत? तीं एकमेकाचा अनुनय करीत, प्रथम प्रेमकलह, नतर प्रेमलीला अकारण किंवा सकारण, एकानें रुसावयाच व दुसऱ्यानें मनधरणी करावयाची किंवा सखीनें मध्यस्थी करावयाची आणि अखेरीस चाटुवचनानीं त्याचा समेट व्हावयाचा सकारणापैका अनेक प्रेमकलह गोत्रस्खलनामुळ किंवा प्रियकराचा प्रेमापराध प्रेयसीच्या प्रत्ययास आल्यामुळें झाल्ले आहेत कोणी परस्पराना गद्य आख्यानें सागतात, कोणी काव्यपठन करतात आणि कोणी व्यग्य अथवा ग्राम्य गाथा ऐकवितात, कोणी कामकथाच श्रवण करीत व कोणी कामशास्त्राची चर्चा करीत कधा गायन, वादन व नर्तन यात कालक्रमणा करात केव्हा पति वाद्य वाजवा व प्रेयसी नृत्य (क्र ३०४) करी नवविवाहित दापत्य त्यासगा उद्यानात दोहद-क्रीडा करात, प्रोत्साहन प्रियकराच व प्रत्यक्ष क्रिया प्रेयसाची अशीं व सामान्य जोडपा उघाडाच्या दिवसात कुजविहार, उन्हाळ्यात जलक्रीडा व चादण्यात जोत्स्नाकेली रात्राच्या पहिल्या प्रहरा मद्यपान नतर कामक्रीडा व अखेर एकशय्येवर निद्रा पति बाहेर गेला असल तर तो परत येण्याच्या सुमाराम पत्नी दरवाजात त्याची वाट पहात (क्र १४० ७५ ३०२) उभी राहत तो प्रवासाला गेलेला असल तर त्याच्या आगमनाचे दिवस पुन पुन मोजण्यात ती कालक्षेप करते प्रोषितभर्तृका विरहाच्या काळात पूर्वीच्या प्रेम प्रसगाच्या आठवणी (क्र २९ ४४ ७१७) आळवतात मनोरथ (क्र १७, १३३) उडवितात किंवा आळसात काळ (क्र ६५, ६६, ३५८, ७६४) काढतात साक्षर असतात त्या पतीशा पत्रव्यवहार करतात त्याच्या मत्रिणी त्याना प्रवासी प्रियकराच्या कल्पित कथा (क्र ८३४) सागतात ज्या प्रोषित

धुतिका ज्या प्रोषितपतिका उनाड असतात त्या अभिसरण करतात, सकेतस्थाने पडतात व रात्री धिंगाणा ( क्र ५८ ) घालतात नव्या नवरीच्या नादीं लागलेला व्याध आसक्तीमुळें दुबळा होतो व त्याचें पूर्वीचें धनुष्य त्याला पेलाव म्हणून ती तें छिलून हलकें ( क्र ११९, १२० ) करते

गाथासप्तशतीच्या नायिकाना नटून थटून गावभर मिरवण्याची मोठी हौस सौंदर्य-प्रसाधने व अलकार यानी विभूषित होऊन आजूबाजूने वावरणाऱ्या प्रेक्षकाना घायाळ करात ( क्र २९, ३० ) या ना त्या निमित्ताने त्या रस्त्यावरून भटकत ( क्र २०, ४७,५७, ४१५ ४१६ ) आहेत अगर मिरवत ( क्र ३८, १७३, २४१, ३२८, ४५७ ) आहेत, कधीं वायर्ने वाळण्याच्या ( क्र ३२८ ) सबबीवर, तर कधीं बाजारहाट ( क्र ५८८, ७८८, ८८३ ) करण्यासाठी या बाबतात त्या आधुनिक नगरी स्त्रियाना हार जाणार नाहात कुलस्त्रिया घरातल्या घरात डोहाळे, गोत्रग्रहण इत्यादि क्रीडा करून कालहरण करतात नववधू प्रियकराच्या सान्निध्यात दोहद क्रीडा करतात अशोक दोहदाला ( क्र १०१ ) सरस्वतीकण्ठाभरणात अशोकोत्तासिका क्रीडा ( पूर्वोक्त पृ ६६६ ) असे शीर्षक दिले आहे आणि वात्स्यायनानें या क्रीडेसाठीं चैत्र शुद्ध अष्टमी नेमस्त केलेली आहे वर उल्लेखिलेल्यापैकी काही क्रीडा नायिकानीं नायकाच्या साहचर्यात केलेल्या आहेत आणि काहीं नायक व नायिकाना स्वतत्रपणे केलेल्या आहेत नायिका कालहरणार्थ किंवा काही हेतूनें कुडाच्या भिंतीवर चित्रें ( क्र ३१ ) किंवा आकृति काढतात त्याचप्रमाणें नायक प्रेयसीच्या शरीरावर चित्र ( क्र ८२४ ) रगवतो स्त्रियाप्रमाणें पुरुषही बाजारहाट करतात पण हें केवळ माळणीच्या सौंदर्याच्या ( क्र ५९८ ) निरीक्षणासाठीं ' मुलाची अशी एकच क्रीडा उल्लेखिलेली आहे प्रियाच्या पाठीवर आरोहण करून घोडा-घोडा ' खेळण्याची आणि हा उल्लेखही वात्सल्यानें प्रेरित झालेला नसून बन्धविशेष ध्वनित करण्यासाठीं झालेला आहे ! हिंवाळयात थडीनें कुडकुडणारा मुलें शेकोटीभोवता ( क्र ७६४ ) बसून कालहरण करतात असाही उल्लेख आढळतो आईच्या गालाला चावणें किंवा आईबापाच्या मध्यें झोपणें या अजाण बालकाच्या लीला आहेत, त्याना क्रीडा म्हणता येणार नाहीं

गोत्रग्रहण व गोत्रस्खलन याना क्रीडा म्हटलेले असले तरी वस्तुत हा एक कालहरणोपाय आहे सबब त्याची चर्चा येथेंच केला पाहिजे

**गोत्रग्रहण** क्र. १२३, ३४३, ४४०, ८२७. **गोत्रस्खलन** क्र ०, १०१, ४००, ४२६, ८९९, ९०१, ९०२, ९०३, ९३८, ९६१

गाथासप्तशतींत गोत्रहरण व गोत्रस्खलन याचा उल्लेख क्रीडा किंवा अपराध म्हणून आलेला आहे येथें गोत्र ही सज्ञा प्रचलित अर्थानें वापरलेली नाही कुल किंवा कुलनाम या अर्थानें हा शब्द फक्त एकदा, क्र ८१७ या गाथेंत योजलेला आहे अन्यत्र त्याचा अर्थ व्यक्तिनाम असा आहे गोत्रग्रहण म्हणजे नाव घेणें आणि गोत्रस्खलन म्हणजे नाव चुकणें गोत्रग्रहणातलें नाव पतीचें वा पत्नीचें किंवा प्रियकराचें वा प्रेयसीचें असतें, बोललेलें किंवा लिहिलेलें, आणि सामान्यत गोत्रस्खलनातलें नाव पुरुषानें उच्चारलेलें असतें व तें प्रेयसीचें असतें, तें अनवधानानें घेतल जातें, क्वचित् मुद्दाम, क्रीडा म्हणून, किंवा छळून, अन्यत्र चित्त गुतल्यामुळें किंवा धुंदात

वात्स्यायनानें कामसूत्रात ( २ १० ४० ४५ प्रणयकलह प्रकरण ) गोत्रस्खलनाचा उल्लेख केलेला आहे वर्धमानप्रणया तु नायिका सपत्नीनामग्रहण तदाश्रयमालाप वा गोत्रस्खलित वा न मर्षयेत नायक व्यलीकं च ॥ ” नायकानें सवतीचें नाव घेतले किंवा तिच्या नावानें आपणास हाक मारली अगर तिच्या गुणाचें वर्णन केलें तर नायिका त्याची क्षमा करीत नाही, कलह करते कच विस्कटून टाकते रडते व स्वतःला मारुन घेते किंवा प्रसगविशेषीं नायकाचेंहि कच उपटते व त्याचा ताडन करते वात्स्यायन सागतो अशा प्रसगी नायकानें प्रियभाषण करून किंवा जरूर तर पाया पडूनहि नायिकेचें आर्जव करावेंत आणि क्रुद्ध नायिकेने नायकाच्या मस्तकावर पादप्रहारही करावा पण दाराबाहेर मात्र जाऊ नये कारण त्यामुळे वेअब्रू होते

सामान्यत गोत्रग्रहण म्हणजे पत्नीनें पतीचें नाव घेणें नववधूला समवयस्क मैत्रिणींना पतीचं नाव घेण्याविषयीं आग्रह करणें तिनें लाजून आढेवेढे घेणे ही मुग्धा नायिकेची लाडिक लीला किती प्राचीन आहे हें या उल्लेखावरून दिसून येतें विशिष्ट प्रसगाच्या अनुरोधानें पति हा आपला वल्लभ नसून वैरी आहे असें क्र १०३ च्या मधल्या नायिकेनें पळवाटेने पण गाथेच्या गाभ्या

हसून म्हटलेलें आहे क्र ८०७ मधील कल्पना रम्य आहे, प्रवासी पतीनं पत्नीला गुदारांच पत्र लिहिलें, पण त्यात मजकूर असा काहाच नाहा, तिचें नाव पुन पुन लिहून त्यानें पत्र भरून पाठवलें आहे पतीच्या प्रीतीचा प्रत्यय आल्यामुळें बिचाऱ्या प्रोषितपतिकेला किती धन्यता वाटली असेल!

गाथासप्तशतींत बहुवल्लभनायक (क्र ७२, १४७) आणि नायिकेच्या सवती याचे अनेक उल्लेख आलेले आहेत, त्यावरून सिद्ध होतें का त्या काळात बहुपत्नीकत्वाची प्रथा रूढ होती यात गुप्त असें काहाच नव्हतें यामुळ सव तींना एकमेकींचा नावें माहीत असत आणि अन्येन्या नामोच्चारामुळ त्याचा मत्सर जागृत होत असे ह्याप्रमाणेंच केव्हाही कोठें कोठें व्यभिचार चालत होता त्याचा बभ्रा होऊन आपली गणना स्वैरिणात होऊ नये म्हणून विवाहित स्त्रिया घेतात तवढी खबरदारी पुरुष घेत नाहात व आपल्या विवाहबाह्य मवधाच्या वाच्यतेची पुरुषाना तेवढी खतही वाटत नाहीं पण याचा तपशील अत पुरात वर्णापक्षणा दासल होतो आणि पतीला याचें प्रत्यतर पत्नीच्या अश्रूच्या किंवा उपाम्भाच्या द्वारें येतें या परिस्थितींतून व वृत्तींतून गोत्र स्खलनाचा सभव होतो

स्पष्टपणं क्रीडा म्हणून गोत्रस्खलनाचा उल्लेख क्र ९६१ या गाथेंत आलेला आहे नायिकेला चिडविण्यासाठीं नायकानें अन्य स्त्रीच्या नावानें तिला सबो धिलेलें आहे क्र ९०१, ९०२ व ९०३ या गाथातील उल्लेख असेच आहेत त्याचे नायक निरपराध आहेत क्र ३२ १३१, ४५० ४९६, ८९९ व ९३८ मधील गोत्रस्खलन क्रीडेसाठीं चालेलं नाहीं या गाथाचे नायक अपराधी आहेत व गोत्रस्खलनामुळ त्याचा अपराध व प्रेमस्थान हीं प्रकट झालीं आहेत गोत्र स्खलनाची प्रतिक्रिया ही माहेण्यासारखी आहे कोणी अश्रु (क्र ९३८) ढाळतात कोणी अगतिकपणं सहनशीलता व्यक्त (क्र १३१) करतात कोणी दडपून उपाम्भोद्गार (क्र ३२ ४५२) काढतात आणि कोणी यातही आनद मानण्याइतक्या (क्र ४९०) निढावतात क्र ४९६ मधील गोत्रस्खल नाचा प्रकार विशेष हृदयद्रावक आहे हा प्रकार सणाचे दिवशी किंवा नायि केच्या वाढदिवशी झाला आहे नायिकेनें अलकार धारण केले होते तिला अपेक्षा होती कौतुकाची पण हें तिच्या नशीबी आहे' तिला वाटलें

मर्जी देण्यासाठा रेडा सजवतात, तशाच आपली अवस्था आहे म ८११ व ९०१ ह्या गाथांच्या नायिका योत्त्रावहुत तडफदार आहेत पतीबरोबर हाच मौडा करून उट्टे फेडण्याची त्याची तयारी आहे, पण तसें झालेलें मात्र नाही म ९०१ या गाथेतील नायकाची आई मुलाला सांगते का तुझी तशीच चेष्टा करण्याइतकी बुद्धि तुझ्या दुरावलेल्या बायकोलाही आहे अक्कल सर्वांना असते, हिंमत मात्र फार थोड्यांना हिंदुस्थानातील पुरुषांनाही स्वत त्या स्वत्वावर किंवा हक्कावर झालेल्या आक्रमणाची चीडसुद्धा येत नाही, मग प्रतिकाराची गोष्टच कशाला ? आणि आपल्या स्त्रिया ? त्या तर पुरुषाहून अगतिक

गोत्रस्खलनाच्या पुन पुनरुच्चारामुळे या प्रकाराला सकेताच ( motif ) स्वरुप आलेलें आहे मी या सकेताला "विरचिता सकेत" असं अभिधान दिलें आहे विरचिता हा वत्सराज उदयनाच्या अत पुरातील दासी राजवाड्यातल्या दासी अगानें सुरक व पिंडानें उफाड्याच्या असावयाच्याच. उन्मादाच्या क्षणा किंवा अनुकूल सधि मिळताच अत'पुरातही थोडीबहुत गडबड चालायचीच उदयनाचा विरचितेशी सबध होता एकदा महाराज 'तयार' होऊन अत पुरात आले व महाराणी वासवदत्तेच्या महालात घुसले मद्याच्या धुदात उदयन वासवदत्तेला विरचितेच्या नावानें सबोधून कुरवाळू लागला ! मानी राणीच्या कानउघाडणीमुळें महाराज शुद्धीवर आले त्यानें राणीचे पाय धरले व तिला प्रसन्न केलें हा प्रसग कथासरित्सागरात ( कथामुख लम्बक - तरग सहावा ) वर्णिलेला आहे पुरुषाचें चाचल्य व स्त्रियांची सहिष्णुता ही अमर्याद व दिक्कालातीत आहेत, हाच या सकेताचा निष्कर्ष प्रतिकार काय करणार आणि करून तरी काय होणार ?

## ( २ ) खेळ :

खेळाचे जगलो, मर्दानी व घरगुती आणि जनानी व मर्दानी असे पोटभाग प्रकरणात असं वर सांगितलं मर्दानी खेळांची मल्लयुद्ध हा मुख्य आणि घरगुती खेळामध्यें फुगडी व सोंगट्या केवळ क्रीडा म्हणून खेळल्या जाणाऱ्या विहार प्रकाराची चर्चा येथें केली आहे लैंगिक आशय असणाऱ्या क्रीडांचा विचार त्या प्रकरणात केलेला आहे

उत्फुल्लिका उप्फुलिआ, उफुल्लिआ, पप्फुलिआइ : म ११६ फुगडी हा

बाल्किाचा खेळ भारतातल्या सर्व प्रदेशात प्राचीन काळापासून प्रचलित आहे गाण्यान्या साथात चालणान्या या खेळात करमणुकीबरोबर सर्व स्नायूंना पुरेसा व्यायाम होतो आणि शरीराला व गतीला ढब येते, शिवाय आपल्या अन्य खेळाप्रमाणे यालाही उपकरणे लागत नाहीत उत्फुल्लिका हा बाल्किाच्या फुगडीचा एक प्रकार आहे उत्फुल्ल, प्रफुल्ल वगैरे शब्द विकासित पुष्पाचे अगर अशी फुलें ज्यावर उमलली आहेत अशा वृक्षलताचे द्योतक आहेत कामशास्त्रात उत्फुल्लक हीं सज्ञा विशिष्ट सभोगासन या अर्थानें वापरण्यात येते वात्स्यायन ( २६८ ) मानतो शिरो विनिपात्योर्ध्वं जघनमुत्फुल्लकम्। जयमङ्गलेत यशोधर मानतो शिरोभागमधस्तान्छय्यायां विनिपात्योत्तानमूर्ध्वं जघन कुर्यादितिभेदमेवरूप पश्चाद्भागेनेत्यर्थ । पाइअसद्दमहण्णवात उप्फुल्लिआचा अर्थ दिला आहे तो असा पाव पर बैठकर वारवार ऊचा नीचा होना उत्फुल्लिका या बाल्किा क्रीडेबद्दल गगाधर मानतो पादोपविष्टाना मुहुरुत्पतनोत्पतनरूपा क्रीडा उत्फुल्लिकेत्युच्यते। आणि पण्डित मथुरानाथशास्त्री सागतात उत्तान शयानस्य पादयोरुपविष्टाना बालाना मुहु पतनोत्पतनरूपा क्रीडा उत्फुल्लिके-त्याख्यायते । ह्या क्रीडेनें बालिका वृद्धामध्या व जितश्रामा होतें, ती तशी व्हावी व पुरुषायिताचे प्रसगीं तिला धाप लागू नये अशी या गाथेची अपेक्षा आहे येवरनें 'फुडाफुडिक' असा एका टीकेतील या क्रीडेचा अर्थ दिलेला आहे फुड फुड विकसित, फुडिअ = विकसित, विदारित अर्थ एकच

उप्फुडिआ म्हणजे सम फुगडी

"मुली व स्त्रियासाठी सचित्र मनोरजक गाणीं व खेळ या नोपस्यात श्री दामोदर विनायक वागळ ( आर्यसदन छापखाना ) यानी समफुगडीची गाणीं दिली आहेत

एक गुई गारवृ गारवृ। पान पडे साह साह ॥
एवं पडा मोठा मोठा। मई आणी पोटा पोटा ॥
मईच्या पानी पुत्या पुत्या । आम्ही गाढ़ फुगड्या फुगड्या ॥

( पक्का घालून )

एक गुई चमुला चमुला । पाच पडे साठुना साठुना ॥
एक पडा मोठा मोठा । मई आणी पोटा पोटा ॥

सईच्या कानी बुगड्या बुगड्या । आम्ही खेळूं फुगड्या फुगड्या ॥
असें चीट चांगलें चांगलें । वडाला नेऊन टांगलें टांगलें ॥

॥ फुई, फुई, फुई ॥

कोण बार नगरी
भोवताल्या नगरी
काटयाचीं कुलपें
मोत्याची झुलपें

आम्ही लेंकी थोराच्या । कानीं बुगड्या मोराच्या ॥
एक भुई सारवूं सारवूं । पाच खडे मांडूं मांडूं ॥
एक खडा उडाला उडाला । खिडकीत जाऊन बुडाला बुडाला ॥
खिडकी माझी मायम मायम । लाथा बुक्या खायम खायम ॥
लाथा बुक्या सोसेना सोसेना ।
जीव कसा जातो जातो । डोळे वासून पाहतो पाहतो ॥
डोळ्यात होता बाऊ बाऊ । नेईल माझी जाऊ जाऊ ॥
वड्या कशा कापिती कापिती । गोफण कशी मारिती मारिती ॥
भाऊजींनीं देखिली देखिली । गुंड्याखालीं ठोकिली ठोकिली ॥
असा खुटा झाड ग झाड ग । हाताला आला फोड ग फोड ग ॥
हाताचा फोड फुटेना फुटेना । दारचा पाहुणा उठेना उठेना ॥
त्यानीं घेतली म्हैस ग म्हैस ग । माझी मामी गईस ग गईस ग ॥

व्यायामकोशातील 'मुलींचे खेळ' या भागात (पृ. ३५६) सौ. लक्ष्मीबाई मुजुमदार यांनी बसफुगडीचा तपशील दिला आहे "ही फुगडी दोन मुलींनी खेळावयाची असते. यात एका मुलीने खाली बसून व अर्धवट बसल्यासारखे राहून (व समोरच्या मुलीने हात घट्ट धरून गोल फिरावयाचे असते) फुगडी खेळावयाची असते. या प्रकारात अर्धवट बसणाऱ्या मुलीच्या पायावर जास्त जोर येतो व समोरच्या मुलीच्या हातास जास्त मेहनत पडते. या वेळी मुली खालील गाणे म्हणतात. बसफुगडी बसूं गा। चतुर शिंपी हसूं गा॥ एक पाय सोन्याचा। सीताराम शेल्याचा॥

बसफुगडी वेगळ्या प्रकाराने खेळलेली मी पाहिली आहे. मुलीने बरोबर

हात ठेवून चवड्यावर बसावयाचें, एकेका झटक्यासरशी एकदा उजवा व एकदा डावा पाय तिरपा ताणावयाचा आणि थोडें थोडें पुढ सरकावयाचें, त्या बरोबर ऊर्ध्वांग आजूबाजूला व मागेपुढें डोल्वून एकदा या व एकदा त्या हातान्या मुठात फू, फू करावयाचें, अशी ही फुगडी आहे एकीनें खेळावी किंवा अनेकींनीं, ओळीन किंवा वर्तुळात हीच फुगडी या गाथेला अभिप्रेत असावी असें तिच्यातील सूचनेवरून व खेळाच्या संभाव्य प्रतिक्रिये वरून वाटतें

पुरुषाचा कटिपश्चात्प्रदेश सिंहासारखा सकुचित असावा व माद्या पिळदार आणि प्रौढेचें नितब पृथुल व जघन मांसल असावत अस आपल प्राचीन व मध्ययुगीन सौंदर्यतज्ञ सागत आले आहेत उपभोग्य सौंदर्याच्याच नव्हे, सत्ता राच्या प्रधान उद्दिष्टान्या दृष्टीनेंही त्यानीं ह्यां वैशिष्ट्यें आदर्श मानली होतीं जघन व नितब हे मासल व पृथुल, त्याचप्रमाणें चपल व श्रमक्षमही असले पाहिजेत यासाठी देशोदेशीं बालिकाकडून विशिष्ट पद्धतीचे व्यायाम करवून घेण्यात येत असत नितब भ्रमण या व्यायामाला अरब लोक 'धुग' म्हणतात आणि अबीसीनीयन लोक डक-डक म्हणतात स्वाहिली त्रियाना हें नृत्य विशेष बमोशीनें शिकविण्यात येते नितब-भ्रमण-नृत्यात प्रवीण झाल्यावांचून त्याना विवाहाचा दर्जा प्राप्त होत नाहा (Chandra Chakraberty Sexology of the Hindus p 8) उत्फुल्लिका ही याच धत्ताची क्रीडा आहे, मग तिला क्रीडा म्हणा किंवा नृत्य श्री हॅव्हेलॉक एलिस सागतात (Psychology of Sex Sex in Relation to Society Vol II Part III pp 515-7) की रति ही एक कला असून विवाहेच्छु व्यक्ति-मात्रानें ती सपादन केली पाहिजे हा सिद्धान्त ख्रिश्चन धर्माला अमान्य असल्यामुळें ग्रीक व रोमन काळात प्रचलित असलेल्या अशा नृत्याचा व व्यायामाचा युरोपात लोप झाला आपल्याकडेही अशा क्रीडा लुप्त झालेल्या असून त्याच पुनरुज्जीवन अशक्य झालेलें आहे

**जलक्रीडा** क्र १८ १८१ २३१ २४ २७३ ५५८ ६९९ ९८९

गाथासप्तशतीन्या नायिकाना न्हाण्याची व स्नानाची, नदीत डुबण्याची व पोहण्याची मोठी हास मग त न्हाण सणासुदीच अभ्यगस्नान (क्र ७९)

असो किंवा परमातलें उघड्यावरलें दैनिक स्नान ( क्र ६८३ ) असो, प्रियकराच्या प्रलोभनार्थ अगाला उटणे लावून दिवसा धीमेपणें गोदावरीच्या घाटावरलें स्नान ( क्र १८९ ) असो किंवा अपरात्रीं पूर आलेल्या गोदावरीचा प्रचण्ड प्रवाह पोहून ओलाडताना अनिच्छेनें घडणार साहसी स्नान (क्र ०३१) असो नर्मदेंत ( क्र ५४८, ७७८, ५९९ ) आणि विशेषत गोदावरींत ( क्र ५८, १०३, १०७, १७५, १८९, २३१, ३५५, ६४९ ) न्हाणाऱ्या व काठावरील कुञ्जात घुमणाऱ्या आणि जलाशयात ( क्र १८६, ४७३, ५७८ ) डुंबणाऱ्या व डुबी घेणाऱ्या प्रियकराशी गुप्त कामक्रीडा करणाऱ्या नायिकाच उदाहरण पाहिले म्हणजे वरील विधान प्रत्ययास येतें

जलक्रीडेची चर्चा वात्स्यायनानें कामसूत्रात ( १४४१, १६३० ) केलेली आहे या क्रीडेचा अतर्भाव त्यानें उद्यानगमनात केलेला आहे आणि ती ग्रीष्म ऋतूत करावी अशी शिफारस केलेली आहे शिष्ट लोकांच्या व प्राचीन स्मृतिकाराच्या अनुरोधानें त्यानें जलातील सुरतक्रीडेचा निषेध केलेला आहे

पाशक-शारि ( क्र १३८ ) पासअ म्हणजे फासे आणि सारि = शारि म्हणजे सोंगट्या या शब्दाचा अर्थ फास व मेना असाही होतो पण तो येथें अभिप्रेत नाही असें संदर्भावरून दिसतें उलट क्र २०५ या गाथेंत फासच अभिप्रेत आहे फाशाचा खेळ भारतात फार प्राचीन काळापासून चालत आहे फाशाच्या खेळामुळें होणाऱ्या सर्वनाशाचं वर्णन ऋग्वेदात ( १० ३४ ) आले आहे " गुळगुळणारे फासे मला बेभान करतात फाशाचा आवाज ऐकल्याबरोबर व्यभिचाराला चटावलेल्या स्त्रीप्रमाणें मी त्याच्याकडे धाव घेतों फासे हे मामापर्यंत रतणारे गळ आहेत तरीही जुगाऱ्याना त्याचा मोह पडतो यावरून हा द्यूतप्रकार होता हें निश्चित होतें मात्र तो कसा खेळत असे याचा सविस्तर तपशील मिळत नाही ज्ञानकोशकारानी ( बुद्धपूर्व जग पृ ३५१ ) वैदिक वाङ्मयातील उल्लेख व त्यावरील टीका विचारात घेऊन या खेळाची माडणी दिली आहे फासे पुष्कळ असत व ते टाकण्याकरिता जमीनात खोलगट जागा करीत असत असें तेथें मानिलेलें आहे महाभारताची कथावस्तु द्यूतावर आधारलेली आहे येथही मद्य व द्यूत या व्यसनापासून आत्मनाशाचा उपदेश श्रीकृष्णान व नारदानें युधिष्ठिराला केलेला आहे महा

गृहस्थाना सबधित स्त्रीपुरुषान्च्या समावेश त्याचप्रमाणे स्त्रियाना अतःपुरात व जोडप्याना एकातात

मल्लयुद्ध क्र. ६८४ व ६८५ या गाथात मल्लयुद्धाचे उल्लेख आलेले आहेत मल्ल व मल्लयुद्ध याचा थोडीफार माहिती व अनुभव असेल त्याना हा शब्दचित्रे नि सशय यथार्थ व हृद्य वाटतील क्र. ६८४ या गाथेत 'जुण्णमल्ल' म्हणजे वसलेला पण वृद्ध मल्ल, तालमीतला वस्ताद आणि भिन्ना मल्ल याच्या सामन्याच्या सुरवातीचे वर्णन आलेले आहे जुण्णमल्लाचे कान चढलेले व फाटलेले आहेत सलामीनतर मुठीत हात घालण्याच्या निमित्ताने कानशिलावर तळहाताचा दणका देण्याचा मल्लाचा प्रघात असतो प्रतिपक्षाची शक्ति व सहनशीलता अजमावण्यासाठी, चिरडण्यापूर्वी त्याला चिडवण्यासाठी, त्याचे व्यवधान नष्ट करण्यासाठी त्याला झाज आणून आरभीच नामोहरम करण्यासाठी सुरुवातीच सामन्याचे वेळी अशा प्रहाराचा दुष्परिणाम होऊ नये म्हणून मल्लविद्येचे साधक कानशिलावर थपडा मारून घेऊन आगाऊ तयारी करून ठेवतात यामुळ कधी कानान्च्या गुठळ्या होतात तर कधी ते फाटतात या मल्लाने कक्षाबन्ध चढवि लेला आहे कच्छाबन्ध या शब्दावरून दिसते की हा लगोटीसारखा काचा आहे खेडेगावात भरणाऱ्या हगाम्यातल हौशी मल्ल हल्लीही सामान्यत असा काचा धारण करतात स्त्रियाची जशी नीवि तसाच मल्लाचा हा कक्षाबन्ध मल्लाना उत्तेजन यावे आणि प्रेक्षकान्च्या गलक्यामुळे त्याचे व्यवधान ढळू नये म्हणून हगाम्याचे वेळी होलार कडी वाजवीत असतात विजयी मल्लाची मिरवणूक त्यान्याच कडकडाटात निघते क्र. ६८५ या गाथेत मल्लाचा विजय दवडी वाजवून जाहीर करण्यात येत आहे हा मल्ल विवाहित आहे आणि त्याच्या यशामुळे त्याची पत्नी आनदित होऊन नाचत आहे

भारतात मल्लयुद्धाची प्रथा फार प्राचीन आहे वैदिक यज्ञप्रसगी मल्लाचे सामने होत असावेत रामायणात व महाभारतात मारुती व भीम यानी केलेल्या मल्लयुद्धाचे अनेक वर्णन आलेली आहेत क्र. ६८३ या गाथेत भीमाने पूर नावाशी केलेल्या मल्लयुद्धाचा उल्लेख आलेला आहे बाहुयुद्ध, मुष्टियुद्ध व गदायुद्ध हे मल्लयुद्धाचे तीन प्रकार मल्लाच्या हात लढणाऱ्या मल्लानी युद्धाचे शिष्टसमत नियम काटेकोरपणाने पाळले पाहिजेत असा पचाचा व प्रेक्षकाचा आग्रह अस

शुक्रनीतीत चौसष्ट कलांची यादी आहे पैकी (१८) पदन्यासपूर्वक शस्त्रसंधानविक्षेप, (१९) संघाघाताकृति भेदयुक्त मल्लयुद्ध आणि (२०) बाहुयुद्ध निपीडन या कला प्रस्तुत विषयाशी संबद्ध आहेत पवित्र्यांच्या अनुरोधाने शस्त्रसंधान, मान्यावर आघात किंवा त्यांचें आकर्षण आणि मोक्याच्या जागी मुष्टिप्रहार इत्यादि ही मल्लयुद्धाचा वशिष्टे असून त्यामध्यें प्रयत्नपूर्वक प्राविण्य प्राप्त करून घ्यावें लागतें, म्हणून मर्दानी असल्या तरी या कलाच आहेत कला या सज्ञेला अलीकडेच जनानी अभिप्राय आलेला आहे जातकातही मल्लयुद्धाचें संदर्भ आढळतात ही युद्धें 'समज्ज' सभया ग्रामांगणात किंवा राजांगणात होत असत राजघराण्यातील प्रेक्षकांसाठी मंडप उभारण्यात येत अगणाभोंवती (युद्धमंडल) असलेल्या पायन्यावर प्रेक्षकांच्या वर्तुलाकार रांगा (चक्रातिचक्रे मचातिमचे) बसत शड्डू ठोकणारे व माज्या थोपटणारे मल्ल मोठमोठ्याने गर्जना करीत प्रतिपक्षावर तुटून पडत ( Pre Buddhist India, Ratilal Mehta p 356) राजे व श्रीमंत लोक मल्लांना आश्रय देत आणि त्याच सामने करवीत सोपारय येथील सीहगिरी राजाने विजयी मल्लाना बक्षिसें ठेवल्याचा उल्लेख जातकात आहे गाथासप्तशतीतील मल्ल मात्र केवळ लोकधर्मी वर पोसलेले आहेत

## सण व उत्सव

छण = सण = क्षण = उत्सव मग क्र ७९ ५८, ७९ ४६९, ४९९, ५३५ ६२८, ७३१, ७७८, ८७०, ९५७, इन्द्रध्वजमहोत्सव १ क्र ८५८, फागुच्छण फाल्गुनोत्सव क्र ३६९ मअण मदनोत्सव क्र ५४४, ५४५, वसंतोत्सव व स्वागतोत्सव क्र ७७४

मनुष्य उत्सवप्रिय आहे ही हौस भागविण्याकरिता तो सण निर्माण करतो काहीं सणाचें माहात्म्य ऐतिहासिक किंवा सास्कृतिक असतें आणि काही नैसर्गिक परिस्थितीवर आधारलेले असतात मागासलेल्या व सुधारलेल्या समाजातील सणाचा तौलनिक अभ्यास करून डॉ हॅव्हलॉक एलिस (Psychology of Sex I 127) सागतो की सण हे सूर्याच्या स्थितीवर व कृषि सपत्तीच्या समृद्धीवर अवलबून असतात मकर (winter solstice) मेष (vernal equinox) कर्क (summer solstice) व तूळ

( autumnal equinox ) या राशीत सूर्य प्रविष्ट होतो तेव्हा मनुष्य सामान्यत महत्त्वाचे सण साजरे करतो हा सिद्धान्त देश-काल-परिस्थितीच्या अनुरोधानें विचारात घेतला पाहिजे हें उघड आहे मकर संक्रान्तीचे सुमारास दिवस दीर्घ होऊं लागतो आणि कर्क संक्रान्तीचे सुमारास दिवस दीर्घतम झालेला असतो मेष संक्रान्तीचे सुमारास रब्बी आणि तूळ संक्रान्तीचे सुमारास खरीप पिकें हाता आलेलीं असल्यामुळें शेतकरी आनंदात असतात, म्हणून याच सुमारास होळी व दिवाळी यासारखे सण साजरे होतात सणाच्या मांडणीवरून समाजाच्या वैशिष्ट्याबद्दल, संस्कृतीबद्दल व स्वभावाबद्दल अनुमानें काढता येतात

काहीं सण दिवसा ( वासर क्र ७९ ) व काहीं रात्रीं ( रात्र क्र ६८, ४६६ ) साजरे होतात रात्रीचे सण सामान्यत पौर्णिमेच्या ( क्र ६८, ४६६ ) सुमारास असतात सणाच्या दिवशीं स्त्रिया गरम व सुगंधी पाण्यानें ( क्र ७९ ) न्हातात आणि वेषभूषा ( क्र ३९, ४९६ ) करतात कामकाजा निमित्त अन्यत्र गेलेलीं माणसें सणासाठीं घरीं परत ( क्र ७७८ ) येतात आणि सणाचा आनंद लुटण्यासाठीं स्त्रियाही परठिकाणीं पाहुण्या ( क्र ७३१ ) जातात सणाचे दिवशीं गोरगरीबही नवे कपडे धारण करतात असे उल्लेख जातजात ( J III 446 ) आढळतात सणासाठी मुद्दाम पीठ दळून (क्र ६२४, ८२०) विशिष्ट प्रकारचीं पक्वान्नें तयार करण्यात येतात -क्र ८२० मधील सण हा वसन्तावताराच्या दिवशीं साजरा करण्यात येणारा सुवसन्तक सदृश सण आहे असें सरस्वतीकण्ठाभरणात ( पूर्वोक्त पृ ६६४ ) सांगितलेलें आहे वात्स्यायनानें या उत्सवाची तिथि माघ शुद्ध अष्टमी अशी दिलेली आहे सणाच्या निमित्तानें होणारे उत्सव ग्रामांगणात चौकात किंवा देवळाच्या पटांगणात ( क्र १९० ) अगर नदीकाठच्या वाळवंटात ( क्र ५८ ) साजरे होत उत्सव म्हटला म्हणजे थाळीवहुत गडबड, गोंधळ व धिंगाणा व्हावयाचाच क्र ५३५ या गाथेंत नगारे धडाडत आहेत, करमणुकीचीं स्थानें जाहीर करण्याकरितां, तिकडे गर्दी लोटत आहे, धाईमुळें व धक्काबुक्कीमुळें लोकांना रस्त्याची शुद्ध राहिलेली नाहीं, सर्वत्र गोंगाट चाललेला आहे जागरणाच्या निमित्तानं गोदातीरावर रात्रीं होणाऱ्या धिंगाण्याचें वर्णन क्र. ५८

या गार्थेत आलेलें आहे उत्सव आटोपला की उत्साह ओसरतो आणि प्रभातकाळी पौर्णिमेचा चद्रही निस्तेज (क्र. ६८) होतो पौर्णिमेच्या रात्राच्या उत्सवामुळ उत्साहित झालेला क्र. ४६६ या गार्थेचा नायक संधि साधून नायिकेला जनसमर्दाच्या ओहोटींतून बाहेर काढतो व तिनें प्रसन्न व्हावें म्हणून तिला आडोशाला नेऊन तिची प्रार्थना करतो जणू तो तिला सागत आहे की अशी संधि पुन्हा प्राप्त होणार नाहीं !

क्र. ४९६ मधील सण हा सार्वजनिक नसून वधूच्या वाढदिवसाचा असावा असें अनुमान करण्यास जागा आहे क्र ७७४ या गार्थेत वसतोत्सव व राजाच्या स्वागताचा उत्सव यांची तुलना केलेली आहे समाज स्वयस्फूर्तानें वसतोत्सव साजरा करतो आणि त्या मानानें राजाचा औपचारिक स्वागतोत्सव कृत्रिम असतो राजाची मिरवणूक कार्तिकी पौर्णिमेला काढीत असत असे जातकातील उल्लेखांवरून ( J I 449, III 446 ) दिसतें

**इंद्रध्वजमहोत्सव** ·

क्र ८५८ या गार्थेत इद्राच्या लाकडी मूर्तीचा उल्लेख आलेला आहे इन्द्राच्या मूर्तीचे उल्लेख ऋग्वेदात व इन्द्रध्वजमहोत्सवाचे महाभारतात आढळतात कालिकापुराणात ( अ ८८ ) सागितलें आहे की वार्षिक इन्द्रध्वजमहोत्सवाच वेळीं ध्वजाबरोबर इन्द्राच्या काष्ठ, मृत्तिका अगर धातु यापासून सिद्ध केलेल्या मूर्तींची पूजा करावी कालकाचार्य कथानकावरून दिसतें की शालिवाहन राजाचे अमदानीत महाराष्ट्रात पैठण येथ इन्द्रमहोत्सव साजरा करण्याचा प्रघात होता भाजें येथाल अखेरच्या लेण्यात ऐरावतावर आरूढ असलेला इन्द्र व त्याच्या मार्गे ध्वज धारण करणारा मानकरी असें शिल्प कोरलेलें ( History of Indian & Indonesian Art Smith Pl xiv, fig 51 ) आहे तें या प्रसंगीं संबद्ध असण्याचा संभव आहे शिवाय सरस्वतीकण्ठाभरणात या गार्थेला शक्रोत्सव ( निर्णय पृ ६६८ ) असे शीर्षक दिलेलें आहे म्हणून या उत्सवाबद्दल माहिती देतों

इन्द्र हा विजयेच्छु वाराचा सग्रामप्रवर्तक देव, आणि आर्यांच्या ध्वजाचा रक्षणकर्ता ( ऋ १० १०३ ११ ) म्हणून सम्राटानां सामन्त व सैन्य यासह दरसाल इन्द्रमहोत्सव साजरा करावयाचा प्रघात होता महाभारतात चेदि

देशाचा राजा वसु उपरिचर ( आदिपर्वः अंशावतरणपर्वः अ. ६१ : १–२१ ) याची कथा आहे. उपरिचरानें उग्र तप केलें तेव्हां संतुष्ट होऊन इंद्रानें त्याला आर्तत्राणासाठीं वेळूचा दण्ड दिला. हें इन्द्राचें प्रतीक मानून त्यानें तो वर्ष-प्रतिपदेला वस्त्रावगुंठित करून मैदानांत उभारला व त्याची पूजा केली. वराह-मिहिरानें बृहत्संहितेंत ( अ. ४३ ) सांगितलें आहे कीं विष्णूपासून प्राप्त झालेला ध्वज इंद्रानें वसूला दिला आणि ह्या ध्वजाच्या पूजेमुळें भरभराट होईल, राज्यांत अवर्षण पडणार नाहीं ( कालिकापुराण ) व प्रजा निरोगी होईल ( वराहमिहीर ) असा आशीर्वाद दिला. यानंतर सर्व राजे ध्वजपूजा करूं लागले. महाभारतांत हा उत्सव पाडव्याचे दिवशीं केलेला आहे. ब्राह्मणी आधारग्रंथांत याचा काल सामान्यतः भाद्रपद शुद्ध अष्टमी ते पौर्णिमा असा दिलेला आहे. शिलप्पदिकारम् या महाकाव्यामध्यें त्याची सुरवात चैत्री पौर्णि-मेला झालेली आहे. तेथें हा उत्सव अठ्ठावीस दिवसांचा आहे. पुरहूत महोत्सव आश्विन शु. ९ ते १५ पर्यंत करावा असें जैन ठाणंगसुत्तांत सांगितलेलें आहे. या उत्सवाचे रूपांतर नवरात्रांत झालेले आहे असे केवलानंद स्मारक ग्रंथात श्री. वोपरकर सांगतात.

भाद्रपद शुद्ध अष्टमीला राजानें परिवारासह जंगलांत जाऊन एक उंच झाड पाडून त्याचा बावीस हात लांबीचा ( देवीपुराण : अ. १२ ) सोट वाजत गाजत राजधानींत आणावयाचा आणि तो वस्त्रालंकारांनीं सुशोभित करून राज-द्वारीं चवुतऱ्यावर उभारावयाचा, तो डगमगूं नये म्हणून चोहोंबाजूंना ताण (मध्यमव्यायोग : १·४७) द्यावयाचे, शुद्ध राजानें पूजादिविधिपूर्वक पांच दिवस उत्सव करावयाचा आणि पौर्णिमेला त्याचें विसर्जन करावयाचें, अशी या उत्स-वाची मांडणी होती. हा उत्सव गांवाबाहेर होत असे. उत्सवाचे दिवसांत काव्य-गायन, नाट्य, नृत्य इत्यादि करमणुकीचे कार्यक्रम सदार्गमार्जन केलेल्या मैदाना-वर होत असत, असें उत्तराध्ययन सूत्रांत सांगितलें आहे. बृहत्कल्प भाष्यांत सांगितलें आहे कीं या उत्सवाचे वेळीं पाचशें कुलीन कुमारिका एकत्र जमून सौभाग्यासाठीं इंद्राला बळी अर्पण करीत. युरोपांत मे–पोल च्या समारंभांत असाच ध्वज उभारतात व त्या भोंवतालच्या मैदानांत सार्वजनिक व मिश्र असे नृत्यगीतादि कार्यक्रम होतात, तेथेंही स्थानिक व यथांत आलेल्या कुमा-

रिका घोळक्यात मिसळतात आणि धिंगाणा घालतात या साम्यावरून इंद्र महोत्सव हाहा लैङ्गिक उत्सव असावा असा काही संशोधकांनी निष्कर्ष काढला आहे इन्द्र हा पर्जन्याचा देव, म्हणून हा उत्सव पावसाळ्यात करावा असें हरिवंशात ( २ १५ १९ ) सांगितलें आहे या वैशिष्ट्यावरून हा समृद्धि ( fertility ) उत्सव असावा असा डॉ मायर ( Sexual Life in Ancient India I p 288 ) याना निष्कर्ष काढलेला आहे

कालकाचार्य कथानकात ( हार्वर्ड युनिव्हसिटी प्रत संपादक डॉ नॉर्मन ब्राउन ) इन्द्रध्वजमहोत्सवाचा उल्लेख आलेला आहे उज्जयिनीत स्वत आमत्रून आणलेल्या ( अधिक माहितीसाठीं पहा कालकाचार्य व विक्रमादित्य प्रसाद ऑक्टोबर : १९४७ ) शकांच्या अत्याचारामुळें त्रस्त व प्रजेच्या अवहेलनेमुळें लज्जित झालेला कालकाचार्य पैठण येथें शालिवाहनाच्या आश्रयाला आला त्या वेळीं तेथें भाद्रपद शुद्ध पचमीला इन्द्रमहोत्सव होत असे पर्युषण हा जैनाचा सर्वात मोठा उत्सव हा उत्सव श्रावणाच्या शेवटच्या दिवसात व भाद्रपदाच्या प्रारंभीच्या दिवसात ( ज्ञानकोश ) पाळला जातो एकाच तिथीला आलेले दोन्ही उत्सव आपल्याला समारंभपूर्वक साजरे करता यावेत म्हणून पर्युषणोत्सव पुढें ढकलण्याबद्दल शालिवाहन राजानें आचार्याला विनति केली असता अशी ढकलाढकल अपमानास्पद वाटल्यामुळ आचार्यानें पर्युषणाचा उत्सव चतुर्थीला ठरविला यामुळें राजाला दोन्ही उत्सवाना हजर राहणें शक्य झालें तेव्हां-पासून महाराष्ट्राला जैनानीं श्रमणपूजालय हें नाव दिलें आणि येथें हा उत्सव भाद्रपद शुद्ध चतुर्थीला साजरा होऊ लागला

वस्त्रालंकारादि साधनानीं सुशोभित अशा ध्वजाचें आरोपण हें या उत्सवाचें वैशिष्ट्य मानलें तर आता त्याचें रूपातर गुढीपाडव्यांत झालेलें आहे हा उत्सव वर्षप्रतिपदेला करावा असं महाभारतात सागितलेलें आहेही अवर्षणा पासून प्रजेचें रक्षण व्हावें म्हणून करण्यात येणारा पर्जन्यदैवताचा उत्सव हें प्रधान लक्षण मानलें तर तो अशा वेळीं साजरा व्हावयाला हवा कीं जोंवर शेतांतील पिकाची तहान भागलेली नसते कृषिपर्यायांत हा काळ भाद्रपदात बसतो पुढले पाऊस भरपूर व वेळेवर पडतील किंवा कमी, याची शेतकऱ्याला काळजी असते, त्याच काळात विघ्नहर्त्याच्या पूजनाचें प्रयोजन असतें, हें

श्री शर्मा (आर्योत्सव–प्रकाश · पृ १८५) यांचें वचन उद्धृत करून श्री अंडरहिल (The Hindu Religious Year p 48) सांगतात का भाद्रपद शुद्ध चतुर्थीपासून सुरू होणारा व अनंतचतुर्दशीला संपणारा गणेशोत्सव हा पूर्वधान्यें (खरीप–कार्तिकी पिकें) पिकवणाऱ्या शेतकऱ्याचा वर्षोत्सव मानला पाहिजे इंद्रमहोत्सवाशीं गणेशोत्सवाच्या तिथि जवळ जवळ जमतात, शिवाय त्याप्रमाणें येथेंही प्रतीकाचें विधिपूर्वक विसर्जन होतें आश्विन शुद्ध प्रतिपदेला सुरू होणाऱ्या नवरात्राशीं इन्द्रमहोत्सवाचा संबंध जोडता येईल असें वाटत नाहीं. विजयादशमीचे दिवशीं होणारें शमीपूजन हें वृक्षपूजेशीं आणि शस्त्रपूजन हें पराक्रमाशीं संबद्ध आहे एवढें मात्र खरें

फाल्गुनोत्सव, मदनोत्सव व वसंतोत्सव : फाल्गुनोत्सव म्हणजे होळीचा सण फाल्गुन पौर्णिमेला होळी होते, वद्य प्रतिपदेला धुळवड आणि वद्य पंचमीला रंगोत्सव होऊन शिमग्याचा सण संपतो धुळवडीच्या दिवशीं अत्यजाला स्पर्श करून स्नान करावें असें सांगितलेलें आहे हेमाद्रीनें व्रत चिंतामणींत धुळवडीला भैरवोत्सव अशी संज्ञा दिली आहे तो सांगतो, या दिवशीं लोक भैरवाची मूर्ति धरतात व मिरवणूक काढून ती पुजतात लोक बेहोष होतात, नाचतात व अश्लील गाणीं गात रानभर भटकतात वात्स्यायनानें होलिकोत्सवाचा उल्लेख (कामसूत्र अधिकरण १ अध्याय ४ ४२) केलेला आहे पिचकारीनें पळसाच्या फुलांच्या रंगाचें पाणी भरून तें आणि दुसऱ्या [illegible] अंगावर फेंकणें, ही क्रीडा फाल्गुनी पौर्णिमेला करावी असा कामसूत्रावरील टीकेंत यशोधर सांगतो आता ही क्रीडा वद्य पंचमीला करतात वसंतोत्सव [illegible] पंचमीला होतो वात्स्यायनानें सुवसंतकाचा उल्लेख केलेला आहे यशोधर सांगतो, सुवसंतकाचेंच मदनोत्सव असें नाव असून या उत्सवांत नृत्य, गीत व वाद्य यांनीं प्राधान्य असतें [illegible] या उत्सवाची तिथि माघ शुद्ध पंचमी अशी दिली आहे [illegible] वसंतोत्सव या दिवशीं कामदेवाची पूजा करीत. असें शाकुन्तलावरील उल्लेखावरून दिसतें [illegible] [illegible] [illegible] [illegible] (१४) आलेला आहे आतां या तिथीला श्रीपंचमी म्हणतात या दिवशीं [illegible] पूजा होते [illegible] शुद्ध पंचमीला श्रीपंचमी असें नाव

आहे सिंहासनद्वात्रिंशीच्या दाक्षिणात्य प्रतीत (हार्वर्ड सीरीज संपादक डॉ एड्गर्टन पृ १४१–६) ह्या उत्सवाची तिथि माघ शुद्ध सप्तमी दिलेली आहे हा उत्सव वसताचे सन्मानार्थ होतो, ऋतुदेवतेची पूजा होते, राजा नाट्य, नृत्य, सगीत याचे कार्यक्रम होतात आणि ब्रह्मवृद व कलावन्त याचा नजराण्यानीं सत्कार करण्यात येतो असेही येथें विधान आहे उत्तर हिंदुस्थानात उपलब्ध झालेल्या प्रतात हा उत्सव (पूर्वोक्त पृ ८०) चैत्रात माडलेला आहे मदनोत्सव उर्फ अनगपूजा हा उत्सव अर्वाचीन पचांगात चैत्र शुद्ध त्रयोदशीला माडलेला असतो वात्स्यायनानें मदनोत्सवाचा उल्लेख केलेला आहे यशोधर साग्तो, या दिवशीं मदनाचा पुतळा उभारून त्याची पूजा करतात रत्नावलींत श्री हर्षानें मदनमहोत्सवाचें वर्णन केलेलें आहे (मराठी भाषातर कर्ते श्री• सबनीस अक १ पृ ५) "वारुणीमुळें बेभान झालेल्या कामिनींनीं आपण होऊन करग्रहण केल्यामुळें आनदानें नाचणाऱ्या या नागरिकानीं एकमेकावर पिचकाऱ्यातील रगानें चालविलेल्या माऱ्यामुळें या मदनमहोत्सवाला फारच मजा आली आहे जिकडे तिकडे ओंजळानीं फेंकलेल्या गुलालानें सर्व दिशा लालभडक होऊन गेल्या आहेत क्रीडाचतुर पुरुषानीं पाण्यानें भरलेल्या पिचकाऱ्या अगावर उडविल्यामुळें मनोहर सीत्कार करणाऱ्या या वेश्यागनाचे हे विलास तर पहा" आता मदनमहोत्सव फक्त उत्तर हिंदुस्थानांत साजरा होतो, महाराष्ट्रात होत नाहीं येथें या तीनही उत्सवाचे विविध विधि फाल्गुनोत्सवात समाविष्ट झालेले आहेत, म्हणून त्याची चर्चा एकत्र केलेली आहे

वेदात सहाही ऋतूचा उल्लेख एकत्र आलेला आहे तेथें वर्षारभ वसतापासून झालेला आहे पूर्वफल्गुनी ज्या पूर्णिमेस येतात ती गत सवत्सराची शेवटची रात्र आणि उत्तरफल्गुनी ही आगामी सवत्सराची पहिली रात्र होय असें तैत्तिरीय ब्राह्मणात सागितलेलें (१ १ २ ६–८, ३ १० ४ १) आहे आताची पौर्णिमेची रात्र व वद्य प्रतिपदेचा दिवस मिळून होणाऱ्या चोवीस तासाना त्या काळात पूर्णिमा अशी सज्ञा होती श्री मोरेश्वर वासुदेव कर (आर्यांचे सण १ शिमगा पृ ४) सागतात 'वर्षारभ उत्तरायणारभीं करावा असें धर्म शास्त्रात सागितलें आहे हल्ली उत्तरायण पौषात सुरू होतें सुमार सहा हजार वर्षांपूर्वी उत्तरायण फाल्गुनी पुनवेस होत असे फाल्गुनी पुनवेस सूर्य

नक्षत्रचक्रात दक्षिण दिशेच्या सीमेवर जाऊन उलटला म्हणून सीमग, सीमेप्रत आलेला दिसला . .शिमग्याचा सण म्हणजे शिवेवर आलेल्या सूर्याचा सण संस्कृत भाषेतील अ मराठीत आ होतो या नियमानें सीमग शब्द सीमगा झाला संस्कृत स बद्दल मराठीत कधीं कधीं श होतो या नियमानें सीमगाचें रूपांतर शीमगा झालें, नतर शी ऱ्हस्व होऊन शिमगा शब्द प्रचारात आला " उत्तरफल्गुनीवर आधान करावें असें तैत्तिरीय ब्राह्मणांत सांगितलें आहे अग्निहोत्री यज्ञाग्नीचें आधान होमशाळेंत करीत आणि गावकरी लौकिकाग्नीचें आधान शिवेवर किंवा चवाठ्यावर करीत उत्तरफल्गुनी नक्षत्राची देवता भग (तै स ४४१०, भारतीय ज्योति शास्त्र दीक्षित पृ ५५) ही आहे भग हें आदित्याचें एक अभिधान असून (२.२७ १, ९ १४४ ३) हें समृद्धीचें दैवत आहे, धान्योत्पादनाचें आणि प्रजोत्पादनाचेंही पुढें भगदेवाचें शिश्नदेवाशीं समीकरण झालें म्हणून या रात्रीं लौकिकाग्नीभोंवतीं जमलेले गावकरी या देवतेच्या नावानें जयकार करीत असत लिंग हें सम्राट सूर्याचें प्रतीक आणि योनि हें सम्राज्ञी पृथ्वीचें, त्यांच्या सहकार्यामुळें समृद्धि निर्माण होते म्हणून त्यांच्या नावानें जयकार करण्यात येतो

होळीबद्दल अनेक दंतकथा प्रचलित आहेत होलिका या राक्षसीला लहान मुलें खाण्याची चटक होती गावकऱ्यांनीं तिला वेढलें, मारलें व जाळलें याचें होळी हें प्रतीक तिच्या निर्भर्त्सनेसाठीं गावकरी बीभत्स अप-शब्दांच्या घोषणा त्या दिवशीं सालोसाल करतात होलिका ही हिरण्यकशिपूची कन्या प्रल्हादाला मांडीवर घेऊन कपटानें जाळावें अशी पित्यानें तिला आज्ञा केली त्याप्रमाणें तिनें भावाला मांडीवर घेतलें, पण विष्णूनें भक्ताचें रक्षण केलें आणि तिचेंच भस्म केलें होलिका ही सवताची बहीण फाल्गुनी पौर्णिमेला सवताचा अंत होता व त्याच्या चितेवर ती स्वत ला जाळून घेते तारकासुराचा वध करण्यासाठीं शंकराला जागृत करण्याची कामगिरी देवानीं कामदेवावर सोंपविली त्यानें शंकराचा तपोभंग केला शंकरानें रागानें डोळे उघडले तेव्हा मदनाचें भस्म झालें हा प्रकार फाल्गुन पौर्णिमेस झाला शिमग्यात होणाऱ्या प्रकाराचें समर्थन करण्यासाठीं या व अशा लौकिक कथा निर्माण व प्रचलित केल्या गेल्या असाव्यात

होळीसारखे उत्सव व या वेळीं होतात तसे अश्लील बीभत्स प्रकार देशोदेशीं होतात आणि ते याच सुमारास होतात. लिबर व लिबरा या रोमन देवतांचा उत्सव ता. १७ मार्च रोजीं होतो. मातीचीं प्रचंड लिंगें तयार करून शेतकरी लोक तीं मिरवणुकीनें नगरच्या बाजारांत आणीत व येथें स्त्रिया त्यांची पूजा करीत; कुलीन व प्रतिष्ठित स्त्रियांही व्हीनसच्या उत्सवांत नागरी स्त्रिया लिंगाची मिरवणूक काढीत आणि देवळांतल्या योनिसदृश शाळुंकेत त्याची प्रस्थापना करून त्याभोंवतीं फेर धरून नृत्यें करीत. फ्लोरालियाच्या उत्सवाच्या दिवशीं वेश्या भर रस्त्यातून नागव्या हिंडत असत. वसंतांतलें वातावरण कामोत्तेजक असतें असें संस्कृत कवि वारंवार सांगतात. हें विधान कल्पनारम्य असलें तरी तें अतिरंजित असावें असें अर्वाचीनांना वाटतें. पशुपक्ष्यांचे संभोग हंगामी असतात हें आपण पाहतों, पण प्रगतिशील मानवजातीवर असे निर्बंध असतील अगर असावेत हें आपल्या व्यावहारिक दृष्टीला पटत नाहीं; कारण निसर्गाच्या प्रेरणाचें ग्रहण करण्याची आपली क्षमता दुर्बल झालेली आहे आणि संभोग हें जीवनातील प्रधान व दैनिक कार्य मानण्याकडे आपली प्रवृत्ति झालेली आहे. सहकाराच्या मंजिऱ्यांचा सुगंध वातावरणात दरवळूं लागला कीं जंगली जमातींतील स्त्रीपुरुषांच्या मनोवृत्ति उचंबळतात. मुंडा जमातांतील पुरुष भल्या पहाटेस शिकारीला निघतात व सायंकाळीं परततात. शिकारींत अपेशी झालेल्या पुरुषावर जमातांतल्या स्त्रिया शेणमार करतात आणि यशस्वी शिकाऱ्याचें स्वागत करतात. रात्रीं चांदण्यात मेजवानी होते. जोडीला जाली मद्य असतेंच. वातावरण धुंद झालें म्हणजे जंगी चर्मवाद्यें तालावर धडाडूं लागतात त्यांच्या गर्जनाचा तुताऱ्या भेद करतात मग सधर्गीतें व सघनृत्यें सुरू होतात. एका बाजूला पुरुष व दुसऱ्या बाजूला स्त्रिया, एकमेकांच्या कमरेभोंवती हात घालून, मागें पुढें व आजूबाजूला डुलत व डोलत. मध्येंच एकादी स्त्री बेभान होऊन आपली रांग सोडून रंगणात येते, जणु जमातीच्या पौरुषाला आव्हान देते आणि साभिनय नृत्य करूं लागते. इतक्यात एकादा पुरुष तिचें अनुकरण करतो. ता एकमेकाभोंवतीं गिरक्या घेऊं लागतात. मग रांगा मोडतात आणि सामूहिक द्वंद्वगीतें व द्वंद्वनृत्यें सुरू होतात. या वेळीं गाण्यात येतात तीं गाणीं कमालीचीं अश्लील असतात.

होळीसारख्या उत्सवात होणारे बीभत्स प्रकार आणि अश्वमेधातील महिषी व मृताश्व प्रकरण याचा कामप्रधान-मानसशास्त्र ( Sexual Psychology) व मन प्रधान समाजशास्त्र ( Psycho-Sociolgy ) याच्या दृष्टीनें विचार करून अहिताग्नि श्री. राजवाडे ( नासदीयसूक्तभाष्य : उत्तरार्ध · पृ. १६५० ) निष्कर्ष काढतात कीं " अतिगंभीर प्रसंगा ग्राम्य व अश्लील विनोद मनुष्याच्या नैसर्गिक धृताला वाव देण्यासाठा मुद्दाम योजिला आहे. " प्रजाजननाचें हंगामी प्रमाण व वसंतातले उत्सव याचा तौलनिक अभ्यास करून डॉ. हॅव्हेलॉक एलिस सागतात ( Psychology of Sex I. 123 ) कीं या ऋतूत मानवाला निसर्गत च प्रजोत्पादनार्थ संभोगाची प्रवृत्ति होते.

अर्थात्, होळीच्या उत्सवात एका संवत्सराचा अंत व दुसऱ्याचा आरंभ समारंभपूर्वक जाहीर व साजरा करण्यात येतो कडाक्याची थंडी संपून उबदार वसत सुरू झाला म्हणजे अशी परिस्थिति असेल तेथील रहिवाद्याना किती आनद होत असेल याची आपणा समशीतोष्ण भागातील लोकाना कल्पनाही करता येणार नाही उत्सवार्थ अग्नि प्रज्वलित करण्याची परपरा संस्कृतिपूर्व-कालीन आहे; या प्रथेचें ही प्रत्यतर या उत्सवात येतें नैसर्गिक प्रेरणामुळें उत्तेजित होणाऱ्या भावनांनाही या सणात वाव आहे. संवेदनाक्षमता सूक्ष्मग्राही झाल्यामुळें आता प्रतिष्ठिताना प्रचलित रिवाजापेक्षा काही रुचत नाहीत हा भाग वेगळा

फाल्गुनोत्सवात कर्दभ-प्रसाधन निर्दोष आहे असा क्र ३६९ या गाथेचा निर्वाळा आहे एकमेकाच्या अंगावर चिखल उडवणें ही गरिबाची ग्राम्य करमणूक आणि अबीर, गुलाल उधळणें ही श्रीमताची त्या काळात स्त्रियासही कर्दम-प्रयोग होत असे असे दिसत क्र ५८४ या गाथेच्या नायिकेनें मदनो-त्सवार्थ मद्यप्राशन केलेलें आहे आणि क्र ५८५ या गाथेच्या नायिकेनें कुसुम्बी कसूंबी धारण केलेली आहे पशुंना हा रंग मांसिकाची भत करणें आकर्षित करतो, कारण ती धारण करणारीच्या वर्णाचा तो द्योतक असतो. आताही पाहा, या प्रदूर नगरी तरुणी सर्पदंशानें गुल्मोदरी रगरग पानठें व कुसुम्बी चोळ्या परिधान करतात !

**( ४ ) कापूस व कापड, वर्ने व वेशभूषा :**

कप्पास = कपाशी क ८०५, तूल = बीजरहित कपाशी क ६७९; फलही = कपाशीचें झुडूप : क. १६६, ३५१, ३६०, फलिह = कपाशीचें झुडूप क ५४९, वेण्ट = बोंड क ३५९, ३६०

असुअ = अंशुक (अंशुक शुक्र (श्लक्ष्ण) वस्त्र स्यादस्त्रमोत्तरीययो ॥ मेदिनी) क ५२०, ६६५, आणन्दवड = आनंदपट क ४१७, कञ्चुअ = काचोळी क ३९५, ५४१, ६२०, ६७२, कञ्चुइ = क ६२०, कच्छाबन्ध = कक्षाबन्ध = कांचा क ६८४, कुप्पास = कोपरी, कोपरापर्यंत बाह्या असलेली चोळी (कूर्पासस्त्वर्धचोलक ॥ हारावली) क ७२३, ८०५, गण्ठि = गाठ क ३५१, ६४६, छल्लि = वल्कलें क ११५, णवरङ्गअ = नवें रंगवलेलें वस्त्र क २४१, ३२८, ४६१, णिअसण = नेसण कमरेखाली नेसावयाचें वस्त्र क ३५१, ४६९, दसिआ = दशा क. १८, दुऊल = दुकूल = तलम किंवा रेशमी कापड क ५६९ पट्टसुअ = पट्टांशुक = रेशमी वस्त्र क. ५२०, पड, पडअ = पटक, वस्त्र क. १८, ३२९, ५२०, पाइडि–पारिही = प्रावृति = वस्त्र क. २३८, पारअ = प्रावरण क ७७२, वडअ = पटक क ३२९, वत्थ = वस्त्र क. १६०, ६४६, वत्थद्धन्त = वस्त्राधान्त = पदर क १६०, वेस = वेष क ४४९, साडली, साहुली = वस्त्र, अचल क २६९, ६०५, सिअअ = नेसण क ८७१, सिचअ = सिचय क ५०७, ७१८, ८९२, सुत्त = सूत क ६३, सूई क ३९४, ५०१, ७२०

कपाशीचें मूलस्थान कोणतें? खुद्द वेदांत कापसाचा स्पष्ट उल्लेख नाही आश्वलायन–श्रौत–सूत्रात (६ ४ ४७) कापसाचा पहिला उल्लेख. आढळतो मोहेंजोदरो येथील उत्खननात कापसाचे धागे व सूत कातण्याच्या चात्या याचा आढळ झाला (Marshall Mohenjo Daro & the Indus Civilization I p 33) तेव्हापासून हिंदुस्थान हेंच कापसाचें मूलस्थान, हा सिद्धांत संशोधकांना मान्य झाला कापसाच्या बाबतींतलें युरोपियनांचें अज्ञान साएण्यासारखें आहे ख्रि पू पाचव्या शतकात हिरोडोटसनें नमूद केलें आहे की हिंदुस्थानातल्या एका जंगली झाडाला लोकरीचा फळ येतात व येथील लोक त्या धाग्याचीं वस्त्रें विणतात. ख्रि पू ३५० चे सुमारास थिओ

फेन्सने सांगितले आहे की हिंदुस्थानात वापसाच्या झुडपाची टारीने लागवड करतात अलक्सांडरच्या स्वारीपासून युरोपियन बाजारपेठात हिंदी कापडाची ख्याति झाली हिंदुस्थानातून निर्यात होणाऱ्या कापडाचा पहिला उल्लेख खिस्तोत्तर पहिल्या शतकातल्या पेरिप्लसच्या प्रवास आढळतो

वैदिक वाङ्मयातील उल्लेखावरून दिसते की तत्कालीन आर्यांची वस्त्रे मुख्यत्वेंकरून लोकरीचा असत सूचिसिद्ध वस्त्राचे उल्लेख ( २ १ ३४, १० १०७ ८ ) आढळत असले तरी ते चर्म-वस्त्राबद्दल आहेत त्याचा नेहमीची वापरती वस्त्रे तशी असावीत असे दिसत नाही वेदकालीन आर्यांचा पूर्ण पोषाक चार वस्त्राचा असे ( १ ) उष्णीप हे वस्त्र फेंट्यासारखें किंवा पागोट्या सारखें डोक्याला गुंडाळून व मानेजवळ गाठ मारुन स्थिर करण्यात येत असे याचे धारण सामान्यत ऐच्छिक व यज्ञासारख्या विशिष्ट प्रसगी आवश्यक असे ( २ ) अधिवास हे उत्तरीय उपरण्यासारखे खांद्यावरून घेण्यात येत असे अधिवास ओघळल्यामुळे उषेचे स्तन उघडे पडल्याचा उल्लेख ऋग्वेदात ( १ १२४ ) आढळतो ( ३ ) नीवी हे मलवस्त्र, गुह्यागें झाकण्यासाठी कचासारखें किंवा लगोटासारखें कमरेभोंवतीं बांधण्यात येत असे हे वस्त्र रुंद काठ्कीसारखें ( Sarkar Some Aspects of the Earliest Social History of India p 63 ) असून त्याची गाठ नाभीजवळ मारून त्याचा घाणेदार सोगा लोंबता सोडण्यात येत असे मुनींचे मग्नवस्त्र चर्मांचे असे आणि सुस्थितीतल्याचें मऊ, रंगीत व रुंद ( अथर्व ८ २.१६ ) असे स्त्रियाच्या नीवीचा काहीं भाग सावरीचा कापूस भरुन लेपासारखा केलेला असे नीवीची निवड ज्याने त्याने आपल्या हौसेप्रमाणे ( Dr Moti chandra Indian Costume from the Earliest Times Bhartiya Vidya Vol I p 36 ) करावयाची असे ( ४ ) वस्त्र याचाच परिधान, वसन वास म्हटलेले आहे हे अधोवस्त्र, नीवीवरून धारण करण्यात येत असे त्याची रुंदी व पोत हीं ते नेसणाराच्या सामाजिक व सांपत्तिक दर्जावर अवलंबून असत

महाभारतकालीन लोकही साधारणत अशाच वस्त्रे वापरीत साधारणत शिष्ट पुरुष दोन वस्त्रे वापरीत उत्तरीय व अधिवास युद्धप्रसंगी क्षत्रिय लोक

शिरस्त्राणावर उष्णीष धारण करीत अधिवास म्हणून क्षत्रिय मृगचर्मे वापरीत आणि शूद्र लोक बैलाचा किंवा बोकडाचीं कातडीं. त्यावर सूचिसंस्कार होत असलेच पाहिजेत क्षत्रिय हे शिकारी व शूद्र हे शेतकरी. ज्याला जें उपलब्ध व सोयीचे तें तो वापरी ( Hopkins Position of the Ruling Caste in Ancient India p 105 ) स्त्रियांचें नेसण विरळ असे, त्यांच्या लुगड्याला पदर असे व त्या तो उत्तरीयाऐवजीं घरातल्या घरांत खांद्यावरून घेत त्या अंगात चोळी घालीत नसत ( वैद्य महाभारत : उपसंहार: पृ ३८८-५ ) दुःशासनानें द्रौपदीला द्यूतसभेंत ओढून आणलें तेव्हा ती एकवस्त्रा-पतितार्धवस्त्रा – अधोनीवी अशा अवस्थेंत होती दुःशासनानें तिचें नेसतें वस्त्र फेडण्याचा प्रयत्न केला व त्या वेळां दुर्योधनानें आपली डावी मांडी उघडी केली यावरून त्या काळची वस्त्रधारणाची पद्धत स्पष्ट होते, असें श्री वैद्य सांगतात पण हें सारेंच प्रकरण प्रक्षिप्त आहे असें कांहीं संशोधकांचें अनुमान (Winternitz History of Sanskrit Literature I p 344) आहे

असीरिया, इजिप्त, खाल्डिया, बाबिलोन इत्यादि मध्य आशियातील व त्या-समीपच्या राष्ट्रांशी भारताचे निकट संबंध होते, या विषयां अनेक पुरावे उपलब्ध आहेत असुर संस्कृतीशी झालेल्या या संपर्काचा आपल्या राहणीवर व संस्कृतीवर पुष्कळ परिणाम झालेला आहे, मात्र त्याची व्याप्ति अदाजण्यापुरता तपशील अजून मिळालेला नाहीं महाभारत कालानंतर या संबंधात कांहीं कालपर्यंत खंड पडलेला असावा जातकादि प्राकृत व अर्थशास्त्रादि संस्कृत ग्रंथातील उल्लेखावरून आणि प्राचीन शिल्पकृत्यावरून महाजनपदकालीन आणि मौर्य व सातवाहन कालीन लोकांच्या राहणीबद्दल बराच तपशील मिळू शकतो या ग्रंथांतील अस्सल भाग कोणता व प्रक्षिप्त कोणता, प्राचीन शिल्पकृत्यातील आद्य कोणता व उत्तरकालीन कोणतां, याची शहानिशा बव्हंशीं अनुमानावर अवलंबून असल्यामुळें त्यावरून निघणाऱ्या निष्कर्षांत थोडीबहुत अनिश्चितता असणारच हें उघड आहे अलेक्झांडरच्या स्वारीचा भारतावर सांस्कृतिक असा फारसा परिणाम झाला नाही इकडच्या व तिकडच्या मालमसाल्याची परस्परांनी माहिती होऊन जल व स्थल मार्गांना होणाऱ्या व तोंवर मंदावलेल्या व्यापाराला फिरून ऊर्जितावस्था आली, इतकेंच अशोकाच्या अमदानीत बौद्ध धर्मप्रसाराच्या निमित्तानें भारताचें

परदेशाशा, विशेषत मध्य आशियाशा संघटन वाढलें मार्यांची सत्ता दुर्बल झाल्यानंतर परकीय आक्रमक बौद्ध धर्म स्वीकारून इकडे स्थायिक होऊं लागले यांतील काहींचें निर्मूलन झालें आणि काही भारतीय समाजात विलीन होऊन गेले त्यांच्या राहणीचा व रिवाजाचा आपल्यावर बराच परिणाम झालेला आहे

मौर्य व सातवाहनकालीन शिल्पावरून त्या काळातल्या लोकांच्या वस्त्राची तपशीलवार माहिती मिळते

भरहूत व साची येथील पुरुषाच्या शिरावर उष्णीष आहे, पैकीं काहींची बांधणी साधी आहे व बांधणी घरगुती आहे, काहींची रचना मुकुटासारखी संकीर्ण असून त्यावर कोठें नक्षीच, कोठें जडावाचें काम केलेलें आहे त्यांची बांधणी धंदेवाईक पगडबंदानीं केल्यासारखी दिसते कार्लें येथील सातवाहन लेण्यातील जवनिकेवरील मूर्तींचें उष्णीष अगदी मराठी फेट्यासारखें आहे भाजें लेण्यातील मूर्तींचें शिरस्त्राण संकीर्ण स्वरूपाचें आहे परंतु येथील यक्ष धोतर नेसला आहे व त्यानें छातीवर उपरणें घेतलें आहे भरहूत येथील सर्व पुरुष धोतरें नेसतात नागार्जुनिकोंडा येथील राने उत्तरीय केव्हांही धारण करीत नाहींत त्यांचा दर्जा ओळखण्याची हीच मुख्य खूण आहे दरबारी पुरुष अंगात घट्ट अंगरखा घालतात व पायात पायजमा चढवतात किंवा धोतर नेसतात आणि निऱ्यांचा सोग्यासारखा पटका लोंबता सोडतात येथील घोडे-स्वार व मोतद्दार अंगरखा घालतात पण धोतर किंवा पायजमा वापरीत नाहींत हीच त्यांचा दर्जा ओळखण्याची खूण ( Naik Studies in Indian Sculptures p 62 ) मराठी समाजाच्या वरिष्ठ व कनिष्ठ दर्जांच्या पोषाकात नमरा हाच फरक आजही दिसतो अजंठ्यातले पुरुष रंगीत व आडव्या पट्ट्यांची अरुंद धोतरें लुंगीसारखीं नेसतात आणि कनिष्ठ दर्जाचे पुरुष लंगोट किंवा कमरपट्ट वापरतात धोतराची रुंदी वाढल्यानंतर तीं नेस-ण्याच्या विविध पद्धति प्रचारात आल्या धोतरें वापरणें गोऱ्यांना परवडत नसावें असें दिसतें भाजें व नागार्जुनीकोंडा येथें द्वारपालाच्या मूर्ति आहेत त्यांचा पोषाख [illegible] आहे [illegible] [illegible] व [illegible] [illegible] [illegible] अंगरखा व [illegible] पायजमा त्यांनी धारण केलेला आहे [illegible] [illegible] अंगरखा असा [illegible] [illegible] आहे भरहूत येथे एक

मिदिरमूर्ति ( Barua Bharhut Vol II Pl lxii Fig 71 ) आहे त्यानें अगात कोट घातला आहे त्याची आघाडी गळ्याजवळ व कमरेवर बंदानी बाधलेली आहे यावरुन अनुमान होतें कीं भारतात सुचिसिद्ध वस्त्राचा वापर पूर्वीपासून होत असला तरी शकाच्या आक्रमणानतर ही प्रथा सार्वनिक झाली असली पाहिजे प्रथम एतद्देशीय दरबारात व लष्करात आणि नतर शहरात, अशा क्रमानें शिवलेल्या वस्त्राचा वापर सुरू व प्रसृत झाला असला पाहिजे

मौर्य व सातवाहन कालीन शिल्पातील बहुतेक सर्व स्त्रिया उष्णीष व उत्तरीय धारण करतात अजठ्यातील स्त्रिया उष्णीष वापरीत नाहींत वेद काळापासून प्रचलित असलेली ही प्रथा दरम्यानच्या काळात नष्ट झालेली दिसते अभिजात सस्कृत वाङ्मयात उष्णीषाचा उल्लेखही आढळत नाहीं अजठा येथील भित्तिचित्रातील स्त्रियाची वेशभूषा विविध प्रकारची आहे वेशपाशात कुसरीचे व मौल्यवान् अलकार गुफलेले आहेत मला वाटतें, केशभूषेच्या आणि अलकार प्रदर्शनाच्या हौसेमुळें स्त्रियानीं बोजड उष्णीषाचा त्याग केला असावा समाजाच्या सापत्तिक व स्त्रियाच्या सामाजिक दर्जा सुधारला असल्याचाही हा प्रकार द्योतक असावा असें वाटतें उत्तरेंत उष्णीषाची जागा ओढणीनें घेतली, उष्णीष नष्ट झालें आणि उत्तरीय खाद्यावरुन माथ्यावर चढलें उत्तरीयातून अवगुठन उत्कात झालें असावें वासवदत्तेच्या अवगुठनाला भासानें यवनिका ही सज्ञा ( स्वप्नवासवदत्त ६ १६ ) दिली आहे सभवनीय आहे कीं आपण या वस्त्राची प्रथा ग्रीकापासून घेतलेली आहे दक्षिणेंत उष्णीष व उत्तरीय हीं दोन्ही नष्ट झालीं व त्याची जागा नेसत्या वस्त्राच्या पदरानें घेतली उच्च वर्गीय स्त्रियानीं मात्र उत्तर कालात उत्तरीयाची व्याप्ति वाढवून त्याचा पडदा म्हणून उपयोग केला आहे गुप्त व वाकाटक कालीन शिल्पात व भित्तिचित्रात वेगवेगळ्या धर्तीच्या ओढण्या दिसतात कोठें त्या ढळू नयेत म्हणून त्यांवर पट्टा बाधलेला असतो ओढणीची ओढ एका प्रकारची आणि पदराचा नखरा वेगळ्या प्रकारचा ओढणी सहसा ढळत नाहीं शिष्टाचार म्हणून माथ्यावरून पदर घ्यावयाचा, पदन्यासाच्या ठक्यात तो सहेतुकपणें ढळू द्यावयाचा आणि विध्वस्त्या आविर्भावानें पुन्हा

पुन्हा सावरून घ्यावयाचा, हे महाराष्ट्रीय वेषभूषेचे वैशिष्ट्य बरचस उत्तरकालीन आणि बहुधा सकच्छ वस्त्र धारण पद्धतीनतरचें असावे मात्र या प्रथाचा प्रारभ शककालाच्या सुरवातीच्या सुमारास बानरूपानें झालेला असावा. भरहूत येथील स्त्रिया माथ्यावरून ओढणी घेतात ( Barua Bharhut Pl lxxiii ) आणि पहिल्या शतकातील गाधार हारिती ( Grundwell . Buddhist Art in India p 104 fig 55 ) पायांवरून पदर घेते अमरावती, भरहूत, साची येथील वरिष्ट वर्गाच्या स्त्रिया उत्तरीय क्वचितच वापरतात या सर्वांचे स्तन विवस्त्र आहेत या नियमाला अपवादही आहेत भरहूत येथील चण्डा यक्षिणीनें आखूड बाह्याची कचुकी धारण केलेली आहे तिचीं अग्रें सूत्रानें बाधलेली आहेत कान्हेरीसारख्या काळातील सर्व स्त्रिया कचुकी धारण करतात बौद्ध युगातील स्त्रिया नीवी नेहमीं धारण करतात. श्री नाईक ( Studies in Nagarjunikonda Sculptures p 56 ) यानीं नीवीस लगोटी हा प्रतिशब्द वापरलेला आहे कधी अरुद रुमाल कमरेभोंवतीं गुडाळून याचा खोंवाबा असा ती दिसते, तर कधी ती लावण्यक पट्टीसारखी असून लगोटासारखी वापरलेली दिसते नीवीवरून वस्त्र व त्यावरून कमरपट्ट ( Cunningham Bhilsa Tope Pl xvi ) आणि मेखला धारण करावयाचा प्रघात होता पुरुष धोतर नेसतात त्याच धतानें स्त्रिया वस्त्र नेसत ( Motichandra Indian Costume from the Earliest Times Bhartiya Vidya Vol I p 49 ). या काळातील स्त्रियाचीं वस्त्रें साधारणत तोकडीं आहेत, लाबीला व रुदीलाही त्याचा घोळ फार तर गुडघ्यापर्यंत येतो त्या नाभिदर्शन अगम्य मानीत नाहींत अजठ्याची राजकन्या माया नग्न आहे मात्र ती अलंकृत उभी आहे शिवाय तिनें इतके अलंकार धारण केलेले आहेत की त्यामुळें तिच्या विवस्त्रावस्थेकडे लक्षच जात नाहीं रस्त्यावरील मिरवणुकींत सामील झालेल्या दुसऱ्या एका राजकन्येनें कोणतेंही उत्तरीय धारण केलेलें नाहीं ( Herringham Ajanta Pl xxix ) प्रमाणे या चित्रातील राजकन्येनें नीवी व मेखला धारण केलेली आहे व स्त्रिया दाराशीं उभ्या असलेल्या दासीस चामरधारिकेनें सकच्छ वस्त्र परिधान केलें आहे

गाथासप्तशतींत कपाशीचे उल्लेख कप्पास, तूल, फल्ही व वंट या शब्दात आलेले आहेत त्याचप्रमाणें कपाशीची लागवड, रासण व वेंचणी या तीन्ही व्यापाराचे उल्लेख आलेले आहेत निसर्गत लालसर रंगाचा, लांब धाग्याचा व उच्च प्रतीचा कापूस आन्ध्र व बंगाल प्रांतांत फार पूर्वीपासून पिकविण्यात येत आहे गाथासप्तशतींतला कापूस मात्र पांढरा शुभ्र आहे, कारण त्याची तुलना धवल हास्याशी ( क्र ३६० ) व शुभ्र मेघाशीं ( क्र. ६७९ ) केलेली आहे कपाशीची पेरणी करावयाचे वेळीं नांगराची पूजा ( क्र १६५ ) होत असे या पुण्याहमंगलाला घरधन्याच्या कुटुंबातील सर्व माणसें हजर असत हा विधि खुद्द घरधनिणीनें करावयाचा असे घरच्या बायकाना कपाशीच्या देख रेखीचें व रासणीचेंही काम करावें लागे, मालकीण उच्चकुलोत्पन्न असली तरी क्र ३६० या गाथेची नायिका आर्या आहे, कपाशीच्या शेतांत ती संकेतासाठीं गेली असावी असें संदर्भावरून दिसत नाहीं रासणीसाठा मोलाची माणसेंही ठेवीत असत अशा कप्पासरक्खिकेचा उल्लेख महाजनक जातकात ( ६ ३३६ ) आलेला आहे आडदांडपणा अशीं असलेल्याची निवड ( क्र ८०५ ) या कामासाठीं होत असावी इकडे तिकडे हिंडताना राखणदाराची नजर चुकवून कपाशीचीं बोंडें उचलण्याचा उद्योग करणाऱ्या मंडळींचा या काळातही उपद्रव होत आहे बोंडें वेंचण्यासाठीं घरचीं माणसें शेतावर जातात या कामासाठीं मोलाचीं माणसेंही ठेवलेलीं आहेत क्र ३१९ या गाथेंत अशा एका तरुण मोलकरणीचा व तिचे चाळे टेहळणाऱ्या धनिणीचा उल्लेख आहे

गाथासप्तशतींत रंगारी, विणकर व शिंपी यांचे उल्लेख नाहींत पण त्यांनीं विणलेल्या, रंगविलेल्या व शिवलेल्या कापडाचे व कपड्यांचे अनेक उल्लेख आहेत हा वस्त्रें सुईनें शिवलेलीं आहेत तलम सुताचा उल्लेख ( क्र ६३ ) आहे, पण हें सूत विणकरी नसून माळकरी आहे सुईचे उल्लेख ( क्र ३९४, ५०१, ७२० ) आहेत पण ते सांकेतिक आहेत सूतकताईचा उल्लेख नाहीं रजक हाच रंगारी असें जातकात ( ४ ८१ ) आढळतें त्याचा सामाजिक दर्जा हलका मानण्यात येत असे त्याचप्रमाणें विणकाम करणारे ततवाय व भरतकाम करणारे पेसकार याचाही ( १ ३५६ ) जाड्याभरड्या वस्त्राचें विण काम करणारे बव्हंशीं अनार्य किंवा वन्य असावेत हें या गडाचें कारण

असाव अर्थशास्त्राच्या सूत्राध्यक्ष प्रकरणात ( अधिकरण २ अध्याय २३ प्रकरण ४०, इग्रजी भाषांतर डॉ शामशास्त्री पृ १२५ ) कौटिल्य मागतो " विधवा, पगु स्त्रिया, प्रव्रजिता, दड भरण्यास असमर्थ असलेल्या स्त्रिया वेश्यामाता आणि सेवानिवृत्त देवदासी याच्याकडून सूत कातवून घ्याव. सामाजिक किंवा धार्मिक निर्बंधामुळ अगर शारीरिक व्यगामुळ ज्या स्त्रिया घराबाहेर पडत नाहींत अथवा ज्याचे पति प्रवासाला गेल्ले आहेत अशाना चरितार्थासाठीं व्यवसायाची जरूरी असेल तर सूत खात्यातील मोलकरणीच्या करवीं कच्चा माल त्याच्या घरीं पोंचवावा धाग्याच्या प्रमाणात त्याना वेतन द्यावें " वेदकालापासून गुप्त कालापर्यंत सूतकताई हें काम स्त्रियाच्या हाती होतें या विधानाच्या मर्यादा येथे मिळतात अनाथ व अन्य व्यवसायाला असमर्थ अशा स्त्रिया हं काम करीत स्त्रीपुरुष घरोघर चरखे फिरवीत आहेत आणि गावोगाव विणकराचे हातमाग चालेले आहेत कापडाचे बाबतीत ग्रामसस्था स्वयपूर्ण आहेत, अशी परिस्थिति या काळात तरी नव्हती, असं यावरून स्पष्ट दिसतें

गाथासप्तशतींत मर्दानी वस्त्राचे उल्लेख फार थोडे आलेले आहेत ग्रामीण पुरुष फारशीं वस्त्र धारण करीत नाहींत शृगाराचा परिपोष वस्त्रामुळें स्त्रियाचे ठायीं होतो तसा पुरुषाचे बाबतींत होत नाहीं हींच याचीं कारणें असावीत कक्षावध कसलेल्या पटाईत मल्लाचें वर्णन क ६८४ या गाथेंत केलेलें आहे त्याच्या अवमानाचें वर्णन नामी आहे नीवी हें मल्लवस्त्र नेहमीं धारण करावयाचें असल्यामुळ त्याचे बध करवचून बाधता येत नाहींत म्हणून मल्ल युद्धासाठीं कक्षाबध वापरावयाचा या उल्लेखावरून दिसत की तो लगोटाच्या किंवा जघियाच्या माध्यावरून चढवावयाचा नसून लगोटासारखा बाधावयाचा आहे कक्षाबधाचें हल्लीं मराठी नाव काचा हा गाथाकारपर्व योनिभर रुद व बावभर लाब असतो कडदोरा व लगोटी या दोहोंचें काम तो करतो लगोटाला असतात तसे याला पदर नसतात सौराष्ट्रातले होली मल्ल कुस्तीसाठीं मैदानात उतरताना अजूनही काचा कसतात गाथासप्तशतीत पटक ही मल्ल नसलेल्या व्यक्तीचा दालक आहे मग ते स्त्रीनें धारण केल्ले असो

किंवा पुढपानें क्र ३२९ मधील पटक नि मगय मर्दांनी आहे क्र १८ मधील उल्लेख मात्र संदिग्ध आहे

गाथासप्तशतींत जनानी वस्त्राचे अनेक उल्लेख आलेले आहेत अंशुक, दुकूल, निवसन, पट, पटक, पट्टांशुक, वड, वस्त्र, साउली व सिचय हीं नावें स्त्रियांच्या नेसत्या वस्त्राची आणि कंचुक, कचुकिका व कूर्पास हीं नावें स्तनांशुकाची इंपीरियल गॅझेटीयरच्या कूर्ग विभागात ( भाग ११ पृष्ठ २४ ) कुप्पास या सशेचा अर्थ Long coat, open in front & reaching below the knees असा दिलेला आहे सर्वच स्त्रिया नेहमी डोक्यावरून पदर घेत असत किंवा सर्वदा स्तनांशुक वापरीत असत असें दिसत नाहीं

अंशुकाचा उल्लेख दोनदा आला आहे एकदा आकर्षक अडचण या नात्यानें पट्टांशुकात व एकदा प्रसाद म्हणून देण्यात आलेल्या रक्तांशुकात. पटाहून पट्टांशुक भारी, हें क्र ५२० मधील उल्लेखावरून स्पष्ट दिसतें आपल्या नायिकाना हं उंची वस्त्र परवडत नाहसें दिसतें त्या वापरतात त्यातलें सर्वात तलम वस्त्र दुकूल त्यापैकीं एक इतक्या नाजूक पोताचें आहे कीं त्यातून तिच्या स्तनावरील नखक्षत दिसतें खेडेगावात धडोती वापच जास्त वापरला जाणार हें उघड आहे णिअसण, पटक, वत्थ व सिचय हीं वस्त्रें रोजच्या वापरातली आहेत आपल्या नायिकाना रंगीत वस्त्रें विशेष आवडतात नवरङ्गक वस्त्राचा उल्लेख तीनदा आला आहे नवरङ्गक म्हणजे नवें व म्हणून टवटवीत रंग असलेलें वस्त्र विटल्यामुळें पुन्हा रंगवलेलें असा याचा अर्थ असेल असें दिसत नाहीं क्र ४६१ मधील नवरङ्गक हें नेसतें वस्त्र आहे वेबर सुचवितो त्या प्रमाणें हा उल्लेख कचुकीचा नाहीं क्र २४१ या गाथेची नायिका हलिक स्नुषा असून नवें वस्त्र नेसल्यामुळें ती इतकी फुगली का रस्त्यात मावेनाशी झाली बिचारी अल्पसंतुष्ट होती गावच्या गावात हीच फुशारकी शिवाय कोण्या लुगड्याचा थोडासा चोंगा होतोच सणावाराच्या दिवशीं वायनें देण्या साठीं घरोघर हिंडावयाचें असल्यामुळें या वळी नवीं व रंगीत वस्त्रें नेसण्याचा प्रघात ( क्र ३२८ ) होता या वस्त्राचे रंग कोणत होते याचा खुलासा मिळत नाहीं मात्र हे रंग भक्क ( क्र ४६१ ) होते पट या वस्त्राचा निळा ( क्र ५२० ) आणि अंशुक ( क्र ९६० ) व दुकूल ( क्र ५६९ ) याना लाल

रग दिलेला आहे हे आरक्त वस्त्र नववधूचे आहे क्र. ५४५ मधील कचुकीला कुसुम्बी व क्र ३२० मधील कचुकीला निळा रग आहे. कुसुम्बी हा उत्सवाचा रग आहे, विशेषत मदनोत्सवाचा हिंदुस्थान हें निळीचे मूलस्थान. म्हणूनच निळीला इडिगो हें नाव आहे. येथें निळीचा उपयोग फार प्राचीन काळापासून केला जात आहे हिंदुस्थानातून निर्यात होणाऱ्या निळीचा उल्लेख प्लिनीनें ( XXXV 25 17 ) केलेला आहे. आजही खेड्यापाड्यात मुख्यत निळा व तांबडा हेच रग स्त्रियांच्या वस्त्रांत दिसून येतात, आणि सुसंस्कृत समाजातही. लग्नप्रसगीं वधूवराना लालभडक वस्त्रें (मृच्छ १०.४४) नेमवांत, ऋतुसहारातल्या नववधूनें आरक्त कंचुकी (६.१९) धारण केलेली आहे. उर्वशीनें (विक्रमोर्वशीय ५ ३) व राधेनें (गीतगोविंद निर्णय-सागर पृ ८१) अभिसरणासाठीं नीलाशुक धारण केलेलें आहे. ही वस्त्रें *कशी होतीं ? तीं कशीं नेसलीं जात ?*

*गाथासप्तशतीत उष्णीषाचा, तसाच उत्तरीयाचा उल्लेख नाहीं. समकालीन* शिल्पात हीं वस्त्रें आढळतात येथें मात्र त्याची जागा नेसत्या वस्त्राच्या पदरानें घेतलेली आहे क्र. १६० व २६९ या गाथाल अनुक्रमें वस्त्रार्धान्त व साहुलि याचे उल्लेख आलेले आहेत. कर्पूरमजरीतील नायिकेचा पदर राजानें ओढून धरला, तेव्हा तिनें अग घुसळलें, ती त्याच्या तावडीतून निसटली आणि "वरिष्ठ" तेवढें राजाच्या हातीं राहिलें ( अक ३ ) हें निःसंशय सुटें उत्तरीय आहे. क्र. १६० मधील नायकाची अशी खोळवण झालेली नाहीं, शिवाय येथील उल्लेख वस्त्रार्धान्त असा स्पष्ट आहे. यावरून हा पदर नेसत्या वस्त्राचा असला पाहिजे असें ठरतें क्र २६९ मधील पदर माथ्यावरून घेतलेला आहे. गाथासप्तशतीतील नायिकांचीं वस्त्रें त्यावेळीं तोकडीं होतीं आणि त्यांनीं वस्त्रधारण केलें व मत्स्यान होतें क्र ५०७ व ६०५ या गाथांच्या नायिकांचीं वस्त्रें इतकीं तोकडीं कीं तीं वाऱ्यानें फडफडतांना त्यांच्या जघनाचें दर्शन होतें अजंठ्यातील स्त्रियांचीं वस्त्रें अर्थात तोकडीं आहेत त्यांच्या जघनांचें दर्शन अनिर्बंधित असल्यामुळें या अवयवाचा विशेष पाहण्यासारखें काहीं आहे असें कोणीच मानत नाहीं गाथासप्तशतीत असें प्रसग आवर्जून मांडिलेले आहेत म्हणून ते अपवादात्मक असावेत असें दिसतें क्र २४१ मधील वस्त्र

मान लावरुद असावे असे दिसतें कारण त्याचा बागा झालेला आहे व त हलिकस्तुपेला दुष्प्राप्य असल्याचें तेथें सागितलेलें आहे क्र १६२ या गाथेंतील नायिकेचें वस्त्रधारण इतकें गल्थान की भिक्षेकऱ्याला नाभिदर्शन होतें भरहूत व साची येथाल शिल्पातले वस्त्रधारण ह्याच पद्धतीचें आहे तेथेंही नाभिदर्शन होतें पण तेथें जो नियम तो येथें अपवाद आहे येथें तिऱ्या शैथिल्यावर भावनोद्रेकाची सबब लादण्यात आलेली आहे गाथासप्तशतीत नीवीचा किंवा तत्सदृश वस्त्राचा उल्लेख आलेला नाही सातवाहन कालीन शिल्पात नीवी या वेदकालीन मलवस्त्राचा उपयोग स्त्रीपुरुषानीं केलेला आढळतो या काळात विकच्छ व सकच्छ या दोन्ही परिधानपद्धति प्रचारात होत्या पेशावर संग्रहालयांतील हारीति ( Handbook of Sculptures in the Peshawar Museum Pl VII ) आणि पहिल्या शतकातील अझिलिसेस याच्या नाण्यावरील देवता ( Catalogue of Coins in the Punjab Museum Vol I pl XIII No 334 ) याचें वस्त्रधारण सकच्छ आहे अशी उदाहरणें अन्यत्र ही ( Cunningham Bharhut Tope Pls VIII, XIII, XLV, Fergusson Tree and Serpent Worship Pls XXV, XXXVII Ars Asiatica Vol XVI Pls VI, XI XIV ) आढळतात नागार्जुनीकोंडा ( Archeological Survey Reports 1930 34 Pls 39 40 ) व अजंठा ( Yazdani History of the Deccan Vol I Part VIII Fine Arts ) येथील दासाच्या दर्जाच्या स्त्रियाचें वस्त्रधारण सकच्छ आहे आणि वरिष्ठ वर्गीयाचें विकच्छ कालिदासानें नीवी ही सज्ञा जघनवासस् ( कुमारसंभव १ ३८ ), वस्त्रधारणार्थ करकचलेली रशना ( कुमारसंभव ३ ५७ ६२ ) आणि वस्त्रग्रन्थि ( कुमारसंभव ८ ४ मेघदूत उत्तर ५ ) या अर्थानीं वापरली आहे 'नीवीबन्धोच्छ्वसितशिथिल' या मेघदूतातील श्लोकातील नीवीचा अर्थ मल्लिनाथानें 'वसनग्रन्थि' आणि स्थिरदेवान 'न्यासविशेष' असा दिलेला आहे राजशेखरानें नीवी हा शब्द 'स्त्रियाची गुटिका' ( काव्यमीमांसा ३ ८ ) या अर्थानें वापरलेला आहे गाथासप्तशतींतील ( क्र ६४६ ) वत्थगण्ठि असाच असली पाहिजे क्र ३०१ मधील नायक वस्त्राची गाठ सोडीत आहे, क्र ७१८

मधील नायक मार्ग सापडत नसल्यामुळे गोंधळून गेलेला आहे हा वस्त्र सकच्छ असावींत असें वाटत निश्चित अनुमान करता येत नाही कारण वस्त्रग्रन्थि ही दोन्ही वस्त्रधारणपद्धतीत आवश्यक आहे क्र २८९ व ५०३ या गाथात रजस्वलाची वस्त्रधारणपद्धति सांगितलेली आहे त्यावरून ही उलगडा होत नाहीं फार तर त्या वरचा पदर कमरेभोंवतीं गुंडाळून घेत असत, एवढेंच अनुमान करता येईल दासी व नर्तकी यांचीं वस्त्रें सकच्छ व वरिष्ठ वर्गायाचीं विकच्छ असावींत यावरून अनुमान होतें कीं चपळ हालचालींना अडथळा होऊ नये म्हणून कनिष्ठ वर्गांतील स्त्रियांनी ही पद्धति सुरू केली, त्यांचीं वस्त्रें रुंदात तोकडीं होतीं नतर सौकर्य व सौंदर्य याचा प्रत्यय आल्यामुळें वरिष्ठ वर्गांतील मर्मज्ञ स्त्रियांनाही ( Herringham Ajanta Pls II, X, XI, XIV, XXVIII ) तिचा स्वीकार केला, यामुळें परिधानाची रुढी वाढली नेसत्या वस्त्राची लांबी तोकडी असल्यामुळें सकच्छ परिधान पद्धतीला प्रथम पदराची जोड नव्हती कातकरी, वारली वगैरे वन्य आणि कोळी वगैरे किनारी जमातींतल्या स्त्रिया हल्ला नेसतात तशी वस्त्रधारणपद्धति गाथासप्तशतीच्या काळात प्रचलित असावी असें वाटतें हीं वस्त्रें नितंबावर घट्ट बसतात त्याच्या अग्राची गाठ ओटीपोटावर असते आणि वाऱ्याच्या झोतावरोवर वस्त्र फडफडलें का मांड्या उघड्या दिसतात

खरें पाहिलें असता उल्लेखाच्या संख्येच्या अनुरोधानें कञ्चुकीचा विषय प्रथम हातीं घ्यावयाचा पण हें वस्त्र उत्तरीय, शिवाय उत्तरकालीन, म्हणून त्याची चर्चा अखेरीस घेतली आहे

समकालीन शिल्पांतील अनेक स्त्रियांचे स्तन विवस्त्र असल्याचे आढळतें विवस्त्र प्रतिकृतींचें दर्शन व प्रदर्शन प्राचीन भारतीयांना असभ्य किंवा अश्लील वाटत नसे ( Fergusson Tree and Serpent Worship pp 102 103 ) स्तन हें मातृत्वाचें प्रतीक असल्यामुळें त्यांच्या विवस्त्र प्रदर्शनात शिष्टाचाराचा भग होत नाहीं असा प्राचीन शिल्पकारांचा सकेत होता ( Altekar Dress and Ornaments of Hindu Women Journal of the Benares Hindu University Vol II No 3 p 408 ) तत्कालीन स्त्रिया विवस्त्र अवस्थेंत वावरत असाव्यात असें धनु

मान आपल्याला त्यावरून काढता येणार नाही या शिल्पावरील वस्त्रें रंगात दाखविलेलीं असावात, असें त्याचें समर्थन करावें तर अजंठ्याच्या चित्रपटात फक्त नीवी धारण करून मिश्र समाजात वावरणाऱ्या स्त्रिया दृष्टोत्पत्तीस येतात गाथासप्तशतींतील सर्वच स्त्रिया आणि सर्वदा कञ्चुकी धारण करीत होत्या असें दिसत नाही गलितयौवनाच्या उदरपतित व निराधार पयोधराचा उल्लेख क्र ६५७ या गाथेंत आहे वृद्धा नारी अनिर्बन्धा ! क्र १४५, १५०, ६७४ व ८०७ या गाथाच्या नायिका तरुणी आहेत व त्याचे स्तन विवस्त्र आहेत घरात-कामकाजांत, माजघरात व अंतर्गृहात कञ्चुकी वापरण्याचा प्रघात नसावा असें या उल्लेखावरून वाटत क्र ३६९ मधील उल्लेख घराबाहेरचा असावा असें सकृद्दर्शनीं भासतें, पण तो तसा नसावा असा भोंवतालच्या परिस्थिती वरून निष्कर्ष निघतो क्र ८५७ मधील उल्लेख मात्र निःसंशय घराबाहेरचा आहे नेसत्या वस्त्राप्रमाणें तत्कालीन कचुकी ही तोकडी असावी, कारण कृष्ण-मेघातून चंद्रबिंब थोडेसें बाहेर पडावें, तशी नीलकञ्चुकींतून डोकावणारी स्तनाची कोर शोभत आहे असा उल्लेख क्र ३९५ या गाथेंत आलेला आहे पण शाकुन्तलातील सूचनेप्रमाणें हा दोष नायिकेच्या वर्धिष्णु यौवनाचाही असणें संभवनीय आहे स्त्रियाना उत्सवप्रसंगीं अलंकारानीं सजून मिरवण्याची हौस असते क्र ५४५ या गाथेची नायिका ग्रामतरुणी असून अलकाराचे अभावामुळें खट्टू झालेली आहे पण तिचे स्तन पुष्ट होते आणि त्यावर कसलेली कञ्चुकी कुसुम्बी होती काहीं गुण सोन्याचा व काहीं सवागांचा ! हें यौवनाचें ऊमटशीत आभरण अगा असल्यावर त्यावर आणखी अलंकार कशाला ? नाहीं तर ' निन्दति कञ्चुककार प्राय शुष्कस्तनी नारी ' ' या वयात अलंकाराची हौस असते हें खरें, पण त्याची अडचणही ( क्र ४२९,९८८ ) याच वयात विशेष जाणवते या कञ्चुकीची कटाई कशी होती याचा खुलासा क्र ६२० या गाथेंत मिळतो नायिकेनें निळ्या गडद रंगाची कञ्चुकी धारण केलेली आहे कवि सांगतो, या कञ्चुकीच्या आवरणातून मोकळ्या राहिलेल्या दुबोटी फटा-तून जणु ती आपल्या यौवनाचा नमुना रसिकाना दाखवीत आहे यावरून दिसतें कीं ही कञ्चुकी मराठी चोळीसारखी असावी कारण, चोळीला असताल तसे पान नसल्यामुळे कांचोळीला मध्य फट नसते गडडगड्ही या प्राकृत काव्यात अगाच उल्लेख आहे

थण-मज्झ-च्छवि-तार कुप्पासन्तरमणङ्गणासम्मि ।
उद्धव लोयण तिणयणस्स वन्दीकय जाहिं ॥ ७५७ ॥

या कचुकीचे बद बाधल्यानतर मध्ये मोकळ्या राहिलेल्या स्थलाला शकराच्या तृतीय नेत्राचा उपमा दिलेली आहे तिच्या वक्षस्थलावर ठसठशीत तीळ होता का इद्रनील जडवलेलें पदक रुळत होते तें न कळे या कचुकात व आपल्या चोळात फरक इतकाच की स्त्रिया अग्राना बद आहेत आणि चोळीच्या पाठच्या अग्रानाच गाठ मारलेली असते क्र ६७२ मधील कचुकी कुडत्या-सारखी शिवलेली असल्यामुळे ती डोक्यावरून काढावी घालावी लागते, म्हणूनच येथें ती काढतांना नायिकच्या मुखचद्राच्या सर्व कलाचे दर्शन झालेलें आहे

काचोळी, चोळी इत्यादि नावानें ओळखलीं जाणारा स्तनाशुक वापरण्याची प्रथा आपण शकापासून घेतलेली आहे असा काही सशोधकाचा अभिप्राय आहे ( The Vakataka Age p 153 ) बॅक्ट्रियात या वस्त्राला अद्याप चोल हा शब्द प्रचारात आहे ( Moti Chandra Indian Costume from the Ferliest Times p 44 ) स्कन्धावर सूक्ष्मग्रन्थि असलेल्या वल्कलाचा उल्लेख शाकुन्तलात ( १ १९ ) आलेला आहे भरहूत ( Cunningham Bharhut Tope fig XV ) व साची ( Cataogue of the Museum Pl XXIII ) येथील दासींच्या दर्जाच्या स्त्रियांनी चोळ्या चढविलेल्या आहेत अजठा येथील दरबारी नर्तकीने लाब बाह्याचें कुडतें घातलेलें आहे (Yazdani Indiani Art of the Buddhist Period Pl XVI) मालतीमाधवातील रेशमी चोलक ( ६ ० ८३-८५ ) ह्स्यासारखे लाब आहे गाथासप्तशतातील कञ्चुकी मात्र तग आहे असे क्र ५४५ मधील उल्लेखावरून दिसतें स्तनाच्या उठावाच्या अनुरोधानें शिवलेली तटतटीत चोळी ही भारतीय स्त्रियाच्या वपभूषेला महाराष्ट्राची देणगी आहे

५ अलंकार ।

**मर्दानी** · अवअस = अवतम ( जम्बूदल ) = १८०, आहरण = आभरण (श्री सहोदर रत्न ) ९८२ कञ्कण (वासुकि) ६९ , कोत्थुह = कौस्तुभ १५१, ९८२, सेहर = शेखर १६

जनाना = अवगम (सिहिपेहुण = मोरपीस) १७३, आहरण (कुवलअ =) ८८०, ओमालिआ = अवमालिका १९४, कण्ठिआ = कण्ठिका (पोम्मराअ = पद्मराग माणिक, मरगअ = मरकत पाचू) ७०, कणअडोर = सोन्याचा करगोटा ८११, कण्णऊरउप्पल = कर्णपूरोत्पल : १७६, कण्णगअचूअमंजरि = मोहोराची मंजिरी ८२०, कण्णरइअ कुवलअ = कर्णरचित कुवलय ३२३, कण्णवअस = कर्णावतंस ४३९, कण्णाहरण = कर्णाभरण (इदणील = इंद्रनीळाचे फूल) २०२, कण्णुप्पल = कर्णोत्पल ७१९, कुंण्डल (कणअ = कनक- ) ३९८,४४६, णेउर = नूपुर १८८, ताल्वेण्ट = ताम्बून्त ३९८, धम्मिल = गजरा घातलेला खोपा ९९०, पसाहण = प्रसाधन (गअमो त्तिअरइअ = गजमौत्तिकरचित ) १७३, मण्डण = मण्डन (वेहव्व = वैधव्य व सोहग्ग = सौभाग्य) ६३३, मेहल = मेखला (कसणमणि = कृष्णमणि मेखला) ५७४, मेहलिआ = मेखलिका ४६३, मोहणपिंछि मोहन पिच्छिका = मोरपीस. ५७२, वलअ = वलय ७८०, ८९६, ९२२, अविहवलक्खण = अविधवालक्षण ५३९, जालवलअ जालवलय ८० वलअसद्द वलयशब्द २८३, ३९२, ६८३, ९५३, वेहव्वमण्डण = वैधव्यमण्डन ६२३, सिढिल वलअ = शिथिलवलय १३३, २०५, ४५३, ४९३, ७८०, सोहग्गअ = सौभाग्यक ६३३, हार = ४२९,९८८, ९९०, हारलता ४४६

वस्त्राची लांबीरुंदी व त्यासाठीं वापरण्यात येणारा कच्चा माल, त्याचा पोत व त्यावरील जरतारी काम आणि त्यांवर होणारे सूचिसंस्कार यावरून तीं वापरणाऱ्या व्यक्तींच्या व त्या वापरीत असलेल्या समाजाच्या सांपत्तिक व सांस्कृतिक स्थितीबद्दल अनुमानें काढता येतात हा ज्या परिमाणावरून काढण्यात येतात तोच अलंकारानाही लागू पडतात अलंकार व त्यांची विविधता त्यासाठी वापरण्यात येणारे धातुरत्नादि पदार्थ आणि त्यावरील कुसर इत्यादि साधनांवरून अनेक अनुमानें काढता येतात

भारतीयांची अलंकारांची आवड सुप्रसिद्ध आहे गेल्या शतकात तर ती कुप्रसिद्ध मानण्याइतकी सुशिक्षितांची मजल गेली होती वैदिक व बौद्ध वाङ्मय आणि रामायण महाभारतादि आद्य आधार ग्रंथ यांत स्त्रीपुरुषांच्या

अनेक अल्काराचे उल्लेख आलेले आहेत त्यांतील अनेक सज्ञाचा आता आपणास स्पष्ट अर्थबोधही होत नाही अलीकडे जागोजाग झालेल्या उत्खननात काचेचे, सुवर्णाचे व रत्नजडित असे अनेक अल्कार मिळालेले आहेत शिवाय बौद्ध शिल्यावरून तत्कालीन अलकाराबद्दल स्पष्ट कल्पना होऊ शकते नाट्यशास्त्रांत (२१ १०–१२) प्रथम मालाभरणाचें विवरण करून नतर अल्कारायद्दल भरत सागतो

चतुर्विध तु विज्ञेय देहस्याभरण बुधैः ।
आवेध्य बन्धनीय च प्रक्षेप्यारोप्यके तथा ॥

अलकार चार प्रकारचे असतात १ आविध्य–शरीराच्या वेधावर धारण करावयाचे–कुण्डलादि, २ बन्धनीय–श्रोणिसूत्रादि, ३ प्रक्षेप्य–नूपुरादि, ४ आरोप्य–हेमसूत्रादि अल्काराच्या या सर्व जाती गाथासप्तशतींत आढळतात

गाथासप्तशतींत आढळणारे मर्दांनी अल्कार फक्त देवादिकानां धारण केलेत आहेत क्र १६ मधील मुकुट गगनानें धारण केलेला आहे हा मुकुट रत्नखचित नसावा, शिरावर धारण केलेला शुभ्र पुष्पाचा गुच्छ असावा, असें सदर्भावरून दिसतें अथर्ववेदात (५ १३८ ३) कुभाकार शीर्षालकाराचा उल्लेख आहे कौस्तुभ (क्र १११) हें श्री-सहोदर रत्न (क्र ९८२) समुद्र मथनातून प्राप्त झाले व तें विष्णूनें हृदयावर धारण केलें, त्याचें तेज सूर्यासमान आहे वासुकीचें ककण पशुपतीनें (क्र. ६९) धारण केलेलें आहे वासुकि हा कश्यप व कद्रु याचा पुत्र आणि सर्पांचा अधिपति, हा शकराच्या शरीरावर असतो क्र १८० च्या हलिक नायकानें कानावर आमळाची डिक्शी ठेवलेली आहे वस्तुत हा अल्कार नाहीं सकत स्थानाची आलकारिक सूचना आहे

यावरून दिसतें कीं गाथासप्तशतीतले पुरुष ग्रामीण व साधेसुधे आहेत सम कालीन दक्षिणी शिल्पातील पुरुषानीही एवढेच अलकार धारण केलेले आहेत, कार्ले, कोंडाण व बेडस येथील पुरुष मूर्तीच्या अगावर एवढेच अल्कार आढळतात उत्तरकालीन भित्तिचित्रात शिल्पात व साहित्यात मात्र विविध व प्रभूत मर्दांनी अलकार दिसतात

पुरुषाच्यापेक्षा स्त्रियाच्या अलकारात अधिक महाहता, रसिकता व विविधता दिसून येते शरिराचा जो जो भाग अलकारानीं सजविण्याजोगा तो तो

गाथानायिकांनी विविध आभरणांनी अलकृत केलेले आहे अलकार धारण करावयाचे ते केवळ पतीऱ्या प्रसन्नतेसाठी, अशी त कालीन स्त्रियांची भावना होती, म्हणूनच प्रोषितपतिका अलकार धारण करीत नाहीत, सकेताप्रमाणे प्रियकर आला नाही म्हणने नायिकेला अलकार धारण निष्फळ वाटते आणि अवमानितेला अगावरील अलकार बळी देण्यासाठी सजविलेल्या रेड्याच्या गळ्यातील माळासारखे वाटतात।

कटदोरा, कुण्डल व हार हे अलकार सुवर्णाचे आहेत, पैकी काही कुण्डलें व हार रत्नखचित आहेत क्र ३०२ मधील डूल इन्द्रनीलाचे आहेत क्र ७५ मधील कण्ठिकेंत पाचू व माणकें जडविलेली आहेत क्र ८० मधील जाळवलय सुवर्णाचेंच असलें पाहिजे क्र १८८ व १९० मधील हार सोन्यामोत्याचे आहेत क्र १८८ मधील नूपुर रुप्याचे असावेत क्र १७३ मधील नायिकेच्या सवतांना धारण केलेल्या अलकारात गजगण्डस्थळातील मोती जडविलेली आहेत व्याधाना असी मोत्यें शिकारात उपलब्ध होतात असा कविसकेत आहे जगलात मोती गुजांच्या जोडीनें सापडतात (क्र ३१० ) अशी सामान्य जनाची समजूत होती तरीही गाथासप्तशतींत गुजानाच मोती म्हटलेले आहे असें विधान करता येणार नाही षड्विंश ब्राह्मणात ( ५ ६ ) मोत्याचा उल्लेख आहे क्र २ या गाथेंत मोत्याच्या शिंपलीचा उल्लेख आहे पाचूच्या सुईनें मोत्याना वेध घेण्याच्या प्रथेचा उल्लेख क्र ३९४ या गाथेंत आलेला आहे अर्थात् गाथासप्तशतीच्या काळात मोती व त्यापासून सिद्ध केलेले अलकार अस्तित्वात होते हें निश्चित पण त्याच्या उपलब्धीचीं स्थानें सामान्य जनाना माहीत नव्हता क्र ५७४ मधील मेखला कृष्णमण्यांची आहे विशिष्ट जातीच्या प्रस्तर खण्डाना घासून इष्ट तो मण्याचा आकार द्यावयाचा, नतर त्यावर इष्ट वर्णाला अनुकूल अशी रासायनिक क्रिया करावयाची, अखेर ते भट्टींत भाजावयाचे व क्रमाने उतरतील ते मणि अलकारात वापरावयाचे अशी प्रथा त्या काळीं प्रचलित होती वन्य जमातातच नव्हे नागरिकातही या मेखलेंतील मणि ह्याच पद्धतीनें सिद्ध केलेले असावेत

क्र १७३ व ५७२ या गाथांच्या नायिकाना केशपाशात आघाडीला मोहक मोरपीस खोचलेले आहे क्र ९९२ च्या नायिकेनें खोप्यावर गजरा घातला

आहे क्र १७०, ३२३ व ७१९ या गाथान्या नायिकानी कानावर छोटा चमळे ठेवलेलां आहेत, आणि कोणी आम्रमजरी ( क्र ८०० ) तर कोणी ताल वृन्त ( क्र ३९८ ) धारण केलेले आहेत यातूनच शिरोभार्गी धारण करावयाचे उत्तरकालीन अल्कार उत्क्रात झाल्ले आहेत सह्याद्रीतल्या वन्य जमाती असे अल्कार आजही धारण करतात

कोंडाण्यान्या लेण्यातील स्त्रियानी जवळजवळ स्कधापर्यंत रुळणारे उष्णीष धारण केलेलें आहे सबब येथें शीर्षालकाराना वाव नाही कार्ल्यान्या लेण्या तील स्त्रियानी चद्रकोर व बिंदी यासारखे शीर्षावतस व वर्तुलाकार कुण्डलें धारण केलेली आहेत झाली ती क्रान्ति दरम्यानच्या कालात झालेली असावी गाथासप्तशतीतील सुगधित निकुरभार ( क्र ५७० ), शीर्षावतस ( क्र १७३ ) व धम्मिल्ल ( क्र ९९२ ) हीं आभरणें या क्रान्तीचा द्योतक आहेत कालिदासानें उल्लेखिलेली ( कुमारसभव १४, मेघदूत उत्तर ११ ) मुक्ताजाल व रत्नजाल हा शीर्षाभरणें आणखी उत्तरकालीन आहेत या दोन्ही लेण्यातील स्त्रियानीं कण्ठिका, वलय, मेखला व नूपुर हे अल्कार धारण केलेल आहेत त्यानीं लमाणी धर्ताची वलयाची चवड चढविलेली आहे व त्याचे नूपुर वाळ्याच्या धर्ताचे आहेत गाथासप्तशतात आढळतात तसे शिखिपिच्छावतस व धम्मिल्ल अजट्यान्या भित्तिचित्रात पहावयास मिळतात येथील क्र १ या लेण्यातील पाठमोऱ्या स्त्रीनें अबाड्यावर गजरा चढविलेला आहे आणि क्र १० या लेण्यातील स्त्रियानी सीमतस्थानी मारपिसे लावलेली आहेत कोणी कॅमात अनेक अल्कार गुफले आहेत कोणी बाजूबद बाधले आहेत व कोणी वलयाना घुगुर लावले आहेत हे अल्कार नि सशय उत्तरकालीन आहेत

कानाच्या पाळ्याना वेध घेऊन त्यात अल्कार अडकविण्याची प्रथा बरीच प्राचीन आहे शरीरस्वास्थ्यासाठीं कानाच्या पाळीला वेध घेऊन त्यात औषधी मुळी बसविण्याची योजना सुश्रुतात सागितलेली आहे कर्णछिद्रे व कर्णाल्कार याचा दृष्टीवर चागला परिणाम होतो हें आता सशोधकाना मान्य होऊ लागलें आहे क्र ७२० या गाथेंत कर्णछिद्राचा उल्लेख आलेला आहे मौर्य-सातवाहन-कालीन शिल्पातील कुण्डलें जड व वर्तुलाकार आहेत मग हा बोजडपणा शिल्पाचा असो किंवा अल्काराचा गाथासप्तशतीतील कर्णाभर

त्या मानान नाजूक आहेत त्यात रत्नेही जडविलेली आहेत कर्णाभरणातील रत्नान्या प्रभेच्या परावर्तनामुळे कपोलाना प्राप्त होणाऱ्या शोभेची कवाना व रसिकाना पूर्ण जाणीव होती

मौर्य–सातवाहनकालीन मूर्तींच्या मनगटावरील वलयें जाडजूड आहेत आणि त्याची सख्याही मोठी आहे तीं हलक्या वजनाची, भारी धातूची व पोकळ असावीत गाथासप्तशतीतील वलयें नाजूक व सैल आहेत विरहात तीं शिथिल होतात आणि अगविक्षेपासरशीं सशब्द होतात वकणरव ही एक काव्य कणिकाच आहे ! क ४३८ मधील वलयें प्रेमप्रसगात पिचलीं आहेत तीं काचेचीच असला पाहिजेत मौर्य–सातवाहनकालीन काचेच्या रगीबेरगी बागड्याचे तुकडे उत्खननात जागोजाग मिळालेले आहेत

क ८० मधील जालवलयाचा अर्थ गगाधरानें ' केशसमार्जिनी ' – फणी असा दिलेला आहे श्री राजारामशास्त्री भागवतानीं तो स्वीकारलेला आहे पडित मथुरानाथ शास्त्री यानीं ' जालप्रधान वलयम् '– करकङ्कण असा अर्थ दिला आहे श्री शिवराममूर्ति ( Amaravati Sculptures p 112 ) यानींही ' जाळीची बागडी असाच अर्थ घेतलेला आहे मीं हाच अर्थ घेतलेला आहे गाथेतील सदर्भ आहे तो असा नायिका न्हात आहे, न्हाण्याला बसण्यापूर्वी तिनें अगाला हळद लावली हाती, पाण्याबरोबर ती ओघळली व जालवलयात अडकून बसली, तेव्हा तिनें एक किल्ची घेतली व बागडींत अडकलेली हळद कोरून काढली न्हाण्यापूर्वी हरिद्रा अगाला लावतात, केसांना लावीत नाहीत केसाना क्वचित प्रसगीं उटणीं लावतात, पण त्यात हरिद्रा मिसळलेली नसते सामान्यत वरिष्ठ वर्गातील स्त्रिया न्हाताना फणी घेऊन बसत नाहात किंवा फणीचा उपयोग करीत नाहींत बहुजनसमाजातील स्त्रिया मात्र हातीं फणी असल्याशिवाय न्हात नाहींत स्त्रिया न्हाताना सामान्यत जाळीच्या बांगड्या काढून ठेवतात हें खरें, पण त्या तशाच राहिलेल्या असल्या तर त्याच्या जाळींत दडावरून ओघळलेल्या हरिद्रेच अवशेप अडकून राहणार हें उघड आहे बाणाच्या चाण्डालकन्येचें वलय रत्नखचित आहे अडकलेला मळ काढण्यासाठीं रत्नखचित किंवा जाळीच्या बागड्या वेळोवेळीं किल्चीनें किंवा राठ केसाच्या वातेकेनें साफ कराव्या लागतात

क्र ४६३ मधील मेखलिका जघनावर ओघळलेली आहे कार्ल्यांच्या लेण्यातील अवनिकेवरील स्त्रियांच्या मेखला अशाच आहेत या मेखला गोल मण्यांच्या व पाच पदरी आहेत वज्रटीकेचे सर एकमेकापासून अलग होऊ नयेत म्हणून ते आतल्या आगच्या गादीला शिवलेले असतात तशीच योजना मेखलेच्या सरासाठी केलेली असावी मेखला आणखी खाला ओघळू नये म्हणून आघाडीच्या पदकात गुफलेले आणखी काही सर कमरेवरून घेण्यात येत असत, असे कार्ल्यांच्या लेण्यातील नृत्ययुग्मावरून स्पष्ट दिसते उत्तरकालात या मेखला रत्नखचित व रुणझुणणाऱ्या झाल्या क्र २११ मधील नायिकेने कनकडोर धारण केलेला आहे नेसत्या वस्त्राची ग्रथि, निऱ्याचे आघाडीचे केळे किंवा कासोट्याची पट्टी कडदोऱ्याला फिरकी देऊन पक्की केलेली असते सपन्न ग्रामीण तरुण व क्वचित् उनाड ग्रामीण नर्तिका असे कडदोरे हल्लीही धारण करतात

## ६ आरोग्य

गाथासप्तशतीतील जनता सामान्यत निरोगी आहे जर=ज्वर (क्र ५०, ५१, २५९, ८०८) आणि सलोहिय पित्त = रक्तपित्त (क्र ५६२) या दोनच आजाराचे उल्लेख आलेले आहेत ज्वरामुळे क्र ५१ च्या नायिकेच्या अगाला दुर्गंध येत आहे तिला हा ज्वर अपचनामुळ, अमाशामुळे अगर जागरणामुळ आलेला आहे सारखी तहान लागणे, अगाची लाही होणे, अगावर वारवार काटा उभा राहणे, अन्नावर वासना नसणे व जीव कासावीस होणे ही मुरलेल्या ज्वराची लक्षणं क्र ८०८ या गाथत नमूद केलेली आहेत वस्तुत ही लक्षण कामज्वराची आहेत क्र २५९ मधील ज्वराचा उल्लेख आजाराचा द्योतक नसून लैङ्गिक सुखप्राप्तीच्या दृष्टीने केलेला आहे क्र ६६७ मध्ये रातांधळ्याचा उल्लेख आहे ही विकृति मोठी सोईस्कर आहे विशेषत प्रवासात परगृहा पथारी पसरणाऱ्या पाहुण्याना सोईस्कर कारण व्याधि आहे म्हटले तर आहे नाही म्हटले तर नाही रोगाचा पुरावा काहीच नाही आणि त्यावर औषधही नाही पण त्याची लक्षणे मात्र मोठी अवलक्षणी! प्राचीन व मध्ययुगीन प्राकृत व सस्कृत कवीनी या लक्षणावरून या विकृतीला सक्ताचे स्वरूप दिलेले आहे रत्तिअधिअ याचा अर्थ कामाध असाही घेता येईल पाहुण्याचे लक्षण पाहून नायिकेने व्याधीचे निदान केले! रुग्णाचा समाचार हा शिष्टाचार

(क्र १०, ११, ३१७) पाळला जात असे गाथासप्तशतीत सर्प पुष्कळ आहेत विषारी सर्पही आहेत पण त्यांनी कोणाला दंश केल्याचे नाही क्र २३७ मध्ये नायिकेला विंचू चावला आहे, दरवाजावर, दरवाजाच्या बाहीला टेकून विचारी कोणाची तरी वाट पहात होती तेवढ्यात या दुष्टाने दावा साधला! की कर्णोत्यात विंचू आहे हें पाहून तिनें संधि साधली? दोन्ही हात झटकणें हें मात्र डाग आहे

गाथासप्तशतीत वैद्य (क्र २३७, ३६३ ६००, ८०८) आहेत सामान्यत रुग्णाना वैद्याकडे (क्र २३७) नेतात दरिद्री गावात (क्र ६००) वैद्य नसावेत असें दिसतें औषधांपैकीं (क्र २७०, ३१७, ३३६, ४५८, ५५०, ८४१) संजीवनौषधि (क्र ३३६) सांकेतिक आहे आणि जखमेवरील पट्टी (क्र ४५८) सूचित आहे जखमेवर भस्म आणि रसव्याधावर मदिरा हीं औषधें सर्वांना माहीत होतीं क्र ३१७ मधील उल्लेखावरून दिसतें कीं रुग्णाला काढा गरम करून देत असत आणि पिण्याला तापवून गार केलेलें पाणी (क्र ५३) देत असत क्र ८४१ मधील रसायन कामोत्तेजक असावें असें वाटतें कारण त्यामुळें चित्त अस्वस्थ झालेलें आहे

## जाती व जातीयता

जात म्हणजे जन्मसिद्ध गट, वर्ण, वास्तव्य व व्यवसाय आणि श्रुति, स्मृति व संस्कृति यांशीं संबद्ध जातीयता म्हणजे एतद्विषयक अभिनिवेश व अनेक स्वरूपात व्यक्त होणारी श्रेष्ठ कनिष्ठ भावना

समाजाचें अस्तित्व व स्वास्थ्य सहजीवनावर अवलंबून असल्यामुळें या भावना सामान्यत सुप्तावस्थेत असतात स्पर्धेमुळें सहजीवनाचा तोल ढळतो तेव्हा त्या व्यक्त होतात

सामान्यत लोकवाङ्मयात असे विषय उल्लेखिले किंवा चर्चिले जात नाहीत अधून मधून अस्पष्ट व ओझरते उल्लेख होतात, अभावितपणें सुचालीसाठीं किंवा वेदना व्यक्त करण्यासाठीं

यदिच या ग्रंथात चातुर्वर्ण्यसिद्धान्त आहे, आणि स्पर्धाजन्य श्रेष्ठकनिष्ठ भाव हीं पण समाजाचें जातींत वर्गीकरण झालेलें नाहीं पुढें वसाहतींचें क्षेत्र विस्तृत

झाले, पाखंडाची स्पर्धा जाणवू लागली, परस्थाचा आक्रमणें आला व हिंदी धर्माचा स्वीकार करून स्थिरावला यामुळे समाजाचे स्वरूप विराट् व सकीर्ण झालें आणि विविध समस्या निर्माण झाल्या अशा परिस्थितीत व तिच्या अनुरोधानें, स्मृतिकारानीं अनेक योजना आखल्या मूलत त्या सकल्नात्मक होत्या, पण विकृत परिस्थितीमुळें त्याचें पर्यवसान विघटनेंत झालें मूलभूत चातुर्वर्ण्य सिद्धान्तातून सकर-सिद्धान्त निर्माण झाला मूलत हा सिद्धान्तही भिन्न व मिश्र जातीयाना चातुर्वर्ण्यात व आर्य सस्कृतीच्या कक्षेत समाविष्ट करण्यासाठीच प्रतिपादन करण्यात आलेला असावा परतु परिस्थितीच्या प्रादुर्भावामुळें, सकराच्या सभाव्य परिणामाच्या धास्तीमुळें आणि पोटभरू भिक्षुकाच्या हेकटपणामुळें जातींच्या मर्यादा अलघ्य झाल्या आणि वर्गीकरणाचें पर्यवसान विभक्तीकरणात झालें

पुरातत्त्वभूषण श्री राजवाडे यानीं राधामाधवविलासचपूच्या प्रस्तावनेंत पाणिनि ( शकपूर्व सुमारें १००० ) व पतजलि ( शकपूर्व सुमारें २०० ) याच्या काळातली सामाजिक परिस्थिति विस्ताराने वर्णिली आहे ती येथें कारणापुरती व सक्षेपानें देतों

पाणिनीच्या काळा चार वर्ण होते, परतु ते पक्के जाति झाले नव्हते षट्कर्माधिकारी ब्राह्मण हे राजाचे पुरोहित असत, प्रसगविशेषीं ते राजाना पदच्युत किंवा पदाधिष्ठित करीत सर्वच ब्राह्मण कुलशीलवान्, विद्वान् किंवा अग्निकर्मरत नसत क्षत्रिय हा सामान्य वाचक शब्द असून राजन्य हा अभिषिक्तवश्य क्षत्रियाचा वाचक असे क्षत्रियाचा एकच धदा, देशसरक्षण करण्यासाठीं लढण्याचा पुरोहिताचें जें प्रवराध्यायप्रसिद्ध गोत्र तेंच क्षत्रियाचें असे कृषि, पाशुपाल्य व वाणिज्य हे त्रिकर्माधिकारी वैश्याचे धदे शूद्र केवळ उच्च प्रकारचे पशु गणले जात शूद्र दोन प्रकारचे असत अनिरवसित म्हणजे आत येण्याचे नि शेष बद न केलेले चातुर्वर्ण्यात अशत समाविष्ट केलेले, समाजाच्या कमीजास्त उपयोगी पडणारे उदा सुतार, लोहार वगैरे, निरवसित, आत येण्याचे नि शेष बद केलेले समाजाच्या उपयोगी न पडणारे उदा चडाल, निषाद वगैरे वश दोन प्रकारचे असत मातृवश व पितृवश, पैकी मातृवशपद्धति कुत्सित मानली जाऊ लागली होती अनार्य व अब्राह्मण स्त्रियात

आर्य व ब्राह्मण करून घेण्याची चाल पाणिनीय कालाच्या पूर्वी केव्हा तरी अस्तित्वात होती सपत्नीकत्वाची चाल होती शूद्र वर्णांतील स्त्रीला इतर वर्ण भार्या करीत ब्राह्मण स्त्रीला क्षत्रिय व वैश्य भार्या करीत वर्णबाह्य भार्यांना पत्नी हें सन्मान्य पद मिळत नसे पत्नीला यज्ञकर्मात पतीच्या बरोबरीनें सहाधिकार असे वर्गावर्गांतील संबंध गौण समजला जाऊं लागला होता, पण संकरजाति स्वतंत्रपणें अस्तित्वात आल्या नव्हत्या सामान्यत चातुर्वर्णिक समाज ब्राह्मणाचा अनुयायी होता पाणिनि व पतंजलि याच्या दरम्यानच्या काळात सामाजिक परिस्थितीत ठळक फेरफार झाले, बौद्ध जैन वगैरे सनातन धर्मद्वेष्ट्या लोकाचा समाजात सुळसुळाट झाला क्षत्रियवैश्यापकी काही बुद्ध-जिनानुयायी बनले आणि काहीं यज्ञादि वैदिक क्रियाचा लोप झाल्यामुळें वृषल, म्हणजे शूद्रसम बनले क्रियाकर्मांतर व धर्मधर्मांतर या बाबतीत जे परिवर्तन झालें त्याचा मुळें स्त्रिया व शूद्र याच्याशीं ब्राह्मणक्षत्रियवैश्यादि त्रैवर्णिकाचे शेंकडीं वर्षं जें वर्तन घडत येत होतें त्यात गुरफटलेली आहेत अनार्यांचा समूळ विध्वंस अशक्य आहे हें आर्यांच्या प्रत्ययास आलें काहीं अनार्य आर्यांच्या उपयोगी पडतात व आर्यधर्माविषयी आदर बाळगतात हें निदर्शनास आल्यावर आर्यांनीं शूद्राला वर्णव्यवस्थेंत नियतस्थान दिलें, याहून जास्त लगट राजरोस करू दिली नाहीं त्रैवर्णिक स्त्रीकडे त्यानें डोळे वर करून पाहिल्लेंही खपत नसे कालांतरानें या दुरीभावात फरक पडला तोंड वैश्यद्वारां पडलें घरीदारा, शेतवाडींत, हाटबाजारात सर्व व्यवहार शूद्र साहाय्यानें होई अर्थात् शूद्रातील नरमाद्यांचा वैश्यगृहातील स्त्रीपुरुषांशीं एकान्तीं लोकान्तीं संबंध पडे आणि अधर्म्य शरीरसंबंध होई ब्राह्मण क्षत्रिय समाजात हा चोरटा व्यवहार थट्टेचा विषय होऊन बसला होता अश्वमेधाची प्रक्रिया चालू असता क्षत्ता म्हणतो शूद्रीण वैश्याशीं चोरून रत होते, तेव्हा तिचें समाधान म्हणून होत नाहीं, यावर पालागली म्हणते शूद्र पुरुष वैश्य स्त्रीशा रममाण होतो तेव्हा त्याची तरी तृप्ति कोठें होते? कालांतरानें या असद्व्यवहाराचा फैलाव क्षत्रियात व ब्राह्मणातहि पसरला हें पाहून तत्कालीन प्रशासकानीं त्रैवर्णिकाना शूद्रस्त्रियाशीं विवाह करण्याची परवानगी दिली पाणिनी काळापर्यंत त्याचीं अपत्यें पितृजातीय समजत यामुळें पितृसवर्ण शुक्र व मातृसवर्ण कृष्ण असे दोन

रंगाचे ब्राह्मण दिसू लागले कृष्ण वर्णायाचा कैवारी वैशंपायन आणि शुक्रवर्णी याचा पुरस्कर्ता याज्ञवल्क्य या मामेभाच्याची स्पर्धा हें ब्राह्मणातील या दोन वर्णांच्या वमनस्याचें व स्पर्धेचें प्रतीक आहे हें भाडण पाणिनीपूर्वी नुकतेंच घडलें असावें पुढें जैन बौद्धानीं चातुर्वर्ण्यव्यवस्था मोडून सर्वांची एकजात व एकमता करण्याचा उपदेश व उद्योग आरभला, यज्ञयागाना दुष्ट ठरविलें, शूद्रादि लोकाना न समजणाऱ्या सस्कृत भाषेला फाट दिला आणि समजणाऱ्या प्राकृत भाषाचा पुरस्कार केला आणि शुद्ध त्रैवर्णिकाची व सामान्य प्राकृत जनतेची ताटातूट करून टाकली बहिष्कारामुळें बाद्धाऱ्या सख्येंत भर पडू लागली म्हणून त्रैवर्णिकानीं निष्कासनाचा मार्ग न धरता शूद्रनियमनाचा उपाय पत्करला आणि शूद्रस्त्रीजन्य अपत्यें पितृसवर्ण न समजता मातृसवर्ण मानावात असा कायदा केला पण कमीपणा येतो म्हणून मातृवर्णही त्याना आपल्यात सामील करून घेईना म्हणून स्वतंत्र जाति निर्माण झाल्या साम्राज्य सत्ता शूद्रवर्णा नदाच्या हातां गेली तेव्हा ब्राह्मणसस्कृतीची दैना झाला उपल मौर्यांच्या अमदानींत बौद्ध धर्माला राजसत्तेचा पाठिंबा मिळाला शुग, काण्वायन व शातवाहन या घराण्याच्या राजवटात ब्राह्मणधर्मानें डोकें वर काढलें व गुप्ताच्या कारकीर्दीत बौद्ध धर्मावर पूर्ण विजय मिळविला यामुळ सस्कृत भाषा व यज्ञयाग ह्याची समाजात पुन्हा स्थापना झाली

निरुयात जर्मन प्राच्यपडित श्री रिचर्ड फिक् याच्या Die Sociale Gliederung im Nordostlichen Indien zu Buddhas Zeit या ग्रथाचें मराठी भाषातर "बुद्धकालीन भारतीय समाज" श्री कालेलकर यानीं केलेलें आहे त्यातून प्रस्तुत विषयापुरती माहिती सक्षेपानें देतो

पूर्व भारत ही जैन व बौद्ध धर्मांची जन्मभूमि या भागातील बहुजनसमाज वैदिक सस्कृतीच्या निकट सहवासात कधीच आला नाहीं या प्रदेशातील क्षत्रिय अधिपति हे मूळचे अनार्य असावेत चातुर्वर्ण्यसिद्धान्त हा स्वयसिद्ध असल्याचें पालि धर्मग्रथकाराना व जातकाच्या लेखकाना मान्य आहे त्याचा विरोध आहे तो केवळ जन्मावरून ब्राह्मणाना समाजाचे नेते म्हणून मिरवण्याला ब्राह्मणाचे स्थान श्रमणानीं घेतल इतर्कच क्षत्रिय हे राजसत्तेचे प्रतिनिधि बौद्ध सघटनेंत त्याना अग्रस्थान मिळाले यामुळें क्षत्रिय हे ब्राह्मणानीं उद्दट-

पणान वागू लागल शुद्र युद्धानें वैश्य व शुद्र जातांत कधींही जन्म घेतलेला नाहीं, सर्वांनीच असा क्षत्रिय किंवा ब्राह्मण जातींतच जन्म घेतलेला आहे युद्धकाळांत प्रतिष्ठित मध्यम वर्ग अस्तित्वांत आला व वैद्यांना विशेष महत्त्व प्राप्त झालें, त्यांची संपन्नता वृद्धिंगत झाली व समाजांतलें स्थानहीं उंचावलें धर्मशास्त्रांतील चातुर्वर्ण्य व वर्णसंकरामुळें उत्पन्न होणाऱ्या जाती याबद्दल जातकांत काहींच उल्लेख नाहीं व्यापारी व कारागीर, हलके धंदे करणारे लोक व अनार्य मानववंश हे मात्र गुणविशेषामुळें जातींच्या सदरांत येण्यासारखे आहेत

या विवेचनाच्या अनुरोधानें गाथासप्तशतींतील वर्ग व वर्ण विषयक उल्लेखांची पाहणी करावयाची आहे

गाथासप्तशतींत आर्य नाहींत आर्य म्हणजे शिष्ट, विशिष्ट प्रकारानें यजन करणारे लोक बहुजनसमाजाशीं व ग्रामीण जीवनाशीं त्यांचा संबंध क्वचितच येणार शिवाय या काळांत त्यांचें माहात्म्य नष्टप्राय झालेलें होतें गाथासप्तशतींत आर्य नसले तरी आर्या मात्र अनेक आहेत

अज्जा–आर्या क्र ७१, १७०, १७०, १७२, १९८, २४९, ३६०, ३७९, ३९५ ५७७, ६८३, ७९७, ८३२, ८५२ ही संज्ञा अनेक अर्थांनीं व टिकाईनें वापरलेली आहे

क्र. १७२ मधील अज्जा ही ग्राम किंवा ग्रामीण देवता आहे क्र ७९, २४९, ३६०, ३७९, ५७२, ७१७ व ८५२ या गाथांमधील अज्जा या शब्दाचा अर्थ काहीं टीकाकारांनी आढ्या – उच्च व संपन्न कुलोत्पन्ना असा दिलेला आहे यापैकीं क्र ७९, २४९ ३६० व ३७९ या गाथांतील आर्यांचीं लक्षणें या अर्थाला साजेशीं आहेत क्र ३७९ मधील आयला असती, तरुणी इत्यादि पाठभेद भिन्न हस्तलिखितांत दिलेले आहेत छिनालच असती कां म्हणावयाचें याचा मात्र खुलासा होत नाहीं क्र २३७, ५७७, ६८७, व ७९७ मधील अज्जा या फक्त पाठभेदांत आलेल्या आहे स्वीकृत पाठांत त्यांना अनुक्रमें बाला, मुग्धा, वधू व विलासिनी म्हटलेलें आहे क्र. १७० व १८९ मधील आर्या या पतिव्रता आहेत आणि पाठभेदांतील आर्या वगळल्या असतां क्र १९८, २४९, ३६०, ३७९ व ८५२ मधील आर्या या असती आहेत

क्र. ७९ १७० ३६० व ३७९ या गाथांतील आर्या नायिकांना त्यांच्या

वरिष्ठ दर्जाची जाणीव आहे किंवा त्याचा दर्जा गाथाकर्वांना अभिप्रेत आहे असें दिसतें. क्र. ७९ या गाथेंतील आर्येला अनेक सवती आहेत. या सवती सभासुदोच्या दिवशीं सुगंधी जलानें न्हाऊन व वस्त्रालंकारांनीं नटून मग्न झाल्या आहेत, पण आर्येनें–श्रेष्ठ किंवा धर्मपत्नीनें मात्र स्नानाविषयीं अनादर दाखविलेला आहे. या वृत्तीचीं अनेक कारणें संभवतात. या आर्येला आपल्या वरिष्ठ दर्जाची जाणीव आहे आणि ती तिनें संयमानें, पण स्पष्टपणें व्यक्त केलेली आहे. ही आर्या गलितयौवना असेल व या सवती बहुधा बहुजनसमाजांतील असतील. त्यांच्या यौवनावर लुब्ध होऊन आसक्त आर्यानें त्यांशीं प्रतिलोम विवाह केले असतील आणि त्यांचें साहचर्य आर्या नाईलाजानें सहन करीत असेल. किंवा हा सण शिष्टसंमत नसल्यामुळें कनिष्ठ वर्गांत रूढ असलेल्या त्या दिवशींच्या रिवाजापासून ती अलिप्त राहिली असेल. किंवा तरुण सवतींच्या साचरेपणाचा तिला निःशब्द निषेध करावयाचा असेल. किंवा या सवती पतीशीं सवर्ण असून ही एकटी उच्च वर्णाची असल्यामुळें प्राप्त परिस्थितीबद्दल तिला खंत वाटत असेल; कोणताहि पर्याय स्वीकारला तरी त्याला आर्येचें हें ना तें वैशिष्ट्य अभिप्रेत असल्याचें स्पष्ट दिसतें. क्र. १५० मधील आर्येचे नेत्र निळे आहेत. निळे डोळे हे थंड पठारावरून आलेल्या व वंशशास्त्रान्वयें वरिष्ठ दर्जाच्या लोकांचें एक वैशिष्ट्य मानण्यात येतें. बहुजनसमाजांतील लोकांचे डोळे काळे किंवा अन्यवर्णमिश्रित काळसर असतात. म्हणून निळ्या डोळ्यांची अपूर्वाई वाटते. नील नेत्र हें अनेक अन्य गाथांतही सौंदर्यलक्षण म्हणून नमूद केलेलें आहे; पण निळा बुबुळें असलेल्या अन्य नायिकांना आर्या म्हटलेलें नाहीं. क्र. ३६० या गाथेंतील आर्या नायिकेचा हालिकानें नुकताच उपभोग घेतलेला आहे. त्याचा अडाणी आवेग व तिचें सुसंस्कृत सौकुमार्य हा वैशिष्ट्यें श्रेष्ठ-कनिष्ठ भावानें या गाथेला अभिप्रेत आहेत असें दिसतें. क्र. ३७९ या गाथेंतील घरंदाज आर्येला रात्रीं मुक्कामाला आलेल्या अपरिचित व सामान्य पथिकाबद्दल तिरस्कार वाटला, पण या वृत्तीबद्दल तिला पुढें पश्चात्ताप झालेला आहे.

या आर्यांचे अंगीं आपल्या दर्जाबद्दल अभिमान आहे, पण दर्प नाहीं. द्विजांपैकीं किंवा त्रैवर्णिकांपैकीं त्या कोणत्या वर्णाच्या आहेत याबद्दल अनुमान करण्याला कांहीं साधन नाहीं.

आहिर–अभीर, आभीर . क्र. ८०५ . हा उल्लेख उत्तरार्धांतला आणि

पक्च एक असगा तरी त्यावरून व इतिहासावरूनही गाथासप्तशतीच्या काळात महाराष्ट्रात त्याचा नुक्ताच प्रवेश होऊ लागलेला असावा असें अनुमान करता येतें सिंध ( पतंजलि ), राजस्तान व सोराष्ट्र ( महाभारत ), माळवा ( क्षत्रप ) व महाराष्ट्र ( सातवाहन ) या मार्गानें व त्या त्या काळात त्याचें आक्रमक परिभ्रमण झालेलें आहे अभीर हे एतद्देशीय का परदेशी ? श्री स्मिथ ( Early History of India , p 290 ) सागतात की ते परदेशी आहेत आणि श्री कनकसभे (Tamil Land 1800 Years Ago p 57 ) सागतात कीं ते एतद्देशीय आहेत कसे ही असोत, महाराष्ट्रातलें त्याचें आगमन अल्प प्रमाणात शकाच्या आगेमागें, म्हणजे शकपूर्व पहिल्या किंवा शकोत्तर पहिल्या शतकात झालेलें आहे मौर्य व क्षत्रपाचे राजवटात हे त्याचे सैन्यात होते- त्यांनी तिसऱ्या शतकात सातवाहनाचा महाराष्ट्रात पाडाव केला सातवाहनो- त्तर काळात ते वाकाटकाचे माण्डलिक झाले आणि कदम्बानीं त्याचा उच्छेद केला अडदाडपणाबद्दल ते पूर्वीपासून प्रसिद्ध आहत ज्याना अर्जुनाचा काफिला लुटणे ते काय रानावनात एकाकी अवलेच्या विनयभग करण्याला डरणार ? भार्येत मुजोरी व कृतीत बळजोरी याशिवाय सहनशील समाजातही नवागताचा निभाव लागत नाही क्र ८०५ या गाथतील अहीराची वृत्ति अशीच आहे- शक आले तस गले किंवा नामशेष झाले अल्पसख्य असल्यामुळें बहुजन- समाजात मामावून गेले गाथासप्तशतीतल्या लोकगीतात त्याचा उल्लेख आढळत नाही त्या अर्थी ते खेड्यापाड्यापर्यंत पोचले नसावेत अहीर मान गोपाल असल्यामुळें खेड्यापर्यंत पाचले त्याच्या व यादवाच्या साहचर्यामुळ व परि भ्रमणामुळें बहुजनसमाजात प्रसृत झालेल्या कृष्णकथाचा परामश या पूर्वीच घेतलेला आहे अहीर व यादव हे आरभा मुख्यतेकरून गोदावरीच्या परिस रात, उत्तर भागात, मोठ्या सख्येंत स्थायिक झाले आजही त्याची वस्ती व छाप या भागावर, येथील भाषेवर आहे या भागातील ब्राह्मणापैका बहुसख्य माध्यदिन शाखीय आहेत त्यापैकी ज्यानीं अभीराचें पौरोहित्य पत्करलें त्याना अभीर ब्राह्मण हें अभिधान प्राप्त ( खान्देश वन्हाडातील माध्यदिन शाखा प्रकरण श्री शकर गापाळ जोशी पृ ६५ ) झालें स्मृतिकारानीं जातींच्या गोटात अभीराचा समावेश केला तेव्हा त्याना स्थान दिलें तें असें ब्राह्मण पुरुष × वैश्य स्त्री = अबष्ट ब्राह्मण पुरुष × अबष्ट स्त्री = अभीर हें समीकरण

बनावट आहे हें उघड आहे तरीही सप्तशतींत याचें स्थान बरेंच उच्च दर्जाचें आहे

**खाडिअ : खट्टिअ :** क ६८० (दे ना २ ७०) = खाटिक या उल्लेखाला जातीयतेचा गंध नाही, पण या काळात जातीय समजला जाण्याइतका हा धंदा विशिष्ट वर्गाच्या हातां होता

**गोप** क २०७, गोवी क ११० (प्रमथ), ११४, १२८, ५५०, २१०, ६९० (रुप्पगोपी), ७२६ (पिंडार) हे उल्लेख जातीचे द्योतक असावेत असे दिसत नाही असलेच तर ते अहीराचे असावेत पाइअसद्दमहण्णवात या शब्दाचे दिलेले अर्थ आहेत ते असे गोव = गौओं का रक्षक, ग्वाला गोवी = (दे ना २ ९६) कन्या, कुमारी, बाला, लडकी, आणि गोपाङ्गना अहारीन अहीर हे अडदाड, कणखर, निर्भय व सशक्त म्हणून आज ही प्रसिद्ध आहेत म्हणूनच क ८०१ मध्ये त्यांचकडे कपाशीच्या राखणीचें काम दिलेले आहे आणि क. ६९० व ६९१ मध्ये गोपीकडे भातशेतातलीं कष्टाचीं कामें ही मडळी रोजदारीवर काम करणारी दिसतात क ६३७ मधील गोप हा गोदोहनात कुशल आहे येथें त्याचें हस्तकौशल्य आणि पर्यायानें लैङ्गिक उपचारचातुर्य वर्णिलेले आहे पटाईत गवळी गोदोहनासाठा घरोघर जात असत असेंहा यावरून दिसतें गाथातील गोपाचे अगा असलेलें कामकलानैपुण्य व लालित्य मोहविणारें आहे क ११२ व ११४ मधील गोपी कृष्णाभावता घोटाळत आहेत क ११४ मधील गोपीचें नर्तननैपुण्य व त्यांपैकी एकीच सुवनचातुर्य वर्णिलेलें आहे क्रियांची अजूनही प्रचलित असलेली गरबा, फेर यांसारखीं सघनृत्य हा भारताच्या सस्कृतीला गोपाची देणगी आहे क १२८ मधील गापी हृदय विद्ध करणारा विरहगीतें गात आहेत क ६९० मधील गोपाच पाऊल तिरप पडलेलें आहे नखऱ्यामुळे असो किंवा चिरत्यामुळे असो तिरपें असो किंवा वाकड असा आठरण ठेवण्याजोगा, एवढ साम रागड्या बहुजनसमाजात हीं लक्षणें उठून दिसतात म्हणूनच त्यानें लालित्य काव्यवद झालेले आहे क ७२, मधील पिंडार, पडार हाही गवळीच आहे देशीनाममाला पिंडार याचा अर्थ गोपाल, महिषपाल ' असा दिलेला आहे सरस्वती कण्ठाभरणात पिंडार याला प्रतिशब्द ' अहीर ' असा दिलेला आहे कृष्णाच्या गवळ्यात पदा नेहमा आढळतो ह व्यक्तिनाम पिंडार, पेंनार यावरून तर

निघालेलें नसेल? क्र ७२६ मधील पिंडार हा स्वत गोपालन करणारा आहे. या गाथेंतील न्याहारी आणणाऱ्या त्याच्या कारभारणीच्या उल्लेखावरून दिसते कीं त्याची गोशाळा त्याच्या राहत्या घरापासून बरीच दूर असावी पाठभेदा वरून दिसते कीं कुरणातील गोष्ठात पतिपत्नींनी जोडीनें श्रम करण्याचा रिवाज होता गोष्ठ या शब्दाचा गायरान असाही अर्थ ( ऐ ब्रा ३ १८ १४, वा स ३ २१ ) आहे

चण्डाल क्र २२७, ८०४ क्र २२७ मधील पानकुटीचा अर्थ काहा टीकाकारांनी चण्डालकुटी असा दिला आहे आणि काहींनी पानकुटी क्र ८०४ मध्य चण्डालाच्या हाती मैना लागलेली आहे अथर्व वेदात चण्डाल ही जमात मागासलेली आहे आणि वाजसनेयि संहितेत अस्पृश्य मानलेली आहे चण्डाल हा संकरज जातिविशेष शूद्र पुरुष व ब्राह्मण स्त्री यापासून निपजलेला, म्हणून ब्राह्मणाना असह्य आणि ब्राह्मणी वर्चस्व असलेल्या समाजातून बहिष्कृत मनु ( १० ०० ५१ ) सागतो चाण्डालाना ग्रामाबाहेर रहावें, दिवसा राजाच्या परवानगीनें व चिन्हांनी युक्त होऊन ग्रामात कामकाजानिमित्त यावें आणि रात्रीं ग्रामात येऊ किंवा राहू नये दारू गाळण व विकणें आणि पाखरे पकडून ती विकणें हे चण्डालाचे व्यवसाय हे व्यवसाय निषिद्ध किंवा निर्दय, म्हणून बहुजनसमाजातही ते तिरस्कृत जातकातही चाण्डालाची अवस्था अशीच आहे, अधर्मता व हीनता याची द्योतक म्हणून ही सज्ञा जातका अनेकदा योजलेली आहे श्री फिक् ( पूर्वोक्त पृ ५८ ) सागतात "हीन जातीयाना पब्बज्जा स्वीकारण्याचा अधिकार असला व जातकामध्यें चण्डाल पब्बजिताचा उल्लेख असला तरी त्याचा आर्यांशीं संबध येऊ न देण्याबद्दल जे निर्बंध घालण्यात आले होते त्यामुळें आध्यात्मिक उन्नतीला ते पारखे झाले होते " चण्डाल या अनार्य जातीबद्दलच्या वरिष्ठ वर्गाच्या भावना बुद्धपूर्वकालीन आहेत आणि ब्राह्मण क्षत्रियांनी घालून दिलेल्या मर्यादा बौद्धांनीही उल्लघिल्या नाहीत

चण्डिल क्र २९१ ४१७ देशीनाममालेंत ( ३ २ ) याचा अर्थ न्हावी असा दिलेला आहे क्र २९१ मधील उल्लेख व्यावसायिक असून क्र ४१७ मधील उल्लेख जातीयतेचा द्योतक आहे न्हाव्याचा धंदा स्मृतिकारांनी ओाळ असल्यामुळे तो करणाऱ्या लोकाचें सामाजिक स्थान हीन मानण्यात यंर्ह सिगाल जातकात नहापितपुत्ताची कथा आहे एका न्हाव्याच्या मुलानें

लिच्छवि राजकन्येवर प्रेम बसले तो पित्याला म्हणाला, राजकन्या मला पत्नी मिळाली नाहीं तर मी जगणार नाहीं यावर बाप म्हणाला, तू न्हाव्याचा मुलगा, हीन जातीचा आहेस, लिच्छवि राजकन्या उच्च जातीची क्षत्रियकन्या आहे, म्हणून अशक्य गोष्ट मिळविण्याची आकांक्षा धरू नकोस

नापितपुत्रानें थोडा दम धरला असता अगर व्यवहार सभाळला असता तर त्याची आकाक्षा नव्हे, आसक्ति तरी तृप्त झाली असती याचें प्रात्यक्षिक क्र. ४१७ या गाथेंत आढळतें. बायकाबायकांचें भांडण चाललें आहे. एक दुसरीला व तिच्या मैत्रिणींना छिनाल म्हणते लगेच दुसरी म्हणते, काय, आम्ही छिनाल? तू मोठी पतिव्रता, आमच्या पासून दूर रहा, नाहीतर आमच्या ससर्गामुळें तुझ्या कुळाला बट्टा लागायचा पण हें पहा, आम्ही छिनाल आहोंत पण आम्ही उत्तम नायकावर तरी आसक्त आहोत तुझ्याप्रमाणें आमची वागणूक एकाद्या वेश्येसारखी नाहीं किंवा आम्हीं न्हाव्याकडेही जात नाहीं!

नापिताच्या व्यवसायाचीं वैशिष्ट्यें विचारात घेऊन वात्स्यायनानें त्याची गणना नायकाच्या व्यवसायप्राप्त मित्रात व दूतात ( १ ६ ३७ ) केलेली आहे, आणि त्याच्या पत्नीची दूतात सुसपन्न व सुसस्कृत नागरी स्त्रीपुरुषाची सजावट त्याच्या कारागिरीवर अवलबून असते या व्यवसायासाठी दुकान माडण्याची प्रथा नसल्यामुळ त्याना गिऱ्हाइकाच्या घरोघर जावें लागे, त्याशीं गप्पागोष्टी छाटण्याची व लगट करण्याची सधि मिळे, म्हणून त्याना दौत्य करावयास सवड मिळे या वरून दिसतें का वात्स्यायनाच्या काळात त्याचा सामाजिक दर्जा बराच उचावला होता अशीच परिस्थिति अलीकडे पुन्हा निर्माण होऊ लागली आहे यामुळें इतर गडाबरोबर हाही नष्ट होणार अशा चिन्हें दिसत आहेत

**दास** क्र ९१ डॉ केतकर ( बुद्धपूर्व जग पृ ३८ ) सागतात की आर्य व दस्यु हा भेद यजनविषयक असून आर्यांचा कृष्णवर्णीयाशीं सबध येण्यापूर्वींचा आहे. ऋग्वेदात कृष्णवर्णायाना दास म्हटलेलें ( १. १३० ८, ९ ४१ ) आहे आणि जित दासाच्या काहा पुढाऱ्यानीं आर्य जेत्याबरोबर समेट केल्याचें नमूद आहे सद्वर्तनी व सुसपन्न दासाना आर्यत्व सपादन शक्य ( ६ २२ १० ) होतें प्राचीन युरपियन व मध्य एशियाटिक आणि मध्ययुगीन ख्रिश्चन व इस्लामी देशाच्या इतिहासात दिसतें तें गुलामीचें रौद्र व करुण

स्वरूप भारतांत आढळत नाहीं. लढाईंत कैद, दरबारांत किंवा न्यायालयांत शिक्षा, दारिद्र्य आणि कर्ज फेडण्याचें असामर्थ्य हीं दास्याचीं कारणें बौद्ध वाङ्मयांत नमूद आहेत ( थेरीगाथा; ४४४ : विनय : १. ७२. ). सैनिकांप्रमाणें दरवडेखोरही पकडलेल्या स्त्रीपुरुषांना दास म्हणून विकीत असत. गाथासप्तशतांतील क्र ५४, ५५, ११८ व ५२७ या गाथांतील वन्दिनी याच सदरांत पडतात. हे दास धन्यांच्या घरांत कुटुंबीयांप्रमाणें ( सिरिकालकण्णि जातक ) रहात, धन्याचा विश्वास संपादन ( नंद जातक ) करीत; धन्याचा दासाशीं ( कटाहक जातक ) आणि दासांच्या श्रेष्ठींच्या कन्येशीं ( चुल्ल सेट्ठि जातक ) प्रेमसंबंध जमल्याचीं ही अनेक उदाहरणें आढळतात. शाक्य राजपुत्र महनाम, याची दासी नगमुदा, यांची कन्या वासवखत्तिया हिला शाक्यकुलोत्पन्न मानण्यास लिच्छवीं जमातीनें नकार दिलेला ३.हि आणि दासांना भिक्षुसंघात घेण्याला मनाई केलेली आहे. ब्राह्मण व क्षत्रिय यांनाही दास्यांत पडावें लागे. ( वेस्सन्तर जातक ). मात्र आर्य दास्याला पात्र नाहींत अशी अर्थशास्त्राची ग्वाही ( नत्वेवार्यस्य दासभाव. । ३. १३. ६५. ) आहे. दास्य, मग तें कोणत्याही अवगुंठनाखालीं असो, शक्य तोंवर नष्ट, कमीत कमी सह्य करण्याकडे कौटिल्याचा कल आहे. गाथासप्तशतींतील दास हा सामाजिक किंवा आर्थिक अवस्थेचा द्योतक नाहीं. ' तत्पर नोकर ', ' मालकिणीची मजा संपादन करण्यात कुशल ' या अर्थानें तो या गाथेंत आलेला आहे.

पुलिंद : क्र ११६, ३१०; पुलींदी : क्र. ६३४ : ऐतरेय ब्राह्मणांत ( ७.१८ ) पुलिदांचा उल्लेख आन्ध्र, पुण्ड्र, शबर व मूतिब याच्या जोडीनें आलेला आहे. हे विश्वामित्राचे पुत्र, त्याच्या शापामुळ बहिष्कृत होऊन दक्षिणापथात आलेले. महाभारतांत ( १२. २०७. ४२ ) पुलिंद दक्षिणापथांत मांडलेले आहेत. मत्स्य ( ११४. ४६. ८ ) मार्कण्डेय ( ५७. ४५. ८. ) व वायु ( ४५. १२६ ) पुराणात त्यांना दक्षिणापथांत आणि अभीर, आन्ध्र, दण्डक, कुंतल, विन्ध व वैदर्भ याच्या सान्निध्यांत मांडलेलें आहे. त्याचा राज्यें विन्ध्याच्या परिसरात असल्याचें कथासरित्सागरात ( ४. २२. ) सांगितलेलें आहे. टॉलेमीनें त्यांना नर्मदेच्या किनाऱ्यावर मांडलें आहे, त्याच्या कथनावरून दिसतें कीं हे लोक कंदमुळें व कच्चे मांस यावर निर्वाह ( Tribes of Ancient India : Dr Law : p 175. ) करीत. गाथासप्तशतींतले पुलिंद हे विन्ध्य पर्वताचे

(क ११६) रहिवासी आहेत ते पुनरमृगयासक्त व वन्य असून नागरी व्यवहाराविषयां इतके अजाण आहेत कीं त्याना मोत्यापेक्षा गुंजा (क. ३१०) अधिक आकर्षक वाटतात

भोइअ = भोगिक क ५५६, भोइणि क ६०३, ७३२, ७७० गगाधरानें क ५२६ या गाथेंतील भोइअ या शब्दाचा अर्थ पडिक्खक = प्रतीक्षक या पाठाच्या अनुराधान 'भोगिको भोगासक्त:' असा दिलेला आहे आणि पडिसर = प्रतिसर = असहिष्णु या पाठाच्या अनुरोधान 'भाक्ता ग्रामाधिकारी' सरस्वतीकण्ठाभरणात (पृ ६७० क ३१९) भोइआ याला प्रतिशब्द भोगिको असा दिलेला आहे क ६०३ या गाथेंतील भोइणि या शब्दाचा अर्थ गगाधरानें 'ग्रामव्यापारिक स्त्री' असा सागितला आहे व पण्डित मथुरानाथानीं ता स्वीकारला आहे अन्य टीकाकाराना क ७३२ व ७७० मधील भोइणीचा अर्थ 'ग्रामप्रधानहिला' असा दिलेला आहे आणि क ७३२ मधील भोइणीचा 'ग्रामव्यापारमहिला' असाहा देशीनाममालेत व पाइअसद्दमहण्णवात भोइ व भोइअ याच अर्थ ग्रामाध्यक्ष, ग्राम या मुखिया भोगासक्त, विलासी असे दिले आहेत आणि भोइणाचा अर्थ ग्रामाध्यक्षाची पत्नी पाइअसद्दमहण्णवांत भोइ व भोइया या शब्दाचे अर्थ भार्या, स्त्री, वश्या असे दिलेले आहेत गाथासप्तशतीतील तिन्ही भोइणी अगता आहेत क ६०३ व ७३२ मधील भोइणी या ग्रामतिणा आहेत या भोइणी क्षत्रिया असोत किंवा वैश्या त्यांच्या नादीं लागणारे पुरुष मात्र बहुजनसमाजातले आहेत. या उल्लेखांपैका क ७०६ शिवाय इतराना वर्ग भावना अभिप्रेत आहे असे वाटतें

या भोगिकाचा समन्वय कोणाशा करावयाचा? भोज या प्राचीन जमातीशी? की भोगिक या गुप्तकालीन स्थानाधिकाऱ्याशा? डॉ. केतकर यांच्या अनुमानानुसार (प्राचीन महाराष्ट्र प्रकरण ४१) भोइ या जमातीशी? प्राकृत कोशानुसार क्षत्रिय मुखियाशी की काही टीकाकारांच्या अनुराधान वैश्य व्यापाऱ्याशी?

भोजाचा पहिला उल्लेख ऋग्वेदांत (३ ५३ ७) आढळतो देवें त्याना यज्ञाचा मान दिलेला आहे ऐतरेय ब्राह्मणात (८ १० १४ १७) त्याना दाक्षिणात्य म्हटलेले आहे आता त्याना विस्तीर्ण प्रदेश व्यापलेला आहे आणि भोज्य राज्यपद्धति Hindu Polity Dr Jayaswal p 36) इत्यादि

केलेशी आहे महाभारतातले भोज यादववंशीय असून ते विदर्भात माडलेले आहेत दण्डकारण्य या अभिधानाला अभिप्रेत असलेला दण्डक्य हा भोज होता असे अर्थशास्त्रात सांगितलेले आहे अशोक व खारवेल यांच्या शिलालेखातील भोजाचे उल्लेख 'स्थानिक व वशपरपरागत राज्यकर्त' या अर्थानें आलेले आहेत डॉ रामकृष्ण भाडारकरानीं या भोजाना वऱ्हाडी ठरविलेले आहे. सातवाहन साम्राज्यातील भोजाचे शिलालेख कोंकणात, महाड व कुडा येथील लेण्यात मिळालेले आहेत येथें त्याना भोज व महाभोज आणि त्याच्या स्त्रियाना भोजिकी व महाभोजी म्हटलेलें आहे भोजाचा महारावरोबर सबध आल्यामुळें महाभोज हें राष्ट्रनाम सिद्ध झालें असावें अस डॉ केतकराचे (प्राचीन महाराष्ट्र पृ ३३४) अनुमान आहे मात्र याला पुरावा असा काहींही नाहीं क्षत्रप व महाक्षत्रप, तसेच भोज व महाभोज नाहींतर भारताचा विस्तार महाभारतात झाला तोही याच कारणामुळें, असें ही अनुमान करता येईल भोई या मत्स्योपजीवी (Poona Gazetteer I p. 387) जमातींशीं समन्वय करण्यासाठी भोज हे आरभी मत्स्योत्पादक होते व पुढें ते कुणब्यात समाविष्ट झाले अस त्यानीं गृहीत धरलें आहे आणि कृषिकर्म करणाऱ्या भोयांपैकीं जे देवपुजारीपण करणारे ते भोजक ब्राह्मण झाले असेही निष्कर्ष त्यानीं काढले आहेत, त्यानाही काहीं पुरावा नाहीं

ग्रामणी हा गावचा पाटील, प्रजेचा प्रतिनिधि, भोजक हा राजघराण्याशीं किंवा राज्यकारभाराशीं सबध असलेला करमाफ इनामदार, राज्यकर्त्यांचा प्रतिनिधि, गृहपति हा सरकारी कर देण्यास पात्र असा जमीनदार, प्रतिष्ठिताचा प्रतिनिधि, असें मानलें तर गावगाड्यातलीं त्याचीं स्थानें निश्चित होतात गाथासप्तशतीच्या काळात गावोगावीं सरजामदाराच अस्तित्व जितके असभाव्य तितकेंच किराण्या व्यापाऱ्याच सभाव्य म्हणूनच भोइणीचा अर्थ मी वाणीण असा घेतला आहे

वाणिअअ = वाणिजक क्र १६१ वणि, वाणि, वाणिअ, वाणिअय याचा अर्थ पाइअसद्दमहण्णवात वनिया, वनियाका लडका, वैश्य, व्यापारी असा दिलेला आहे हा वाणी फक्त वृत्तीनें वैश्य आहे वर्णानें वैश्य असलेला व्यापारी व्याघ्रकर्म. हस्तिदत अशा वस्तूंचा व्यापार करीत हें निश्चय त्या काळात तरी समजत नाहीं असल्यास तर तो स्पष्ट आहे, माउग्गरेदी ही जुगती सबब आहे-

आणि केवळ व्याधाची सुदर सून दृष्टीस पडावी म्हणून तो तिच्या झोपडी-भोवती घोंटाळत आहे या गाथेला जात किंवा जातीयता अभिप्रेत नाही.

विज्जाहरि = विद्याधरी क्र ८४६ विद्याधर हे दिवसा स्मशानात, एका पायावर उभे राहून सूर्यतपस्या करतात आणि रात्री स्त्रियांचे अपहरण करून त्यांचा उपभोग घेतात, असा उल्लेख धजविहेठ जातकात आढळतो. जैन ग्रंथात आणि बृहत्कथेत त्यांना विशेष महत्त्व दिलेले आहे त्यांना देवयोनीत घातले आहे व अद्भुत शक्ति दिल्या आहेत विद्याधर हे विन्ध्य पर्वताच्या परिसरात स्थायिक झालेले इराणी असावेत असें डॉ केतकरांचें अनुमान ( प्राचीन महाराष्ट्र प्रकरण १७ ) आहे या गाथेतल्या विद्याधरीला अतरिक्षातून गमन करण्याची शक्ति आहे सामान्य स्त्रियाप्रमाणें विद्याधरी वेणी घालीत नाहीत, भुरभुरते केस मोकळे सोडतात असें या उल्लेखावरून दिसत अजठ्याच्या गुहेतील विद्याधरींचे चित्र तुलनेसाठीं पाहण्यासारखें आहे

वाह = व्याध क्र १२२ ६०१, ६१८, ६२९, ६६३, वाही = व्याधी = व्याधवधू, व्याधस्त्री क्र ११९, १२०, १२१, १७३, ५९७, ७३६, ७८८. गाथासप्तशतीत, किंवा अन्यत्रही, व्याध ही एक जात या अर्थाने आलेले नाही. व्याध म्हणजे शिकारी, वन्य शिकारी, शिकारीवर उपजीविका चालविणारे, म्हणून रानात वस्त्या करून राहणारे त्यांच्या झोपड्यांचे गट असलेले दिसत नाहीत ( क्र १२१, ९४० ) हे व्याध धनुष्यबाणानें शिकार करतात धनुष्यबाण हें त्यांचें व पुलिंदांचें ( क्र ११६ ) आयुध थोडा शिकारी असे समर्थ ( क्र ६३० ) की ते एका बाणांत हत्तीला लोळवीत. अस्वल (क्र. ७३६) गज ( क्र १२१, १७३, ७३६, ९४० ), गवा ( क्र. ७३६ ), गेंडा (क्र ७३६) मृग ( क्र. ६०१, ६१८, ६२९ ) शरभ ( क्र ७१६ ) व शार्दूल ( क्र. ७३०, ९८० ) या लाख व हिंस्र पशूंची हे शिकार करतात, हत्तींची त्यांच्या गंडस्थळातील मोत्यासाठी ( क्र. १७३ ) व हस्तिदंतासाठी आणि व्याघ्रांची त्यांच्या चर्मासाठी ( क्र ९४५ ) चितळ हरणांची हत्या करणें हें दुरंग आहे असें त्यांच्या स्त्रियाही ( क्र. ६२० ) मानतात एखादा शिकाऱ्याला रानात कधा दिसला असें की त्याच्या धास्तीने हिंस्र श्वापदें त्याच्या वस्तीच्या आसपास फिरकत नसत पण तो थेटा ( क्र १२१ ) किंवा त्याची वाटणी वधार आणि ( क्र ७३६ ) म्हणजे या पशूंना अनू अभय मिळे! आरदा स्त्रीने देया

पिढीला नावें ठेवावयाची ही सनातन प्रथा गाथासप्तशतीत धनुष्य-संकेताच्या रूपात (क्र. ११९, १२०, १२२, ६३०, ६३३) सशब्द झालेली आहे नव्या बायकोच्या नादानें व्याध दुबळा होतो, त्याला धनुष्य पेलत नाही, यातच ती धन्यता मानते पण संसार तर चालला पाहिजे म्हणून त्याची बायको ते छिलून हलकें (क्र ११९, १२०) करते, किंवा यात वेड्जन आहे हें जाणत तोच तें एकान्तात छिनतो (क्र ६६३) किंवा न पेलणारे धनुष्य व बाणाचा भारा खांद्यावर टाकून शिकारीसाठी म्हणून तो जंगलात जातो, पण शिकार मात्र करू शकत नाही (क्र ६३०) त्याचे हें दौर्बल्य पाहून भविष्याच्या काळजीनें त्याची आई रडते (क्र ६६३), पण तिच्या अजाण नवतरुण्या सुनेला चिंता कशी ती माहीत नाही. आपण तासलेल्या धनुष्याच्या छिलक्या आभाळात वातचक्रावर उडालेल्या दिसल्या की जणू आपल्या सौभाग्याचा ध्वजच फडकत आहे (क्र १२०) असे तिला वाटतें तिच्या ठायी व्यवहारज्ञानाचा अभाव तर इतका की सवतीनी धारण केलेल्या मोत्याच्या अलंकाराचें मूल्य तिला समजत नाही आणि स्वतः धारण केलेल्या मोरपिसाच्या तुऱ्याच्या तोऱ्यातच ती मिरवते! प्रत्यक्ष व्यवहारात व्याध व हिंसा याच आहे तेवढेंच व्याध व अहिंसा यांचे साहचर्य प्रचारकथात व गीतात आढळून येतें त्यावरून त्याचें युद्धोत्तरकालीनत्व सिद्ध होतें महाभारतातील अर्जुन विषाद व रामायणातील क्रौंचवध हे प्रसंग या सदरात पडण्याजोगे आहेत गाथासप्तशतीतील क्र ६०१, ६१८ व ५९४ या गाथा निःसंशय बुद्धप्रणीत अहिंसेच्या सिद्धान्तानें प्रेरित आहेत या गाथा कृत्रिम व प्रचारकी थाटाच्या नाहीत प्रियकर व प्रेयसी यांच्या परस्परावरील अकृत्रिम प्रीतीमुळें त्या निःसंशय विशेष हृदयंगम व हृदयद्रावक वाटतात

## जातीयता, एतद्विषयक श्रेष्ठ कनिष्ट भावना आणि सामाजिक परिस्थिति :

गाथासप्तशतीचें संपादन झालें तेव्हा दक्षिणापथात आर्यांच्या वसाहती प्रस्थापित व स्थिर होऊन अनेक शतकें लोटली होती आता उत्तरप्रमाणे दक्षिणेतही आर्य व अनार्य यांचा संघर्ष शमला होता झाडावर बसून कच्चे मांस खाणाऱ्या अनार्य राक्षसांची आठवण आता केवळ श्लेषजन्य उपमेपुरता (क्र ३११)

राहिली होती. आर्य या सत्तेतला दर्प नष्टप्राय झाला होता आणि दरारा क्षत्रियामध्ये केंद्रित झाला होता. मात्र आर्यांविषयी व त्यांच्या आचाराविषयी सर्वांना आदर वाटत होता; आर्य हे आपल्यापेक्षा वरिष्ठ आहेत अशी सामान्य जनाना जाणीव होती.

म्हणूनच एतद्देशीयांनी ग्रामदेवतेला अज्जा हें अभिधान दिलेले आहे.

आर्य स्त्रियाना आपल्या दर्जाची जाणीव आहे. सामान्य व्यवहारात ही प्रत्ययाला येईल इतकी ती त्यांच्या वृत्तींत मुरलेली ( क्र. ७१ ) आहे.

सामान्यत स्त्री ही तिच्या वैशिष्ट्यामुळें व्यासपीठावर अधिष्ठित असलेली व्यक्ति आहे, देव्हाऱ्यात प्रस्थापित असलेली देवता आहे अशी समाजातील सर्वसाधारण लोकांची समजूत असते. वर्गभावना जागृत असते तेथें आणि ती सुप्तावस्थेंत असली तरी उच्च वर्णाय स्त्रियाबद्दल कनिष्ठ वर्गीयामध्यें ही भावना विशेष प्रबळ असते. श्री. हेन्री शापाली यांनीं White Women, Coloured Men या विषयाचें सोदाहरण विवेचन केलेलें आहे तें जिज्ञासूंनीं अवश्य पहावें. वर्गभावना असते, म्हणूनच सामान्य जनाना वरिष्ठ वर्गातल्या स्त्रिया विशेष आकर्षक वाटतात मग ती ग्रामणीची दुहिता ( क्र. ५९२ ) असो किंवा गृहपतीची स्नुषा ( क्र ७५४ ) असो, तरुण भोइणि ( क्र. ६०३ ) किंवा वयस्क शेटाणी ( क्र. ७७० ) असो आणि तिचा उपभोग घेणारा हालिक ( क्र. ३६० ) किंवा चरक चालविणारा मजूर ( क्र ५५८ ) अगर राखणदार अहीर ( क्र. ८०५ ) असो. असी गुणवैशिष्ट्यें आहेत अशी ज्यांची ख्याति त्या वरिष्ठ वर्गातील स्त्रियाना त्यांच्या तथाकथित व्यासपीठावरून खालीं ओढून त्यांचा उपभोग घेणे, सुरतसंग्रामात आपलें सामर्थ्य त्यांच्या अनुभवास आणून देऊन त्यांचें तोंवरचें प्रतिष्ठित जीवन किती शुष्क होतें हें त्यांच्या प्रत्ययास आणून देणें आणि नतर त्यांच्याबद्दल समव्यमनिकांच्या समुदायात चवाठ्यावर चर्चा ( क्र. ७७० ) करणें, हीच आपल्या पौरुषाची कृतार्थता, अशी अनेकांची इच्छा व कल्पना असते, पण एकादे वेळा गाडें उलटतें आणि त्यांच्या दिसाऊ पौरुषाला कुचकामी म्हणून दूषण ( क्र १७४ ) देण्यात येतें! आणि पूर्वी त्याला चटक लावण्यासाठीं प्रोत्साहक ( क्र. ६०३ ) देणारी आता त्याला गूळ-पोवरें देण्यालाहा राजी नसते. अशीच आसक्ति कनिष्ठ वर्गातील स्त्रियाना वरिष्ठ वर्गातील पुरुषाबद्दल ( क्र ६०८ ) वाटते

असं आहे तरी एखादे खट नी एकादा दुसरा हालिक आयशा ( क्र ३६० ) किंवा कुलवालिगा ( क्र १७० ) लगट करीत असला तरी तिचा दर्जा व तिच्या बाधवाचा दरारा यांच्या शास्तीनें त्या वेळांही त्यांच्या जिवाची धाकधुक होत असतेच

गायासप्तशतीचं संपादन झालं त्या वेळा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र, या वर्गांत समाजाच वर्गीकरण होऊन अनेक शतकें लोटली होती पण या वर्गांचा वा वर्णांचा येथें मागमूसही आढळत नाहीं येथें वर्णक्रम आहे पण तो केवळ भिंति चित्रात ( क्र ६१२, ७३२ ), सामाजिक जीवनात नव्हे !

आर्य संस्कृतीचा मूलाधार मानलेल्या यज्ञसंस्थेची येथें हेटाळणी ( क्र २८७) केली आहे येथें ब्राह्मणाचा दर्जा इतका खालावलेला आहे का जे धार्मिक व परलोकव्यसनिक ते खेड्यापाड्यातल्या उडाण्या बायकांच्या उपहासाला पात्र झालेले आहेत आणि हें कोणाच्या राज्यात ? नाणे घाटातील शिलालेखाच्या पुराव्यानें ज्याचा यज्ञपुरस्कार सार्थीत होतो त्या सातवाहनाच्या राज्यात, नाशिकच्या पाण्डवलेण्यातील गोतमी बलश्रीच्या शिलालेखाच्या पुराव्यानें ज्याचें एकब्राह्मण्य सिद्ध होत त्या सातवाहनाच्या राज्यात हा सारा बौद्धाच्या प्रचाराचा परिणाम हें उघड आहे गायासप्तशतींत बौद्धाचा व त्याच्या आद्य तत्त्वाचा स्पष्ट उल्लेख आलेला आहे शिवाय हा राजकीय पारतन्त्र्याचाही परिणाम असणे शक्य आहे या काळात महाराष्ट्रावर क्षहरात क्षत्रपाची सत्ता होती आपल्या सत्तेच्या पुरस्कारार्थ त्यानींही ब्राह्मणाना दान दिलेला आहेत पण तीं तेजस्वी ब्राह्मणाना दिलेलीं नाहींत, पोटार्था भिक्षुकाना दिलेली आहेत खिस्तोत्तर पहिल्या शतकात नाव घेण्याजोगा एकही आचार्य महाराष्ट्रात निप जला नाहीं अंतर्यामीं संजीवनीच स्फुरण असलेल्या शुक्राचार्याची जागा लाळ घोट्या शुष्काचार्यानीं बळकावली म्हणजे असेच व्हावयाचें !

गायासप्तशतीतील ग्रामणी हा ग्रामाच्या संरक्षणाबद्दल जबाबदार असल्या मुळे क्षत्रिय आणि मान्दार असल्यामुळें गृहपति हा वैश्य असणं शक्य आहे श्री फिक ( पूर्वोक्त पृ २०३ ) सागतात "वैश्य या शब्दाला पूर्ण समा नार्थक असलेला आणि विशिष्ट वर्गसूचक असा गृहपति हा शब्द पालि वाङ्म यात सर्वत्र आढळतो द्युपतिदायादम्या याचा अर्थ गृहस्थ किंवा कुटुंबाचा मुख्य असा असला तरी सर्वसाधारणपणें हा शब्द जमीनदार किंवा उच्चजातीय

धनाढ्य व्यापारी यांच्याबद्दलही वापरण्यात येतो राजवंशाय क्षत्रियानंतर तोबडतोब येणारा हा सुसंपन्न मध्यमवर्ग क्षत्रियांप्रमाणेंच या गृहपतांना स्वतःच्या श्रेष्ठत्वाचा व आर्यत्वाचा इतका तीव्र अभिमान होता वा त्यामुळे स्वतःहून हीन दर्जाच्या लोकांशी समतेच्या नात्यानं वागणें त्यांना शक्य नव्हतें स्वजातीबद्दल तीव्र अभिमान व परजातीयांशी विवाहाची बंदी यामुळे गृहपतांचा एक स्वतंत्र वर्ग बनला होता कान्हेरी (ल्यूडर्स क्र १००३) व कुडा (ल्यूडर्स क्र १०७३) येथील शिलालेखांतील गृहपति ही संज्ञा सेट्ठि या अर्थानें आलेली आहे गृहपति हे वैश्य असावेत असे डॉ जयस्वाल यांचेंही मत आहे पण गाथासप्तशतीतील गृहपति वैश्य किंवा व्यापारी दिसत नाहीत डॉ फिक् यांच्या अशेरच्या विधानाचा क्र ६०० या गाथेंतील गृहपतिसुता व तिचा हालिकनन्दन पति या जोडप्याशी समन्वय केला असता गृहपति हा सामान्य हालिक वर्गाशी नात्यानें संबद्ध असल्यामुळे त्याच वर्गातून आर्थिक, राजकीय व सामाजिक दृष्ट्या वरिष्ठ वर्गात प्रविष्ट झाला असलेला दिसतो सामान्य बहुजनाचा पाठिंबा असल्यामुळेंच त्यांच्या नावाचा व तरवारीचा दरवडेखोरांना दरारा वाटतो

गाथासप्तशतीत पुलिंद व व्याध या वन्य जमातींबद्दल तिरस्कार किंवा विद्वेष प्रदर्शित झालेला नाही नागरी किंवा ग्रामीण जनतेशी त्यांचा फारसा संबंध येतच नाहीं लंपट करणाऱ्या लंपट अहाराबद्दल तरुणानें केलेल्या तक्रारीत जातीयतेची तीव्रता नाही चंडालाचा उल्लेख विवाद्य आहे निरवसित शूद्र असल्यामुळें तो गावाबाहेर राहतो व कलालाचा निषिद्ध धंदा करतो हें खरें, पण येथें प्रकट झालेला तिरस्कार त्याच्याबद्दल नसून यज्ञसंस्थेबद्दल आहे निर्दयता या गुणविशेषाच्या अनुरोधानें खाटकाचा उल्लेख आलेला आहे तिरस्कार स्पष्टपणें व्यक्त झाला आहे तो फक्त चंदिलाबद्दल वात्स्यायनानें नापिताला नायकाच्या परिवारात दिलेलें स्थान उत्तरकालीन असावें आणि गाथासप्तशतीतला समाज नापितावर अवलंबून राहण्याइतका सुसंस्कृत झाला नव्हता असें या उल्लेखावरून दिसतें हे सब उल्लेख स्मृतींचें अखेरचें गुप्तकालीन संस्करण होण्याच्या पूर्वीचे आहेत अस्थिसंचय व गीतायज्ञ हे धार्मिक विधि गाथासप्तशतीतल्या स्त्रियांनीं केलेले आहेत, गुप्तकालीन स्मृतिकारांनीं त्यांचे धार्मिक हक्क हिरावून घेण्यापूर्वीची ही परिस्थिति आहे हे उघड आहे

जातीयतेची भावना ऐहिक वा धार्मिक सत्ता व स्थानिक वा प्रादेशिक सत्त्या

याच्या अनुरोधानें सामान्यत. आक्रमक किंवा आक्रदक स्वरूपात प्रकट होते. तसा प्रकार गाथासप्तशतींत प्रत्ययाला येत नाहीं यावरून निष्कर्ष निघतो कीं समाजाचें थोडेंबहुत वर्गीकरण झालेलें असलें तरी तें तोंवर बंदिस्त झालेलें नव्हतें.

**आचार :**

गाथासप्तशतातील कौटुम्बिक व धार्मिक आचार त्या त्या प्रकरणात सांगितलेले, आहारविहारादि आचार चालू प्रकरणात ज्या त्या शीर्षकाखालीं सांगितले, आता सामान्य आचार सांगतों.

गाथासप्तशतींतल्या पुरुषाचे केंस लांब (क्र १०८, १८८) आहेत ऋग्वेदात (१ १७३ ६) व अजठ्याच्या चित्रपटातही असे उल्लेख आढळतात व दृश्यें दिसतात लांबसडक केंस हें स्त्रियांच्या सौंदर्याचें लक्षण (क्र ५६६, ५७२) मानण्यात येई स्त्रिया केंसाचा अंबाडा (क्र. २७३, २९१, ५५०) बांधतात

गाथासप्तशतींतील समाजाला आभिजात्य (क्र ३८, २६१, २६६, ९३९) व कुलीनत्व याची जाणीव आहे आभिजात्यामुळें पुरुष पराधीन (क्र. २६५) असतात. बाहेरची ओढ असली तरी त्याजवर कुटुंबाचा दाब इतका असतो कीं सायकाळीं घरा येऊन पादप्रक्षालन (क्र. १३०) केलें कीं पुन्हा चक्कर टाकायला बाहेर पडू शकत नाहीं. अकुलीन (क्र २५३), कृपण (क्र ६८, ८३), दु शिक्षित (क्र ५६, ९१, २७४, ७३२, ८७२), नकली धार्मिक (क्र ६०८), पळपुटे (क्र ६३१) व क्षुद्र शिकारी (क्र ६२९) यांबद्दल गाथांनीं तिरस्कार व्यक्त केलेला आहे दाक्षिण्य (क्र. ८५, ९३८), परोपकार (क्र ४७२, ९९५, १००६), शिष्टाचार (क्र ५०, ५१, ३१७, ६१४, ७५४) व शौर्य (क्र ५२८) यांची प्रशंसा केलेली आहे सायावरून मिरवून गुणीजनाचा (क्र १९१) व नगारे वाजवून विजयी मल्लाचा (क्र. ६८९) सत्कार केलेला आहे, नालायक व निरक्षरांचा समाजाकडून गौरव होत असलेला पाहून त्याबद्दल नापसती (क्र १९१) व्यक्त केलेली आहे उदार (क्र २३०) व रसिक (क्र ७३३) यांच्या वाट्याला आलेल्या दारिद्र्याबद्दल दैवाला दोष दिला आहे

गा गाममशततल्या अनक गाथा स्त्रियाना लिहिलेल्या आहेत (अन्ध्रलक्ष्मी क्र १७ , ०२८, २६३, ४७०, ४७५, ५०५, १०५, ०८० कुरंगी उर्फ कुरगी क्र ६१८, ८९४, गुणमुग्धा क्र ४७४, ग्रामकुट्टिका क्र ८८, १२८, ३०१ झेञ्झा क्र ५८४, नाथा क्र ४१, प्रहता क्र ८६ पृथिवी क्र ८६ पेश्र क्र ४४८, मृगाङ्कलक्ष्मी क्र ४२६ रेवा क्र ४,२, ५०६ रेहा क्र १,३, रेवती क्र ८७, रेवा क्र ८७, ९०, रोहा क्र ४१ वोहा क्र ६३० शशिप्रभा क्र ३०४, सिरिसत्ता क्र १४० हस्तिनी क्र ७१७ ) यावेरा काही नावें एकाच लेखिकेची असणे शक्य आहे अनेक सामान्य स्त्रियाही सुशिक्षित आहेत त्या पतीशीं पत्रव्यवहार ( क्र २४४, १७१, ८०४, ८२७, ८३५ ) करतात ज्या अशिक्षित आहेत त्या पतीच्या प्रवासाचे दिवस मोचण्यासाठी भिंतीवर रेघा काढतात किंवा काढलेल्या पुसतात ( क्र १७०, २०६, २०८, ८६१ ) अगर विरहाचे दिवस हातापायांच्या बोटांनी ( क्र ३०७ ) मोजतात दहाना व वीसानीं गणना करण्याच्या पद्धति बोटांच्या सख्येवर आधारलेल्या असाव्यात

माहेरी श्रीमंती व सासरी दारिद्र्य असल तरी कुलवधू सासरच्या आभिजात्याचा अभिमान ( क्र ३८ ) बाळगते एकांतीं ती पतीला आज्ञा देत असली ( क्र ०३ ) तरी अन्यत्र ती त्याची अवज्ञा करीत नाहीं कुलवधूचा पति वृद्ध असला तरी तो तिला प्रिय ( क्र २१३ ) असतो पति उदासीन असला तरी ती त्याला आदरानें ( क्र २,६ ) वागवते आणि केवळ औपचारिक दाक्षिण्यात समाधान ( क्र ८१ ३५३ ) मानते प्रियकराचा निषेध करावयाचाच झाला तर तोही ती मर्यादा राखून ( क्र ५१३, ७०९ ) करते पातिव्रत्य हच स्त्रियांचें भूषण आणि लज्जा हच कुलस्त्रियाच प्रसाधन ( क्र ८ ० ) होय कुलीन विरहिणींचा विभ्रम त्यांच्या पतीबरोबर प्रवासी ( क्र २७४, ८६५ ) होतो कुलस्त्रीनें वामकुक्षी ( क्र ६५, ६६ ) करू नये, प्रियकराच्या चारित्र्याची चर्चा ( क्र ६७७ ) करू नये गुरुजन पति व सासू याविषयीं आदर ( क्र ४९३ ) बाळगावा परिचय असला तरी स्त्रीनें पुरुषाकडे त्यांच्या पत्नींची चहाडी करू नये ( क्र ७०४ ) पुरुषाशीं रस्त्यात बोलू नये ( क्र ११४ ७०४ ) दृष्टिक्षेपास मात्र मनाई नाहीं असा एक उल्लेख आढळतो आणि अन्यत्र ( क्र ७१० )

मात्र परिचित पुरुष स्त्रीकडून ओपचारिक अभिवादनाची अपेक्षा करतो कुलस्त्रियाचा अपमान करावयास कोणी धजत नाही (क्र ९७०) त्याना उपसर्ग देणाराला शासन (क्र १३८) करण्यात येतें हें खरें, पण आभिजात्यामुळेंच विट त्याचा फायदा (क्र ९३९) घेऊ शकतात

गाथासप्तशतींतल्या स्त्रिया निर्भय व स्वतत्र दिसतात ओसाड रस्त्यानें त्या एकट्या हिंडतात (क्र १०७, ११३, ८७१, ९५५) आणि चरितार्थाचे व्यवसाय नि सकोचपणें (क्र ४९, ५९८, ८९५) करतात, गीतें गातात (क्र १२८, ८३७) आणि सामूहिक नृत्यें (क्र ११४) करतात इतकेंच नव्हे, उघड्यावर परसात (क्र ६८३) किंवा नदीवर (क्र २४६) अर्धनग्न (क्र १२५) स्नान करतात प्राचीन काळात नग्नता आजच्या इतकी गर्ह्य मानण्यात येत नसे समाजाच्या मनावर हा सस्कार मुसलमानांच्या आगमना नतर झालेला आहे असें काही सशोधकाचें (Tree and Serpent Wor ship p 102) म्हणणें आहे

गाथासप्तशतीनें वाचकासमोर काहीं आदर्श माडले आहेत घरकाम (क्र २३), स्वयपाक (क्र १३) इत्यादि गृहकृत्यें आनदानें करते ती सुगृहिणी सहन शीलपणें कटुबाची विघटना होऊ देत नाही (क्र ५९) व विनयानें वागून ससार सुखाचा करते (क्र ८९०) ती सुमहिला सुखदु खात सहभागी असतो तो आदर्श पति (क्र ९९) आणि भावजयीकडे मान वर करून पहात नाहीं तो आदर्श दीर (क्र ३५) सकटात त्याग करीत नाही (क्र ३७) व नेहमा सन्मुख (क्र २१७) असतो मित्र धीर सोडीत नाहीं (क्र ९७२) व सतापत नाहीं (क्र २५०) तो सुजन आणि सुजन हेच (क्र ९४) देशाचे अलकार

नमिकानाही उघड्यावर नागवें हिंडू नये (क्र ७३५) व घरांत उकडत असलें तरी सुनांनीं अगणात झोपू नये (क्र ७७८) असें गाथाकवि साग तात या गाथाना भोळ्या समजुतीचा आधार व व्यङ्ग्य अर्थ असला तरी हा आचार सामान्य असावा प्रोषितपतिकेनें स्वत चें व दरिद्री शेजारणीचेंही शील (क्र ३६) साभाळावें, रात्रीं सावधपणें जागावें (क्र ३३६), प्रवासी मुक्कामाला आलाच तर त्याला पथारीला अगणात जागा (क्र ३७९) द्यावी असा गाथाकर्त्यांनीं सागितलें व सुचविलें आहे पाहुण्या (क्र ७३१, ९५७) व

पाहुणे (क्र २५४, ३७९, ७३१, ८०१, ९५७) यांचें घरोघर स्वागत होत आहे शिष्टाचार (क्र ५९४, ७५४,), शेजारधर्म व सुसपृच्छा (क्र ५०, ५१, ३१७) याचा समाजाला जाणीव आहे सक्टसमयीं परस्पराशी सहकार्य (क्र ३२९) आणि शरणागताला अभय (क्र २९७) हां गृहस्थाचा व गृहिणाचा कर्तव्यें मानलेलीं आहेत उनाड स्त्रीपुरुषानाही जनवादाची (क्र ५७, २०१, ५०१) कदर आहे

१० निष्कर्ष :

गाथासप्तशतींतील समाजाची वृत्ति अल्पसतुष्ट आनदा, वाटक सहकारी व साधाभोळी आहे

गाथासप्तशतींतील सामाजिक जीवनात प्राचीन कालान सहजता पदोपदी प्रत्ययास येते, गुप्तकालीन सभ्यता व समृद्धि आणि स्मृतिकालीन दृढता व सकीणता येथें कोठेंही आढळत नाहीत येथें जातीय किंवा धार्मिक अभि निवेश अगर अवहेलना आटळत नाहीं येथें सहजीवन आहे, सघर्ष नाही बौद्धान्या अशोक्कालीन व जैनाच्या खारवेलकालीन उठावणीच्या ओहोटी नतरची आणि गुप्तकालीन ब्राह्मणा उठावणीच्या भरती पूर्वीची परिस्थिति येथें प्रदाशत झालेली आहे

गाथासप्तशतींतील समाजाचा आहार साधा आहे सामान्यत ग्रामीण जनता गोपालक, शाकाहारी व शेतकरा आहे आणि वन्य जमाती शिकारी व मासाहारी आहेत वेदकालात विहित असलेलें महिष – मास (५ ३९ ७ ८, ६ १७ ११) अद्याप निषिद्ध झालेलें नाहा अहिंसेचा आग्नरता उल्लेख केवळ अद्भुतरम्य स्वरूपात झालेला आहे तादूळ हें या समाजाचें मुख्य अन्न आहे पक्वान्नेंही तादळाचीं किंवा मुख्यत्वेंकरून तादळ पदा होता त्या प्रदेशात पिकणाऱ्या पदार्थांचीं आहत मात्र त्यात नारळाचें साहचर्य आढळत नाहा त्याचप्रमाणें मासे व मीठ याचा तुटवडा दिसता या प्रमाणा वरून वाटतें कां हे लोक समुद्रकाठच्या प्रदेशातले रहिवासी नसावेत ते सह्या द्रीच्या घाटमाथ्याच्या लगतच्या प्रदेशातले व मावळातले रहिवासी असावेत हे लोक करतात ती शिकार या भागात सुलभ आढळते, विशेषत-विन्ध्याच्या सान्निध्यात या समाजातले लोक मद्याचें सेवन करतात, त्यांना सोम

माहीत नाही, तरी कोणी इदागारने झगलेले दिसत नाहीत या मद्यपानात अपूर्वाई नाही, निषिद्धताही नाही ही मद्य घरगुती बनावटीची आहेत श्रीमंतांची मद्ये सुगंधित आहेत आणि त्याना मुरलेल्या मद्यान्या माधुरीची जाणीव आहे येथें आढळतात ती मद्य मुख्यत्वेंकरून ऊस, तांदूळ व मोहाची फुलें यापासून सिद्ध झालेली आहेत हा वृक्षाचा माल ही वर निर्दिष्ट केलेल्या प्रदेशात मुबलक मिळतो चाउल चालवीत असलेल्या पानकुटीच्या उल्लेखावरून दिसतें की त्याना नि सारणाची प्रक्रिया नुक्तीच अवगत झालेली असावी

गाथासप्तशतीतला समाज हा साध्या व सामान्य जनाचा बहुजनसमाज आहे हें त्यांच्या विहारावरून ही दिसून येत या लोकाचे घरगुती व मैदानी खेळ आणि सार्वजनिक उत्सव विलसचा आहेत सारवलेल्या अगणात किंवा माजघरात सागट्या व फुगड्या होतात ग्रामागणात जत्रा भरतात आणि मैदानात खादलेल्या हौदात कुस्त्या खेळल्या जातात, आणि गावालगतच्या तळ्यात जलक्रीडा मस्कृत प्राकृत मधर्षावद्दल विख्यात असलेली सातवाह नाची जलक्रीडा मात्र अत पुरातील वार्धीव तलावात झालेली असावी फाल्गुनोत्सव हा त्याचा मुख्य उत्सव त्यातही त्याची वृत्ति दिसून येते या उत्सवाला उत्तरकालात आलेले श्रीमती व सर्कीर्ण स्वरूप येथें दिसत नाहीं बहुजनसमाजाच आरोग्य चागलं दिसत अशोकाच्या लेखात उल्लेखिलेल्या आरोग्य सस्था मात्र येथे कोठ दिसत नाहात एका सोन्याला चार रगीबेरगी वस्त्रें गुडाळून तो चावडीसमोर उभारला का इद्रध्वजमहोत्सवाची तयारी झाली ! जेजुरीला काव्याचा उत्सव असतो, त्यासाठी सगमनेरापासून अशा शृगारलेल्या काव्या वाजत गाजत येतात ही प्रथा ध्वजपूजेशी सबद्ध आहे का काय ?

गाथासप्तशतातल्या समाजाचा वस्त्र साधा आहेत स्त्री–पुरुषाचा वस्त्रें सामान्यत कापसाच्या धाग्याची आहेत समकालान शिल्पात आढळणाऱ्या उत्तरीय व उष्णीष ह्या वस्त्राचा बहुजनसमाजात वापर असलेला दिसत नाही सामान्यत हे लोक वापरतात ती वस्त्रें जाडाभरडी घडाती व तोकडी आहेत श्रीमत स्त्रिया मात्र शिरशिरीत वस्त्रें वापरतात त्याच वस्त्रधारण विरुद्ध होतें का मकाठ यावावत स्पष्ट उल्लेख आढळत नाही नेसत्या वस्त्राच्या आतन त्या नीवी धारण करीत असाव्यात असे वाटतें स्त्रिया डोक्यावरून

पदर घेत असावेत. त्या केशपाशात अलंकार व फुलें माळतात, आघाडीला मोरपिसें खोचतात. त्या अर्थी त्यांच्या माथ्यावरला पदर वेळोवेळां ढळत असावा किंवा त्याची फारशी मातबरी नसावीसें दिसते. गाथासप्तशतीच्या काळातही मराठी धर्ताची चोळी वापरात असलेली दिसते. गाथासप्तशतीची रचना झाली त्या भागात कापाशी बरीच पिकत असावी. चरखा व हातमाग गावोगाव चालत असते तर त्याचा उल्लेख झाल्यावाचून न राहता.

गाथासप्तशतीच्या काळातल्या समाजाची साधी राहणी त्या लोकांच्या अलंकारावरून प्रत्ययास येते. गुप्तवाकाटककालीन अलंकाराची विपुलता व विविधता तत्कालीन भित्तिचित्रात, शिल्पात व साहित्यात दिसून येते. तशी परिस्थिति येथें आढळत नाही. सातवाहन कालात विविध अलंकार उत्पन्नच झाले नव्हते असेंही म्हणता येत नाही. येथें श्रीमंत स्त्रिया तेवढ्या थोडेबहुत अलंकार वापरतात, त्यात क्वचित् रत्नेंही जडविलेली आहेत. पण ती सार्वजनिक सुसंपन्नतेचा द्योतक असावीत असें दिसत नाही. पानें व फुलें हेच सामान्य जनांचे अलंकार आहेत.

गाथासप्तशतीत वर्ण आहेत, पण वर्णाभिनिवेश नाही, व्यवसायजन्य जाति आहेत, पण जातीयता नाही. वरिष्ठ वर्गांना दर्प नाही, सामान्यांना दीनगंड नाही. आर्यांना व क्षत्रियवैश्य स्त्रीपुरुषांना लगट करण्याची हरिष स्त्रीपुरुषांना हौस आहे, ती केवळ कुतूहलजन्य आहे, तीत आत्मलक्ष जातीयतेचा आविष्कार दिसत नाही. परचक्र व तज्जन्य अगर सामान्य संकट यांच्या निवारणाची जाति संस्था ही एक सामाजिक योजना आहे. मग हे चक्र राजकीय असो, किंवा आर्थिक, धार्मिक अगर सांस्कृतिक असो, ही संस्था समाजाच्या आत्मसंरक्षणेची किंवा प्रतिकारितेची द्योतक नाही, पराभूततेची द्योतक आहे. परचक्राविरुद्ध होणाऱ्या उठावणीचे प्रयत्न किंवा प्रोत्साहक नेतृत्व स्वीकारणाऱ्या व्यक्तींना व वर्गांना प्रथम छळ सोसावा लागतो. शांति यशस्वी झाली म्हणजे प्रभुत्व प्राप्त होते आणि युगधर्माच्या अनुरोधाने समाजाची पुनर्घटना होते. त्यांच्या नावलौकिकामुळें आणि त्यांच्या वर्गाच्या प्रतिष्ठेमुळें अशा स्वरूपाचे अवलंबन होते आणि ती समाजात अमर होते. मग पुन्हा शांति होते, कारण समाजाचे चैतन्य हे

सत्व चिरजावी आहे अशा क्रान्तींच्या अनुरोधाने व्यक्तांना व वर्गांना जाताना व जमाताना श्रेष्ठ-कनिष्ठता प्राप्त होते गाथासप्तशतीतला समाज ग्रामीण आहे येथील रोज्यापाठ्यात ब्राह्मणाची वस्ती दिसत नाही, त्याचें नात्र ही दिसत नाहीं, त्याचें तथाकथित सांस्कृतिक प्रभुत्व व सामाजिक नेतृत्व नष्टप्राय झालेलें दिसतें बौद्धही हतप्रभ झालेले दिसतात समाज जिवट ग्रामसंस्थाच्या जिवावर जगत असलेला दिसतो ही परिस्थिति पारतन्त्र्यजन्य असावी, राज्य संस्थेच्या विस्कळितपणाची द्योतक असावी असें अनुमान होतें गाथासप्तशतीतल्या समाजाचा आचाराचा वारसा शिष्ट समाजाला साजेसा आहे, थोडीबहुत भ्रष्टता दिसते तिचा संदर्भ वरील परिस्थितीशाच लावला पाहिजे.

पहिल्या सातकर्णीनें यज्ञसंस्थेचा पुनरुद्धार केला, नंतर वैदिक धर्माची परागति झाली गोतमीपुत्र सातकर्णीनें क्षहरात क्षत्रपाचा उच्छेद करून चातुर्वर्ण्याची पुन स्थापना केली त्या दरम्यानच्या काळातली ही परिस्थिति आहे, असें या साधनावरून अनुमान होतें

## १५. गाथासप्तशतींतील आर्थिक जीवन

### १ आर्थिक जीवन

गाथासप्तशतीतला समाज सर्वात वन्य व ग्रामीण आहे मळईच्या सुपत्र प्रदेशात स्थायिक झालेला नाहीं किंवा औद्योगिक व व्यापारी केंद्राशीं संबद्ध नाही. जसा देश तसे लोक, जसा देश तसे व्यवसाय

गाथासप्तशतीतील या विषयाशी संबद्ध अशा उल्लेखाचा संदर्भ समजण्या-साठीं प्रथम तत्कालीन आर्थिक परिस्थितीचें सिंहावलोकन केलें पाहिजे

त्या काळात कऱ्हाड, जुन्नर, नगर, नाशिक, पैठण व वैजयंती ( वनवासी) हीं शहरें भरभराटीत होतीं अजंठ्याच्या घाटातून जाणाऱ्या हमरस्त्यानें पैठणची पेठ उत्तर हिंदुस्थानातील उज्जयिनी आदि व्यापारपेठांशा जोडलेली होती पाण्डवलेण्यावरून जाणाऱ्या मार्गानें गोवर्धन व नाशिक हीं ठाणीं गोपाऱ्याशीं आणि नाणेघाटांत जुन्नर व माळशेज घाटानें कल्याणशी संबद्ध होत भडोच, सोपारा, कल्याण व चोल हीं बंदरें भरभराटीत होतीं जयगड, दाभोळ, बाणकोट, राजापूर व विजयदुर्ग या बंदरातूनही परदेशाशी

व्यापार चालू होता. रुप, पोटिन व तांब या धातूंची नाणी अंतर्गत व्यवहारात चालत होती व्यापारी व कारागार याचे संघ होते आणि त्याचेकडे सुपूर्त केलेल्या ठेवींवर ते दरसाल दर शेंकडा नऊ ते बारा टक्के व्याज देत असत समकालीन शिलालेखात पुढील कारागीर उल्लेखिले आहेत आवेसणि (Artisans), ओदयनिक (Fabricators of hydraulic engines), कढिचक (Brick layers), कमार (Iron workers), कासाकार (Braziers), कुलरिक (Potters) कोलिक (Weavers), गधिक (Perfumers), गोलिक (Herdsmen), चम्मकार (Leather workers), तिलपिशक (Oil pressers) तेसकार (Polishers) धम्मिक (Corn dealers), मणिकार (Jewellers), मालाकार (Florists), मीठिक (Stone polishers), लेखक (Writers), लोहवाणिय (Iron mongers), वढकि (Carpenters), सुवर्णकार (Goldsmiths), सेलवडकि (Stone-masons), हालिक (Agriculturists) यापैकी ओदयनिक, कासाकार कुलरिक, कोलिक तिलपिशक तेसकार व धम्मिक याच्या श्रेणींचा ही या शिलालेखात उल्लेख आलेला आहे हे उद्योगधंदे सामान्यत व्यापारी शहरातच चालत असले पाहिजेत शेतकऱ्यान्या दैनदिन जीवनाशीं व व्यवसायाशी संबद्ध असतील तेवढेच व्यवसाय खेड्यापाड्यात चालणार व गाथासप्तशतींत उल्लेखिले जाणार ह उघड आहे गाथासप्तशतीला संपन्नता व दारिद्र्य या दोहाचीही चांगली जाणीव आहे J

सपादकाला त्यान्या पूर्वजान्या व त्यान्या समकालीनाच्या संपन्नतेच्या स्मृति असल्याच पाहिजेत नद व अशोक आणि नाणेघाटातील देवस्थातील शिलालेखात ज्यान्या यज्ञातील महादानाचा उल्लेख केलेला आहे तो सातकणी यान्या अपरपार संपत्तीची व दानशूरतेची आठवण त्याला असलीच पाहिजे विप्लोद्धारात ज्याच वक्तृत्व शकराच्या तोडाच त्या शालिवाहनाच स्मरण (क्र ४६७) त्यानें आदरपूर्वक केलेले आहे कुशल मजुराला लक्ष मुद्रा बक्षीस देणाऱ्या विक्रमादित्याचा उल्लेख (क्र ४६४) केला आहे आणि चार गाथाना दशकोटि मुद्रा मानधन देऊन (क्र ९९९) दातृत्व व रसिकता या गुणात त्यानें पृथ्वीनिमारर वरी केलेली आहे

वाराहा सहन ( क्र. ३८ ) होत नाहा उदरचिंतेनें सुख वाळवडत ( क्र ८३), पाण मनुष्याला लॉचट (क्र १३४) करत, उसनवारी (क्र १९६) करायला लावत, मिंधी भीक मागायला ( क्र १६१, १९५, ५१३ ) लावतें क्र २९० व ४७२ मधाल डोहाळे लागलेल्या वधूची स्थिति सहृदयाला पीळ पाडणारी आहे

खरेदा करावयाच्या मालाचा नमुना ( क्र ६२० ) पाहण, त्याच मूल्य ( क्र ६९८ ) विचारण, महाग ( क्र १६८ ) का स्वस्त ( क्र २८७ ) त ठरविण, तराजूनें तोलून ( क्र १९१ ) किंवा मापानें मोजून ( क्र १५२ ) माल घेण, रोखीने ( क्र ६८ ) किंवा वस्तुविनिमयानें ( क्र २३८ ) मूल्य देण ही व्यवहारपद्धति प्रचलित असल्याचे दिसून येते घाऊक व व्यापारी व्यवहाराचा उल्लेख कोठेंही आलेला नाहा लोकगीतात त्याचा आढळ होणें शक्यही नाही

भारत हा आताप्रमाणच तेव्हाही कृषिप्रधान देश होता शेतकरी व शेतात पैदा होणारे पदार्थ यांच्या उल्लेखांच्या संख्येवरून गाथासप्तशतीच्या काळातही अशीच परिस्थिति असल्याचें दिसून येतें

## ~ शेत, शेती व शेतकरी

गाथासप्तशतीत शेत जमीनीला छित्त ( क्र ९ ) व छेत्त ( क्र १६८, १६९, ४५७, ७९१ ) = क्षेत्र या संज्ञा योजलेल्या आहेत समकालीन शिलालेखात खेत हा संज्ञा आढळते क्षेत्र म्हणजे लागवडीखालची लागवडीला आणण्याजोगी किंवा सुद्दाम पड ठेवलेली जमीन शेताला सीमादर्शक किंवा जलविरोधक बांध ( क्र १६८ ) असत आणि बांधाना कुरण ( क्र ९६ ५१३, ६३५ ) असत हा शेतें ग्रामसीमेला भिडलेली ( क्र ८०२ ) आहेत काळींची मर्यादा दर्शविण्यासाठीं ग्रामसीमेवर तणपुरिस-तृणपुरुष ( क्र ७४० ) बुजगावण्या मारखा उभा केलेला आहे लागवडीला लायक असलेल्या जमीनापलीकडे कुरण असत व त्यापलीकडे अरण्यें वेदकाळात जमीनीचं क्षेत्रफळ मोजून त्याचीं क्षेत्रात विभागणी करण्यात येत असे ( १ ११० ) आणि त्यावर शतवल्याचा मार्गदर्श दृष्ट ( ८९१ १-६ ) असे सातवाहनकाळात जमीनमोजणीसाठीं निवत्तण = निवर्तन हें माप (Nasik Gazetteer Pāndu Leṇā Inscr No 4) वापरात होतं ४ हात = १ दण्ड, १० दण्ड = १ रज्जु आणि

३ × ३ रज्जु = १ चौरस निवर्तन असा तपशील कौटिल्याने अर्थशास्त्रा (Shamsastry P 118) दिलेला आहे महाराष्ट्र शब्दकोशात दिला आहे तो अर्थ असा १. गुजराथेतील चार विघे जमीनीचें परिमाण २ दहा हात लांबीच्या वीस काठ्यांचें माप, चौरस चौरस ४००० हात ३ चौरस चौरस तीनशें हात जमीनीवर शेतकऱ्याचा मालकी हक्क असे आणि शेत जमीनीवर कर घेण्याचा किंवा करमाफी करण्याचा सरकारला अधिकार असे हेंही त्या लेखावरून दिसून येते

जमीन नांगरण्यासाठीं हल (क्र ३२४, ६९०, ७८९) व लङ्गल (क्र १६५) वापरलेले आहेत हल हा हलका नांगर हलक्या जमीनीसाठीं वापरण्यात येत असावा आणि लङ्गल हा मोठा व वजनदार असून तो भारी जमीनीसाठी वापरण्यात येत असावा क्र ६९० मधील हल भात शेतात फिरलेला आहे क्र. ३२४ मधील हल चिखलात चाललेला आहे, त्याचा फाळ वारंवार आणि ओढून काढावा लागत आहे अशी नांगरट फक्त भातशेतात संभवते क्र. ७८९ मधील 'कठिण खर-वीर' अशी खडकाळ जमीन प्रथमच नांगरण्याकरता हल वापरलेला आहे खर = कठोर (दे ना २ ७८) = खडकाळ आणि विर = मार्गणें (हेम ४ १०६) यावरून तर करवीर हें ग्रामनाम सिद्ध झालेलें नसेल[2] भातजमीनीसाठीं वापरण्यात येणारा हलका नांगर मावळातले शेतकरी हल्लीही खांद्यावरून घरातून शेताकडे वाहून नेताना दिसतात क्र १६५ मधील लङ्गल कपाशीच्या शेतात उभा आहे कपाशीला कसदार जमीनात खोल नांगरट करावी लागते या दोन्ही जातीच्या नांगराना लोखंडी फाळ बसविलेले आहेत, तसें नसतें तर क्र ७८९ मधील खडकाळ जमीन नांगरताना ठिणग्या उडाल्या नसत्या नांगराला जुपलेलीं जनावरें जुवाला जोत्त = योक्त = कासऱ्यानें बांधलेलीं असत आणि त्याना अवहासिणी-वेसणी घातलेल्या (क्र ६९२) असत नांगर ओढण्यासाठी बैल व रेडे या दोहोंचा उपयोग होत असावा प्रत्यक्ष उल्लेख मात्र आलेला नाही तरीही क्र २३८ व ६९३ मधील उल्लेखावरून बैलाबद्दल निश्चित अनुमान करता येते सामान्यत नांगराला दोन बैल (Jataka II 165, 300) जुपीत असत नांगरणीपूर्वी नांगराची पूजा करीत असत क्र ३५८ या गाथेंत प्र यज्ञ पेरणीचा एकत्र उल्लेख आलेला आहे हल्लीप्रमाणेच तेव्हाही

मुठीनें यी पेरीत असत. नागरणी व पेरणी हीं मेहनतींचा कामें पुरुषांना केलेलीं आहेत आणि शेत राखणीचें ( क्र. ६९०, ६९१, ८९५, १००६ ) आणि न्याहारी ( उवहारिआ, पाउहारी ) पोचवण्याचें ( क्र. ६९२, ७२६ ) अशीं कमी मेहनतीचीं कामें मोलान्या व घरच्या स्त्रियांनी केलेलीं आहेत.

गाथासप्तशतीतील पिकें मुख्यत्वेंकरून पावसाळी आहेत क्र ५६७ मधील साळीचें शेत पाण्यानें भरलेलें आहे आणि क्र. ३९० मधील शालिक्षेत्रातून तर पावसाळी पाण्याचा प्रवाह वाहलेला आहे अशीं दृश्यें आजही मावळात दिसतात पावसाळी पाण्यावर पिकणाऱ्या जमीनीला केदु आणि विहीरीच्या पाण्यावरच्या जमीनीला सेतु अशा संज्ञा योजलेल्या आढळतात. पाण्याच्या भरपूर पुरवठ्यावाचून उसाचें पीक निघणें शक्य नाही, मग हें पाणी कालव्याचें असो किंवा विहिरीचें. क्र ४९० या गाथेत रहट्टघडि–रहाट-गाडग्याचा उल्लेख आहे. या यंत्राला इंग्रजीत पर्शियन व्हील, इराणी चाक अशी संज्ञा आहे. भूमिगत जलप्रवाहाचा व जलाशयाचा शेतीसाठीं उपयोग करण्याच्या अनेक योजना इराणात वापरात आहेत त्या अर्वाचीन आहेत असें गृहीत धरून गाथासप्तशतीचा काळ अलीकडे ओढण्याचा कांहीं संशोधकाचा प्रयत्न आहे तो योग्य नाहीं. ऋग्वेदात ( १०.१०१.५–६ ) रहाटगाडग्याचा उल्लेख आहे श्री चित्रावशास्त्री यांच्या भाषांतरावरून त्यावद्दल स्पष्ट कल्पना होत नाहीं, शिवाय या सूक्तात एतद्विषयक संज्ञा प्रत्यक्ष आलेली नाहीं. वायांनीं परस्परांनी बांधलेली भांडीं आणि विहिरीतून ओढलेल्या पाण्याचा अखंड प्रवाह याचा समन्वय अशा यंत्राचें अस्तित्व मानल्याशिवाय होऊ शकत नाहीं अर्थात् हे यंत्र अर्वाचीन किंवा परकी आहे असें मानण्याचें काहींच कारण नाहीं

हलिअ = हलिक ( क्र ३१७, ३६०, ४६७, ६९३ ), हलिक पुत्र ( क्र ८४, १८०, ३७३, ४५८, ६००, ६०३ ७४० ८९९ ), हलिक-पुत्रि ( क्र. ३८८, ८५७, ८५८ ), हलिक स्नुषा ( क्र १०७, ४४१, ९५३ )

हल धारण करतो तो हलिक, नांगऱ्या, शेतकरी हाता पळी पोथी धारण करतात म्हणून स्वत ला वरिष्ठ म्हणवून घेणाऱ्या काही जमातीं हातीं हल धारण करणाऱ्यांना हलके गणतात ही वृत्ति हानिकारक आहे. गाथाकोशाच

नव्हे व्यावहारिक हा नाही वस्तुत हरी हा हलाचा पुतारा रलयोरभेद या नियमानुसारही हल ह प्रतीक धारण करण्यात हलधर बलरामाला कमीपणा वाटला नाही हाती हल घेऊन जमीनीचे कर्षण करण्यात स्वपणालाही हलकेपणा वाटला नाही

गाथासप्तशतीतला हालिक अडाणी (क्र १८०) आहे, अल्पसंतुष्ट (क्र ३१७) आहे, त्याचें मनगट बळकट (क्र ७८९) आहे आणि तो कष्टाळू (क्र ३०४) आहे तो नागरतो (क्र ३२४), पेरतो (क्र ३५८), राखतो (क्र ५५०), मापणी करतो (क्र ८९), मळणी करतो (क्र ६८८) हालिक फारेकी बरेच पामर (१,९,२३८ ३५८ ६८९,६९२) आहेत क्र ८४ मधील हालिक सधन असावा क्र २३८ मधील हालिक इतका दरिद्री का बैल खरेदी साठी त्याला पाथरणे विकावा लागतात हालिकाचे आपल्या शेतावर पोटच्या पोराएवढे प्रेम (क्र ५६७) असतें हालिकाची कामासक्ति अनेक गाथात वर्णिलेली आहे विशेषत त्याला आर्य स्त्रियाबद्दल वाटणारें आकर्षण (क्र ८४) आणि त्यामुळ आर्यांच्या रोपाची धास्ती (क्र ३९०) हालिकान्या स्त्रिया दुग्धसमुद्रातून निघालेल्या लक्ष्मीसारख्या (क्र ३८८) सुंदर आहेत, त्यांचे स्तन पुष्ट (क्र ८०७) आहेत एवढेंच नव्हे एरडान्या पानाएवढे विस्तीर्ण (क्र २५७) आहेत देशीत एरडाला पचगुलि (दे ना ६ १७) अशी संज्ञा आहे, ती मोठी अन्वर्थक आहे हालिक स्त्रिया इतक्या अल्पसंतुष्ट आहेत की त्याना नवें वस्त्र मिळालें (क्र २४१) का अस्मान ठेंगण वाटतें आणि पतीची मना साभाळण्याविषयीं इतक्या तत्पर व एवढ्या सहनशील की त्या त्यान्यासाठी स्वत दौत्य करावयासही माघार घेणार (क्र ८४) नाहीत हालिक पुरुषाना आर्य स्त्रियाबद्दल वाटत तस आकर्षण हालिक स्त्रियाना गृहपति पुत्राबद्दल (क्र १०३) वाटतें क्र ४१८ व ८५८ या गाथात लैंगिक विकृतीचे उल्लेख आलेले आहेत

हालिकाचा जीवनक्रम कसाचा सकाळ शेतावर फेरी (क्र ८९२) टाकावी दिवसभर दमछाक होईपर्यंत चिखलात पावसात नागरट (क्र २२४) करावी आणि घरी जावें तर रानी दुकले शेत उदरानी कुरतडावें (क्र ७६२) किंवा रेड्यानी तुडवाव (क्र ४८९) रान उघडार, जवानीनें तटतटल्या, सावळ्या राणाला कर्णात घेऊन झोंपावे आणि विधुर असल्यास घराच उदासवाणें बसून

रहावे ( क्र. ३७३ ) किंवा काम नसले तरी शेतातच वस्ती ( क्र १६९ ) करावी आनंद काय तो एकदाच– खळ्यावर पाडऱ्या शुभ्र तांदळाची रास पडेल ( क्र ६८९ ) तेव्हा।

गाथासप्तशतीत पुढील पिकाचे उल्लेख आलेले आहेत, ऊस ( इच्छु, उच्छु, पुडइच्छु, क्र ५४१, ५५८, ७३४, ७६९, ७७० ), कपाशी ( कप्पास, तूल, फलही, फलिहः क्र १६५ ३५९, ३६०, ५४९ ६७९, ८०१ ), कोहाळा ( क्र ७६०, ७९६ ), चणे ( चणअ क्र ५५७ ), तांदूळ ( कलम क्र ६१०, ६९१, व्रीहि क्र ९ ५६७, ५६८, ६८९, ६९०, ७८० १००३ ), तिल ( क्र ८ ६९०, ७२३ ), तूर ( तुवरी क्र ३५८ ), मोहरी ( राइआ क्र १७१ ), यव ( क्र ८०२ ) वालुङकि ( क्र १० ) आणि शण ( क्र ९ ) आणि गवतापैकी तृण ( तण क्र ७७, ३७९, ३९८, ७२६ ), पलाल ( क्र १०९, ३३० ) व सिप्पिर ( ३३० )

या उल्लेखावरून स्पष्ट दिसते की गाथासप्तशती निर्माण झाली त्या प्रदेशाच तांदूळ हेंच मुख्य अन्न व पीक आहे आणि जी तृणें उल्लेखिलेली आहेत तीही भातशेतीऱ्याच भागातलीं आहेत छप्पर, बिछाना व शेकोटी या तीन्ही कार्यांसाठी भाताच्याच पेंढ्याचा उपयोग होऊ शकतो मात्र येथें नारळीची झाडें नाहीत आणि क्र ७८० मधील साळीऱ्या शेताचा उल्लेख विन्ध्याऱ्या साहचर्यात आलेला आहे गाथासप्तशतीऱ्या निर्मितीची स्थलनिश्चिति करताना हे आणि कपाशीचेही उल्लेख विचारात घेतले पाहिजेत

येथें तांदळाऱ्या तीन जातांचे उल्लेख आलेले आहेत त्यांऱ्या ओळखीबद्दल मतभेद आहेत सामान्यत कलम म्हणजे कोळंबा, सालि म्हणजे गरवी आणि व्रीहि म्हणजे हळवी गरवीचें पीक सुमारें सहा महिन्यांत तयार होतें क्र ५६८ मधील साळीचे पाय हिंवाळ्यातलें दव पडूल तरी तयार झालेले नाही क्र ६८९ मधील साळीचा तांदूळ शरद् ऋतूत तयार झालेला आहे हळवाच पीक सामान्यत तीन ते साडे चार महिन्यात तयार होतें आणि कोठें साठ दिवसात ऋग्वेदात तांदुळाचा उल्लेख नाही आणि व्रीहि हा प्रथम अथर्वांत ( बुदपूर्व जा पृ २९० ) आढळतो गोदावरीच्या पारसरात पहिल्या उन्हाळ्यात सातमानें जलद वाढणारा नाचणी च। पात लागवडली, ती हीच तर

नसेल ? तादळाच्या शेतात पाणी तुंबविण्यासाठी उतारावर बांध घालणें, घिरिटावर भात भरडणें आणि उखळात मुसळानें तांदूळ काढणें, या पद्धति तेव्हाही प्रचारात होत्या असें क्र. ५६७, ५६८, व ७९४ या गाथावरून दिसतें खळ्यावरली नव्या तादळाची पाढरी शुभ्र रास आणि शरद् ऋतूंतील काटेरी चादणें याची क्र ६८९ मधील तुलना नवकाव्यातली असावी असें वाटण्याइतकी अकल्पित आहे वैदिक वाङ्मयात क्षेत्रें व मुलें याचा उल्लेख एकाच भावनेनें केलेला आढळतो ( बद्धपूर्वजग पृ १७८ ), तसा उल्लेख क्र ५६७ या गाथेंतही आढळतो.

भारतीयाना ऊस अथर्व कालापासून (१·३४·५. १२·२·५४) माहीत आहे क्र ७३४ या गाथेंत उसाच्या पुण्ड्या जातीचा उल्लेख आहे ही जात मूळची परकी ( Watt. Commercial Products of India P 936 ) असली तरी ती अनेक शतकापासून हिंदुस्थानात स्थायिक झालेली आहे. पुण्ड्याच्या जातीपैकीं पुणेरी, बनारसी व सहराणपुरी या विशेष विख्यात आहेत. या उसाची उत्तमागनेशा तुलना केलेली आहे, वाळली सुकली तरी तिची गोडी कमी होत नाहीं म्हणूनच पुण्ड्याची लागवड लोकवस्तीच्या आसमंतात आणि साखर कारखान्याच्या आसपास करण्यात येते

गाथासप्तशतींत कपाशीचे सहा उल्लेख आलेले आहेत. एकादाच उल्लेख असता तर अपवाद म्हणून किंवा ग्रामीण जीवनाच्या आर्थिक स्वयपूर्णतेचें लक्षण म्हणून वासलात लावता आली असती. सहजीं उडवता येण्यासारखे हे उल्लेख उपरे नाहींत. गभीर नागरपूजेपासून बोंडाच्या छिचोर हास्यापर्यंत त्यांची व्याप्ति आहे तादूळ व कापूस शेजारा पिकत नाहीत. त्यांच्या दरम्यान कोरडवाहू रुद पट्टा असतो तादळी प्रदेशात पडतो तेवढ्या पावसात कपाशी कुजून जाईल आणि कपाशी पिकते त्या भागातल्या उष्णतेनें तादूळ कोळपून जाईल शिवाय या जमीनींचा कसही वेगळा असतो. म्हणून गाथासप्तशतींच्या निर्मितीसाठीं सह्य व विन्ध्य याच्या परिसरातील निसर्गत भिन्न अशा प्रदेशातील कवींचें सहकार्य झालें असलें पाहिजे असें निश्चितपण सागता येतें.

तांदळापेक्षा कपाशीचें प्रेम मौल्यवान हें तत्कालीनानाही मान्य होतें असें स्पष्ट दिसतें तादळाच्या शेतात चोरून चरणाऱ्या पोळाला घरधन्याचीच धास्ती

( क्र ९५२ ) आणि कपाशीच्या शेतात रेडा घुसला तर त्याला हुसकायला घरदार धाव ( क्र. ५४९ ) घेतें तादळाच्या पिकांची राखण घरच्या पोरी ( क्र. १००३ ) व मोलाच्या बाया ( क्र ६९०, ६९१ ) करतात तर कपाशीची राखण करण्यासाठीं अडदाड अहीरांची योजना करण्यात ( क्र. ८०५ ) येते ! पिकल्या तादळाची रास उघड्या खळ्यावर घालण्यात येते ( ६८९ ) तर कपाशीचीं बोंडें वेंचण्याचें काम चालू असतांना खुद्द गृहपतिसुता ( क्र. ३५९ ) हजर राहते !

कपाशीच्या खालोखाल तिळाचे उल्लेख आलेले आहेत. तीळ जितके उपयुक्त तितकेच पवित्र. अथर्व वेदात तिळाचे अनेक उल्लेख (१२·८·३;१२·२·५४) आलेले आहेत. तीळ व तादूळ हीं पिकें एकमेकाच्या साहचर्यांत वाढतात. इतर पिकांपैकीं मोहरीचा उल्लेख गोदावरीच्या साहचर्यात आलेला आहे एवढाच मुद्दा लक्षात घेण्याजोगा आहे

## ३ शिकार :

शिकार हा गाथासप्तशतींतील वन्याचा चरितार्थाचा व्यवसाय आहे. रघुवंश व शाकुन्तल, कादंबरी व हर्षचरित इत्यादि उत्तरकालीन ग्रथात शिकार ही वरिष्ठ व सधन वर्गाची क्रीडा झालेली आहे. हें साहित्य कृत्रिम, बहुजन-समाजविन्मुख व वरिष्ठ वर्गाधिष्ठित झालें असल्याचें यावरून नि सादिग्धपणें दिसून येतें.

गाथासप्तशतींतले व्याध करतात ती शिकार व्याघ्रादि हिंस्र श्वापदाची ( क्र. ९८५ ), हत्तींची ( क्र १२९, ६३० ) व हरणाची ( क्र. ६०१, ६१८, ६२९, ९४५, ). पुलिंदाचा उल्लेख कुंजरमृगयासक्त ( क्र. ११६ ) म्हणून आलेला आहे. व्याघ्राची व हरिणाची शिकार होते ती त्याच्या चर्मासाठीं आणि हत्तींची त्याच्या दातासाठीं हरणाचें मास हें मांसोत्तम म्हणून प्राचीन कालापासून प्रसिद्ध आहे मिरवणुकांत किंवा लढाईत डका धारण करण्यासाठी हत्ती पकडण्यात येत (क्र. ९९३) असत. प्राचीन भारतीय युद्धपद्धतांत हत्तींचें स्थान आघाडीचें व महत्त्वाचें होतें साम्प्रदायिक विधींसाठीं मृगाजिनें व यज्ञप्रसगीं प्रमुख कर्त्यांसाठीं व्याघ्राजिनें वापरण्याची प्रथा वेदकालापासून प्रचलित आहे. अशीं चर्म विकीकरता खरेदी करण्यासाठीं फेरीवाले वाणी व्याधाच्या घरोघर

(क्र. ९८१) जात असत. दांतासाठीं हत्तींची शिकार होत असल्याचे अनेक उल्लेख जातकांत (१·३२०) आढळतात. आरशाचे दांडे, बांगड्या, फण्या इत्यादि वस्तु बनविण्यासाठीं हस्तिदंताचा वापर झालेला तेथें व समकालीन शिल्पांत आढळतो.[१]

पुलिंद व व्याध शिकारीसाठीं धनुष्यबाण हेंच आयुध वापरतात. पित्याचें धनुष्य वारशानें पुत्राकडे (क्र ६६३) येत असे. एकेका व्याधाचा रानांत असा दरारा असे (क्र. १२१) कीं त्याच्या हयातींत त्याच्या वस्तीच्या आसपास फिरकण्यासही हत्ती धजत नसत. क्र. ६३० मधील व्याध असा जबरदस्त होता कीं तो एका बाणांत हत्तीला लोळवी; पण लग्नानंतर बायकोच्या नादानें तो इतका चवचवला कीं आतां त्याला पूर्वीचें धनुष्यही पेलेनासें झालें, हीच व्याधवधूंची फुशारकी आपल्यावरील आसक्तीमुळें दुर्बल झालेल्या पतीचें धनुष्य त्याला पेलावें म्हणून तें हलकें करण्यासाठीं त्या तें उघड्यावर छिलून आपलें सौभाग्य प्रगट (क्र ११९, १२०, १२२) करतात! कानापर्यंत धनुष्याची दोरी ओढून (क्र ५९४) बाण सोडला कीं जणूं वीज कडाडल्यासारखा शिंजिनीचा घोष (क्र ५४, ५५) होई चितळ हरणाची शिकार करणें हें कर्तृत्वांत कमीपणाचें लक्षण होय असें व्याधस्त्रियाही (क्र. ६०८) मानीत असत.[२]

धनुष्य (क्र. ११६, ११९, १२०, १२२, १७२, ४२४, ४७३, ५०४, ५८४, ६०१, ६१८, ६६३, ७०७, ८०२, ९८६), बाण (क्र. १०१, २१०, ३२५, ३२६, ३८१, ४२४, ४४१, ५०४, ६०१, ६३०, ९४६, ९८२, ९९८), भल्ल (क्र ५८६, ५९४) आणि शिञ्जिनी (क्र. ५४, ५५, १७७, ६२४, ५९४, ६०१)

शस्त्रास्त्रांपैकीं हा एवढाच विषय येथें घेतो कारण गाथासप्तशतींत धनुष्यबाण हें आयुध मुख्यत्वेंकरून व्याधांनीं व तेंही शिकारीसाठींच वापरलेलें आहे पहा. क्र १७२, ४७३ व ९८२ हीं धनुष्यें मदनाचीं व क्र ५८४ व ७०७ हीं इंद्राचीं क्र १०४ हें धनुष्य धूर्जटीचें आणि क्र ८०२ हें चंद्राचें, आणि बाणापैकीं क्र. १०१, २१०, ३२५, ३२६, ३८१, ४२४, ४४१, ९४६, ९८२ व ९९८ हे शर मदनाचे व क्र ५०४ मधील अर्धचंद्राकृति बाण दृष्टीचा

क १४ व ५५ मधील शिजिनीघोष बन्दिनीच्या प्रियकरा या टणत्काराचा उपमा व सकेत वगळले म्हणजे राहतात ते धनुष्यबाण व्याधपुलिंदाचें

धनुष्य हें वेदकालीन आर्यांचे मुख्य शस्त्र ऋग्वेदातलें (१० ७ २२) धनुष्य लाकडाचें असून त्याची दोरी स्नायूची आहे महाभारतकाळात कार्मुक (८ ३८ १०) या लाकडाचें धनुष्य बनवीत असत कौटिल्यानें (शाम शास्त्री पृ ११०) धनुष्याचे कार्मुक कोदण्ड द्रूण व धनु हे प्रकार दिलेले असून ते अनुक्रमें ताल चापू दारु व शृग यापासून बनविलेले असत असे नमूद केलेले आहे पुढे धातूची निर्मिति वाटली व त्याचा उपयोग अस्त्रासाठी होऊ लागला धनुष्यासाठीं शिंग व लोखड याचा जोडीनें उपयोग करावा असे अग्निपुराणात (२४५ १-१०) सागितलेलें आहे तरी हिरोडोटसच्या (७ ६९) काळापर्यंत मुख्यत्वकरून बाबूचाच धनुष्यें वापरात होतीं जोड वाकणाचा धनुष्यें यरींच उत्तरकालीन असावात महाभारतातली धनुष्यें (१ १३५ ८-९ ६ १०० १२) रगविलेली आहेत त्यावर सुवर्णाकृति व रत्नें जडविलेली आहेत धनुष्यें ती वापरणाराच्या उचीच्या व शक्तीच्या मानानें लहान मोठीं असत सामान्यत त्याची लाबी तालमान असावी असें महाभारतात सागितलेलें आहे याहून मोठीं धनुष्यें शक्तीच्या (क ६६३) किंवा निशाणाच्या स्पर्धेसाठीं वापरण्यात येत असत शिञ्जिनी म्हणजे धनुष्याची दोरी वेदकाळात ही दोरी बैलाचें कातडें किंवा स्नायू याची असे मूर्व, तृण, शण, बाबूची साल वा स्नायु यापासून धनुष्याची शिञ्जिनी सिद्ध करावा असें कौटिल्यान (पूर्वोक्त) सागितलेलें आहे शिञ्जिनीच्या प्रत्येक टोंकाला फास असे पैकीं एक फास धनुष्याच्या वरल्या आतला मस्तक टोंकाशीं असलेल्या खाचत नेहमी गुतविलेला असे धनुष्य वापरण्याच्या वळाच दुसरा फास खालच्या खाचेंत बसविण्यात येत असे नाहीं तर धनुष्याच्या कमानीची शक्ति नष्ट व्हाव याची धनुष्य वापरण्याच्या वेगवेगळ्या सज्ञा वाजसनेयी सहितेंत दिल्या आहेत आतन् = धनुष्यावर दोरी चढविणें प्रतिज्ञा = बाण लावणं आयमु = धनुष्य वाकवण आणि अस् = बाण सोडण बाण जोडून शिञ्जिनी ताणून, नेम धरण्याला सधान ही सज्ञा इतरत्र दिलेला आहे धनुष्याचा मध्यभाग

व बाणार्न अग्र आणि लक्ष्य हीं उघड्या डोळ्याच्या पातळीत येतील एवढ धनुष्य उचलून सधान साधावयाच महाभारतातले योद्धे धनुष्य उभें धरतात आणि होमरचे योद्धे तें आडव धरतात गुडघ्यावर बसून किंवा अतराळातील सधान साधावयाचे असेल तेव्हा धनुष्य आडवच धराव लागतें आपले योद्धे धनुष्याची दोरी कानापर्यंत (क्र १९४) ओढतात व त्याचे छातीपर्यंत आपले योद्धे दोरी उजव्या हातानें ओढतात, एकटा अर्जुन मात्र सव्यसाची होता ऋग्वेदात, अथर्व वेदात व पुराणात बाणाचे द्योतक असे अनेक शब्द दिलेले आहेत भल्ल (क्र ५९४) हाही बाणच आहे असें हॉपकिन्सचें (Position of the Ruling Caste in India p 273) म्हणणें आहे अर्धचंद्राकृति बाण हा भामाचा विशेष आवडता म ५८० मधील हस्तभङ्ग हा मात्र भाग असावा वेदकालीन बाण वेताचे असत त्याचीं फळें शिंगाचीं, ताब्याचीं अगर पचधातूचा असत तीं ज्वालेसारखी अणकुचीदार असत ऋग्वेदात व अथर्व वेदात आलाक्ता व दिग्ध या विषारी बाणाचा उल्लेख आलेला आहे अशा विषारी बाणाचा वापर धर्मयुद्धात करावयाचा नाही असा सक्त नियम होता अनार्यांचे जमाव व हिंस्र श्वापदें यासाठीं त्याचा उपयोग होत असावा कौटिल्यानें नाराच या लोखंडी बाणाचा उल्लेख केलेला आहे बाणाची लांबी रथाच्या आसाएवढी (म भा ७ १६६ १८) म्हणजे वावभर असे मध्ययुगीन बाणाची लांबी अडीच ते तीन फूट (Egerton Hand Book of Indian Arms) असे बाणाच्या आघाडीचें शल्य व पिछाडीचीं पिसें हीं काचाला तातीनें बाधलेलीं असत बाणाचा भाता (काण्डकरण्डश क्र ६३०) पाठीवर असे त्यात दहा ते वीस बाण असत ऋग्वेदातील धनुष्याच्या दोऱ्या (१० २७ २२) स्नायूंच्या आहेत महाभारतातल्या मूर्वा तृणाच्या अगर रेतेच्या आहेत अग्निपुराणात कातड्याच्या दोऱ्याची शिफारस केलेली आहे क्र ५४ व ५५ या गाथात शिंजिनीच्या टणत्काराचा उल्लेख आलेला आहे श्रृंगा ओढावयामुळे पीळ उकलून शिंजिनी निरुपयोगी होत असावी असें क्र ६०१ मधील उल्लेखावरून दिसतें रणधुमाळीत धनुष्य मोडतात व दोऱ्या तुटतात आणि बाण संपतात, म्हणून त्याचा साठा जवळ बाळगावा लागत असला पाहिजे धनुधरानीं सोडलेल्या बाणानीं आकाश भरून गेल्याची वर्णनें

आढळतात पण त्या मानानें हानि झालेली दिसत नाहीं म्हणून या अस्त्राचा कार्यक्षमता कमी लेखण्याकडे पाश्चात्य संशोधकांचा कल आहे

फांसेपारधी पाश लावून पाखरं पकडीत, असें क्र १३८ व १०१ मधील उल्लेखावरून दिसतें ऋग्वेदातही या पद्धतीचा उल्लेख ( ३ ४५ १ ) आढळतो क्र ७८३ मध्यें हत्ती पकडण्यासाठीं पाश लावलेला आहे हत्तींचा आटोपशीर कळप आटोक्यात आलेला पाहून शिकारी जंगलाला दोहींकडून आग लावतात आणि भेदरलेल्या हत्तींना पकडतात या पद्धतीचा उल्लेख क्र ७८४ या गाथेंत आढळतो हत्तींच्या हालचाली चालू असतील अशा प्रदेशात खड्डे खणावयाचे, ते काटक्यांनी भरून त्यावर गवत व माती पसरून भोंवतालच्या जमिनीसारखे करावयाचे आणि एकटादुकट्या हत्तीला फसवून त्यात आणून अडकावयाचें ही पद्धत क्र ७८१ या गाथेंत दिसून येते येथें हत्तींला फसविण्यासाठीं खड्ड्यात कृत्रिम हत्तीण उभी केलेली आहे हत्तीचे घ्राणेंद्रिय फार तीक्ष्ण असते त्या मानानें त्याची दृष्टि मंदच असते तशात ते माजाला आले म्हणजे स्वतःच्या मदाच्या गंधानें ते जणू अंध होतात आणि सोंडेनें जमिनीचा ठाव घेण्याचा नेहमीचा सराव विसरून बेभानपणे खड्ड्यातल्या हत्तिणीकडे धाव घेतात आणि बंधनात पडतात ही पद्धत म्हैसूर राज्यात गेल्या शतकापर्यंत चालू होती व अतिदक्षिणेकडे अजूनसुद्धा चालू आहे म्हैसूर गॅझेटीयर ( Vol I p 126-7 ) मध्यें श्री सी आर नारायणराव सांगतात 'Pits were artfully disposed along routes frequented by wild elephants or near about the pools and trees which they love to visit and being lightly covered over by a net work of bamboos leaves and earth were steedily overgrown with grass after the early showers so as to remove all causes for suspicion The animals usually so cautious saw nothing to rouse their suspicion and precipitated themselves in to the pits When the captive elephants fairly completely filled the pits there was no space in which

to throw fodder and there was absolutly no means of watering them and the period which elapsed between the fall and the rescue was usually one of starvation for them. After noosing the captive with the help of the Kumkies (or tame elephants), the pits wich by now would be slightly enlarged by the struggles of the captive beasts, were filled in with twigs, leaves and other rubbish, with the result that the animals elevated themselves automatically. This method which on account of the cruelty involved, is very rarely resorted to in Mysore at the present day still flourishes in South India & Malabar." शिकारीच्या या पद्धतीचे उल्लेख गाथासप्तशतीच्या उत्तरभागातले असले तरी त्या मात्र उत्तरकालीन नाहीत. ऋग्वेदात (५·७८·४) व सांपळ्यांत (१०·२८·१०) अडकवून सिंहाची शिकार केल्याचे उल्लेख ऋग्वेदांतही आढळतात.

## व्यवसाय :

गाथासप्तशतींत अनेक व्यवसायाचे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष उल्लेख आलेले आहेत; उदाहरणार्थ, चंदिलाचा प्रत्यक्ष उल्लेख आलेला आहे आणि प्रमाण-सूत्रावरून (क्र. १५३) अरेकगाचा व्यवसाय अप्रत्यक्षपणे सूचित केलेला आहे. या व्यवसायांपैकीं काहीं वन्य आहेत व काहीं नागरी; काहीं स्वतंत्र व काहीं गावगाड्याशीं संबद्ध; काहीं स्थायिक व काही फिरस्ते सामान्यत सारेच व्यवसाय बहुजनसमाजाचे आहेत, त्यांनीं केलेले व त्यांच्यासाठीं केलेले सुशीक्षिताचे व सुसंस्कृताचे व्यवसाय अपवादात्मक आहेत यापैकीं काहीं व्यवसायाचा येथें तात्पुरता निर्देश करतों.

पशुपक्ष्याची पारध हा वन्य जमातींचा चरितार्थाचा प्रमुख व्यवसाय. चर्म, अस्थि, स्नायु, दात, शिंग, पित्त, चरबी व मास इत्यादि पदार्थांचा व्यापार या जमाती करीत असत.

सुवर्णसिद्ध अल्कार, त्यात जडविण्यासाठीं नील ( क्र. ३०० ), पाम्मराब ( पद्मराग = माणिक क्र ७१ ), मणि ( क्र. ८०३, ९७०, ९७८ ) व मरगअ ( हेम १ १८० मरकत = पन्ना क्र ४७५ ) इत्यादि स्थलोद्भव आणि प्रवाल ( क्र ५७८ ) व मोती ( क्र ६६९, ९९८ ) इत्यादि जलोद्भव मौल्यवान् रत्नें, अकुश ( क्र ९९३ ) करवत ( क्र १७० ) खड्ग ( क्र ७८७ ), चिल्यत ( क्र ९९७ ), तरवार ( क्र ७८७ ९९७ ), नागराचा फाळ ( क्र ६९० ७८९ ), बाणाची अग्रें, मेख व शूल ( क्र ६४ ), शस्त्रा ( क्र ७८० ), सुई ( क्र ३९४ ७७० ) इत्यादि लोह ( = लोखंड क्र ९९७ )-सिद्ध कलश ( क्र १३९, १४० ४०६, ५७६, ८३१ ), पात्र ( क्र २४० ) या ताम्रसिद्ध घडा ( क्र १०९, १७० ) इत्यादि धम ( धर्म पाणिनि ४ ३ १६८ ५ १ ०५ ) - सिद्ध धातुरग ( क्र ६९८ ), हरिताल ( क्र ९ ) इत्यादि धातुसिद्ध प्रसाधन-साहित्य हे नित्योपयोगी, व्यवसायोपयोगी व युद्धोपयोगी वस्तूंचे उल्लेख निःसदिग्धपणे सिद्ध करतात कीं गाथासप्तशतीच्या काळात धातूंच्या व रत्नांच्या खाणी अस्तित्वात असल्याच पाहिजेत, निर्मितीच्या किंवा लगतच्या प्रदेशात आणि इषुकार, तांबट, मणिकार, लोहार, शिकलगार सोनार वगैरे व्यवसाय ही या धातूंच्या खाणी व हे व्यवसाय भारतात वेदकालापासून चालू आहेत सुचि जातुकात सुई तयार करणाऱ्या कम्माराचा उल्लेख आहे ही सुई अशी सूक्ष्म की ती पाण्यावर तरगते व अशी तीक्ष्ण की गिरणीचा भेद करते ( जातक ३ २८१ ) चिलखत व तरवार हे उल्लेख गाथा सप्तशतीच्या उत्तर भागात आलेले आहेत, ते उत्तरकालीन मानले पाहिजेत. सातवाहनकालीन बाणाचीं अग्रें पुष्कळ मिळालीं ( Excavations at Brahmapuri 1945-6 Dr Sankalia & Dr Dikshit p 121 ) आहेत त्याचप्रमाणे किंवा चिरस्त्या ( जातक ३ २८१ ) अयस्कारानीं तीं धनविक्री अगावीत क्र १०१ मध्ये सोनाराच्या तागडीचा स्पष्ट उल्लेख आलेला आहे. आणि क्र. ६७० मध्ये कसोटीवर रत्न घासणाऱ्या अडाणी जवाहिऱ्याचा गाथासप्तशतीत उल्लेखिलेली मरकतभाजन व शखमुक्ति आदि पूजापत्रे या मणिकारानीच तयार केलेली आहेत हिंदुस्थानात जागोजाग झालेल्या उत्खननात प्राचीन व रगी बेरगी असे काचेचे व दगडी मणि मिळाले ( Etched Beads in

India Dr Dikshit ) आहेत मण्यावर रग चढविण्यासाठी त्यावर रासायनिक क्रिया करून ते भट्टात भाजण्यात येत असत गाथासप्तशतीत उल्लेखिले आहेत तसे काळे मणि ब्रह्मपुरीच्या उत्खननात मिळालेले आहेत काचेच्या बागड्या ( क्र १३३, २८३, ५८९, ६८३ ) व चपक ( क्र ७१०, ९११ ) या उल्लेखावरून काचकार व कासार याचे धंदे सूचित होतात. ग्राम स्त्रिया काशाच्याही बागड्या वापरीत, म्हणून बागड्याचा व्यवसाय करणाराना कासार हे नाव मिळालेले असावे बागड्या भरण्याचे काम कासारणी करतात असा स्पष्ट उल्लेख क्र ५३९ या गाथत आलेला आहे त्याचा हा व्यवसाय फिरस्ता असला पाहिजे ब्रह्मपुरीच्या उत्खननात निळसर रगाच्या सात वाहनकालीन बागड्या मिळालेल्या आहेत, त्या रोमन असाव्यात असा डॉ दीक्षित याचा अदाज ( पूर्वोक्त पृ ११७ ) आहे मद्य गाळविण्यासाठी व पिण्यासाठी वापरावयाची उची भाडी हो सातवाहन कालात रोममधून आयात होत असत क्र ७०४ या गाथेत आरशाचा उल्लेख आहे प्राचीन भारतातील आरसे धातूचे असावेत मिलिंदपन्हो ( ४ १ ६० ) मध्ये तसा उल्लेख आहे प्राचीन ग्रीक व रोमन लोक असेच आरसे वापरीत असत दतकारानी केलेल्या हस्तिदती मुठी आरशाना बसवीत असा जातकात (V No 531 p 138) उल्लेख आढळतो गाथासप्तशतीला समकालीन असलेल्या मथुरा व साची येथील शिल्पात हाती आरसा घेतलेल्या यक्षीच्या मूर्त आढळतात अजठ्यातही असाच प्रसग रगविलेला आहे क्र १३८ व ९४० मधील फास दतकारानी तयार केलेले हस्तिदती असणे शक्य आहे पिरीट ( क्र ७९४ ), चटुक व करडक ही भिक्षापात्रे ( क्र १६२ ), चरक ( क्र ५७४, ७६९, ७७० ),नागर ( क्र १६०, ६९०, ६९२, ७८९ ) प्रमाणसूत्र ( क्र १५३ ), मुसळ (क्र १०१), रहाटगाडगें ( क्र ४९० ), सागड्या ( क्र. १३८ ) इत्यादि काष्ठसिद्ध वस्तूवरून वरेकम व सुतार याच अस्तित्व सिद्ध होते क्र १७, ३४ व १६५ मध्ये रथाचा उल्लेख आलेले आहेत आणि क्र ७४० मध्ये जहाजाचा रथकाराचा व्यवसाय नागरी आणि जहाजे तयार करणाराचा धदा समुद्रकिनारी असला पाहिजे या स्थलचर व जलचर वाहनाचे उल्लेख ऋग्वेदापासून आढळतात वेदकालीन नौका अश्मयाच्या ( १ ११३ ० ८ १० ९७ १ ), सुधा पोखरून केलेल्या असत

सातवाहनकालीन लेण्याच्या मांडणीवरून तत्कालीन घराच्या उभारणीची कल्पना करता येते सुतार व गवंडी यांचें सहकार्य असल्यावाचून घराची किंवा देवळाची कामें होणें शक्य नाही कार्ल्याच्या लेण्यातल्या छताच्या लाकडी कमानी व स्तूपावरील लाकडी छत्र हीं कामें सातवाहनकालीन सुतारांनी केलेलीं असावीत असा संशोधकाचा अंदाज आहे त्यावरून त्यांच्या कौशल्याची कल्पना करता येते क्र ७०० या गाथेंत पाषाणरेषेचा उल्लेख आहे तो सेलवढकींच्या-पाषाणावर कोरीव काम करणारे-कार्याला अनुलक्षून असावा क्र. ६९८ मध्यें कोंबडा आरवून प्रवाशांना सांगत आहे कीं जागे व्हा, मुक्काम हलवा, ओझ्याचीं जनावरं हाका ही सूचना नि मशय व्यापाऱ्यांना अनुलक्षून आहे क्र ७४० मधील डोलकाठी व कावळा यांचें साहचर्य स्पष्ट केलें पाहिजे समुद्रातून प्रवास करणाऱ्या नौकेची दिशा निश्चित करण्यासाठी प्राचीन नावाडी कोणतें यांत्रिक साधन वापरीत याचा तपास लागलेला नाहीं, पण भर समुद्रात अंदाज अशक्य असता जमीन जवळपास आहे किंवा कसे हें निश्चित करण्यासाठीं ते जहाजावर दिशाकाक (जातक क्र. ३६७) पाळीत आणि हे शिकवलेले कावळे जातील त्या दिशेला जमीन असली पाहिजे असें अनुमान (Social & Rural Economy of Nothern India Bose p 299) करीत, ऋग्वेदकालीन, फिनिशियन व बाबीलोनियन नावाडी हीच युक्ती उपयोग करीत सूतकताई, रंगारी व विणकर यांचे धंदे भरभराटींत असले पाहिजेत, त्यांचा प्रत्यक्ष उल्लेख मात्र येथ आढळत नाहीं. या वस्त्रांच्या रंगावरून (कुसुम्बी क्र ३०८, ३२८, ४६१ ५४० नीळ क्र ३९५, ६१०) दिसतें कीं हे रंगारी स्थानिक वनस्पतिजन्य रंग वापरीत कुड (क्र. २२९), कुंभ (क्र. ६५४), घट (क्र २६०), रहाट हारग (क्र ४९०) इत्यादि मृत्तिकापात्रांच्या उल्लेखावरून कुंभाराचा धंदा भरभराटींत असला पाहिजे असें अनुमान होतें क्र ८३, व ६९२ मध्ये कासाराचे उल्लेख आहेत आणि क्र ५०७ मध्ये सुताचा गुरुड व दोर वळणार यांचे व्यवसाय त्यावरून सूचित होतात हे तीन हीं व्यवसाय आताप्रमाणेच नव्हे ही स्थानिक स्वरूपाचे असले पाहिजेत दुंदुभि (क्र. ११०), पटह (क्र. ... ६८०) व मृदंग (क्र. २५१) या वाद्यांचा भार्मी मातीचा, लाकडी असर धातूचा असावीत त्यांना लागणारें कमावलेलें

पातळ वातड पुरविणारे वन्य चाभर तात्कालीन समाजात असले पाहिजेत क्र १३३, १३५, ५४७, ८३० या गाथांत तेलवातीवर उजळणाऱ्या दिव्याचे उल्लेख आलेले आहेत त्यावरून तेल्याचा व्यवसाय सिद्ध होतो तिलपिशकाऱ्या श्रेणीचे उल्लेख समकालीन शिलालेखात आलेले आहेत गौळवाडे गावाबाहेर असले ( क्र ७२६ ) तरी धार काढण्यासाठी गवळी घरोघर ( क्र ४६२, ६३७ ) जात असावेत असे दिसत क्र ५७६ मध्ये हस क्षीर संकेत आलेला आहे तेव्हांही गवळी लोक दुधात पाणी घालीत असत असा निष्कर्ष यावरून काढावयाचा का काय? क्र २२७ मध्ये कलालाचा अप्रत्यक्ष उल्लेख आहे क्र २९१ व ४१७ मध्ये न्हाव्याचा आणि क्र ६८० मध्ये खाटकाचा असे प्रत्यक्ष उल्लेख आलेले आहेत वस्तऱ्याने हजामत करण्याची प्रथा कमीत कमी तैत्तिरीय ब्राह्मणाइतकी ( १ ५ ६ ) पुरातन आहे यज्ञामध्यें, देवाना हविर्भाग म्हणून अर्पण केल्या जाणाऱ्या पशूना मारण्याचे व तोलण्याचे काम करणाऱ्या शमित्यामधून यज्ञ-संस्थेच्या अपकर्षाच्या काळात खाटकाचा व्यवसाय उत्पन्न झाला असला पाहिजे

गाथासप्तशतीत दास हा शब्द एकदाच ( क्र ९१ ) व तोही तत्पर सेवक या अर्थाने आलेला आहे दास्य ( Slavery ) या पाश्चात्य सज्ञेने जें कार्य सूचित होतें तें जातककथात कधीं कधीं प्रत्ययास येत असलें तरी त्याच्या मानानें याची व उत्तरकालीन हीन जातीयाची ही जीवनपध्दति मानवतेशी अधिक सुसगत होती, म्हणूनच भारतात दास्य अस्तित्वात नसल्याचा निर्वाळा मेगॅस्थेनिस्नें दिलेला आहे क्र ६२८, ६८७, ७६१ ८३२ या गाथात परिजन हा शब्द आश्रित किंवा घरगुती नोकर या अर्थानें आलेला आहे यापैकी कांही गडी आहेत व काही बाया असाव्यात हे लोक धन्याच्या कुटुंबाशीं समरस झालेले आहेत शेतकामासाठी, विशेषत हगामाच्या दिवसात मोलानें माणस लावण्यात येत असावीत नागरटीसाठीं (क्र. ६९२), राखणीसाठी (क्र ६९०, ६९१, ८०५, ८१५, ९६२ ) कापणीसाठीं ( क्र ८, ९ ) व कपाशीचा बोंडे वेचण्यासाठीं ( क्र ३५९ ) यापैकी क्र ६९०, ६९१, ८१५ व १००३ मधील उल्लेख कलमगोपाचे आहेत क्र ८९ मधील गाई वळणाऱ्या वल्वी या घरच्या आहेत का मोलाच्या, हे निश्चित करता येत नाही क्र ५५४,

७६९ व ७७० या गाथात चरकाचे उल्लेख व चरक्याचे उद्गार आलेले आहेत बाजूबाजूला बैल दिसत नाहीत, त्या अर्थी हे हातचरक असावेत हा चरक उभा होता कीं आडवा आणि त्याला दात्याचां चकें होतीं किंवा कसे हे निश्चित सागता येणार नाही. भरपूर रस निघेल असें हे यन्त्र असलं पाहिजे हें मात्र निश्चित व्यवहारभाष्यात जतमालेच्या उल्लेख आहे ( १० ८८ ४ ) त्यावरून वाटते कीं उंसाची लागवड होणाऱ्या प्रदेशात चरक चालविण्याचा हगामी धंदा चागल्या प्रमाणात चालत असावा असे चरक चालविणें हें काम विशेष मेहनतीच व भरपूर मोबदल्याचें असावे धनी व कामगार यान्या काम व मोबदला याबाबत विशेष अपेक्षा आहेत, कामगार धिप्पाड असावा आणि त्याच्या अगा बळ, तितकेंच कौशल्य असावें अशी मालकिणीची व मालकाण सढळ व भरम असावी अशी कामगाराची ' उसाच्या रसापासून गूळ तयार व्हावयाचा आहे आणि कामगाराला मेहनतीचा मोबदला गुळाच्या रूपात मिळावयाचा आहे मजुरांच्या विशिष्टीभवनाचा हा गाथासप्तशतींतला एकमेव उल्लेख आहे या गाथांतले गुळव्याचे उद्गार बारा गावाच पाणी प्यालेल्या उनाड हमालाच्या तोंडा खासगी बैठकींत येतील असेच आहेत गाथासप्तशतीत पामर ( क्र १६४, १६९, २३८, ३२८, ३३१, ३५८, ६९१, ६९४ ) हा शब्द अडाणी ( क्र १६८ ), छोटा शेतकरी ( क्र १६९ २३८ ३२८ ), दरिद्री ( क्र. ३३१ ) बेकार आणि मजूर ( क्र. ३२४, ६९१, ६९४ ) या अर्थांनी आलेला आहे क्र. २३८ मधील पामरानें पाघरूण विकून बैल खरेदी घेतले आहेत आणि क्र ३५८ मधील तूर पेरणारा पामर पीक हातीं येण्याची अपेक्षा बाळगीत आहे, त्या अर्थी ते छोटे शेतकरी असले पाहिजेत क्र ६९२ मधील नागऱ्याला त्याचा व्यवसाय अवगत नाही, तरी तो काही अनन्य हेतुनें कामावर राहिला आहे, त्या अर्थी त्याचा तात्पुरता पेशा असावर किंवा रोजदारीवर काम घेणाऱ्या मजुराचाच असला पाहिजे या सर्व कामकऱ्याना मिळणारा मोबदला व तो पुरेसा असे किंवा कसे याबद्दल अनुमान करावयास काहीच साधन नाहीं शेतमजुराला पोटाला पुरेसाही मोबदला मिळत नाही असा उल्लेख गाल्हिकार आनकात आढळतो आपण ज्या शेतात काम केलें तेथें भरपूर पीक आलेलें पाहून

आलेले आहेत नटीन मुलाला हरितालाने प्रसाधन लावलेले आहे. नर्तकीचा उल्लेख रंगभूमीच्या साहचर्यात आलेला आहे यापैकी नटी ही हौशी आहे का धंदेवाईक याचा खुलासा होत नाही नर्तिका ही मात्र सांकेतिक व धंदेवाईक असावी असे वाटते येथे सांगितलेले तिचे वैशिष्ट्य कामशास्त्रोक्त आहे नट व नर्तक यांच्या स्त्रियांना व्यभिचार निषिद्ध नाही असे रामायणात सांगितलेले ( २ ८३ १५ आहे ) आहे गवई व गायिका, नट व नटी, नर्तक व नर्तिका गटाने गावोगाव हिंडून चरितार्थ चालवीत. त्यांचे कार्यक्रम सामान्यत शहरातून किंवा ग्रामीण जनातून होत असावेत तालपुताच्या नाटकमंडळात पाचशे नटी होत्या आणि ही मंडळी गेल्यात, नगरात व राजधानीत कार्यक्रम करीत असे, असा उल्लेख थेरी गाथेत (क.१०९० टीका) आलेला आहे।

गाथासप्तशतीत ज्योतिषविषयक अनेक उल्लेख आलेले आहेत क्र ८३० मध्ये त्रिकोणाकृतीत उडणाऱ्या बलाकापङ्क्तीचा हीराशाल्मलीशान वाटलेल्या रेषांशी समन्वय केलेला आहे फलज्योतिषी काढतात तशा कुंडलीच्या या रेषा आहेत हे उघड आहे क्र ६०२ मध्ये चद्रतिथीचा उल्लेख आहे क्र. ३१९ व ७९८ मध्ये राहूचा आणि क्र २६१ मध्ये वार व विट्ठि (विष्टि) यांचा. क्र ३८६ मधील ग्रहबाधेचा उल्लेख आणि अन्यत्र आढळणाऱ्या अयन, ऋतु, मास, मुहूर्त इत्यादि संज्ञा ही ज्योतिष विषयाशी अप्रत्यक्षपणे संबद्ध आहेत ]

मुख्यत्वेकरून श्री शंकर बाळकृष्ण दीक्षित यांच्या भारतीय ज्योतिःशास्त्रातून व अन्य आधार ग्रंथातून संकलित केलेली तद्विषयक माहिती येथे देतो वर्ष शब्दाचा सांप्रत जो अर्थ आपण समजतो त्या अर्थी वर्ष शब्द ऋग्यजु - संहितेत आला नाही. शतपथ ब्राह्मणात ( २ ४ ३ ) आला आहे वेदकाली महिने चांद्र होते आणि वर्ष सौर होते शतपथब्राह्मणात ( २ १ ३ ) अयन म्हणजे कोणता काळ हे स्पष्ट केले आहे वैदिक वाङ्मयात ऋतुविषयक कल्पना स्पष्ट नाहीत तैत्तिरीय ब्राह्मणात तसा आणि पाच ऋतु आहेत व अन्यत्र सहा यांत हा त्यातल्या मुख्य आहे चयादि सर्व संहिताब्राह्मणवाङ्मयाच्या प्रचाराच्या नमुन्याचा तैत्तिरीय, शतपथ आणि तैत्तिरीय या ब्राह्मणांत नक्षत्रादि सर्व आहेत व ते भाग शकापूर्वी ४००० आणि १००० यांच्या मधल्या काळचे आहेत

वाराचा सात नावं वदात कोठेंही नाहीत दिवसाचे मुहूर्तसंज्ञक १५ विभाग आणि तसेच रात्रीचे १५ विभाग तैतिरीयब्राह्मणात ( ३ १० ९ ) सांगितलेले आहेत सूर्याला ग्रहण लागत म्हणजे आसुर स्वर्भानु तमाने सूर्याला आच्छादितो, असे ऋग्वेदात ( ५-४० ) वचन आहे आच्छादितो म्हणजे गिळतो ही कल्पना उत्तरकालीन आहे श्री सिद्धेश्वरशास्त्री चित्राव याना ऋग्वेदाच्या भाषांतरात स्वर्भानूचा राहूशी समन्वय केलेला आहे ग्रहाच ज्ञान वैदिक काळा होते शतपथ ब्राह्मणात जादूसारखा परिणाम करणारी शक्ति या अर्थात ( बुद्धपूर्व जग : पृ १९६ ) योजलेला आहे अथर्ववेदज्योतिषात मेषादि राशि नाहीत, पण वाराचा नावें आहेत आदित्य सोमो भौमश्च तथा बुधबृहस्पती ।। भार्गव शनैश्चरश्चैव एते सप्त दिनाधिपा ।। ९३ ।। महाभारतात ( उद्योगपर्व अध्याय १४- ९ ) अंगारक म्हणजे मंगळ असा उल्लेख आलेला आहे याज्ञवल्क्यस्मृतीतही मंगळ वाराचा उल्लेख आहे. अहोरात्राचे होरा नावाचे २४ विभाग करतात होरा म्हणजे अहोरात्र यातील पहिलें व शेवटचें अक्षर काढून उरून राहणारा शब्द असें वराहमिहिरानें सांगितलें आहे खाल्डियाच्या लोकात होरा हा काल विभाग फार प्राचीन काळापासून प्रचारात होता व सात वार आमच्या इकडच्या प्रमाणें होते त्याना राशि व वार इ स पूर्वी ३८०० पूर्वीच माहीत होते ते त्या लोकावरून शकपूर्व १५०० नतर, इ पू १००० चे सुमारास आमच्या देशात आले कुडली माडून भविष्य वर्तविण्याची प्रथा थोडीशी उत्तरकालीन असावा त्याच्यावरून भविष्य वर्तविण्याची बाबीलोनी प्रथा अलेक्झडरच्या स्वारीनतर भारतात आली व चवथ्या शतकाच्या सुमारास सार्वत्रिक झाली शिलालेखातला वाराचा पहिला उल्लेख इ स ४८४ च्या एरण येथील बुधगुप्ताच्या लेखात ( Fleet Gupta Inscriptions p 88) आढळतो त्या अर्थी गाथा सप्तशतीच्या काळात या सज्ञा असण समवनीय आहे महामहोपाध्याय श्री काणे ( केवलानद स्मारक ग्रथ पृ १७ ) सागतात का वाराचा आपलेक्डील नावें इसवी सनापूर्वी फार तर चार पाचशें वर्षांहून प्राचीन नसावींत अर्थात् या उल्लेखावरून गाथासप्तशतीचा काळ अलीकडे ओढण्याचा काही सशोधकाचा प्रयत्न आहे तो टिकण्यासारखा नाहीं असें या विवेचनावरून दिसून येईल

गाथासप्तशतींत आलेले वैद्य व व्याधि याचे उल्लेख पूर्वी आरोग्य परिच्छेदात

नमूद केले आहेत। क्र २३७ मधील वैद्य वेषधारी आहे की व्यभिचारी आहे याचा खुलासा होत नाही, तो मांत्रिक असावा असे वाटते खेडे गावात वैद्य नसतो आणि ही परिस्थिति नागरी राहणीला चटावलेल्याना असह्य ( क्र ६०० ) वाटते गाथातले वैद्य रुग्णाना औषधें ( क्र २०० ) काढे ( क्र २१७ ), मज्जम ( क्र ४०८ ) व रसायनें ( क्र ८४१ ) देतात आणि जखमावर शुभ्र पट्ट्या ( क्र ६१८ ) लावतात ७

आयुर्वेदाचा मूळ आरंभ मंत्रतंत्रातून ( वेदविद्या पृ ५६ ) झालेला आहे रोग बरे करण्यासाठीं व विषाचा प्रतिकार करण्यासाठीं वगैरे याजावयाचे मंत्र ऋग्वेदात आहेत अथर्ववेदात तर वशीकरण, सपत्नीनिवारण इत्यादि मंत्र आहेत *वेदकालीन वैद्य औषधाबरोबर मंत्रतंत्राचा उपयोग करीत* वैद्याचा धंदा यजुर्वेदात तुच्छ मानलेला आहे अभिचार विद्येचा जैन, बौद्ध व ब्राह्मण ग्रंथातही निषेध केलेला आहे तरी प्राचीन वाङ्मयात या तीन्ही धर्मांचे मांत्रिक व वैद्य आढळतात खरे व लटके स्वार्थासाठीं किंवा धर्मासाठीं सपादित विद्याचा उपयोग करणारे खेडेगावात ज्योतिष व वैद्यक याचा कुडबुडा समन्वय झालेला दिसतो म्हणूनच पोटभरू व लटके ज्योतिषी ( मनु ३ १६२ ), वैद्य ( म भा ५ ३८४ ) व सामुद्रिक ( म भा १३ ९० ७ ) याचा जागोजाग निषेध केलेला आढळतो

गाथासप्तशतीत चित्रकार (क्र २१७ ६१० ६४१ ६५६ ७२२) व मूर्तिकार ( क्र ८५८ ) याचे उल्लेख आलेले आहेत

सातवाहन कालात चित्रकला व मूर्तिकला परिणत स्थितीप्रत पोचलेली होती हें सह्याद्रींतील तत्कालीन लेण्यावरून प्रत्ययास येतें या लेण्यातील मूर्ति प्रमाण बद्ध आहेत आणि आरंभी त्या रंगीत होत्या हे निश्चित भाजाच्या चैत्यातील स्तंभावरची रंगीत चित्र त्यावर कलल्या रासायनिक क्रियमुळें अलीकडेच प्रकट झालेली आहेत पृष्ठभागावर प्रथम तुसाचा गिलावा करावयाचा, त्यावर अळ्याच्या टरफला इतक्या जाडीचा रंगाचा भंग होणार नाही असा टिकाऊ लेप चढवावयाचा ( चुल्लवग्ग ८ १७ १ मिलिंद ३३१ ), या क्रियेनें स्थान विशुद्धि ( ठाणविसुद्धी क्र ७३२ ) झाल्यानंतर त्यावर वर्तिकानीं ( वट्टी क्र

६१६ ) प्रथम ( क्र ६६२ ) रेखाचित्र काढावयाचे आणि नंतर रंगसंगतीच्या अनुरोधाने त्यात रंग भरावयाचे अशी या चित्रकाराची पद्धति होती अशी चित्रे घराच्या भिंतीवर ( क्र. २१७ ७३२ ) व पत्रावरही ( क्र ९५६ ) काढीत असत. पत्नीला दुखवून तरी चित्रातला गाढ गर्दा समजून त्यावर एकदा अडाणी ( क्र ९४१ ) हात मारावयाचा ! उत्तररामचरित ( १ ३९ ), प्रतिमा ( ३ ), प्रतिज्ञा यौगन्धरायण ( ३ १ ), मालतीमाधव ( १ ३३ ९–१० ), मालविकाग्निमित्र ( . . ), मृच्छकटिक ( ४ १ ) शाकुन्तल ( ६ १३ १४ ) स्वप्नवासवदत्त ( ६ १३ ) या नाटकांत चित्र व मूर्ति यांचे उल्लेख उद्धृत आले आहेत उत्कण्ठा विनोदन हे आलेख्याचे प्रयोजन होय असे वचन मालती माधवात आहे प्रतिमेतील रंगीत भित्तिचित्रयुक्त लग्न, यथार्थदर्शी आहे स्वप्नवासवदत्तातील वासवदत्तेची प्रतिमा ओळख पटण्याइतकी यथार्थ आहे चित्र कितीही यथार्थ असले तरी मूर्ताच्या मानाने प्रतिकृतीत काहि विसंवाद असतोच असे विधान मालविकाग्निमित्रात आहे प्रतिमानाटकातील मूर्ति पाषाणाच्या आहेत, तरी त्या क्रियामधुर आहेत, भावपूर्ण आहेत त्रिविक्रमाच्या नलचम्पूत शलाकालेख्याचा उल्लेख आहे शलाकेच्या सूक्ष्मभागे पृष्ठभागावर रेखाचित्र काढण्यात येत आणि सारीच्या कसाच्या क्षुपक्यासारख्या वर्तिकेने तीं रंगविण्यात येत गद्यचिंतामणांत व नाट्यशास्त्रात ( २ ८८–९० ) भित्तिचित्रांचा उल्लेख आहेत गुप्तकालीन विष्णुधर्मोत्तर पुराणात चित्रकलेला एक संपूर्ण अध्याय दिलेला आहे या उल्लेखावरून तत्कालीन कलाप्रवाहाची दिशा अजमावता येते

चरितार्थासाठी सरकारी नोकरीवर अवलंबून असणाऱ्याचा विचार अन्यत्र केलेला आहे

[6]गाथासप्तशतीत व्यापारी व सावकार यांचे अनेक उल्लेख आलेले आहेत भरभराटीच्या काळात संचित संपत्ति सुरक्षिततेसाठी अगर व्याजासाठी सावकाराकडे किंवा औद्योगिक अगर नागरिक श्रेणींकडे ठेव ( णिक्खेव = निक्षेप क्र १५४ ) म्हणून ठेवण्यात येते मर्दाच्या दिवसात ठेवीदाराची फेडीची मागणी सावकार पुरी करू शकत नाहीत असुरक्षिततेच्या काळात संपत्ति भूमिगत ( णिहाण निधान क्र ३१८ २७३ ५०७ ५७७ ) होती याचाही उदाहरणें गाथासप्तशतीत आलेली आहेत. क्र ९,९,९ मध्ये सुलेख उल्लेख

आहे ती निरक्षर असते म्हणून जें हलकें तें उचलून धरते तुलेचा उल्लेख वाजसनेयि संहितेत व शतपथ ब्राह्मणात आलेला आहे क्र. ७३८ मध्यें पाघरुण विकून बैल खरेदी केल्याचा उल्लेख आहे वेदकाळात बैल हें मूल्यमापनाचे साधन (वेदविद्या पृ. ८०) होतें, तें आता केवळ उत्पादन साहित्य झालेलें आहे क्र. ९५२ या गाथेत धान्य मोजण्याच्या मापाचा उल्लेख आहे आणि क्र. ८०२ मध्यें खारि या द्रवमापनाचा श्री जोग-(पूर्वोक्त : पृ. २७७) यांनी अनेक प्रमाणावरून खारि म्हणजे १२८ शेर असें ठोकळ मानानें ठरविलें आहे

गाथासप्तशतात दारिद्र्य आहे, भिकारी आहे पण बेकारी दिसत नाही क्र. १६० व ५.. या गाथामध्यें भिक्षेकरी आहेत, पण पहिला भिकारी वेषधारी आहे व दुसरा धार्मिक आहे, मग तो भिक्षु असो अगर भिक्षुक हे परान्नपुष्टीचे द्योतक आहे बेकारीचे नव्हे चोर व दरोडेखोर हे खरे बेकार ते पुष्कळ दिसतात

**निष्कर्ष :**

गाथासप्तशतीच्या काळात आताप्रमाणेंच भारत हा शेतकीप्रधान देश होता आताप्रमाणच त्या काळात ही नगरें व बंदरें होतीं आणि उद्योगधंदे व व्यापार भरभराटात होता

हालांच्या अर्धयुगात ही पिकाची लागवड नैसर्गिक परिस्थितीच्या अनुरोधानें व जास्तीत जास्त नफा मिळविण्याचे दृष्टीनें करण्यात येते, स्वयंपूर्णतेच्या नव्हे व्यावहारिक दृष्टीनें शेतकी करणाराची दृष्टि आताप्रमाणच तेव्हांही उत्पन्नावरच केंद्रित असली पाहिजे ऊस व कपाशी यांची पैदास हाच निष्कर्ष निर्दिष्ट करते अन्य व्यावसायिकावर अवलंबून असल्यामुळें असा व्यापारी पिकाचें उत्पादन भाडवलवाले शेतकरीच करीत असले पाहिजेत

आमची प्राचीन ग्रामीण अर्थव्यवस्था स्वयंपूर्ण होती असा सामान्य समज आहे तो खरा नाही सर्वस्वी स्वयंपूर्ण अशी समाजघटना असंभवच नाही उत्पादन व विनिमय साधनांच्या अनुरोधानें समाजाची आर्थिक घटना उत्क्रांत होत असते सहकार्य व स्पर्धा यामुळेंच सहजीवन शक्य होतें

गाथासप्तशतीतल्या समाजाच्या नैमित्तिक व व्यावसायिक गरजा भागविण्यासाठी बारागार निरनिराळ्या समाज व्यापित होते स्वव्यवसायाचा वादनचा नाय असे

अशा मोठ्या गावात ते स्थायिक असत पावसाळा सपला की फिरस्ते कारागीर सहकुटुंब व गटानें भ्रमतीला निघत अद्यापहीं अनेक धंदेवाईक यार मार्गाचा अवलंब करतात

आमच्या ग्रामीण स्वयपूर्णतेची कल्पना अलुतेदार व बलुतेदार या सस्थेवर आधारलेली आहे बलुतेदार बारा असून त्याचे तीन वळ असतात (१) लोहार, सुतार, महार व माग, पैकी महाराला इतरापेक्षा दुप्पट मुशाहिरा मिळतो (२) कुभार, चाभार, परीट, न्हावी, (३) भट, मुलाणी, गुरव, कोळी कोठें त्याचे वळ बदलण्यात येतात आणि कोठें पाटील, कुलकर्णी, चौधरी, पोतदार व देशपाडे याचाही बलुतेदारात समावेश करण्यात येतो तेली, तांबोळी साळी, माळी, जगम, कळवन्त, टवरी, ठाकूर, घडशी, तराळ, सोनार व चौगुला हे बारा अलुतेदार ही व्यवस्था मकलित माहितीवर आधार लेली आहे अलुतेदार व बलुतेदार याचा सपूर्ण सच आजवर कोणत्याही गावात आढळलेला नाही स्वयपूर्ण ग्रामीण अर्थव्यवस्थेची ही योजना व्यव हारात अशक्यप्राय आहे या मडळापैकीं लोहार, सुतार, कुभार, चाभार, न्हावी, तेली, साळी, माळी, कळवन्त, परीट (रगारी), सोनार इत्यादि व्यावसायिक गाथासप्तशतींत आढळतात पण प्रत्येक गावात त्याचा सच होता किंवा त्याना यावयाचा मोबदला वलुतेदारीप्रमाणें पावसाऱ्या प्रमाणात ठरलेला होता असें दिसत नाहीं

या व्यवसायामध्यें श्रमविभाजन ( Division of labour ), स्थानिकी भवन ( Localization ), यन्त्रीकरण ( Mechanization ) विशिष्टीकरण ( Specialisation ) कितपत झाले होतें हें अजमविण्यास साधन नाहीं तत्कालीन अर्थव्यवस्था येथवर आली नव्हती जगलातली झाडें तोडण्यापासून इमारतींची उभारणी होईपर्यंतचीं सर्व कामें सुताराना केल्याचा उल्लेख जातकात ( II 18 ) आलेला आहे सुतारानीं जगलात कापलेले ओंडके वाहतुकीसाठीं प्रवाहात सोडण्यात येत असावेत असें क्र १०५ मधील उल्लेखावरून दिसते चरक रहाटगाडगें व हातमाग एवढाच व्यावसायिक यन त्यावेळीं उपलब्ध असलेला दिसतात क्र ४३६ मधील दोरखडाच्या उल्लेखावरून यारीच अस्तित्व सभवतें पाण्डवलेण्यातील एका लेखात ओदयन्त्राचा उल्लेख आहे हें यन्त्र

पाण्याच्या शर्तीवर चालत असे असे उघड दिसत, पण त्याबद्दल जास्त खुलासा मिळत नाहीं डागरातून व नदीकिनाऱ्यावरून धावडांना व झारेकऱ्यांना नागरी लोहाराना व सोनाराना लोखंड व सोनें आणून द्यावयाचे आणि याना भट्ट्या लावून त्यापासून उपयुक्त वस्तु व मोल्यवान् अलंकार घडवावयाचे एवढच विभाजन त्या काळात चालू असावें क्र २११ मधील अभिधानीय मताचा उल्लेख सोनारी भट्टीचा द्योतक आहे

लेण्यांतील शिलालेखात व्यावसायिकाच्या श्रेणीचे उल्लेख आढळतात उदाहरणार्थ गोवर्धन येथे कोलिकश्रेणी–विणकरसघ–होती नाशिक येथें तेली व कुंभार याच्या श्रेणी होत्या पाणिनीने ही श्रेणीचा उल्लेख ( २ १ ४९ केलेला आहे श्रेष्ठी हा नागरी श्रेणीचा अध्यक्ष ज्येष्ठ हा व्यवसायिकाचा आणि भोजक हा ( Social & Rural Economy in Northern India ) Bose p 261 ) ग्रामीण अधधुरीण कल्याण, चौल सुपारा येथून व्यापारी जलमार्गानें मालाची आयात निर्यात करीत गुरूवी वाहतूक लमाण करीत, क्र ७४० या गार्थेत जहाजी व क्र ६९८ या गार्थेत लमाणी वाहतुकीची सूचना आहे बदरा व व्यापारी मागणी व पुरवठा याच्या अनुरोधानें स्थानिक व्यापारी खरेदी व विक्री करीत आणि कारागीर निर्मिती करीत मोठ्या प्रमाणावर उत्पादन होऊ शकेल असे आणि भोगसाहित्य ( Luxury Goods ) निर्मितीचे व्यवसाय शहरात चालत व सघटित होत

वैदिकाची समाजव्यवस्था धर्मकारणावर आधारलेली होती, त्यानीं ब्राह्मणाना अग्रस्थान दिलें अर्थव्यवहार उत्क्रांत होण्याइतका त्या काळीं समाज स्थिर वा उत्क्रांत झाला नव्हता यज्ञसस्था हें या युगाचें वैशिष्ट्य आहे राजकारण व अर्थकारण यावर बौद्धाची समाजव्यवस्था आधारलेली होती त्यानीं क्षत्रियाना अग्रस्थान दिलें आणि वैश्याना स्वातंत्र्य दिलें यामुळें अशोकारामारखे राजकीय व अनाथपिंडकासारखे आर्थिक सम्राट सभवले अहिंसाप्रधान धर्मराज्याला अशोकानें केलेला पुरस्कार वर्द्धीय राजकीय व आर्थिक सत्तासवर्धनाला पोषक झाला अशोकाच्या काळात व्यापाराला ओपचारिक सरहद्दीवरील पाटातून वहात

होता सागरी व्यापारामुळें या काळात भडोच व सुपारा या बदरांना आंतरराष्ट्रीय महत्त्व प्राप्त झालें होतें. अशोकानंतर मौर्य साम्राज्य कोलमडलें आणि वायव्य सरहद्दीपलीकडील भागांतल्या राजकीय उलाढालीमुळें खुष्कीचा व्यापार मंदावला यामुळें पश्चिम किनाऱ्यावरील बदरांचें महत्त्व वाढलें ही समृद्धि स्थिर करण्यासाठीं सातवाहनांनीं नाणे घाट खोदविला आणि यज्ञनगर जुन्नर वरून व्यापाराला मार्ग मोकळा करून दिला सातवाहनांनीं संघटित केलेल्या अर्थव्यवस्थेंत ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकात शकांच्या आक्रमणामुळें व्यत्यय आला याच काळात गाथासप्तशतीचें संपादन झालेलें आहे, यामुळें आणि ही ग्रामीण लोकगीतें असल्यामुळें या घटनेचे आर्थिक परिणाम येथें व्यक्त झालेले नाहीत

चौल, कल्याण, सुपारा व भडोच हीं सातवाहनांचीं पश्चिम किनाऱ्यावरील मोठीं भरभराटलेलीं बदरें, पैकीं भडोच येथें क्षहरात क्षत्रपांनीं आपल्या सत्तेचें केंद्र स्थापन केलें नर्मदेच्या अस्थिर प्रवाहामुळें भडोच बदर धोक्याचें झालें तरी तेथील सागरी व्यापाराला धोका येऊ नये म्हणून शकांनीं अनेक तजविजा केल्या, एवढेंच नव्हे, त्यांनीं सातवाहनांचें कल्याण बदर काबीज केलें आणि इकडे येणारीं जहाजें ते जबरदस्तीनें भडोचला ओढून नेऊ लागले या काळातला सागरी व्यापार सौराष्ट्र, कच्छ, इराण, अरबस्तान, असा काठा काठानें चालत असे यामुळें या व्यापारावर अरबांची छाप होती पहिल्या शतकात हिप्पालसनें मोसमी वाऱ्याचा शोध लावला यामुळें हिंदुस्थानशी युरोपियन व्यापार अलेक्झान्ड्रियावरून जहाजांतून नाइलमधून सुमारें पावणे तीनशें मैलावरील कोप्टस पर्यंत, तेथून उंटावरून सुमार दोनशें मैलावर असलेल्या सिनाइ द्वीपकल्पाच्या मुखाजवळील जफातीन वेटानजीकच्या आफ्रिकन किनाऱ्यापर्यंत आणि तेथून पुन्हा जहाजातून लाल समुद्रातून मोकोला वेटाला वळसा घालून भर समुद्रातून थेट कल्याण किंवा भडोच अगर मलबार किनाऱ्याकडे, असा वाहू लागला या व्यापारावर रोमची छाप होती या व्यापारामुळं देशाची समृद्धि झाली तिचें प्रत्यंतर गोतमीपुत्र सातकणी वासिष्ठीपुत्र पुळुमावि यांच्या अमदानींत पहावयास सापडतें

## १६ गाथासप्तशतींतील राजकीय जीवन आणि ऐतिहासिक उल्लेख

गाथासप्तशतीतील गाथा हा लोकगीतें आहेत अशा गीतांचे अनेक प्रकार संभवतात पोवाडा व लावणी हें पहिलें वर्गीकरण पोवाडे दोन प्रकारचे असतात प्राचीन पौराणिक व्यक्तांचे आणि अर्वाचीन ऐतिहासिक व्यक्तींचे वैदिक वाङ्मयातील पोवाड्यांना ओल्डेनबर्गनें आख्यानसूक्त ही संज्ञा दिलेला आहे उदा ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील यमयमी ( १० १० ) आख्यान आणि उर्वशी पुरुरवा ( १० ९५ ) आख्यान अशा आख्यानें यज्ञप्रसंगी म्हणण्यात येत लावण्या दोन प्रकारच्या असतात कथागीत व भावगीत ह्या कथा-गीतांतील कथानक केवळ काल्पनिक असत आख्यानसूक्तात ज्यांचें कर्तृत्व सांगितलेलें असतें त्या व्यक्तांना सर्वमान्य सांकेतिक व्यक्तिमत्त्व प्राप्त झालेलें असतें पोवाडे प्रोत्साहनार्थ गाण्यात येतात आणि लावण्या मनोरंजनार्थ गाथा-सप्तशतीतील गाथा ह्या भावगीतें आहेत, म्हणून त्यात ऐतिहासिक किंवा राजकीय उल्लेख अपेक्षिणें व्यर्थ आहे भावगीतात असे उल्लेख आलेच तर ते उपमान्या किंवा दंतकथाच्या स्वरूपात येतात, त्याचा अर्थ संदर्भावरून लावला पाहिजे व निघणारां अनुमानें सावधगिरीनें स्वीकारलां पाहिजेत

### ( १ ) ऐतिहासिक उल्लेख :

अशा प्रकार प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षपणें उल्लेखिलेल्या पौराणिक अगर ऐतिहासिक व्यक्तांची माहिती कालानुक्रमानें सांगतो

क्र. ८८६ या गाथेत पराशराचा उल्लेख आहे याची सविस्तर माहिती प्राचीन चरित्रकोशात दिलेली आहे शक्ति हा वसिष्ठ अरुंधती यांचा ज्येष्ठ पुत्र ऋग्वेदातील काहीं मंत्रांचा हा द्रष्टा आहे गौदासाच्या यज्ञात शक्तीनें विश्वामित्राचा पराजय केला म्हणून पुढें त्यानें किंवा त्याच्या नोकरानीं याला जाळून मारलें पुराणात सांगितलें आहे या कल्माषपादानें वसिष्ठाचे शंभर पुत्र भक्षिले त्यात याचाही भक्षण केलें हा मेला तेव्हा याची पत्नी अदृश्यंती गरोदर होती पराशर हा तिचा पुत्र ऋग्वेदातील काहीं सूक्त याच्या नांवावर आहेत यानें मत्स्यगंधेच्या अंगाचा दुर्गंध घालविला व तिच्या अंगाचा सुगंध एक योजनपर्यंत

दरवळेल अशी योजना केली यान्यापासून तिला वेदव्यास द्वैपायन हा मुलगा झाला पराशर हा सकलशास्त्रपारगत व पुराणवक्ता होता यानें मैत्रेयाला विष्णु व भागवत हां पुराण सांगितलां यान्या ज्योतिषशास्त्रावरील ग्रंथातील वचनावरून याचा काळ ख्रि पू तेराव अगर चवदावे शतक असावा यान्या नावावर खालील ग्रंथ प्रसिद्ध आहेत होराशास्त्र, धर्मसंहिता नीतिशास्त्र, वास्तुशास्त्र, वैद्यकशास्त्र याची स्मृति कलियुगाला प्रमाण आहे अनेक प्राचीन व मध्ययुगीन पुराणकारांनी व स्मृतिकाराना यान्या वचनाचा आधार घेतला आहे गाथेंतील संदर्भ कात्मसिंह्याला अनुलक्षून आहे तारुण्यात मत्स्यगंधेवर अनुरक्त झालेला पराशर पुढें स्मृतिकार झाला, भावगीताचें गुंजन करणारा कवि शुष्क स्मृति वचनाचें विवेचन करू लागला

क्र ८१७ या गाथेंतील धिक्काराला ऐतिहासिक पार्श्वभूमि असावी असा माझा क्यास आहे

दंतकथेनुसार शालिवाहन राजा जारज होता त्याची माता ब्राह्मणी, कुमारी किंवा विधवा होती प्रतिष्ठान येथील नागह्रद सरोवरावर किंवा गोदावरीच्या डोहावर ती पाणी आणावयास गेली असता नागराज शेषान तिचा उपभोग घेतला व या विवाहबाह्य संबंधापासून शालिवाहानाचा जन्म झाला ही दंतकथा सर्वतोमुखी असल्यामुळे कोठें सातवाहन ही सज्ञा जारज संततीला अनुलक्षून योजण्यात ( नेपालका इतिहास मिश्र पृ ७८ ) येई ख्रि पू चवथ्या शतकात मगध देशावर शिशुनाग घराण्याचे राज्य होतें महानन्दिन् हा या घराण्यातील शेवटचा राजा कर्टियस् या समकालीन लेखकानें याच्याबद्दलची एक दंतकथा नमूद (The Invasion of India by Alexander Mc Crindle p 122) करून ठेवली आहे राजान्या परिचयसाठीं अगदीं अंत पुरात प्रविष्ट होण्याची संधि असलेल्या एका देखण्या, धूर्त व महत्त्वाकांक्षी न्हाव्यानें याच्या राणीशी संधान बांधलें, अनेक असंतुष्टान्या पाठबळाने कट करून राजाचा विश्वासघातानें खून करविला आणि सर्वसत्ताधारी होऊन राजपुत्राचा व राज कुलाचा उच्छेद केल्यानतर त्याला आपल्या पोटचा पोरगा गादीवर बसविला पुराणानी याचें नाव महापद्मनन्द असें दिलें आहे व त्याला शूद्रगर्भोद्भव म्हटलें आहे जैन परिशिष्ट पर्वांत सांगितलें आहे की नन्द हा एका गणिकेला

न्हाव्यापासून झालेला मुलगा. नदाचें साम्राज्य कुंतल प्रदेशापर्यंत (Dynasties of the Kanarese Districts : Fleet · p 284) पसरलेलें होतें. नन्दांच्या कलिंगावरील प्रभुत्वाचा उल्लेख खारवेलाच्या हाथीगुंफा शिलालेखात आढळतो. म्हणजे गाथासप्तशतीचें सकलन झालें त्या भागात जारज सातवाहन व नापितोद्भव नन्द याच्या दतकथा प्रचलित होत्या एखादें राजघराणें नष्ट होऊन अनेक शतकें लोटला तरी ऋणानुबंधामुळें त्याचे पक्षपाती अवशिष्ट राहतातच. या दोन घराण्यातील श्रेष्ठ कनिष्ठ भावाची चर्चा त्याच्या त्याच्या पक्षपात्यामध्यें जातीय अभिनिवेशानें व छिद्रान्वेषी भावनेनें, पाणवठ्यावर किंवा चवाठ्यावर झालेली या गाथेला अभिप्रेत असावी अस अनुमान होते

क्र ३ या गाथेंत आणि प्रत्येक शतकाच्या अगेरीस असलेल्या प्रशस्तिगाथेंत गाथासप्तशतीचा सपादक कविवत्सल हाल याचा उल्लेख आलेला आहे, आणि क्र ४६७ व ९९९ या गाथात सालाहण नरेंद्राचा त्याचप्रमाणें क्र ४६४ या गाथेंत विक्रमादित्याचा क्र ९९९ मधील सालाहण हा हाल सातवाहनच असला पाहिजे कारण क्र. ३ प्रमाणें येथें ही त्यानें गाथासप्तशतीसाठीं गाथाकवींना मानधन दिलेलें आहे शिवाय सालाहण व हाल हीं नावें एकाच व्यक्तीचीं आहेत असें देशीनाममालेंत ( ८ ६६ ) सांगितलेलें आहे. क्र ४६७ मधील सालाहण उर्फ शालिवाहन हा आपल्या कुलाचा उध्दारकर्ता आहे. क्र ४६४ मधील विक्रमादित्य हा गुणज्ञ व उदार आहे

प्रथम सातवाहन उर्फ **शालिवाहन या घराण्याचा इतिहास** पाहतां.

सातवाहन हा महाराष्ट्राचा पहिला ऐतिहासिक व भारतांत सम्राट्पद संपादन करणारा महावंश होय राज्यवर्धन, राज्यरक्षण व राज्यविस्तार आणि मुद्रा, शिलालेख व स्थापत्य या बाबतीत त्यानें प्राचीन भारतातील स्थान अग्रगण्य आहे धार्मिक सहिष्णुता, राजकीय स्वातंत्र्य व प्राकृत पुरस्कार या महाराष्ट्र-संस्कृतीच्या प्रधान वैशिष्ट्याची प्रस्थापना त्यानींच केली हिंदुस्थानात ज्या दोन कालगणना पद्धति प्रामुख्यानें व मान्यतानें चालू आहेत त्यांपैकी शक गणना पद्धतींचें जनकत्व त्यांचेंच आहे

पुराणात या वशाचा उल्लेख आन्ध्र या नावानें किंवा आन्ध्रजातीय असा केलेला आहे मनु संहितेत आन्ध्र ही जात अस्पृश्य मानलेली आहे या वशातील सातकर्णीनें अश्वमेधादि यज्ञ केले गौतमीपुत्र सातकर्णाला पाण्डव लेण्यातील लेखात एकब्राह्मण व चातुर्वर्ण्य सस्थेचा पुरस्कर्ता म्हटलेले आहे त्याच नावावर चालणारा शक धर्मकृत्यात प्राह्य मानलेला आहे यावरून ते हीन जातीय नव्हते असें ठरतें सातवाहन राजे एकाही लेखात स्वत ला आन्ध्र म्हणवीत नाहीत त्याचे बहुसख्य शिलालेख महाराष्ट्राच्या सह्याद्रीलगतच्या भागात आढळतात आणि नार्गो देश या नावानें ओळखल्या जाणाऱ्या महाराष्ट्राच्या पठारी प्रदेशात आणि मराठवाडा व वऱ्हाड या भागात त्याचा आद्य शिलालेख नाणेघाटातील देवकुलात कोरलेला आहे येथ आद्य सातवाहनाच्या प्रतिमाही कोरलेल्या होत्या या व अन्य प्रमाणावर त्याच मूलस्थान आन्ध्र मावळ हें असावें असें माझें अनुमान आहे (Annals of the Bhandarkar Institute Silver Jubilee Volume 1917 1942 The Home of the Satavahanas) आपल्या यशाची निशाणी आपल्या मूलस्थानाच्या आसपास माडावी हा मनुष्य स्वभाव आहे नाणेघाटातील लेखात उल्लेखिलेले यज्ञ जुन्नर ( यज्ञ नगर जण्ण = यज्ञ क्र २२७ ) येथ झाले असावेत असेंही माझें अनुमान आहे

सातवाहनाच्या दतकथा सस्कृत, प्राकृत भाषात रूढ आहेत ऋषीच्या शापानें सिंहरूप प्राप्त झालेल्या सात नामक यक्षाच्या पाठीवर बसलेला बालक दीपकर्णा राजाला मिळाला म्हणून यानें त्याला सातवाहन हे नाव दिले अशी कथा कथासरित्सागरात आहे यक्ष सात हा राजगृहाचा प्रपालक, असें सयुक्तवस्तूत ( ३१ ) विधान आहे ब्राम्हणी विधवा व शेष नाग याचा सातवाहन हा पुत्र, तो कुभारवाड्यात वाढला, तो आपल्या सवगड्याना मातीचे हत्तीघोडे करून देई म्हणून त्याला सातवाहन हें नाव मिळालें अशी कथा जिनप्रभसूरीच्या प्रतिष्ठानपुरकल्पात सागितलेली आहे विक्रमानें पठणवर स्वारी केली तेव्हा शेषानें पुरविलेल्या अमृतानें त्यानें हे हत्तीघोडे सजीव केले व विक्रमाचा पराभव केला अशी कथा सिंहासन बत्तिशीत आहे डॉ प्रिझुस्की यानीं सातवाहन या सज्ञेचा अर्थ ' अश्वपुत्र " असा लावला ( J R A S

1929 ) आहे, कारण सुड भाषेंत सादम् म्हणजे घोडा आणि हप्पन म्हणजे पुत्र कारण अश्वमेधात अश्व व महिषी याचा संभोग होतो ! श्री अरवमुथन् ( The Kaveri, Maukhari & Sangam Age ) सांगतात कीं वाहिन् व कर्णा ह्या समानार्थी शब्दाचा अर्थ वल्हे असा असल्यामुळें ज्याचे हुकमतींत शंभर नावाडी तो सातवाहन पुरातत्वभूषण श्री राजवाडे सांगतात पाणिनि काली शालिवाहन याचा अर्थ भातगाडी असा असल्यामुळें हें ज्याचे देवक ते शालिवाहन कुल आणि ज्याच्या बैलाचे कान कापलेले आहेत ते–शाता कर्णा येषाम् ते शातकर्णी ·अशा अनेक व्युत्पत्ति संशोधकानी लावलेल्या आहेत त्या सर्व विचारात घेऊन मी ही एक व्युत्पत्ति मांडली ( Annals of the Bhandarkar Oriental Research Institute : XXVII pp 237-287 · " Satavahana & Satakarni " ) आहे. ती अशी सातवाहन ही संज्ञा सूर्यवंश द्योतक ( सप्तवाहन सूर्य ) आहे, सातकर्णी म्हणजे सूर्यकिरण किंवा सूर्य शर, सातवाहनांच्या नाण्यावर जें विशिष्ट चिन्ह आढळतें तें सूर्याचे द्योतक आहे

गाथासप्तशतीचा टीकाकार कुलबाल्देव सांगतो कीं शालिवाहनानें 'आदिम ध्यानेषु' इष्ट दैवताप्रत नमस्कार गाथा घातल्या आहेत अशा गाथा तीनच ( क्र १, ३३२ व ७०० ) आहेत प्रत्यक्ष पशुपति ज्याला नमन करतो तो सूर्य हेच शालिवाहनाचे इष्ट दैवत आहे यात संशय नाहीं गाथासप्तशतीच्या काळात तापीचे ठायीं विशेष पावित्र्य असल्याचें क्र २३९ या गाथेवरून दिसतें. दुसऱ्या कोणत्याही नदीला पवित्र म्हटलेले नाहीं तपती उर्फ तापी ही विवस्वान् सूर्याची कन्या हें अनेक आधारावरून सिद्ध आहे म्हणूनच येथें तिला पुण्यप्रद म्हटलेले असलें पाहिजे

अशोकाच्या मृत्यूनंतर सर्वांना समर्थ व समृद्ध आणि संघटित व सुस्थिर असा मौर्य साम्राज्याचा डोलारा उडाला आर्थिक, राजकीय व लष्करी संघटनेवर साम्राज्याचे सामर्थ्य अवलंबून असते अशोकाने धर्मराज्याचा पुरस्कार केल्यामुळे सर्वांना रिता झाला, राज्यकारभारांत ढिलाई आली आणि लष्करी सामर्थ्य नष्ट झाले असलीं तर महाराष्ट्रावर अशोकाची सत्ता नाममात्र होती अशोकाच्या मृत्यूनंतर सातवाहन कुलोत्पन्न सिमुक आणि

चेतधुलीतपन्न महामेघवाहन खारवेल याच्या नेतृत्वाखाली महाराष्ट्र व कलिंग देश स्वतंत्र झाले अशोकाचे उत्तराधिकारी कर्तृत्वशून्य व प्रतिकार पराङ्मुख निघाले शेवटचा मौर्य राजा बृहद्रथ याचा वध करून पुष्यमित्र शुंगाने मौर्य साम्राज्य निकालात काढले व शुंग साम्राज्य प्रस्थापित केले

सातवाहन वंशात तीस राजे होऊन गेले वेगवेगळ्या आधारग्रंथात ही सख्या कमी जास्त दिलेली आहे सामान्यत सर्व संशोधकाना मान्य अशी या राजाची अनुक्रमापुरती वंशावळ आणि समकालीन उल्लेख व इतिहास यावरून मी अनुमानाने बसविलेला त्याचा काळ याच कोष्टक येथे देतो अनुमानित काळ हा पुराणातील राज्यकाळावरून बसविलेला आहे

मगधसम्राट् पुष्यमित्र शुंग प्रथम महाराष्ट्राधिपति व नतर दक्षिणापथपति श्री सातकर्णी सातवाहन, कलिंग सम्राट महामेघवाहन खारवेल आणि सिंध-पंजाबचा ग्रीक अधिपति मीनंडर हे समकालीन व प्रतिस्पर्धी पुष्यमित्र व सातकर्णी हे ब्राह्मण व यज्ञसंस्कृतीचे पुरस्कर्ते मीनंडर हा परावर्तित बौद्ध आणि खारवेल हा जैन बौद्ध व जैन राजानी एकमताने छेदकरून वैदिक संस्कृतीच्या पुरस्कर्त्यांविरुद्ध उठावणी केल्यामुळे त्याच्या सामन्याला काही संशोधक धर्मयुद्धाचे स्वरूप देतात पहिला सामना खि पू १७१ च्या सुमारास खारवेल व सातकर्णी याच्या दरम्यान झाला खारवेलाने महाराष्ट्रावर दोन स्वाऱ्या केल्या, प्रथम सातवाहनाच्या मूषिकनगरीचा नाश केला व नतर त्याच्या राष्ट्रिक-भोजक सामन्ताचा पराभव केला मूषिकनगरी म्हणजे उदीर गाव असा डॉ यदुनाथ सरकार याचा अदाज आहे मला वाटते, हा नगरी मुशी नदीच्या खोऱ्यात शोधली पाहिजे तीनशे वर्षांपूर्वी नन्दानी कलिंगातून राजगृही नेलेल्या जिन मूर्ति परत मिळविण्याच्या निमित्ताने त्याने मगधावर दोन स्वाऱ्या केल्या पहिल्या वेळी पुष्यमित्राने बचावासाठी मथुरेपर्यंत माघार घेतली आणि दुसऱ्या वेळी त्याचा पराभव झाला बौद्ध साहित्यात मिलिंद या नावाने विख्यात असलेल्या मीनंडरने गंगा यमुना दुआब व सौराष्ट्र हे प्रदेश काबीज केले आणि त्याचा सैन्ये उज्जयिनीकडे व पाटलीपुत्राकडे वळली या प्रचंड विपक्षाच्या चढाईमुळे भारताचे स्वातंत्र्य धोक्यात आले

| क्रमांक | नाव | राज्यारोहणकाल | | टीप |
|---|---|---|---|---|
| | | श्री. बखले | माझा अनुमान | |
| १ | सिमुक | खि पू २२० | खि पू २२० | याची प्रतिमा नाणेघाटात आहे महाराष्ट्राचा पहिला स्वातंत्र्य संस्थापक |
| २ | कृष्ण | ,, १९७ | ,, १९७ | याचे राजवटीतला लेख पांडवलेण्यात आहे |
| ३ | श्री सातकर्णी (१) | ,, १७९ | १७९ | याची प्रतिमा व यज्ञलेख नाणेघाटात आहे पुष्यमित्र शुंग, खारवेल व मीनँडर याचा समकालीन राणी नायनिका साची तोरणावरील लेख याचे राजवटीतील असावा दक्षिणापथपति माळवा घेताच्या नाणी |
| ४ | पूर्णोत्संग | ,, १६९ | ,, १०१ | याने शुंगाचा पूर्ण उच्छेद केला असावा |
| ५ | स्कन्धस्तम्भि | ,, १५१ | ,, १३३ | |
| ६ | सातकर्णी (२) | १३३ | ,, ११० | याने मालवगणाचे नेतृत्व पत्करून शकाचा पराभव केला असावा साची तोरण लेख नाणी |
| ७ | लम्बोदर | १०४ | ,, ५९ | |
| ८ | आपीलक | ८६ | ,, ४१ | याचे नाणे मध्य प्रांतात मिळाले आहे |
| ९ | मेघस्वाति | ,, ७४ | ,, २९ | स्वाति नाव धारण करणारा वंश वेगळाच, असे काहींचे मत |
| १० | स्वाति | ,, ५६ | ,, ११ | |
| ११ | स्कन्दस्वाति | ,, ४० | इ स १ | |

| क्रमांक | नांव | राज्यारोहणकाल | | टीप : |
|---|---|---|---|---|
| | | श्री. बखले | माझें अनुमान | |
| १२ | मृगेंद्र स्वातिकर्ण | ,, ३९ | ,, ८ | |
| १३ | कुंतल स्वातिकर्ण | ,, ३७ | ,, ११ | याचा उल्लेख वात्स्यायनाच्या कामसूत्रांत आलेला आहे. |
| १४ | स्वातिवर्ण | ,, २९ | ,, १९ | |
| १५ | पुलोमावि ( १ ) | ,, २८ | ,, १९ | |
| १६ | अरिष्ठकर्ण | ,, ४ | ,, ४३ | |
| १७ | हाल | ई. स. २१ | ,, ४३ | गाथासप्तशतीचा संपादक. |
| १८ | मंतलक | ,, २६ | ,, ४४ | |
| १९ | पुरींद्रसेन | ,, ३१ | ,, ४९ | |
| २० | सुंदर सातकर्णि | ,, ४२ | ,, ५३ | |
| २१ | चकोर सातकर्णि | ,, ४३ | ,, ५३ | स्मिथ याचा समन्वय वासिष्ठीपुत्र विळिवायकुरार्शी करतो. |
| २२ | शिवस्वाति | ,, ४३ | ,, ५३ | |
| २३ | गौतमीपुत्र सातकर्णि | ,, ६० | ,, ७६ | यानें क्षहरात क्षत्रपांचा उच्छेद केला व शकस्थापना केली. नाशिक येथें लेख. जोगळटेंबीचा मुद्रानिधी. |
| २४ | वासिष्ठीपुत्र पुलोमावि | ,, ८५ | ,, ९१ | कार्ले, नाशिक, अमरावती, कान्हेरी येथें लेख. नौका चिन्हांकित मुद्रा. |
| २४ | अ सातकर्णि | ,,११३-१२७ | ,, ११९ | तऱ्हाळा नाणीं. |

| क्रमांक | नाव | राज्यारोहणकाल | | शेरा |
|---|---|---|---|---|
| | | श्री बखले | माझें अनुमान | |
| २५ | शिवश्री | ११२ १२९ | १६८ | अमरावती शिलालेख नाणी |
| २६ | शिवस्कंद | ११२ १२९ | ११८ | तऱ्हाळा नाणी |
| २७ | यज्ञश्री सातकर्णी | १२७ | १९५ | नाशिक कान्हेरी [illegible] चिन्नगंजम येथें [illegible] क्षत्रप धर्तीचें एक नाणें सातवाहन धर्तीचीं अनेक नाणीं |
| २८ | विजय | ११६ | १७४ | तऱ्हाळा नाणा |
| २९ | चंद्रश्री | १६२ | २०० | कोडवोलु शिलालेख, नाणा |
| ३० | पुळोमावि ( ३ ) | १७२ १८० | २१० २१८ | तऱ्हाळा नाणी म्याकदोनी शिलालेख |

शकाचा उच्छेद करणाऱ्या सातवाहनाचा उल्लेख आहे या व अन्य पुराव्यावरून समन्वयानें ऐतिहासिक घटना निश्चित होतात, त्या अशा

जैन आचार्य कालक हा धर्मप्रसारार्थ उज्जयिनीस आला असता त्याची रूपवती बहीण सरस्वती हिला तेथील राजा गर्दभिल्ल उर्फ गंधर्वसेन यानें अंतःपुरात ओढलें तिची सुटका करण्याचे सर्व प्रयत्न विफल झाल्यानंतर आचार्यानें उज्जयिनीवर स्वारी करण्यासाठी शकांना आमंत्रण आणलें या वेळा वायव्य सरहद्दीवर यवनांचीं राज्यें होतीं व मध्य आशियातील कुषाण टोळ्या शकाचा उच्छेद करण्यास उद्युक्त झाल्या होत्या त्यांना टाळून शक टोळ्या बोलन घाटातून हिंदुस्थानात घुसल्या होत्या खि पू पहिल्या शतकाच्या पहिल्या चतुष्कात शक सिंध-पंजाबात स्थायिक झाले होते आचार्यांच्या पुरस्कारामुळें त्यांना स्वारीच्या खर्चासाठी अलोट संपत्ति आणि सौराष्ट्र गुजरातेतील स्थानिक राज्यकर्त्यांचें सहकार्य मिळालें आचार्याला उज्जयिनीचा भेद माहीत होता त्याचा फायदा मिळाल्यामुळें शकांनीं गर्दभिल्लाचा पाडाव करून उज्जयिनी काबीज केली सरस्वतीची सुटका झाली, पण ठरल्याप्रमाणें शक परत जाईनात ते तेथेंच रमले व प्रजेवर अत्याचार करू लागले त्यांच्या पाठिंब्यानें फुशार ल्ल्या आचार्याचा आता अपमान उपहास होऊ लागला म्हणून तो पैठणला सातवाहनाच्या आश्रयाला आला कारण शकांना विरोध करण्याला समर्थ अशी ही एकच सत्ता त्या काळात अस्तित्वात होती शिवाय सातवाहनाचा माळव्याशीं पूर्वापार संबंध असल्यामुळें शकाविरुद्ध त्याची सहानुभूति संपादन करणें शक्य होतें आचार्यानें उज्जयिनीची परिस्थिति सातकर्णाला समजावून दिली नंतर जुनें लागेबांधे उकलून सातकर्णानें माळव्यावर स्वारी केली उज्जयिनी जिंकली आणि मालवगणाच्या मदतीनें शकांना पिटाळून लावलें

खि पू पहिल्या शतकात उज्जयिनीतून शकांचें उच्चाटन केल्याचें श्रेय परंपरेनें विक्रमादित्याला दिलें आहे याचें ऐतिहासिकत्व अत्यंत संशयास्पद आहे याचा एकही शिलालेख किंवा नाणें आजवर मिळालेलें नाहीं, किंवा कोणा समकालीनाच्या लेखात त्याचा उल्लेख आलेला नाहीं या काळात माळव्यात मालवगणाचीं नाणीं मिळालेलीं आहेत उज्जयिनीत होणारे अपशकुन राज्यक्रांतीचे द्योतक आहेत असें भविष्य ज्योतिष्यानीं वर्तविल्यावरून आणि

ज्याची आई अडीच वर्षांची असेल त्याच्या हातून तुला मृत्यु येईल असेही त्याजकडून सागण्यात आल्यावरून विक्रमानें वेताळाला सभाव्य शत्रूचा शोध करावयास पाठविलें शालिवाहन हा असा बालक वेताळाला पैठण येथें आढळला. लगेच त्यानें विक्रमाला वर्दी दिली. शत्रुचा उठावणीपूर्वीच नि पात करण्याचें ठरवून विक्रमानें पैठणवर स्वारी केली शालिवाहनानें आपल्या खेळातले मातीचे हत्ती, घोडे व सैनिक शेषाच्या कृपेनें सजीव केले आणि त्यानिशी विक्रमाशीं युद्ध केलें या युद्धात विक्रमाचा पराभव झाला व त्याच्या सैन्यानें उत्तरेकडे पळ काढला. शालिवाहनानें विक्रमाचा पाठलाग केला, त्याला गाठलें आणि सोडग्यानें वदडन ठार केलें. शेवटीं विक्रमाचें सैन्य नर्मदापार झालें आणि पाठलाग करणारे शालिवाहनाचें सैन्य नदीतून वाहून गेलें या विक्रम-शालिवाहन कथा वेताळ पचविशी व सिंहासनबत्तिशी या लोककथासंग्रहात थोड्याबहुत फरकानें आलेल्या आहेत. हे कथासंग्रह नि संशय उत्तरकालीन आहेत गर्दभिल्ल विक्रमादित्याची परपरा ब्राह्मणी आहे असे म्हणावें तर पुराणातील वशावळीत त्याचा उल्लेख नाही गर्दभिल्ल व शक याचा उल्लेख आहे, तरीही ही परपरा जैन आहे असें म्हणावें तर खुद्द कालकाचार्य कथानकात सागितलें आहे की शकोच्छेदक विक्रमादित्य हा प्रतिष्ठानहून उज्जयिनीस आला होता. मग हें सोंग साजरें करण्यासाठीं गृहीत धरावयाचे की शकाकडून गर्दभिल्ल मारला गेल्यानतर त्याचा पुत्र विक्रमादित्य हा पैठणला सातवाहनाच्या आश्रयाला आला असला पाहिजे ! अडीच वर्षांच्या आईचा मुलगा म्हणजे ज्यानें नुक्तेंच राज्य स्थापन केलेलें आहे असा शालिवाहन राजा होय, असा डॉ. जयस्वालाचा अभिप्राय आहे. सिमुक हा सातवाहन कुलाच्या राज्यकर्तृत्वाचा सस्थापक, याबद्दल सर्वांचें एकमत आहे. ज्या व्यक्तीवरून या कुलाला सातवाहन हे नाव प्राप्त झालें तो याच्याही पूर्वी होऊन गेला असला पाहिजे हें आहे कारण सिमुकाला कोणी-ही शालिवाहन म्हणून सबोधिलेलें नाहीं राजा सातवाहन असें नाव असलेलें एक ताब्याचें चौकोनी नाणें माझ्या सग्रहीं आहे. अक्षर धाटणीवरून तें पहिल्या सातकर्णीच्या ही पूर्वीचें असावें असें सशोधकाचें अनुमान आहे. डॉ. जयस्वाल याचें अनुमान स्वीकारलें तर सातवाहन राज्यसंस्थापक शालि

या परचक्राच्या प्रतिकारार्थ शुंगसातवाहनांना आपलें सामर्थ्य एकत्रित केलें आणि मीनंडरचा पराभव ( खि पू १५३ ) केला

या विजयाच्या उत्सवार्थ आणि सार्वभौमत्वाचें निदर्शक म्हणून पुष्यमित्र व सातकर्णी यांनी पतंजलीच्या प्रेरणेनें अश्वमेधादि यज्ञ केले नाणे घाटातील सातवाहनाच्या देवकुलातील देवी नायनिकेचा लेख याला साक्ष आहे हा घाट व ही गुंफा पाहिली असता यांनी पटते का हा दोन्ही काम समकालीन असला पाहिजेत भारतातला हा पहिला यज्ञलेख आहे या लेखात सातकर्णाला अप्रतिहतचक्र व दक्षिणापथपति म्हटलेलें आहे यज्ञ प्रसंगा केलेल्या दानाचा उल्लेख या लेखात आलेला आहे अशोकाच्या धर्मराज्यामुळें व बौद्धांच्या प्रचारामुळं ब्राह्मणाची अवस्था केविलवाणी झाली होती या आपन्नांना आश्रय आणि दानें देऊन सातकर्णीनें त्यांचा उद्धार केला यावरून वाटत का क्र ४६७ मधील मालाहण तो हाच असला पाहिजे शिवाय या काळात महाराष्ट्रात भागवत धर्म प्रस्थापित झाला होता आणि धार्मिक सहिष्णुता वाणली होती असं ही या लेखावरून प्रत्ययास येतें मीनंडरच्या आक्रमणाला महाभाष्य आणि पुष्यमित्राच्या पराक्रमाला मालविकाग्निमित्र साक्षी आहेत

या विजयानंतर काही काळपर्यंत माळव्यावर सातवाहन व शुंग या दोन्ही घराण्यांची सत्ता असावी असं दिसतें, उज्जयिनी येथें सातवाहनाची आणि विदिशा येथें शुंगांची पहिल्या सातकर्णाची माळवा धर्ताचा नाणा मिळतात याचें हेंच कारण असल पाहिजे माळव्यातल्या अनेक गणाच्या राजाच्या नाण्यावर उज्जयिनी चिन्ह आढळतें हे सातवाहनाचे मांडलिक असावेत असें माझें अनुमान आहे

क्र ४७१ या गाथेंत ऐतिहासिक घटना सूचित असावी असे अनुमान टीकेंत व्यक्त केलें आहे दाक्षिणात्य राजाच्या शत्रूंनीं उत्तरेकडे पलायन केलं असा संदर्भ आहे हा राजा कोण आणि त्याचे हे शत्रु कोण ? नन्द, चंद्रगुप्त व अशोक मौर्य, विक्रमादित्य महाक्षत्रप रुद्रदामन्, समुद्रगुप्त व हर्षवर्धन या उत्तर हिंदुस्थानी राजानीं दक्षिणेवर आक्रमण केल्याचा इतिहास अगर दंतकथा आहेत पण पलायन असं फक्त विक्रमादित्यानं केलें कालक्रमानुरोधानें या गाथेंतील सूचित घटनेशीं या कोणाचा ही समन्वय होत नाही

मीनॅंडरविरुद्ध झालल्या उठावणात पुष्यमित्र शुग व सातकणा सातबाहन हे सहकारी होते या स्वातन्त्र्य युद्धानतर लवकरच हे दोघेही दिवगत झाले त्यान्या उत्तराधिकाऱ्यामध्ये स्नेहभाव दिसत नाहीं पुष्यमित्रानतर त्याचा पुत्र अग्निमित्र हा राज्यावर आला कालिदासान्या मालविकाग्निमित्र नाटकाचा हा नायक यज्ञसेन व माधवसेन हे भाऊ भाऊ व विदर्भ सत्तेचावत प्रतिस्पर्धी अग्निमित्रानें विदर्भावर स्वारी केली व राज्य या दोघामध्यें वाटून दिलें असा कथाभाग या नाटकात आलेला आहे खारवेलान्या लेखात कृष्णवेणेचा उल्लेख आहे श्री वरखले आणि अनेक अन्य सशोधक (E I XX p 83) या नदीचीं ओळख कृष्णेशीं पटवितात आणि श्री मिराशी व अनेक अन्य सशोधक हे वैनगगेला मिळणाऱ्या कन्हान नदीशीं या आणि अनेक अन्य प्रमाणावरून दिसतें, का खारवेलाच्या काळापासून विदर्भावर सातवाहनाची सत्ता होती अर्थात् यज्ञसेन व माधवसेन हे सातवाहनाचे माडलिक असले पाहिजेत आणि अग्निमित्रान्या आक्रमणामुळ शुग–सातवाहनामध्यें सघर्ष निर्माण झाला असला पाहिजे राजाच्या अल्पकालीन कारकीर्दा हें क्रान्ति कालाचे लक्षण आहे पुष्यमित्रान्या उत्तराधिकाऱ्यामध्यें तें दिसून येतें शुगान्या उच्छेदाचें श्रेय पुराणानी काण्वाना दिलें आहे काही आधुनिक सशोधक (Shivarammurti Amaravati Sculptures p 11) हें श्रेय पूर्णोत्सगाला (पूर्णम् उन्क्रान्त शुगान्) देतात मला हें मत ग्राह्य वाटत सातवाहनान्या नौबती झड लागताच शुगाचीं सैन्यें नर्मदापार झालीं असली पाहिजेत

दुसरा सातकणी हा सहावा सातवाहन राजा यानें छप्पन वर्षें राज्य केलें सातवाहन राजात याची कारकीर्द सर्वात मोठी 'रणो सातकणिस' असा लेख असलेलें नाणा ही याचीं असें डॉ रॅप्सन याचे अनुमान आहे यापैकी काहीं नाणी उज्जैन धर्तीचीं वर्तुलाकार आहेत व काहीं एरण धर्तीचीं चौकोनी आहेत काहीं नाण्यावर झप घेणाऱ्या सिहाची आकृति आहे आणि काहीं वर साड उभारलेल्या हत्तीची हीं दोन्ही प्रतीकें अन्वर्थक आहेत साची स्तूपान्या दक्षिण तोरणावर सातकर्णीच्या कारागिराचा पुढारी वासिष्ठीपुत्र आनद याचा दानलेख आहे कालकाचार्य कथानकात उज्जयिनी येथील

वाहनाला खि. पू. तिसऱ्या शतकाच्या द्वितीयार्धांत माडलें पाहिजे. त्या काळाशी जुळेल असा विक्रम परपरेंत एकही तपशील नाही पहिल्या शतकात गोतमीपुत्रानें क्षहराताचा नि पात केला, चवथ्या शतकाच्या अखेरच्या चतुष्कात दुसऱ्या चद्रगुप्तानें क्षत्रपाचा उच्छेद केला आणि पाचव्या शतकाच्या अखेरच्या चतुष्कात यशोधर्म्यानें हूणाचा या चद्रगुप्तानेंच प्रथम विक्रमादित्य हें बिरुद धारण केलें खि पू पहिल्या शतकातील विक्रमादित्याच्या कथा अर्थातच यानतर निर्माण झाल्या असल्या पाहिजेत.

मग क्र ४६४ मधील विक्रमादित्याच्या उल्लेखाची सगति कशी लावावयाची? चद्रगुप्त विक्रमादित्यानतर विक्रमकथा अस्तित्वात आल्या असे मानलें तर गाथासप्तशतीचें सपादन पाचव्या शतकात झालें असलें पाहिजे असें मानावें लागतें अशी आपत्ति टाळण्यासाठी डॉ. अळतेकर ( Vikrama Volume Riddle of Vikrama Era p 9 ) सागतात की हा उल्लेख प्रक्षिप्त उत्तरकालीन असला पाहिजे या कोड्याला अशी बगल देण्याचें काहीच कारण नाही ऐतिहासिक विक्रमादित्याव्यतिरिक्त परपरेला आणखी दोन विक्रमादित्य माहीत आहेत, एक कालकाचार्य कथानकातला वीर विक्रम, शकाचा उच्छेदक आणि प्रतिष्ठानचा राजा, ज्याचा समन्वय दुसऱ्या सातकर्णीशी होऊ शकतो, आणि उत्तरकालीन सिंहासनबत्तिशीचा नायक उदार विक्रम गाथासप्तशतीला गर्दभिल्ल कुलातला वीर विक्रम माहीत नाहीं, लोककथातला उदार विक्रम माहीत आहे जो सर्वस्वी काल्पनिक आहे, लोककथाव्यतिरिक्त ज्याला अस्तित्व नाहीं ग्रथ उत्तर कालीन असला तरी सिंहासन बत्तिशींत ग्रथित केलेल्या कथा प्राचीन काळापासून चालत आलेल्या आहेत त्याचें मूळ जातकाहून किंवा कमींत कमी त्याच्या इतकें प्राचीन असावें अस वाटतें

आठवा सातवाहन राजा आपीलक याच ताब्याचें मोठें वर्तुलाकार नाणें मध्यप्रातात मिळालें आहे या नतर सातवाहन सत्तेला उतरती कळा लागलेली दिसते राजाचे राज्यकाल अल्प आहेत, त्याचे शिलालेख आढळलेले नाहीत व नाणीं मिळालेलीं नाहींत फक्त पहिला पुलोमावि व शिवस्वाति यानीच बरीच वर्षे राज्य केलेलें आहे तेरावा सातवाहन राजा कुतल सातकर्णी याचा उल्लेख

वात्स्यायनाच्या कामसूत्रात त्यांचा विट्ठलीच्या अनुषगानें आलेला आहे "कर्तर्या उन्तल शातकणि शातवाहनो महादेवी मल्यवती जघान। या उल्लेखावरून अनुमान करण्यात आले आहे की याचा जन्म कुन्तलात झाला असेही अनुमान होतें का याच्या काळात सातवाहन सत्ता कृष्णाकाठच्या कोण्यात मात्र अस्तित्वात असावी सतरावा सातवाहन राजा हाल हा गाथासप्तशतीचा संपादक याची सत्ता मावळात व त्र्यंबकादि पर्वतालगत गोदावरीच्या परिसरात मात्र होती

उज्जयिनीच्या पराभवानंतर तेथील शकाना उत्तरेकडे पलायन केले दरम्यान मोगम व अझेस या शक नेत्याना पंजाब व गंगायमुना दुआब या भागात प्रभुत्व मिळावलं होत तक्षशिला, पुष्कलावती व मथुरा येथे त्याचा मुख्य ठाणी होती मथुरा येथील क्षहरात क्षत्रपाचा भूमक याने सौराष्ट्रात क्षत्रपसत्ता प्रस्थापित केली त्याचा उत्तराधिकारी नहपान याने माळवा, राजस्थान, सौराष्ट्र, लाट व उत्तर महाराष्ट्र या भागात आपली सत्ता प्रस्थापित केली नाशिक, जुन्नर व कार्ले येथ त्याचे लेख आहेत खि पू पहिल्या शतकाच्या चवथ्या चतुष्कात स्वाति हे उपनाव धारण करणाऱ्या सातवाहनाच्या काळात क्षहरातांचा महाराष्ट्रात प्रवेश झाला असाव स्वाति हे आदि मध्य किंवा अत्य नाव धारण करणाराविषयी पुराणाचे उल्लेख एकसुर्री नाहीत क्षत्रपाच्या आक्रमणामुळ हे राजे देशोधडीला लागले असावेत किंवा दुर्दैवी मारले गेले असावत क्षहरातांची शिल्पकृत्यें व धर्मकृत्यें यावरून त्याची संपन्नता व राजकीय धोरण प्रत्ययास येतात मानवरनें फक्त बौद्धाना आश्रय दिल्यामुळें त्याला ब्राह्मण क्षत्रियाचे सहकार्य किंवा महानुभूति ही मिळाली नाहीत क्षहरातांनी बहुजन समाजासाठी अन्नछत्रें घातला, धर्मशाळा बांधल्या, नद्यावर घाट बांधले व धरमतरी सुरू केल्या हजारो ब्राह्मणाना भोजनें घातला व दानें दिलीं पहिल्या सातकर्णीनें यज्ञात त्यानें दिलेली दीं प्रत्यक्ष प्रक्रियेत भाग घेणाऱ्या ब्राह्मणानाच दिला असली पाहिजेत हें उघड आहे पण त्यानें दानग्रहण करणाऱ्या वर्गाचा उल्लेख केलेला नाहीं क्षहरातानीं असा उल्लेख केला, कारण ते स्वत देशाला परके होते व विशिष्ट वर्गाला सतुष्ट ठेवण्याला उत्सुक होते नहपानाच्या मुलाचे नाव दक्षमित्रा व जावयाच ऋषभदत्त नहपानाच्या नाण्यावरील लेख त्याच्या प्रचेला

परकी असलेल्या खरोष्टी व ग्रीक आणि परिचित अशा देशी ब्राह्मी लिपीत आहेत यावरून दिसतें कीं क्षहरात हे परकेपणा समरस होण्यास उत्सुक दिसले तरी आपलें व्यक्तिमत्व अबाधित राखण्याविषयीं दक्ष होते

या पारतन्त्र्यावर्त काळात सातवाहन राजाना सह्याद्रीच्या जंगलात किंवा कर्नाटकात आश्रय घेतलेला असावा या काळात महाराष्ट्रातील बंदराचा व्यापार प्रयत्नपूर्वक उध्वस्त करण्यात आला कल्याण बंदरात मालाची चढउतर करावयास आलेल्या जहाज यवनाना सैनिकांच्या बंदोबस्तात भडोचला हाकून नेण्याची प्रथा पेरिप्लसनें नमूद केलेली आहे

वासीमाता सातवाहन राजा शिवस्वाति याला भागवत पुराणात अरिंदम म्हटलेले आहे यावरून यानें क्षहराताविरुद्ध उठावणी आरंभिली असावी याची राणी महादेवी गोतमी हिच्या सारखी भाग्यवती आजवर भारतात झाली नाही राजर्षि शिवस्वाति हा तिचा पति, शककर्ता गोतमीपुत्र सातकर्णी हा यांचा पुत्र आणि महाराज वासिष्ठीपुत्र पुळुमावि हा नातू तिचा लेख पाण्डवलेण्यातील क्र ३ या गुफेत आहे त्यातील काही विधाने येथे देता ती स्वत सत्यवचनदानक्षमाहिंसानिरत, तपोदमनियमोपवासतत्पर अशी होती तिने पुत्राचे माहात्म्य वर्णन केले आहे तें असे एकशूर एकब्राह्मण, एकधनुधर सातवाहनकुलयशप्रतिष्ठापनकर क्षत्रियदर्पमानदमन शकयवनपल्हवनिषूदन निमसुदपीततोयवाहन द्विजवरकुटुम्बविवर्धन विनिवर्तित चातुर्वर्ण्यसंकर नाशिक जिल्ह्यात सिन्नर तालुक्यात जोगळटेम्भी येथें नहपानाच्या तेरा हजार राप्यमुद्राचा निधि आढळून आला त्यापैकी दोन तृतीयांश नाण्यावर गोतमी पुत्राच्या नावाचे व सातवाहनाच्या मुद्राचिन्हाचे ठसे ठोकण्यात आलेले आहेत क्षहरातांचा निःपात केल्याचे द्योतक म्हणून हे पुनर्मुद्रण करण्यात आले असले पाहिजे सातवाहन व नहपानाचे उत्तराधिकारी क्षहरात क्षत्रप याचा निर्णायक युद्ध, काळ, जुन्नर व नाशिक ह्या सह्याद्रीलगतच्या भागात झाला असला पाहिजे या संघर्षात गोतमीपुत्र विजयी झाला म्हणूनच त्याला शालिवाहन शककर्ता म्हणतात.

गोतमीपुत्रानंतर त्याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुळुमावि हा राज्यावर आला महाराष्ट्रात कार्ले व नाशिक आणि आन्ध्रात अमरावती व धरणीकोट येथे याचे

लेख मिळालेले आहेत. याची नाणी महाराष्ट्रांत व आन्ध्रांत मिळाली आहेत. कारोमांडल किनाऱ्यालगतच्या प्रदेशांत मिळालेल्या याच्या नाण्यांवर डोलकाठी असलेल्या जहाजाची प्रतिमा आढळते.

गोतमी बलश्रीच्या लेखांत गोतमीपुत्राच्या अवन्तिविजयाचा उल्लेख आहे. इ. स. ७८ पासून उज्जयिनीस महाक्षत्रप चष्टण याच्या घराण्याची सत्ता सुरू झाली. या घराण्याचे राज्य अवन्तिमाराष्ट्र भागात इ. स. ३९५ पर्यंत टिकले. चष्टण हा कुषाणांचा क्षत्रप असावा. क्षहरातांशी गोतमीपुत्राचा महाराष्ट्रांत संग्राम सुरू असता त्यात टिकाव आणण्याकरितां किंवा त्याचा फायदा घेऊन चष्टणानें हे आक्रमण केले असावे. या घराण्यातला दुसरा राजा जयदामन् हा फक्त क्षत्रप होता. या घराण्यातला तिसरा महाक्षत्रप रुद्रदामन् याचे लेख अंधौ व जुनागड येथे मिळालेले आहेत. या लेखावर अनुक्रमे ५२ व ७२ असे वर्षांक आहेत. दक्षिणापथपति सातकर्णी याचा आपण दोनदा पराभव केला, पण तो नजीकचा नातेवाईक असल्यामुळें त्याचा समूळ नाश मात्र केला नाही असे जुनागड लेखात त्याचे विधान आहे. या लेखाचा काळ ७२ + ७८ = इ. स. १५० असा शकेतानुसार ठरतो. कान्हेरीच्या लेण्यांतील एका संस्कृत लेखात वासिष्ठीपुत्र सातकर्णीची राणी कार्दमकुलोत्पन्न महाक्षत्रप रुद्र याची कन्या होती, असा उल्लेख आढळतो. या उल्लेखावरून अनुमान होते की क्र. २४ अ–सातकर्णी-यानें जयदामन् याचा पराभव केला असावा आणि समेटादाखल जयदाम्यानें आपली नात न रुद्रदाम्याची कन्या शिवश्रीला दिली असावी. पुढे महाक्षत्रप रुद्रदाम्यानें शिवश्रीचा पराभव केला असावा.

सत्ताविसावा सातवाहन राजा यज्ञश्री सातकर्णी याचे लेख कान्हेरी, नाशिक व चिन्नगंजम येथे मिळाले आहेत. सोपारा येथील स्तूपांतील करंडकांत यज्ञश्रीचें क्षत्रप धर्तीचें नाणें मिळालेले आहे. अशा नाणीं गुजरातमौराष्ट्रांतही मिळालेली आहेत. यावरून अनुमान करण्यात आलें आहे कीं हे प्रदेश यज्ञश्रीनें क्षत्रपांपासून जिंकून घेतले असले पाहिजेत. याची नाणीं तऱ्हाळा, विदर्भात मिळालेली आहेत. एकोणतिसावा राजा चंद्रश्री याचा लेख, पूर्व गोदावरी जिल्ह्यांत कोडवलि येथें मिळालेला आहे आणि तिसावा राजा पुळुमावि याचा लेख

बळारी जिल्ह्यात अदोना तालुक्यात म्याकदोनी या लेख्यात मिळालेला आहे यावरून यज्ञश्रीनतर सातवाहन सत्तेचा ऱ्हास व स्थलांतर प्रत्ययास येतें

सातवाहन सत्तेचा अस्त कसा झाला याबद्दल काहीही माहिती उपलब्ध नाही महाराष्ट्रात सातवाहनानतर अभीरानीं राज्य केलें शिवदत्त अभीराचा पुत्र माढरीपुत्र ईश्वरसेन यानें उत्तर महाराष्ट्रात, नाशिक खानदेश भागात, सातवाहन सत्तेचें उच्चाटन केलें असाव याचा लेख पाण्डवलेण्यात आहे आन्ध्रात सातवाहनानतर इक्ष्वाकु घराण्याचें राज्य आलें वासिष्ठीपुत्र शातमूल हा या राजघराण्याचा मूळ पुरुष राज्यप्राप्तीनतर त्यानें अश्वमेध, वाजपेय इत्यादि यज्ञ केले यावरून सातवाहनाशी सघर्ष होऊन त्यात याचा जय झाला असावा वनवासी येथील चुटु हे सातवाहनाचे सामन्त ते ही स्वतन्त्रपण राज्य करू लागले. वऱ्हाडात वाकाटक ह सातवाहनाचे सामन्त होते सातवाहन दुर्बळ झालेले पाहून विन्ध्यशक्ति वाकाटक स्वतन्त्रपणें राज्य करू लागला या उत्तराधिकारी घराण्यांपैका वाकाटक तेवढे पुढें विशेष प्रसिद्धीला आले आणि महाराष्ट्र सस्कृतीचा आणखी विकास करते झाले

## ( २ ) राज्यव्यवस्था .

देश ( क्र ९४ ) व जन्मभूमि ( क्र ३४० ) या सज्ञा गाथासप्तशतींत आलेल्या आहेत मात्र गाथासप्तशतीला त्या राजकीय सदर्भात अवगत नाहीत सुजन हा देशाचा अलकार आहे आणि स्नेह्यासोबत्यान्च्या साहचर्यामुळें जन्मभूमीचें दर्शन प्रिय वाटतें, अशा भावना या गाथात व्यक्त झालेल्या आहेत हे दोन्ही उल्लेख उदासपणे आहेत आणि क्र १६ मधील क्षेत्रसीमेच्या दर्शनानें उचबळणाऱ्या भावनाशीं तोलून पाहण्यासारखे आहेत क्र. ९८९ मध्यें एकच्छत्त भुअणरज्जाचा उल्लेख आहे, पण हें एक राज्य मदनाचें आहे

राना णराहिव = नराधिप क्र ३,४, पुहवीस = पृथ्वीश क्र ७७४, महाराओ = महाराव क्र ८१४, राअ = राज क्र ३९६

क्र. ३६७ मधील राजस्तुति ही मध्ययुगीन ताडपुत्तेपणाला मानेशी आहे क्र ४९५ मधार उद्गार वैतालिकाचे आहेत असं मध्ययुगीन गगाधरानें सागितलेंही आहे क्र. ३९६ मध्यें राजशाहारी युवराज आणि क्र ९९३ मध्य

राजनिष्ठेची घोषणा आहे हा राजद्रोह तत्कालीन परक्या राजकर्त्यांविरुद्ध असणें संभाव्य आहे. क्र ५९६ मधील घटनेशीं तुलना केली असता हें अनुमान विशेष संभाव्य वाटतें आणि स्वदेशी राज्याच्या शत्रूची अवस्था किती करुणास्पद होती हें दिसून येतें. रणरस व रणदुंदुभि ( क्र ९२० ) व जयलक्ष्मी ( क्र. ९७१, ९७७ ) आणि राजाच्या शत्रूची शरणागति ( क्र ४७१, ९७८ ) व पलायन याचा वर्णनें पाहण्यासारखी आहेत क्र ७७४ या गाथेंत पर्वंदिाच्या कृत्रिम स्वागतोत्सवाची तुलना वसंतोत्सवाच्या उत्स्फूर्त उत्साहाशीं केलेली आहे क्र ८१४ मधील महाराव हा उपपदपणें उत्तरकालीन आहे आणि हत्तीना त्याचा आश्रय आहे यानच त्याचा आहे तो मोठेपणा आहे. मेंत स्थैनिम मागतो का हत्ती बाळगण्याचा हक्क फक्त राजांना होता साहजिक आहे दुसऱ्या कोणाला हत्ती पोसवणार ? आणि राज्याचें माहात्म्य जाहीर करणारा ढक्का ( ढक्का क्र ७२८ ) धारण करण्याचें सामर्थ्य त्यालाच कसा असतें गुप्त बातम्या सांगण्यासाठी प्रभूच्या कानाला लागणाऱ्या हेराचा उल्लेख क्र ८१७ या गाथेंत आलेला आहे

काही सातवाहन राजे मातृकुलाचा नाम धारण करीत असले तरी त्याचा राज्यावर येण्याचा अनुक्रम पित्यामागून पुत्र असाच असल्याच शिलालेखातील व पुराणातील उल्लेखावरून ठरत आहे श्री चट्टोपाध्याय ( Satakarni Succession & Marriage Rules J R A S V 1939 p 317 ) यानी हा अनुक्रम मातृप्रधान प्रथेनें होत असावा असं अनुमान केलें आहे पण तें संशोधकाना मान्य झाल नाहीं वारस वयात आलेला नसला तर नावर त्याचा चुलता राज्यकारभार चालवी राजा हा शाततेच्या काळात समाजाचा व धर्माचा आणि युद्धात सेनेचा अग्रणी असे धर्मदायाना संमत असलेल नेतृत्व कर ना नसून करी महाभाज व महारठी हे त्याचें नातेवाईक व सामन्त आणि भोजक व रठिक हे त्याच स्थानिक सरंजामदार वासिष्टीपुत्र स्वामी श्री पुळुमावि ह्याच्या लेखात महासेनापति या पदाचा पहिला उल्लेख आढळतो देशाची विभागणी आहारात केलेली होती, उदा · गोवर्धनाहार, मामालाहार यांच क्षेत्र अर्वाचीन जिल्ह्याएवढं असावें, त्यावर अमात्य-अमात्य हे अधिकारी असत राजाज्ञा साक्षर करण्याची व त्याच्या

म्हणून हें पद ग्रामाच्या प्रकरणात वंशपरंपरेनें चालत असावे मध्यवर्ती सरकारचे सामर्थ्य वाढू लागलं तेव्हा सत्ताधाऱ्यांच्या जमातातून त्याची नेमणूक करण्याची प्रथा सुरु (डॉ भटनागर J R A S 1934 p 348) झाला असावी त्यानेच न्यायदानाचें काम त्यांच्याकडेच असावे असं अर्थशास्त्रावरून दिसतें मृच्छकटिकातील नागरी न्यायाधीशाला 'अधिकरणभोजक' म्हटलेलें ( निर्णयसागर शास्त्री व परब अंक ९ पृ २०० ) आहे अदाधुंदीच्या व परचक्राच्या काळात भारतातील प्रजा व्यक्तिमत्वासह तगविण्याचें श्रेय ग्रामवृद्धाच्या सत्याने चालणाऱ्या ग्रामसंस्थेच्या नेतृत्वाला सघटित झालेल्या ग्रामसंस्थानाच दिले पाहिजे

गाथासप्तशतीच्या ग्रामणीचा दर्जा स्थानिक राज्यकर्त्यासारखा असावा असं त्याच्या पल्लीपति ( क्र ६३२ ) या अभिधानावरून दिसतें या काळात अदाधुंदी असावी सार्वजनिक सुरक्षितता धोक्यात असावी असें दिसते क्र १४ व ५० या गाथाच्या नायिका सरकारी तुरुंगात असून त्यावर हृष्टी चढवून पति ओळख्याला सोडवून नेईल अशी त्याची अपेक्षा आहे क्र ४७७ च्या नायिकेला चार पळवून नेत आहेत, तिचीही अशाच अपेक्षा आहे क्र ५८ चा नायक दरवडेखोराच्या पाठलागाला किंवा परचक्रनिवारणाच्या मोहिमेवर गेला आहे असं टीकाकाराच अनुमान आहे क्र ११८, ४७७ ४७३ , २९८ व ७८७ या गाथात चोराच उपद्रव आहेत त्याच्या धास्तीनें नागरिकाना जागरण ( क्र ३३१ ) करावा लागत आहेत गृहपतीच्या दाराच्यानें क्र ७८७ मधील चोराची पागापाठ चालेली आहे क्र ६२८ व ६३१ मधील उल्लेख परचक्राचे असावेत क्र ९१ मधील ग्रामणीपुत्राची छाती अलवाच्या बाणाना खडखडात झाल्ली आहे क्र ६२८ मध्ये पाटलाच्या पुत्रानें आपल्या वस्ताच रक्षण करण्यात शिताफीन केलेलें आहे क्र ६ १ मधील ग्रामणी आसन्नमरण असला तरी गावकऱ्याना प्रतिकार *टाकून सुरक्षिततेसाठी जगण्यात पळ काढण्याचा भाषा निक्षयासही त्यार* नाही ग्रामणीचा हुद्दा आनुवंशिक असावा क्र ६२८ मधील ग्रामणीपुत्र वयान लहान असला तरी पित्याच्या पाठीमागन ग्रामरक्षणाची जबाबदारी त्याच्यावर पडली आहे क्र ६३१ मधील ग्रामणी आपले नाव सांभाळ

ण्याविषयीं पुत्राला उपदेश करीत आहे. गृहपतिपुत्र व गृहपति दुहिता या प्रमाणे ग्रामणीनंदन (क. ३०, ९०८) व ग्रामणीदुहिता (क. ४१०) यांजवर ग्रामतरुणींची व ग्रामतरुणाची आसक्त नजर आहे; आणि पाटलिणींवरही (क. ४६८-४६९) क. ५९७ मधील ग्रामणीदुहिता इतकी सुंदर कीं तिच्याकडे पाहताना गांवकरी पापण्या मिटण्याचें विसरतात, क. ४१० मधील ग्रामणीदुहिता बाळपणांत एवढा उन्मादक का हा तरुणपणा अनर्थ करील अशी जाणत्यांना धास्ती वाटते आणि ग्रामणीनन्दन? तो तर गांवकन्याच्या गळ्यातला ताईत आणि ग्रामतरुणाचा प्यार! त्यानें बायकोच्या कह्यात राहूं नये आणि संधि मिळेल तेव्हां आपल्याबरोबर रमावें (क.३०) अशी या सुंदरींची अपेक्षा! पाटलिणींशीं सामान्यानें संधान बांधण्यातला धोका क. ४६८ व ४६९ या गाथात व्यक्त झालेला आहे आर्यान्या बाबतात पूर्वी सांगितलें तें येथेंही लागू पडतें. असेंही असावें कीं बहुजनसमाजाच्या मानानें ग्रामणाचा वंश अधिक शुद्ध असल्यामुळें त्याचें शारीरिक सौष्ठव वरिष्ठ दर्जाचें असावें आधुनिक पाटील व देशमुख याच्या घराण्यांतहा हें निदर्शनास येते

पाटील या शब्दाची व्युत्पत्ति महाराष्ट्र-शब्दकोशात पट्टकाल अशी दिलेली आहे. पट्ट, पट्टक म्हणजे ग्राम, जमिनीचा तुकडा किंवा इनामी सनद, कुळांची यादी. हे तपशील नोंदून सांभाळण्याची जबाबदारी पाटलावर असे. गाथा-सप्तशतीच्या काळांत ही संज्ञा प्रचलित होऊं लागली असावी असें क.४६८ व ४६९ या गाथातील 'पाटलाच्या अंगणात पाटलीचें झाड' या श्लेषावरून अनुमान होतें.

क. ५९६ या गाथेत तित्तिर असा पहारेकऱ्याचा उल्लेख आलेला आहे. याला छायेंत कोणी दौवारिक आणि कोणी तिंतापर हे प्रतिशब्द दिले आहेत. पाइयसद्दमहण्णवात तत्तिर व तित्तिर या शब्दाचे अर्थ अनुक्रमें तत्पर व द्वारपाल असे दिलेले आहेत आपटे कोशात दौवारिक याचा अर्थ door-keeper, porter असा आहे हे अर्थ विचारात घेऊन मी तित्तिर हा पाठ स्वीकारला आहे. गाथातील उडाणटप्पू स्त्री-पुरुषांवर याची नजर आहे.

न्यायदानाचें काम करणाऱ्या अधिकाऱ्याला मूल्छक्रटिकात (निर्णयसागर:

शास्त्री व परब : पृ २०२ ) अधिकरण – भोजक म्हटलेलें आहे. क्र. ५४ व ५५ *या गाथांतील उल्लेखांवरून वाटतें कीं स्त्रियांसाठीं वेगळा तुरुंग असावा.* क्र. ४२५, ५५५ व ७८३ या गाथांत बन्धनाचा उल्लेख आहे आणि क्र. ७८० मध्यें शृंखलेच्या बन्धनाचे धावतांत गुन्हेगारी पहात, कुल विचारात घेतलें जात नसे ( क्र ७८३ ). गुन्हेगारांना सुळावर चढवांत असे क्र. ६४, ५३६ व ५६३ या गाथावरून दिसतें क्र ५३६ या गाथेतील चोराला स्मशानांतील झाडावर फाशी दिलेलें आहे. स्त्रीचें अपहरण करणाराला न्यायालयांत नेण्याऐवजा गावकरी परस्पर बदडून काढात ( क्र. ३३१ ) असावेत.

क्र २९ या गाथेंतील उल्लेखावरून दिसतें की गुन्हेगाराला सुळावर देण्यासाठा चालविले असताना वाटत त्याच्या गुन्हेगारीच्या घोषणा करण्यात • येत असत मृच्छकटिकाच्या दहाव्या अंकात या प्रथेचा तपशील आढळतो चारुदत्ताच्या गळ्यात लालभडक करवार पुष्पाची माळ घातलेली आहे, अगाला रक्तचंदनाचा उटा लावलेला आहे बळी देण्यासाठा चालविलेल्या पशुप्रमाणे चाण्डाल त्याला रस्त्यातून मिरवीत नेत आहेत, चौकाचौकात थावून ते त्याच्या गुन्ह्याची व त्याला झालेल्या शिक्षेची घोषणा करीत आहेत आणि प्रजेला बजावीत आहेत की कोणी असा गुन्हा केला तर त्याचा दर्जा विचारात न घेता त्याला अशीच कटक शिक्षा देण्यात येईल. चारुदत्तावरील आरोपाच्या घोषणेची योजना शूद्रकानें नाट्यवस्तूच्या परिपोषासाठां हेतुपुरः- सर केलेली आहे कारण ही घोषणा काना आला नसती तर कोणाला कोणत्या गुन्ह्यासाठा वधस्तंभाकडे नेण्यात येत आहे याचा उलगडा वसंत- सेनेला झाला नसता आणि तेन वेळी प्रकट होऊन तिला चारुदत्ताचे प्राण वांचविता आले नसते गुन्ह्याच्या अशा घोषणेचा सकेत शूद्रकाच्या काळात प्रचलित होता हें निश्चित नायाधम्मकहा ( २ p ५३ ) आणि समराइच्चकहा ( पृ. ८९०-१ ) या प्राकृत ग्रथात अशा घोषणाचा उल्लेख आलेला आहे *मृच्छकटिकाचा काळ अनिश्चित असला तरी त्याची गणना संस्कृतांतील* आद्य नाटकात करण्यात येते काहा संशोधक तर सिमुक या आद्य सातवाहन नृपाचा शूद्रकाशा समन्वय करतात या वादाच्या तपशिलात शिरणे अप्रस्तुत आहे एवढे मात्र खरें की गाथासप्तशतीच्या अगदी जवळ असलेल्या या

विक्रमाच्या अशा रचलेल्या दिसतात. लोकव्यवहारात असा प्रकार वारंवार आढळतो.

• गाथासप्तशतीत दरबारी व वरिष्ठ अधिकारी मंडळाचे उल्लेख आढळत नाहीत, ग्रामणीचे उल्लेख मात्र बहुत आढळतात. ग्रामव्यवस्था आणि ग्रामीणांचे संरक्षण हा त्यांच्याच हाती आहेत. केंद्रसत्ता दुर्बळ असावी आणि अदाधुंदीची परिस्थिति असावी. ग्रामव्यवस्थेचा व ग्रामीण जनतेशी केंद्रसत्तेचा विशेष संबंध नसावा असे यावरून अनुमान होते. ही परिस्थिति निःसंशय गुप्तपूर्वकालीन आहे.

## १७ गाथासप्तशतींतील लैङ्गिक जीवन

गाथासप्तशतींतील भावगीते ही प्राधान्येंकरून शृंगारिक आहेत आणि त्यांतील कांहींचा अभिप्राय लैङ्गिक आहे, तरी हा टीकाकारांनी व साहित्यशास्त्रज्ञांना त्यावर लादले आहेत ते अर्थ कामकोविदांनाही पटण्यासारखे नाहीत. सबब टीकाकारांच्या अर्थाच्या अनुरोधानें तत्कालीन लैङ्गिक जीवनाचें विवेचन करणें अशक्यप्राय आहे. भारतातील सामान्य वाचकालाही कामशास्त्रातील सिद्धान्ताची स्थूल माहिती असते. हें गृहीत धरून हे प्रकरण लिहिलें आहे. कामाच्या लैङ्गिकतेच्या कल्पना अवास्तव असतात, तर कोणाच्या सभ्यतेच्या भावना विकृत असतात. शक्य तोंवर या दोन्ही मर्यादा सांभाळून, या विषयाची चर्चा केलेली आहे. शिवाय गाथासप्तशतीच्या या आवृत्तीच्या उत्तरार्धातील उतार्‍याचें विवेचन विशेष केलेलें नाही. कारण हा भाग प्रक्षिप्त तसाच उत्तरकालीनही आहे.

गाथासप्तशतीच्या काळांत प्रतिष्ठित पण्डितही कामशास्त्राचे अध्ययन व अध्यापन आणि तत्त्वांचा व तन्त्रांचा उहापोह (क. १) करीत असलेले दिसतात. तत्क्या रक्षणें का हा कामग्रंथ ऐकणाऱ्या विद्वानांना विषयाची शिसारी यावी. माहजिक आहे कारण या विद्वानाची वृत्ति व ज्ञान हां जीवनविन्मुख असतात. कारण या लब्धप्रतिष्ठितांना आपसांत होणारी कामशास्त्राची चर्चा चालते, पण बहुजनसमाजाला रुचणाऱ्या शृंगारिक प्राकृत गाथा मात्र सांवरत नाहीत! कामशास्त्राच्या अध्ययनानें जीवनाचें रहस्य ग्रहण करण्याची शक्ति

जा विदग्धता ती सर्वांना होते असं सांगण्यात येतं, पण ही प्रतिक्रिया सर्वत्र प्रत्ययास येते असें मात्र नाही दुर्विदग्ध पण्डितानें शास्त्रोक्त मार्गानें शिरीषासारख्या नाजूक नायिकेचा चुरगळा केल्याचा प्रसंग क्र १६ या गाथेंत आलेला आहे.

ज्ञानप्राप्तीसाठी शास्त्राचें अध्ययन करावेंच लागते कामतंत्र मात्र कोणा कोणाला शिकवावें लागत नाही कारण कामोद्भव अत- प्रेरणाग्या नैसर्गिक उन्मेषावर अवलंबून असतो म्हणूनच वात्स्यायनान सांगितलं आहे 'अचिन्त्यशक्ति र्भगवाननङ्ग ।' कोणी काही न शिकविता क्र ८१९ च्या चिमुरड्या नायिकेला सारें कांहीं माहीत आहे सीत्कृत ( शूनो प्रहरणाज्जात पाडा व्यतिकृत भवेत्। गत्यादिजातो य शब्द विशेषत्तद्धि सीत्कृतम्॥ रतिरहस्य प्रदीपिका ). सीत्कार हा पूरक आणि सुस्कारा हा रेचक सीत्कारात पक्ष्याच्या विरुताच अनुकरण असतें ( कामसूत्रम् २ ७ ८ ) मणित ( मणित रतिकूजित ). सुनवप हस्तस्प आणि धारण केलेल्या अलंकाराच शिञ्जित हे नर्तरं क्र ३९० या गाथेच्या नायिकेला कोठेंरा कुसुम्भान शिकविलेल आहेत क्र ६८९ च्या नायिकेचे विलास निसर्गप्रेरित होते पण ते पाहून ती बहुशिक्षिता असावी असा नायकाला संशय आल्यावाचून राहिला नाही ! म्हणूनच वात्स्यायनानें सांगितलं आहे का सुशिक्षितान्या स्वप्नातही येणार नाहात अस भाव सुरतव्यवहारात प्रत्ययास येतात

समाजाच्या धारणेला इष्ट तसेंच अनिष्ट, लैंगिक आचार गाथासप्तशताच्या काळात प्रचलित होते समाज तावर स्मृतिकारान्या कक्षात आलेला दिसत नाही

पौर्णिमेच्या रात्रा उघड्या अंगणात झोंपणाऱ्या मुलांना राहू झपाटतो ( क्र ७९८ ) अशी भोळ्यांची समजूत होती चांदण्यात चित्तवृत्ति उत्तेजित होतात व प्रक्षोभक स्वप्नें पडतात. आजूबाजूला विलासी दृश्य दिसतात व आपल्या बेभान शरिरावर शेजाऱ्यांची नजर लागण्याचा संभव असतो, हें या निर्बंधाचे व्यावहारिक व शास्त्रशुद्ध कारण, राहूची वार्ता ही असमंजसाच्या समाधानासाठीं सबब मुलींना रस्त्यातून नागवें हिंडू नये ( क्र ७३५ ) हा शिष्ट समाजाचा आचार आणि तो मुलांना ही लागू आहे, पण येथे वाल्य

३

ज कारण दिलेल आहे ते निकृत मनोवृत्तीच द्योतक आहे हें खरे असले तरी तें अगदाच असलित आहे असे म्हणता येणार नाहा मुलाना कामशास्त्राच घरगुती शिक्षण दिल जात होतें किंवा कसें याबद्दल अनुमान करण्यास साधन नाहा एवढें मान खरे की सुरतक्षमतेचा पोषक असे उत्फुल्लिकेसारखे (क्र १९५) व्यायाम त्यांचेकडून घरोघरी करवून घेण्यात येत असत पुरुषाना प्रसन्न करण्याचे मार्ग कुमारिकाना सराइत मत्रिणीच्या सहवासात अवगत होत असा देत असें (क्र ६९८) दिसत मन्मथोद्दीपनासाठा नायकानें नायिकेला अश्लील समस्या व ग्राम्य गाथा ऐकवाव्यात असे वात्स्यायनानं (५ १० ६) व जय मङ्गलन्त यशोधरानें सांगितल आहे याचा प्रत्यय क्र ५ व ८०९ या गाथांवरून यतो गाथासप्तशतात स्त्रीविदात या अनेक कथा सारांश रूपात आलेल्या आहेत अशा गोष्टी स्त्रीपुरुषांनी परस्पराना सांगण्याची प्रथा असावी असे त्यावरून अनुमान होत गेल्या पिढातल्या कुमारिका प्रसगानुरूप ऑव्या उखाणे पाठ करून ठेवीत, या प्रथेचें मूळ किती खोल आहे हें या उल्लेखावरून दिसून येतें गाथासप्तशतात बालविवाहाचा एकही उल्लेख नाहा सर्वत्र प्रौढ विवाह प्रचलित आहेत यामुळे कुमारिकांच्या चित्तात वैवाहिक जीवनाबद्दलच्या अपेक्षा (क्र ५९८) निर्माण झाल्या आहेत सुखी जीवनासाठी मनाजोगता जोडीदार निवडण्याबद्दल कुमार व कुमारिका उत्सुक (क्र ६५०) आहत, अनुरूप नायकाचे अभावी क्र. ९९१ ची कुमारिका नायिका उडारली आहे, क्र ५०७ व ६४१ या गाथांच्या कुमारिका नायिकांनी तर विवाहापूर्वी लैङ्गिक अनुभव घेतल्ले आहेत क्र. १६ या गाथेतला उल्लेख फसलेल्या कुमारीचा असावा विवाह प्रौढपणी होत असले तरी ते विवाहपूर्व अनुनयावर आधारित होते असें दिसत नाहा निदान तसा स्पष्ट उल्लेख कोठही आलेला नाहा क्र ६४१ या गाथेची नायिका मंगलाष्टकात उच्चारलें जाणारें पतीचें गोत्र एकण्यास उत्सुक आहे क्र ६४१ ची नायिका पतीच्या डोळ्याला डोळाही भिडवीत नाहीं यावरून त्याचा परस्पराशी पूर्व परिचय नसावा असे अनुमान होतें चतुर्थीमगलानंतर वधूवराचा एकशय्या होत असे आनन्दाचा हें याचें प्रात्यक्षिक

## आनन्दपट

वधूच्या सखिणी आनन्दपट मिरवीत आहेत आणि तिच्या स्वामायातील प्रियकर हे दृश्य पाहून चकित झाला आहे असा प्रसंग प १०७ या गाथेंत वर्णिलेला आहे हा पट कृत्रिम आहे असें कवीनें स्पष्ट सांगितलेलें आहे

गदाधरानें टीकेंत आनन्दपटाचा अर्थ सांगितला आहे ' आनन्दपट प्रथमपुष्पवतीवस्त्रम् । प्रथमरजोदर्शने जाते तद्वस्त्र बन्धुभिर्गोकुषु प्रदर्श्यते इति देशविशेषे आचार । जारसमवस्थ्छाघितया अस्थाने सप्रमदर्शनेन चास्य हास इति वाच्यम् । साधारण देव सांगतो आणन्दवड हा शब्द देशी असून कृत्रिम म्हणजे ' सुरतायासाऽनातक्षतजम् दृष्ट्वा रक्तस्रवेऽयम् इति कृत्वा कृत्रिमम् । हा आचार दक्षिण देशांत प्रचलित होता असे आणखी एक टीकाकार (वेवर प १९८) सांगतो आनन्दपट म्हणजे ऋतुप्राप्तीच्या रक्तानें रंगलेलें वस्त्र वा प्रथम संभोगाचे वेळी झालेल्या रक्तस्रावामुळें आरक्त झालेलें वस्त्र ' गाथासप्तशतीच्या काळात विवाहाचे वेळी वधूवर सामान्यत प्रौढ वयाचे असत रजोदर्शनापूर्वी कन्येचा विवाह करावेत हा प्रथा बराच उत्तर कालीन आहे हें आपण पाहिलें विवाहानंतरच्या पहिल्या रजोदर्शनाचे वेळी आनन्दपट मिरविण्यात काही मुद्दा दिसत नाही शिवाय ८ वर्षे असतें तर वधूचा पूर्वप्रेमाचा प्रियकर तें पाहून एवढा चकित झाला नसता म्हणून अनुमान होतें की हा आनन्दपट हें संभोगवस्त्रच असावे

स्पेन, रशिया, अरबस्तान तुर्कस्तान, दक्षिण अमेरिका वगैरे देशांत प्राचीन काळी आनन्दपटाच्या मिरवणुकीसारखे रिवाज ( Sexual Life in Ancient India Dr Myer Vol I p 43 ) प्रचलित होते मारक्को देशात गर्भाधानाचे रात्री वधूवरांना शयनमंदिरात सोडल्यावर संभारंभासाठी जमलेले पाहुणे बाहेर दिवाणखान्यात बसून राहतात प्रथम संभोगाचे वेळी झालेल्या रक्तस्रावानें भिजलेलें वस्त्र नवऱ्यानें दासीच्या हातीं दिलें की ती तें [illegible] दिवाणखान्यात येते आणि तें कुटुंबीयांना व पाहुण्यांनी पाहिल्यानंतर मेजवानी सुरू होते दुर्दैवानें असे होऊ शकलें नाही तर वधूला तिच्या पितृगृही अपमानपूर्वक पाठविण्यात येते आणि पाहुण्यांना

amount of expenditure ( incurred by the bridegroom ) When a man refuses to give in marriage a particular maiden as agreed upon, he shall pay double the above fine When a man substitutes in marriage a maiden of different blood or is found to have bestowed false praises ( on her quality ), he shall not only pay a fine of 200 panas & return the nuptial fee, but also make good the expenditure

या परिच्छेदाचें डॉ मायर यानीं केलेलें भाषांतर पहा

" A wife having intercourse with her husband before puberty shall be fined 54 panas & also repay the Sulka & the amount of expenditure If her immaturity is proved by the blood caused by the intercourse she shall pay double the fine If another woman's blood is substituted for her own she shall pay 200 panas A man uttering a lie under such circumstances shall be equally fined He shall also lose his Sulka & the amount of expenditure•

या दोन्ही भाषांतराची मूळ परिच्छेदाशीं तुलना केली असता डॉ मायर याचा या बाबतींतला अभिप्राय पटण्यासारखा नसल्याचें दिसून येईल

गाथासप्तशतीतील वरील गाथा उद्धृत करून डॉ मायर सांगतात कीं आनन्दपटाची मिरवणूक गर्भाधानाच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं काढण्यात येत असे या गाथेंतील पटावरील चिन्हें कृत्रिम आहेत असें ही त्याना सांगितलें आहे नायिकेनें कोणती युक्ति योजली असेल ? उत्तर एक रीति अनेक. ही चाल बंद झाली, घरें झाल, कृत्रिमता टळली, अश्रू बचावली

वधूवराचा परस्पराशीं परिचय व्हावा म्हणून दोहद काढण्या अवगर करण्यात येत असे

दोहद :

(अशोक क्र ४४०५ कुरवक क्र -, डोहाळे क्र १५,२९०,४७२)

भारतीय साहित्यातील विख्यात दोहद संकेताच्या विविध स्वरूपाचे विवेचन श्री ब्लूमफील्ड ( J A O S XL pp 1-24 ) यांनी केलेले आहे गाथासप्तशतींत ही संज्ञा तीन अर्थांत आलेली आहे : १ ) ऋतुतृप्ताची इच्छा ( २ ) डोहाळे, ( ३ ) उद्यानक्रीडा ऋतुप्राप्तीनंतर स्त्री संभोगाला योग्य व गर्भधारणेला सिद्ध होते प्रजाजनन हें तिचें नियोजित कार्य असल्यामुळें तिला ऋतुकाळात संभोगेच्छा तृप्त करून घेण्याची नैसर्गिक प्रेरणा होते या सूचित अर्थानें ही संज्ञा क्र ६ या गाथेंत आलेली आहे दोहद म्हणजे डोहाळे, या अर्थाने ही संज्ञा क्र १५,२९० व ४७२ या गाथात आलेली आहे गर्भधारिणांना विशेष वस्तूबद्दल वासना किंवा विद्वेष वाटतो डोहाळतुलीच्या इच्छा या भावी संततीच्या प्रवृत्तीच्या द्योतक असतात असें सामान्यत मानण्यात येतें या इच्छेला आधार, थोडाशी अतृप्त होंस आणि बराचसा अवडं नखरा, या अनुमानाला आधार, थोडासा पोक्त अनुभव आणि बरीचशी गूढरम्य कल्पना सामान्यत पहिलटकरणींचे डोहाळे कौटुंबिक परिस्थितीच्या अनुरोधानें पुरविण्यात येतात म्हणूनच क्र २९० व ४७२ या गाथांच्या नायिकांनी आपल्या इच्छा मशब्द केल्या नाहीत उद्यानक्रीडा या अर्थानें ही संज्ञा क्र ४,६ व ४०५ या गाथात आली आहे दोहद म्हणजे स्त्रियांच्या प्रत्यक्ष स्पर्शामुळें किंवा त्यांच द्वारा करविलेल्या उपचारामुळें वृक्ष किंवा लता ( J I S O A III 110-124 ) फळाफुलांनी समृद्ध करविणें

> स्त्रीणां स्पर्शात् प्रियङ्गु विकसति बकुल सीधुगण्डूषसेकात्,
> पादाघातादशोकस्तिलककुरबकौ वीक्षणालिङ्गनाभ्याम्
> मन्दारो नर्मवाक्यात्पटु मृदु हसनाच्चम्पको वक्त्रवातात्
> चूतो गीतान्नमेरुर्विकसति च पुरो नर्तनात्कर्णिकार ॥

वृक्षलतांना फळाफुलांचा बहर येण्यासाठी स्त्रियांनी खालील उपचार करावेत : प्रियङ्गुला स्पर्श करावा, मुखात मदिरा घेऊन तिची चूळ बकुळावर टाकावी, अशोकाला लत्ताप्रहार करावा, तिलकाकडे दृष्टिक्षेप टाकावा, कुर

बकाला आलिंगन द्यावें, मन्दाराशा मृदु भाषण करावें, चम्पकाला हास्य ऐकवावें आम्राला फुंकर घालावा, नमेरूला गायन ऐकवावे आणि कर्णिकारा समोर नृत्य करावे प्राकृत संस्कृत कवाइतक्याच तत्कालीन तरुणी, हे वृक्ष व लता धन्य! कल्पना करा, यौवनानें मुसमुसलेली युवती, उद्यानात काढला येत आहे या ऋतूत या व त्या ऋतूत त्या, वृक्षलतांच्या अंतर्यामीच्या इच्छा ती पुरवीत आहे एकदा ती प्रियकराबरोबर वनभोजनासाठी आली त्यांनी बकुळीपाशी बैठक मांडली पण फुलं मात्र डळेनात बकुळीचा खोड तिला माहीत होती त्या दिवशीचे मद्य जरा कडकच होतें, तिने त्याच्या खोडावर चूळ टाकली तों काय आश्चर्य? मद्याचा रंग व मद सुगंध बकुळीच्या फुलांच्या नाजुक पाकळ्यापाकळ्यांनीं धारण केला आणि मद्यपानानंतर त्यांना परस्परा कडे पाहिलें तेव्हा तीच छटा त्यांच्या नेत्रांतही प्रकट झालेली दिसली एकदा ती उद्यानात आली, तेव्हा तिनें पायात पैंजण घातले होते व तळव्यांना अळिता लावला होता पावसाळ्याच्या प्रारंभी नभात मेघांचा गडगडाट चालला होता तो ऐकून अशोक फुलतो असें तिनें ऐकले होते पण येथें पहावे तर हा शुभ आपला संस्कृतिसंरक्षकासारखा उभा तेव्हा चिडून त्याला डाव्या लाथेनें ठोकरला ता काय आश्चर्य! अशोकावर अळित्याच्या रंगाच्या शेकडों फुलांचे घुपके एकाएकी टवटवले जणू निसर्गाचे लालित्य तेथें प्रकट झाले तेव्हा तिला याही संकेताचा प्रत्यय आला!

संस्कृत साहित्यात व मध्ययुगीन शिल्पात दोहदाचे अनेक उल्लेख आढळतात मघदूतात ( २ १८ ) अशोक व बकुल आणि ऋतुसंहारात ( ४ १० ) प्रियंगु दोहद आढळतात भुवनेश्वर येथील राजाराणी मंदिरात अशोक दोहदाची मूर्त ( Ideals of Indian Art Havell Pl XII ) कोरलेली आहे

दोहद संकेत निर्माण करणारे कवि अधिक रसिक की हे उपचार करवून घेणाऱ्या वृक्षलता अधिक भाग्यवान्? संकेतानुसार दोहद विधि करणाऱ्या स्त्रिया तरुण सुंदर व विदग्ध असल्या पाहिजेत नाहीतर विचाऱ्या वृक्षलतांवर कठिण प्रसंग ओढवता! संकेतानुसार तिच्याशी संस्कारक्षमता विशेष दिसते कुरबक दोहद कोणी कसा मानवला कोण जाणे? कारागीचे वाट पाहिले म्हणजे हा दोहद की हें दिव्य असा प्रश्न पडतो की कोणा कुरूप वा पाषाण

हृदयी स्त्रीच्या आलिंगनाची आपत्ति टाळण्यासाठी कोरांटीला एकाएकी फाट फुटले? बिचाऱ्या भारतीय स्त्रिया, पुरुषांच्या प्रेरणेनुसार व त्यांच्या सुखा समाधानासाठी त्या दिव्यही करतात, मग दोहदाचा काय कथा? दोहद हा स्वतः अद्वितीय आहे आणि पूर्णतया भारतीय आहे आणि, मला वाटते, आमच्या प्राचीन कवीना कल्पिलेल्या सर्व संकेतात अत्यंत रमणीय आहे वृक्षलतांची सत्त्वाक्षमता हा जगदीशचंद्रांना अलीकडेच सप्रयोग सिद्ध करून दाखविलेला आहे. जणू हाच सिद्धांत आमच्या प्राचीन कवींना अंतर्ज्ञानाने अपेक्षित होता!

**रजस्वला —**

रजोधर्म या स्त्रीजीवनातील नैसर्गिक अवस्थेबद्दल गाथासप्तशतीत अनेक उल्लेख आलेले आहेत

(आलिंगन क्र. ४२८ आसक्ति क्र. ९२९४१, एकशय्या ५२९ भुवन क्र. ५९९ दशन क्र. ४८० पुष्पवई पुष्पवती क्र. ४८ ४८९, ५०८, ५०९ ९४३ ९४४ वर्णघृत क्र. ७२, ७८९, ५९९, ५२८ वर्षे क्र. २८९ ५०३, ९४३ स्पर्श क्र. ४८९, ५११ ९४४)

स्त्री ही पुरुषाची दासी का स्वामिनी? धर्मधारिणी का अधर्मप्रेरिणी? काय जाणे! जशी दृष्टि तसा निर्णय सनातनी व सुधारक सारखेच दोघेही तिला दास्यात ठेवतात एक सामान्यतः समान हक्क अमान्य करून व दुसरा ते मान्य करून पण तिला तिच्या नैसर्गिक वैशिष्ट्यांना अनुरूप असा सवलती नाकारून! प्राचीन भारतीयांना स्त्रीला संसारहेतु अशी संज्ञा दिलेली आहे आणि ती अगदी यथार्थ आहे. गृहस्थाच्या दृष्टीने व संन्याशा या हा ऋतुप्राप्ति हा स्त्रीजीवनाच्या नैसर्गिक प्रवृत्तीची आणि मानवी जीवनाच्या चिर तनत्वाची पहिली घोषणा! बाल्याचा उपसंहार भोगक्षम यौवनाची प्रस्तावना स्त्रीजीवनातली पहिली क्रांति उत्क्रान्तीच्या तत्त्वद्वतेचा पहिला प्रत्यय!

ऋतुप्राप्तीनंतर स्त्रियांना ठराविक मुदतीनंतर रजोदर्शन होऊ लागते हा मुदत ज्या त्या देशातील नैसर्गिक परिस्थितीवर अवलंबून असते उदाहरणार्थ,

एस्किमो स्त्रिया वर्षातून दोन किंवा तीन वेळाच रजस्वला होतात रजोदर्शनाचा आरंभ व अंत नैसर्गिक परिस्थितीवर अवलंबून असतात रजोदर्शन का होतें ? शास्त्रज्ञांना याची मीमांसा अद्याप लागलेली नाहीं कोणी सांगतात, प्रथम गर्भाशयाच्या सिद्धतेमुळें, पुढें गर्भाशयाच्या आकुंचनामुळें, जणू गर्भधारणेसाठी निसर्गानें करून ठेवलेली सिद्धता विफल झाल्यामुळें, जणू हा एक लटका गर्भपातच ! हे सिद्धान्त केवळ कल्पनारूप मानावे लागतात ऋतुप्राप्तीमुळें स्त्री संभोगाला योग्य होते आसक्ति व तृप्ति हे अंत करणाचे गुणधर्म, त्याचप्रमाणें शरीराचेही, संभोग हे त्याचें माध्यम, सुख हें संभोगाचें तात्कालिक आणि संतति हें अंतिम फल म्हणूनच प्राचीन व प्रामाणिक भारतीयांनी ऋतुप्राप्ति हा उत्सरक्षण ( क्र २४ ) व ऋतुतृप्ति हें वैवाहिक कर्तव्य म्हणून नेमस्त केलेलें होतें संभोगाची इच्छा ही वर्तमानकाळात व्यक्त होणारी भविष्याची प्रेरणा, असं धर्मशास्त्रकार मानतात प्रजाजननाचं अनुष्ठान या दृष्टीनें ते संभोगाकडे पाहतात ऋतुप्राप्तीमुळे संभोगाची इच्छा निर्माण होते आणि ऋतुकालातील अतृप्तीमुळें किंवा संयमाच्या अतिरेकामुळें ऋतु व्यर्थ होतो, अतृप्तीमुळे अधर्माचरण घडतें आणि प्रसंगविशेषा वर्णसंकराचा ही धोका निर्माण होतो, म्हणून ऋतु व्यर्थ होणार नाही अगर आड मार्गाला लागणार नाहीं अशी उपवधूच्या पित्यानीं खबरदारी घ्यावी अशी धर्मशास्त्रकाराची आज्ञा आहे रजोधर्माचा काल संपल्यानंतर बारा ते सोळा दिवसाच्या अवधीला ऋतुसमय अशी संज्ञा आहे या मुदतात गर्भधारणा सहज होते व स्त्री पुरुषाचा संभोग होणें इष्ट असतें असें प्राचीन भारतीयाचे मत आहे पाश्चात्य संशोधकानाही हें तत्त्व मान्य आहे याज्ञवल्क्य स्मृतातील पुढील उल्लेख पहा षोडशर्तुनिशा स्त्रीणां तस्मिन्युग्मासु संविशेत्। ब्रह्मचार्येव पर्वाण्याद्याश्चतस्रश्च वर्जयेत् ॥३·७९॥ या काळात पतिपत्नीनीं ऋतुतृप्ति केलीच पाहिजे हा गृहस्थाचा धर्म आहे व पत्नीचा हक्क आहे या कर्तव्यात व्यत्यय आणणाऱ्या पुरुषाला रामायणात दुरात्मा म्हटलेलें आहे महाभारतात ( १३ २०१ ११ ) तर सांगतलेले आहे कीं या काळात पत्नीशी गमन केल्यानें पतीचें ब्रह्मचर्य नष्ट होत नाही ।

हा जसा धर्म त्याचप्रमाणें रजस्वलेशी कोणत्याही प्रकारचा व्यवहार करणें हा अधर्म तैत्तिरीय संहितेंत ( २ ५ १ २–७ ) पुढील वृत्तात आढळतो

इद्रानें वृत्राची हत्या केली ब्रह्महत्येच्या पातकाचा भार त्याला सहन होइना, म्हणून त्याचा चतुर्थांश त्यान स्त्री जातीवर लादला तेव्हापासून स्त्रियान्च्या मासिक धर्माची सुरवात झाली बृहत्कल्पभाष्य या जैन ग्रथात ही कथा वेगळ्या स्वरूपात दिलेली आहे इद्रानें उडकाच्या पत्नीशी व्यभिचार केला हें समज ताच उडकानें शाप देऊन ब्रह्महत्येचे पातक त्याच्या मस्तकावर लादलें त्याच्या भारापासून इद्राला मुक्त करण्यासाठी देवानी ब्रह्महत्येचे चार भाग केले आणि यापैकी एक भाग त्यानी स्त्रीवर लादला स्त्रियानी हें स्वर्ग लावून घेतल, पण मोबदल्यात इद्रापासून एक वरही मिळविला ऋतुकालात प्रजोत्पादनार्थ सभोगाचा हक्क हाच तो वर स्त्रियाना सभोगसुख मिळू लागलें आणि एव्हा पासून गर्भधारणेनें प्रजोत्पादन होऊ लागलें भागवत पुराणात ( ६ ९ ९ ) तर सागितलें आहे का केवळ सभोगसुखाच्या अपेक्षेनें स्त्रियानी या पातकाचा स्वीकार केला ! यापूर्वी केवळ सकल्पानें प्रजोत्पादन होत असे हा शाप का वर ' त्याचे त्याच जाणोत ! अग्नि हा व्यभिचाराचा स्वामी आणि इद्र हा बीजधारणाचा इद्र व इद्रिय याचें बीज एकच आहे इद्राचे पाप स्वीकारल्यामुळें महिनाभर केलेल्या पापातून स्त्रिया चार दिवसात मोकळ्या होऊ लागल्या सकल्पित ( मनु • १०८ ) किंवा प्रत्यक्ष (याज्ञवल्क्य १ ७२) व्यभिचाराच,अगर कोणतही (वसिष्ठ २८ १) पातक रजोधर्मामुळें नष्ट होतें असें स्मृतिकारानीं सागितलें आहे कारण, पराशर (१० २०) सागतो,स्त्री ही भूमीप्रमाणें असल्यामुळे ती सर्वस्वी त्याज्य अशी कधाहि होऊ शकत नाही भूमि दरसाल नवी होते आणि स्त्री दरमहा, एवढाच फरक !

धर्मसिंधूत ( आवृत्ति १ तृतीय परिच्छेद पृ ३ ) रजस्वलेच्या दिनचर्येचे नियम सागितले आहेत त्यापैकी काहीं येथें देतों तीन दिवस पर्यंत कोणालाही स्पर्श करू नये रजस्वलानी परस्परानाही दतधावन तलाभ्यग काजळ व गधपुष्पधारण गोरस भक्षण, मासाशन व ताबूल सेवन अग्निस्पर्श, सूर्यदर्शन व प्रणाम हा वर्ज्य करावात पाटावर किंवा चौरगावर बसू नये, वामकुक्षी करू नये भूमीवर शयन करावें, उदकात बुडी मारून स्नान करू नये ' मिताक्षरेंत ( याज्ञवल्क्यस्मृति मिताक्षरासार श्री बापटशास्त्री, चित्रशाळा पृ २३ ) सागितलें आहे की रजस्वला तीन रात्री अपवित्र मलिन वस्त्रें नेसून रहावें, वीर्यवृद्धि करणाऱ्या पदार्थांचें सेवन करू नये

रजस्वलाच्या दैनिक व्यवहारांवर धर्मशास्त्रकारानी एवढे सूक्ष्म व कडक निर्बंध कां घातले? कारण रजोधर्मान्या काळात स्त्रियांचे दोष व पापें त्यांच्या शरीरातून बाहेर पडत असतात, म्हणून त्यान्या भारताल्चें वातावरणही अनिष्ट व अशुद्ध झालेलें असतें आणि त्यान्या भोंवती विघ्नकर्त्या क्षुद्र देवता घोंटाळत असतात प्रथमेऽहनि चाण्डाली द्वितीये चर्मकारिणी ( ब्रह्मघातिनी )। तृतीये रजकी प्रोक्ता चतुर्थेऽहनि शुध्यति ( स्नानमाचरेत् )॥ असे आंगिरसाहितेत वचन आहे एकेक दिवस जातो तस त्याच अपावित्र्य कमी होत जातें श्रौतसूत्रात चवथ्या दिवशीं अतिक्रम विहित आणि मनूनें मात्र वर्ज्य मानलेलं आहे यज्ञप्रसंगीं रजस्वला आजूबाजूस असली तर देवता ( म भा १३ १२७ १३ ) किंवा पितर ( मार्कण्डेय पुराण ३२ ७४ ) हविर्भागाचें ग्रहण करीत नाहींत रजस्वलेनें स्पर्शिलेलें अन्न भक्षण करू नये ( मनु ४-२०८ ) एवढेच नव्हे, ज्या अन्नाकडे तिची नुस्ती नजर गेलेली असेल तेंही ब्राह्मणानें सेवन करू नये, असा दण्डक आहे भोळ्या भारतातच नव्हे, सर्वच दर्शात त्या-यावर असेच निर्बंध घातलेले आहेत आणि त्यान्या अनिष्ट प्रभावाविषयीं अनेक समजुती प्रचारात आहेत तिनी सागतो की रजस्वलेनें स्पर्शिलेल्या बीजाला अंकुर फुटत नाहींत आणि वस्तऱ्याची धार गजून बोथटते मध्ययुगात ख्रिस्ती मंदिरात प्रवेश करण्याची त्याना मनाई ( Duffor History of Prostitution Vol III 'p 115 ) होती मास नासेल म्हणून त्याना स्वयपाकघरात व गतिदर्शक्ता विघडेल म्हणून होकायत्रान्या आसपास फिरकू देत नसत हॅव्हेलॉक एलिसनें ( Psychology of Sex Vol I Part I p 295 ) एका ततकाराचं मत नमूद केले आहे रजस्वला आजूबाजूस आली का ततुवाद्यान्या तारा आपोआप व एकाएकी तुटतात।

रजोधर्मान्या काळात स्त्रियान्या वासना उत्तेजित होतात आणि सयमशक्ति दुर्बळ होते नैमित्तिक प्रवृत्तीच्या आवर्तांत भिरभिरल्यामुळ या काळात त्या पुरुषान्या भोंवतीं घोंटाळतात असं सुश्रुतात सागितलेलें आहे म्हणूनच रजस्वलेनें ब्राह्मणाला सहेतुक स्पर्श केला तर तिला चाबकानें फोडून काढावें असं विष्णु पुराणात ( २१०५ ) सागितलें आहे पहिलें शीलखण्डन याच काळात होतें असा निष्कर्ष अनेक पुराव्यावरून मानस-काम शास्त्रज्ञानीं काढलेला (हॅव्हेलॉक

एलिस - पूर्वोक्त : पृ. १०३) आहे. रजोधर्माच्या काळात चित्तवृत्ति उत्तेजित झाल्यामुळें कुंतीनें सूर्याला आवाहन केलें आणि कर्णाला जन्म दिला ( Dr. Myer Sexual Life in Ancient India : Vol I p 29. ). म्हणूनच धर्मशास्त्रकारांनी त्याची दिनचर्या नियंत्रित केली आहे आणि आरोग्य व नीतिनियमाना धार्मिक अवगुंठन देण्याच्या त्याच्या नेहमीच्या पद्धतीनें सागितलें आहे कीं रजस्वलेशीं संभोग केल्यानें ब्रह्महत्येचें पातक लागते आणि आयुष्य क्षीण ( म भा १२-२८०-४३ ) होतें. सहा महिनेपर्यंत ओलीं वस्त्रें परिधान करावींत आणि राखेवर झोपावें असें या पापाला प्रायश्चित्त महाभारतात सागितलेलें आहे. रजस्वला पत्नीशीं गमन करणाऱ्या पतीला झरतुष्ट्रानें दोनशें फटक्याची शिक्षा ( Scented Garden Dr. Stern. Vol I p 174 ) सांगितलेली आहे

धर्मशास्त्रकाराना या बाबतीत घालून दिलेले नियम गाथासप्तशतीच्या काळात बहुजनसमाजालाही मान्य व अवगत होते असें वर नमूद केलेल्या उल्लेखावरून दिसतें. रजस्वला-समागमाबद्दलचे हे उल्लेख याहीपर्यंत माझी समजूत होती कीं हा अनाचार अगदीं अर्वाचीन आहे; पण नाहीं, मनुष्य स्वभावाचे गुणधर्म दिक्कालातीत आहेत. जसा धर्म, तसाच अधर्मही सनातन आहे अलिकडचे सभावित वाच्यता करीत नाहीत, एवढेंच, एक राहिलें, कोणी या विषयाला नुसता हात घातला तर त्याची हुरवडी करण्यास मात्र ते सदैव सज्ज असतात!

गाथासप्तशतींतील रजस्वला मलिन वस्त्रें ( क्र. ९४३ ) धारण करतात आणि धारण केलेलें जुनेर दुहेरी गुंडाळून ( क्र २८९, ५०३ ) घेतात. गजबजलेल्या कुटुंबात त्या संकोचानें वावरतात आणि कोठ नरी, कोपऱ्यांत, अंग चोरून, अधोमुख, सलज्ज अशा उभ्या राहतात. कौटुंबिक आचार म्हणून अधोमुख, या अवस्थेंतही आपण प्रियकराला किती हव्या आहोंत याची जाणीव असल्यामुळें सलज्ज ' गोविंदाग्रजाची पुष्पवती अशीच सलज्ज आहे आपले दर्शनही अमगल व निषिद्ध ( क्र. ४८० ) मानण्यात येत असल्याची त्याना जाणीव आहे तरीही त्याच्या अगप्रत्यंगात अनग आपल्या अने

आयुधासह सज्ज होऊन ठाकलेला आहे असे प्रियकराला (क्र ९४३) वाटत आणि त्याच्या स्पर्शाने आयुष्य क्षीण होत हें माहात (क्र ९४४) असले तरी त्याच्या समागमात मोक्षसुख आहे असे पुरुषाना (क्र ४८०) वाटतें आपला अवस्था प्रगणित करण्यासाठी त्या मुलाला वर्णघृत लावतात, तरीही त्याचे पति त्याना चुंबन तरी देण्याविषया आग्रह (क्र २२-५१९) करतात त्यापुढ त्याच काहा चालत नाही हा अनाचार कोणाच्या दृष्टीस पडणार नाहा आणि मुखाला लावलेल चिक्ट मल्म प्रियकराच्या ओठाना लागणार नाही एवढी खबरदारी त्या घेतात, हेतुपुर मर स्त्रिा अभावितपणें प्रियकराला स्पर्श झालाच तर तो मी केला नाहा, माझ्या हातून झाला, असें सागून (क्र. ४८१) हे कृत्य परस्पर झटकून टाकण्याचा खटपट करतात या स्पर्शासाठी स्वत चे हात स्फुरत्याचे नायिकेनें येथे मान्य केलें आहे रात्री त्या पतीच्याच खोलात, पण वेगळ्या बिछान्यावर (क्र ५९२) झोपतात, पण ह्या निर्बंधाची अमलबजावणी कोठवर ? दाराला आतून कडी लागली नाही तोंवर पतीनें एकातात एकशय्येचा आग्रह केला तर तो तिला मोडवत नाही मग, दुसऱ्या दिवशा, पतीच्या बाहुब्यावर वर्णघृताचे डाग उमटलेले पाहून (क्र ५२८) खण्डिता सवती ढसढसा रडतात क्र ९४४ या गाथेची पुष्पवती नायिका प्रियकराचे निवारण करीत आहे, त्याचेच आयुष्य क्षीण होऊ नये म्हणून पण म्हणतात ना, ज्याचे करावें बर, तो म्हणतो माझेंच खरें! आयुष्य क्षीण होईल ही भीति कशाला घालतेस, आजच मेलों तरी फिकीर नाहीं, तू मात्र विनाकारण कालहरण करु नकोस! वारवार विनवणी केल्यामुळें विनयवताचाही धीर चेपतो पत्नी किंवा प्रेयसी धर्म रक्षणार्थ उत्सुक असली तरी प्रियकराच्या हट्टापुढें निभाव कसा लागणार ?

गाथासप्तशतीच्या काळात रजस्वला मुलाला वर्णघृत लावीत असत

## वर्णघृत

(तुप्पलिअ क्र ५२८, तुप्पाणणा क्र. २८९ वण्णअघअलिप्प क्र ५१९, वण्णघिअतुप्प २२)

तुप्प हा शब्द देशी असून त्याचा अर्थ लिप्त असा आहे. घिस म्हणजे विलेपनपक. श्री. कुलकर्णी सांगतात : " 'स तुप् = हिंसायाम्' या धातूशी ह्या शब्दाचा संबंध दूरान्वयानें लावण्यासारखा आहे. मारलेल्या पशूची चरबी हा 'तृप' या शब्दाचा मूळ अर्थ होय. हिंसा बंद झाल्यावर दुधातून घुसळून काढलेल्या पदार्थाला तृप म्हणू लागले. गाथासप्तशतीत "तुप्प" हा शब्द आढळतो " गाथासप्तशतीत तुप्प हा शब्द आहे हे खरें, पण येथ तो लिप्त या देशी अर्थानेंच आलेला आहे. तुप्प या कानडी शब्दाचा अर्थ तेल असा आहे. तूप या अर्थानें 'सिणेह' हा शब्द क्र. ३१६ या गाथेत आलेला आहे. छायाकारांनी मात्र तुप्पाला घृत हाच समानार्थी शब्द दिलेला आहे. वण्णघिअ म्हणजे वर्णघृत. गंगाधरानें याचें स्पष्टीकरण दिलें आहे. तें असें : "हरिद्रावर्णप्रधान घृतम् वर्णघृतम्। कुंकुमहरिद्रा साधितम्। देशविशेषे रजस्वलामुखम् चिन्हार्थ वर्णघृतम् लिप्यते इति आचार।" हा आचार कोणकोणत्या देशांत प्रचलित होता हें त्यानें सांगितलेलें नाही. डॉ. मोतीचंद्र (Costume & Coiffure in Ancient India Journal of the Society of Oriental Art : Vol. VIII · 1940 : p 106) गाथासप्तशतींतील उल्लेखाचा निर्देश करून सांगतात. 'Ghee mixed with some colouring material was used for painting the body." हें स्पष्टीकरण मूळ विधानाहून व्यापक आहे. सर्वांगाला वर्णघृत लावण्याचा उल्लेख मुळांत नाहीं. गाथासप्तशतींतील रजस्वला फक्त मुखाला वर्णघृत लावीत, त्यांतही ओठांना लावीत नसत (क्र. २२) आणि टीकाकार सांगतात, वर्णघृत लावीत तेंही केवळ 'चिन्हार्थ'. मूल जन्माला आल्यानंतर त्याला पहिली आंघोळ घालतात तेव्हांपासून प्रत्येक संस्काराचे वेळी सर्वांगाला हळद लावण्याचा आपल्याकडे प्रघात आहे. मलापहारक व वर्णोज्ज्वलक म्हणून, आणि म्हणून मंगल. मराठींत 'तोंडाला हळद लावणें' असा वाक्प्रचार आहे. महाराष्ट्र-वाक्प्रचार-कोशांत त्याचा अर्थ दोष देणें, नापसंती दर्शविणें असा दिला आहे. वर्णघृताच्या प्रथेवरून तर तो निघालेला नसेल ?

गाथासप्तशतीत कानराउला सहज असलेल्या प्रहार, व्रण क्षत आदि घावांचे अनेक उल्लेख आलेले आहेत

**वेदना व संवेदना :**

वेदना या शारीरिक पीडेच्या द्योतक आणि संवेदना या तज्जन्य मानसिक सौख्याच्या द्योतक, या अर्थानें आणि कामक्रीडेच्या संदर्भानें या संज्ञा येथें योजलेल्या आहेत पीडा देण्याची इच्छा ( Sadism ) आणि पीडा करून घेण्याची इच्छा ( Masochism ) या काम भावनांचा वा व्यथांचा अलीकडे पाश्चात्य लैङ्गिक मानसशास्त्रज्ञांना पुष्कळ अभ्यास केलेला आहे, तरीही वेदना आणि संवेदना यांचें साहचर्य हें आजवर न उलगडलेलें कोडें असल्याची त्यांनीं ग्वाही दिलेली आहे हा सिद्धांत गाथासप्तशतींत क्र. ३२२ या गाथेंत मांडला आहे "कामशर कुसुममय खरे, पण असे प्रखर की त्याचा प्रताप स्पर्शापूर्वी असह्य वाटतो आणि ते शरीराला विद्ध करतात तेव्हा सुख वाटतें."

गाथासप्तशतींत कामपीडनाचे पुढील उल्लेख आलेले आहेत

केशाकर्षण क्र १०८,१८८, दंतव्रण · क्र ७८, ९६, २००, ५०७, ६०५ ९७५, नखव्रण क्र १००, १४१, १५०, २३३, ४०९, ४२७, ४३६, ४६३, ४७४, ४६९, ५७०, ७०७, ९३१, ९६५, नवलतिका क्र २८, ४१९, ८५६, प्रहार : क्र ८६, ८९२, ९१०.

क्र १०८ व १८८ या गाथांच्या नायिका प्रियकरावर क्रुद्ध झालेल्या आहेत, त्यांचे प्रियकर त्यांना प्रसन्न करण्यासाठी त्यांचा अनुनय पादवंदन-पूर्वक करीत आहेत आणि या नायिका मात्र त्या बिचाऱ्याचे केस अंगुष्ठांत किंवा नूपुरांत गुंतवून त्यांचे हाल करीत आहेत नायकांना हे सुखकारक वाटत आहे की पुढाल सुखावर नजर ठेवून ते हें सहन करीत आहेत, कोण जाणे !

वात्स्यायनानें कामसूत्रांत चुंबनविकल्प ( २·३ ), नखच्छेद्य ( २·४ ) व दशनच्छेद्य ( २·५ ) या प्रकरणांत या प्रयोगांचा विहित स्थानें दिलां आहेत· ललाट, अलक ( कपाळावर भुरभुरणारे केस ), कपोल, नयन, वक्ष ( छाती ), स्तन, ओंठ आणि अंतर्मुख ( जीभ ) हीं चुंबनस्थानें, यांपैकी वरचा ओंठ, अंतर्मुख व डोळा हीं दशनाला वर्ज्य गाथासप्तशतींतील चुंबनाचे अनेक उल्लेख ( क्र. २०, २२, ११४, १७६, ४५५, ४६५, ४९५, ५२०, ६३९,

१४९, ८०३ ८.०, ८९२, ९१७, ९३८ ) आलेले आहेत क ४५५ मध्ये नेत्राचें व क ८२१ मध्यें अधराचें चुंबन घेतलें आहे बाकाचीं सारीं कपोल-चुम्बन आहेत क ०० मधील चुम्बन हें वात्स्यायनानुसार ( २ ३ २६-२७ ) रागदीपन किंवा चलितक चुंबन आहे क २२ मधील चुंबन हें व्याड्येनुसार स्पृष्टक ( कामसूत्र २ २ ९ ) आलिंगन आहे क. ११४ व १२८ मध्ये नायिकेच्या आदर्श-सदृश कपोलावर उमटलेल्या प्रतिबिंबाचें चुंबन घेतलेलें आहे वात्स्यायनानें याला संक्रान्तक ( ... ३०-३१ ) अशी संज्ञा दिलेली आहे गाथासप्तशतीत दंतव्रणाचे अनेक उल्लेख ( क ७८, ९६, ००, १०७, ०५ ७३१ ९.०, ९७० ) आहेत यापैकी क ७८ मध्ये नायकानें नायिकेचा अधरोष्ठ दातांत धरलेला आहे क ७३१ मध्ये अधरावरील व्रण स्पष्ट दिसत आहे क ९६ मधील दंतव्रणाला वात्स्यायनानुसार मणिमाला ( २ ७ ११ ) ही संज्ञा आहे क ००७ मधील व्रण नायिकेच्या मांडीवर आणि क ६०७ मधील व्रण जघनावर उमटलेला आहे क ५०७ मधील 'उरु' चा अर्थ स्तन असा घेतला तर तो निधानकल्पनाला अधिक युक्त होतो वात्स्यायनानुसार ( २ ५ १४ ) गलकक्षवङ्क्षणप्रदेश दंतक्षताला विहित आहेत हा क्षतें कालांतरानें दृश्यमान होण्याइतर्का स्पष्ट आहेत काख, स्तन, गळा, पाठ, जघन व मांड्या एवढ्याच नखच्छेद्य स्थानें वात्स्यायनानें नमूद ( २ ४ ४ ) केली आहेत अन्यत्र ( २ ४ १२ ) त्यानें हनुवटी व अधरोष्ठ हीं स्थानें अनुद्दिष्टलेली अशा नखप्रयोगासाठीं सांगितलीं आहेत स्मरदीपिकेंत सांगितलें आहे : 'कक्षा कण्ठ कपोल च नाभि श्रोणि कुचौ तथा। भगस्कन्धौ पर्णमूले प्रयादश नखालया ॥' वात्स्यायन विचारतो नखक्षताचे अनेक प्रकार असून त्याचे वर्णन करण्यास कोण समर्थ आहे ? प्रथम समागमाचे वेळीं अगर कामवासना प्रबल झाली असता, प्रवासाला जाताना किंवा परत आल्यावर, मानिनी प्रसन्न झाली असता अगर मद्यपानानें उन्मत्त झाली असता च नखक्षतें करावीत परस्त्रीचे ठायीं नखक्षत करू नये स्मरणार्थ करावयाचें झालें तर तें गुप्त भागीं करावें, असे निर्बंध त्यानें घातले आहेत गाथासप्तशतींत नखक्षताचे अनेक उल्लेख आलेले ( क १००, १४१ १५० २३३, ४०९ ४२७, ४३३, ४६३, ४७४, ५९९, ५७०, ६७३, ७०७ ९३१, ९६५ ) आलेले आहेत पैकी क ६५३, ९३१ व

६६५ या गाथातील क्षतें नायकाच्या शरिरावर दिसत आहेत आणि हा भूषणें त्यानें घराबाहेर संपादन केलेलां आहेत वात्स्यायन सांगतो (२ ४ ३०) कीं पुरुषाचें शरिरावरील क्षतें स्त्रियाचें स्थिर चित्तही चचल करतात क्र. २३३ ची नायिका उद्धा आहे आणि क्र ४७४ ची वेश्या क्र १०० व ४०९ मध्यें नखक्षतामुळें पुलकोद्भव झालेला आहे ओरखडा न उमटता केवळ स्पर्शानें रोमांचोद्भव करणाऱ्या नखक्षताला वात्स्यायनानें आच्छुरितक (२ ४ १२) अशी सज्ञा दिलेली आहे क्र १४९ मधील क्षताला शशप्लुतक आणि क्र ५६९ व ५७० मधील क्षताना अर्धचद्रक ( कामसूत्र २ ४ १३ ) अशा सज्ञा आहेत क्र ४६३ मधील नखपङ्क्ति जघनावर उमटलेली आहे वात्स्यायनानुसार याला मडल ( २ ४ १६ ) किंवा उत्पलपत्रक ( २ ४ २१ ) या सज्ञा देता येतील दतक्षत व नखक्षत यासारखें प्रेमजागृतीच व प्रेमवृद्धीचें साधन नाहीं अशी त्याची ग्वाही आहे वल्लभानें दु ख दिलें तरी तें सुखकारक असतें हें तत्त्व खुद्द गाथासप्तशतींतच ( क्र १०० ) आलेलं आहे

नासदीयसूक्तभाष्यात अहिताग्नि राजवाडे सांगतात, नखच्छेद्य व दशनच्छेद्य ह्या क्रीडा अलिंगनानुसारी आहेत, आलिंगन व नखच्छेद्य यात कोरडा त्वक्स्पर्श आहे आणि चुबन व दशनच्छेद्य यात त्वक्स्पर्शावरोवर रसस्पर्शहा आहे या स्पर्शांना सवेशनाची जोड मिळाली का तथें अत स्पर्शन घडून येतें, रूप, शब्द, गध, रस व स्पर्श तृप्त होतात

गाथासप्तशतीत नवलतिका प्रहाराचे तीन उल्लेख आहेत तीनही नायिकाची उमर कोवळी आहे कोवळ्या फोकाच्या प्रहारानी त्या रोमाचित होत आहेत क्र २८ ची नायिका देवरानुरक्त आहे, क्र ४१६ चा नायक हलिकपुत्र आहे आणि क्र ८५६ ची नायिका हलिकस्नुषा आहे क्र ८६ व ८९२ या गाथांच्या नायकाना नायिकाना फटकारले आहे आणि यामुळें त्याची अनुरक्ति वृद्धिंगत झालेली आहे

सरस्वतीकण्ठाभरणात क्र २८ या गाथेच्या प्रस्तावात ( निर्णय पृ ६६७) सांगितलं आहे कीं नवलताप्रहार ही चूतलतिका सज्ञक वसन्तक्रीडा आहे भोजदेवानें या क्रीडेचा तपशील दिला आहे तो असा " यत्र वस्ते प्रियतम इति पृच्छद्भि पलाशादि नवलताभि प्रियो जनो हन्यते सा चूतलतिका । " नवलता-

प्रहार प्रश्नपूर्वक करण्यात येत असत असे दर्शविणाऱ्या दोन गाथा हेमचंद्रानें देशीनाममालेंत ( पृ १६७ ) दिल्या आहेत.

अत्थ-पलासलयाए जणेहि पइणाम पुच्छिया जुवई
अस्हन्ती णिहणिज्जइ णिअमविसेमो लज्ज्या सा ॥
दोलाविलाससमये पुच्छन्तीहिं सहीहि पइणाम
ल्ठीहि हणिज्जन्ती वहुआ णवलयवय भरइ ॥

गाथासप्तशतीतील प्रहार प्रश्नपूर्वक झालेले नाहीत ध्वन्यालोकात ( निर्णय. पृ ६२ ) अशीच समानार्थी गाथा दिलेली आहे.

अज्जाए पहारो णववलदाए दिण्णो पिएण थयवट्ठे
मिउओ वि दुसहो व्विअ जाओ हिअए सवत्तीणम् ॥
[ भार्याया प्रहारो नवलतया दत्त प्रियेण स्तनपृष्ठे
मृदुकोऽपि दु सह इव जातो हृदये सपत्नीनाम् ॥ ]

लोचन टीकेंत ' अज्जा 'चा अर्थ ' कनिष्ठ भार्या ' असा दिलेला आहे जिला प्रत्यक्ष प्रहार झाला ती रोमांचित झाली आणि तिजवरील प्रीतीच्या या प्रदर्शनामुळें तिच्या सवती खण्डित व व्यथित झाल्या क्र १७५ या गाथेत वेदना व सवेदनाचें असेच संक्रमण झालेलें आहे.

वात्स्यायनानें कामसूत्राच्या नागरक प्रकरणातील ' देश्या क्रीडा ' या परिच्छेदात चूतलतिका क्रीडेचा उल्लेख केलेला आहे देश्या म्हणजे प्रादेशिक, *विशिष्ट प्रदेशात प्रचलित असलेल्या चूतलतिका म्हणजे ' चूतपल्लवावतंसनम् ' असें जयमङ्गलेंत मागितलें आहे, म्हणजे आंब्याची कोवळी पानें गुंफून तीं अवतंस म्हणून धारण करणे ' या क्रीडेचा प्रकार सूत्रकारानें किंवा टीकाकारानें* मागितलेला नाही. अनंगरङ्ग पञ्चसायक चूडामणि नागरसर्वस्व, पञ्चसायक वगैरे कामशास्त्रावरील मध्ययुगीन ग्रंथात या क्रीडेचा उल्लेख आढळत नाही वात्स्यायनानें प्रहणन प्रकरणात काला कर्तरि विद्धा वगैरे प्रकाराचा उल्लेख केला आहे पैकी कर्तरि मजक मुष्टिप्रहारानें शातवाहन कुन्तल शातकर्णानें महाराणी मलयवतीला मारले असा उल्लेख केलेला ( ..७.२८ ) आहे; यावरून *त्याला महाराष्ट्रातील कामक्रिया अवगत होत्या असें स्पष्ट दिसतें तरीही त्यानें*

नवलतिकाप्रहार या क्रीडेचा उल्लेख केलेला नाहीं यावरून वाटतें कीं गुप्त कालाच्या सुमारास ही क्रीडा लुप्तप्राय झाली असावी

नवलताप्रहार, मग ती लता कितीही कोंवळी किंवा फुलांनी डवरलेली असो, म्हणजे केवळ पुष्पवर्षाव नव्हे, कीं त्यापासून नाजूक नवोढेला सुखप्राप्ती व्हावी गाथासप्तशतींतील उल्लेखावरून दिसतें कीं या क्रीडेंत चार दोन शिपक्या उड विण्यापलीकडे विशेष काहो केलें जात नसावें मानवी शरीर संवेदनाक्षम आहे तोंवर नाजूक प्रहारानेंही त्याला वेदना या होणारच वेदनाची संवेदनात परिणति ( Love & Pain ) या विषयाला डॉ हॅव्हेलॉक एलिस यांनी Psychology of Sex मध्ये सुमारें सवाशें पानें दिलेली आहेत लैङ्गिक मानसशास्त्राचा हा सिद्धान्त गाथासप्तशतीच्या क्र १०० या गार्थेत सूत्ररूपात मांडलेला आहे. अंटनी ॲण्ड क्लिओपॅट्रा या नाटकात शेक्स्पीयर सागतो,

Like the lover s pinch which hurts & is desired.'

प्रियकर चिमटा घेतो तो दु ख देतो, तरी इष्ट वाटतो दतक्षत व नखक्षत या सांकेतिक किंवा साम्प्रदायिक प्रणाहून लताप्रहाराचें वळ हे किती तरी पटीनीं अधिक हृदयंगम, हृदयद्रावक द्वद्वात प्रतिपक्षावर प्रहार करणें हें पौरुषाचें किंवा विजिगीषु सामर्थ्याचें लक्षण, प्रहारामुळें प्रतिपक्षाला होणाऱ्या वेदना प्रत्यक्ष पाहणें हें त्याचें सार्थक प्रेम हेंही द्वद्वच आहे मनुष्य जन्मतात शिकारी आहे मनुष्य शिकार आहारासाठीं करतो, हें खरें, पण केवळ आहारासाठीच तो शिकार करतो असं म्हणता येणार नाहीं कौशल्यामुळें किंवा शक्तीमुळे शिकार विद्ध झालेली पाहणें हेंच शिकाऱ्याचें खरें समाधान मनुष्यानें शिकारी पेशा अनेक शतकापूर्वी सोडलेला असला तरी शिकारी वृत्ति त्याच्या सस्कारशरीरात दृढ बद्धमूल झालेली आहे वधूच्या बाधवाशी युद्ध करून तिला जबरदस्तीनें पळवून आणणें व तिच्याशी विवाह करणें ही आसुर विवाहाची प्रथा याच वृत्तीची द्योतक आहे म्हणून प्रयोगामुळें पुरुषाला यशस्वी शिकाऱ्याचें समाधान प्राप्त होतें प्रतिपक्षाच्या वेदना पाहणें हा विजयी जेत्याचा आनद, त्याला या प्रयोगामुळ अनुभवावयास मिळतो प्रतिपक्षाच्या असहायततेहा लैङ्गिक आकर्षण असतें प्रहार होत असताना प्रतिपक्षाच्या द्रुत अगविक्षेपामुळें पुरुष उत्तेजित होतो सीत्कार, मणित, मुखवेप, हस्तकप आणि ककणाचें व नूपुराचें शिञ्जित

हीं सुरतसमरामाचा लक्षणें ( क ३९२ ) त्याला अनुभवावयास मिळतात. स्तन, नितबादि नेहमी वस्त्राच्छादित असणाऱ्या अवयवांवर हे प्रहार होत असल्यामुळे कार्याचा आवेश ओसरल्यानंतर सांत्वनासाठीं शुश्रूषा करतानाही पुरुष आनंदित होतो आणि स्त्री १ कामशास्त्रज्ञ सागतात कीं स्त्री ही जात्या विपुलनितंबिनी असल्यामुळे ( नासदीयसूक्तभाष्य पृ ८०६ ) "वयात येण्याच्या सुमारास त्या अवयवावर फटके मारून घेण्याची वृत्ति सर्वसामान्य असते, इतकी का ती विकृति मानण्याचे ऐवजी युक्त वृत्ति मानण्यास हरकत नाही, म्हणून कित्येक जातींत विवाहविधींत वरानें वधूच्या ढुंगणावर फटके मारण्याची चाल आहे " प्रेमसमरामात तीही काहीं काळपर्यंत द्वंद्व भावनेनें भाग घेते. ती जिंकते, तशीच जिंकली जाते. शिकार शिकाऱ्याला झुलवते, भुलवते; त्याच्या तावडीतून निसटण्यासाठीं. स्त्रीही पुरुषाला झुलवते, भुलवते; त्याला जिंकण्यासाठीं, त्याच्याकडून जिंकली जाण्यासाठीं तिच्या वेदना व संवेदना या त्या त्याच क्षणी निर्माण होतात व विलीन होतात. कोठवर २ वात्स्यायनानें घातलेल्या मर्यादेपर्यंत या मर्यादेपलीकडे कार्याचा भाग सुरू होतो. भारतापेक्षा पाश्चात्य देशात लैङ्गिक कार्याची तीव्रता व व्याप्ति अधिक.

आपल्या चूतलतिकेसारख्या क्रीडा पाश्चात्य देशातही प्राचीन काळापासून प्रचलित आहेत Flagellation म्हणजे छडीमार किंवा कोरडेमार, याचे प्रकार दोन फटके मारणें वा फटके मारून घेणें, कामक्रीडा म्हणून वा धार्मिक प्रायश्चित्त म्हणून. रोमचा विख्यात विलासी बादशहा नेरो (ई.स. ३७ ते ६६) याचा नर्मसचिव पेट्रोनियस याच्या सॅटिरिकॉन या काव्यात पाश्चात्य वाङ्मयातील लता-प्रहारप्रयोगाचा पहिला उल्लेख आढळतो अतिसंभोगामुळे दुर्बळ झालेल्या तरुणाना पक्षघातासारख्या नपुसकत्वाचा झटका येतो त्यावर रामबाण इलाज म्हणून त्याच्या पोटावर ग्लाजकुयरीच्या फांद्याचे फटकारे उठविण्यात येत असेही त्याने सागितलें आहे रोमन सौंदर्यदेवता व्हीनस हिला तद्देशीय गणिका आपल्या सुरतकौशल्याचे प्रतीक म्हणून लगाम व चाबूक अर्पण करीत असत दरसाल ता. १५ फेब्रुवारी रोजीं प्राचीन रोमन लोक ल्यूपरकस या देवताच्या तुष्टीसाठीं ल्यूपरकाली या नावाचा उत्सव साजरा करीत. ल्यूपरकस् म्हणजे पन, याचे शरीर कमरेपासून वर पुरुषाचें व खालीं बोकडाचें असतें. याची वस्ती डोंगरकपारांत गुहेंत

असतें पेनेलोप ही तरुणी आपल्या मेंढराची राखण करीत असताना मर्क्युरीनें बोकडाचें शरीर धारण करून तिचा उपभोग घेतला व हें बाळ जन्माला आलें, अशी कथा (Classical Dictionary Dr Charles Anthon) आहे उपरोक्त उत्सवाच्या दिवशीं रोमन स्त्रीपुरुष जगलात जमत, अगावरले कपडे उतरून ठेवीत आणि जवळ जवळ नग्नावस्थेंत असलेल्या एकामेकावर, विशेषत स्त्रियावर कोरड्याचे फटके उडवीत समकालीन इतिहासकार सागतात का या स्त्रिया हे फटकारे चुकविण्यासाठी यत्किंचितही प्रयत्न करीत नसत, एवढेंच नव्हे, आपखुषीनें प्रहारपथात येण्याचा प्रयत्न करीत असत, कारण या प्रहाराचें वळ धारण करण्यामुळें देव सतुष्ट होतो आणि त्याच्या कृपाप्रसादानें सतानप्राप्ति होते अशी तत्कालीन स्त्रियाची समजूत होती (Prof. R G Van Yelyr . The Whip & The Rod pp. 16-17 ) कालातरानें हा उत्सव नष्ट झाला आपल्याकडील कडकलक्ष्मीचा आसूड आणि काळूबाईचा चाबूक व वेत हीं प्रतीकही लैङ्गिकच आहेत हें यावरून ध्यानात येईल प्रतोदप्रहारानें प्रमदा बहुफलप्रद होतात ही समजूत नष्ट झाली, पण प्रतोद प्रहारप्रथा मात्र उद्दीपनाचें साधन म्हणून योजण्यात येऊ लागली.

पाश्चात्य कामवाङ्मयात प्रहणन प्रयोगावर अनेक ग्रथ आहेत त्यावरून दिसतें कीं काहीं विकृत वृत्तीच्या व्यक्तींची कामजागृति किंवा तृप्ति क्रौर्याशिवाय होतच नाहीं, किंबहुना क्रौर्यामुळेंच होते मार्क्विस द सेड ( १७४०-१८१४ ) हा या क्रूरकर्म्याचा आधुनिक आचार्य. त्याच्या नावावरूनच लैङ्गिक क्रौर्याला अनुलक्षून वापरण्यात येणारा सॅडिझम् ही सज्ञा सिद्ध झालेली आहे त्याच्या लिखाणात, तशींच प्रत्यक्ष कृतीत लैङ्गिक विकृति व अधोगति याची परिसीमा दिसून येते त्या मानानें वात्स्यायनानें नमूद केलेले प्रयोग पोरखेळासारखे सौम्य आहेत. त्याचाही त्यानें कडक शब्दात निषेधच केलेला आहे

लताप्रहार व प्रतोदप्रहार हीं एकाच कामक्रीडेचीं रूपं आहेत या विषयावें हॅव्हेलॉक एलिसचा अभिप्राय ( Psychology of Sex Vol I Part II - p 138 ) अखेरचा मानण्याइतका यथार्थ आहे प्रतोद-प्रहार

कोणी दिलेले असोत अगर सोसलेले असोत, त्यामुळें राग व भीति या भावना जागृत होतात मानवी वृत्तात या भावना मूलभूत आहेत आणि त्या अनुरागाशा सबद्ध आहेत लैङ्गिक भावना सुस्पष्ट झालेल्या नसतात तेव्हाही प्रहारप्रयोगामुळें त्या जागृत होतात हे संस्कार कधाही नष्ट होत नाहीत आणि तारुण्यात ते कामक्रीडेच्या स्वरूपात प्रगट होतात

## संकेत व संकेतस्थानें .—

सकेत म्हणजे इशारा, खूण, प्रतीक सकेतस्थान म्हणजे ( rendevous ) प्रेमभेटीसाठीं ठरलेलें ठिकाण.

गाथासप्तशतात सकेताचे अनेक उल्लेख आलेले आहेत. क्र २५४ या गाथेंत सुनेनें पथिकास इशारा दिलेला आहे, क्र. ४९ या गाथेंत प्रपापालिकेनें पथिकाला विश्रान्तीसाठी छायावृक्षाची खूण केलेली आहे, क्र १८० या गाथेत श्यामलेनें हलिकपुत्राला सकेताच्या प्रतीकादाखल जाभळाची डिकशी दिलेली आहे. कामशास्त्रावराल मध्ययुगीन लेखकानीं सकेताचें शास्त्रच उत्क्रात केलेलें आहे कथासरित्सागरातले ( कथापीठलम्बक तरग ७ प्रकाशक यदे पृ ५१ ) पुष्पसकेताचें उदाहरण जिज्ञासूनीं अवश्य पहावें

गाथासप्तशतात सकेतस्थानाचे अनेक उल्लेख आलेले आहेत, पैकी नि सदिग्ध व प्रत्यक्ष असे फार थोडे आहेत, बरेचसे अप्रत्यक्ष किंवा आरोपित आहेत गाथांच्या नायिका व्यभिचारिणी आहेत असें गृहीत धरून उत्तरकालीन टीकाकारांनी त्याची सख्या अवास्तव फुगवलेली आहे

सस्कृत व प्राकृत साहित्यातील सकेताचे व सकेतस्थानाचे उल्लेख सामान्यत व्यभिचारी प्रीतीशा सबद्ध आहेत साकेतिक प्रतीकाचा अभिप्राय ओळखता आला नाहा म्हणजे घोटाळे होतात, पण व्यभिचारी प्रीति हा मामला मुळातच चोरीचा असल्यामुळें अशा गफलती अपरिहार्य असतात

गाथासप्तशतींतील सकेतस्थानाचे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष उल्लेख टीकाकारानी नमूद केले आहे ते असे :

सकेतस्थान अगण ३२२, ३७९, अरण्य ११६, ४९४, ७७५, ९८१; अक्षोट ३१३, कदम्ब. ३७, १७७, कपाशी–शेत. १६५, ३५९, ५४९.

८०५, करञ्ज १६७, ५५३, काश–भूमि ४३४, कुञ्ज ३७, ५८, १०२, १०३, २१८, २३२, २३९, ३६५, ३६६, ४२२, ६२६, ६४३, ७४, ६८०, ७५४, ८७०, ८७९, ९५७ ९५८, ९९५, कुसुम्भ १४५, ३९२, गोदातट ५८, १०३, १५१, १७०, २३१, ३५५, ८७९, ९५८, घरीं ८, ६३, ७७, १५९, २३७, ३२०, ३३६, ३५५, ५४९, ६६७, ७२९, ९५५, ९५९ जम्बू १८० तळ्याचे पाळीं : ४, ८, ११०, १८६, ८१४, ४९५, ५७४, ६२२, ६९३, ९४७, तापी–तट ३६९, ५७८, ५९९, तिलक्षेत्र ८ ६९३, ७६३, तुवरीक्षेत्र ३५८ तृणलतागृह ३९४, देऊळ ६३ ६४, १०९, १९४, परसू ३१३, ८३, ९५३, ९५७, पलाश ७७५, पाणपोई ४९, १६१ पाणवठा ८७४, ८७५ ९५४, प्रियङ्गु : ९५७, मधूक १०३, १०४, १५९, ९५८, महिषशाला ५६०, माधवी ३२२ यव ४०२, लतागृह ३९४, ५५९, लिंब ८७२, वट ९४, १६६, २६३, २९५, ५५९, वंश ६७४ वानीर ३१८ विन्ध्य ११६, वेतस ५९९, ६३५, ६४३, ७५४, ८६८, ८७० शाहिक्षेत्र ९५२ शणवाटिका ९ शालिक्षेत्र ९, ५६२, ५६७ ५६८, ६११, ६९०, ६९१, ९५२ शेत ६९३, ७९१, शेफालिका ९५३ हरिजाल ९ हरिद्रा ८५७

संकेतभग ६८३ ८१३, ९५६

संकेतस्थानभग ८, ९, ३७, १०२, १०४, १०९, २६३, ४०२ ४०३, ४१६, ४२२, ५४९, ६२०, ७२५, ७६३

समागमोत्सुक अपरिचितांना परस्परांशी परिचय करून देणें परिचितांची अनुनयाला अनुमति मिळविणें, अनुकूलांना एकांतासाठी संकेतस्थान उपलब्ध करून देणें आणि आगंतुक आपत्ति वा संभाव्य व्यत्यय याबाबत इशारा देण्यासाठीं संकेतस्थानासभोंवतीं टेहळणी ठेवणें हें काम दूतीचें किंवा सखीचें, दूताचें किंवा चेटाचें आणि नायकाचा वेश्येशीं व गणिकेशीं स्नेह जडविणें व तो टिकवणें हें कार्य विटाचें

गाथासप्तशतींत दूती व सखी यांचे अनेक उल्लेख आलेले आहेत या संज्ञाची योजना विशेष विचक्षणेनें केलेली नसल्यामुळें त्यांचे अनुक्रमांक एकत्र करून देतों ४, ९, १० १२, १५ २८, ३०, ३२, ३७, ३९, ४५ ४९,

५७, ६०, ६१, ७६, ७७, ८४, ९१, ९०, ९६, १०१, १०२, ११४, ११६, १३१, १३८, १४०, १४४, १४५, १५६, १७७, १७८, १८१, १९३, १९८, २०४, २११, २३७ २४१, २४०, २४४ २४९, २५६, २५९, २६४, २८४, २९८, ३५२, ३८१ ३८६, ४१९, ४४०, ४५३, ४८२, ४८६, ५१७, ७०१, ७१०, ७१३, ७१८, ७१९ ७०८, ७३७, ७५१, ७९४, ८०४, ८११, ८१८, ८३४, ८४५, ८४८, ८४९ ८५०, ८५२, ८५४, ८५५, ८७३, ८७४, ८५० ८७९, ८८०, ८८९, ८९१, ८९४, ९२९, ९३०, ९४९, ९५०, ९५२, ९५३, ९५४, ९५५ ९५६, ९५७, ९९०

कामसूत्रान्या पारदारिक अधिकरणात वात्स्यायन सागतो

विधवेक्षणिका दासा भिक्षुणा शिल्पकारिका

प्रविश्याशु विश्वास दूतीकार्यं च विद्दती ॥

"विधवा, शकुन सागणारी दासा, भिक्षुणी व कलावता ह्या इष्टस्थानीं अल्पायासानें प्रविष्ट होऊन व विश्वास संपादन करून दूती कार्य सिद्ध करतात" अनङ्गरङ्ग ( अध्याय १६ ), नागरसर्वस्व ( ८ ८ ), पञ्चसायक ( चतुर्थ सायक -१ ) व रतिरहस्य ( १३ १०३ ) या कामशास्त्रावरील ग्रथात दूती कर्माला योग्य असे पुढील वर्ग नमूद केले आहेत कोष्टीण, गवळण, चेटी, धात्री ( दाई ), धोबीण, नटी, प्रव्रजिता ( जैन सन्यासिनी ), फेरीवाली, मणिकारिणी, माळीण, शिंपीण, शेजारीण, सखी, सर्वधिनी व सैरन्ध्री ( अंत पुरदासी ). अनङ्गरङ्गात प्रतिगेहिका हा आणखी एक वर्ग नमूद केलेला आहे स्त्रियान्या समारभासाठी घरोघरी आमत्रणें देण्यासाठी हिंडणारी ही निरोपी असावी पण्डरीविठ्ठलाच्या दूतीकर्मप्रकाशात ( निर्णयसागर : काव्यमाला, गुच्छ १३ ) एक्वीस दूताची यादी दिलेली आहे समाजाची माडणी सवीण होऊ लागली आणि स्त्रियाना अधिक व्यवसाय उपलब्ध होऊ लागले तसतशा वात्स्यायनाच्या यादात भर पडू लागली व्यवसायान्या निमित्तानें या स्त्रियाना अतर्गृहातही सहज प्रवेश मिळतो एतद्देशीय व परदेशी जाणते सागतात का हरा या किंवा तत्सम व्यवसायातल्याच स्त्रिया दूतीकर्म करीत असतात दौत्यकर्म असें नाजूक व विश्वासाचें तसच धोक्याचें व जिवावरचें म्हणून दूतीचा दर्जा दासीहून श्रेष्ठ सखीचा दर्जा त्याहून श्रेष्ठ सखी हा नायिकेच्या दर्जाची

नव्हे; समवयस्क, विशेष विश्वासातली, निकटवर्तिनी परिचारिका. दूतीकर्म-प्रकाशात सखीची व्याख्या दिलेली आहे: "सखी विश्वासविश्रमकारिणी पार्श्वचारिणी। मण्डनोपालम्भ शिक्षा परिहारादिका यथा॥" गाथासप्तशतींत अनेक गाथांत आई, आत्या, भगिनी, मामी अशी संबोधनें आलेली आहेत तीं सर्व सामान्यत. दूतींना अथवा सख्यांना अनुलक्षून योजलेलीं आहेत. "माता वृद्ध स्त्रीणा सम्बोधने भगिनी समवयस्कस्त्रीणा सम्बोधने।" दौत्य-धर्मासाठीं कोणता गुणसमुच्चय अंगीं असणें अवश्य आहे? वात्स्यायन १·६·४०) सांगतो: वाक्चातुर्य, धार्ष्ट्य, इङ्गिताकारज्ञता, अनाकुलत्व, परमर्मज्ञता, प्रतारणत्व, देशज्ञान, कालज्ञान, संकटसमयीं स्थिरबुद्धि, प्रसंग जाणून तात्काळच उपाय योजण्याची बुद्धि दूती ही प्रागल्भ्यवती वक्रोक्ति-विभूषिता असावी असें कुट्टनीमतात (क्र. ८९) सांगितलेलें आहे. आदिपुराणात (५० ३९·४०) दूतीचीं षोडशविध कर्में सांगितलेलीं आहेत: सुरूपता दुःख-सहिष्णुताच। सुशीलता कोमलवाक्यताच। सन्मन्थिताऽऽच्छादित मन्त्रिता च। च्छन्दानुवर्तित्वमलज्जिताच। प्रोत्साहनं गुणकथाकथन कलाना। विश्रम्भणं बहु-लता धनदर्शनं च। गाढानुराग वचनस्य सिद्धि:। कर्मेति षोडशविध कथयति दूत्या·॥ चेट व विट याचे गुण भरतानें नाट्यशास्त्रात (अध्याय २४) दिले आहेत: कलाप्रियो बहुकथो विरूपो गन्धसेवक। मान्यामान्यविशेषज्ञश्चेटो ह्येव विध. स्मृत:॥ वेश्योपचार कुशलो मधुरो दक्षिण: कवि.। उहापोह क्षमो वाग्मी चतुरश्च विटो भवेत्॥

नायिकेला विरहकालात गोष्टी सांगणें (क्र. ८३४) आणि विलासानंतर तिचें चित्त विनोदानें आणखी प्रसन्न करणें (क्र १४५), नायिकेला धीर देणें (क्र. १०) व नायकाला प्रोत्साहन देणें (क्र. ३८६), नायकाची भलावण करणें (क्र २८४) व नायिकेला अभिमुख करणें (क्र २५६, २८७), नायि-केसाठीं घरात पुरुष आणून ठेवणें (क्र ७७) व नायिकेला संकेतासाठीं घरा बाहेर काढणें (क्र ३३७, ९५६), संकेतस्थान निश्चित करणें (क्र ४) किंवा बदलणें (क्र. ९) व त्यावाबत जरूर त्या सूचना देणें (क्र ४०२), संकेत स्थानाच्या सुरक्षिततेबद्दल भरंवसा देणें (क्र ७९४) व धोक्याची सूचना (क्र ९१२, ९१३) देणें वगैरे कामें गाथासप्तशतींतल्या दूतींनीं केलेलीं आहेत

वेळोवेळा विश्वासाचा कामें केल्यामुळे दूताला नायिकेच्या अतर्यामात प्रविष्ट होण्याचा (क्र २६४) आणि प्रसगविशेषा नायक-नायिकाचीं निर्भत्सना (क्र ४१२·१७८) करण्याचा अधिकार प्राप्त होतो, हा तिने (क्र १८१) अशा कौशल्यानें वापरायचा का अडलेले काम पुरें झालें पाहिजे आणि मग मान होता कामा नये क्र ५४ या गाथेंत पत्नीदूतीच हृदयद्रावक वृत्त सांगितलें आहे क्र ४९, ४४०, ६६७, ८७३ वगैरे गाथाच्या नायिका या स्वयदूती आहेत नायिकेची प्रतारणा करून नायकाशा स्वत च रममाण होणाऱ्या दूती व सखी (क्र ७१३, ८५५) या अधम आहेत महाभारतात देवयानीची सखी शामिष्ठा ययातीला सागते, समानेतौ मतौ राजन्पति सख्याश्च य पति । सम विवाहमित्याहु सख्या मेऽसि वृत पति ॥ देवयानी ही तुझी भार्या व माझी सखी, सबब आम्ही दोघींही तुला भोग्य ! पण सर्वच नायिकाना हें सहन होतें असें नाहीं आपल्या गालावर उठलेले सखीचें प्रतिबिंब (क्र ९३२, ९३३) नायकानें चुबावें हेंही नायिकेला सहन होत नाहीं

क्र ४ या गाथेवरील टीकेंत गगाधरान रतिरहस्यातील (५ ३) वचन उध्दृत केलें आहे तेथें श्री सिद्धपण्डित कोक्कोक सागतो वाहत्या नदीच्या तीरावरील कुंज, वनातील गर्द राई व पर्वतातील गुहा हीं सोईस्कर संकेत स्थानें आहेत क्र ८ या गाथेवरील टीकेंत गगाधर सागतो कीं तिलक्षेत्र व कमळाचें तळ हीं छान सकेतस्थानें आहेत दामोदर गुप्ताच्या कुट्टनीमतावरील रसदीपिका टीकेंत श्री त्रिपाठी यांनी वचन दिलं आहे "अटव्यामन्धकारे वा शून्ये वाऽपि सुरालये। उद्याने वा सरित्कुञ्जे प्रदेशे गहितेऽथवा ॥ परदारेषु सकेत कर्तव्यो रतिसिद्धये। दूतीमन्त्रेण निश्चित्य स्वय तत्र पुरा व्रजेत ॥" कल्याणमल्लानें अनङ्गरङ्गात त्याज्य स्थानाविषयी वचन दिलें आहे "वह्निब्राह्मण पूज्यवर्ग निकटे नद्या च देवालये। दुर्गादौ च चतुष्पथे परगृहेऽरण्ये श्मशाने दिवा ॥ सङ्क्रान्तौ शशिसदृक्षये (अमावास्यायाम्) च शरदि ग्रीष्मे ज्वरार्तौ मते। सन्ध्यायां च परिश्रमेषु सुरत कुर्यान्न विद्वान् क्वचित् ॥" विष्णुपुराणात हा वर्ज्य स्थानाचा तपशील दिलेला आहे "देवद्विजगुरूणा च व्यवायी नाश्रमे भवेत्। चैत्यचत्वरसारेषु न चैव च चतुष्पथे ॥" गाथाकवीनीं किंवा त्याच्या टीकाकारानीं ह्यापैकी बहुतेक सर्व निर्बंध झुगारून दिलेले आहेत एवढें मात्र

सर्वे का गाथासप्तशतीत उल्लेखिल्याप्रमाणें प्राचीन भारतात सुरत व्यवहार पुष्कळदा उघड्यावर, फार तर वृक्षादिकांच्या आश्रयानें होत असत म्हणूनच हेरोडोटसनें ( III. 101 ) सुप्रसिद्ध विधान केलें आहे की हिंदुस्थानातले लोक जनावराप्रमाणें उघड्यावर संभोगक्रिया करतात. शिवाय त्यांचें रेतही कृष्णवर्ण असतें ! नीतीच्या व धर्माच्या दृष्टीनें व्यभिचार जितका हीन तितकीच शिष्टाचाराच्या दृष्टीनें उघड्यावरील संभोगक्रिया गर्ह्य, मग ती मिथुनाना कितीही प्रिय किंवा सोइस्कर वाटो !

गाथासप्तशतींत संकेताचे व संकेतस्थानाचे प्रत्यक्ष व सहापूर्वक असे उल्लेख फारच थोडे आहेत क्र ३१८ मधील संकेतस्थान वेळूच्या वनात आहे क्र ३३५, ६२६ व ९१८ मधील कुंजात आणि क्र ६९१ मधील शालिक्षेत्रात गाथासप्तशतातील संकेतस्थानाचे वर्गीकरण केलें असता दिसून येतें की यातील बहुसंख्य स्थानें खेडेगावच्या परिसरातील असून ग्रामीण जीवनाशी सबद्ध आहेत शेतकीतील विशेष मेहनतीचीं कामें पुरुषांनी करावयाची आणि कामकऱ्याना न्याहरी पोंचविणें, शेताची राखण करणें, कपाशीचा बोंडें खुडणें वगैरे कमी श्रमाचीं कामें स्त्रियांनी करावयाचीं, अशी पद्धत हल्लीप्रमाणेंच तेव्हाही प्रचलित होती यामुळें हल्लि स्त्रीपुरुषाना संकेताची संधि सहज मिळत असे त्याचें प्रतिध्वान किंवा प्रतिबिंबें या गाथात उमटलेली आहेत प्रियकरानें नागरटीचें काम पत्करावयाचें व न्याहारी घेऊन येणाऱ्या प्रेयसीशा त्याची भेट व्हावयाची, हा क्र ६९२ मधाल प्रसग उल्लेखनीय आहे अशा सवलती उपलब्ध नसल्यामुळें नगरच्या नारांना निराळ्या युक्त्या योजाव्या लागतात कामकाजा निमित्त पुरुषाना पुष्कळ दिवसासाठी प्रवासाला जावें लागे, ती संधि नागरिक साधतात येथील संकेतस्थानें बहुधा घराच असतात, क्वचित्‌हुना जेथें गृह हे संकेतस्थान आहे तो संकेत नागरिकाचा आहे असें अनुमान वसविण्यास हरकत नाहा क्र २३७ या गाथेच्या नायिकेनें विंचू चावल्याचे ढोंग केलें आणि सखीनें संकेतानुसार तिला दण्डाला धरून वैद्याच्या घरा नेलें । क्र ३३५ च्या गाथेचा स्वयदूती नायिका शेजाऱ्याशा रात्रीचा संकेत ठरवीत आहे शहरातले लोक परगावीं जातात, त्याचप्रमाणें बाहेरगावचे लोक उद्योग धद्यासाठीं किंवा ख्यालीखुशालीसाठी शहरात येतात आणि सर्रास नागरांशी

लावून एखाद्या ओळखीच्या घरी मुक्कामाची सोय लावून घेतात चार दोन वेळा ये जा झाली की साहजिकच त्यांची घरातल्या घरात बरी वाईट सोय लागत असे क्र २५४ च्या नायिकेच्या प्रोत्साहनामुळे पथिकाने अंगणाऐवजी ओसरीवर पथारी लावली आहे परक्या घरा पुरुष पाहुण्यांची वर्दळ असे, त्याचप्रमाणे नात्यागोत्यातल्या किंवा थोड्याबहुत ओळखीच्या स्त्रियाही भरल्या घरात पाहुण्या म्हणून उतरत असत आणि घरातील दूतीमार्फत त्यांच्या अनुकूलतेचा ठाव घेतला जात असे क्र ९१७ गाथेत प्रत्यक्ष भावजयीने दूतीकर्म केलेले असून पाहुणीला प्रियङ्गु मण्डपात बसविले आहे

गाथासप्तशती हे अकृत्रिम जानपद वाङ्मय आहे, बहुतेक गाथांतील प्रसंग, भावना व विचार प्रत्यक्ष ग्रामीण जीवनातून निवडलेले आहेत आणि या गाथा ग्रामीण कवींनी बहुजनसमाजाकरिता रचलेल्या आहेत, साहित्यशास्त्रातील सिद्धान्ताचे उदाहरण म्हणून रचलेल्या नाहीत उलटपक्षी गाथासप्तशतीवरील टीका पंडितांनी पंडितांसाठी लिहिलेल्या आहेत त्यांच्या कल्पकतेचे कौतुक करावे तेवढे थोडेच होणार आहे ज्या संकेतांच्या सूक्ष्म सूचना आहेत असे ते सांगतात त्यांचा सांकेतिक अर्थ समजण्याइतका चाणाक्षपणा सामान्य मनुष्याच्या अंगी संभवणे अशक्यप्राय आहे या टीकाकारांनी उभारलेला संकेतांचा डोलारा इतका कमकुवत आहे की जरा डिवचले की तो कोलमडतो सामान्य बुद्धीच्या माणसांनी अशा संकेतांच्या भानगडीत पडू नये हेच श्रेयस्कर नाहीतर हिरमोड व वर बोभाटा पदरी पडावयाचा क्र १८६ मधील श्यामलेचा जम्बूदल संकेत हलिकाला कसा समजणार ? त्याच्यापासून चाणाक्षपणाची अपेक्षा करणे हाही अडाणीपणाच

गाथासप्तशतीतील संकेतस्थानांचे वर्गीकरण केले असता दिसून येते की त्या काळी नदीकाठ हे सर्वात लोकप्रिय संकेतस्थान होते त्याच्या खालोखाल वेळूची बने व भातशेत वगैरेचा संकेतस्थान तळ्याच्या पाळी व ओसाड देवळी मोडलेली आहेत या सगळ्या अशा असण्यात हे तत्कालीन भौगोलिक व सामाजिक परिस्थितीशी जुळत आहे अन्न व पाणी या प्राथमिक गरजा कृषियुगातल्या मानवी वसतिस्थाने नद्यांच्या काठाकाठाने असत स्नानासाठी व धुण्या

पाण्यासाठी ग्रामीणांना सकाळीं सध्याकाळीं पाणवठ्यावर जावेंच लागतें, नदीनंच देवळें व त्याच्या ओवऱ्या असतात यामुळें नैमित्तिक कामानंतर तरुणांना रके तिकडे चकर टाकण्यास सवड सापडते म्हणूनच हा संकेतस्थान इतकीं लोकप्रिय आहेत गोदावरीचा परिसर जगात सुदर असे पुराणात सांगितलेलें आहे स्वत गाथासप्तशतीत गोदातटावाबद्दल ( क्र ३५५ ) काढलेले उद्गार पहा, गोदावर्या कूलानि शीलेन्मूलानि ' गाथासप्तशतीत याविषयीं उद्युक्त असलेल्या मञ्जार्याच या परिसरात विशेष वर्दळ आहे मध्ययुगीन व आधुनिक पडित मात्र गोदावरीच्या तीरावरील तीर्थांची प्रशसा करीत असतात गाथासप्तशतींतील संकेतस्थानें मुख्यतें करून गोदा, तापी, व नर्मदा यांच्या काठावर विखुरलेलीं आहेत, विशेषत गोदावरीच्या महाराष्ट्राच्या मावळ भागात भातशेती फार प्राचीन काळापासून अस्तित्वात आहे वेळूचीं वनें हा मुख्यतेंकरून याच भागात आढळतात प्रेमप्रसग होतात तींच स्थानें मनुष्याच्या विशेष आवडीचीं असतात व तीं त्यांच्या वसतिस्थानाच्या आसपास असतात आणि तींच त्याच्या काव्यात निर्दिशिलीं जातात या न्यायानें गाथासप्तशतीच्या निर्मिति स्थानाबद्दलही या प्रमाणावरून अनुमान करता येतें

## व्यभिचार :

गाथासप्तशतीत व्यभिचाराचे अनेक उल्लेख आढळतात. व्यभिचार भावनेच्या सकल्पापासून सिद्धीपर्यंतच्या प्रत्येक अवस्थेबाबत, अनुभावित अपेक्षाच्या उद्गमापासून अपेक्षाभगापर्यंत काही प्रोत्साहक व काही निषेधपर, काही ललित व काहीं ग्राम्य

स्त्रीपुरुषाचे अप्रतिबध लैंगिक सबध विवाहसस्थेनें निर्बधित केले ही सस्था कोठें करारावर आधारलेली आहे तर कोठें धार्मिक सस्कारावर समाजानें वैवाहिक शपथांच्या भगाबाबत शासनें उत्क्रांत केला या व्यवस्थेला अनेक शतकें लोटलीं, तरी स्त्रीपुरुषाची व्यभिचारी वृत्ति लोपली नाहीं, अद्याप आटोक्यात आली नाही इतकेंच नव्हे, उलट वृद्धिंगत होत असल्याचीं चिन्हें दिसत आहेत, काव्यातच नव्हे व्यवहारातही

डॉ. हॅव्हेलॉक एलिस ( पूर्वोक्त II III p 296 ) सागतो का वैवाहिक

जीवनात काही वर्षे कठल्यावर स्त्रीपुरुषांचे ठायीं वैचित्र्याची अज्ञेय अपेक्षा वा आसक्ति उद्भूत होते, ती भागविण्यासाठा प्रचलित परिस्थितीच्या अनुरोधानें उपलब्ध साधनांचा उपयोग करण्यात येतो बौद्धिक तृषा असते ते गणिकांना आश्रय देतात आणि केवळ लैंगिक भूक लागते ते वेश्यांना, सामान्य लोक शेजारींपाजारी ( क्र ७६२, ७९५ ) हौस भागवतात, कोणी वृद्धेकडे धाव घेतात ( क्र १९ ) तर कोणी वलिग्रामर्दनात ( क्र ४४ ) सुरतसर्वस्व शोधतात भ्रमराच्या दृष्टांत घेऊन ( क्र १३९ ) कवि सांगतो कीं भ्रमर फुला फुलाचा अनुनय व परित्याग करतो हा दोष फुलाचा, त्याच्या नीरसतेचा। भ्रमराचे हें चापल्य पाटला नष्ट करील असें कलीला ( क्र ६१९ ) वाटते पण तसें कधी होत नाहीं सभोगाच्या वेळीही मनातल्या मनात तुलना चाललेली असते व तीमुळें विमनस्कता मात्र (क्र ४४) पदरीं पडते पुरुषाप्रमाणें स्त्रियाच्याही चित्तात विकल्प निर्माण होतो आणि व्यभिचारासाठी त्या नाना निमित्तें (क्र. १०३, १०४, १५९, २३७, ३२८, ८०८, ८१५, ८७४, ८७५, ८८१, ८८२, ८८३ ९५४,९०६,९८१) व साधि शोधून काढतात त्यावर स्त्रीविदातल्या अनेक श्रुतिकथा आधारलेल्या आहेत माचीवरून पिकाची राखण करीत असताना कोणा मार्गपृच्छा केली ( क्र ८१५ ) किंवा कोणा रस्त्यात अडविलें (क्र ९५१) तर त्यातही कोणी धन्यता मानतात. महाभारताच्या वनपर्वातील द्रौपदी-हरणपर्वांत जयद्रथाच्या आज्ञेवरून कोटिकास्यानें द्रौपदीला अडवून प्रश्न विचारलेला आहे यात स्त्रीचा बहुमान आहे असा या प्रसंगावरून डॉ मायर निष्कर्ष काढतात, तो मात्र अप्रासंगिक आहे कोणाचा पति स्थविर (क्र १९७, २९३) असतो तर कोणाला स्वभर्त्याविषयी वैराग्य वाटू लागतें ( क्र २६७ ) म्हणून त्या व्यभिचाराला प्रवृत्त होतात, कोणाला रसिकाच्या सहवासाची ( क्र ३२८ ) हौस असते तर कोणा शेटाणीला हमालाच्या ( क्र. ५५४ ) आणि कोणा आर्येला हलिकाच्या ( क. ३६० ) स्त्रीचें परपुरुषाच वेड क्र. ८८१ व ८८२ या गाथात पराकोटीला गेलेलें आढळतें एकान्तरस पुरुष सद्गुणी स्त्रियानाही प्रिय वाटत नसावेत ( क्र ४८ ) असं दिसतें कारण एकनिष्ठाना नाहीं दोषाची जाणीव, नाहीं गुणाची पारख। बारा गावातलें पाणी प्याल्याशिवाय पुण्याच्या पाण्याची माधुरी कशी कळणार?

गाथासप्तशतीत व्यभिचार प्रसंगाच्या अनेक गाथा आहेत त्या मानानें पति व्रताचें माहात्म्य कथन करणाऱ्या गाथा फारशा नाहीत, हे खरें आहे पण हा लोकगीतांचा धर्मच आहे तरीही व्यभिचाराचे समर्थन क्वचितच केलेले आहे आणि जेथें केलें आहे तेथें तो परिस्थितिजन्य आहे व्यभिचाराचा निषेधही केलेला आहे प्रथमोद्गतशीलखंडनाची पामरानाही लज्जा ( क्र ११८ ) वाटलेली आहे कुलस्त्रीवर वैषयिक प्रेम करणें हें पाप आहे याची गाथासप्तशतीला जाणीव ( क्र १८३ ९७० ) आहे अनीतीचा प्रसार होऊ नये म्हणून ग्रामाधिपान्यानें पहारेकरी ( क्र ९५६ ) नेमलेले आहेत स्वैरिणीला हद्दपार करून कुग्रामात वदात ठेवलेलें आहे

व्यभिचार हा मनुष्यमात्राच्या अतर्यामात अनादिकालापासून मुरलेला ताप आहे आसक्ति जागृत होते तेव्हा जणू त्याचेंच रोंव भरतें व तें जीवनाचा धरकाप करतें

## वेश्या —

गाथासप्तशतीत वेश्यांचे अनेक उल्लेख आलेले आहेत, पैकी नामपूर्वक असे उल्लेख फारच थोडे ( क्र १५६ ४७४, ८८४ ) आहेत समाजपरिस्थिति व साहित्यप्रवाह यांच्या अनुरोधानें उत्तरकालीन टीकाकारांनी आणखी अनेक गाथांच्या नायिकांना वेश्या ठरविलेले आहे, त्यापैकीं काहीं या सदरात समाविष्ट येण्यासारख्या ( क्र २१, ५३, ५६, ८८, २०३, २११, २८७, ७१०, ७१३, ८८४, ९३९ ) आहेत क्र १३४ या गाथेंत कुट्टनी व क्र ९३९ या गाथेत विट यांचा उल्लेख आलेला आहे टीकाकारांनीं या सदरात आणखी अनेकांना मांडलेलें आहे

वेश्याव्यवसाय हा जगातला जुन्यात जुना व्यवसाय असे समाजशास्त्रज्ञ सांगतात विनभांडवली, फावल्या वेळात अल्पायासानें कोठेंही करता येण्या सारखा, पुरेसा विदागीचा असा हा एकच व्यवसाय स्वैरिणींना उपलब्ध आहे आणि कुट्टिनी व विट यांचा व्यवसाय हा दुसरा ( The Second Oldest Profession Dr Reitman ) कारण ते विदागीसाठीं वेश्या व भुजग यांची भेट घडवून आणण्याकरितां जरूर त्या त्या तजविजा करतात.

ऋग्वेदात सामान्य वेश्येचा उल्लेख साधारणा ( १ १६७ ४ ) या संज्ञेनें केलेला आहे गुप्तपणे गर्भपात करणाऱ्या व्याभिचारिणी ( २ २९ १ ), नवऱ्याचा घात करणाऱ्या स्वैरिणी ( ४ ५ ५ ) आणि भ्रात्याचा आधार नसल्यामुळे ( ऋ १·१२४ ७ अथव १ १७ १ ) चरितार्थासाठा देहविक्रय करणाऱ्या कुमारी व विधवा याचेही उल्लेख वैदिक वाङ्मयात आलेले आहेत. वैदिक समाजात वेश्याना प्रतिष्ठा नाही समाजात सुसंपन्न व सुसंस्कृत वर्ग निर्माण झाल्यानंतर गणिकाचा प्रतिष्ठित वर्ग अस्तित्वात आला महाभारतात वेश्यांच्या विलासाचे व धिंगाण्याचे अनेक उल्लेख आढळतात बौद्ध काळात व वाङ्मयात वेश्याना प्रतिष्ठा प्राप्त झाल्याचें दिसतें वाराणसाची सुलसा ही नगरशोभना ( जातक ३ ४३५ ) मानण्यात येइ तिच्या परिवारात पाचशे वर्णदासी असत एका रात्रीला एक हजार मुद्रा असा तिचा भाव होता वैशालीची विख्यात गणिका अबपालिका उर्फ आम्रपाली ही जशी सुदर तशाच गायन-नर्तन-वादन प्रवीण होती तिच्यामुळें वैशालीची भरभराट होत असलेली पाहून श्रेणिक बिंबिसारानें राजगृह येथें सौंदर्यस्पर्धेचा मेळावा भरविला आणि सौंदर्यसम्राज्ञीपद मिळविलेली राजकन्या शालवती हिला वेश्यापण दिले ती सुदर तशाच सुसंस्कृत होती, एका रात्रीला शभर मुद्रा असा तिचा भाव होता अशा गणिकांच्या निवासामुळे नगरीची शोभा येइ व सरकारला करभार मिळे सुदर स्त्रियावरून समाजात संघर्ष निर्माण होऊ नये म्हणून लिच्छवी जमातीत त्याना विवाहबद्ध होण्याची मनाइ करण्यात येइ आणि अतिसंगविधानें त्या सर्वांना उपभोगाला उपलब्ध ठेवण्यात येत असत बौद्ध वाङ्मयात कुटणखान्याचें ( वेसियाघर ) आणि तांबूलखान्याच्या संप्रदानानें प्राप्त होणाऱ्या हीन वेश्याचे( जातक II ३०९, ३७९ )हा उल्लेख आढळतात गणिका श्रीमंतासाठी आणि वेश्या श्रमिकासाठी ' कौटिल्यानें अर्थशास्त्रात वेश्यानियंत्रणाला एक प्रकरण (२ २७) दिलेलें आहे नियतक गणिकाना राजाश्रय असे, कलागुण रतिगुण, यौवन व सौंदर्य यांच्या अनुरोधाने त्याची निवड करण्यात येत असे त्यांच्या शिक्षणाचा खर्च राजकोषातून करण्यात येत असे राजछत्र धारण करणें, शकुनाचा सुवर्णकुंभ वाहणें आणि चवरी ढाळणें हीं दरबारीं कामें त्याचेकडे सोपविलेली असत. भोगभम गणिकाचा वर्ग सरकारी कोठींत किंवा मुदपाकखान्यात लावण्यात येत

असे रूपजीवा वेश्याना दरमहा दोन दिवसाची प्राप्ति सरकारात कर म्हणून भरावी लागे वात्स्यायनानें कामसूत्रात वेश्याना एक संपूर्ण अधिकरण दिलेलं आहे वेश्यानी आपली आकर्षकता व उपयुक्तता आणि गुणसंपन्नता व सुसंस्कृतता वृद्धिंगत व संवर्धित करण्याविषया त्यात विस्तृत विवेचन केलेलें आहे मृच्छ कटिकाची नायिका वसंतसेना ही तर संस्कृत साहित्याचें भूषण मानलेली आहे तेथें वेश्याची तुलना स्मशानसुमनाशीं केली असून त्या वर्जनीय आहेत असें सांगितलेलें आहे आपण वसंतसेनेवर आसक्त झालों हा आपल्या चारित्र्याचा दोष नसून यौवनाचा आहे असें चारुदत्त सागतो तरी तिच्या किंवा त्याच्या बद्दल वाचकाला किंवा प्रेक्षकाला घृणा वाटेल अशी नाटकाची मांडणी नाहीं दामोदरगुप्तानें कुट्टनीमतम् आणि क्षेमेंद्रानें समयमातृका हे ग्रंथ तर कुट्टनी व वेश्या या विषयावर लिहिलेले आहेत प्राकृत व संस्कृत वाङ्मयाची निर्मिति होत होती तोंवर गणिकाचा किंवा वेश्याचा दर्जा भ्रष्ट झालेला नव्हता असं दिसून येतें मग हा परिणाम वाङ्मयाच्या जनतापराङ्मुखतेचा असो किंवा सामाजिक मूल्यांच्या भिन्नतेचा असो दरबारी रिवाजाच्या प्रभावाचा असो किंवा तोंवरच्या तथाकथित फिरंग रोगाच्या अभावाचा असो वेश्याच्या बाबतीत हिंदी समाजाची वृत्ति आरंभापासून सहिष्णुतेची आहे, हल्ली जी घृणा दिसते ती अगदीं अलीकडची आहे आणि सुशिक्षिताव्यतिरिक्त अन्यत्र तीही विशेष तीव्र नाहीं

वात्स्यायनानें वेश्यांचें वर्गीकरण केलें आहे तें असें (१) कुम्भदासी चरितार्थासाठीं हलक्या कामें व फावल्या वेळा वेश्याव्यवसाय करणारी, (२) परिचारिका सेवाशुश्रूषेपासून सुरवात करून धन्याची रखेली झालेली, (३) कुलटा नवरा असलेली, त्याच्या धास्तीनें गुप्तपणें परगृहा व्यवसाय करणारी, स्वत चें कुल सोडून अन्य कुलाचा आश्रय करणारी, (४) स्वैरिणी नवरा असलेली त्याला न जुमानता स्वगृही व परगृहीं व्यभिचार करणारी, पती शिवाय पाच जणाशी संबंध ठेवणारी, (५) नटी व्यवसायानें नटी, संधि साधेल तेव्हा निरडक पुरुषाशी संबंध ठेवणारी (६) शिल्पकारिका सक्त दूर्शनी हस्तव्यवसाय करणारी, छपून व्यभिचार करणारी, (७) प्रकाशविनष्टा जिची व्यभिचारी वृत्ति लोकप्रसिद्ध आहे अशी (८) रूपजीवा मध्यम

दर्जाची वेश्या, जिच्यापाशी स्त्रीत्व व रूप एवढीच सामुग्री आहे, (९) गणिका शील रूप-गुण संपन्न, सन्मान्य, सुसंस्कृत आणि नीतिनियम पाळणारी

वेश्या कोणाला म्हणावं? पात्रापात्र विचार न करता संप्रदानार्थ संभोग देते ती वेश्या, अशी व्हार्टनची व्याख्या (Law Lexicon) आहे कायद्याच्या काटेकोर दृष्टीनें ती बरोबर आहे सामान्य व्यवहारासाठी या व्याख्येला "व्यवसाय म्हणून संप्रदानार्थ" अशी पुस्ती जोडली पाहिजे, नाही तर कलवठीला किंवा चर्चात खासगी व हासिसाठी, चार पैसे असावेत म्हणून आडवाटेनें जाणाऱ्या स्वैरिणींचाही या वर्गात समावेश करावा लागेल कोणत्या वर्गातील स्त्रिया या व्यवसायाचा आश्रय करतात? मिशनरी लोगन यानें लंडन येथील वेश्याव्यवसायावर लिहिलेल्या The Great Social Evil या अथांतील याबाबतचें अवतरण डॉ हॅव्हेलाक एलिसनें दिलें आहे (१) घरात किंवा दुकानात हल्कीं कामें करणाऱ्या मोलकरणी, म्हणजे वात्स्यायनाच्या कुंभदासी, (२) कारखान्यातल्या कामकरणी म्हणजे वात्स्यायनाच्या शिल्पकारिका, (३) भुजंग, कुंटिणी व विट याच्या भुलथापानीं फसलेल्या खेडवळ स्त्रिया (४) आळशी, उथळ, उन्मत्त, उपाशी स्त्रिया, स्वैर प्रवृत्तीमुळें चरितार्थासाठीं परिश्रम करण्यास प्रतिकूल किंवा व्यभिचाराविषयीं नि संग असणाऱ्या स्त्रिया सामान्यत याच वर्गातील स्त्रिया आर्थिक किंवा नतिक दौर्बल्यामुळ या व्यवसायात पडतात आपल्याकडे आहे तसा वेश्याचा आनुवंशिक वर्ग फक्त जपानमध्यें आहे नटी, नर्तिका, व गणिका या आपआपल्या पेशासाठीं ल्हानपणापासून शिक्षण घेतात

पुरुष वेश्यागमन का करतात? कारण कुटुंबात उपलब्ध असा सवर्धित कलागुणाचा अविष्कार विदग्ध (क्र ८८४) गणिकाचे ठाया (क्र ‐७३) सुसपन्नाना व सुसस्कृताना मित्राच समवेत अनुभवता येतो कारण वेश्या या कुलस्त्रियाहून अधिक आकर्षक (क्र १५४) असतात, बाह्योपचारकुशल (क्र. ७५३) असतात गणिक व वेश्या याना ल्हानपणापासून मोहनतंत्र शिकविण्यात आलेलें असतें सौंदर्य सामान्य असलें तरी त्याचे अगीं निर्लज्जपणा (क्र ८८५) भरपूर असता आणि कोणाकोणाला, नव्हे अनेकांना (क्र ९८७), त्याचीच हौस असते क्र ११६ व ८८४ मध्यें त्याच्या कैतवयुक्त रतिकौशल्याची प्रशसा केलेली आहे शृंगारदीपिकेंत (क्र ८) सांगितलें आहे शय्या

वत्समसुरते तुरगारोहेव पौरुषे भावे। क्लीव बधसुरते---" पुरुषाच्या लैङ्गिक अपेक्षा व विकृति त्या भागवतात धनार्जन हाच वेश्यांचा पुरुषार्थ गणिकाना विट व वेश्याना कुट्टनी गिऱ्हाइकें आणून देतात विट म्हणजे नुस्ता दलाल नव्हे नाट्यशास्त्रात भरत सांगतो "वश्योपचार कुशलो मधुरो दक्षिण कविः। उहापोहक्षमो वाग्मी चतुरश्च विटो भवेत्।" कामसूत्रात (१-४-४५) वात्स्यायन् व कलाविलासात (९ ३९) क्षेमेंद्र सांगतो की आरंभी सुसपन्न व सुसंस्कृत असलेला व तारुण्यात मर्न उपभोग भोगलेला, भागलेला, भोगी विभवक्षया नंतर चरितार्थासाठी या व्यवसायाचा अवलंब करतो, तो अशी सेवा करीत असला तरी अंगी कलाज्ञान असल्यामुळें नागरिकांच्या सभेत त्याला सन्मानानें वागविण्यात येई यशोधर सांगतो, विटति म्हणजे परस्पराना निरोप सांगतो तो विट क्र ९३९ या गाथेंत विटाचा व त्याला अनायासें मिळत असलेल्या दलालीचा उल्लेख झालेला आहे क्र ३३ या गाथेंत मित्रमंडळात निस्तेज होणाऱ्या सतेज व कलापूर्ण चंद्राचा उल्लेख आहे तो विटाला अनुलक्षून असावा सामाजिक संमेलनात विट भाग घेत असत (साहित्यदर्पण ३ ४१) क्र १३४ या गाथेत कुट्टनीची धावच्याशीं तुलना केलेली आहे, जितकी मार्मिक तितकीच हृदयद्रावक "कुथ्यति छिनति नाशयति क्षीणा शीलम्" ती बुद्दिनी संप्रदान (क्र ६८) म्हणजे संभोगद्रव्य गाथासप्तशतींतल्या वेश्या कधीं हें आगाऊ घेतात (क्र २५१) तर कधीं संभोगोत्तर (क्र ६८) कुट्टनीमतातील उल्लेखा-वरून (क्र ३६८) दिसतें कीं संभोगद्रव्य म्हणजे ग्रहणक आगाऊ घ्यावयाचें आणि सुरतकौशल्याबद्दल बक्षीस म्हणून संप्रदान संभोगोत्तर मागावयाचें संप्र-दानही आवश्यक मानण्यात येत असावें असें दिसतें हा आपला व्यवसाय असल्यामुळें पुरुष कसाही कोणत्याही वर्गांतला असला तरी त्याला टाळू नको असा उपदेश वेश्यामातेनें दुहितेला केलेला (क्र ९२७) आहे अण त्या आपल्याकडे न आलेल्या भोगी सपन्नाची नोंद ठेवीत (क्र ४७४) असत, व्याधिता गर्भिणी व्यग्रा राजकर्मपरायणा' अशा वेश्याना गिऱ्हाइक नाकारू हक्क होता असें याज्ञवल्क्य स्मृतीवरून दिसतें

क्र. २१ या गाथेंत वेश्यांच्या व्यवसायाचें रहस्य विशद केलेलें आहे. "साजशृंगाराला किंमत नाहीं, घटका साधली पाहिजे ती हुकली की

आसक्ति शिथिल होते आणि चित्तांत विकल्प येतो." वेश्यामातेच्या या उद्गारात अनुभवाचें सारसर्वस्व सांठविलेलें आहे. मुलगी तरुण आहे, सुंदर आहे, कलावती आहे, पण अल्लड आहे, नवशिकी आहे. या व्यावहारिक खाचाखोचा तिला कोणी तरी शिकविल्याशिवाय कशा उमगणार ! म्हणूनच वात्स्यायनानें नियम घालून दिला आहे कीं तरुण वेश्येनें हरघडीला मातेचा सल्ला घ्यावा आणि तिच्या आज्ञेचें उल्लंघन करूं नये. मुलीला प्रसाधनाचें महत्त्व अधिक वाटलें तर तिच्या आईला घटकेचें महत्त्व विशेष वाटलें. आसक्ति तीव्र आहे तोंवर प्रसाधनाकडेच नव्हे तर रूपगुणाकडेही पुरुषाचें लक्ष जात नाहीं. आसक्ति ओसरल्यानंतर त्याची विचारशक्ति जागृत होते, तो तुलना करतो- बिदागीबद्दल घासाघीस करून शक्य तर टाळाटाळीचा प्रयत्न करूं लागतो. म्हणून औत्सुक्याच्या उमळीवरचा फेस विरला नाहीं तोंवर बैठकींत हजर झालेंच पाहिजे असा आदेश तिनें कन्येला दिला मनुष्यस्वभावाचें ज्ञान आईला होतें व तें तिनें अनुभवानें मिळविलें होतें विशेष विचक्षण अशा विशिष्ट व्यक्तींचे बाबतींत कधीं कधीं व्यावसायिक अनुभवामुळेही फसगत होते असें क. ७३ या गाथेवरून दिसून येतें. नायक निर्धन होता तेव्हा वेश्यामातेनें त्याला नकार दिला होता, नंतर त्याला वैभव प्राप्त झालें, तेव्हा त्याला आवा, ह करण्याविषयीं ती दुहितेला प्रोत्साहन देऊ लागली. यावर कन्या म्हणते, ही वंचना आहे, हा अपराध आहे, त्यातलें कैतव त्याच्या लक्षात येईल आणि तें त्याला रुचणार नाहीं. कन्येचे हे उद्गार अंतःकरणापासून निघालेले आहेत आणि ते खरेही आहेत. मग तिच्या मातेनें असें वैर साधण्यासारखें वर्तन कां केलें ? कारण तिनें मनुष्यस्वभावाचें ज्ञान निरीक्षणानें मिळविलें होतें आणि तें अनुभवाच्या कसोटीवर पारखून ठेवलें होतें वात्स्यायनानें सांगितलें आहे कीं आमंत्रण आल्याबरोबर स्त्रीनें घाईघाईनें त्याचा स्वीकार करू नये, कारण अनायासानें प्राप्त होणाऱ्या स्त्रीबद्दल पुरुषाला आदर वाटत नाहीं. मुली, त्यानें शिटी वाजविल्याबरोबर वासोळ्याचा गोंडा घोळीत त्याच्यामागे धावावयाला तू काय सामान्य कुत्री आहेस ' ही वंचना त्याच्या ध्यानांत आली तर कसें होईल असें तू मला विचारतेस ' पूर्वीच्या वृत्तांताची आठवणही होणार नाहीं अशा प्रकारें तू त्याला रमविलें पाहिजेस एवढा खर्च करून'

तुला सर्व कला शिकविल्या त्या काय हा प्रश्न ऐकण्यासाठीं ? कोणतीही वतावणी जमली नाही तर माझ्या लाष्टपणाची व लोभी स्वभावाची हवी तेवढी निंदा कर वेश्यामातेनें अंत:करण कठोर व वृत्ति लोभी ठेवावी असें वात्स्यायनानें सांगितलेंच आहे शिवाय बिदागीचा आग्रह धरावयाचा नाही तर हा व्यवसाय कशाला करावयाचा आणि आपल्या इतमामाला लागणारा खर्च कसा भागवावयाचा ?

वेश्येचें बिदागीशिवाय चालणार नाहीं, हें खरें, पण ती तिनें घासाघीस करून ठरवावयाची नसते, तर पुरुषाला संतुष्ट करून पण त्याच्या मनोवृत्तीचा अंदाज अगोदर बांधता आला पाहिजे, नाही तर फसगत व्हावयाची क्र १८ मध्यें वेश्यामाता थोडें गोड, थोडें तिखट बोलून बिदागी मिळविण्याचा प्रयत्न करीत आहे मुलीनें तुम्हाला नाखूष तर नाहीं ना केलें ? माता म्हणते मला आपली शंका आली आणि वाटलें का म्हणून तुम्ही हात आखडता घेतला असेल तसें काही नाहीं ना ? मग हें पाहा संतुष्ट झाल्यानंतर बिदागी न देण्यात शोभा नाहीं आणि फार ताणून धरलेंत तर तुमची शोभा होण्याला वेळ लागणार नाही! निर्वाणीचं शस्त्र निघाल्यावर कोणत्याही सभ्य नागरिकाची काय हिंमत लागून गेली आहे की या महाताळींची मागणी तो पुरी करणार नाही ?

क्र २०३ या गाथेंत गुणगर्विता गणिकेचे उद्गार आहेत ती म्हणते, नायकाचा काय दोष ? माझ्याच अगीं गुण नसावेत छे, छे, असें कसें म्हणता येईल तुमचे गुण साऱ्यांना माहीत आहेत आणि त्याची रसिकताही विख्यात आहे गुणांना किंमत राहिलेली नाहीं गुणाची किंमत कशी करता येईल बरें ? आम्ही जी किंमत देता ती आमची किंमत, तुमची नव्हे त्याची बायको गुणी असेल ? तशी असणं संभवनीय आहे तसं पाहिलें तर कोणाच्या ल्याऱ्या बायका गुणी नसतात ? त्या गुणी नसतात म्हणून का कोणी तुमच्याकडे येतात ? ही एक तहान आहे, तोच आहे आद आहे आलेल्याला संतुष्ट करण्यात तुम्हीच कुचराई केली असेल आणि आता वसऱ्या आहात विचार करतं का आणि बस !

वेश्येनें पुरुषाला संतुष्ट केलें पाहिजे, हें खरें, पण हें कर्म किती कठिण आहे? त्यासाठीं त्या बिचाऱ्याची काय दुर्दशा होते याची आपल्याला कल्पनाही करता येणार नाहीं क्र १८ मध्यें ग्रामप्रधानानें वेश्येची ओढाताण केलेली आहे क्र ५, मध्यें शिरापासारख्या नाजूक नायिकेच्या सुरतहावदग्धानें चुरगळा केलेला आहे हत्ति असता तर खड्गप्रहार केला असता, मूर्ख असता तर टाकून दिला असता पण हे पडले वरिष्ठ वर्गातले, स्वत ला विदग्ध मानणारे! महामूर्ख परवडला, कानउघाडणी केली म्हणजे मान खालीं घालून निघून जाईल, पण हे पडले पढतमूर्ख! निषेध केला तर झालेल्या सुरत व्यवहारावर सशास्त्र व सटीक प्रवचन सुरू करायचं!

अडाण्यानीं चुरगळलेल्या वेश्यांचें काय होतें? त्या बाजारबसव्या होतात, योग्यायोग्यतेचा विवेक करू शकत नाहीं क्र २२७ मधील उद्गार वेश्यामातेचे आहेत असें गृहीत धरून पहा कोणी धनिक वश्येकडे गेला तो हल्कट वायकाकडे जातो असें तिनें ऐकलें होतें म्हणून ती त्याग नाकारणार होती तिचा मनोदय ओळखून तिची आई म्हणते, तो कसा का असेना, आपल्याला फक्त त्याचें धन हवें आहे! पोटात निखारे घालणें म्हणतात तें याला

अशा लोभी व कनिष्ठ वेश्या बहुधा त्यांच्या मातांपेक्षाही हीन अशा कुटिणींच्या हातीं पडतात त्या कुटिणीचें आयुष्य तरी सुखाचें असतें का काय? मुळींच नाहीं त्याची अवस्था क्र १३४ या गाथेंत वर्णिलेली आहे

या व्यवसायाचें व तो करणाऱ्या व्यक्तींभोंवतीं घोंगावणाऱ्या परोपजीवि व हीन व्यक्तींचें जीवन व त्याचें पर्यवसान भीषण आहे हें खरें, तरीहि वेश्यांचें प्रेम ही चीज अजब आहे यात शंका नाहीं क्र १५६ ही गाथा खुद्द हाल सातवाहनाची आहे त्यानें येथें वेश्याच्या प्रेमाची व त्याच्या कैतवपूर्ण सुरताची प्रशंसा केलेली आहे वेश्याच प्रेम नसें ल्वाडीचें, तशाच स्वाची प्रशंसाहि कौटुंबिक जीवनाच्या मर्यादामुळें गृहिणी परतंत्र असत तिच्या प्रेमात लवाडी, नि शकता विविधता व आवश कशा असणार?

वेश्यांचें अस्तित्व समाजजीवनाला अपकारक आहे का उपकारक? वैयक्तिक जीवनाला नि संशय अपकारक पण समाजशास्त्र सांगतात की वश्यावर्ग हा

समाजजीवनाला उपकारक आहे, कौटुंबिक स्वास्थ्य व वैवाहिक जीवनाचें स्थैर्य याच्या संरक्षणासाठीं प्रतिष्ठेच्या सीमेवर उभारलेली ही संरक्षक फळी आहे।

## स्त्री-सौंदर्य .

सौंदर्याचा विचार दोन अगांनीं केला पाहिजे स्थिर ( Static ) व चल ( Dynamic ) अवयव व रूप हीं सर्वांनाच असतात, त्याची बांधणी भिन्न असते, कोठें ढबदार, कोठें बेढब, कोणी सुस्वरूप असतात व कोणी कुरुप बांधणीच्या दृष्टीनें सौंदर्याचीं गमकें देशोदेशा व युगायुगीं भिन्न असतात जीवनाच्या गतीमुळें व भावनाच्या प्रेरणेमुळें चल सौंदर्याचा आविष्कार प्रत्ययास येतो.

शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध याचें ग्रहण हीं ज्ञानेंद्रियाचीं कार्यें श्री राजवाडे ( नासदीयसूक्तभाष्य पृ ७०२ ) सांगतात "हे पाची विषय स्पर्शमयच आहेत त्याचें स्पर्शनकर्म त्वक्स्पर्शाकडून चक्षुस्पर्शाकडे उत्तरोत्तर अधिकाधिक सूक्ष्म बनत जातें म्हणून मूळ स्पर्शनाची सुरुवात चक्षूचे ठिकाणा रूपदर्शनात होते "

प्रेक्षकाला प्रथम रूप दिसतें आणि त्यात ही कान्ति, शरीराचा वर्ण ,

गाथासप्तशतीला दोन वर्ण माहीत आहेत गौर व श्याम गौरव या शब्देला गौरता अभिप्रेत आहे असें भासत असलें तरी गाथासप्तशतींत उल्लेखानुसार श्यामला बहुसंख्य आहेत गौर म्हणजे किती ? अधारात ज्योतीसारखा तेव णारा ( क्र ४१५ ) आणि चादण्याशीं एकरूप ( क्र ६०७ ) होणारा उल्लेखित गौरी गारीपान आहे आणि अनुल्लेखित काली श्यामल गोरी जराशी रागाला आली की तिचे गाल लाल ( क्र १९२ ) होतात, आणि श्यामला ? वाटतें, जणू गडद मेघावर कोंवळे किरण प्रसारले आहेत, किंवा अतर्यामातली वीज चमकती आहे ' कोमलता दोघींचेंही अगीं आहे, शिरीषासारखी ( क्र ५६ ), अल्प आयासानें अवयव थरकावे एवढी ( क्र ५२ ), किरणानाही संभ्रम पडावा की अधिक कोमल कोण ( क्र. २६९$_{1}$), चमत्कृती चमत्कार! आणि श्यामलेची कोमलता ( क्र ९६३ ) तर अद्वितीयच।

सौंदर्य न्याहाळताना प्रथम दिसतें आनन तें तिलकानें ( क्र १७९ ) सुशोभित असतें गाथासप्तशतात मुखाचा मुख्यतेंकरून चद्राची व सख्येच्या अनुरोधानें त्या खालोखाल कमलाची उपमा दिलेली आहे म्हणजे गाथाकाराचा आवडता मुखाचा आकार पूर्ण चद्रासारखा वर्तुलाकार किंवा उमलत्या वा अधोमुख कमलासारखा अडाकृति आहे सौंदर्य शास्त्रानुसार स्त्रियांच्या मुखाचे हेच आकार अभिजात मानण्यात येतात सामान्यत वर्तुलवदना सासारिक जीवनाशा सत्वर समरस होतात आणि कमलानना बौद्धिक जीवनाशीं काना तल्या डुगला जडवलेल्या इद्रनीलाची कान्ति कपोलावर प्रकटली ( क्र ३०२ ) किंवा अश्रूबरोबर काजळाची छटा गालावर ओघळली का मृगाङ्काची उपमा देण्याची सोय चद्रामुळें होते आणि मुखाचा वर्ण ( क्र ९, १०, ३७० ), मधुरता ( क्र ३४३ ), वदनाचा परिमल ( क्र ७८ ) व निश्वासाचा सुगध ( क्र ३६६ ) याची संगति कमलामुळें लावता येते हेलावणाऱ्या कमलाभोंवतीं भ्रमर, त्याचप्रमाणें प्रघूर्णत शीर्षाभोंवता ओघळलेले अलक ( क्र ७८ ) डोलतात क्र ९६६ च्या नायिकेचें मुख चद्राहून सुदर आहे आणि क्र. ३६६ च्या नायिकेचे कमलाहून कोमल क्र १३ व ६४५ आणि क्र. ४९० व ५१० या गाथामध्य वाणलेलें मुखाचें चल सौंदर्य तुलना करून पाहण्याजोगें आहे

गाथासप्तशतात नायिकाचे केश काळेभोर ( क्र ७८ ) व लाब ( क्र ५५५, ५६६ ), मऊ ( क्र २४९ ) व सुगधित ( क्र ५७२ ) आहेत ते फणीनें विंचरून ( क्र. ३८० ), मध्यें भाग पाडून ( क्र ६८२ ) त्याचा अबाडा (क्र.७८,६१४) घातलेला आहे यमुनेच्या लाटेवर फेसाचा पुजका असावा तसा त्यावर सुगधी गजरा ( क्र ९९२ ) चटविलेला आहे क्र. ५७ च्या नायिकेचे केश भुरभुरीत असावेत आणि क्र ६१४ च्या नायिकेचे कुरळे विरहदिनानी केंस विंचारावयाचे नाहात ( क्र २७३ ) असा आचार प्रचारात होता साहजिक आहे पतिव्रतेचें ( क्र ८५ ) यौवन, विभ्रम व सौंदर्य हा पतीकराचर प्रवासाला जावयाचें, मग केश विंचरावयाचें कशाला व कोणासाठीं ? का ते विस्कटलेल्याचें आप्ताच्या ध्यानीं येऊ नये म्हणून हा रिवाज पडला होता ? आवशपूर्ण चुबन घेण्यासाठीं ( क्र २१३ ) किंवा रुसवा नष्ट करण्याकरितां मदिरा पाजण्यासाठीं ( क्र ५५० ) केश धरून प्रियेचें मुख उत्तान करण्याची

प्रणयी जनाना फार हौस असावी गाथासप्तशतातील नायिकाचे गाल गुबगुबीत (क्र ४३९, ६३९) व गोरेपान (क्र १८२, ३००) आहेत, रुसण्यानें ते लाल (क्र १९२) होतात त्याची कान्ति आरसपानी (क्र. ११४, ८१८) आहे इतकी, की आजूबाजूला वावरणाऱ्या व्यक्तींचीं प्रतिबिंब त्यावर दिसतात, अर्थात् तीं जवळून पाहिल्याशिवाय दिसत नाहीत आणि म्हणून त्याचें चुंबन घेतलें गेलें म्हणजे नायिकेला जणू त्या प्रतिबिंबाचीही चाहूल लागते। श्रमानें (क्र ११४) तसेच भावनेनें (क्र ९३२) ते ओले होतात आणि त्यावर चंद्रबनुष्याची शोभा (क्र ८०२) प्रकट होते हर्षानें ते विकसित (क्र २३, ८५०) होतात व मत्सरानें खोल (क्र ३८०) जातात प्रियकर त्यावर दन्तमण्डलें (क्र ९६, ३००, ९७१) उमटवितात आणि केव्हा केव्हा प्रातीमुळ स्वेदाचें (क्र ९३२) अगर मत्सरामुळें सवेदनाचे ऐवजी सवतींच्या ठायां वेदनाचें सक्रमण (क्र ९७५) होतें। ह्या नायिकाचे अधर आरक्त (क्र ८०२,९२७) व भरदार (क्र ९८२) आहेत बिंबाधराची उत्तरकालीन उपमा उत्तरभागातच आलेली आहे शिञ्जिनी जुळवून समोरासमोर ठेवले ल्या धनुष्याची, कामशराचा उल्लेख आलेला असूनही कामधनुष्याच्या जोडीची उपमा गाथाकाराना कशी सुचली नाही कोण जाणे, कदाचित् त्या काळात दुहेरी बाकाचीं धनुष्यें वापरात नसावात, म्हणून क्र १०६ या गाथेच्या नायिकेनें ओठाला अधर राग लावलेला आहे सहृदर्शना वाटतें तितकी ही प्रथा अर्वाचीन नाही मात्र पिपासाकुल प्रियकराला त्या केवळ अधर राग अर्पण करीत नाहीत। अधर–खण्डन (क्र ७८, ७१३, ७९१, ८८०, ९९५) अधर–चुंबन (क्र ७१३, ८२१, ९२७, ९८४), अमृतोपम अधर–रस–ग्रहण (क्र २१३, ८२१) व फिरा होईर्यंत अधर–शापण (क्र ९२७, ९८४) या प्रणयी जनाच्या आवडत्या प्रणयलीला आहेत अधरायें आवाहन (क्र. ८२१) व स्फुरण (क्र ९१०) आणि मगाग निव्हेचें स्पर्शन (क्र ७९५) या लीला करणाऱ्या सूक्ष्म निरीक्षणाच्या द्योतक आहेत या नायिकाच्या भ्रुकुटि धनुष्याकार (क्र. ५०४) आहेत आणि रुसत्या असता भिवईवर त्या अशी [illegible] पाठी चढवतील की.वाटतें—

गाथाकर्त्यांनी सर्वांत सूक्ष्म व सहृदय निरीक्षण व वर्णन जर कशाचे केले असेल तर तें नायिकांच्या नेत्राचें व नजरेचें

या नायिकाचे नेत्र विशाल (क्र ४७०, ४८०, ८४६, ९१४, ९१७, ९६७), आकर्ण (क्र ३३८, ८१७) व तेजस्वी (क्र ७५८) आहेत नायिकेला नेत्रावरून अभिधान फक्त एवच दिलेलें आहे मृगाक्षी (क्र ३००, ४६६, ९४४) त्यावर लाब पापण्या (क्र ४७० ) आहेत आणि जणू त्याना धार यावी म्हणून त्यात अजन (क्र ८६४ ) घातलेलें आहे त्याचें बाह्याग धवल (क्र ८१७) आहे आणि खेद (क्र ८३२ ) व मद (क्र ५०४ ), मत्सर (क्र ९०२, ९३५ ) व मद्य (क्र ८२० ) यामुळें त्यावर क्वचित् आरक्त छटा उमटते त्याचें अतरग काळभोर (क्र ४७०, ८१७) किंवा नील (क्र ५, १४०, १५०, ८०२, ८२६, ८४४, ८४६ ) आहे सामान्यत ज्यांच्या नेत्राचें अतरग काळभोर असतें त्याचें अतर्याम स्वच्छ असतें तरीही निळा बुबुळें अधिक आकर्षक दिसतात हेंच खरें अशा नेत्राची नजर कधीं चचल व तीक्ष्ण असून मन्मथाला प्रेरक (क्र ७१८ ) असते, तर कधीं ती विलासी जागरणामुळें (क्र १४८, ९०० ) किंवा भावनाच्या भारामुळें जड व सुस्त (क्र ३७१ ) भासते जनतेच्या जमावात गुरफटलेल्या प्रियकराच्या शोधासाठीं कधी ती तरल (क्र ८७४ ) होते आणि अतरांच्या अपेक्षेनें टकमक (क्र ९०३ ) पाहते, तर कधीं प्रमसमाधीमुळें निश्चल (५५८ ) किंवा मुकुलित (क्र ५, ३२३ ) होते. भरत सागतो रतान्ते च श्रमे चैव सुखसंभोगभावने। गन्धे स्पर्शे च हृष्ट च मुकुला दृष्टिरिष्यते ॥ क्र. ४७० या गाथेंत कवि सागतो डोळे सर्वांनाच असतात, काहींचे डोळे सुदरही असतात, पण अशा नेत्रांनी पहाव्याचें कसें हें सर्वांनाच समजतें असं नाही. गाथाकारानी नेत्रकृत्याचीं अनेक आसनें नमूद केली आहेत त्यांपैकीं काही येथें देतों अनिमिष प्रियच्या अवयवावर रोखलेली (क्र.७३), अपाङ्ग नि शब्द हृदयनिवेदन (क्र ३७०) अर्धतारक प्रोत्साहक (क्र २५४ ) अर्धाक्षि [ आदर (क्र. २५, २२५ ), यवव्यामुळें (क्र ५२ ), रहस्यपूर्ण (क्र ८७८ ) दिरमोडामुळें (क्र. १८० )] अल्पधन्य (क्र २६६ ), अवधीरणवशविसर्पुरवग्नयनार्धदृष्टि (क्र. १४६ ) अवितृप्त वहानी (क्र ९३, ९९ ), उद्विग्न (क्र. ४९२), उत्सुक (क्र. ८२२), उन्मत्त (क्र ७०१),

ऊर्ध्वाक्ष (क्र १६१), कटाक्ष (क्र ५८१, ८८१); कृत्रिम (क्र. ३५७); घूर्णनशील (क्र. १४८, ३३८, ९३१); तिर्यक् (क्र. १४८); दरवलित (क्र. २५४); दिशासुखप्रसारित (क्र. ५७); निमीलिताक्षि : मनोमय प्रियकराच्या आलिंगनामुळें (क्र. १३३), ध्यानस्थ (क्र. ८३६), सरावासाठीं (क्र २४९); परितोषविकसित : अनुरागजन्य (क्र. ३४१); प्रफुल्ल: प्रियकराच्या गुणश्रवणामुळें (क्र. ८६४) प्रसारित : चेष्टेनें (क्र. ९०३), पाहिलें न पाहिलें (क्र. ७१५); प्रेमहीन (क्र. ३५३); बाष्पाकुलित (क्र. २५); भ्रुकुटिभङ्गसज्ज (क्र. ९१४, ९१५); मत्सरग्रस्त (क्र. ९०२); मन्थर (क्र. ३७१), रक्तविषम (क्र.१०४); रागीट (क्र. ८९२); वक्राक्षिप्रेक्षण (क्र. १७४); विनिमीलितार्धाक्षि (क्र.५२); शून्य (क्र. ८६४); स्नेहसद्भावभरित (क्र १९९); हासोन्मिश्र (क्र. ४५७).

प्रौढावस्थेंत पदार्पण करतांना मुग्धेनें एवढे नेत्र–विलास संपादन केले तर तिला अजिंक्य असा पुरुष आढळणार नाही. कटाक्षानें महात्म्येही विद्ध व व्यथित होतात (क्र. ८८१), मग सामान्यजनांची काय कथा? तारुण्यांत नुक्तेंच पदार्पण केलेले कितीतरी स्वसंतुष्ट लोक किती तरी काळपर्यंत गुसत्या कटाक्षावर (क्र. ५८१) झुलतात! कोणी खरोखरीच अल्लड असतात म्हणून लाडें लाडें पाहतात (क्र. २५) आणि कोणी अभिप्रायाच्या सवरणार्थ (क्र.२२५) जाणून तसें ढोंग धारण करतात. जे चतुर असतात (क्र. ८७८) किंवा जाणते (क्र. २५४) असतात ते दृष्टिक्षेपाचें रहस्य तावडतोब उमजतात! कांहीं पहावयाचेंच असलें तर कुलवधूनें मात्र मुख वर न उचलतां पाहिलें पाहिजे (क्र.५२५) असा दंडक होता – आणि आहेही!

कृश व नाजूक उदर (क्र. ३०९, ३१३, ३६२, ७९७) हें गाथाकर्त्यांनीं संस्कृत कवीप्रमाणेंच सौंदर्यलक्षण मानलेलें आहे. उदरावर त्रिवली (क्र. २७८, ४२५) आहे. भावनोद्रेकामुळें नेमकें वस्त्र सैल झाल्यानें क्र. १६२ च्या नायिकेच्या नाभीचें भिक्षाचराला दर्शन घडलें आहे. उदराला कृत्रिम कृशता आणण्यासाठीं कार्सेटसारखा काहीं उपाय मात्र सांगितलेला नाहीं. कृशोदर हें सौंदर्याचें तसेंच सभ्रम संसाराचें लक्षण आहे. उदरंभरणाच्या चिंतेनें चित्त ग्रासलें की एका काळीं उन्नत असलेल्या स्तनादीं उदराचाच आश्रय

(क्र.६५२) ध्यावा लागतो; मात्र तेव्हां त्याच्या वृशतेची ही दर नष्ट (क्र. ३०९) झालेली असते.

जसे दृष्टीचे, तसेच स्तनांचे अनेक उल्लेख गाथासप्तशतींत आलेले आहेत. स्तनांना उपमाही अधिक दिलेल्या आहेत : कलश (क्र. १४०, २५६, ३६८, ३६९, ५७६), घट (क्र. २६०), पिकें बेलफळ (क्र. ५७९) आणि राजहंसाची जोडी (क्र.६२४). सर्वच नायिकांचे स्तन कंचुकींत बद्ध (क्र. ७३०) आहेत; दोष कंचुकीचा असो किंवा गुण यौवनाचा (क्र. ७३६) असो, स्तन बंधन जुमानीत नाहींत आणि चंद्रकलेच्या (क्र. ३९५) आकारांत प्रकट होतात ! कारण, त्याचें अंत स्फुरण (क्र. ५९६). व स्वयंवर्धन (क्र. ७३६). स्तन कसे असावेत ? निदाप (क्र. ७०८) व सुंदर (क्र. ६७०); वर्णानें उज्ज्वल (क्र. ७०९), गोरे (क्र. ८२०) व लाल (क्र. २६०, ७०९, ७२७); आणि त्याची अग्रें लाल (क्र. ८३); गर्भधारणेनंतर तीं काळीं पडतात, किंवा हृदयांत रत्नाचा निधि साचल्यानंतर त्यांवर त्यांवर मदनराजाची काळी मोहोर केली (क्र. ८०७) जाते. स्तन असावेत आकारानें उत्तुंग (क्र. १५०, २५६, २५८, ३८२, ४२५, ४२७, ५७९, ८७३), उन्नत (क्र. ४३४, ४२८, ८९३, ८७३, ९१८), गंभीर (क्र. ४२८), घोर (क्र. ६१९), पीन (क्र.७०७, ९१८), पुष्ट (क्र. ५४९, ५६७, ६६९, ७०७, ७६७, ८५७), पृथुल (क्र. ७६७, ८४६) व विशाल (क्र. २६८, ५७५, ६६७): स्तन असावेत स्पर्शाला उदार (क्र. ७७, २३८, ७६६), कठिण (क्र. २६१, ५७९) व भरदार (क्र. २५८, २६८); स्तनयुगल (क्र. ८२४) निरंतर (क्र. २५८, ४२७, ६६९); स्तन सालंकार (क्र. ४२८), मग ते अलंकार नखक्षताचे (क्र. २३३, ४२७, ४२८, ७०७) असोत या प्रेमचित्रांचे (क्र. ८२४); किंवा हारादि (क्र. ९८८) लौकिक मूल्याचें असोत. भरदार स्तनाचा भार (क्र. १६०) कृशकटीला (क्र. ३६२, ७६७) पेलत नाहीं. स्तनमर्दनाला प्रियकर उत्सुक (क्र. ७२३, ८०९) असतो आणि तो गाढ आलिंगन देतो तेव्हां जणू (क्र २७६) ते त्याच्या छातींत रुतनात. पण प्रियकर व प्रेयसी असे नातें नसेल तेव्हां कोणाची छाती लागून गेली आहे पुरताच्या छातीला स्पर्श (क्र. ९७०) करण्याची !

डॉ. ह्रास व बार्टल्स यांनी आपल्या स्त्रीविषयक प्रचण्ड ग्रथात स्तनांचे चार वर्ग ठेवणीच्या अनुरोधानें केले आहेत: bowl-shaped, hemispherical, conical, elongated. श्री. राजवाडे यानी या संज्ञाना प्रतिशब्द दिले आहेत: पूर्णमण्डलाकार, दीर्घवर्तुलाकार, उच्छ्रित कोनाकार व नत नलिकाकार. पुष्ट, विशाल, उन्नत व नत हे प्रतिशब्द मला अधिक अन्वर्थक व सोपे वाटतात. हे सर्व वर्ग गाथासप्तशतींत आढळतात. स्तनांचा आकार केवढा असावा? ओव्हिड सागतो, मुठींत मावेल एवढा. सामान्यतः याहून ते मोठे असतात. क्र. ७९ च्या नायिकेच्या स्तनाचा आकार कवठाएवढा किंवा बेलफळा एवढा आहे. कुक्कोकानें त्याचा आकार श्रीफलाएवढा असावा असें सांगितलें आहे. स्तनांना प्राकृत-संस्कृत कवींनी कलश, कुंभ व घट यांच्या उपमा दिलेल्या आढळतात. सामान्यतः यांहून ते लहान असतात. बालकाच्या पोषणासाठीं पुरेसें दूध धारण करणें हें त्यांचें नैसर्गिक कार्य; तेवढे ते पुष्ट असणें हेंच सौंदर्याचें लक्षण. स्तनांचें काठिण्य वर्णन करण्याची प्राचीन व मध्ययुगीन कवींना फार हौस, आणि त्यांच्या तालमींत तयार झालेल्या अर्वाचीनांनाही. 'वाटे सहजाचे कठिण कुचावर फुटेल सुपारी', हे लावणीकाराचे उद्गार रसिकतेचे द्योतक व व्यावहारिकतेचे? की केवळ यमक साधनेचे! क्र.२६१ या गाथेंत अशी अतिशयोक्ति आढळत नाहीं. भावनावेशानें स्तनांना झालेल्या स्पर्शानें, मग तो कामविकारानें प्रेरित असो किंवा वात्सल्यानें, स्तनाग्रें उत्थापित, रोमांचित होतात, हा सिद्धांत गाथासप्तशतींत आलेला आहे. पुत्राच्या नखस्पर्शानें मातेचा एक स्तन पान्हवला व पतीच्या नखस्पर्शानें दुसरा रोमांचित झाला, हें क्र. ४०९ मधील भावसंकराचें उदाहरण साहित्यांत अद्वितीय आहे. या प्रतिक्रियेच्या कारणाबद्दल इंद्रियविज्ञान व मनोविज्ञान या शास्त्राच्या निष्पांत दुमत आहे. पांचजन्य शंख फुंकतेवेळीं कृष्णाला यशोदेच्या स्तनाचें स्मरण व्हावें (क्र. ९६८) हा उल्लेख साहित्यांतील नवसांप्रदायिकांना गुदगुल्या केल्यावाचून राहणार नाहीं. स्तनांना नखांचीं व दंतांचीं एवढीं क्षतें धारण व सहन करावीं लागतात—कारण त्यांचें ग्रहण, चूषण व मर्दन पुरुषाच्या अंत प्रेरणेनें होत असतें. हिंदुस्थानात तर या विधीला जणूं

धर्मशास्त्राची प्रेरणा आहे, कारण स्मृतींना स्त्रीपुरुषांना सकञ्चुकरतापासून परावृत्त केलें आहे।

गाथासप्तशतींत बाहूंना व कराग्रांना फारसें महत्व नाही बाहुल्ता हें आलिंगनाचें साधन मात्र ( क्र १३३, २७६, ३५४, ७८०, ८४४ ) आहे क्र ८४४ या *गाथेत बाहूंना कमळाच्या देंठाची उपमा दिलेली आहे कराना* कमलाची ( क्र ४११ ) आणि कमलदलाची ( क्र ८५५ ) क्र ४०४ या गाथेत कराग्रांना अशोक पल्लवाची व क्र ६७८ मध्यें प्रवालाङ्कुराची उपमा दिलेली आहे क्र ६७८ च्या नायिकेचे तळहात स्वाभाविकपण प्रवाळांसारखे लाल आहेत, ज्यांचे हात असे नसतात त्या त्यांना धातुरंग लावतात क्र १९६ या गाथेची नायिका बाला किंवा मुग्धा असून ती उत्फुल्लिका खेळत आहे प्रौढावस्थेत जघन जड व विशाल झाले तरी पुरुषायितांच्या वेळीं श्रम् नये म्हणून हा व्यायाम करावा असा गाथेचा अभिप्राय आहे सुरतोत्तर विवस्त्र जघन झाकण्यासाठीं क्र ४५९ ची नायिका उत्सुक आहे जघनाला कड-दोऱ्याची मिठी ( क्र २११ ) आहे, त्यावर नखाचे ओरखडे ( क्र २३३ ) व नखक्षतें उठलेलीं आहेत ( क्र ४६५ ), इतकेच नव्हे, दतव्रणही ( क्र ६०९ ) दिसत आहेत ! हा अखेरचा विधि विहित नाहीं शिवाय फडफडत्या लुगड्या-*मुळें जघनावरले व्रण प्रकट कसे होणार, याचा नीट उलगडा होत नाहीं* ' जघन काञ्चीपद कट्यधोगत पुरोवर्ति प्रदेश तस्य पश्चाद्‌गतो नितंब ' अशी व्याख्या आहे या नायिकाचें नितंब पृथुल ( क्र ८२६ ), विपुल ( क्र ८४६ ), विशाल ( क्र ७९७ ) व विस्तीर्ण ( क्र ३९३ ) आहेत हत्तीच्या सोंडे-सारख्या मांड्या ( क्र ९१६ ) आहेत, म्हणूनच नायिकेला त्यांचा भार ( क्र ७९७ ) पेलत आहे ! नितंबावर नखक्षताचे ओरखडे ( क्र २३३ ) आहेत, घामामुळे त्यांना पातळ चिकटतें ( क्र ७१८ ) व क्वचित् तें आढारें ( क्र ८०१ ) लागतें रस्त्यानें चालतांना नितंबांना हेलकावा देण्याची प्रथा नायिकांना होती ( क्र ३९३ ) असावी असें दिसतें आणि नितंबांना गुरुत्व आलेलें नसतें तेव्हांची चपल चाल कशी फुलपाखरासारखी ( क्र १७४ ) असते !

*स्त्री तन्वंगी असावी हें खरें, पण कशी असावी ? श्रोणीभारादलसगमना* स्तोकनम्रास्तनाभ्याम् ! स्त्री सौंदर्याचा हा लक्षण नैसर्गिक आहेत, कारण प्राणी

ही प्रजोत्पादनाशीं संबद्ध आणि स्तन प्रजापोषणाशीं! जघन–नितंबाचा गौरव हीं उत्क्रांति व सुसंस्कृति याचीं लक्षणें आहेत. चतुष्पादात जघनगौरव घाला महत्व नाहीं; रानटी स्त्रियाचे हे अवयव पुरुषासारखेच असतात. या परिणामानुसार गाथासप्तशतीच्या नायिका सुधारलेल्या समाजातील असल्या पाहिजेत असे अनुमान होतें. येथेंही हीं लक्षणें वन्य नायिकाचे बाबतींत प्रत्ययास येत नाहीत हें लक्षात घेण्यासारखें आहे.

सौंदर्याचा प्रत्यय गतींत असतो. क्र. ६७ च्या नायिकेची चाल संथ आहे, कारण तळव्याना चिखल लागूं नये आणि प्रियकराच्या पावलावर आपलें पाऊल पडून अप्रत्यक्ष स्पर्शाचें श्रेय मिळावें याविषयीं ती दक्ष आहे. क्र. ४६३ च्या नायिकेची चाल मंद आहे, कारण तिनें धारण केलेली मेखला तिच्या जघनावरील नखक्षतांवर घांसत आहे. क्र. ६९० मधील वल्मगमपाचं पाऊल तिरपें पडलेलें आहे, ही चाल वाटते तितकी अर्वाचीन नाहीं. गाथासप्तशतीत नायिकापैकीं सर्वात मोहक चाल कोणाची असेल तर ती क. १७४ च्या नायिकेची, नागमोडी! क्र. १२७ च्या नायिकेचीं पावलें स्वाभाविकपणेंच लाल आहेत; ज्याना हें वैशिष्ट्य लाभलेलें नसतें त्या त्याना आळेता लावतात; पूर्वी आणि हल्लींही.

गाथासप्तशतींतील नायिका भिन्न वर्गांतल्या आहेत. क्र. ११९ व ७८८ या गाथाच्या नायिका या व्याधस्त्रिया आहेत, पहिली रूपयौवनोन्मत्त आहे आणि दुसरीचे शरीर मलिन आहे. क्र. ५४५ ची नायिका ग्रामीण आहे; तिला आभरणांची अगर प्रसाधनाची जरूर नाहीं. क्र १८२, ५१६ व ७५८ या गाथाच्या नायिका सुतनु व सडपातळ आहेत; क्र. ५६ व २७८ या गाथाच्या नायिका नाजूक आहेत. क्र. ४१० ची नायिका बाला आहे, तरी तिच्या अंगीं लैङ्गिक आकर्षण इतकें आहे का प्रेक्षकाला त्याचा प्रभाव विपरीतसारखा जाणवत आहे. क्र. ५९२ च्या नायिकेचे सौंदर्य न्याहाळतांना प्रेक्षकाना पापण्या मिटण्याचेंही भान रहात नाहीं. ज्याचें आकर्षण व लावण्य नावाजण्यात येतें त्याची निर्मिति (क्र. ३३१) अमृत व विष याच्या मिश्रणानेंच झालेली असते! देहात यौवनाचा (क्र. ३९२) आणि मनात मन्मथाचा संचार सुरू झाला म्हणजे अंगप्रत्यगांत सौंदर्य भरूं

लागतें, इतकें कीं जणू तें नायिकेच्या शरीरात मावत नाहीं ( क्र २७८ ) आणि ( क्र. २३४, ७७१ ) प्रेक्षकालाही तें सपर्णपणें पहाता येत नाही !

अगाला सुगध असणें हें सौंदर्याचेंच एक अग मानण्यात येतें कामशास्त्रकारानी गधाचे अनुरोधानें स्त्रियाचें वर्गीकरण केलेलें आहे मत्स्यगधेला योजनगधा म्हटलेलें आहे कारण तिच्या अगाचा गध योजनपर्यंत दरवळत असे मत्स्यगध हा कामवर्धक असल्यामुळें पराशर हा ब्राह्मण व शतनु हा क्षत्रिय हे दोघेही तिच्याकडे आकृष्ट झाले द्रौपदीही वर्णानें श्यामल व नीलोत्पलगधा होती मानव देहात अशी एखादी अत स्रावक किंवा बहि स्रावक ग्रथि नाही की जी जास्त गधवती नाहीं विशेषत स्त्रियाच्या देहातून सूर्योदयाच्या व सूर्यास्ताच्या वेळीं आणि आकाशात मेघाचा गडगडाट सुरू होतो तेव्हा मादक गध दरवळतात गाथासप्तशतात क्र ५१ व २८१ या गाथात अगसुगंधाचा आणि क्र १८ ८६, ८९, ३१७, ३६६ या गाथात निश्वास सुगधाचा 'प्रत्यक्ष उल्लेख' आहे वात्स्यायनानें कामसूत्रात, बायबलातील सालोमनच्या गीतात आणि शेख नेफजावीनें Perfumed Garden या मध्ययुगीन ग्रथात सुगधाचें माहात्म्य वर्णिलेलें आहे मनुष्याच्या अतर्यामावर मृगसुगधाइतका कशाचाही उत्तेजक परिणाम होत नाही अकाल ( क्र ४९७ ), कदब ( क्र १७७ ), कुरबक ( क्र २११ ), आबेमोहोर ( क्र ४११ ), शेफालिका ( क्र ४१२ ) याचा सुगध आपल्या नायिकाना विशेष कामोत्तेजक वाटतो असें दिसतें

## श्यामला

( सामगी क्र. १२६, १८०, १८९ २३८, ७१८, सामा क्र ९९३· सामाइ · क्र १८०, ४३९· सामच्छवि क्र ५५५ )

प्राचीन व मध्ययुगीन सस्कृत व प्राकृत साहित्यात, विशेषत काव्यात, ज्याना श्यामला व श्यामा या सज्ञा लावण्यात येतात अशा सुदरी वारवार भेटतात सामान्यत श्याम व श्यामल हा वर्णवाचक विशेषणें आहेत श्याम, श्यामल म्हणजे काळा काळासावळा आणि श्यामा, श्यामला म्हणजे काळीसावळी पण कोशकारानी व टीकाकारानी सदर्भाच्या अनुरोधानें या

संज्ञांचे वेगवेगळे अर्थ दिले आहेत व छटा दाखविल्या आहेत. शिवाय कवींनींही त्याची योजना थोड्याबहुत ढिलाईनें केलेली आहे, म्हणून या संज्ञांचे विवेचन करणे भाग आहे.

अमरकोशात श्याम व श्यामल हे शब्द या वर्गांत आलेले आहेत : 'कृष्णे नीलासित श्याम काल श्यामलमेचकाः' = कृष्ण, नील, असित, श्याम, काल, श्यामल व मेचक हीं सात नांवें काळ्या रंगाचीं. हे शब्द केवळ प्रतिशब्द नाहींत, त्यांमध्यें सूक्ष्म भेद आहेत. कोशकारांनीं व टीकाकारांनीं या शब्दांनीं व्यक्त होणाऱ्या छटांची सोदाहरण फोड करून सांगितलेली नाहीं. विशिष्ट वर्णांत असलेली दुसऱ्या वर्णाची छटा व्यक्त करण्यासाठीं जो तो शब्द निवडून वापरावयाचा, अशी योजना असली पाहिजे. अमरकोशांत पांढऱ्या वर्णाला पांडुर व गौर हे शब्द दिलेले आहेत. त्यांमधील फरक उलगडून न सांगतांही उमजण्यासारखा आहे. गौर हा शब्द पिंवळ्या रंगाचाही वाचक आहे असेंही अमरकोशांत सांगितलेलें आहे. यावरून अनुमान होतें कीं श्वेत वर्णांत पीत वर्णाची छटा असली म्हणजे त्या कांतीला गौर म्हणावयाचें; आणि तसा प्रघात आहेही. त्याचप्रमाणें कृष्ण अगर नील वर्णात गौर वर्णाची किंवा गौर वर्णांत कृष्ण अगर नील वर्णाची छटा असली म्हणजे त्या कांतीला श्याम किंवा श्यामल म्हणावयाचें, असा संकेत असला पाहिजे असें वाटतें.

श्याम व श्यामल हे शब्द वर्णद्योतक आहेत हें निश्चित; कारण ते पुरुषांना, त्याचप्रमाणें स्त्रियांना अनुलक्षून वापरलेले आहेत.

उत्तररामचरितांत (४, १९) अरुन्धतीनें लवाच्या कांतीचें वर्णन केलें आहे : 'कुवलयदलस्निग्धश्याम' = नीलकमलाच्या पाकळीसारखी तकतकीत व श्यामवर्ण. मात्र नील कमलाचा वर्ण काळा भासण्याइतका गडद कधींच नसतो. श्यामकंठ म्हणजे नीलकंठ, शंकर. हलाहलप्राशनानें त्याचा कण्ठ काळवंडला होता. मेघदूतात (१, १५) कालिदासानें गोपवेषधारी विष्णूच्या व मेघाच्या वर्णाला अनुलक्षून श्याम हा शब्द वापरलेला आहे. "येन श्यामं वपुरतितरां कान्तिमापत्स्यते ते। बर्हेणेव स्फुरितरुचिना गोपवेशस्य विष्णोः।" = श्री कृष्णाचें श्याम शरीर मयूरपिच्छांच्या मुकुटानें शोभतें, त्याप्रमाणें तुझें काळें-

मोर शरीर इन्द्रधनुष्यामुळें शोभायमान् दिसेल स्त्री गीतातही कृष्ण काळा आहे, पण काळा कुळकुळीत नाही त्याची कांति सावळी आहे, शिवाय तो सुंदरही आहे, म्हणूनच त्याला श्यामसुंदर म्हणतात आभाळात काळेभोर मेघ दाटले असें आपण म्हणतों, पण ते काळेकुट्ट क्वचितही नसतात, शिवाय त्यांना नीळवर्णाची पार्श्वभूमि असते तसाच कृष्णाचा वर्ण होता म्हणून त्याला घननीळ, मेघश्याम म्हणतात जो वर्ण आवडता तो सावळा आणि नावडता तो काळा असें मात्र नाहीं मेघदूतात ( १, २३ ) तर कालिदासानें दशार्ण देशाला श्यामकान्त ठरविलें आहे 'त्वय्यासन्ने परिणत फलश्यामजम्बूवनान्ता' = फळांच्या पक्वतेनें श्यामवर्ण झालेलीं जांभूळवनें ज्यांच्या ठायीं आहेत असा देश येथें श्याम शब्दाचा अर्थ गडद जांभळा किंवा काळा निळा हा अभिप्रेत आहे

श्यामा व श्यामल या शब्दाचें आणखी काही अर्थ पहा

श्यामा म्हणजे रजनी, विशेषत कृष्णपक्षातली, श्यामा म्हणजे उपरसाळी तुळस, दुर्वा, निशोत्तर, प्रियंगु श्यामा म्हणजे काली, दुर्गा, यमुना श्यामा स्त्री म्हणजे यौवनमध्यस्था एक व्याख्याकार सांगतो 'अप्रसूता भवेत् श्यामा श्यामा षोडशवार्षिकी। श्यामा च श्यामवर्णाच श्यामा मधुरभाषिणी ॥' पहिल्या ओळीला पाठभेद आहे तो असा 'अप्रसूता भवेत् श्यामा तन्वी च नवयौवना।' आणखी एक व्याख्याकार सांगतो 'शीते सुखोष्ण सर्वाङ्गी ग्रीष्मे या सुखशीतला। तप्तकाञ्चनवर्णाभा सा स्त्री श्यामेति कथ्यते ॥' अनंगरंगात पद्मिनीच्या वर्णनांत तिचा वर्ण श्याम सुवर्णचम्पकनिभ असल्याचें सांगितलेलें आहे. श्री मुळे यानीं प्रकाशित केलेल्या आवृत्तीत या भागाचें भाषांतर दिलें आहे 'काळी नसता तारुण्याच्या भरामुळें श्यामवर्ण भासणारी' गोऱ्या स्त्रीची कांति यौवनाच्या भरामुळे अधिक सतेज दिसेल. श्यामल कशी होईल? शिवाय पद्मिनीनें यौवन ओलांडलें की तिचें पद्मिनीत्व नष्ट होतें की काय?

हीं वचनें, वर्णनें व व्याख्या विषय सुगम करण्याऐवजी जिज्ञासूला अधिकच घोंटाळ्यात मात्र पाडतात गौर वर्णाच्या श्रेष्ठत्वाबद्दल मनात पूर्वग्रह घोंटाळत असल्यामुळेंच या बाबतीत त्यांची वृत्ति अशी संभ्रमित असावी असे वाटतें

कालिदासानें अनेक नायिकाचीं शब्दाचित्रें रंगविलेलीं आहेत त्यांपैकी मेघ-

दूतातला नायिका हीच काय ती त्यानें संपूर्णतया स्वतंत्रपणें निर्माण केलेली आहे. त्यानें केलेलें तिचें वर्णन पहा.

> तन्वी श्यामा शिखरिदशना पक्वबिंबाधरोष्ठी
> मध्ये क्षामा चकितहरिणी प्रेक्षणा निम्ननाभिः ॥
> श्रोणी भारादलसगमना स्तोकनम्रा स्तनाभ्याम्
> या तत्र स्याद्युवतिविषये सृष्टिराद्येव धातुः ॥

विदग्ध व विलासी प्राचीन भारतीय तरुणाच्या स्त्रीविषयक अपेक्षांचें सार सर्वस्व कालिदासानें या श्लोकात ग्रथित केलेलें आहे. या श्लोकात त्यानें श्यामा या संज्ञेचा जाणता उपयोग केलेला आहे. टीकाकारांनीं मात्र वयक्तिक प्रवृत्तींच्या व उपलब्ध वचनाच्या अनुरोधानें या संज्ञेचे वेगवेगळे अर्थ केलेले आहेत. मल्लिनाथ सांगतो " श्यामा युवति श्यामा यौवनमध्यस्था इति उत्पलमालायाम्। " स्थिरदेव मात्र मुळापासून ढळलेला नाहीं, तो ( डॉ. परांजपे संपादित आवृत्ति १९३५ पृ. ९४ ) सांगतो "तन्वी कृशतनु इत्याकारचारुता। श्यामा श्यामला इति वर्णाभिरामता। " सर विल्यम जोन्स यांनीं या श्लोकाचें भाषांतर करताना (Calcutta Edition 1901 p. 23) श्यामा हा शब्द अजिबात गाळला आहे. श्री. वामनशास्त्री इस्लामपूरकरांनीं ( काव्यार्थदीपिका पृ. २०५ ) 'तारुण्याच्या ऐन भरात आलेली' हा अर्थ स्वीकारला आहे. "श्यामास्वङ्ग चकित हरिणी प्रेक्षणे दृष्टिपातम्। " या मेघदूतातील वचनावरील टीकेंत मल्लिनाथ सांगतो "श्यामासु प्रियङ्गुलतासु। अङ्गं शरीरमुत्प्रेक्षे। सौकुमार्यादिसाम्यादङ्गानीति तर्कयामीत्यर्थः।" आणि स्थिरदेव सांगतो "श्यामासु प्रियङ्गुलतासु अङ्गं वपु। श्यामत्वतनुत्वाभ्यां तत्सादृश्यम्। " या टीकावरून दिसून येईल कीं मेघदूतातील श्यामा हा शब्द नायिकेच्या वयाचा द्योतक नसून तिच्या कांतीचा वाचक आहे.

गाथासप्तशतींत आलेल्या श्यामा व श्यामला या संज्ञांचा अर्थाबद्दल बरीच अनिश्चितता आहे. सान्याजणी तरुण, सुंदर व सुकुमार आहेत, एवढं मात्र खरें.

क्र. १२३ मधील श्यामलेला प्रसूति-वैराग्याची लहर आलेली आहे, म्हणून येथें 'अप्रसूता' हा अर्थ लागू पडत नाहीं. येथें गंगाधरानें श्यामलेचा अर्थ

'वरत्री' असा दिलेला आहे. हा शब्द येथें वर्णवाचक आहे असें म्हणतां येणार नाहीं. क्र. १८० मधील संदर्भ 'सामाइ सामलिज्जइ'–श्यामाया: श्यामलायते, असा आहे. हा उल्लेख निःसंशय वर्णवाचक आहे. क्र. ११८ या गाथेंतील श्यामला सुकुमार आहे. हा उल्लेख वर्णवाचक नसावा असें सकृद्दर्शनीं वाटतें; पण कवीनें जम्बूकषायाची योजना करून तिचा वर्ण सूचित केलेला आहे. क्र. २३८ या गाथेची नायिका 'शीते सुखोष्ण सर्वांगी' अशी आहे; तिची अंगकांति धगधगीत अंगारासरखी आहे. तप्तकांचनाचा वर्ण असाच असतो. कोळसा सवंग व काळा आणि सोनें महाग व पिवळें, म्हणून तीं तारखली असतां त्याच्या वर्णांत फरक पडेल की काय? क्र. ४२९ या गाथेच्या नायिकेबद्दल गगाधर सांगतो 'श्यामाया उत्तमनायिकायाः।' ही षोडशवार्षिकी नसावी, यौवनमध्यस्था असावी असें वाटतें. हिचा वर्ण ध्वनीनेंही सूचित केलेला नाहीं. क्र. ५५१ या गाथेची नायिका श्यामलाङ्गी आहे असें मुळातच सांगितलेलें आहे. शिवाय वाळ्याभोंर लांबसडक केशांच्या साहचर्याची जोड दिलेली आहे. क्र. ७५८ मध्यें नायिकेच्या वर्णाची सूचना नाहीं; मात्र, शरीराचा वर्ण श्यामल आणि नेत्राच्या बाह्यभागांचा धवल, असें असलें म्हणजे त्याची शोभा विशेष आकर्षक असते. क्र. ९६३ या गाथेंतील श्यामलेची कांति अद्वितीय आहे. हिला पाहून कवीला वाटलें की तुम्हाआम्हाला निर्माण करणाऱ्या सर्वसामान्य प्रजापतीकडेच हिचें कर्तृत्व असावें हें खरें वाटत नाहीं. वर दिलेल्या कालिदासाच्या उद्गाराशीं ही भावना तोलण्याजोगी आहे.

भारतांत सुखकारक काय असतें?

कूपोदकं, वटच्छाया, श्यामा स्त्री, इष्टिकागृहं –

आणि हीं सुखकारक का असतात?

शीतकाले भवेदुष्णं ग्रीष्म कालेच शीतलम्॥

आडाचें तळें पाणी, उन्हाळय रुप्रकृतीला मानवेल व रुचेल एवढेंच गार असतें, कृत्रिमपणें गार केलेलें पाणी रुचतें पण मानवत नाहीं. कूपोदक हिंवाळ्यात कोमट असतें, कारण भोंवतालच्या भूमींत मुरलेली उष्णता तें धारण करतें. सरोवरांचा विस्तार मोठा असल्यामुळें त्याचें पाणी हिंवाळ्यांत फार थंड असतें. वडाची छाया दाट असते, पानें मोठीं असल्यामुळें त्यांतून ताजी

हवा खेळती राहते. त्याच्या फांद्या व पारंब्या भुईसरपट असल्यामुळें हिवाळ्या पावसाळ्यांतही वगराळीं निवारा मिळतो. घर बांधावयाचें तें विटाचें बाधावें. विटा उष्णतावाहक नसल्यामुळें उन्हानें भिंतींची बाहेरली बाजू तापली तरी घराच्या अंतर्भागांतील गारवा नाहासा होत नाहीं. स्त्री कशी असावी? विशेषतः हिंदुस्थानांत? अर्थात् आपली! श्यामला! का? कारण ती 'शीते सुखोष्ण सर्वाङ्गी ग्रीष्मे या सुखशीला।' अशी असल्यामुळें सर्व ऋतूत सुख-कारक असते. शिवाय त्याच्या शरीराला सुगंधहि विशेष असतो असे जाणते सागतात. श्री. राजवाडे सांगतात (नासदीय-सूक्त-भाष्य पृ. ७३६), योजनगंधा मत्स्यगंधा ही श्यामला असावी, कारण तिला पराशरापासून झालेला पुत्र वर्णानें काळा होता. गोरवर्ग स्त्रिया संसाराच्या धकाधकींत, विशेषतः हिंदुस्थानांत, टिकाव धरू शकत नाहींत हा सिद्धांत शास्त्रीय प्रमाणांनीं प्रस्थापित होण्याजोगा नसला तरी तो अनुभवाच्या कसोटीला उतरलेला आहे. सर रिचर्ड बर्टन हाही या अनुभवाशीं सहमत आहे. 'काळी नार, सकत फार' हें एका लावणींतील वचन येथें उधृत करण्याचा मोह आवरत नाहीं. या वचनातील उत्तान सूचना वगळली तरी व्यावहारिक सिद्धात या दृष्टीनें त्याचें महत्त्व सहज पटण्याजोगें आहे. पण सध्याचें सुधारलेलें व सुसंस्कृत म्हणवून घेणारें जग वर उधृत केलेल्या सुभाषिताचीं प्रचीति घेण्याच्या मनःस्थितींत नाहीं. चित्रपटांतही "Gentlemen Prefer Blondes, बिचाऱ्या Brunettes!

गौरवर्ण हा पांढरपेशाचा आवडता आणि श्यामवर्ण बहुजनसमाजाचा. गोरा म्हणजे पांढरा शुभ्र नव्हे आणि श्याम वर्ण म्हणजे काळा कुट्ट नव्हे. श्यामला म्हणजे निमगोरी कीं निमकाळी? कोण जाणे! श्यामला म्हणजे सावळी, हेंच खरें. प्रतिशब्द नाहीं, उपमाही नाहीं, कारण देश, काल व वैयक्तिक आवड याच्या अनुरोधानें या वर्णाची छटा गडद किंवा फिक्ट होते, इतकेंच नव्हे, त्याच व्यक्तीच्या बाबतीत विशिष्ट परिस्थितीच्या अनुरोधानेंही वर्णाची चलबिचल होते लाल रंगाला जसा मोतिया, किंवा निळ्या रंगाला जसा अस्मानी-तसाच कृष्णवर्णाला श्यामल! उन्हाची तिरीप लागली कीं 'घरा मळल झाल्यामुळे काळसर झालासा भासतो-पण आपली निरखून पाहिलें

यों त्यावर मोतियाची फिक्को छटा आलेली असावीसे वाटतें ! आणि सावलीचा आश्रय मिळताच तो पूर्वपदावर येतो, मनोवृत्ति उत्तेजित होताच गौरतेकडे झुकतो आणि स्थिरस्थावर होताच पूर्वपदावर येतो; असा हा वर्ण आहे ! गंगा व यमुना यांचा संगम होतो तेथें गंगेचा गौर व यमुनेचा श्यामल वर्ण यांचा प्रत्यय येतो, असें सांगतात. कल्पना करा गंगा व यमुना या दोन्ही नद्यांना उन्हाळ्यातला पूर आलेला आहे हिमालयात उगम पावणाऱ्या या नद्यांना वर्फ वितळल्यामुळें उन्हाळ्यातही पूर येतो आणि वितळणारें पाणी सुक्या मातीवरून लोटत नसल्यामुळें पूर आला तरीही या नद्यांचें पाणी गढूळ होत नाही, गंगा व यमुना यांच्या पुरान्या पाण्याबरोबर वाहणारें फेंसाचे पुंजके संगमावर एकमेकात मिसळतील तेव्हा त्याचा जो दिसेल तो श्यामवर्ण !

आणि श्यामला ? म्हणजे अशा वर्णाची स्त्री निमगोरी, निमकाळी, श्यामला पण तरुतरीत श्यामला ही सौंदर्याची सीमा, समाधानाचें निधान; अप्रसूता-पण बाला नव्हे, यौवनमध्यस्था-यौवन व प्रौढत्व यांच्या चंचल सीमारेषेवर, एक पाऊल जरा इकडे वा दुसरें जरा तिकडे, अशा तरल अवस्थेत असलेली; अल्लड भूतकाळाकडे अपाङ्ग दृष्टीनें अवलोकन करीत असलेली, आणि भविष्या-तील उपभोगाकडे आतुर व आसक्त दृष्टिक्षेप करणारी !

श्यामला हें एक स्वप्न आहे, सुंदर स्वप्न आहे ते वस्तुस्थितीत कधी अवतरत नाही, पण प्रत्यक्षावर स्वप्नाचा आरोप केला जातो, एतकेंच.

**प्रसाधन :**

शारीरिक स्वास्थ्य व सौंदर्य संवर्धन यांसाठीं गाथासप्तशतींतील स्त्रीपुरुष अनेक प्रसाधनांचा उपयोग करतात.

स्त्रिया केसांना सुगंधी तेल ( क्र. ८०, २९९, ५७२ ) लावून न्हातात, केस कोरडे होईपर्यंत ते मोकळे ( क्र. २९९ ) ठेवतात, नंतर आरशात ( क्र. ३०४ ८०८, ८१३, ८१७ ) पाहून भांग ( क्र. ६८२ ) पाडतात व वेणीफणी ( क्र ८० ) करतात, अंबाडा ( क्र. २९३ ) लावून अंबाडा ( क्र २९१ ) बांधतात आणि त्यात फुलें ( क्र २९९ ) माळतात व ओघळता गजरा ( क्र

१९२ ) धारण करतात. कालिदासाच्या नायिका पुष्पाच्या धुरांत ( ऋतु : १·४; ५·१२; कुमार : ७·१४ ) केंस वाळवतात. भांग काढणें हें सौभाग्याचें लक्षण ( E. 1 : I. 129 ) मानण्यांत येत असे. अथर्वांत शंभर दांत्यांच्या फणीचा ( १४·२·६८ ) उल्लेख आहे. युक्तिकल्पतरूंत ( पृ. ७८–७९; ९१–९७ ) प्रसाधनीचें वर्णन केलेलें आहे :

फाष्ठजा धातुजा चैव श्रृङ्गजाता यथाक्रमम्।
गुरुता लघुता चैव तथा घनशलाकता।
मनोहरत्वमुदितं प्रसाधन्या गुणग्रहः ॥

स्नानानंतर सुवासिनी कपाळावर तिलक ( क्र. १६, ११६, १७९ ) लावतात. डॉ. स्मिथ यांनीं History of Fine Arts in India & Ceylon मध्यें ( Pl LVII ) अजंठ्याच्या भित्ति चित्रांतील एकाची प्रतिकृति दिली आहे; *त्यांतील सर्व स्त्रियांनीं तिलक धारण केलेला आहे.* क्र. १७९ या गाथेंतील ललाटिका संज्ञक आलिंगनानें उपनायिकेच्या मुखावरील तिलकाचा रंग प्रथम नायकाच्या मुखावर व नंतर नायिकेच्या चरणांवर परिवर्तित झालेला आहे; त्या अर्थी तत्कालीन तिलक तैलमिश्रित ओलसर असावा असें अनुमान होतें. क्र. ९ या *गाथेंत नटीनें मुखराग म्हणून* हरितालाचा वापर *केलेला आहे.* स्त्रिया न्हातांना अंगाला हरिद्रा ( क्र. ५८, ८०, २४६ ) किंवा जम्बूकषाय ( क्र. १८९ ) लावीत; शरिराला कान्ति येण्यासाठीं हरिद्रा आणि अंगांचा तेलकटपणा जाण्यासाठीं जांभळाचें उटणें. रजस्वला मुखाला वर्णघृत ( क्र. २२; २८९, ५११, ५२८ ) लावीत. पुरुषही जम्बूकषाय वापरीत असें क्र. १८९ मधील उल्लेखांवरून दिसतें. मुखरागानंतर डोळ्यांत शलाकांवर घेऊन अंजन ( क्र. ८६४ ) किंवा काजळ ( १५३, ३०२ ) घालीत आणि अधरांवर राग ( क्र. १०६, ४५८, ८०२ ) लावीत. डोळ्यांत घालावयाचें तें अंजन व ओंठाना लावावयाचें तें रंजन असा भेद भरतानें नाट्यशास्त्रात ( २३·२० ) केलेला आहे अधरराग मेणांत ( क्र. ४५८ ) तयार केलेला असे. पुरुषही मेणाची गुटिका व आळित्याचा हात अधरांवरून फिरवीत असें वात्स्यायनाच्या उल्लेखावरून ( कामसूत्रम् : १·४·१६ ) दिसतें. हल्लीप्रमाणेंच तेव्हांही

अधररागामुळें गुप्त प्रीति प्रगट होत (क्र. १०६) असावी असं दिसतें. ग्रीष्मताप किंवा कामताप सहन व्हावा म्हणून स्त्रीपुरुष अंगाला चंदनाचें उटणें (क्र. २८८) लावीत. स्वागताचे वेळीं प्रियकराच्या अंगावर सुगंधी चूर्ण (क्र. ३१२) उधळीत असत. कौषीतकी उपनिषदात अप्सराना चूर्णहस्ता म्हटलेलें आहे यावरून हा रिवाज फार प्राचीन असावा. गाथासप्तशतींतील स्त्रिया हाताना धातुराग (क्र. ६७८) व पायाना लाक्षारस (क्र. ४६४) किंवा आळित्याचा रंग (क्र. ९४०) लावीत. या प्रसाधनानाही प्रीति वोलकी करण्याची खोड दिसते. आमंत्रित प्रेयसी व वेश्या कसोशीनें प्रसाधन करीत असें क्र. २१ मधील उल्लेखावरून दिसतें.

क्र. ४०८ मध्यें कापालिकेनें प्रियकराच्या शरिराच्या रक्षेचें प्रसाधन धारण केलेलें आहे. अवनालिका-धारण (क्र. १९४) व उच्छिष्ट-ग्रहण (क्र. १८९, २४६) आणि पावलावर पाऊल (क्र. ६८), बोंड (क्र. ३५९) व मदिरा-चषक (क्र. ९११) हीं प्रियकर किंवा प्रयसी यांच्या अप्रत्यक्ष स्पर्शामुळें प्राप्त होणाऱ्या संवेदनाजन्य सुखाचा प्रतीकें मानली पाहिजेत. प्रतीकासक्ति (Fetichism) ही लैंगिक विकृति अर्वाचीन मानसशास्त्रज्ञानीं सूक्ष्म दृष्टीनें अभ्यासिली आहे. क्र. ३६९ च्या नायिकेनें फाल्गुनोत्सवात कर्दम प्रसाधन धारण केलें आहे, अशा अभिमानानें का तो जणू कस्तुरीचा लेप आहे! क्र. ६३३ या गाथेंत वेधव्यमण्डनाचा उल्लेख आहे. प्रस्तुत विषयापुरता याचा संबंध विस्कटलेल्या वेणीशीं आहे. सुतकात वेणीफणी करावयाचा नाहीं या रिवाजाचा उल्लेख अथर्ववेदात (११ ९ १४) आलेला आहे. प्रियकरावाचून सौभाग्यवतींचीही कधीं अशी दशा करण्यात येते! म्हणून तें सौभाग्यलक्षणही ठरत. कानावर भरलेल्या मळवटाशीं ही या उल्लेखाचा संबंध असणं शक्य आहे.

अंजन, अळिता, तिलक, मेंदी, हळद वगैरे प्रसाधनाचीं साहित्यें घरोघर तयार करण्यात येत. लक्षारस मात्र कारागीर तयार करीत. हा व्यवसाय महत्त्वाचा होता असे उल्लेख अनेक प्राकृत (निर्यावलियाओ ३ ५ आवश्यक टीका हरिभद्र: पृ. ३९८) या ग्रंथात आढळतात.

**सुरत :**

सुरत हें तात्त्विक दृष्ट्या मानवी संसाराच्या सातत्याचें साधन आणि व्याव-हारिक दृष्ट्या काम भावनेचें साध्य.

खरोखर, प्रेम बहुविकारी (क १२६) आहे. त्याचा स्पर्श विपरीत (क ८०३) वाटतात प्रेमाची धार विलक्षण, ओल्या हृदयात ती पेटते व कोरड्या हृदयात विझते (क ४३०), शृंगाररसाच्या सिंचनानें प्रेमाग्नि प्रज्व-लित होतो (क. ७१३), मात्र तप्त हृदयावर प्रेमरसाचा बिंदु पडला की तें तडकतें (क ७९०) परंतु प्रीतीची गति वक्र (क. १०, ९०४) असते आणि कपटरहित प्रीति ही स्वप्नातच अशक्य कोटीतील (क १०४) आहे. प्रेमामुळें दुःखातही सुख (क १००) वाटतें, नरकात स्वर्ग निर्माण (क ८७०) होतो. पण केव्हा ? प्रीति सफल होईल तेव्हा अशा प्रीतीची प्राप्ति पूर्वपुण्याईवाचून (क. १७४) होत नाहीं. प्रेम दैवघटनेवर अवलंबून नसतें. (क. २८७) हें खरें पण तें तसं असलें तरी स्वागतार्ह (क ७३८) आहे. म्हणून कवीनें प्रार्थना केली आहे, (क ८३८) या देवा, मला मनुष्यजन्म देऊं नको, दिलास तर प्रेमात गुंतवूं नको, गुंतवलेंस तर अप्राप्य अशा ठिकाणीं गुंतवूं नकोस।

अनुनय, आलिंगन व चुंबन हे सुरतपूर्व विधि.

एकाकिनीची अडवणूक (क ८७१, ९११) किंवा पाठलाग (क ३२१) हे अनुनयाचे आसुरी प्रकार, होय, अनुनयाचेच अविरत आराधना (क ९३३) किंवा लाडीगोडी (क ६८६) हे शिष्ट प्रकार उद्दिष्ट साध्य होण्यासाठी प्रेमिकाचे ठायी थोडाबहुत निर्लज्जपणा असावा लागतोच !

गाथासप्तशतीत अनुनय ही संज्ञा (क १७, ८७, ९१, १०१, २७७, ४२०, ८८६, ९०८ ९०९, ९१०, ९२१, ९२४, ९३५) विवाहपूर्वप्रियारा-धन, कोर्टशिप या अर्थानें वापरलेली नाहीं या गाथात मानिनी आणि विन्मुख (क २७, ३३, ८७) नायिकेला प्रसन्न व सन्मुख करण्यासाठी नायक अनुरंजन करीत आहे, प्रभुत्वाच्या प्रदर्शनानें नव्हे दास्य वृत्तीनें (क ९१); पादवंदनपूर्वक (क ९१, ३९०, ४३२, ८८८, ९०४, ९१०, ९४०), कधीं

एखाता तर कधा सवतीच्या ( क्र ९२१ ) देरत, कधा हें मानधारण केवळ अनुनयाच्या अपक्षेनें ( क्र १०१ ) केलेलें आहे तर कधा अपराधाचा (क्र २७७) कबुलीजबाब मिळविण्यासाठी, कधा अनुनय सफलझालेला आहे तर कधा त्यामुळेच प्रसाचें पर्यवसान खेद, चाड व पराङ्मुखता (क्र ४२०,९०९)यात झालेलें आहे प्रेयसीच्या हृदयात प्रीतीचा प्रादुर्भाव झाल्याचें पुलक ( क्र. २०, २८, ५५, ७७, ८७, ९६, १००, २१६, ३१४, ४०६, ७१६, ७१९, ९८२, ८३०, ९२३, ९६८ ) हें पाहिले प्रमादचिन्ह प्राकृत-संस्कृत साहित्यात पुलकाला आहे तेवढे महत्त्व अन्य भाषात आढळत नाही या गाथावरून यवांचें सूक्ष्म निरीक्षण प्रत्ययास येतें क्र २० मध्यें गण्डपरिचुंबनानें अतीवप्रमुदित नायक रोमाञ्चित झाला आहे आणि क्र २१६ च्या नायिकेच्या शरिरावर उमललेले पुलक तिच्याच अश्रूंचा भेद करीत आहेत क्र ७७ ची नायिका अप्रत्यक्ष स्पर्शानें आणि क्र ८३० ची नायिका स्वप्नात आलिंगनाच्या अपेक्षेनें पुलकित झालेली आहे।

आलिंगनाचे अनेक उल्लेख गाथासप्तशतीत ( क्र. ९८, १३३, २७६, २८८, ३४४, ३५१, ३५४, ३८८, ४२९, ४१९, ७८०, ८२९, ९१५, ९२३, ९३८ ९८८, ९९० ) आलेले आहेत आलिंगन ही संज्ञाच सुरतद्योतक आहे, आलिंगन हा रतिनाटकाचा पूर्वरंग आहे असें क्र ३४४ या गाथेंत सांगितलेलें आहे क्र ३५१ मधाल आलिंगन तसें आहेही, आणि क्र ९८८ व ९९० मध्येंही. पण तें नेहमीच असं असतें असें नाही क्र ४२९ मधील आलिंगन सुरतोत्तर आहे आलिंगनाचा महिमा काय सांगावा ? चन्दनानें नव्हे, आलिंगनानें धर्मताप शांत(क्र २८८) होतो, त्यासाठी बाहुलता (क्र ३५८) स्वयंस्फूर्तानें सरसावतात आणि त्याचा आवेश काय वर्णावा ? त्यामुळें जणू नायिकेचे स्तन नायकाच्या छातीत रुततात, आणि केवळ आवेशाच्या दर्शनामुळे चिरडण्याच्या धास्तीनें नायिकेचा कृत्रिम ( क्र ९२८ ) मान आपोआप ओसरतो क्र ९२ मधील आलिंगना वात्स्यायनानें स्पृष्टक ( २ २ ९ ) अशी संज्ञा दिलेली आहे हाच्याच बुद्धिपुर सर होत आहे असा कोणाला संशयही येणार नाही अशा रीतीनें, काही तरी बहाणा करून शरीराचा शरीराला कोठेंतरी स्पर्श करणें क्र १५९ मधील आलिंगन हें वात्स्यायनाच्या लताटिका ( २. २. २७ ) यांत

येत मुले मुखमासज्याक्षिणी अक्ष्णोर्लेगटेन ललाटमाहन्यात्मालाटिका ॥'
क्र २७६ मधील आलिंगनाचं नाव विद्धक ( २ १ १० ), कारण येथें स्तनानें शल्याप्रमाणें वेध झालेला आहे क्र. १३३ व ८७९ मधील आलिंगनें मनोमय प्रियकराला दिलेलीं आहेत आलिंगन हें चुम्बनापेक्षा टसटशीत व दीर्घकालीन असल्यामुळें त्याची तहान हाताला हात ( क्र ७४३ ) लावून किंवा अडचणींत आधार ( क्र १९३ ) घेऊन त्रोटक आलिंगनानें भागवावी लागते क्र २२ मधील रजस्वलेचें आलिंगन असेंच त्रोटक आहे पण क्र ५२८ मधील मात्र दीर्घकालीन असलें पाहिजे आलिंगनाचें व स्तनांचें गोत्र जुळतें (क्र २७६, ३६८), पण, किंवा त्यामुळेंच त्याचें हाराशी (क्र ४२९, ९८८, ९९० ) सूत जमत नाहीं।

गाथासप्तशतींत चुंबनाचे अनेक उल्लेख (क्र २०, २२, ८९, ९६, १००, ११४, १७६, २००, २१३, ३००, ४५५, ४५८, ४६५, ५०७, ५१९, ६०५ ६६१, ७२९, ८२०, ८२१, ८२४, ८६६, ८८८, ८९२, ९१७, ९२७, ९३२, ९६५ ९७२) आलेले आहेत चुंबनाला आलिंगन, अंत शोषण व गंधग्रहण हा अभिप्रेत आहेत आलिंगन हा मुख्यत्वेंकरून स्तनाचा गौरव आणि चुंबन हा अधराचा त्यामुळें वाढेला एकाएकी स्त्रीत्व प्राप्त होतें कधीं कधीं चुंबनातील आवेशाचें पर्यवसान दंतव्रणात होतें ह्या क्रीडा कोणी कोणाला शिकवाव्या लागत नाहींत (क्र. ६६१ ), हेंच खरें वात्स्यायनानें विहित चुंबनस्थानें ( २ ३ ६ ) सांगितलीं आहेत ललाट अलक कपोल नयन वक्ष स्तन ओष्ठ अन्तर्मुखेषु चुम्बनम्। क्र २० मधील चुम्बनाला वात्स्यायनानें रागदीपन ( सुप्तस्य मुखमवलोकयन्त्या स्वाभिप्रायेण चुम्बनम् ) म्हटलेलें आहे, आणि क्र. २२ मधील चुम्बनाला स्पृष्टक व क्र ११४ मधील चुंबनाला संक्रान्तक ( प्रतिमाया चुम्बनम् ), अनङ्गरङ्गात क्र. ८२१ ला स्फुरित ( ९ १४ ) क्र. ८८८ ला मिलित ( ९ १३ वात्स्यायनाचें निमित ) ( क्र ९२७ ) ला सपुत्क ( ९ १८ ) सल्ता रंग रंग काढण्यासाठीं डोळयात फुंकर घालणें हें पहिलें चुंबन घेण्याचें जुनें निमित्त आहे असं क्र ८९ व १७६ या गाथावरून दिसतें आजूबाजूला माणसें वावरत असला तरी ह निमित्त वेळ निभावून नेतें दिवसा उजडीं तोंडाचा वास घेणें हही असेंच सोईस्कर निमित्त (क्र ८८६ ) आहे येथें तें नायिकेनें

मोव्य साहसानें योजलेलें आहे दिवसा उजेडीं अधाऱ्या खोलात हा विधि (क ७२९) लगोलग उरकता येतो! क्षत पडलेंच तर रानावनात वावरणाराना मधमाशीची सबब (क ६३४, ८८०) उपलब्ध असतेच पुरयाला व स्त्रालाही. क ४५५ मध्यें पार्वतीनें शंकराच्या नेत्राचें चुंबन घेतलें आहे. आणि क ८७४ मधें नववधूनें नवऱ्याचें, अनेकदा, ओठ सुकेपर्यंत. क २२ व ५१९ मध्यें नायकानें रजस्वलेचें चुंबन घेतलेलें आहे क २४९ च्या नायकानें नायिकेचा अधर दातात धरलेला असून त्याच्या पकडीतून सुटण्यासाठीं ती शीर्षप्रघूर्णन करात आहे साहित्यदर्पणात सागितलें आहे "केशस्तनधरादीना ग्रहे हृषऽपि संभ्रमेत्। प्राहु कुट्टमित नाम शिर करविधूननम्॥" क २१३ मधील चुंबन आवेशपूर्ण आहे आणि क ९२७ मधील दीर्घकालीन वसेंहा असलें तरी सिद्धान्त एकच. अधर एकच असला तरी स्वयस्फूर्तानें त्याचें चुंबन मिळालें तर त्यापासून अनेक रसाची प्राप्ति होते।

गाथासप्तशतातील व्यभिचारी सुरतक्रिया सामान्यत उघड्यावर, दिवसा उजेडीं, नि शकाणें (क ६३५, वृक्षादिकाच्या आश्रयानें (क ९५३) चालतात कदमुळासाठीं किंवा शिकारीसाठीं जगलात वावरणाऱ्या व शेतीवर अवलवून असणाऱ्या समाजात, लोकवस्ती तुरळक असलेल्या भागात असेच रिवाज प्रचलित असलेले दिसतात. कुलीन व विहित सुरतव्यवहार साधारणत घरां व रात्रीं, कधी अधारात आणि कधी सदीप (क २६४, ५४७, ५८९) व्यभिचारिणी ही स्वैरिणी होईपर्यंत पतिशय्येची अदब राखले आणि चौर्यरताला अन्यत्र अवसर नसला तर तें रात्रा, अधारात (क ३३३) उरकण्यात येतें ही सामान्य पद्धति झाली, अपवाद आहेतच वेळ काय, कोणताही, सधि मिळेल तेव्हा क ४९ व २९९ मधील सुरत दुपारीं झालेलें आहे सुरतासाठीं आवाहन कोण करतात? स्त्रिया कीं पुरुष? स्त्रियांनीं शील बिघडविण्याची जबाबदारी पुरुषावरच पडते ही सामान्य समजूत परपरागत दाक्षिण्याच व प्रचलित व्यवहारालाही धरून असला तरी प्राचीन व मध्य युगान साहित्यात ती निदर्शनाला येत नाही सुरत व्यवहाराचें आवाहन स्त्रियानीं करावयाचें ही योजना गाथासप्तशतातही आढळते, मग ती तत्कालीन रिवाजाच्या अनुरोधानें केलेली असो किंवा कवानीं सजातीयाच्या दोष-

प्रच्छादनार्थ केलेली असो क्र १६१, २००, २५४, ८७३, ९५५ या गाथांतलें आवाहन क्रियांना केंद्रें आहे ज्या गाथांत कथावस्तु आहेत तेथें तर हा प्रकार जवळ जवळ सर्वत्र आढळतो सुरतासक्ति ही भावना क्षणिक आहे, विरवानें ती ओसरते, हा कामशास्त्रातला व्यावहारिक सिद्धान्त क्र. २१ या गाथेत मांडलेला आहे आळवली तर ही भावना चित्ताचाच नव्हे, शरीराचा व जीवनाचाही कबजा घेते कामदशा ही या भावनेची साहित्यातील आळवणी, साहित्यदर्पणात कामाच्या दहा दशा सांगितलेल्या आहेत : "अभिलाषश्चिन्तास्मृति गुणकथनोद्वेगसप्रलापाश्च। उन्मादोऽथ व्याधिर्जडता मृतिरिति दशात्र कामदशा ॥" कामविकार प्रबल होण्यापूर्वीच आवरला तर मनाला व्यथा होते (क्र ८११) पण तो मनातल्या मनात जिरू शकतो, या अनुभवावरच कामविन्मुखाची निवृत्ति आधारलेली आहे. बाला (क्र ७५१, ७९१), गर्भिणी (क्र ९२ (व नवप्रसूता) क्र २००) या सुरतव्यवहाराला त्याज्य असल्याचें सांगितलेलें आहे गर्भधारणेनतर सातव्या महिन्यापासून बाळाला दात येईपर्यंत सुरताला मनाई होती तरीही मासप्रसूता (क्र २१९) ही अतिसुखदायिनी असल्याचा उल्लेख आढळतोच! कलिका उमलली वा मधुकराला (क्र ७८९) मन आवरत नाही, कधीं तो कलिकेचें उत्फुल्लकरण मोठ्या कौशल्यानें व सावधगिरीनें (क्र ४४२) करतो आणि कधीं तर ती उमलण्यापूर्वीच तिचें मर्दन (क्र ४४४) निर्दयपणें (क्र ६१३) करण्यास उद्युक्त होतो। प्रेमाचे सर्वच व्यवहार अनिर्बंध हेच खरें!

स्त्री पुरुष सुरतासाठी भिन्न आसनांची योजना का करतात? कारण रसिक मनुष्य (क्र ४७६) ऋजुक रतानें संतुष्ट होत नाही!

कामशास्त्रकारांनी नमूद केलेल्या आसनांपैकी गाथासप्तशतीत फक्त पुरुषायिताचा नामपूर्वक (क्र ४, ५२, १५१, १९६, ३९३, ४४०, ४८३, ६१४, ६५४, ८१०, ९८८) पुनःपुनरुच्चार झालेला आहे अन्य आसनें आराधित आहेत पुरुषायित मानवांना आवडत, तसेच गधर्व देवादिकांनाही (क्र.१५१, ४४६, ८१०) पैगंबरानें मात्र धर्मविरुद्ध म्हणून पुरुषायिताचा निषेध केलेला आहे (राजवाडे : पूर्वोक्त - पृ ८२८), तरीही शेख नफ्जवी यानें

(The Perfumed Garden : पृ. 81) त्याचा उल्लेख केलेला आहे. गर्भिणांना हे आसन अयोग्य (क्र. ४८३) मानलेले आहे, इतकेच नव्हे, विपरीत संभोगाने गर्भसंभव होत नाही (क्र. ६५४) असाही उल्लेख आलेला आहे. वात्स्यायनाने (२. ८. ३२) नवप्रसूतेला पुरुषायिताची मनाई केली आहे. पुरुषायिताने गर्भसंभव होत नाही असे यशोधराने जयमङ्गलेत (काव्यालंकार सुपरकर शास्त्री प्रत : पृ. २६३) सांगितले आहे. क्र. ११ मध्ये धेनुका-सनाची सूचना आहे असे टीकाकार सांगतात. वात्स्यायनाने याचे लक्षण (२. ६. ३७) सांगितले आहे : " भूमौ वा चतुष्पदवदास्थिताया: वृषलीलयाऽवस्कन्दनं धेनुकम्।। " क्र. ४११ व ४२५ मध्ये त्रिविक्रमबंधाची सूचना आहे असे टीकाकार सांगतात. क्र. ५२१ मधील सुरत हे मार्जार सुरतासारखे भासते. क्र. ५५८ मध्ये जलक्रीडेचा उल्लेख आहे जलांतील आसनप्रयोग सुलभ असल्याचे सुवर्णनाभाचे मत उद्धृत करून वात्स्यायन (२. ६. ३३) सांगतो की जलामध्ये सुरतक्रिया शिष्टजनांनी निषिद्ध मानली आहे, सबब ही अयोग्य आहे. क्र. ८८४ या गाथेंत गोयूथिकरताची सूचना आहे असे टीकाकार सांगतात. त्याचे लक्षण वात्स्यायनाने (२. ६. ४१) सांगितले आहे: " बह्वीभिश्च सह गोयूथिकम्। " गाईंच्या खिल्लारांत एक बैल जसा वावरतो तसा एक पुरुष स्त्री-समूहात रममाण होत असल्यामुळे गोयूथिक ही संज्ञा पूर्णतया समुचित आहे, असे या सूत्रावरील टीकेंत यशोधराने सांगितले आहे.

सुरतसमयी अनेक विकल्प व विभ्रम संभवतात. नववधूला सुरतविधीची माहिती नसते. लज्जा व धास्ती मात्र बहुत असते, म्हणून ती डोळ्याला डोळा भिडवीत नाही (क्र. ६४५) व संविष्टितोरु (क्र. ६४६) असते; तिला अनुकूल करून घेण्याला अनेक टावपेच लढवावे लागतात; तरीही, किंवा म्हणूनच, तिचा समागम रुळलेल्या प्रथमगृहिणीपेक्षा अधिक सुखदायक (क्र. ४७९) वाटतो. प्रियकराला संतुष्ट करण्याची तिची इच्छा असते, पण विरामस्थिति माहीत नसते (क्र. ९५५), यामुळे प्रियकराचा मात्र विरस होतो, रत च्या सामर्थ्याबद्दल साशंकता वाटते; माहितगार महिला मात्र अवसानानंतर परस्पर चा श्रमभार हलका करण्याचा यत्न (क्र. २९९) करतात. हा विधीच असा विलक्षण आहे की परतीच्या मनांत पतविषयीं कितीही

आदर असला तरी ती सुरतसमयीं त्याला एकवचनात आज्ञा देण्याला धजते। सामान्यत विवाहित स्त्रीपुरुषाना एकनिष्ठेची अपेक्षा असते पति अन्येन्या नादी लागला किंवा आहारीं गेला किंवा तसा सशय आला या पत्नीला मत्सर (क्र १, ३३, ४३, ७२६, ७३१, ८६०, ९०२, ९३२) वाटता प्रतिबिंबाचा (क्र ९३२) आणि आख्यानातील नायिकेचा (क्र ८६२) ही एकादीच अशी उदार असते या ती मत्सर आवरून स्वत पतीसाठीं दौत्य (क्र ८४) करावयास सिद्ध होते पण ज्याचे अगा विशेष गुण असतात व याची जाणीव असते त्याना त्याचें चीज व्हावें अशीही अपेक्षा असते म्हणूनच क्र ४८ च्या गुणी नायिकेला एकान्तरस पति अरसिक वाटतो मानवाची मनोवृत्ति सकीर्ण असते, म्हणूनच क्र ४४ च्या नायकाला अन्यमहिलाप्रसगीं स्वमहिलेची आठवण झालेली आहे; म्हणूनच क्र ६६१ च्या नायकाला सुरतरसिक भार्या बहुशिक्षिता असावी असा सशय आलेला आहे। वस्तुत सुरतातील विलास कोणी कोणाला शिकवीत नाहीं, फार तर कुसुम्भ (क्र ३९२) कुमारिकाना विभ्रम शिकवतो, पण स्नेहानुबध (क्र ४७७) हाच त्याचा एकमेव आचार्य। अर्थ ती तोच असला तरी 'कौशल्य मोठें रचनेंत आहे' क्र ४४० चा नायक कलिकाभङ्गप्रसगीं अनुभवसिद्ध कौशल्य उपयोजीत आहे क्र ४६२ या गाथेंत हाच सिद्धान्त कुशल गवळ्याचा दृष्टात देऊन माडलेला आहे अनुभवसिद्ध कौशल्य हेंही केव्हा केव्हा तान्त्रिक किंवा यान्त्रिक वाटतें, चर्वितचर्वणासारखें (क्र ३७४) वाटतें, इतकेंच नव्हे, दुर्विदग्धसुरत सशास्त्र असलें तरी दु खद (क्र ५६) होतें रसिकाचा सुरताचा सकल्प ठरण्यात (क्र ६१) होतें तेवढें सुख, मग भले तो सकेत सिद्धीस न जावो तेवढें समाधान वाह्य अविदग्धाशीं होणाऱ्या सभोगानें होत नाहीं जो सुरतरसिक असतो तो सौंदर्याच्या पुरेपूर आस्वादासाठीं सदीप सुरत (क्र ५४७) रमतो, इतकेंच नव्हे, सुरतानतर स्त्रीच्या विकलागाच्या निरीक्षणानें वैदग्ध्य प्रकट (क्र ४१३) करतो, एवढेंच नव्हे, दुसऱ्या दिवशी तिच्या मुखावर प्रकट होणाऱ्या छटा पहावयास अधिक उत्सुक (क्र २०९, ७१२) असतो।

गाथासप्तशतीच्या नायिका सामान्यत सुरतसमयीं विवस्त्र (क्र ३५१, ४५७ ४५६, ४६१, ५२०, ७१८) आढ़त, हेरोडोटस (३ १० १) सागतो त्या-

भ्रमाणें घराबाहेरच ( क. ४६१ ) नव्हे, घरातही, असा रिवाजच ( क ५२० ) असवा. कुलवधूला सुरतोत्तर एकातांतही याची लाज ( क ४५९ ) वाटते. क. ३१६ व ८७३ या गाथात ग्रामस्त्री सुरत सूचित आहे. कुग्रामातल्या स्वयं-पाकात तूप मीठ नसते, साधें अन्न मात्र पोटभर असतें, त्याप्रमाणें ग्रामस्त्री-सुरतात बाह्योपचार मिळणार नाहात पण कुचराई होणार नाहा, कुग्रामात मऊ शय्या मिळणार नाहीं, पण उन्नत पयोधराचा आश्रय मिळेल क. १९६ व ८८४ मध्यें वेश्यासुरताचा उल्लेख आहे. हें सुरत रसिकाला संपूर्णतया सुसतुष्ट करतें, कारण या बाबतीत पुरुषाच्या ज्या ज्या अपेक्षा व तृषा असतात त्या त्या तेथें भागतात, आणि गौथूथिकेची व्यवस्था अन्यत्र अशक्यच! क ३३३ मधील चौर्यरताचा उल्लेख वास्तवपूर्ण आहे असें टीकाकार सागतात! यासाठी आणखी कोणती सावधगिरी घेतली पाहिजे याविषयीं सूचना क. ४१५, ९५२, ९५३ या गाथात दिलेल्या आहेत अगावर कोठें ओरखडा किंवा गाला-वर नाजूक काटा उमललेला दिसला का सशयाला साधे मिळावयाची, अशा माणसाच्या दृष्टींतून अधरव्रण ( क ८८८ ), धाप ( क ८७५ ) किंवा भ्रमवलय ( क ४३८ ), सुगध ( क. ५१ ), स्वेद ( क. ३५८, ३५९, ४०७, ४०८, ४४०, ७१८, ८२२, ८२८, ८७५, ९३२ ), इत्यादि चिन्हें कशा निसटणार? रतिसमयी प्रकट होणाऱ्या विभ्रमाबद्दल वात्स्यायन ( २.७ ) सागतो. रतिचक्रप्रवर्तस्य नास्ति शास्त्र न च क्रम. ।... . स्वप्नेष्वपि न दृश्यन्ते ते भावास्ते च विभ्रमा. ॥ क्र. ५ या गाथेंत सागितलें आहे या नैसर्गिक विभ्रम हे तृप्तापर्यंतच व्यक्त होतात, अन्य विभ्रम हे कृत्रिम होत. कुलस्त्रीचा शृगार ( क ८७२ ) व विभ्रम फक्त पतीसाठीं असतात आणि तो प्रवासाला निघाला की तेही, इतकेंच नव्हे, तिचें यावन व सौंदर्य हींही त्याच्याबरोबर प्रवासाला जातात, असें सार्वत्रिक विधान क ८६५ या गाथेत आढळतें

सुरतासाठीं वेश्येप्रमाणेंच चरक चालविणाऱ्या धडधाकट पुरुषानें नीरस व वयस्क नायिकेकडून मोबदल्याची अपेक्षा केलेली आढळते. प्रौढाला किंवा वृद्धालाही बाला हवीशी वाटते, म्हणून बालिकेचें सगोपन हा केलें जातें, त्याचप्रमाणें वृद्धेलाही तरुणाची हौस वाटते ( क. १९, ७७० ) असें दिसतें. एवढेच काय, मद्यपान केलें असता ( क ९७८ ) ती आकर्षकही दिसते!

धृदेच्या समासामुळें तरुणाशही पदरर येतें असा कामशास्त्राचा इशारा आहे; तो पत्करत असेल त्यानेंच असं साहस करावें! क्र ४०० या गाथेंतला प्रसग धुडुबरसिकाना वारवार अनुभवास येणारा आहे, पण तथाकथित सुसस्कृत साहित्यात प्रचलित संकेतामुळें असे उल्लेख करावयास कोणी धजत नाहीत

निष्कर्ष

सस्कृत काम, नाट्य व साहित्य शास्त्रकारानीं शरीराचा असा अगोपागें व नऊ प्रत्यगें कल्पिलेलीं आहेत, अग मस्तक, स्कन्ध, वक्ष, कटि, पार्श्व, हस्त व पाद, उपागें भुज, मणिबन्ध, जघा व ऊरु प्रत्यग मुख, भ्रू, दृष्टि, कपोल, नासिका, अधर, दत, जिव्हा व हनु या सर्व अगप्रत्यगाचे उल्लेख गाथासप्तशतात अनेकदा आलेले आहेत आणि त्याद्वारा व्यक्त होणारे व्यक्तिमत्त्व व सौंदर्य गाथासप्तशतात प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षपणें वारवार प्रत्ययास येत प्राचीन व मध्ययुगीन सस्कृत व प्राकृत कवीना स्त्रीसौंदर्यवर्णनाचे अनेक सकेत रूढ केलेले आहेत त्याचा तेवढा योजना येथ केलेली आढळत नाहीं गाथासप्तशताच्या सपादनकालात हे सकेत एवढे रूढ झालेले नसावेत शिवाय त्याच्याप्रमाणें स्थिर सौंदर्यवर्णनाकडे गाथाकवीचा कल नाही, आणि स्वीकारलेल्या माध्यमाच्या मुद्रित स्वरूपामुळें त्याना तेवढी सवडही नाहीं गाथाकवीना चल सौंदर्यच अभिप्रेत आहे आडपडद्याच्या व कृत्रिमतेच्या अभावी, सामान्य व्यवहारात, भावनाच्या प्रकटनात, गात्राच्या चलनवलनामुळ व्यक्त होणारा सौंदर्याचा आविष्कार गाथाकवीनीं वाणला आहे गाथाकवि स्थिर अवयवाभोवतीं घुटमळत नाहात, त्याना उपमा देण्यात रगत नाहात नायिकेच नग्नदर्शन झालें तरी, तर त कार तर श्वास रोधून धरतील चार दोन शब्दात प्रसगाचें बाह्य व स्थूल चित्रण करून गाथाकवि अत प्रेरणाकडे वळतो आणि त्याच ही दिग्दर्शन तेवढ्याच झटक्यात चार दोन शब्दात असं करतो का निसर्ग जन्माचा चटका लागावा! ह्या चित्राच्या ठळक बाह्यरेषामध्यें छायाप्रकाशाच्या किंवा रगीबेरगीं छटा भरलेल्या नसल्या तरी त इतक स्वयपूर्ण असतें कीं जणू जिवतपणा समोर उभें ठाकतें!

गाथासप्तशतीच्या नायिकेच्या सामूहिक (Composite) स्वरूपाबद्दल काहीं अनुमानें काढता येतात

गाथासप्तशतीच्या नायिका मुख्यतःकरून तीन वर्गांच्या आहेत आर्य हलिक व वन्य आर्य या वरिष्ठ वर्गात क्षत्रिय व वैश्य हे समाविष्ट होतात हे वर्ग हलिकांना हलके लेखतात, हें खरें पण ते केवळ आर्थिक व सांस्कृतिक दृष्ट्या आर्यांचे अंगीं असलेल्या गुणांचें वैशिष्ट्य सामान्य जनतेला मान्य आहे त्यांच्या साहचर्यामुळें त्यांचे गुणावगुण सामान्य वर्गांमध्यें अनुस्यूत होत आहेत आणि मुख्यतःकरून स्त्रियांचे मार्फत सामान्य वर्गांचें उत्थापन होत आहे आर्य व द्रविड यांच्या समन्वयानें दक्षिणापथाची वसाहत झाली असावी या अनुमानाला गाथासप्तशतीत आधार आढळत नाही वरिष्ठ वर्गातील स्त्रिया व्यवस्थितपणें वेषधारण करतात प्रसाधनें वापरतात आणि आभिजात्याच्या बंधनात वावरतात हलिक व वन्य स्त्रिया सामान्यत कृत्रिमतेपासून अलिप्त आहेत त्यांची शरीरयष्टि मजबूत आहे आणि चाल ताठ आहे उन्नत स्तन व पृथुल नितंब यामुळें त्यांच्या गतीला गांभीर्य आलेलें आहे पण कुलीनतेच्या कृत्रिम बंधनाच्या भारामुळे त्या आपल्या अवयवांचा गौरव छपविण्यासाठीं पाठीला पोंक आणून किंवा अंग चोरून चालणार नाहीत हिंदी लग्नाउत्सयात आढळणारे व म्हणींत समाविष्ट करून गौरविलेले ‘ मरहट्टणिचे कुच ’ गाथासप्तशतींत वारंवार दिसतात गाथासप्तशतीच्या नायिका दिलखुलास मनमोकळ्या आहेत, निर्भय आहेत पण त्या काळाच्या मानानें निर्लज्ज नाहीत नदीवर स्नानाला किंवा वनात विहाराला चल असें प्रियकरानें किंवा मैत्रिणीनें सुचविण्याचा अवकाश की लाच आढवेढ न घेता ती घराबाहेर पडेल मित्रमैत्रिणींच्या समवेत वाळवंटात पिंगाणा घालील आणि कामधामाला किंवा पुरुषांशी बरोबरीनें सहकार्य करण्याला डरणार नाही पतीनें वाद्य हातीं घेतलें तर त्याच्या तालावर ती नाचेल किंवा सुरावर गाणं म्हणेल प्रियकरानें सुरतासाठी आग्रह केलें तर ती आडोशासाठी अडणार नाही इतकेच नव्हे कोठें व केव्हां याचा नेम नाही, स्वयंप्रेरणेनें सुरताची मागणी करील आणि सामान्यत ज्याचे चौसष्ट अश्लील मानील असे प्रकार सुरतसमयी सीत्कारपूर्वक घडण्यात आनंद मानील प्रपंचाचे व्यवधान सांभाळील आणि साहसाला प्रवृत्त होईल अशी ही दिलदार व हौशी आहे

गाथासप्तशतीच्या सामूहिक नायिकेच्या लैंगिक गुणदोषांचें विवेचन

ठरेंच आहे; सातवाहन कुळाच्या थोरवीची तुलना उत्तुंग व विस्तीर्ण हिमालयाशींच होऊ शकते आणि गोदावरीच्या परिसरात सातवाहनाएवढी कीर्ति दुसऱ्या कोणत्याही कुळानें आजवर संपादन केलेली नाहीं. मौर्य युग हें बौद्धाचें सुवर्णयुग आणि गुप्त युग हें वैदिकाचें. या युगांच्या दरम्यानच्या कालखंडाला सातवाहनयुग हेंच अभिधान द्यावें लागतें. या युगाला महाराष्ट्राचें पहिलें सुवर्णयुग असें अभिधान दिलें तर तें यथार्थ ठरेल. अशोकाच्या काळात बौद्ध भिक्षुना राजाश्रय मिळाला आणि गुप्त काळांत संस्कृत कवींना व पण्डितांना, स्मृतिकारांना व पुराणिकांना. गुप्त काळात वैदिकांना जें यश लाभलें त्याचा पाया सातवाहनानींच घातलेला आहे. पहिल्या सातकर्णीनें यज्ञ संस्थेचा पुनरुद्धार केला आणि गोतमीपुत्र सातकर्णीनें चातुर्वर्ण्याची प्रस्थापना केली. हाल सातवाहनाचें कर्तृत्व असेंच अव्वल दर्जाचें आहे त्यानें स्वतंत्र प्राकृत साहित्याची निर्मिति केली व करविली आणि प्रचलित लोकगीतांचें संकलन केलें.

उत्तर हिंदुस्थानांत अशोक व दक्षिण हिंदुस्थानात पहिला सातकर्णी, हे प्राकृताचे आद्य पुरस्कर्ते हम्रस्व-पूर्वजाच्या या परंपरेला अनुसरून हाल सातवाहनानें महाराष्ट्री प्राकृतात आणि गाथा या महाराष्ट्री वृत्तात (Colebrooke : Sanskrit and Prakrit Poetry : Asiatic Researches : X : p. 415) गाथासप्तशती या गाथाकोशात लोकसाहित्याचा संग्रह केला. गुणाढ्यानें पैशाची भाषेत लिहिलेला बृहत्कथा हा कथासंग्रह आणि कातन्त्र व्याकरण याचाही हालाशीं (Smith : Z. D. M. G : p 60?) संबंध जोडण्यात येतो. या विषयीं अनेक दंतकथा प्रचलित आहेत. हाल शालिवाहन हा दर चार दिवसांनीं चार वर्णांतील एकेका सुंदरीशीं लग्न करून अंतःपुरात भरती करूं लागला. यामुळें तरुणांना वधू मिळेनात. तेव्हा एका द्विजानें देवीची प्रार्थना केली देवीनें सुंदरीचें स्वरूप धारण केलें व एकांतात राजाला भेटून भेडसावलें. तेव्हापासून राजाचा बायकांचा नाद सुटला (लीलाई: प्रस्तावना : डॉ. उपाध्ये). सातवाहनाच्या अंतःपुरात पाचशें राण्या होत्या. पैकीं चंद्रलेखा ही पट्टराणी. एके दिवशीं ती सखयासह प्रतिष्ठानच्या देवीकुंड नामक तडागात जलक्रीडा करीत असता राजा तिच्या अंगावर पाणी उडवू लागला. माझ्या अंगावर पाणी उडवू नको असे राणीनें त्याला संस्कृतात सांगितलें. मोदकैः हा समास ऐकून

राजाला वाटलें कीं राणीला मोदकाचा मार हवा आहे. त्यानें पाकशाळेंतून मोदक मागवले व ते राणीच्या अंगावर फेंकले. तेव्हा राणीनें मंत्रिणींसमक्ष राजाचा उपहास केला. ही राणी सुसंस्कृत म्हणवून घेणाऱ्या घराण्यातील असावी. अशा घराण्याशीं सोयरीक करण्याची पद्धत सातवाहन कुलांत वारंवार आढळते. संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन हा पतंजलि प्रेरित क्रांतीचा एक परिणाम उत्तर हिंदुस्थानात विशेष प्रसृत झाला होता. अपमानामुळें व्यथित झालेल्या राजानें सरस्वतीची आराधना केली प्रबन्धकोशात सरस्वतीला भारती म्हटलेलें आहे. देवी प्रसन्न झाली तेव्हा हालानें वर मागितला कीं माझ्या राजधानींतले सारे नागरिक व राज्यातले सारे लोक कवि व्हावेत. त्याप्रमाणें झालें. या नवकवींनीं लिहिलेल्या एक कोटि, कोणी सांगतात दहा कोटि गाथा जमवून हालानें त्यापैकीं सातशें गाथा निवडल्या आणि त्याचा गाथासप्तशती या सुभाषितकोशात संग्रह केला. हालानें चार गाथांना दहा कोटि मुद्रांचें मूल्य दिलें अशी कथा प्रबन्ध चिंतामणींत सांगितलेली आहे. संस्कृत व्याकरण शिकविण्याविषयीं राजानें आपल्या पण्डितांना आवाहन केलें असता गुणाढ्यानें ६ वर्षांची मुदत सांगितली आणि शर्ववर्म्यानें सहा महिन्यात राजाला व्याकरणात पटाईत करण्याची प्रतिज्ञा केली शर्ववर्म्यानें कार्तिकेयाच्या कृपेनें कातन्त्र व्याकरण संपादन केलें व तें राजाला शिकविलें. व्युत्पन्न राजानें प्रसन्न होऊन शर्ववर्म्याला भरुकच्छची सुभेदारी दिली. ही कथा कथासरित्सागरात आलेली आहे.

अगदीं अलीकडे श्री सोहनी यानीं "कालिदास, हाल सातवाहन व चंद्रगुप्त II" हा लेख लिहून प्रसिद्ध केला ( Journal of the Bihar Research Society Vol. XLI Part 2 1955 pp 229 244 ) आहे. त्याचा सारांश येथें दिल्यावाचून राहवत नाहीं :

" मेघदूतात कालिदास सांगतो

हित्वा हालामभिमतरसां रेवतीलोचनाङ्काम्
बन्धुप्रीत्या समरविमुखो लाङ्गली याः सिषेवे
कृत्वा तासामभिगममपां सौम्य सारस्वतीनाम्
अन्तः शुद्धस्त्वमपि भविता वर्णमात्रेण कृष्णः ॥

अमरकोशावरील टीकेंत क्षीरस्वामी सांगतो, 'जहाति लज्जामनया हाला ।'

| देश | आचार | आलिंगन | कुचमर्दन | चुंबन | दंतक्षत | नखक्षत | प्रहणन | सुरत | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अपरान्त-लाट | | उत्सुक | मंद | अविरत-रत | मंद | मंद | मंद-रत | रतिललित | सुरसतमयीं सीत्कार, आलिंगन समयीं प्रियकराचे गळ्यांत मिठी. नायकाच्या शरिरावर क्षतें करण्याविषयीं उत्सुक. |
| अवन्ति | | | | विरक्त | विरक्त | विरक्त | | चित्ररत-प्रिय | अपशब्द आवडतात. |
| आन्ध्र | आचारभ्रष्ट | | असह्य | | | | | रतिप्रिय | अमंगल आवडी. |
| आभीर | | प्रिय | अतिप्रिय | प्रिय | प्रिय-विरक्त | प्रिय-विरक्त | प्रहणन-साध्य | | क्षतांनीं जखम करीत नाहीत. |
| मध्यदेश | आर्यप्रधान सात्त्विक | उत्सुक | | विरक्त | विरक्त | विरक्त | मध्यम-प्रवृति. | चित्ररत | |
| महाराष्ट्र | | प्रिय | | प्रिय | प्रिय | प्रिय | प्रसिद्ध | उघड्यावर | गीतवाद्यादि चौसष्ट कलांच्या (?) (आसनांच्या) प्रयोगानें संतुष्ट. अश्लील व कठोर शब्द धीटपणें रतांत प्रवृत्त – स्वयंप्रवृत्त – स्वतः आरंभतात. पाटलीपुत्राच्या स्त्रियांचीं लक्षणें अशींच आहेत. पण त्या सुरतास उघड्यावर नव्हे, अंतःपुराच्या एकांतींच प्रवृत्त होतात. |

येयवर केलें, त्यावरून तिच्या प्रादेशिकत्वाबाबत काहीं निर्णय घेता येतो किंवा कसे तें आता पाहू. वात्स्यायनादि कामशास्त्रकारांनीं हिंदुस्थानातील देशोदेशाच्या स्त्रियांचीं लैङ्गिक वैशिष्ट्यें देश्योपचार प्रकरणात सांगितलीं आहेत. त्या त्या देशातल्या स्त्रीशीं प्रसंग आला असता तिचे रंजन कसे करावें या अनुरोधानें त्यांनीं हीं लक्षणें सांगितलेलीं आहेत. त्यांनीं नमूद केलेली *तपशील कारणापुरता दिला आहे*.

कामशास्त्रकारांनीं सांगितलेलीं हीं लक्षणें त्यांच्या वैयक्तिक निरीक्षणावर आधारलेलीं आहेत की पारावर चर्चिल्या जाणाऱ्या ग्राम्य गोष्टींवर, हें सांगता येणार नाहीं. हीं लक्षणें त्या त्या देशातील व्यक्तिमात्राचे ठायीं हटकून आढळतीलच असा भरवसा महर्षि म्हटल्या जाणाऱ्या वात्स्यायनालाही देता येणार नाहीं. सामान्यत: अशीं लक्षणें अपेक्षात्रीत एवढच त्यांचें सांगणे आहे. तीं लक्ष्यात घेतलीं असता निष्कर्ष निघतो की गाथासप्तशतीच्या नायिकेच्या ठायीं दृष्टोत्पत्तीस येणारे गुणदोष विशेषत: अपरान्त, अभीर, लाट व महाराष्ट्र या देशातील स्त्रियांचे अंगीं आहेत अशी या शास्त्रकारांची ग्वाही आहे. महाराष्ट्रात स्थायिक झालेल्या समाजात आभीर आहेत, तसेच पाटलीपुत्राहून आलेले लोक ही आहेत, असा समाजशास्त्रज्ञांचा सिद्धान्त आहे. त्याला या वर्गीकरणाचा पाठिंबा आहे आणि गाथासप्तशतींतील नायिकांच्या लैङ्गिक वैशिष्ट्याचाही!

## १८ संकीर्ण : सांस्कृतिक व साहित्यिक

सातवाहनयुगानंतर निर्माण झालेल्या संस्कृत व प्राकृत साहित्यात नमूद असलेल्या अनेक उल्लेखांनीं गाथासप्तशतीच्या कर्तृत्वाचें श्रेय एकमुखानें हाल सातवाहनाला दिलेलें आहे.

सातवाहन कुलाचा गौरव करणाऱ्या दोन अनामिक गाथा उपलब्ध आहेत.

उत्तरओ हिमवन्तो दाहिणओ सालवाहणो राआ
समभारभरक्कन्ता तेण ण पल्हत्थए पुहवी ॥
सच्चं भणइ गोदावरि पुव्वसमुद्देण साहिआ सन्ती
सालाहण कुलसरिसं जइ ते कूले कुलं अत्थि ॥

सरेंच आहे; सातवाहन कुळाच्या थोरवीची तुलना उत्तुंग व विस्तीर्ण हिमालयाशींच होऊं शकते आणि गोदावराच्या परिसरात सातवाहनाएवढी कीर्ति दुसऱ्या कोणत्याही कुळानें आजवर संपादन केलेली नाही. मौर्य युग हें बौद्धाचें सुवर्णयुग आणि गुप्त युग हें वैदिकाचें. या युगाच्या दरम्यानच्या कालखंडाला सातवाहनयुग हेंच अभिधान द्यावें लागतें. या युगाला महाराष्ट्राचें पहिलें सुवर्णयुग असें अभिधान दिलें तर तें यथार्थ ठरेल. अशोकाच्या काळात बौद्ध भिक्षूंना राजाश्रय मिळाला आणि गुप्त काळात संस्कृत कवींना व पण्डितांना, स्मृतिकारांना व पुराणिकांना. गुप्त काळात वैदिकांना जें यश लाभलें त्याचा पाया सातवाहनांनींच घातलेला आहे. पहिल्या सातकर्णीनें यज्ञ संस्थेचा पुनरुद्धार केला आणि गोतमीपुत्र सातकर्णीनें चातुर्वर्ण्याची प्रस्थापना केली. हाल सातवाहनाचें कर्तृत्व असेंच अव्वल दर्जाचें आहे त्यानें स्वतंत्र प्राकृत साहित्याची निर्मिति केली व करविली आणि प्रचलित लोकगीतांचें संकलन केलें.

उत्तर हिंदुस्थानात अशोक व दक्षिण हिंदुस्थानात पहिला सातकर्णी, हे प्राकृताचे आद्य पुरस्कर्ते सम्राट् पूर्वजांच्या या परंपरेला अनुसरून हाल सातवाहनानें महाराष्ट्री प्राकृतात आणि गाथा या महाराष्ट्री वृत्तात (Colebrooke: Sanskrit and Prakrit Poetry: Asiatic Researches; X: p. 415) गाथासप्तशती या गाथाकोशात लोकसाहित्याचा संग्रह केला. गुणाढ्यानें पैशाची भाषेंत लिहिलेला बृहत्कथा हा कथासंग्रह आणि कातन्त्र व्याकरण याचाही हालाशीं (Smith. Z D. M G: p 600) संबंध जोडण्यात येतो. या विषयीं अनेक दन्तकथा प्रचलित आहेत. हाल शालिवाहन हा दर चार दिवसांनीं चार वर्णांतील एकेका सुंदरीशीं लग्न करून अन्तःपुरांत भरती करूं लागला. या मुळें तरुणांना वधू मिळेनात. तेव्हा एका द्विजानें देवीची प्रार्थना केली देवीनें सुंदरीचें स्वरूप धारण केलें व एकातांत राजाला भेटून भेडसावलें. तेव्हापासून राजाला बायकांचा नाद सुटला (लीलाई: प्रस्तावना: डॉ. उपाध्ये). सातवाहनाच्या अन्तःपुरात पांचशें राण्या होत्या पैकीं चंद्रलेखा ही पट्टराणी. एके दिवशीं ती सरस्वतीसह प्रतिष्ठानच्या देवीकृत नामक तडागात जलक्रीडा करीत असतां राजा तिच्या अंगावर पाणी उडवूं लागला. माझ्या अंगावर पाणी उडवूं नको असें राणीनें त्याला संस्कृतात सांगितलें. मोदकैः हा समास ऐकून

राजाला वाटलें की राणीला मोदकाचा मार हवा आहे. त्यानें पाकशाळेतून मोदक मागवले व ते राणीच्या अंगावर फेंकले. तेव्हा राणीनें मैत्रिणींसमक्ष राजाचा उपहास केला. ही राणी सुसंस्कृत म्हणून घेणाऱ्या घराण्यातील असावी. अशा घराण्याशीं सोयरीक करण्याची पद्धत सातवाहन कुलात वारंवार आढळते. संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन हा पतंजलि प्रेरित क्रांतीचा एक परिणाम उत्तर हिंदुस्थानात विशेष प्रसृत झाला होता. अपमानामुळें व्यथित झालेल्या राजानें सरस्वतीची आराधना केली. प्रबन्धकोशात सरस्वतीला भारती म्हटलेलें आहे. देवी प्रसन्न झाली तेव्हा हालानें वर मागितला की माझ्या राजधानींतले सारे नागरिक व राज्यातले सारे लोक कवि व्हावेत. त्याप्रमाणें झालें. या नवकवींनीं लिहिलेल्या एक कोटि, कोणी सांगतात दहा कोटि गाथा जमवून हालानें त्यापैकीं सातशें गाथा निवडल्या आणि त्याचा गाथासप्तशती या सुभाषितकोशात संग्रह केला. हालानें चार गाथांना दहा कोटि मुद्रांचें मूल्य दिलें अशी कथा प्रबन्ध चिंतामणींत सांगितलेली आहे. संस्कृत व्याकरण शिकविण्याविषयीं राजानें आपल्या पण्डितांना आवाहन केलें असता गुणाढ्यानें ६ वर्षांची मुदत सांगितली आणि शर्ववर्म्यानें सहा महिन्यात राजाला व्याकरणात पटाईत करण्याची प्रतिज्ञा घेतली. शर्ववर्म्यानें कार्तिकेयाच्या कृपेनें कातन्त्र व्याकरण संपादन केलें व तें राजाला शिकविलें. त्यु पर राजानें प्रसन्न होऊन शर्ववर्म्याला भरुकच्छची सुभेदारी दिली. ही कथा कथासरित्सागरात आलेली आहे.

अगदीं अलीकडे श्री सोहनी यानीं "कालिदास, हाल सातवाहन व चंद्रगुप्त II" हा लेख लिहून प्रसिद्ध केला (Journal of the Bihar Research Society Vol XLI Part 2 1955 pp 229 244) आहे. त्याचा सारांश येथे दिल्याशिवाय राहवत नाहीं :

"मेघदूतांत कालिदास सांगतो

> हित्वा हालामभिमतरसां रेवतीलोचनाङ्काम्
> बन्धुप्रीत्या समरविमुखो लाङ्गली याः सिषेवे
> कृत्वा तासामभिगममपां सौम्य सारस्वतीनाम्
> अन्तः शुद्धस्त्वमपि भविता वर्णमात्रेण कृष्णः ॥

अमरकोशावरील टीकेंत क्षीरस्वामी सांगतो, 'हाला इत्यामन्त्रणा हाला।'

मल्लिनाथ टीकेंत सांगतो, "अभियुक्त देशभाषा पदमित्यत्र सूत्रे हाला इति देशभाषापदमप्यतीव कविप्रयोगात् साधु।' काव्यालंकारसूत्रांत वामन सांगतो, 'अतीव कविभिः प्रयुक्तं देशभाषापदं योज्यम्। यथा-योषिदिति अभिलाष न हालाम्। इत्यत्र हाला देशभाषापदम्।' गाथासप्तशतींत सांगितलें आहे कीं प्राकृत काव्य हें अमृतासारखें आहे. प्राकृत काव्य हें 'ललित, मधुराक्षर व सशृंगार' असतें असें वज्जालग्गात वचन आहे. आढ्यराजाची प्रजा प्राकृत-भाषी आणि साहसांकाची संस्कृतभाषी, असें विधान भोजानें सरस्वती-कंठाभरणात केलेलें आहे. साहसांक म्हणजे चंद्रगुप्त विक्रमादित्य. त्याच्या अंतःपुरात संस्कृत व कुंतल सातवाहनाच्या अंतःपुरात प्राकृत भाषा चालत, असें राजशेखरानें काव्यमीमांसेत सांगितलेलें आहे. कुंतल शातकर्णी शातवाहनानें कर्तरि प्रयोगानें महादेवी मलयवतीला मारलें असें वात्स्यायनानें कामसूत्रात सांगितलेलें आहे. गाथासप्तशतीच्या एका प्राचीन हस्तलिखितातला अखेरचा मजकूर डॉ. पीटर्सन यांनीं प्रसिद्ध केला आहे. 'गाथासप्तशतीचा कर्ता श्री सातवाहन नरेंद्र हा कुन्तलजनपदाचा राजा होता, त्याची राजधानी पैठण येथें होती व त्याचीं उपनामें हाल व शतकर्णि अशीं होतीं; द्वीपकर्णि हा त्याचा पिता आणि मलयवती ही त्याची राणी, शर्ववर्मा हा त्याचा मित्र होता व तो गुणाढ्याचा आश्रयदाता होता.' या वचनावरून निष्कर्ष निघतात ते असेः— वात्स्यायनाचा कुन्तल सातकर्णी व गाथासप्तशतीचा हाल सातवाहन हे एकच. मलयवती ही हालाची राणी होती असें लीलावती या प्राकृत काव्यावरूनही दिसून येतें, वात्स्यायनानें तिचाहि उल्लेख केलेला आहे. भोजाचा आढ्यराज हा ही हाल सातवाहनच. हाल सातवाहनचें दातृत्व विख्यात आहे. क्र ४६७ या गाथेतील शालिवाहनाची ओळख हालाशींच पटते. क्र ४६४ या गाथेंतील विक्रमादित्य हें अभिधान हालाचेंच आहे त्याच्या दानशौर्याचें वर्णन भद्र-बाहूच्या निर्युक्ति भाष्यात आलेलें आहे. कालिदासाला हाल माहीत होता, एवढेंच नव्हे, त्यानें गाथासप्तशतीचा सूक्ष्म अभ्यास केला होता. कालिदासाच्या ऋतुसंहारावर गाथासप्तशतीची छाप जागोजाग दिसते. गाथासप्तशतींतील शिव-पार्वतींचा कालिदासानें कुमारसंभव व मेघदूत यांत उपयोग केलेला आहे. कुमारसंभवांतील (१-३१; ५-२४) श्लोकांचें उगमस्थान क्र. २७८ या

गार्थेत आढळतें. आणि मेघदूतातल्या अकराव्या श्लोकाचें उगमस्थान क्र ४७१ या गार्थेत सापडतें. "

ज्याचें माहात्म्य बहुजनसमाजाच्या जीवनाशीं एकरूप होतें त्याच्याच दंतकथा समाजात रूढ होतात. गाथासप्तशतींतल्या काहीं गाथा लम्पट आहेत, म्हणून हालाच्या लम्पटतेची कथा छिद्रान्वेषी लोकांनीं निर्माण केली असावी. संस्कृत पण्डितांनीं जीवनाला, बहुजनसमाजाला विन्मुख होऊन स्वतःपुरतें उच्च पातळीवरलें संकेताधिष्ठित सांस्कृतिक विश्व निर्माण केलें आणि त्या भोंवतीं तत्वज्ञान, व्याकरण इत्यादि आर्ष विद्यांचे तट उभारले आणि उच्च सत्ताधारी व सपन्न वर्गांच्या आश्रयानें प्राप्त झालेल्या आसनावर भरल्या पोटीं मांडा ठोकून उच्च मिरवणारांनीं प्राकृत जीवनाची व सारस्वताची हेटाळणी आरमली तेंव्हा मोदकाची कथा निर्माण करण्यात आली असावी. हालाची रसिकता व विद्वत्ता आणि त्यानें विद्वानांना व लोककवींना दिलेल्या आश्रयाची धन्यता नाकारतां येण्याजोगी नसल्यामुळें आणि स्वतःच्या राजाश्रयाच्या अपेक्षा सबळ करावयाच्या असल्यामुळें उत्तरकालीन पण्डितांनीं व कविमन्यांनीं अतिशयोक्त पारितोषिकाच्या कथा निर्माण केल्या असाव्या. हालासारख्या अत्युत्तम व महाराष्ट्रीय प्राकृत कवींना प्रतिभेचें श्रेय देणें जिवावर आल्यामुळें त्यांनींच भारतीच्या वरदानाची अद्भुत कथा प्रसृत केली असावी असें वाटतें

एवढं मात्र खरें की जणू असा काहीं वरदानाचाच प्रभाव असेल असें भासावें एवढें सांस्कृतिक उत्थान हालाच्या कारकीर्दीत झालें असावें असें गाथासप्तशतीवरून प्रत्ययास येतं हालानें प्रथम सङ्कलित केलेल्या गाथांच्या संख्येवरूनच नव्हे, त्यानें निवडलेल्या गाथांच्या दर्जावरून, या गाथा रचणाऱ्या कवींच्या व कवियित्रींच्या संख्येवरून आणि हा गाथानिर्मितीचा उत्साह चालत होता त्या क्षेत्राच्या विस्तारावरून.

गाथासप्तशतीच्या कर्तृत्वाबद्दल प्राचीन व मध्ययुगीन लेखकांची एकवाक्यता असली तरी अनेक आधुनिक संशोधकांनीं वेगवेगळ्या भूमिकांवरून या बाबतींत वेगवेगळे आक्षेप उपस्थित केलेले आहेत त्यांचा इथें थोडा विचार केला पाहिजे.

डॉ. देवदत्त भांडारकर ( Bhandarkar Commemoration Volume : p. 188 ) सांगतात : या संग्रहांत राधा, वार व विक्रमादित्य यांचे उल्लेख आढळतात, त्या अर्थी त्याचें संकलन सहाव्या शतकाच्या सुरवातीस झालें असलें पाहिजे आणि साहित्याच्या प्राचीनतेबद्दल प्रचलित असलेल्या अनेक अन्य दंतकथाप्रमाण गाथासप्तशतीबद्दलच्या कथा अग्राह्य मानल्या पाहिजेत. विद्याभूषण श्री. धुलेशास्त्री ( वागीश्वरी : वर्ष १ अंक १ ) त्याच्याशीं सहमत आहेत. कापालिक, गणपती व होरा या उल्लेखांवरून आणखी कांहीं संशोधकांनीं गाथासप्तशतीचें संकलन आणखी अलीकडे ओढण्याचा आग्रह धरलेला आहे. महामहोपाध्याय श्री. ओझा ( प्राचीन लिपि माला पृ १६८ ) व डॉ. जयस्वाल ( I. A : Vol 47 : p. 112 ) यांनीं डॉ. देवदत्ताच्या आक्षेपाचें निरसन केलेलें आहे. त्या त्या विषयाच्या अनुरोधानें मी या आक्षेपाची चर्चा केलेली आहे. खुद्द डॉ. वेबर यांनीं गाथासप्तशतीचा काळ तिसऱ्या शतकापूर्वी जात नाहीं असें विधान ( Vorwort ; p xxii ) केलेलें आहे. गाथासप्तशतींतील व्यंजनाच्या स्थानावरून डॉ. कीथ यांनीं अनुमान ( History of Sanskrit Literature ; p. 224 ) केलें आहे कीं हा ग्रंथ ई. स. २०० ते ४०० च्या दरम्यान मांडला पाहिजे. सर्वांत अवांतरी अभिप्राय डॉ. मॅकडोनेल ( Sanskrit Literature : p. 344 ) यांचा आहे; ते सांगतात हा ग्रंथ दहाव्या शतकापूर्वी केव्हा तरी सिद्ध झाला असावा. डॉ. विंटरनिट्झ् ( Geschichte der Indischen Literatur: Vol. III. p. 102) यांनीं मात्र गाथासप्तशतीचा काळ पहिलें किंवा दुसरें शतक असा निश्चित केला आहे. त्याचप्रमाणें डॉ. व्हिन्सेंट स्मिथ ( Z. D. M G. 1902 · p 661 ) यांनीं सांगितलें आहे आहे कीं गाथासप्तशती हा कोश आन्ध्र राजा हाल शातवाहन याच्या पुरस्कारानें ई. स. ६० ते ७० चे दरम्यान संकलित झाला असल्याबद्दल आणि बृहत्कथा व कातन्त्र व्याकरण हे ग्रंथ ही त्याच सुमारास सिद्ध झाले असलेबद्दल आपली खात्री झालेली आहे. यापैकीं कातन्त्र व्याकरणाचा काळ डॉ. बेलवलकरांनीं पहिलें शतक ( Systems of Sanskrit Grammar : p. 83 ) असा ठरविला आहे. या सिद्धान्तापैकीं डॉ. स्मिथ यांचेंच मत मला

ग्राह्य वाटतें. हे आक्षेप घेतले गेले तेव्हापेक्षां आतां अधिक संशोधन झालेलें आहे *आणि संशोधकांची वृत्ति अधिक सहिष्णु झालेली आहे. ज्याचा काल* निश्चित ठरविता येतो असा साहित्यांत किंवा शिलालेखांत आढळणाऱ्या उल्लेखांचें आरंभस्थान तेंच किंवा त्याच्या आसपासच असलें पाहिजे असें गृहीत धरण्याचा आग्रह संशोधकांनीं आता सोडला आहे; आणि सान्या दंतकथा या भाकड आहेत असें मानण्याची वृत्ति ही आतां बदलली आहे या बाबतींत पूर्वी उद्धृत केलेल्या डॉ. फ्राउवार यांच्या विधानावर मी विसंबू इच्छितों.

महामहोपाध्याय डॉ. मिराशी यांनीं Indian Historical Quarterly च्या १९४५ सप्टेंबरच्या अंकात Some Royal Poets of Vākātaka Age आणि डिसेंबर १९४७ च्या अंकात The Date of Gāthāsaptaśati हे लेख लिहून *मुख्यत्वेंकरून लेखकाच्या नामशब्दसाम्याच्या अनुरोधानें* गाथासप्तशतीचा काळ अलीकडे ओढण्याचा प्रयत्न केला आहे. बाणभट्टानें *प्रशंसिलेल्या सुभाषितरत्नांच्या कोशाला असलेलें 'कोश' हें अभिधान* हस्तलिखितांत नसल्यामुळें लोकांपुढें आतां असलेला गाथासप्तशती हा ग्रंथच वेगळा असला पाहिजे, हें डॉ. देवदत्त भांडारकरांचें अनुमान, एवढा अविश्वास ठीक नाही, म्हणून त्यांनीं उडवून लावलें आहे. भांडारकर इन्स्टिट्यूट मधील क्र ३८६ सन १८८८–८९ आणि क्र ३८५ सन १८८७–९१ या हस्तलिखितांचें अभिधान 'गाथ–कोश' असेंच आहे; शिवाय कांहीं शतकांच्या अखेरीस येणाऱ्या गाथेंत गाथासप्तशतीला 'कोशच' म्हटलेलें आहे गाथासप्तशतींतील विक्रमादित्य हा चंद्रगुप्त विक्रमादित्य आहे, त्याच्या तथाकथित दानशौर्याचा उल्लेख अमोघवर्ष राष्ट्रकूटानें केलेला आहे. अशी गाथा विदर्भात रचली जाणें समजण्याजोगें आहे असा त्यांचा अभिप्राय आहे. गाथासप्तशतीच्या हस्तलिखितांत गाथाकारोंचीं नांवें दिलेलीं आहेत. महामहोपाध्यायांनीं मध्ययुगीन ऐतिहासिक व्यक्तींशीं त्यांचा समन्वय केलेला आहे.

कर्ण : क्र ५४ वगैरे गाथांचा कवि = तन्दाळा मुद्रानिर्दीत (J N S. I: II. 83) ज्यांनीं नाणीं मिळालेली आहेत तो "कण्ण सातकणि" = कर्ण सातकर्णि = शातिकर्ण = चंद्रश्री (२२९ ते २३८ इ).

प्रवरसेन : उर्फ प्रवर, प्रवरराज, प्रवरसेनः क्र ४५ वगैरे गाथांचा कवि =

दण्डि, बाण, आनदवर्धन इत्यादिकानीं प्रशंसिलेल्या सेतुबंध उर्फ रावणवहो या प्राकृत काव्याचा कर्ता, वाकाटक वंशातील द्वितीय प्रवरसेन (४२० ते ४५० इ.)

सर्वसेन : क्र ५०२ वगैरे गाथाचा कवि = दण्डिन आलंकारिकानीं प्रशंसिलेल्या हरिविजय या प्राकृत काव्याचा कर्ता = वाकाटकाच्या वत्सगुल्म शाखेचा संस्थापक पहिला प्रवरसेन याचा पुत्र. ज्याच्या नावाचें द्वितीयार्ध ' सेन ' असें आहे, जयसेन, मकरदसेन, मल्लसेन, महासेन विश्वसेन, सत्यसेन, हे ही किंवा त्यापैकीं काहीं वाकाटक वंशातील असणें अनुमानानें शक्य आहे.

मानः क्र १०१ वगैरे गाथाचा कवी = सातारा जिल्ह्यातील माण – मानपुर येथील राष्ट्रकूट घराण्याची ( A. B O. R I· XXV. pp 363 ) संस्थापक मानाङ्क

देवराज = क्र १३८ वगैरे गाथाचा कवि = मानाङ्क राष्ट्रकूटाचा पुत्र. दुसऱ्या चंद्रगुप्त गुप्ताचा विक्रमादित्याचा प्रतिनिधी म्हणून कालिदास याच्या दरबारीं आला होता. यानें देशी शब्दाचा कोश तयार केला होता.

आढ्यराज = ऊर्फ अर्धराज : क्र २६ वगैरे गाथाचा कवि = बाणभट्टानें हर्षचरितात प्रशंसिलेल्या आख्यायिका या ग्रंथाचा कर्ता. याच्या अमदानींत सर्व प्रजा प्राकृत भाषिक असल्याचें भोजानें सरस्वतीकंठाभरणात सांगितलें आहे. *त्या अर्थी तो प्राकृत कवि असला पाहिजे. आख्यायिका हा ग्रंथ प्राकृत* असणें शक्य आहे. आढ्यराज हें शालिवाहनाचेंच नाव असल्याचें टीकाकार रत्नेश्वरानें सांगितलें आहे. पण हें नाव पुराणातील सातवाहनाच्या यादींत आढळत नाहीं. त्याचा हालाशीं समन्वय होत नाहीं.

वाक्पतिराज = क्र १५ वगैरे गाथाचा कवि = मधुमथनविजय व गउडवहो या प्राकृत काव्याचा कर्ता; भवभूतीचा समकालीन, कनोजच्या यशोवर्म्याचा आश्रित : काळ आठव्या शतकाचें द्वितीय चतुष्क.

महामहोपाध्यायाच्या पूर्वी पुरातत्वभूषण श्री. राजवाडे (ज्ञानेश्वरी : प्रस्तावना. पृ ४९ ) यानीं कालिराभ्र व कालइव ( क्र २१ व २६ चे कवि ) याना कालिदासाशीं समन्वय केला होता आणि प्रवरसेन हा कालिदासाचा आश्रयदाता असून त्याच्या ही गाथा गाथासप्तशतींत असाव्यात असा बळकट संशय व्यक्त केला होता. पण या अनुमानाचा त्यानीं पाठपुरावा केला नाहीं. महामहोपाध्यायाच्या या दोन लेखातील अनुमानाना नामसादृश्य आणि यापैकीं

काहींचें कुतलाचिरत्त या-यतिरिक्त कोणताहि आधार नाहीं. शिवाय त्यानीं गृहीत धरलेलीं गाथाकर्त्रींची नांवे अनधिकृत आहेत, तीं फक्त मध्ययुगीन टीकात आढळणारीं आहेत आणि त्याच्या बाबतींत टीकाकाराची एकवाक्यता नाहीं. त्यानीं कल्पिलेल्या कवींची प्राकृत भाषा व त्यानीं योजिलेलीं वृत्तें गाथासप्तशतीहून स्पष्टपणें भिन्न आहेत. या ग्रंथावर निर्विवादपणें अभिजात संस्कृत काव्याची छाप आहे. खुद्द प्रवरसेनाचें सेतुबन्धकर्तृत्व विवाद्य आहे गुद्द सातवाहन घराण्यात सेन हें अंत्य नामाचें असलेला पुरींद्रसेन पुराणानीं नमूद केलेला आहे. केवळ सेन या अंत्याधारावर आधारलेलें हें नामसादृश्याचें गमक मान्य केलें तर त्यापासून हास्यास्पद निष्कर्ष निघू शकतील. सबब या बाबतींत अधिक व विश्वसनीय पुरावा हातीं आल्याशिवाय अंतिमशीं निर्णय घेता येण्यासारखा नाहीं असेच म्हटलें पाहिजे

अर्थात् हाल सातवाहनाचा जो काळ मी धरलेला आहे त्या काळात म्हणजे पहिल्या शतकात गाथासप्तशतीतील बहुसंख्य गाथांची मांडणी करण्यास कांहींही प्रत्यवाय नाहीं.

गाथासप्तशतींतला व त्या काळातला बहुजनसमाज सुधारलेला आहे, सुसंस्कृत आहे. या बाबत पुरेसा अंतर्बाह्य पुरावा उपलब्ध आहे. आर्थिक, धार्मिक व सामाजिक परिस्थिति व प्रगति यांची चर्चा पूर्वी केली. आतां तत्कालीन गुणसंपन्नतेविषयीं माहिती सांगतो.

गाथासप्तशतीचें संकलन होण्यापूर्वी नाणेघाट व तेथील देवकुल आणि कोंडाणें, भाजें, बेडसे इत्यादि लेणीं तोडून झालीं होतीं. त्यावरून येथील पाषाणशिल्पांची स्थापत्य व शिल्प या विषयांतील गति अग्रमानता येते

सह्याद्रींतील लेण्यांच्या मांडणींतूनच भारतीय मंदिराची घाटणी उत्पन्न झालेली आहे, एवढेंच नव्हे, पाश्चात्य खिस्ती मंदिरानी ही .हें त्यानीं आगळें म्हणजे या लेण्यांच्या कर्तृत्वास जबाबदार असणाऱ्या शिल्पेश्वराचें माहात्म्य अग्रमानता येते

सह्याद्रीतील लेणीं तोडण्यासाठीं महाराष्ट्रानें परदेशाचे किंवा अन्य प्रदेशातले कारागीर आणले होते असा प्रवाद अलीकडे रूढ झालेला असून विशिष्ट विचारसरणीच्या बाबतीत व विद्वानांतही तो विशेष स्थिर आहे. पण तो त्यास

नाहीं. हे कारागीर महाराष्ट्रीयच होते. या विधानात सत्याचा अपलाप नाहीं आणि भारतीय दृष्टया अराष्ट्रीय असें काहीं नाहींच नाहीं. हें विधान सर्वमान्य होईपर्यंत पुनः पुनः ठासून सांगण्यात संकोच बाळगण्याचें काहीं कारण नाहीं. माझे मित्र श्री श्रीपाद टिकेकर सांगतात कीं सिंहलद्वीपातलीं लेणीं कोरण्याकरता महाराष्ट्रातले कारागिर तिकडे नेले होते अशी परंपरा तेथें अद्याप प्रचलित आहे. आणि आपल्याला कोणी संकुचित वृत्तीचे असें म्हणू नये म्हणून आम्ही मान हल्या त्या सिद्धान्ताला मान तुकावण्यास सिद्ध होत आहों. गाथासप्तशतीच्या सपादन कालातही हा लेणीं कोरण्याचउ द्योग चालू होता हें निश्चित मग त्याचे पडसाद येथें का उमटले नाहींत? अजंठा व वेरूळ येथील उत्तर कालीन लेण्याबाबतचे उल्लेख तरी आमच्या साहित्यात कोठें आले आहेत? प्रसिद्धी व व्यवहारपराङ्मुखता हा आमचा स्वभावधर्मच आहे. म्हणूनच आम्ही जें निःसंशय आमचें तें वारवार गमावून मग्न होऊन बसलों आहोंत!

सह्याद्रीच्या लेण्यातील भिंती व स्तंभ रंगीत आकृतींनीं व चित्रांनीं अलंकृत केलेले होते, हें निश्चित. आता ओबड धोबड दिसतात त्या मूर्ती ही एकेकाळीं गिलाव्यानें गुळगुळीत करून रंगविलेल्या होत्या याच्या पुराव्यासाठीं त्या मानानें अर्वाचीन अशा अजंठ्यापर्यंत यातायात नको. खुद्द भाजाच्या लेण्यातील स्तंभावर अस्पष्ट अशीं रंगीत चित्रें अजून ही दिसतात. बुद्ध, बुद्धभिक्षु आणि आडव्या रंगीत पट्ट्याचें वस्त्र नेसलेली स्त्री हीं चित्रें तर अगदीं स्पष्ट दिसतात प्रसंगाची, वस्तूची व व्यक्तींचीं रेखा व रंगीत चित्रें गाथासप्तशतींत जागोजाग दिसतात. क्र ३५ या गाथेंत लक्ष्मणाचें चित्र कुलवधूनें भिंतीवर रंगवलेलें आहे हें चित्र आहे कीं हा चित्रपट आहे याचा खुलासा मिळत नाहीं क्र. ६१२ या गाथेंत रेखाचित्र व रंगीत चित्र याचे उल्लेख आहेत. क्र ७३२ मधील चित्र सतत लावलेल्या भिंतीवर काढायचें आहे, धंदेवाइक चित्रकाराना स्थानशुद्धीची व वर्णक्रमाची माहिती असलीच पाहिजे असें ही या उल्लेखावरून दिसतें. क्र ६३२ या गाथेत चित्रात रंग भरण्याचा स्पष्ट उल्लेख आहे. चित्रकाराच्या वर्तिकेचा उल्लेख क्र ६५६ या गाथेंत आलेला आहे. क्र ६४१ मधील चित्र हें वस्तूचें चित्र आहे, प्रत्यक्ष वस्तु नाहीं, हें ज्याला माहीत नाहीं तो त्याच्या दर्शनानें फसावा, इतकें तें हुबेहूब आहे. या चित्रापैकीं कांहीं

धंदेवाईक कारागिरांनीं काढलेलीं आहेत आणि काहीं या कलेचें शिक्षण न घेतलेल्या घरगुती स्त्रियांनीं. लक्ष्मणाचें चित्र रंगवणाऱ्या कुलवधूचा उल्लेख मला विशेष महत्त्वाचा वाटतो. येथें तिच्या कलाकौशल्याची वाखाणणी आवर्जून केलेली नाहीं. हा मुद्दा आणखी महत्त्वाचा. घरंदाज स्त्री हे समाजाचें अंतर्याम. अपवादात्मक नव्हे, सामान्य म्हणून जे गुण तिच्या अंगीं असतील ते समाजाचे गुण मानावयास प्रत्यवाय नाहीं. चित्रकला समाजाच्या अंगीं मुरलेली असणें हें निःसंशय सुसंस्कृततेचें लक्षण आहे.

क्र. ९ या गाथेंत हरितालमण्डितमुखी नटीचा उल्लेख आलेला आहे आणि क्र. २९९ या गाथेंत रंगोत्तीर्णा नर्तिकेचा. क्र. ३४४ या गाथेंत रंगभूमि व पूर्वरंग या संज्ञा आलेल्या आहेत. रंगभूमीवर होणारीं नाटकें व नृत्यें ग्रामीण बहुजनसमाजाला ही पूर्णपणें परिचित असलीं पाहिजेत असें या उल्लेखांवरून दिसून येतें. त्याचप्रमाणें तेव्हां नाटकांत स्त्रियांचीं कामें स्त्रियाच करीत असत असें ही सावीत होतें. मुसलमानी अमदानींत महाराष्ट्राचें श्रावदीकरण झालें आणि आमच्या परंपरागत नाट्यप्रियतेचा आम्हांला विसर पडला, याचें येथें स्मरण झाल्यावाचून रहात नाहीं.

*गाथासप्तशतींत गायन, नर्तन, वादनाचे अनेक उल्लेख झालेले आहेत.*

क्र. ३८१ व ६८९ मधील गीतें पुरुषानीं गाइलेलीं आहेत, पैकीं पहिलें हृदयविदारक विरहगीत आहे व दुसरें प्रसन्न समृद्धिगीत आहे. शेतांत मालाची तयारी होत असताना किंवा तयार माल बाजाराकडे चालविला असताना अशीं समृद्धिगीतें वारंवार ऐकूं येतात. " पिकल्या गहूं वा हरभरा " या लावणीचें पर्यवसान शृंगारिक असलें तरी मूलतः हें समृद्धिगीतच आहे. फार काय, लावणी हा गीत-गायन प्रकार भाताच्या शेताच्या सामूहिक लावणीशीं संबद्ध असावा अशी कल्पना वारंवार माझ्या मनांत येऊन गेलेली आहे. क्र १२८, ३३४ व ८८७ मध्यें उल्लेखिलेलीं गीतें ही विरह गीतें असून तीं स्त्रियानीं म्हटलेलीं, आहेत. क्र ६४२ व ६४३ मध्यें विवाहाचे वेळीं म्हणावयाच्या मंगलगीतांचे उल्लेख आहेत. अशीं गाणीं वधूच्या मैत्रिणीनीं म्हणावयाचीं अशी प्रथा गाथासप्तशतीच्या काळांत प्रचलित होती असें त्यावरून स्पष्ट दिसतें. उत्तरदायित्व त्यांना हा हक्क भटजींनीं बहाल केला. अनेक शतकानंतर अगदीं

अलीकडेच हा मान पुन्हा त्याचेकडे आलेला आहे. क्र. १२८ मधील गीत हें विरहगीत असून तें गोपींनीं रानात गाइलेलें आहे. आणि क्र. ११४ मध्यें कृष्ण-गोपींच्या सामूहिक नृत्याचा उल्लेख आलेला आहे. सामूहिक नृत्य गायनें ही भारताला अभीर व याद व याची देणगी आहे. गोपालक व कृषिप्रधान देशात गोप व गोपी याच्या गाण्याना व नृत्याना प्राधान्य असणारच आणि त्याचा आशय शृंगारिकच असणार. आपदशाकडे त्याना तसा आशय व तसें महत्व होतेंही. म्हणूनच अनेक कवींनीं गोड गोड गवळणी रचल्या. पण पुढें उच्चभ्रूंनीं गवळणींचा कबजा केला आणि सामूहिक नृत्यावर भृकुटि वक्र केल्या; यामुळें आमच्या सामाजिक जीवनातलें हें जिवंत व रसरशीत वैभव नष्टप्राय झालें. ज्यानीं हे अंग संवर्धित केलें त्याचा त्याबद्दल हेवा वाटत असूनही तें अनिष्ट होतें म्हणूनच आपण तें नष्ट केलें अशा नैतिक फुशारकींत आपण स्वसंतुष्ट समाधान मानून घेत आहोंत ! क्र. ३०४ व ३६१ या गाथात कुलस्त्रीच्या नृत्याचे उल्लेख आहेत. क्र. ३०४ मध्यें पति वाद्य वाजवीत आहे व पत्नी त्याच्या तालावर नृत्य करीत आहे. या विलासालाही आपण पारखे झालों आहोंत. गाथासप्तशतींत अनेक वाद्याचे उल्लेख आलेले ( डुण्डुअ = घंटा; क्र. १७२; ढक्कं = डंका; क्र. ५२६; तूर = तूर्य = तुतारी, क्र. ५३६; पटह; नगारा; क्र. २९, ६८५; मुरअ = मुरज = मृदग; क्र. २५१; वज्ज = वाद्य; क्र. ४२०; वंस = वंश = बासरी; क्र. ५५७; वीणा; क्र. ५६० ) आहेत. पैकी घंटा ही आकारानें मोठी असून रेड्याच्या गळयात बांधावयाच्या मालें-तील आहे आणि डंका हें राजकीय प्रभुत्वाचें द्योतक असून येथें तो हत्तीनें धारण केलेला आहे. दरबारी मिरवणुकांत उंटावर डंका लादण्याची प्रथा उत्तरकालीन आहे. देवळात घंटा बांधण्याची प्रथा अद्याप सुरू झालेली नाहीं. पटह हें वाद्य डफासारखें असावें. दोन मल्लांनीं खांद्यावर घेतलेल्या आडव्या दांड्याला धातुचा वाटोळा ढोल बांधलेला असून त्यावर हातानच दांडा हाणून ते मोठा नाद काढणार आहेत, असें दृश्य अजंठ्यात रंगवलेलें आहे. ही वाद्यें भारतात फार प्राचीन काळापासून वापरीत आहेत, साध्या व सुधारलेल्या स्वरूपांत, जंगली जमातींपासून राजधानींतल्या नागरकांपर्यंत. अजंठ्याच्या पहिल्या मजल्याच्या लेण्यात पाश्चात्य गीताराच्या धर्तीची वीणा मांडीवर

घेतलेल्या बैठ्या पुरुषाचें चित्र आहे आणि उडत्या गंधर्वानें खांद्यावर घेतलेली एकतारीसारखी भोपळा बसविलेली वीणा ( श्री हेरिंगहॅम : Ajanta Frescoes : Pl 36. 40 ) अजंठ्याच्या लेण्यांत रंगविलेली आहे. वीणा हें वाद्य ऋग्वेदापासून वापरात आहे. गाथासप्तशतीच्या काळातलें हें वाद्य झंकारानें सूर धरण्यापुरतेंच असावें असें वाटतें.

गाथासप्तशतींत कवि ( क्र ३, ९७७ ) व त्यांनीं रचलेलीं आख्यानें (क्र५१७, ८६२) आणि गाथा व काव्यें (क्र २,३, ४२८, ८०९) यांचे अनेक उल्लेख आलेले आहेत सुशिक्षित लोक काव्यांचें पठण व मर्मग्रहण करीत असत आणि अशिक्षित स्त्रियांना आख्यानें ऐकवीत असत, असें अनुक्रमें क्र ४१८ व क्र ८६२ या गाथांवरून दिसतें. क्र. ६७१, ७०३ व ९८५ या गाथांत पण्डित व शास्त्री यांचे उल्लेख आहेत. हाल गुणी जनांचा एवढा आश्रयदाता, तरी क्र ६७१ मधील पण्डित दारिद्री आहे, म्हणून जणूं दारिद्र्य हें पाण्डित्याचें अनादिसिद्ध लक्षण च आहे, आणि भूषण ही ! क्र ८८६ या गाथेंत कवित्व व व पाण्डित्य यांचा आणि क्र २ या गाथेत पाण्डित्य व वैदग्ध्य यांचा संघर्ष सूचित केलेला आहे. अन्धारकोठडींतील एकान्तवासाहून भयंकर अशी शिक्षा कवीनें अरसिकाला क्र ८०९ या गाथेंत सुनावलेली आहे. क्र. ४२१ व ७३२ या गाथांत कलावन्तांचे उल्लेख आहेत. गुणी जनांचा गौरव होत असलेला पाहून निर्गुणी जनानांही हस्तकामार्फत आपला गौरव करवून घेण्याची बुद्धि होते किंवा उलट प्रिय निर्गुणी जन आपल्यातल्याच एकाद्याचा गौरव करण्यास प्रवृत्त होतात. ही वस्तुस्थिति क्र. १९१ या गाथेंत अवद्य झालेली आहे.

क्र. ७३३ या गाथेंतील सूचित उल्लेख निःसंशय गोष्ठीचा आहे. गोष्ठ म्हणजे गाई चारायाचें कुरण ( ऐ ब्रा : ३-१८-१४ ), गाई बांधण्याचा गोठा (१.१९१.४). रानात जनावरें चरायला सोडलीं म्हणजे त्यांवर फक्त नजर ठेवायाची असते. येथेंच एकाद्या छायावृक्षाखाली गोप-गोपी गप्पागोष्टी करीत बसतात. गोष्ठी म्हणजे गोतवळा, सभा, समाज, समेलन : फावल्या वेळीं मित्र मंडळींनीं गप्पागोष्टी करण्याचें ठिकाण. गोष्ठी हा एक नाम्यप्रकार ही आहे. मग वाटतें कथा या अर्थानें गोष्ट हा शब्द या शब्दाशीं संबद्ध आहे. प्राकृत वाङ्मयात गोष्ठी हा शब्द मित्रमंडळाचें संमेलन या अर्थानें वारंवार ( Nisi

Cu 8: p. 502: Acā II 1 3: 245) आढळतो. या संस्थापाशी बराच पैसा असे व समाजाच्या बैठकींत अनेक प्रकारची चैनबाजी (Nāyā 16. 174) चाले. उत्सव, सण, यज्ञ, यात्रा हीं ही सामाजिक व सांस्कृतिक समेलनेंच; धर्माच्या नावानें संघटित झालेलीं, इतकेंच. गणिकाच्या दिवाणखान्यातही अशीं संमेलनें भरत. कोणी काव्यशास्त्रविनोदात कालहरण करीत आणि कोणी नृत्य गायनात, कोणी मद्यपानात व कोणी गोयूथिकादि सुरतोत्सवात. अशा चैनी सुसंपन्नाच्या मेळाव्यात एकादे वेळीं दरिद्री कलावन्ताची, गुणवन्ताची हेटाळणी व्हावयाचीच. धनिकाना कलावन्ताचा सहवास हवा असतो तो 'केवळ स्वतःला गुणीजनाचा आश्रयदाता म्हणवून घेण्यासाठीं; मनातल्या मनात व सामान्यतः ते याना सुधमस्कन्याहून अधिक किंमत देत नाहींत !

गाथासप्तशतीच्या काळाच्या सुसंस्कृततेचें मूल्यमापन एवढयाच उल्लेखाच्या पुराव्यावर करून भागणार नाहीं. हा सुभाषितकोश राजाश्रयानें सिद्ध झालेला आहे, हें खरें, येथें कालिदासासारख्या एकाद्या अपवादात्मक महाकवीच्या प्रतिभेचें दर्शन होत नसून महाराष्ट्राच्या सामुदायिक सहृदयतेचें व सुसंस्कृततेचें अतर्याम येथें दृष्टोत्पत्तीस येतें, हें ही तितकेंच खरें; कारण, गाथासप्तशती हा अनेक कवि कवियित्रीकृत सुभाषिताचा सग्रह आहे. कारण, या कवि कवियित्रींची सुसंस्कृतता त्याना शालेय शिक्षणानें प्राप्त झालेली नाहीं; कारण आपल्या अभग, ओवी लावणीकाराप्रमाणें हे लेखक व लेखिका ग्रामीण आहेत आणि त्याचें कवित्व, संस्कृत कवींप्रमाणें शिक्षण व सकेत यावर आधारलेलें नसून, आत्मप्रत्ययावर उभारलेलें आहे. आणि भारताचें आद्य लोकसाहित्य म्हणून गाथासप्तशतीचें महत्त्व अद्वितीय आहे.

गाथासप्तशतीची साहित्यिक चर्चा सुरू करण्यापूर्वीच सागून ठेवतों कीं या भागातून रस व ध्वनि, नायक व नायिका, प्राकृत शब्दाचीं रूपें इत्यादि विषय विस्तारभयास्तव हेतुपुरःसर वगळले आहेत.

गाथासप्तशती हें भारताचें आद्य लौकिक लोकवाङ्मय आहे आणि महाराष्ट्राचें आद्य अभिमानस्थान आहे. मी असे म्हणतों, याला अनेक कारणें आहेत.

संस्कृत ही सुसंस्कृत आर्यांच्या धर्मविधींची व शास्त्रज्ञाची भाषा; अभि-

जात व अलौकिक, प्रौढ व व्याकरणबद्ध; बहुजनसमाजाच्या व्यावहारिक जीवनापासून एवढी अलिप्त की जणू म्हणूनच तिला देवभाषा म्हणण्यात येतें ! प्राकृत ही बहुजनसमाजाची भाषा; अभिनव व ऐहिक, अविराम व अनिर्बंध; प्रकृतिसिद्ध, वर्धनशील व सर्वव्यापी. आर्यांची संस्कृति वर्गनिष्ट झाली, बहुजनसमाजाला विन्मुख झाली; म्हणूनच बुद्धानें धर्मक्रान्तीसाठीं प्राकृताचा आश्रय केला; किंवा त्यानें प्राकृत धर्माचा प्रसार केला असें म्हणा हवे तर. धर्मप्रसारार्थ बौद्धांनीं प्राकृतात धार्मिक साहित्य निर्माण केलें आणि प्रचार कथा रचल्या. वैदिक साहित्यापेक्षा जातककथा बहुजनसमाजाला जवळच्या व सहज समजण्यासारख्या असल्या तरी त्या विशिष्ट हेतूनें लिहिलेल्या असल्यामुळें आजही हें धर्मसाहित्य कृत्रिम वाटतें. गाथासप्तशतींत समाजाचें अतर्याम प्रकट झालेलें आहे आणि तें ही अकृत्रिमपणें. येथील भावना उत्स्फूर्त आहेत आणि ऐहिक आहेत; म्हणूनच म्हटलें आहे कीं हें भारताचें आद्य लौकिक लोकसाहित्य आहे.

अहंमन्य व स्वसंतुष्ट संस्कृतनिष्ठ पण्डितांनीं मराठीची अवहेलना मांडलेली असली तरी माझ्या मुखातून बाहेर होणारीं मराठी वचनें ही अमृतातें जिंकतील ही ज्ञानेश्वराची प्रतिज्ञा आणि गाथासप्तशतींतील प्राकृत काव्याच्या अमृतमधुरत्वाची ग्वाही यांची तुलना करण्यासारखी आहे. ज्ञानेश्वरानीं ज्ञानाभोंवतीं पण्डितांनीं उभारलेली कोंडी फोडली आणि गाथासप्तशतीनें काश्मीरापासून कन्याकुमारीपर्यंत हिंदुस्थान जिंकलें; बाणभट्टासारख्या महापण्डिताचे उद्गार आणि अलंकार वाङ्मयात समाविष्ट झालेलीं गाथासप्तशतींतील असंख्य वचनें हीं या विधानाला साक्षी आहेत.

शुष्काचार्यांच्या लब्धप्रतिष्ठितेविरुद्ध उठावणी हा महाराष्ट्राचा स्वभावधर्मच आहे व तो साहित्यात वारंवार प्रकट झालेला आहे.

वाङ्मयाचे मुख्य वर्ग दोन : शिष्टवाङ्मय व लोकवाङ्मय. शिष्टसाहित्य वर्गनिष्ठ असतें, कृत्रिम व सांकेतिक असतें. लोकसाहित्य हें लोकनिष्ठ असतें, जीवननिष्ठ असतें, नैसर्गिक व व्यावहारिक असतें. शिष्ट साहित्यांतील नायक-नायिकांचे गुणावगुण सांकेतिक असतात, शास्त्रोक्त असतात, बोलताना अलंकार साधण्याला उत्सुक असतात, अमुक हा अलंकार अमुक याची त्याना जाणीव असते,

किंबहुना तो साधण्यासाठींच तें बोललें जातें. लोकसाहित्य हें बहुजनसमाजातील कवींनीं बहुजनसमाजासाठीं निर्माण केलेलें असतें, बहुजनसमाजाच्या भाषेत लिहिलेलें असतें आणि त्यात बहुजनसमाजाचें जीवन सशब्द झालेलें असतें. या दृष्टीनें पहिलें असता भर्तृहरीचें शतकत्रय शिष्टसाहित्यात सामावतें आणि गाथासप्तशती लोकसाहित्यात. गाथासप्तशतींतल्या अनेक गाथा समाविष्ट झालेल्या असल्या तरी उत्तरकालीन वज्जालग्गावर शिष्टपणाची अधिक छाप पडलेली दिसते. ज्ञानेश्वरीचा समावेश शिष्टवाङ्मयातच केला पाहिजे. ज्ञानेश्वर हे खरोखरीच ज्ञानाचे ईश्वर होते. त्यांनीं हा ग्रंथराज मराठी बहुजनसमाजासाठीं लिहिला. भारतात तुलसीदासाच्या रामायणाइतकें दुसऱ्या कोणत्या ग्रंथाचें अध्ययन किंवा पठण होत असलें तर तें ज्ञानेश्वरीचेंच; अर्थात् हा पुरस्कार बहुजनसमाजाचाच, हें निर्विवाद. तरी हा ग्रंथ महापण्डितानीं पण्डितासाठीं *लिहिलेला आहे, निदान ज्ञानेश्वरानीं शान्याकरिता; हें कोणीहि नाकबूल* करणार नाहीं. आणि नामदेव–तुकारामाच्या गाथांचा समावेश लोकवाङ्मयातच करावा लागेल, कारण या गाथा बहुजनसमाजाच्या जीवनाशीं एकरूप आहेत. शिष्टसाहित्य हें संस्कृतीशीं एकनिष्ठ असतें पण बहुजनसमाजाच्या व्यावहारिक जीवनाशीं एकरूप नसतें. लोकवाङमय हें संस्कृतीशीं एकनिष्ठ असतें आणि जनतेशीं एकरूप असतें. या दृष्टीनें पाहिलें असता गाथासप्तशती हें अव्वल दर्जाचें लोकसाहित्य आहे, संस्कृतीशीं एकनिष्ठ व बहुजनसमाजाच्या जीवनाशीं एकरूप असें लोकवाङ्मय आहे, असें दिसून येतें.

आणि गाथासप्तशती हें महाराष्ट्राचें आद्य लोकसाहित्य आहे.

कारण गाथासप्तशतींतील गाथा महाराष्ट्री प्राकृतात लिहिलेल्या आहेत आणि महाराष्ट्री प्राकृतापासूनच मराठी भाषा उत्क्रांत झालेली आहे. महाराष्ट्री प्राकृतात अशीं अनेक वैशिष्ट्य आहेत कीं जीं फक्त मराठींतच आढळतात. मराठींत आणि मराठींतच आजही अनेक शब्द असे आढळतात कीं ज्याचें मूळ प्राकृत व देशी प्रयोग गाथासप्तशतींत आढळतात. संपादकाचा वंश व भौगोलिक उल्लेख यावरून तर गाथासप्तशतीचें महाराष्ट्रीयत्व निःसंशय सिद्ध होतें. म्हणूनच डॉ. घाटगे सांगतात ( Mahārāstrı Language & Literature : पूर्वोक्त : पृ. ३२ ) कीं गाथासप्तशती हा पूर्णतया महाराष्ट्री

ग्रंथ आहे.. या विषयीं डॉ. कीथ ( Classical Sanskrit Literature : p. 115 ) सांगतात कीं महाराष्ट्री प्राकृतात व वृत्तात रचलेल्या या गाथात प्रत्ययास येणारी सहजता ही मराठी वृत्तींतील रोखठोक वस्तुवत्तेची द्योतक आहे.

गाथासप्तशतींतील अनेक गाथा अश्लील आहेत असा आक्षेप वारवार घेण्यात येतो. प्रा. दत्तात्रय केशव केळकर ( काव्यालोचन : आवृत्ति दुसरी : पृ ६ व १० ) सांगतात, " हालाच्या सप्तशतींतील पाचकळ कवनें मोठमोठ्या भट्ट आचार्य, राजानक, पंडित, दीक्षित वगैरे घेंडानीं उत्कृष्ट काव्याचे मिष्टास नमुने म्हणून जिभल्या चाटीत वाचकास सादर करावीत हें नवल होय. यातील बरींच उदाहरणें प्राकृतातील असताही, तत्कालीन प्राकृतोद्भव अर्वाचीन भाषातील भक्तिपर वाङ्मयाकडे संस्कृत काव्यशास्त्रानें ढुकूनही पाहिलें नाहीं." याचप्रमाणें ते सांगतात : " हालाच्या प्राकृत सप्तशतीमधील अश्लील लावण्यातील ध्वनि उकलून मिटक्या मारणारे व त्यावर ध्वनिसिद्धांताची इमारत उठविणारे रसिक मराठी लावण्यास मिळाले नाहींत. त्यामुळें लावणी वाङ्मयाची काव्यशास्त्रदृष्ट्या मीमांसा निर्माण झाली नाहीं. पोवाड्याची तीच गत. पोवाडे रचणारे शाहीर हे जातिवंत कवि होते, पण काव्यमीमांसकास लागणारें विद्वत्त्व त्यांच्या गावींही नव्हतें आणि त्यांचा पोशिंदा व चाहता रसिकवर्ग हाहि तात्त्विक चर्चेनें रसिकता प्रकट करण्यापेक्षा खूप झालेल्या शाहिराच्या अगावर हातातलें सोन्याचें कडें किंवा कमरेचा भरजरी शालू फेंकण्यात अधिक धन्यता मानणारा होता सतकवि संस्कृत पद्धतीच्या विद्वत्ताप्रचुर काव्यापासून जसे दूर रहात तसेंच या शाहिरी व शृंगारी काव्याचाही विटाळ मानीत. भगवद्भजनाव्यतिरिक्त सर्व काव्य हलक्या दर्जाचें होय हा त्यांचा काव्यशास्त्रीय सिद्धान्त होय. रामदास म्हणतात " कामिक रसिक शृंगारिक। वीरहास्य प्रास्ताविक । कौतुक विनोद अनेक। या नाव धीट पाठ । " हें सर्व काव्य धीटपाठ म्हणजे दुय्यम व हलक्या दर्जाचें होय. "

उतारा थोडासा लाबला, पण तो घेतला कारण ही विचारसरणी विशिष्ट वृत्तीची प्रातिनिधिक आहे. क्र २ या गाथेंतला संघर्ष कामशास्त्र व आक्रन्द गाथा यामधला आहे, तो ही गाथासप्तशतीला मानवला नाहीं. येथें तर अध्यात्म व शृंगार यामधला संघर्ष प्रतीत झालेला आहे. पोवाडे व लावण्या

रचणाऱ्या कवींचे ठायीं विद्वत्ता नव्हती हें खरें, नैसर्गिक शृंगाराच्या आविष्काराला शास्त्राधार लागत नाहीं, तसाच काव्यालाही. आणि शृंगार सर्वस्वीं वर्ज्य मानावयाचा तर सतांनीं शृंगारिक गवळणी का रचल्या? रामदास हे सत्पुरुष होते हें खरें, पण म्हणून त्यांचे साहित्यिक सिद्धान्त ग्राह्य मानावयाचे कीं काय? *त्यांच्या विधानाप्रमाणें* धीटपाठ म्हणून विनोद, वीर, शृंगार व हास्य हे साहि यातून बाद केले आणि रसिकांवरही बहिष्कार घातला तर साहित्यात व जीवनात राहिलें काय? क्षुद्र अहंकाराला अध्यात्म आणि समाजस्वास्थ्याची आस्था हीं फार मानवतात, निदान वेळोवेळीं हें प्रत्यक्षपणें प्रत्ययास येतें, हें मात्र अगदीं खरें.

*कायद्यानें अश्लील-साहित्य-प्रकाशन हा गुन्हा ठरविलेला आहे; पण अश्लील*तेची व्याख्या हेतुपुरस्सर केलेली नाहीं, कारण समाजाच्या विनयबुद्धीला आज जें अश्लील वाटतें तें उद्या तसे वाटणार नाहीं, असा संभव असतो, म्हणून. *आक्षिप्त साहित्याची प्रवृत्ति संस्कारक्षम वाचकाला दुराचाराला प्रवृत्त किंवा शील* भ्रष्ट करण्याकडे असेल तर त्याला अश्लील म्हणावें, अशी जस्टिस् कोकबर्नें याची व्याख्या आहे ( Regina v. Hicklin (1868) Law Reports : Queen's Bench, at p 371.) "*समाजाच्या विनयबुद्धीला जें साहित्य* गर्ह्य वाटतें आणि ज्यामुळें संस्कारक्षम वाचकाच्या लैंगिक वासना उफाळून येतात तें साहित्य अश्लील होय असा अमेरिकन फेडरल कोर्टाचा ( Dysart V. United States, 4 Fed (2) (765,1925) निर्णय आहे ज्याची संस्कारग्रहणक्षमता अति चपल किंवा अति जड आहे त्याच्या अभिप्रायावर विसंबू नये, असाही अमेरिकन फेडरल कोर्टाचा निर्णय ( United States V. Harmon, 45 Fed 417 (1891) आहे समाजाच्या विनयभावनेचा भंग कशानें होईल याचा नेम नाहीं. पहा— बोस्टनमध्यें पुढील पुस्तकें आक्षेपार्ह ठरलेलीं आहेत: बर्ट्रंड रसेल. What I Believe, अप्टन सिंक्लेअर: Oil, एच् जी वेल्स: The World of William Clissold, हेमिंग्वे : The Sun Also Rises, जज्ज लिंड्से, The Revolt of Modern Youth *मराठी वाचकांना माहीत असलेले लेखक* व त्यांचीं पुस्तकें, तेवढींच येथें दिलेलीं आहेत, कारण सरकारी यादी फार मोठी आहे.

समाजाच्या विचारबुद्धीचें परिवर्तन किती झपाट्यानें होत आहे याचें प्रत्यंतर श्री. स्टॅन्ले कॉफमन् यांच्या फिलॅडरवेल या कादबरीबाबत झालेल्या खटल्यावरून प्रत्ययास येतें. ही कादंबरी अश्लील आहे असें सरकारचें म्हणणें होतें. नऊ पुरुष व तीन स्त्रिया अशा बारा पंचानीं दिलेल्या निर्णयानुसार प्रकाशकाला दोषमुक्त ठरविण्यात आलें. पंचाना खटला समजावून देताना न्यायमूर्तींनीं केलेलें वक्तव्य The All England Law Reports : 1954: Vol. II : p. 683 मध्यें प्रसिद्ध झालेलें आहे. त्यांतील निवडक उतारे येथें देतों : या कादबरीच्या नायकाचें व्यक्तिमत्त्व आकर्षक आहे. स्त्रीविषयक आसक्ति हा त्याच्या वृत्तीचा मध्यबिंदु आहे. लेखकानें व्यभिचाराची प्रशंसा किंवा समर्थन केलेलें नाहीं. मद्यपानाच्या अतिरेकाचे दुष्परिणाम माहीत असून ही त्यापासून परावृत्त होणें अशक्य झालेल्या व्यसनी इसम सारखी त्याची अवस्था झालेली आहे बाळपणीं मनावर झालेल्या संस्काराने त्याच्या वृत्तीचें मूलकारण आढळतें. कादबरीचा विषय उघडपणें लैङ्गिक आहे. लैङ्गिक भावना ही मानवी जीवनाची महाशक्ति आहे यात संशय नाहीं ही भावना अजिबात त्याज्य ठरविण्याइतकी मानवजात अद्याप सुधारलेली नाहीं. तशी सुधारणा झाली तर मानवजात नष्ट होईल. एक काळ असा होता कीं टेबलाचे पाय मनुष्याच्या नागव्या पायासारखे दिसतात म्हणून त्यावर आवरण घालीत. लैङ्गिक बाबतींत लपवाछपव केल्यानें नाश संभवतो; आणि नागव्या संभोग-साहित्यानें ही. साहित्यानें सुवर्णमध्य साधला पाहिजे. केवळ वाचकाची करमणूक हें कादबरीचें उद्दिष्ट नाहीं कादंबरीकाराला विशिष्ट कालखंडातील समाजजीवनाचें यथार्थ चित्र रंगवावयाचें असतें. मुलामुलींना लैङ्गिक ज्ञानापासून अलिप्त ठेवणें हे त्यांना नकोसा, स्राणू व होकायंत्र यांच्या अभावी स्वतःच्या जबाबदारीवर महासागराच्या पर्यटनास पाठविण्यासारखें सर्वनाशकारक आहे. पोटे सदर सारखा बाजारात मिळणारें संभोग-साहित्य बहिष्काराला योग्य आहे यात संशय नाहीं. या प्रकारच्या लिखाणाला साहित्य ही संज्ञा देता येणार नाहीं पण म्हणून आपण फौजदारी कायद्याचीं क्षितिजें अविचारिक विस्तृत केलीं पाहिजेत असें मात्र म्हणता येणार नाहीं. असें झाले तर कायद्याची प्रतिष्ठा राहणार नाहीं. एखादा ग्रंथ उच्च आहे कीं ग्राम्य आहे हें ठरविणें हें आपलें उद्दिष्ट नाहीं, यामुळें समाजाची नीति

भ्रष्ट होईल किंवा कसें हें आपण पहावयाचें आहे. शाळेंतल्या चौदा वर्षांच्या परकऱ्या पोरीच्या दृष्टीनें वाङ्मयाची इष्टानिष्टता मोजणें केव्हांही योग्य होणार नाहीं. आजवर कोणत्याही न्यायाधीशानें एवढया प्राजळपणें या विषयी वक्तव्य केलेलें नाहीं आणि पुष्कळांनीं ही एवढया निर्भयपणें मतदान केलेलें नाहीं म्हणूनच वर म्हटलें आहे कीं समाजाच्या विनय बुद्धीचें परिवर्तन झपाट्यानें होत आहे, तें या निकालामुळें स्पष्टपणें प्रत्ययास येतें.

प्राचीन व मध्ययुगीन साहित्याला आणि विख्यात लेखकांना खास सवलत द्यावयाची असा न्यायालयाचा शिरस्ता आहे. श्री फ्रेड्रिक सीबर्ट ( Rights & Previledges of the Press , p 241, ) सांगतात :

" Classical immorality, as opposed to modern indecency, has received special treatment at the hands of courts. Works of renowned authors which have survived the test of time as literary masterpieces can be printed without fear of prosecution "

या न्यायानें Hasley v New York Society for the Suppression of Vice 234 N. Y I (1922) या खटल्यात गोटिएरची मादमोझेल द मोपिन ही कादंबरी दोषमुक्त ठरविण्यात आली, आणि या निर्णयावर विसंबून पेट्रोनियसचें सॅटिरिकॉन हें ही पेनचें अरेबियन नाइटस्, ओव्हिडचें अ र्ट ऑफ लव्ह, डिकॅमेरॉन्, हेप्टॅमेरॉन् इत्यादि ग्रथही दोषमुक्त ठरले आहेत. सायकॉलजी ऑफ सेक्स, लेडी चॅटरलेज लव्हर वगैरे पुस्तकांवर न्यायालयानें मात्र तीं दोषमुक्त ठरलीं आहेत.

लोकसाहित्यातील अश्लीलता ही वस्तुत. ग्राम्यता असते हा केवळ ग्राम्य विनोदबुद्धीचा आविष्कार असतो शिष्ट साहित्यातील अश्लीलता ही सामान्यत. सहेतुक असते आणि लोकसाहित्यातील अश्लीलतेचा लैंगिक आवाहन नसतें. ग्राम्य विनोदाचा परिपाक हास्यात होतो, चित्ताच्या कल्पिनतेंत होत नाहीं, लैंगिक क्षुब्धतेंत होत नाहीं. म्हणूनच अशा विनोदाला अश्लील म्हणण अन्यायाचें होईल क्र १५ मध्यें सख्यानीं नायिकेला दोहदप्रश्न विचारलेला आहे तेव्हां तिनें प्रियकराकडे दृष्टिक्षेप केलेला आहे. क्र १२३ मध्यें नायिका नुकतीच प्रसूत झालेली आहे आणि तिच्या मैत्रिणी तिला नवऱ्याचें नाव घेण्याविषयीं आग्रह करीत असून ती त्याचें नुसतें नावही घेण्याला तयार नाहीं. ह्या गाथांशी

काही वर्षांपूर्वी अश्लील मानण्यात आल्या असत्या. लोकसाहित्याविषयीची आपली सहानुभूति वृद्धिंगत होईल आणि बहुजनसमाजाच्या अंतर्यामाचा आपल्याला ठाव लागेल तेव्हां एकही गाथा अश्लील आहे असें म्हणण्याचें साहस कोणालाही होणार नाही.

गाथासप्तशतीची आरंभीची मांडणी नाटकाप्रमाणे केलेली आहे; निदान अधिकृत आवृत्तींत ती तशी झालेली आहे.

नाटकाच्या प्रास्ताविक भागाला पूर्वरंग अशी संज्ञा आहे. नाटकाचा आरंभ नान्दीनें व्हावयाचा असा संकेत आहे. भरतानें नाट्यशास्त्रात (५.२४) नान्दीचें लक्षण सांगितलें आहे:

> आशीर्वचनसंयुक्ता नित्यं यस्मात् प्रयुज्यते।
> देवद्विजनृपादीनां तस्मान्नान्दीति संज्ञिता॥

सूत्रधारानें मध्यम स्वराचा आश्रय करून देवद्विजादिकांना वंदन करणारी नान्दी म्हणावयाची असे भरताचे वचन आहे. प्राचीन नाटकांत नान्दीचा एकच श्लोक असे, उत्तरोत्तर त्याची संख्या वाढत गेलेली आढळते. नान्दीनंतर सूत्रधार व पारिपार्श्वक यांचे मार्फत लेखकानें स्वतःची माहिती सांगावयाची आणि *प्रथम श्रोत्यांची प्रशंसा आणि नंतर त्यांना असह्य होणार नाही एवढी* आत्मस्तुति करून नाटकाचें प्रयोजन सांगावयाचें, आगामी पात्राचा परिचय करून द्यावयाचा, अशी प्रथा होती. नाट्यवस्तूचा ओझरता परिचय हें प्रस्तावनेचें उद्दिष्ट होय. उपसंहारातही लेखकानें भरतवाक्य म्हणून देवस्तुति करावयाची असते, मगल चरण हें नाटक निर्विघ्नपणें सिद्धीस जावे म्हणून आणि भरतवाक्य हें तें अपेक्षेप्रमाणें निर्विघ्नपणें सिद्धीस गेलें म्हणून.

गाथासप्तशतींत आरंभी नान्दी व अखेरीस भरतवाक्य आहे. या गाथात शालिवाहनानें इष्ट देवतेची प्रार्थना केलेली आहे. येथें संपादक हाच सूत्रधार आहे. बाह्यतः बाहींही व्यवहार चाललेला असला, तरी व्यक्तिमात्राच्या अंतर्यामात, सामान्यतः कामविचारांचें स्पंदन सुरू असतें हा लैङ्गिक मानसशास्त्राचा सिद्धान्त देवस्तुतीच्या, गौरीच्या मुखाच्या आरक्ततेच्या मिषानें शालिवाहनानें पहिल्याच गाथेंत मांडून गाथांतील व्यङ्ग्योक्तीची सूचना केली आहे. दुसऱ्या गाथेंत विपरीतरत्यास आहे. या भागात नाट्याचें बीज असावें असा भरताचा सिद्धान्त आहे. प्रकृत काव्य स्तुतीच्या निमित्तानें, जणूं विदग्ध

नायिकेच्या मुखानें त्यानें स्वप्रतिष्ठित पंडितांची हजिरी घेतलेली आहे. आपण आपसात लैङ्गिक चर्चा केली तर तो विद्वत्तेचा आविष्कार; कोठवर ? जोवर ती संस्कृतात चाललेली आहे आणि प्राकृतजन चर्चेत भाग घेत नाहींत तोंवर ? बहुजनसमाजाला आवडणारें व समजणारें प्राकृत काव्य मात्र एकांतात वाचतांना किंवा निरङ्क व मोजक्या मंडळींत ऐकतांना ओंठ उडवलेच पाहिजेत अशी ज्यांची वृत्ति त्याना तीबद्दल शरम कशी वाटत नाहीं, असा उघड सवाल अप्रबुद्ध नायिकेनें प्रबुद्ध पण्डिताला दुसऱ्या गाथेंत केलेला आहे. या गाथेंत गाथासप्तशतींत संकलित केलेल्या गाथांच्या विषयाची व वृत्तीची चुणूक दाखविलेली आहे. हा गाथाकोश आपण केवढे परिश्रम घेऊन सिद्ध केलेला आहे हें तिसऱ्या गाथेंत संपादकानें सांगितलेलें आहे. प्रतिष्ठित सूत्रधार पहिल्या गाथेंत देवस्तुति करतो आणि दुसऱ्या गाथेंत विदग्ध नटी त्याची रेवडी उडविते, असेही मानता येईल. चवथ्या गाथेंत बिसनीपत्रात जशी बलाका, मरकत भाजनात जशी शंखशुक्ति, तशी रंगभूमीवरल्या हिरण्यागार बैठकीवर नायिका निश्चल बसलेली दिसत आहे; जणूं ओळखा माझें अंतर्याम, असे तिचें प्रेक्षकांना आव्हान आहे- आणि जणूं म्हणूनच आलंकारिकांनीं या गाथेचें सूक्ष्म विश्लेषण केलेलें आहे.

नाटकात नाट्यवस्तूच्या सूत्रानें अंगोपांग बांधलेलीं असतात. तसा प्रकार संकीर्ण कोशात संभवणें शक्य नाहीं. आरंभीं मात्र नाट्यवस्तूशीं साधर्म्य दिसतें. *शिवाय गाथासप्तशतींतल्या अनेक गाथांमध्यें नाट्यवस्तु बीजरूपात आढळतात.*

ऋग्वेदांत अनेक आख्यान व संवाद सूक्तें आहेत ज्यात कथावस्तु असते तें आख्यानसूक्त आणि ज्यात विशिष्ट भावनेचा विकास संभाषणाच्या माध्यमानें केलेला असतो तें संवाद सूक्त बृहस्पतींची बायको जुहू हिचें अपहरण व पुनरागमन याचा वृत्तांत ऋग्वेदात ( १०-१०९ ) सांगितलेला आहे; हें *आख्यान सूक्त; त्यात वर्णिलेली घटना प्रत्यक्षात घडलेली असणें संभवनीय* आहे. यम व यमी यांचें ( १०-१० ) संभाषण, हे संवाद सूक्त. या दोन्ही प्रकारात नाट्यवस्तु स्पष्ट दिसते. आख्यान सूक्तात अनेक पात्र आहेत आणि संवाद सूक्तांत फक्त दोन ऋग्वेदात स्वगत भाषणाच्या ही अनेक ऋचा आहेत. असे प्रसंग रंगभूमीवर दिग्दर्शित केले जात असत किंवा नसे याबद्दल निश्चित अनुमान करण्यास साधन नाहीं. शुक्लवेदांतर्गत माध्यंदिन वाजसनेयि

संहितेंतील एकोणतिसाव्या अध्यायांतील प्रसंगच असा आहे कीं तो केवळ म्हटला जात असावा, फार तर प्रतीकाच्या द्वारें दिग्दर्शित केला जात असावा. अशीं प्रकरणें ब्राह्मण ग्रंथातही आढळतात. अशा सूक्तात सांकेतिक गूढार्थ भरलेला असून यात सृष्टीची व मानवाची उत्पत्ति व उत्क्रांति आणि आर्यांचे ऐहिक व धार्मिक उद्योग यांचा इतिहास आलेला आहे असे अनेक विद्वानांचें प्रतिपादन आहे. हा विद्वन्मत सिद्धान्त गवळणींच्या गाथांनींतही योजण्यात येतो. गाथासप्तशतीचा टीकाकार पीतांबर यानें तर गाथांच्या शब्दांतील ओढून ताणून तो लागू केलेला आहे। यामुळें असा प्रश्न उपस्थित होतो कीं हे संकेत खरे तर ते अशा उत्तान प्रसंगाच्या अनुरोधानें व लैंगिक संदर्भात का सांगण्यात आले पण हा न तुटणारा वाद आहे. कसेंही असो, या सूक्तात भारतीय नाट्याचें मूळ स्वरूप दृष्टीस पडतें, हें मात्र अगदीं खरें, आणि सर्वमान्यही.

नाट्यशास्त्र, दशरूपक, साहित्यदर्पण इत्यादि प्राचीन व मध्ययुगीन ग्रंथात नाटकाचे अनेक प्रकार सांगितलेले आहेत प्रहसन हें सामान्यतः एकांकी असून यात मुख्यतः वेंकरून शृंगार व हास्य या रसाचा परिपोष करण्यात येतो; यात लबाड व बदमाष लोकांत चालू असलेले कलहविग्रहादि प्रकार वर्णिलेले असतात; यातील पात्र आपआपल्या प्राकृतात बोलतात. भाण हा नाट्य प्रकार विट हा एकच नट करून दाखवितो. भाण हें मूळ नाटक किंवा नृत्य यांतून परिणत झालेलें आहे. गोष्ठी या एकांकी नाटकात कामशृंगाराचा परिपोष केलेला असतो. यात हल्कया दर्जाचे नऊ दहा पुरुष आणि पाच सहा स्त्रिया यांचें काम असतें. रासक या एकांकीं नाट्यप्रकारात बढाई व वक्रोक्ति आणि गीत व नृत्य यावर भर असतो.

गाथासप्तशतींतल्या अनेक गाथामध्यें नाट्यवस्तु आहेत आणि क्र ९१७ व ८६२ या गाथात आख्यानाचे उल्लेख आहेत अनेक गाथात प्रचलित लोककथांचा संदर्भ आढळतो असे टीकेत जागोजाग सांगितलें आहे. मध्ययुगीन वाङ्मयात शोध घेतल्यास आपणास अनेक कथा आढळतील क्र १६२ या गाथेंत सूचित असलेली कथा कथासरित्सागराच्या लावाणक लंबकात पहिल्या तरंगात आली आहे. क्र ९८१ मध्यें सूचित असलेल्या कथेसारख्या प्रसंग कथासरित्सागराच्या मदनमंचुका लंबकाच्या सातव्या तरंगात श्रासेनाच्या कथेत आलेला आहे नाट्य वस्तु असलेल्या गाथा हीं आपणाकडूनी असावींत व त्याच्या अनु- रोधानें ग्रामीण फट नाटक रंगवीत असावेत असे मला वाटतें.

वन्य समाजाची हीं शब्दचित्रें आहेत, त्यात एकरूपता दृग्गोचर येत नसली तरी कृत्रिमता मात्र आढळत नाहीं. यावरून अनुमान होतें कीं गाथा-सप्तशतीच्या काळात नागर किंवा शिष्ट संस्कृति, हल्लीं आपण या शब्दा वापरतों त्या अर्थानें, उत्पन्न किंवा संघटित झालेल्या नव्हत्या.

एकादा निष्णात चित्रकार कुंचलीच्या दहा पाच टळक फटकाऱ्यात अभिप्रेत चित्र जणू सजीव करू शकतो नवशिका चित्रकार मात्र प्रभावासाठीं रेखांच्या सूक्ष्मतेवर व छायाप्रकाशाच्या यथार्थतेवर विसंबतो व त्यातच फसतो गाथासप्तशतींतील शब्दचित्रें निष्णात चित्रकाराप्रमाणें कमींत कमी शब्दात आणि उपमा व अलङ्काराच्या अभावीं हा असा उठावदार व चटदारीनें निर्माण केलेलीं आहेत कीं त्यांत संस्कृत प्राकृत व इम्रजीत तोड नाहीं. कमींत कमी पात्रांच्या कार्याचा किंवा भावनांचा सरळ अगर समन्वय करून एकादा त्रुटित प्रसंग अगदीं अल्प सामग्रीनिशीं असा उभारलेला आढळतो कीं त्यात जणूं जीवन नाट्याचें सर्वस्व समोर उभें राहतें सृष्टिसौंदर्याचें वर्णन ज्या ढंगानें सफाईनें केलेलें आढळतें तेवढीच कुशलता कवींनीं केलेल्या मनोविश्लेषणातही आढळते. आता मनोविश्लेषण हा विषय विशेषतः साहित्यिकामध्यें एवढा प्रिय आहे कीं काहीं साहित्य जणू त्यासाठींच हेतुपुरःसर निर्माण करण्यात येत आहे, पण त्यातलें बरेंचसे एवढें कृत्रिम असतें कीं त्याचा उथळपणा अजाणत्यालाही जाणवतो. गाथासप्तशतींत मनोविश्लेषणाचीं अशीं कितीं तरी उदाहरणें आढळतील कीं ज्यात नामवंत नवसाहित्यिकानाही नावीन्य वाटेल! गाथाकवींचें निरीक्षण सूक्ष्म आहे व त्याच्या कल्पनेचा पल्ला अमर्याद आहे. गाथाच्या रचनेंत प्रासादाचें लालित्य प्रकट झालेलें आहे, एवढेंच नाहीं, शब्दसृष्टीची तालबद्धता ही येथें प्रत्ययास येते शिष्ट साहित्यात वारंवार प्रत्ययास येणारी कृत्रिमता कोठेंही आढळत नाहीं, सुभाषितांतही. गाथा कवींचे नायक व नायिका आणि त्यांनीं व्यक्त केलेले प्रसंग सजीव वाटतात एवढेंच नव्हे, ते सजीव आहेतच, आणि डोळे असतील त्याला ते हरघडी भोंवतीं घडत असतांना दिसतील. कारण गाथाकृति प्रामाणिक आहेत आणि जीवनाशीं एकरूप आहेत.

ज्ञानेश्वरीपाठीं । जो ओवी करील मऱ्हाटी ।
तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥

जणूं याच भावनेनें मराठी कवींनीं गाथासप्तशतीनंतर अनेक शतकें लेखणी हातीं घेतली नाहीं!

॥ श्री मल्हार चरणारविंदार्पणमस्तु ॥

# शुद्धिपत्र

विशेष महत्वाच्या आणि विशेषतः प्राकृत भागातील चुका येथें दिलेल्या आहेत.

| पान नं. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २४ | २ | दंसणं ग | दंसणं च गह |
| ३५ | १० | खणे | छणे |
| ३९ | ३ | दट्ठ | दट्ठु |
| ४० | ११ | धारणा | धारणे |
| ४७ | २ | यथात्या | यथास्या |
| ४७ | १८ | मज्जाआ | मज्जाओ |
| ५५ | ४ | प्पहारा व्व पुण्णिम | प्पहाअ व्व पुण्णिमा |
| ५५ | १८ | पावत्या | पावंत्या |
| ५८ | १० | तामिच्छामि | तमिच्छामि |
| ६० | १० | सासुसएण | साणुसएण |
| ६३ | ८ | मणणं | सणेण |
| ६५ | ७ | महिला | महिलो |
| ६६ | २ | सुहावास | सुहावेसि |
| ७१ | ७ | गुरुई | गुरुइं |
| ७३ | १६ | कवाल | कवोले |
| ७८ | ४ | तअि | तीअ |
| ७९ | ५ | पूरण | पूरेण |
| ७९ | १९ | गलिप्यास | गलिप्पसि |
| ८३ | १४ | कु | चु |
| ९० | २० | रम्प | रम्प |
| ९३ | १३ | कइअव | कैअव |
| ९३ | १४ | अइ | अह |
| ९४ | ३ | मद्दत्त | मुहत्तं |

उदाहरणार्थ क्र २३१ या गाथेतील प्रसंग पहा. शुकबहात्तरींतील कथेशीं या गाथेतील वस्तूचें किती साम्य आहे! लावणीचा किंवा पोवाड्याचा एक एक चौक संपला कीं रंगभूमीवरील सर्वजण मिळून ध्रुवपद बोलून म्हणतात, जणू एक एक प्रवेश संपल्यानंतर तोंवरच्या नाचगाण्यामुळें व हावभावामुळें, गद्य व ग्राम्य वर्तनामुळें भावावलेल्या श्रोत्यांना सद्‌भावांची आठवण करून देण्यासाठीं, तशाच या गाथा ध्रुवपदासारख्या वारंवार म्हणण्यांत येत असाव्यात असे मला वाटतें.

हे मान्य झालें तर मराठी पोवाडा व लावणी यांचें मूळ आपल्याला गाथासप्तशतींत सापडलेंसे होईल!

उदाहरणार्थ "सगनभाऊच्या लावण्या" ह्या संग्रहांत समाविष्ट झालेली "कस्तुरीचा सुगंध" ही सिद्धनाथाची लावणी (सारस्वत प्रकाशक मंडळी: पृ. २६) घ्या. या लावणीचें ध्रुवपद असे आहे:

कस्तुरी वाळवित होती माडीवरती।
वेदरची कामसेना चतुर गुणवती॥ ध्रु॥

एके दिवशीं ती अशी कस्तुरी वाळवीत असतां मंद वारा सुटला आणि कस्तुरीचा दरवळला श्वास दौलताबादेस राव बाच्छायवती गेला. बादशहानें दिवाणाला विचारलं, कस्तुरी कोणाचाशीं श्वास मारिती? ॥ ध्रु॥ दिवाणानें कामसेनेचें नाव घेतलं. बादशहाला खोटें वाटलें. त्यानें धमकी दिली, खोटें ठरलें तर डोके मारीन. मग बादशहानें पत्र देऊन वेदरला जासूद जोडी पाठविली. पत्रांत विचारलें होतें कीं तुम्ही कोणते दिवशीं, कोणते वेळीं कस्तुरी वाळवली. ॥ ध्रु॥ वेदराळ गणिकेनें वाळवेळ लिहून उत्तर पाठवलें. दरम्यान साबाजी अनंतानें तें पत्र वाचून दाबवलें. वाचून यानें दिवाणाला सासासर्का दिली. ॥ ध्रु॥ तिकडे कामसेना मनांत झुरू लागली. तिनें अलंकार धारण केले, द्रव्य गाठीं घेतलें. माहीत असून बादशहाच्या भेटीला निघाली. स्वर्गांतून रंभा सुखासाठीं आली दौलताबादेस चांभार टेंकडीजवळ तिनें वस्ती धरली ॥ ध्रु॥ तिनें गाणें सुरू केलें ती गौरा रागिणी गाऊं लागली तेव्हां रातारात्रीं द्रव्य तें गाणें एकायला आलीं, तिनें गळ्यांतला हार काढला, त्या हरिणाच्या गळ्यांत घातला. गाणें सरतें तेव्हां हरणें पळालीं मग तिनें दिवाणाच्या चारी बद्दल बादशहाकडे फिर्याद दिली दिवाणा हार दिला मिळवून घ्यायला असा बादशहानें दिवाणाला हुकूम दिला॥ ध्रु॥ साबाजी अनंत कामसेनेकडे

चोरीच्या मार्गी आला त्याने तिला हकीगत विचारली. काय झालें असावें तें त्यानें ओळखलें, तो ही गुणी होता. त्यानें गाणें सुरू केलें. तें ऐकून हरणाचा मेळ जमला. त्यात हाराचा धनीही आला तो त्याच्याकडून मागून घेऊन साबाजीनें दरबारात हजर केला ॥ धृ ॥ फिर्यादीपासून तीन दिवसात मुद्देमाल हजर झालेला पाहून बादशहा खुषी झाला. त्यानें कामसेनेला तबकभर मोहरा दिल्या तो तिच्यावर फिदा झाला. ती म्हणाली, माझा हेत आहे साबाजी अनंतावर, मला एक रात, चार घटका द्या बादशहा बरें म्हणाला. त्यानें साबाजीला तिचें उत्तर सांगितलें ॥ धृ ॥ साबाजीनें तिला माडीवर चोरावल. शिडीच्या पायरी त्यानें अगोदरच काढून ठेवली होती. तेथे ती घुटली, साबाजीला म्हणाली, मला हात द्या. साबाजी उडला त्यानें तिला हात दिला. पण घरताच तिचा मदन उतरला कामसेनेचा गर्व हरला. ही नाथपंथी सदनाथाची कविता आहे ॥ धृ ॥

क्र १०१ मायेरें आकणकडचे आणि टीकेंत दिलेली गुरुबहातरींतील गोष्ट याचा मेळ कसा बसतो तें पहा, म्हणजे आपण माझ्या वरील अनुमानाला आपणपोंनें दुजोरा द्याल

नागरी, ग्रामीण व वन्य असे वर्ग समाजात नेहमींच असतात. या वर्गाचें विशिष्ट प्रकारचें सांस्कृतिक व्यक्तिमत्व ही कल्पना होत असतें गाथ सप्तशती-च्या काळांत या वर्गांच्या संस्कृत, प्राकृत व पैशाची या भाषा होत्या काळ जरा पैस नाजूका ठेवला तर म्हणता येतें कीं अनुक्रमें कालिदास, हाल व गुणाढ्य हे या वा वर्गांचे प्रतिनिधि आहेत पण गुणाढ्यच्या नावावर हल्ली उपलब्ध असलेल्या ग्रथात व य संस्कृति प्रत्ययास येत नाहीं हाल हा प्रतिष्ठानचा राजा होता हें नि संशय, पण परचक्रामळ त्याचें राज्य अस्थिर व संकुचित झालेलें असावें, त्याला नरचले अ युष्य गजानजीरच्या खेड्या प ड्यात, कदाचित अरण्य तरासात काढावें लागलें असावें हाल हें व्यक्तिनाम दुर्बोध आहे ल हाला ही सरा प्रिय हवी, हाल हें त्याचें आयुध होत, तो रयत. हलिक होता, अशा विरक्त वातावरणात आलेल्या व्यक्ति कोण जाणे कोणी नर सामंत तर कीं नरेंद्र हाल हा हलिक होतात आणि कवित्व सल नी हाल हा त्याचा आश्रयदाता होता कोण जाणे गाथ सप्तशतींत ग्रमीण जीवनाचे उत्तेज वर्णन आहेत. हे उत्तम त्रि हाळशाचे अहेत कवि ग्रामीण जीवनाशीं एकरूप झाल्याचे त्यावरून दिसून येतें गाथ सप्तशतीं नागर व

| पान नं. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ९६ | ८ | महूअर | महुअर |
| ९७ | २२ | होऊ | होउ |
| १०० | ४ | भूत | भूते |
| १०१ | १ | पाप्य | पोप्य , |
| १०५ | ८ | णीससिअं जाव | णासासिअ वराइअ जाव |
| ११० | १५ | यांवना | यांवनो |
| ११९ | २२ | वक्क | वंकं |
| १२३ | ११ | परिहरम् | परिहरन् |
| १२६ | १० | उद्कल | वड्कुल |
| १२६ | ११ | उड्कु | वड्ख |
| १३२ | १ | सुख | मुख |
| १३४ | १३ | मणु | माणु |
| १४८ | २ | भ्रमद्धदय | भ्रमध्द्धदय |
| १४९ | ६ | व्वि | व्व |
| १६० | १७ | यया | यथा |
| १६४ | १३ | णीसाहो | णीसहो |
| १८२ | १६ | पसूअ | पसूअं |
| १९५ | १२ | हआसइ | हआसाइ |
| १९९ | १३ | दू:सह | दु सह |
| २०० | ७ | वढ्ठिअ | वेढ्ठिअ |
| २०४ | २ | जल्पल्य | जल्पत्य |
| २११ | १९ | अकअ कअ | अवअं कअं |
| २१४ | ३ | गुज्जाओ | गुञ्जाओ |
| २१५ | १४ | हरिसूससिआए | हरिसूसुइआइ |
| २१८ | १७ | जण | जह |
| २२० | ११ | काऊं | काउ , |
| २२० | २२ | कुलह | कलह |

| पान न. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २२३ | ४ | दून्वन्ति | दुन्वन्ति |
| २२४ | १६ | णिाक्क्व | णिक्किव |
| २३८ | ६ | अम्हि | अम्हेहिं |
| २४२ | ८ | तुअ | तुह |
| २४६ | ७ | विरज्जए | खिज्जए |
| २४९ | १० | सुत्तव्व | सुतुन्त्र |
| २५३ | १७ | तत | तव |
| २५४ | १९ | भूतोचर | भूतोचर |
| २६० | १० | जेत्तिओ | जेन्तिओ |
| २६१ | ३ | सुमुद्दुत्तरन्त | समुद्दुत्तरन्त |
| २६१ | ५ | सुमुद्र | समुद्र |
| २६६ | १६ | क्रे | का |
| २६७ | ५ | अण्णअ | अण्णुअ |
| २६९ | १५ | दट्टुण | दट्टूण |
| २७४ | २ | सिज्जिर | सिञ्जिर |
| २७४ | १८ | निषण्णया | निषण्णाया |
| २८३ | १६ | ब्भमर | भमर |
| २८३ | १६ | भरग्ग | भरभग्ग |
| २८४ | १० | इदादीम् | इदानीम् |
| २८५ | ३ | उज्जुअस | उज्जुअस्स |
| २९० | ४ | भणन्नप्रियं | भणन्नप्यप्रियं |
| २९९ | १२ | गविरो | गव्विरो |
| २९९ | १३ | गुण | गुणे |
| ३०१ | १८ | वअणाइ | वअणाइ |
| ३०१ | १९ | अद्दतर | अहरंतर |
| ३०५ | ३ | कररस | करस्स |

| पान नं. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ३०५ | ५ | प्रहरस्य | प्रहरन्त |
| ३०५ | १३ | वट | वटं |
| ३०६ | १८ | आलिङ्गनन | आलिङ्गनेन |
| ३०८ | ४ | रन्तस्यकरम्पटया | रन्तव्यकरुम्पटया |
| ३०९ | ७ | प्रगूणं | मगूणं |
| ३१० | १६ | पमण्ण | पमण्णे |
| ३११ | ६ | दमि | रमि |
| ३१४ | १ | पक्ष्म | पक्ष्मल |
| ३१४ | ७ | जानाति | जानन्ति |
| ३१५ | ६ | दूगअ | दुगअ |
| ३१८ | १५ | वण्णगिण्व | वण्णवमिए |
| ३२४ | १६ | वानिन | वानिव |
| ३२८ | १२ | पहिहाइ | पडिहाइ |
| ३३७ | ८ | दंपडुम्म | दडुंपम्म |
| ३३७ | १६ | णिग्गुआ | णिग्गुणा |
| ३४२ | २ | वाहोह | वाहीह |
| ३५४ | १२ | विवरन्तगलिअ | विवरन्तरगलिअ |
| ३५५ | ४ | निवृर्ति | निर्वृर्ति |
| ३६० | ५ | कार्पस्यपि | कार्पास्यापि |
| ३६१ | ९ | जीहद | जीहाइ |
| ३६१ | १० | माहिस | महिस |
| ३६६ | १६ | चपआ | चणआ |
| ३६७ | २१ | पिसुणन्ति | पिसुणेन्ति |
| ३७० | ७ | पुसुवाण | पुसुआण |
| ३९० | १५ | यथुबिता | यैथुम्यिता |
| ३९१ | १३ | पहिआअ | पहिआण |
| ३९५ | ११ | अवेज्जइ | अवेज्जए |

| पान न. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३९८ | १५ | पहेणं | पहेण |
| ४०८ | ८ | ,सिणह् | सिणेह |
| ४१० | १ | कपाटपिनद्ध | कपाटकपिनद्ध |
| ४१९ | ९ | निर्घात शला | निर्घातशिला |
| ४२१ | ७ | पेच्छइ | पेच्छह |
| ४२३ | १४ | जुअणेहिं | जुआणेहिं |
| ४२५ | ६ | णववर | णववरे |
| ४२६ | १४ | हान्ति | होन्ति |
| ४२६ | १४ | विअसान्त | विकसन्ति |
| ४३१ | ५ | ज ज | ज ज |
| ४३४ | २ | मस्था : | मस्था : |
| ४४२ | ११ | सआरा | सचारा |
| ४४८ | ३ | जण | जल |
| ४५१ | २ | निर्वर्तित | निर्वतित |
| ४५३ | १५ | दट्ठण | दट्ठूण |
| ४६३ | २ | रोत्तु | रोत्तु |
| ४६३ | ३ | भेत्तमइ | मेत्तुम्मइ |
| ४६८ | १६ | गधेन | गधेण |
| ४६५ | ११ | प्रसव | प्रवस |
| ४६९ | २ | मितें | मिते |
| ४७६ | ५ | अभुत्तण | अब्भुत्तण |
| ४७८ | ५ | णिस्सारइ | णिस्सरइ |
| ४९० | १० | उच्छंगियायँ | उच्छंगियाएँ |
| ४९३ | ७ | पहियस्य | पहियस्स |
| ४९३ | ७ | धूसरस्य | धूसरस्स |
| ४९८ | ७ | दिहओ | दिअहो |
| ४९८ | १३ | णिहेण | सिणेह |

| पान न. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५०७ | १३ | रोआविण | रोआविअ |
| ५०७ | १३ | पहिएअ | पहिएण |
| ५२६ | १७ | मुहअं...उलोइरी | मुहअंदपुलोइरी। |
| ५२७ | ६ | ताई | ताइं |
| ५२७ | ७ | अज्जुण्ह | अच्चुण्ह |
| ५३२ | ९ | ई | इ |
| ५३८ | १० | णीसस | णीसार |
| ५३९ | ८ | जंपेसु | जपसु |
| ५३९ | १० | अद्धाच्छि | अद्धच्छि |
| ५५१ | २ | जह | जइ |
| ५५१ | १६ | रूंभिअ | रुंभिअ |
| ५५३ | १७ | मिअंकलेहें व्व | मिअंकलेहॉव्व |
| ५५४ | ३ | मण्णुआ | मण्णुणा |
| ५५७ | १५ | तो | ता |
| ५५८ | ३ | मुणिणो | मुणिओ |
| ५६८ | ३ | मविसइं | माविसइ |
| ५६९ | १६ | दइअ | दइआ |
| ५७० | ११ | क्षे म् | क्षेत्रम् |
| ५७५ | ७ | जावउ | जारउ |
| ५८१ | १३ | कंदाराहिं | कंदरहिं |
| ५९१ | ११ | तदो | तदा |
| ५९३ | ३ | भात्त | भर्त्ति |

कविवत्सल श्री हाल सातवाहन संपादित

# ॥ गाथासप्तशती ॥

## प्रथमं शतकम्

<u>१ मङ्गल :</u>  1. Obeisance.

● सूर्य 'उगवता' आहे हें मूळ गाथेंत सांगितलेलें नाहीं. गाथासप्तशतीच्या आरंभीं व अखेरीस शंकरानें केलेल्या सध्यावंदनाच्या किंवा सूर्यनमनाच्या गाथा आहेत; म्हणून पहिल्या गाथेंत उगवत्या व अखेरच्या गाथेंत मावळत्या सूर्याला अञ्जली देण्यात येत असल्याचे गृहीत धरलें आहे. या गाथेंतील 'अरुण' या शब्दानें ह्या तर्काला पुष्टि मिळते; अखेरच्या गाथेंत हा शब्द नाहीं. प्रेमराज सांगतो कीं ग्रंथकारानें शिष्टाचार-परिपालनार्थ ग्रथारंभीं इष्ट देवतेला नमन केलेलें आहे. कुलबालदेव सांगतो कीं शालिवाहनानें ग्रथाच्या आरंभीं, मध्यें व अखेरीस ( आदिमध्यांतेपु ) इष्टदैवताप्रत नमस्कार-गाथा लिहिलेल्या आहेत. गाथासप्तशतींत शंकराला उद्देशून लिहिलेल्या अनेक गाथा आहेत; प्रत्यक्ष पशुपति ज्याला नमन करतो तो सूर्य हेंच शालिवाहनाचें इष्ट दैवत असलें पाहिजे असा तर्क केला तर हे वचन यथार्थ आहे असें दिसून येतें; कारण गाथासप्तशतींत सूर्यनमनाच्या गाथा तीनच आहेत आणि यापैकीं मधली गाथा ( क्रमांक ३३२ ) ही मूळ ग्रथाच्या मध्याच्या आसपास आहे. गाथा-सप्तशती हा ग्रथ शृंगारप्रचुर आहे असें 'रोपारुण' या शब्दावरून ध्वनित होतें असें एका टीकाकाराचें मत आहे. गगाधर सांगतो, मानिनी नायिकेचा प्रणयरोप असह्य झालेल्या नायकाप्रत हे दूतीचे उद्गार आहेत ! पार्वतीला गायत्रीबद्दल मत्सर वाटला, शंकरालाहि मत्सराचें लक्ष्य व्हावें लागलें, मग मनुष्याची काय कथा ! स्त्रियांना संशयाची व मत्सराची लहर केव्हा, कोणाबद्दल व कोणत्या कारणानें येईल, याचा अंदाजहि करता येणार नाहीं; या बाबतींत स्वभावतः विशेष चाणाक्ष असणाऱ्या स्त्रियांनाहि ! चंद्राला सौंदर्य आहे, पण तो फिक्ट आहे, पौर्णिमेच्या पहाटे मात्र तो लालसर असतो आणि गौरीचें मुख लालसुंद आहे; चंद्राला सौंदर्य आहे, पण सुगंध नाहीं, उमेच्या मुखचंद्राला कमलाचा सुगंध आहे ! पद्मः चंद्रंगता पद्मगुणान्न भुङ्क्ते पद्माश्रिता चान्द्रमसीमभिख्याम् । उमामुख तु प्रतिपद्य लोला द्विसश्रया प्रीतिमवाप लक्ष्मी ॥

( कुमारसंभव : १.४३ )

## २ प्रयोजन :  2. Nectar.

अमिअं पाउअकव्वं पढिउं सोउं अ जे ण आणन्ति ।
कामस्स तत्तंतन्ति कुणन्ति ते कहँ ण लज्जन्ति ? ॥ २ ॥

[ अमृतं प्राकृतकाव्यं पठितुं श्रोतुं च ये न जानन्ति ।
कामस्य तत्त्वचिन्तां कुर्वन्ति ते कथं न लज्जन्ते ॥ ]

अमृतासारखें प्राकृत काव्य वाचणें किंवा ऐकणें ज्यांना माहीत नाहीं ते कामशास्त्रातील तत्वांची चर्चा मात्र करीत असतात. त्याना लाज कशी वाटत नाहीं ?

● व्युत्पन्न नायकाप्रत विदग्ध नायिकेची उक्ति. पण्डितांनीं विचारलें, काय आम्ही प्राकृत पढावयाचें ? प्राकृत वाङ्मय मूढांनीं किंवा स्त्रियांनीं वाचावें. 'बालस्त्रीमूढमूर्खाणां नृणां चारित्रकाङ्क्षिणाम् । अनुग्रहार्थं तत्त्वज्ञैः सिद्धान्तः प्राकृतः कृतः ॥' (दशवैकालिकटीका, पृ. ११३). नायिका सांगते, प्राकृत गाथा मनोरंजक आहेत, त्या मदनागारदूती आहेत, कामकौशल्याच्या शिक्षिका आहेत; समयोचित ललित गाथा ऐकविल्यानें विदग्ध वनिता प्रसन्न होतात. म्हणून, साधारणदेव सांगतो, कामशास्त्राच्या फलप्राप्तीच्या इच्छुकानें गाथांचा संग्रह अवश्य करावा. कामशास्त्राचें शुष्क चर्वितचर्वण ऐकून कंटाळलेली व तापलेली विदग्ध नायिका प्राकृत काव्यस्तुतीच्या निमित्तानें व्युत्पन्न नायकाप्रत म्हणते, आतां हें संस्कृत पुरे नाहीं का झालें ? पंक्तीच्या उत्तरार्धांत प्राकृताची मागणी होते, याचा रसिकांना अनुभव आहेच ! कामशास्त्रातील तत्त्वाची या तंत्राची चर्चा करतांना पण्डितांना संकोच वाटत नाहीं, कारण अशी चर्चा पण्डितांनीं

१. अमअं, अमयं. २. अमय पाइयकव्वं पढिउं सोउं च ये न याणन्ति (वज्जालग्ग). ३. कामस्स. ४. तत्तत्तिं, तत्तम्मि. ५. तन्त्रचिंतम्. ६. वार्ताम्.

पण्डितासाठीं केलेली असते. स्त्रियांनीं किंवा प्राकृत जनांनीं त्याचें अनुकरण केलें तर तें मात्र अश्लाध्य, किंवा अश्लील! कारण यामुळें आपली प्रतिष्ठा कमी होईल अशी या लब्धप्रतिष्ठितांना धास्ती वाटते! प्राकृत काव्य रसाळ आहे, मधुर आहे, जिवंत आहे; कारण त्यांत हृदयांतल्या भावना प्रामाणिकपणें सशब्द केलेल्या असतात; एवढेंच नव्हे, अमृतमय आहे, कारण त्याच्या श्रवणानें नवचैतन्य प्राप्त होतें! अमृताच्या स्पर्शानें वस्तुमात्राला चैतन्य व चिरंजीवन प्राप्त होतें, असा संकेत आहे. मग प्रत्यक्ष अमृताचें धारण कोणी व कसें करावयाचें? समुद्रमंथनाच्ये वेळीं देवदानवांनीं हा प्रश्न कसा सोडविला असेल तो असो!

## ३ ग्रंथस्वरूप : 3. Patron.

सत्त सताइं कइवच्छलेण[2] कोडीअ मज्झआरम्मि ।
हालेण विरइआइं सालङ्काराणँ गाहाणम् ॥ ३ ॥

[ सप्त शतानि कविवत्सलेन कोटेर्मध्ये ।
हालेन विरचितानि सालंकाराणां गाथानाम् ॥ ]

एक कोटि गायांमधून अलंकारांनीं सजलेल्या अशा सातशें गाथा निवडून कविवत्सल हालानें हा संग्रह केला.

● प्राकृत-पिङ्गलात गाथालक्षण सांगितलें आहे : ‘ पढमं बारह मत्ता बीए अट्ठारएहिं संजुत्ता । जह पढमं तह तीअं दहपञ्चविहूसिआ गाहा ॥ ’ संस्कृतात जी आर्या ती प्राकृतात गाथा. हेमचंद्रानें काव्यानुशासनात ( अ. १ : सू. ११ ) काव्यलक्षण सांगितलें आहे: ‘ अदोषौ सगुणौ सालंकारौ च शब्दार्थौ काव्यम्। ’ गाथासप्तशतीला गाथाकोश अशीही संज्ञा आढळते. हेमचंद्रानें ( पूर्वोक्त : अ. ८: सू. १३ ) कोशलक्षण सांगितलें आहे :

१. सयाइं. २. वत्थलेण. ३. शालवाहनेन, शालिवाहनेन.

' स्वपरकृतसूक्तिसमुच्चयः कोशः । यथा सप्तशतकादिः । ' साहित्यशास्त्रावरील अनेक संस्कृत ग्रंथात अलंकारांची उत्कृष्ट उदाहरणें म्हणून गाथासप्तशतींतील अनेक गाथा उधृत केलेल्या आहेत. त्याचें कोष्टक इतरत्र दिलेलें आहे. त्यावरून त्याचें सालंकारित्व सिद्ध होतें. ' हालेन विरचितानि ' या प्रयोगावरून आधुनिक टीकाकार अनुमान करतात कीं वेगवेगळ्या कवींनीं रचलेल्या गाथावरून हालानें अशेरचा हात फिरवून त्या सालंकृत केल्या असाव्यात. मध्ययुगातील पण्डितानाही सातवाहन वंशाचा एवढा विसर पडला होता कीं एकानें ' कविवत्सल ' हें व्यक्तिनाम असल्याचें नमूद केलें आहे !

## ४ चकृष्यान : 4. All Quiet.

उअ णिच्चलणिप्पन्दा भिसिणीपत्तम्मि रेहइ बलाआ ।
णिम्मलमरगअभाअणपरिट्ठिआ संखसुत्ति व्व ॥ ४ ॥

[ पश्य निश्चलनिःस्पन्दा बिसिनीपत्रे राजते बलाका ।
निर्मलमरकतभाजनपरिस्थिता शङ्खशुक्तिरिव ॥ ]

पहा, कमळाच्या पानांमध्यें बगळी कशी एकाग्र, निश्चल बसलेली आहे. जणूं निर्मळ पाचूच्या पूजापात्रात मोत्यांची शिंपली ठेवावी तशी ती शोभत आहे.

● निश्चल व निःस्पन्द या शब्दांच्या अर्थांमधील भेद काव्यप्रकाशावरील श्री नागेशभट्टाच्या उद्योत टीकेंत स्पष्ट केलेला आहे. ' चलन शरीरक्रिया । स्पन्दस्त्ववयवक्रिया । ' सुधासागर टीकेंत श्री भीमसेन दीक्षित सांगतात: ' निश्चलत्व स्वप्रयत्नाधीनक्रियाशून्यत्वं, निष्पन्दत्वं स्वाधीनक्रियाशून्यत्वमिति न पौनरुक्त्यम् । ' अलंकारकौस्तुभाच्या टीकेंत श्री विश्वेश्वर पण्डित सांगतात: 'चलनमवयवक्रिया, स्पन्दस्त्ववयवविक्रिया.' शंखशुक्ति या प्रयोगाचा

१. पत्तम्मि. २. बलाआ. ३. मायफुरि. ४. परिट्ठिआ. ५. सिप्पि. ६. प्रतिष्ठिता.

नीट उलगडा होत नाहीं. उद्योतात सांगितलें आहे: 'शंखशुक्तिः शुक्त्याकारशंखघटितं पात्रम्।' शुक्ति म्हणजे मोत्याची शिंपली अथर्ववेदात हा शब्द या अर्थानें वापरलेला आहे ( ज्ञानकोशः बुद्धपूर्व जगः पृ. ४६१ ). चंदनासाठीं कचोळें असतें तसें हें पात्र असावें मध्यें शंख व त्याभोंवतीं मोत्याच्या शिंपा, असें तर हें पात्र नसेल ? अलंकारकौस्तुभाच्या टीकेंत श्री विश्वेश्वर पण्डित सांगतातः 'शङ्खशुक्तिः शङ्खनिर्मितं शुक्त्याकारपात्रम् इति काव्यप्रदीपः।' काव्यप्रकाशात दिलेला या गाथेचा व्यंग्य अर्थ असाः 'अत्र निष्पन्दत्वेन आश्वस्तत्वं,तेन च जनरहितत्वम्, अतः संकेतस्थानमेतदिति कयाचित् कश्चित्प्रत्युच्यते। अथवा, मिथ्या वदसि, न त्वमत्रागतोऽभूरिति व्यज्यते।' अलंकारकौस्तुभातील विवेचन पहाः 'क्वचिद्बिंबप्रतिबिंबभावेन धर्मोक्तिः। स च वस्तुतो भिन्नयोरपि सारूप्यादेकत्वाध्यवसानम्।' गाथा-सप्तशतीवरील व अलंकार ग्रंथावरील टीकाकारांनीं ही व्यङ्ग्योक्ति आहे असें गृहीत धरून या गाथेंतून अनेक अकल्पित अर्थ काढले आहेत, त्याचें कौतुक करावें तेवढें थोडेंच ! गगाधरानें रतिरहस्यातील उतारा ( ५-३ ) दिला आहेः 'कल्लोलिनी काननकंदरादौ दुःखाश्रये चार्पितचित्तवृत्तिः। मृदुक्रमारंभमभिन्नधैर्यः श्लथोऽपि दीर्घं रमते रतेषु॥' तो सांगतो, या गाथेंत दीर्घरताची सूचना आहे ! प्रेमराजानें आपल्या टीकेंत अमरुशतकातील 'शून्यं वासगृहं विलोक्य', हें वचन उधृत केलें आहे. एका टीकाकाराला या गाथेंत विपरीत रताची सूचना दिसते ! भुवनपाल सांगतो, बिसिनी-पत्रावरून नायिका पद्मिनी आहे असें ध्वनित आहे ! मग ती गोरीपान असावी व तिनें हिरवें वस्त्र परिधान केलेलें असावें असा तर्क का करू नये ? बलाका म्हणजे बगळी किंवा लाडकी. संकेताप्रमाणें ती तळ्याच्या पाळीं तुझी वाट पहात बसली आहे, अशी दूतीची सूचना. माणसाची चाहूल लागली कीं बगळे उडून जातात. बगळी निश्चल बसली आहे, अर्थात् आजूबाजूला कोणी नाहीं, निर्धास्तपणें येथें बसण्यास हरकत नाहीं, व्यत्यय येणार नाहीं, असें सुरतासक्ताचें परस्पराना आश्वासन. संकेतस्थाना कडे मी जाऊन आलों असें तुम्ही सांगता, पण तेथें तर बगळी निश्चल बसली आहे; तुम्ही तिकडे गेला असता तर ती केव्हाच उडून गेली असती,

म्हणून मला वाटतें, तुम्ही तिकडे गेलांच नाहींत, अशी दूतीनें केलेली नायकाची निर्भर्त्सना. काव्यप्रकाश, साहित्यदर्पण वगैरे ग्रंथात या गाथेच्या अनेक छटा चर्चिल्या आहेत. त्या वाचून खवळलेले श्री. राजारामशास्त्री भागवत ( प्राकृत भाषेची विचिकित्सा : आवृत्ति दुसरी. पृ. ६४ ) म्हणतात: 'ती काव्यप्रकाशकारानें उत्तमपैकीं ठरवून तिचा शिरस्त्याप्रमाणें जार जारिणींशीं संबंधही त्यानें लावून टाकला आहे...अलंकारानें समंजसपणा आलेली स्वभावोक्ति (' स्वभावोक्तिः ... क्रियारूपवर्णनम् ।' काव्यप्रकाश; उद्योत : 'साधारणस्वभाववर्णनस्य स्फुटत्वाभावालंकारत्वम् । असाधारणस्तु लोकसिद्धोऽपि प्रतिभामात्रवेद्यत्वादलौकिकत्वाद्गातीत्यलंकारः' ) उघड झळकत असताना मुद्दाम आडवाटेनें जाऊन जारिणीचा उजू किंवा दासीच्या द्वारा जाराशीं संबंध लावणाऱ्या काव्यप्रकाशकारास शृंगाराची कावीळ झाली, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईलशी वाटत नाहीं...संस्कृत आलंकारिकानीं जी भलतीच वाट दाखविली त्या वाटेनें प्राकृत ग्रंथावर टीका करणारे भट्ट व शास्त्री डोळे मिटून गेले ही अंधपरंपरा दाडगी नव्हे काय!' खुद्द शास्त्रीबुवानीं गाथासप्तशतींतील शृंगाराकडे पक्षपाती डोळेझाक केलेली असल्याचें त्याच्या टीकाकारानीं दाखवून दिलें आहे.

## ५ विभ्रमः 5. Dalliance.

तावच्चिअ रइसमए महिलाणं विब्भमा विराअन्ति ।
जाव ण कुवलअदलसच्छआइं मउलेन्ति णअणाइं ॥ ५ ॥

[ तावदेव रतिसमये महिलानां विभ्रमा विराजन्ते ।
यावन्न कुवलयदलसच्छायानि मुकुलीभवन्ति नयनानि ॥ ]

नीलकमळासारखी कांति असलेले डोळे रतिसमयीं तृप्तीनें मुकुलित झालेले नाहींत तोंपर्यंतच स्त्रियांचे विभ्रम मनोहर वाटतात.

१. जावण. २. सच्छाइं, सच्छहाई. ३. सदृशानि.

● गंगाधर सांगतो की हे उद्गार नायकाने विपरीतरतप्रसंगी सदर्प नायिकेला उद्देशून काढलेले आहेत ! हाव म्हणजे स्त्रियांच्या शृंगारचेष्टा; यांचे विलास, बिब्बोक, विभ्रम, ललित, हेला व लीला असे सहा प्रकार आहेत. 'स्त्रीणां विलासविब्बोकविभ्रमा ललितं तथा । हेला लीलेत्यमी हावाः क्रियाः शृङ्गारभावजाः ।' (अमरकोष, प्रथम काण्ड, नाट्यवर्ग). 'विभ्रमस्त्वरया काले भूषास्थानविपर्ययः' हें धनंजयानें दशरूपकांत दिलेलें लक्षण येथें लागू पडत नाहीं. भरत सांगतो : 'कामौत्सुक्यकृताकारं रूपयौवनसंपदा । अनवस्थितचेष्टत्वं विभ्रमः परिकीर्तितः ॥' नागरसर्वस्वांत पद्मश्री सांगतो: "क्रोधं स्मितं च कुसुमाभरणादि याञ्चा । तद्वर्जनं च सहसैव विमंडनं च । आक्षिप्य कांतवचनं लपनं सखीभिः निष्कारणोत्थित-गतं बत विभ्रमं तत् ॥ (१३।१३)॥ विभ्रम म्हणजे कामौत्सुक्यानें प्रेरित अशा शृंगारचेष्टा. विभ्रम हा विलास भ्रूसमुद्भव आहे. गंगाधरानें असाच अर्थ घेतला आहे. तो सांगतोः 'सुरतावसानोपचाराद्यनभिज्ञतया रतान्तेऽपि कटाक्षभुजप्रक्षेपादि विभ्रमं कुर्वन्ती नायिकां प्रति सख्याः शिक्षोक्तिरियम् ।' ह्या टीकेचा उत्तरार्ध मात्र अग्राह्य आहे; कारण नायिका कितीही अनभिज्ञ असली व तिची सखी कितीही जिवलग असली तरी अशा प्रसंगीं त्यांचें साहचर्य संभवत नाहीं; शिवाय, काय हेंही शिकवावें लागतें ? आणि, काय जें कृत्रिम तें अनुभविकाला ओळखणार नाहीं ? कामशास्त्रज्ञ सांगतात कीं तृतीमुळें स्त्रियांचे नेत्र मिटतात : ' नारी विसृष्टकुसुमेषुजला रतान्ते । नृत्यं करोति बहुवल्लभरोदनेव । कैवल्यमेतिमुकुलीकृतचारुनेत्रा । शक्नोति नो किमपि सोढुमतिप्रयासम् ॥ ' (अनङ्गरङ्ग : तृतीय स्थल ॥ ११ ॥ : काशी संस्कृत सीरीज). हॅव्हेलॉक एलिस सांगतो कीं दोघांचेही नेत्र मुकुलित होतात. प्रेमराज सांगतो कीं तृतीमुळें पुरुषाचे डोळे मिटतात. म्हणून, आणखी एक टीकाकार सांगतो, नायिके, तुझें समाधान झालें नसले तरी नायक तृप्त झालेला आहे हें बाह्य चिन्हांवरून ओळखून तूं विभ्रमाचा त्याग करावास, हें उक्त ! या गाथेची नायिका मध्या आहे असें धनंजयानें दशरूपकांत (२-१६) सांगितलें आहे.

६ कोरांटी : 6. Longing.

णोहलिअमप्पणो किं ण मग्गसे मग्गसे कुरवअस्स ? ।
एअं तुह सुहग हसइ वलिआणणपङ्कअं जाआ ॥ ६ ॥

[ दोहदमात्मनः किं न मृगयसे मृगयसे कुरवकस्य ।
एवं तव सुभग हसति वलिताननपङ्कजं जाया ॥ ]

सुभग, ( हौसेनें लावलेल्या ) कुरबकाला ( फुलें यावींत म्हणून त्याचा ) दोहद पुरविण्यासाठीं ( त्याला आलिंगन द्यावें म्हणून ) तुम्ही प्रियेला प्रोत्साहन देता; पण आपला पहिला दोहदही पुरवीत नाहीं, म्हणून तुमची पत्नी मुख तिरवें फिरवून ( तुमच्या अडाणी-पणाबद्दल ) तुम्हाला हंसत आहे.

• नायिकेची सखी नायकाला विचारते, तिच्या हंसण्याचा गर्भित अर्थ कळू नये, एवढे तुम्ही अडाणी कसे ? आता ती लहान नाहीं; पहा, कशी बहरली आहे ! किंवा पत्नी स्वत च सूचित करते कीं मी पुष्पिता आहे आणि मलाही स्वतःच्या अशा आशा व इच्छा आहेतच; त्या अगोदर का पुरवीत नाहीं ? एक टीकाकार सांगतो, यात प्रथम रजोदर्शनाची सूचना आहे ! दुसरा सांगतो, पत्नी गर्भिणी आहे, तिला स्वत लाच डोहाळे लागले आहेत आणि हें पतीच्या लक्ष्यात येत नसल्यामुळें ती त्याला हंसत आहे. भुवनपाल सांगतो कीं या गायेची नायिका कुलटा आहे !

७ अशोक : 7 Revenge

वाविज्जन्ति असोएहिं लहहचणिओओ दइआविरहम्मि ।
किं महइ कोवि कस्स वि पाअपहारं पहुप्पन्तो ? ॥ ७ ॥

१. दोहलिअं, दोहलम्. २ सु ३. सुह. ४. न्वदनदम्. ५. एवं च सुभग, एवं मन्नु सुभग हसे. ६ विरआउ.

[ ताप्यन्ते अशोकैर्विदग्धवनिता दयितविरहे ।
किं सहते कोऽपि कस्यापि पादप्रहार प्रभवेन् ॥ ]

प्रियकराच्या विहारामुळें ( विकल झालेल्या ) विदग्ध स्त्रियाना अशोकही तापदायक वाटतो. सामर्थ्य असूनही कोण कोणाचा लत्ता प्रहार सहन करील ?

● अशोकाला शोक माहीतच नाहीं, मग तो परपीडेला कसा उद्युक्त होईल ? पति सन्निध असताना, त्याच्या प्रोत्साहनानें किंवा त्याच्या पाठिंब्यावर विसवून तिनें केलेल्या लत्ताप्रहाराची अशोकाला आठवण असेल, आता वसतात तो फुलानीं डवरला आहे, मस्त झाला आहे, पति सन्निध नसल्यामुळें ती विकल झालेली आहे, तिच्या पूर्वीच्या धार्ष्ट्याबद्दल जणू तिचा सूड घेण्याला अशोक उद्युक्त झाला आहे, आवेशानें लालबुंद झाला आहे, पुष्पित अशोकाचें दर्शन तिला कसें सहन होईल ? प्रोषित भर्तृका विरहाच्या अखेरच्या अवस्थेंत आहे, शिवाय वसत सुरू झाला आहे, त्वरेनें घरीं जा, अशी दूतीचा प्रवासी पतीला सूचना, किंवा वसतात प्रवासाला सज्ज झालेल्या पतीचा निषेध

## ८ तळ्याच्या पाळीं : 8 Withered stalks

अत्ता[१] ! तह रमणिज्जं अह्मं गामस्स[४] मण्डणीहअम्[५] ।
लुअ[६]तिलनाडिसरिच्छ सिसिरेण कअं भिंसिणिसण्डम्[७] ॥ ८ ॥

[ श्वश्रु[९] तथा रमणीयमस्माक ग्रामस्य मण्डनीभूतम् ।
लूनतिलवाटीसदृश शिशिरेण कृत विसिनीषण्डम् ॥ ]

१ ललित, मनोहर २ पुष्पित ३ अत्त तह ४ गाअस्स ५ मडणअभूद ६ लुअ ७ वि सिणिसड ८ सण्डम् ९ हे मातस्तया, अत्यत

आत्याबाई, आपल्या गांवाला शोभा देणाऱ्या रमणीय तळ्यांतील कमळांची थंडीनें कोण दुर्दशा केली आहे ( तीं पाहिलींत का )? तिळाचें सुंदर पीक कापल्यावर नुसते बुडखे राहातात ना, तसे तळ्यांत आतां कमळांचे दांडे मात्र राहिले आहेत.

● तिळवाडींत संकेत ठरला होता; पीक तयार झाल्यामुळें कापणीला शेतकरी तिकडे जातील, म्हणून संकेतस्थान बदलून तळ्याच्या पाळीं जागा ठरविल्याची सूचना. हिंवाळ्यातल्या थंडीनें कमळें करपलेलीं असल्यामुळें आता तिकडे कोणीही जाणार नाहीं व एकांत मिळेल अशी उपपतीला सूचना. या दोन्ही ठिकाणीं जमणार नाहीं, म्हणून घरींच संकेत ठरविला आहे, अशी या गाथेंत सूचना आहे, असें एका टीकाकाराचें म्हणणें आहे! सासूच्या देखत सुनेनें आणखी किती स्पष्ट बोलावयाचें? पण जें बोलावयाचें तें एवढें संदिग्ध, तर तिच्या प्रियकरानें जावें तरी कोठें?

## ९ तागाच्या शेतांत : 9. Hemp.

किं रुआसि ओणअमुही धवलाअन्तेसु सालिछित्तेसु?।
हरिआलमण्डिअमुही णडि व्व सणवाडिआ जाआ ॥ ९ ॥

[ किं रोदिष्यवनतमुखी धवलायमानेषु शालिक्षेत्रेषु ।
हरितालमण्डितमुखी नटीव शणवाटिका जाता ॥ ]

साळीचें शेत पिकून पांढरें झालें आहे. ( तें कापण्याला शेतकरी येतील व एकांत मिळणार नाहीं ) म्हणून मान खालीं घालून कां रडतेस! नटीनें मुखाला हरिताळाचा रंग लावून सज्ज व्हावें त्याप्रमाणें तागाचें शेत ( पिवळ्या धमक फुलांनी ) नटलें आहे.

१. सा एअमु २. छेत्तेसु. ३. जाअ.

● 'हरिताळमण्डितमुखी' हा पाठ स्वीकारून केलेलें भाषांतर वर दिलेलें आहे. 'हरिजालमण्डितमुखी' असाही पाठ आहे. हरि म्हणजे माकड, ज्याचें प्रवेशद्वार माकडाच्या घरट्याच्या जाळ्यानें मण्डित झाले आहे असें तागाचें क्षेत्र, असा अर्थ गंगाधराने दिला आहे. प्रवेशद्वारांशींच ही अडचण आहे, म्हणून तेथें संकेताला योग्य असें निर्जन स्थान व्यक्त होतें, असें त्याचें म्हणणें. 'हरिआल' म्हणजे मुग्या खाणारा प्राणी किंवा पक्षी, असाही अर्थ आढळतो. मान खालीं घालून रडतेस कशाला ? दुसरीकडे संकेत ठरवून मी आलें सुद्धा; उठ, डोळे पूस, मुखराग लावून सज्ज हो आणि ती तिकडे पिंवळी पट्टी दिसते आहे ना, त्या तागाच्या शेताकडे जा, अगदीं प्रसन्न चित्तानें जा, शृंगारनाट्याची सामुग्री तेथें तयार आहे, अशी दूतीची सूचना.

## १० कांकडीचा तंतु : 10 Tendril.

**सहि ! ईरिसिच्चिअ गई, मा रुव्वसु तंसवलिअमुहअन्दम् ।**
**एआण वालवालुङ्कितन्तुकुडिलाणं पेम्माणम् ॥१०॥**

[ सखि ईदृश्येव गतिर्मा रोदीस्तिर्यग्वलितमुखचन्द्रम् ।
एतेषां बालकर्कटीतन्तुकुटिलानां प्रेम्णाम् ॥ ]

सखे – मुखचंद्र तिरपा फिरवून रडू नको. प्रेमाची गती कांकडीच्या कोंवळ्या ततूसारखी ( नाजूक व ) वाकडीच असावयाची.

● कलहान्तरितेप्रत सखीचे उद्गार. प्रियकराच्या प्रीतींत वक्रता दिसली, म्हणून एवढें जिवाला लावून घेऊ नको, अपराधी प्रियकर पुन्हा अनुनयासाठीं आला तर फार ताणूनही धरू नको. प्रेमाची गति वक्र असते, इतकेंच नव्हे, अनुबन्धाचा ततु नाजुक असतो, ताणल्यानें तो सरळ होत नाहीं, तुटतो मात्र, हें जाणून, हे मानिनी, आता तूच त्याचा अनुनय कर.

१. गइ. २ एरिसि च्चिअ. ३. तिरिअ.

११ नवन्यावर स्वार : 11. Cavalier.

पाअपडिअस्स पइणो पुट्ठिं पुत्ते समारुहन्तम्मि ।
दढमण्णुदुण्णिआएँ वि हासो घरिणीऍ णेक्कन्तो ॥११॥

[ पादपतितस्य पत्युः पृष्ठं पुत्रे समारुहति ।
दृढमन्युदूनाया अपि हासो गृहिण्या निष्क्रान्तः ॥ ]

क्रुद्ध गृहस्वामिनीच्या पाया पडणाऱ्या पतीच्या पाठीवर पुत्र बसला. पत्नी आतिशय रागात होती, तरी हें दृश्य पाहून ती खुद्कन् हंसली.

● पत्नीनें मान धारण केला होता आणि पति तिची मनधरणी करीत होता. *पति स्वाधीन असल्यामुळें तिच्या मनात त्याच्याविषयी थोडासा* अनादरही होता. ती पुत्रवती, अर्थात् गलितयौवना; तरीही त्याच्या मनात मान तिच्याविषयी स्नेहातिशय होता. अलंकारकौस्तुभात श्री विश्वेश्वरपण्डित सागतो, पुत्राच्या विलक्षण चेष्टेमुळें तिचा मान ओसरला. गंगाधर सागतो, बन्धविशेषस्मरणामुळे ती हसली! कदाचित् हे उद्गार सपत्नीचे असावेत, असाही त्याचा तर्क आहे! अलंकारकौस्तुभात समाधि अलंकाराचें उदाहरण: 'भवति समाधिः सुकरे हेत्वन्तर-समवधानतः कार्ये।'

१२ योग्य : 12. Praiseworthy.

संचं, जाणइ दट्ठुं ! सरसम्मि जणम्मि जुज्जुए राओ ।
मरउ, ण तुमं भणिस्सं, मरणं वि सलाहणिज्जं से ॥१२॥

[ सत्यं जानाति द्रष्टुं सदृशे जने युज्यते रागः ।
म्रियतां न त्वां भणिष्यामि मरणमपि श्लाघनीयं तस्याः ॥ ]

१. दढ. २. दूमिआएँ, दुम्मिआए. ३. दृढमन्युर्दुमनस्कायाः ४. सच्चिअ. ५. सरिस. ६. सेव. ७. अस्याः

अनुरूप व्यक्तीवर अनुराग करावा हें योग्य आहे. ( तिनें तुझी निवड केली यावरून दिसून येतें कीं ) तिची निवड चांगली आहे. ( आता तुझ्या विरहानें ) ती गतप्राण झाली तर तेही प्रशसनीय होईल; मी तुला बोल लावणार नाहीं.

● तिचें चित्त तुझें ध्यान करण्यात गुंतलेलें असताना ती गतप्राण झाली तर पुढील जन्मीं तरी तूं तिला प्राप्त होशील ! नायक व नायिका परस्पराना अनुरूप आहेत अशी प्रशंसापूर्ण प्रस्तावना करून सखी नायकाला प्रोत्साहन देते, नंतर त्याची निर्भत्सना करते व अखेरीस त्रागा करून सागते कीं तुझ्या समागमासाठीं तिनें प्राणातिक अनुष्ठान माडलें आहे आणि तिची अवस्था आसन्नमरण झालेली आहे. अलङ्काररत्नाकरात ही गाथा व्यत्यासाचें आणि अलकारकौस्तुभात आक्षेपाचें उदाहरण म्हणून उदाहृत केलेली आहे. ' दोषगुणयोरन्यथात्वं व्यत्यासः ' ॥६६॥ अलङ्काररत्नाकर. ' इष्टस्याप्यविधातु योऽर्थस्य विशेषबोधाय । स्वयमेव प्रतिषेधः स वक्ष्यमाणोक्तविषय आक्षेपः ॥ ' अलंकारकौस्तुभ.

## १३ चंद्रा : 13. Full Moon.

घरिणीएँ महाणसकम्मलग्गमसिमलिइएण[1] हत्थेण ।
छित्तं[2] मुहं हसिज्जइ चन्दावत्थं गअं पइणा ॥१३॥

[ गृहिण्या महानसकर्मलग्नमषीमलिनितेन हस्तेन ।
स्पृष्टं मुखं हस्यते चन्द्रावस्थां गतं पत्या ॥ ]

स्वयंपाक करीत असताना हाताची काजळी लागल्यामुळें गृहिणीचें मुख मलिन झालें होतें. पण पतीनें तिच्या मुखाला प्रेमानें हात लावताच ती हसली व तिचें प्रफुल्ल मुख चंद्रासारखें दिसूं लागलें.

१. मइलिएण, मइल्लिएण. २. छिक्कं.

● गाथेच्या परिचयात गगाधर सागतो की हे उद्गार गृहकृत्यपराङ्मुख गृहिणीला उद्देशिलेले आहेत, आणि टीकेत सागतो की जें ज्याचें उचित कर्म तें करीत असताना त्यामुळें वैरूप्य प्राप्त झालें तरी तें भूषणावह असतें. तिची काति उजळ आणि मुख निष्कलक असल्यामुळें चद्राहून सुदर होतें. अशा सुदरींना चूलखण्डाविषयीं थोडाबहुत अनादर असतोच. तिच्या निष्कलक मुखावर काजळी उडाल्यामुळें तें मलिन झालें, पण तें प्रेमस्पर्शामुळें उजळलें. तिचें मुख व वस्त्र मलिन असलें तरी दुर्लक्ष करू नको, अशी दूतीची सूचना. या गाथेंत शृङ्गार व हास्य याचा हास्यप्रधान सङ्कर आहे असें साहित्यमीमासाकारानें म्हणणें आहे. अलकारकौस्तुभात निदर्शना अलकाराचें उदाहरण - 'उपमापर्यवसन्नो यत्रार्थोऽन्योन्यमन्ययानर्हं । यच्च क्रियया कारणकार्यान्वयधीर्निदर्शना सोक्ता ॥' सरस्वतीकण्ठाभरणात विकृत प्रपञ्चोक्तिचें उदाहरण: 'साम्योत्कर्षापकर्षोक्तेरुपमानोपमेययो । प्रकृता विकृता चेति प्रपञ्चोक्ति• प्रदर्श्यते ॥'

## १४ रंगेल अग्नि : 14. Scent.

रन्धणकम्मणिउणिए ! मा जूरसु, रत्तपाडलसुअन्धम् ।[1]
मुहमारुअं पिअन्तो धूमाइ सिही, ण पज्जलइ ॥१४॥

[ रन्धनकर्मनिपुणिके मा क्रुध्यस्व रक्तपाटलसुगन्धम् ।
मुखमारुत पिबन्धूमायते शिखी न प्रज्वलति ॥ ]

तू स्वयपाक करण्यात निपुण आहेस. चूल पेटत नाहीं म्हणून रागावू नकोस. तुझ्या श्वासाला लाल पाटल पुष्पाचा सुगध आहे. त्याचा स्वाद घेण्यासाठीं अग्नि धुराच्या रूपानें तुझ्या मुखाभोंवतीं घोंटाळत आहे व मुद्दामच प्रज्वलित होत नाहीं.

● चूल पेटली की तू आणखी फुकणार नाहींस, चुलीपासून दूर जाशील आणि प्रज्वलित अग्नीला तुझ्या मुखाजवळ घोटाळता येणार नाहीं, म्हणून

१. झूरसु. २. सिधत्त, हदिदि.

केवळ तुझ्या सहवासासाठीं तो धुमसत आहे, इंधन ओलें आहे म्हणून नव्हे; अधर आरक्त व सरस आहेत, म्हणून ! अग्नीच्या पूजेला रक्तपाटलपुष्पें विशेष उचित. धुराच्या रूपानें प्रत्यक्ष अग्निदेव तुला विलगत आहे; त्याला जें आकर्षक वाटतें तें आम्हालाही मोहवितें, आम्हीही तुझ्याभोंवतीं घोंटाळत आहोंत, आमच्या अंतःकरणात आसक्ति अशीच धुमसत आहे; पण तूं आपल्याच नादात गर्क आहेस, जरा मान वर करून पहा तर खरी, अशी अभिलाषसूचना. एक टीकाकार सागतो, या गाथेची नायिका केवळ. रन्धनकर्मांतच निपुण आहे असें नाहीं ! सरस्वतीकण्ठाभरणांत गन्धरतीचें उदाहरण म्हणून ही गाथा उधृत केलेली आहे.

## १५ विचारी : 15. Innocence.

किं किं दे पडिहासइ ? सहीहिँ पुच्छिआएँ मुद्धाए ।
पढमुग्गअदोहॅणीए णवरं दइअं गआ दिट्ठी ॥१५॥

[ किं किं ते प्रतिभासते सखीभिरिति पृष्टया मुग्धायाः ।
प्रथमोद्गतदोहदिन्याः केवलं दयितं गता दृष्टिः ॥ ]

मुग्धेला प्रथमच डोहाळे लागले होते. सख्यांनीं तिला विचारलें, तुला काय कॅाय आवडतें ? ( लगेच ) तिची दृष्टि फक्त प्रिय पतीकडे गेली ( वेडी बिचारी ! )

● मुग्धेची प्रेमपरीक्षा. वेडी, कारण तिला प्रसूतीच्या वेदना माहीत नव्हत्या; बिचारी, कारण लवकरच बहुप्रसूता सपत्नींच्या अवमालिकेंत हिचा समावेश होणार होता ! णवरं = केवळ, णवरं = नवरा; तिनें फक्त आपल्या प्रिय पतीकडे पाहिलें आणि सुचविलें कीं मला याच्याशिवाय कोणाचीहि, कशाचीही हौस नाहीं !

१. मुद्धअ, मुद्धय. २. दोहलिणीए, दोहलिण्णी, दोहणिणीअ ३. णवरिं, णवर.

## १६ स्पर्शसंक्रमण : 16. Divine Touch.

अमअमअ गअणसेहर रअणीमुहतिलअ चन्द दे छिवसु ।[1]
छित्तो जेहिं पिअअमो ममं पि तेहिं विअ करेहिं ॥१६॥

[ अमृतमय गगनशेखर रजनीमुखतिलक चन्द्र हे स्पृश ।
स्पृष्टो यैः प्रियतमो मामपि तैरेव करैः ॥ ]

हे चंद्रा, तू अमृतमय आहेस, गगनाचा मुकुट आहेस, रजनीच्या मुखावरील तिलक आहेस. प्रियकराला स्पर्श करशील त्याच किरणांनी मलाही स्पर्श कर

● चंद्रा–तुझे किरण अमृतमय आहेत असें लोक म्हणतात, पण त्यांची संजीवनशक्ति माझ्या प्रत्ययास येत नाहीं, तुझें दर्शन आल्हादजनक आहे असें लोक म्हणतात, पण मला तुझ्या सौम्य किरणांची प्रखरता सहन होत नाहीं, कारण मी विरहिणी आहे. ज्या किरणांनीं तू माझ्या प्रियतमाला स्पर्श केलास ते, ते मात्र मला शीतल व सुखद वाटतील, त्यांचा स्पर्श झाला तरच मला विरहवेदना सहन होतील तू रजनीच्या मुखावरील तिलक आहेस, अर्थात् अनलाचा पक्षपाती आहेस, त्याच्या सौभाग्याचें प्रतीक आहेस, म्हणून मी तुझी प्रार्थना करीत आहे, प्रियकराला त्वरित घराकडे परतण्याची प्रेरणा दे. परिकर अलङ्कार ( अलङ्कारकौस्तुभ ): 'साभिप्रायविशेषेण विन्यासः परिकरः प्रोक्तः ।' मुग्धाच्या संक्रमणाबद्दलचे भवभूतीने ( मालतीमाधव अंक : १·३८ ) उद्गार पहा :

उन्मीलन्मुकुलकरालकुन्दकोशप्रश्च्योतद्घनमकरन्दगन्धबन्धो ।
तामीषत्प्रचलविलोचनां नताङ्गीम् आलिङ्ग पवन मम स्पृशाङ्गमङ्गम् ॥

## १७ मनोरथ : 17. Day Dreams.

एहइ सो वि पउत्थो, अहं अ कुप्पेज्ज, सो वि अणुणेज्ज ।
इअ कस्स वि फलइ मणोरहाणँ माला पिअअमम्मि ॥१७॥

१ छिविज्ज, छिहिह. २ कुप्पज्ज.
२

[ एष्यति सोऽपि प्रोषितो अहं च कुपिष्यामि सोऽप्यनुनेष्यति ।
इति कस्या अपि फलति मनोरथानां माला प्रियतमे ॥ ]

प्रवासी प्रियकर परत येईल, मग मी त्याच्यावर रागावेन, नतर तो माझी मनधरणी करील, कोणा भाग्यशालिनीच्या अशा मनोरथाची माळ फुलेल, ( माझी नाहीं. )

● सखि, आणखी झुरू नको, उद्या किंवा परवा तुझा पति प्रवासाहून परत येईल आणि आला कीं तो तुझ्या साऱ्या हौसा पुरवील, अशी आश्वासनें देणाऱ्या मैत्रिणींना उद्देशून प्रोषितभर्तृकेचे नैराश्योद्गार. समजा, तो परत आला तरी मी मान धारण करू शकणार नाहीं, कारण त्यातील काव्य समजण्याइतकी रसिकता त्याच्या अगीं नाहीं, माझी मनधरणी करण्याइतकें आर्जव त्याच्या ठायीं नाहीं किंवा त्याचा धिक्कार करण्याइतका धीर माझ्या अगीं नाहीं. मी दुर्दैवी, हेंच खरें.

## १८ दुर्दशा : 18 Poverty.

दुग्गअकुडुम्बअड्ढी[3] कहँ णु मए धोइएण सोढव्वा ।
दसिओसरन्तसलिलेण उअह रुण्णं व पडएण ॥१८॥

[ दुर्गतकुटुम्बाकृष्टि कथ नु मया धौतेन सोढव्या ।
दशापसरत्सलिलेन पश्यत रुदितमिव पटकेन ॥ ]

दरिद्री कुटुंबात कपड्याचीसुद्धा इतकी दुर्दशा व ओढाताण होते कीं ( ती असह्य झाल्यामुळें ) धुऊन वाळत घातल्यावर, बिचारा दशातून गळणाऱ्या पाण्याच्या रूपानें अश्रु ढाळतो.

१. आगमिष्यति २ अनुनायिष्यति ३ कुडुम्ब,कुडम्ब, कुडम्व. ४ कुटुम्बकृष्टि ५. दशावसरन्.

● वस्त्र विरलें तरी तें वापरावेंच लागतें, एकानेंच नव्हे, अनेकांनीं, जितकी दुर्गति अधिक तितकी ओढाताण जास्त अनेक महिलांची मर्जी सांभाळू पाहणाराची अशीच दुरवस्था होते. वेश्येला ग्रामप्रधान द्रव्य देत नाहींत आणि ओढाताण मात्र भरपूर करतात, तिनें कुट्टनीप्रत काढलेले हे उद्वेगाचे उद्गार असावेत, असें एक टीकाकार सांगतो [1] दामोदरगुप्ताच्या कुट्टनीमतातील पुढील समानार्थी उद्गार पहा 'प्रिय सखि लोक समक्ष नगरप्रभुणा हठेण नीताऽस्मि । एव तु नो कदाचिद्द्विगुणार्थप्रार्थने कृतो न्याय ।' (श्री तनसुखराम त्रिपाठी संपादित प्रत गुजराती न्यूज प्रेस) दुसरा टीकाकार सांगतो कीं अनेक महिलांचा पति असलेल्या दुर्दैवी दुर्बलाचे हे उद्गार आहेत [1] आणखी एक टीकाकार सांगतो, ही चन्द्रिका नेहमींच माझी अशी ओढाताण करते, ती मला यापुढें कशी सहन होईल, या विवंचनेनें व भावी आपत्तीच्या धास्तीनें वस्त्र अश्रु ढाळीत आहे !

## १९ उंडारलेलें वासरूं : 19. Curse

**कोसम्बकिसलअवण्णअ तण्णअ ! उण्णामिएहिँ कण्णेहि ।**
**हिअअट्ठिअं घरं वच्चमाण धवलत्तणं पाव ॥१९॥**

**[ कोशाम्रकिसलयवर्ण तर्णक उन्नामिताभ्यां कर्णाभ्याम् ।**
**हृदयस्थित गृहं व्रजन्धवलत्वं प्राप्नुहि ॥ ]**

आंब्याच्या कोयींतून निघालेल्या कोंवळ्या पानासारखा ( तांबूस ) रंग असलेल्या वासरा, तुझा कान उचलून आपल्या आवडत्या घरात घुसता येतें. तुला तरी कृतार्थता प्राप्त होवो.

● वासरा–तुझ्या जातीला व वयाला उडारणें जमतें व शोभतें. तुला धवलत्व प्राप्त होवो. धवलत्व म्हणजे श्रेष्ठता वासरा, तुझें वय लहान आहे, तरी तुला सजातीयामध्ये श्रेष्ठत्व प्राप्त होवो, धवलत्व म्हणजे शुभ्रत्व व खरा, तुझा वर्ण तांबूस आहे, तरी तुला शुभ्रत्व, यश प्राप्त होवो, धवलत्व म्हणजे पदत्व तरुणा, मी वयस्क व इभ्रतीच्या ढोंगामुळें पराधीन, म्हणून

१ हिअअट्ठिअ २. हृदयेप्सितम्.

मला माझ्या आवडीच्या ठिकाणीं जाता येत नाहीं. तुझ्यासारख्या लाल्बुद, उंडारलेल्या तरुणापुढें माझा टिकाव कसा लागणार ? पण लक्षात ठेव, तूं जिच्याकडे जात आहेस ती वयस्क आहे, तिच्या मानानें तूं अगदीं बच्चा आहेस; अशा संभोगामुळें तुला म्हातारपण मात्र लवकर प्राप्त होईल ! तूं माझा मनोभङ्ग केलास, या पापाचें फळ म्हणून तुला पंढरा प्राप्त होवो ! नायिकेच्या घरात बेधडक घुमण्याचें नायकाला दूतीचें प्रोत्साहन. नायिकेबद्दलचा आपला अनुराग आणि पराधीनतेमुळें प्राप्त झालेली अगतिकता व्यक्त करण्यासाठीं नायकानें तिच्या घराच्या आवारात उंडारणाऱ्या वाछराला किंवा प्रतिस्पर्धी तरुणाला उद्देशून काढलेले उद्गार.

## २० लाडीगोडी :　　20. Horripilation.

अलिअपसुत्तअ विणिमीलिअच्छ ! दे सुहअ मज्झ ओआसम् ।
गण्डपरिउम्बणापुलइअङ्ग ण पुणो चिराइस्सम् ॥२०॥

[ अलीकप्रसुप्तकविनिमीलिताक्ष हे[४] सुभग ममावकाशम् ।
गण्डपरिचुम्बनापुलकिताङ्ग न पुनश्चिरयिष्यामि ॥ ]

हे सुभग, तूं झोंपेचें सोंग घेऊन ( बिछान्यावर ) डोळे मिटून पडला आहेस; मला ( तुझ्याशेजारीं ) जागा दे. ( ढोंग्या, तूं जागा आहेस ) मी तुझ्या गालाचें चुंबन घेतलें तेव्हा तुझें अंग पुलकित झालेले मी पाहिलें. हें पहा, मी पुन्हा उशीर करणार नाहीं, बरें का ?

● भावजिज्ञासेनें त्यानें निद्रेचें ढोंग केलें, तें तिनें पहिल्या दृष्टिक्षेपातच ओळखलें. तिनेंही त्याच्या भावनाच्या तीव्रतेची पारख पाहिली. आपण त्याला पाहिजे आहोंत हें तिनें त्याच्या शरीरावर फुललेल्या

१. देसु घअ मज्झ, देसु हअ मज्झ. २. अम्ह. ३. उणो. ४. ददस्व, देहि.

पुलकावरून ओळखलें. आधुनिक जीवनात असे प्रसंग किती तरी येत असतील[1] एक टीकाकार सांगतो, हे उद्गार उपपतीला उद्देशून आहेत; तुझ्या हृदयात अनेक महिलांना स्थान आहे, हें मी जाणतें; त्यातच मलाही थोडी जागा दे, असा आशय. अलंकाररत्नाकरात उद्भेदाचें उदाहरणः 'निगूढस्य प्रतिभेद उद्भेद ॥ १०१ ॥' माझे मित्र श्री. मोरेश्वर दीक्षित यांना त्रिपुरी येथील उत्खननात कलचुरी काळात कोरलेल्या एका शिल्पात गाथासप्तशतींतील हा प्रसंग दिग्दर्शित केलेला आढळला आहे. त्या खाली आहे तो लेख त्यांच्या वाचनाप्रमाणें असा. 'अलिअपसुत्त अविलिमीलिअच्छि दे सुअ उवाभ। गण्डपरिच . म ..णापुलद . अ वालउणो विराद...॥' मला लिहिलेल्या पत्रात ते कळवतात 'गाथासप्तशतींतील श्लोक उधृत केलेलें हें पहिलेंच शिल्प आहे.' त्यांच्या कृपेनें प्राप्त झालेलें या शिल्पाचें छायाचित्र मी या ग्रंथाच्या आरंभीं दिलेलें आहे.

## २१ घटकेचें महत्त्व : 21. Crucial Moment.

असमत्तमण्डणाविअ वच्च घर से सकोउहल्लस्स ।
वोलाविअहलहलअस्स पुत्ति चित्ते ण लग्गिहिसि ॥२१॥

[असमाप्तमण्डनैव व्रज गृहं तस्य सकौतूहलस्य ।
व्यतिक्रान्तौत्सुक्यस्य पुत्रि चित्ते न लगिष्यसि ॥]

(अनुभवी पुरंध्री सांगते) मुली, तुझा साजशृंगार पुरा झाला नसला तरी तो उत्सुक आहे तोवरच आटोप नटोनच त्याच्या घरीं जा. (कारण) घटका साधली पाहिजे. (वेळ गमावल्यास नर) त्याची आसक्ति

१. मण्डणे विअ, मण्डण विअ. २. हल्यरं. ३. सस्य. ४. व्यतिक्रान्तरण-रणकस्य, व्यतिक्रान्तदण्डमकस्य

शिथिल होईल आणि मग तू ( कितीही नटलेली असलीस तरी ) त्याच्या मनात भरणार नाहींस

● वेश्यामातेचा दुहितेला उपदेश ह्या व्यावहारिक खाचाखोचा नवशिकीला कशा कळणार ? अनुभवासारखा शिक्षक नाहीं ! गगाधर सागतो, बाजीरावाचा अनुचर आमत्रण घेऊन आला तेव्हा अतर्गृहात भुजग बसला होता, विटाला थोपविण्यासाठीं, भुजगाला सूचना देण्यासाठीं आणि कन्येला सावध करण्यासाठीं घरवालीनें हे उद्गार काढलेले आहेत !

## २२ तें चुंबन : 22 Forbidden Kiss

आअरपणामिओट्ठं[१] अघडिअणासं असंहअणिडालम्[२] ।
वण्णघिअतुप्पमुहिए[३] तीए परिउम्बणं भरिमो[४] ॥२२॥

[ आदरप्रणामितौष्ठमघटितनासमसहतललाटम् ।
वर्णघृतालिप्तमुख्यास्तस्या परिचुम्बन स्मराम ॥ ]

( रजस्वला असल्यामुळें ) तिनें मुखाला वर्णघृत लावलें होतें ( मी इच्छा दर्शविल्यामुळें केवळ माझा मान राखण्यासाठीं ) तिनें मला चुबन देण्याकरता आदरानें ओठ लवविले, घृताचें चिह्न लागू नये म्हणून तिनें नाकाचा अगर कपाळाचा स्पर्शही होऊ दिला नाहीं, त्या चुबनाची आठवण होते

● सदाचार साभाळण्यासाठीं पत्नी उत्सुक व तत्पर असली तरी पतीच्या आग्रही प्रीतीपुढें तिचा निग्रह कसा टिकणार ? एकूण, हा अनाचार भासविण्यात येतो तितका आधुनिक नाहीं ! टीकाकार सागतात कीं या

१ असगय अपघअ असवालअ २ णिलाद, णिडाह, लिलाड ३ घिअलित्त, घअलुप्प ४ निटिलम्

गाथेतील चुंबन हा अनुरागातिशयसूचक अशा आलिंगनाचाच एक प्रकार आहे; त्याचें नाव स्पृष्टक. वात्स्यायन त्याचें लक्षण सागतो : 'संमुखागताया प्रयोज्यायामन्यापदेशेन गच्छतो गात्रेण गात्रस्य स्पर्शनं स्पृष्टकम् ॥ (साम्प्रयोगिकमधिकरणम्। अध्याय २; निर्णयसागर प्रत; पृ. ९७). हे उडतें चुंबन तिनें ओणव्यानें दिलेलें असावें ! या गाथेवरून चौरपञ्चाशिकेची आठवण होते !

## २३ तीच का ही ? 23. Contrast.

अण्णासआइं देन्ती तह सुरए हरिसविअसिअकवोला ।
गोसे वि ओणअमुही अह सेत्ति पिआं ण सद्दहिमो ॥२३॥

[ आज्ञाशतानि ददती तथा सुरते हर्षविकसितकपोला ।
प्रातरप्यवनतमुखी इयं सेति प्रियां न श्रद्दध्मः ॥ ]

सुरतकाळीं आनंदानें गाल फुललेले असतात तेव्हा ती ( उद्दाम धृत्तीनें ) प्रियकराला शेंकडों आज्ञा देते. सकाळ झाली कीं मान खालीं घालून कामाला लागते आणि ती प्रिया हीच हें खरेंही वाटत नाहीं.

● सनातनी समाजात मर्यादेच्या मर्यादा अमर्याद आहेत. मात्र मर्यादेचें क्षेत्र केवळ समाजात. प्रीति एकान्तीं कोणतीही बंधनें जुमानीत नाहीं. पतीच्या अर्ध्या वचनात असलेली गंभीर वृत्तीची पतिव्रताही पतीला एकांती शेंकडों आज्ञा देते, अगदीं एकवचनानें संबोधून ! विनय व विलास हीं सुगृहिणीचीं लक्षणें व भूषणेंही !

१. हरिसविअसिअ. २. ओणय, ओणह. ३. अहमेत्ति, महमेत्ति. ४. सद्दहिमो. ५. सहसा प्रियेति न.

## २४ कुलीन : 24. Etiquette.

पिअविरहो अप्पिअदंसणं गरुआइँ दो वि दुक्खाइं ।
जीएँ तुमं कारिज्जसि तीएँ णमो ओंहिजाइए ॥२४॥

[ प्रियविरहोऽप्रियदर्शन च गुरुके द्वे अपि दुःखे ।
यया त्वं कार्यसे तस्यै नम आभिजात्यै ॥ ]

( मला ऋतु प्राप्त झाल्यामुळें लोकाचारासाठीं तुम्हाला इकडे यावें लागलें. यामुळें ) तुम्हाला तुमच्या आवडतीचा वियोग झाला व नावडतीचें दर्शन झालें. हीं दोन दुःखें ज्यामुळें सहन करावीं लागलीं त्या कुलीनपणाला नमस्कार असो.

● कुलीन नववधूचे उद्वेगोद्गार. कुलीन घराण्यातल्या एका उनाड तरुणाचें दुर्वर्तन या गाथेंत सूचित केलेलें आहे. गाथेच्या नायिकेशीं लग्न होण्यापूर्वींच त्यानें दुसरीकडे *बिन्हाड थाटलेलें असावें. ही बिन्हाडकरीण* हलक्या कुळातली किंवा बिनलग्नाची असल्यामुळें त्याची घरधनीण होऊ शकत नव्हती. वडील माणसाच्या आग्रहामुळें, घराण्याच्या इज्जतीसाठीं, त्याला नायिकेशीं विवाह करावा लागला असावा असें दिसतें. लग्न केलें, मग गर्भाधान केलेंच पाहिजे, आणि त्यासाठीं, त्या रात्रीपुरता तरी आवडतीचा वियोग व नावडतीचा सहवास सहन केलाच पाहिजे. बाह्यात्कारीं शिष्टाचाराचें पालन हाच कुलीनपणा ! आणि यालाच मध्य युगात बगाल्यात आत्यंतिक स्वरूप प्राप्त झालें.

## २५ ओले डोळे : 25. Antelope.

एक्को वि कल्लसारो ण देइ गन्तुं पओंहिणवलन्तो ।
किं उण बाहाउलिअं लोअणजुअलं पिअअमाए ॥२५॥

१. ओंहिजाइए, आहियाईए. २. कालसारो, क्रिण्णसारो. ३. दआहिण, पाहिण. ४. वडन्तो.

[ एकोऽपि कृष्णसारो न ददाति गन्तु प्रदक्षिण वलन् ।
किं पुनर्बाष्पाकुलित लोचनयुगल प्रियतमाया ॥ ]

एक काळवीट उजवीकडून वळून आडवा गेला तर प्रवास यात्रवाला लागतो, मग ( हरिणाक्षी ) प्रियेचे व्याकुल व ओले असे दोन डोळे तिरपे आडवे आल्यावर प्रवास रहित झाला तर काय नवल ?

● कृष्णसारदर्शनानें प्रवास विफल होतो, यात्रा निष्फळ होते, अशी समजूत प्रचलित होती, अर्थात् व्याधानें विद्ध केलेला कृष्णसार दिसला तरी प्रवाशानें परतलेंच पाहिजे नायकानें प्रवासाची तयारी केली होती, पण तो का गेला नाही ? भावी विरहाच्या वेदनांनी व्याकुळ झालेले प्रियेचे आसव-लेले व वळलेले काळेशार डोळे दिसताच विद्ध कृष्णसाराशीं असलेलें त्याचें साम्य ध्यानीं आल्यामुळें त्यानें प्रवासाचा बेत रहित केला अलङ्कार-रत्नाकरात अर्थापत्तिच उदाहरण ' दण्डापूपिकयापतनमर्थापत्ति । कस्यचिदर्थस्य निष्पत्तावर्थादर्थान्तरस्यापत्तिरिति । '

## २६ मा तशी नाहीं : 26 Deceipt

*ण कुणन्तो च्चिअ माण णिसासु सुहसुत्तदरविबुद्धाणम् ।*
*सुण्णइअपासपरिमूसणवेअणँ जइ मि जाणन्तो ॥२६॥*

[ नाकरिष्य एव मानं निशासु सुखसुप्तदरविबुद्धानाम् ।
शून्यीकृतपार्श्वपरिमोषणवेदना यद्यज्ञास्य ॥ ]

रात्रीं सुखानें झोप लागल्यानंतर थोड्या वेळान जराशी जाग आली, पाहिलें तो पत्नी शेजारीं नाही ' ( मी पतिव्रता असल्यामुळें ) असा

---

१ चासर्, चलन्ता २ कृष्णम ल्लापाकुलितम् ३ गुम १५ ४ मगग, मदगग, मुमण ५ वहन्ता ६ विबुद्धाम, ७ परिमर्षण

फसवणुकीच्या वेदना तुम्हांला माहीत नाहींत, म्हणून सांगतें, माझ्या-बरोबर असे ताठ्यानें वागूं नका.

● अनुनयाचें ग्रहण करण्यात अनौत्सुक्य दाखविणाऱ्या पतीला उद्देशून उद्विग्न पत्नीचे उद्गार. मला सान्याचें सारें काहीं माहीत आहे, सवतींचे ढंग व तुमचीं ढोंगें. तरीही मी तुम्हाला प्रसन्न करून घेण्याचा प्रयत्न करीत आहे. मी पतिव्रता आहे, हाही माझा दोषच आहे. स्त्री-वेदातल्या एकाद्या श्रुतीवर ही गाथा आधारलेली असावी, असें वाटतें.

## २७ ढोंग : 27. Pretense.

पणअकुविआणँ दोह्न वि अलिअपसुत्ताणँ माणइल्लाणम्
णिच्चलणिरुद्धणीसासदिण्णकण्णाणँ को मल्लो ॥२७॥

[ प्रणयकुपितयोर्द्वयोरप्यलीकप्रसुप्तयोर्मानवतोः ।
निश्चलनिरुद्धनिःश्वासदत्तकर्णयोः को मल्लः ॥ ]

दोघांनींहीं रागामुळें झोंपेचें ढोंग घेतलें आहे, श्वास रोधून धरला आहे; दोघेंहि निश्चल आहेत, पण ( एकमेकांच्या हालचाली ) कान देऊन ऐकत आहेत. हें भांडण प्रेमाचें, पण तेंही सहन करण्याचें सामर्थ्य कोणालाही नाहीं, ( मग वृथा कलह कां ? )

● पति-पत्नींनीं एकशय्येवर एकमेकांकडे पाठ फिरवून झोंपेचें ढोंग केलेलें आहे हें नि:श्वासनिरोधनावरून उभयतांच्याही लक्षात आलेलें आहे. अगोदर कोण कुशीवर वळतो याचीच जणू चढाओढ चाललेली आहे. पण त्याचें एकमेकावर प्रेम असल्यामुळें दोघेंहि दुर्बल आहेत आणि हें प्रेमच त्याची खोडकी जिरवणार आहे. परस्पराना पराङ्मुख असताना एवढी प्रीति, मग सन्मुख झाल्यावर त्याला केवढी भरती येईल! पतिपत्नींचा

१. माणइन्ताणम् २. धण्णाण.

समेट करूं पाहणाऱ्या सखीचे उद्गार. सखीला अंतर्गृहांतही अनिर्बंध प्रवेश होता कीं काय ? ‘ को मल्लः ’ हा प्रयोग प्रथमदर्शनीं अपरिचित वाटतो व अभिप्रेत प्रसंगामुळें अप्रयोजक वाटतो, पण तो अन्वर्थक आहे, इतकेंच नव्हे, बहुश्रुचि आहे !

## २८ फोंक ः 28. Birch.

णवलअपहरं अङ्गे जहिँ जहिँ महइ देवरो दाउम् । [1][2]
रोमञ्चदण्डराई तहिं तहिं दीसइ वहूए ॥२८॥ [3]

[ नवलताप्रहारमङ्गे यत्र यत्रेच्छति देवरो दातुम् ।
रोमाञ्चदण्डराजिस्तत्र तत्र दृश्यते वध्वाः ॥ ]

कोंवळ्या फोंकानें दीर तरुण भावजयीला जेथें जेथें प्रहार करूं पाहतो तेथें तेथें अगोदरच रोमांचांची रांग उभी राहते.

● प्रहारापूर्वीच जणूं वळ उमटतात; जणूं प्रीतिचिन्ह व्यक्त होण्यापूर्वीच त्याच्या रक्षणार्थ सभोंवार रोमांचांच्या रांगा उमलतात ! एवढी प्रतिक्रिया व्हावी इतकी सहसंवेदना अनुरक्तीमुळें त्याच्या अंतःकरणात निर्माण झाली होती, कीं वधूचें अधर्मांपासून निवारण करण्यासाठीं हें कुंपण उभारलें गेलें होतें ! प्रस्तुत गाथेंतील नायिका देवरानुरक्त असल्यामुळें असाध्य आहे अशा तिचा अभिलाष करणाऱ्या कामुकाला दूतीची सूचना. साहित्यमीमांसेंत या गाथेला ‘ नाग्लतिका ’ अशी संज्ञा दिलेली आहे. भुवनपालानें नवलतिकेऐवजीं कुवलय ग्राह्य केला आहे !

१. णवलआहारमङ्गे, णवळअरअरं. २. दिअरो, देअरा. ३. दन्तुराइम्.

## २९ मेघगर्जना : 29. Thunder.

अज्ज मए तेण विणा अणुहूअसुहाइँ संभरन्तीए ।
अहिणवमेहाण रवो णिसामिओ वज्झपडहो व्व ॥२९॥

[ अद्य मया तेन विना अनुभूतसुखानि संस्मरन्त्या ।
अभिनवमेघानां रवो निशामितो वध्यपटह इव ॥ ]

अगोदरच त्यांचा वियोग आणि त्यात ही पहिली मेघगर्जना. या गर्जनेमुळें भोगलेल्या सुखांची आठवण होऊन मी व्याकुळ झालें आहे गुन्हेगाराला वधस्तंभाकडे (नेताना त्याच्या गुन्ह्यांची घोषणा करून) नगारा वाजवतात, त्याच्या आवाजासारखी ही गर्जना मला भासते.

● मेघाचा गडगडाट ही आलिंगनाला केवढी सबब ! कालिदास ( मेघदूतः १-३ ) सांगतोः 'मेघालोके भवति सुखिनोऽप्यन्यथा वृत्ति चेतः । कण्ठाश्लेष प्रणयिनि जने किं पुनर्दूरसंस्थे ॥' मेघाच्या नुसत्या दर्शनानें चित्तवृत्ति एवढ्या उचंबळून येतात, मग त्याच्या गर्जनेनें हृदयात केवढी खळबळ उडत असेल ! गुन्ह्याची घोषणा ( प्रस्तावना पहा ) होते त्या वेळीं गुन्हेगाराला आपल्या अपकृत्याची आठवण होते, त्याचप्रमाणें मेघगर्जना ऐकून विरहिणीला पूर्वी उपभोगलेल्या सुखाची !

## ३० जायाभीरुक : 30. Henpecked

णिक्किव जाआभीरुअ दुद्दंसण णिम्बकीडसारिच्छ ।
गामो गामणिणन्दण तुज्झ कए तह वि तणुआइ ॥३०॥

१. अणुभूअसुहाइ. २. अहिणवमोहणरवो ३. अनुभूतसुरतं. ४. वज्रपटह. ५ णिक्किअ. ६ दुद्दस्सण ७. णिम्बकीड.

[ निष्कृप जायाभीरुक दुर्दर्शन निम्बकीटसदृक्ष ।
ग्रामो ग्रामणीनन्दन तव कृते तथापि तनुकायते ॥ ]

पाटलाच्या पोरा, तू बायकोच्या तालानें वागतोस व तिला भितोस; तू कडू लिंबाच्या झाडावरील किड्यासारखा आहेस तू कोणावरही कृपा करीत नाहींस, ( आम्हाला ) तुझें दर्शनही होत नाहीं तरी गाव तुझ्यासाठीं झुरत आहे.

● पाटलाचा पोरगा कसा स्वच्छन्दी, निर्भय व कृपाळु असला पाहिजे, पण हा—हा काहीं करीत नाहीं, कोणावर प्रसन्न होत नाहीं, स्वाच्या बायकोच्या तन्नानें वागतो आणि तिला भितो, शिवाय ही बायको कशी? लिंबाच्या पानाच्या रसासारखी कडू कडू लिंबाच्या झाडावरील किड्याला कडू रसातच स्वारस्य वाटतें, कारण मधुर रसाची गोडी त्यानें कधीं चाखलेलीच नसते, शिवाय तो कधीं बाहेर दिसतही नाहीं, तसाच हा. बायकोला सोडून घरातून बाहेर पडला तरच तो गावभरान्ताना दिसणार! त्यावैकी एकीनें त्याला पाठविलेला निर्वाणीचा निरोप ह्या गार्थेत ग्रथित केलेला आहे.

## ३१ निर्धास्त : 31 Hero.

पहरवणमग्गविसमे जाआ किच्छेण लहइ से णिद्दम् ।
गामंणिउत्तस्स उरे पल्ली उण सा सुहं सुवेई ॥३१॥

[ प्रहारव्रणमार्गविषमे जाया कृच्छ्रेण लभते तस्य निद्राम् ।
ग्रामणीपुत्रस्योरसि पल्ली पुन सा सुख स्वपिति ॥ ]

पाटलाच्या पुत्राच्या छातीवर जखमाचे वण आहेत सारा गाव त्या छातीवर विसंबून सुखानं झोंपला आहे ( मात्र त्याच्या खडबडीत छातीवर मस्तक टेंकून शेजारीं पहुडलेल्या ) त्याच्या पत्नीला झोंप येत नाहीं

१ निक्किव २ गदरा ३ गामिणि, ४ सुअई

● ती सुखासक्त आहे, विलासिनी आहे, तिला मऊ मऊ उशाची सवय आहे. अशा खडबडीत छातीवर मस्तक टेंकून तिला झोंप कशी येणार ? प्रीतीमुळें नव्हे, भीतीमुळें, अनिच्छेनें, केवळ कर्तव्य म्हणून तिनें त्याच्या छातीवर मस्तक टेकलें आहे गावकरी निर्धास्त असल्यामुळें गाढ झोंपले आहेत, आणि लोही. धास्तीमुळें तिला मात्र झोंप नाहीं. ती सुसाध्य आहे, जागी आहे, तळमळत आहे, निर्धास्तपणें तिच्याकडे जा व खूण कर, कोणताही अडथळा येणार नाहीं, अशी दूतीची भुजङ्गाला सूचना पक्षीं उर = पुर, डोंगरी खेड्याकडे जाण्याची पहाडी वाट लाव आणि अवघड वळणाची व चढउताराची आहे, म्हणून तिकडे सहसा कोणी फिरकत नाहीं, शिवाय पाटलाच्या मुलाच्या शौर्यावर गावकऱ्याचा पूर्ण विश्वास असऱ्यामुळें रात्री पहारेकरीही हिंडत नाहींत यामुळें तुला निर्धास्त पणें कार्यभाग साधता येईल, असें दूतीचें भुजङ्गाला आश्वासन.

## ३२ संभावित :　　32 Creditable

अह संभाविअमग्गो सुहअ तुए जेव्वं णवरॅ णिव्वूढो ।
ऍह्निं हिअए अण्णं अण्णं वाआइ लोअस्स ॥३२॥

[ अय संभावितमार्ग सुभग त्वयैव केवल निर्व्यूढ ।
इदानीं हृदयेऽन्यदन्यद्वाचि लोकस्य ॥ ]

नेहमीं खरें बोलणें हाच खरा संभावितपणा, (तुम्हीं खरें तेंच बोल्लात) आणि खरें बोलण्यात संभावितपणाच दाखविलात नाहीं तर इतराच्या हृदयात असतें एक व ते बोलून दाखवितात दुसरेंच.

● गाथासप्तशतींत नामस्खलनाच्या अनेक गाथा आहेत पुनरुच्चारामुळें या विषयाला संकेताचें स्वरूप आलेलें आहे या संकेताला मीं ‘ विरचिता-संकेत ’ ( प्रस्तावना पहा ) ही संज्ञा दिली आहे भावप्रकाशांत सुभग-लक्षण

१ ज्जअ, चिअ, चेव २ णिव्वूढो ३ इण्हिं ४ सद्भावित ५ कल्किकाले

दिलेलें आहे : ' सपत्नीनखदतादिचिन्हं यस्य न दृश्यते । विस्मार्यमाणमानेर्ष्यः सुभगः सोऽभिधीयते ॥ ' तुमच्या हृदयात सदैव असणाऱ्या सहचरीचें नाव घेऊन तुम्ही मला सुखवाळता; तिच्यावरच तुमचें खरें प्रेम आहे; म्हणून तुमचे हे उद्गारही खरे आहेत. नेहमीं खरें बोलणें हाच खरा संभावितपणा.

## ३३ पराङ्मुखी : 33. Repentence.

उह्लाइँ णीससन्तो किंति मह परम्मुहीएँ सअणद्धे ।
हिअअं पलीविअ वि अणुसएण पुट्ठिं पलीवेसि ॥३३॥

[ उष्णानि निःश्वसन्किमिति मम पराङ्मुख्याः शयनार्धे ।
हृदयं प्रदीप्याप्यनुशयेन पृष्ठं प्रदीपयसि ॥ ]

बिछान्याच्या अर्ध्या भागावर मी तुमच्याकडे पाठ फिरवून पडलें आहे. ( सवतीच्या मत्सरानें ) तुम्हीं प्रथम माझें हृदय पेटविलें आणि आता ऊष्ण निःश्वासानीं माझी पाठ का तापवितां ?

● प्रणयकुपिता नायिका एकशय्येवर पतीकडे पाठ फिरवून पहुडली आहे, शेजारी अस्वस्थ पति निःश्वास टाकीत आहे, पत्नी पराङ्मुख झाल्यामुळें त्याचें हृदय तापलें होतें, म्हणून त्याचे निःश्वास उष्ण होते. पण नायिकेला वाटलें, कारण तो अपराधी आहे असें तिनें गृहीत धरलें होतें, कीं त्यातून त्याचा अनुताप व्यक्त होत नसून त्याची सपत्नीबद्दलची अनुरक्ति प्रतीत होत आहे; म्हणूनच या लटक्या दाक्षिण्याची धग तिला असह्य वाटली.

## ३४ विकल : 34 Languid.

तुह विरहे चिरआरअ ! तिण्णा णिव्वटन्तवाहमइलेण ।
रइरहामिहरधएण व मुहेण छाहि व्विअ ण पत्ता ॥३४॥

१. उष्ण निःश्वस. २. पेट. ३. पेटवितोस. ४. टर्ण विनिवृत्त्य ५. तिरस्ता.

[ तव विरहे चिरकारक तस्या निपतद्बाष्पमलिनेन।
रविरथशिखरध्वजेनेव मुखेन च्छायैव न प्राप्ता ॥ ]

सूर्याच्या रथावरील झेंड्याला केव्हांही छाया मिळत नसल्यामुळें तो नेहमीं मळूल असतो, तुझ्या विरहामुळें तिचें मुख संतत अश्रुधारांनीं मलिन झालें आहे व त्यावर थोडीही छाया (कांति) राहिलेली नाहीं

● प्रसाधनाच्या अभावीं आणि अश्रूंच्या ओघळामुळें तिचें मुख निष्प्रभ व मलिन झालेलें आहे. तुझ्या सहवासाच्या सावलीच्या अभावीं आणि विरहाच्या तापामुळें तिच्या मुखावर कांति राहिलेली नाहीं. आता तरी तिच्यावर अनुकंपा कर अशी दूतीची विनंती. विरहिणीच्या अवस्थेचें दूतीनें केलेलें वर्णन.

३५ लक्ष्मण : 35. Ideal.

दिअरस्स असुद्धमणस्स कुलवहू णिअकुड्डलिहिआइं।
दिअहं कहेइ रामाणुलग्गसोमित्तिचरिआइं ॥३५॥

[ देवरस्याशुद्धमनसः कुलवधूर्निजकुड्यलिखितानि ।
दिवसं कथयति रामानुलग्नसौमित्रिचरितानि ॥ ]

अशुद्ध मनाच्या दीराला (सन्मार्ग दाखविण्यासाठीं) रामाशीं एकनिष्ठ असणाऱ्या लक्ष्मणाच्या चरित्राचा वृत्तान्त कुलवधू भिंतीवर दिवसभर लिहीत बसते.

● दीराचा अभिप्राय तिनें ओळखला होता. त्याची वाच्यता केली तर कुटुंब मोडेल या भीतीनें कुलवधू त्याचा उघड निषेध करीत नाहीं, पण आपली प्रतिकूलता विनयानें प्रकट करते. भावजयशीं दीरानें कसें वागावें

याचा आदर्श. लक्ष्मणानें नजर वर करून सीतेचें मुख कधीं पाहिलें नव्हतें; अवयवांपैकीं पावलें व अलंकारापैकीं नूपुर, एवढेच त्याच्या परिचयाचे होते; तुम्ही माझ्याशीं लक्ष्मणासारखे वागा, सुग्रीवासारखे वागूं नका, अशी भाउजींना सूचना देण्यासाठीं तिनें लक्ष्मणाचें चित्र रंगविलें किंवा चरित्र लिहिलें. कदाचित् जावेनें आपल्या पतीचा अभिप्राय ओळखून व नववधूचा अल्लडपणा पाहून हा उपदेश केलेला असावा.

## ३६ शील : 36. Syllogism.

चत्तरघरिणी पिअदंसणा अ तरुणी पउत्थवईआ अ ।
असई सअज्जिआ, दुग्गआ अ, ण हु खण्डिअं सीलम् ॥३६॥

[ चत्वरगृहिणी प्रियदर्शना च तरुणी प्रोषितपतिका च ।
असतीप्रतिवेशिनी दुर्गता च न खलु खण्डितं शीलम् ॥]

तिचें घर भर चौकात आहे; ती तरुण आहे, सुंदर आहे; तिच्या शेजारणी छिनाल आहेत; तिचा पति प्रवासात आहे, तिची कौटुंबिक दुर्गति आहे; तरीही तिनें आपलें शील ढळूं दिलें नाहीं.

● असतीचें आत्मसमर्थन. गंगाधर सांगतो हा विशेषोक्ति अलंकार : ' विशेषोक्तिरखण्डेषु कारणेषु फलावचः । ' अलंकारकौस्तुभात समुच्चयाचें उदाहरण : ' एकस्मिन्सति हेतौ हेत्वन्तरगीः समुच्चयः कथितः ॥ अत्रैव मतभङ्गहेतुत्वादसता योग : । '

## ३७ भोंवरा : 37. Whirlpool.

तालूरभमांउलखुडिअकेसरो गिरिणईएँ पूरेण ।
दरवट्टउखुड्डणिखुड्डमहुअरो हीरइ कलम्बो ॥३७॥

१. चच्चर. २. पइआ. ३. सपाजिआ, सभजिआ, सद्दाज्जिआ, सअज्जआ. ४. घहुर. ५. सहवासिनी, प्रतिवेशिनिका. ६. स्फुटित. ७. ममगखुंडिअ. ८ बुड्डबुड्डणिब्बुड, घुड्डुणिब्बुड.

[ जलावर्तभ्रमाकुलखण्डितकेसरो गिरिनद्याः पूरेण ।
दरमग्नोन्मग्ननिर्मग्नमधुकरो ह्रियते कदम्बः ॥ ]

डोंगरांतील नदीच्या पुरांत वाहत आलेली कदम्बाची फांदी भोंवऱ्यांत सांपडल्यामुळें तिच्यावरील फुलांचे पराग तुटून गेले आहेत ( व मकरन्द धुऊन गेला आहे ). त्या फुलांना बिलगलेला भ्रमर जरा बुडतो, *जरा वर येतो, पुन्हा बुडतो, तरी तो त्यांवरील आपला स्नेह* सोडीत नाहीं.

❁ नदीतीरावरील कदम्बाच्या कुंजात संकेतस्थान निश्चित केलें आहे किंवा कदम्ब कुंजांतील संकेतस्थान नष्ट झालें आहे, अशी दूतीची सूचना. किंवा : ठरल्याप्रमाणें मी संकेतस्थानीं गेलें आणि पुष्कळ वेळ वाट पाहिली, पण तो आलाच नाहीं, अशी नायिकेची दूतीजवळ तक्रार. दुरवस्थेतही सज्जन स्वधर्माचा त्याग करीत नाहींत, हें सरळ तात्पर्य; तिचें यौवन नष्ट झालें, तरी सज्जन प्रियकरानें तिचा त्याग केला नाहीं; आणि तूं, निर्दया, तिच्याकडे ढुकूनही पहात नाहींस; ह्या टीकाकाराच्या सूचना.

## ३८ आभिमान : 38. Dignity.

अहिआअमाणिणो दुग्गअस्स छाहिं पअस्स रक्खन्ती ।
णिअबन्धवाणँ जूरइ घरिणी विहवेण एत्ताणम् ॥३८॥

[ आभिजात्यमानिनो दुर्गतस्य छायां पत्यू रक्षन्ती ।
*निजबान्धवेभ्यः क्रुध्यति गृहिणी विभवेनागच्छद्भ्यः* ॥ ]

---

१. भ्रमात्खण्डित. २. स्फुटितकेसरो. ३. दरमग्नमग्नोन्मग्न. ४. निर्मल. ५. पइअस्स, पइस्स, पिअस्स. ६. पत्ताणं, ७. खिंयति, निन्दति, ८. प्राप्तेभ्यः

माहेरचीं माणसें थाटमाट करून ( अगर मदत म्हणून द्रव्य देण्याला ) आलीं तर गृहिणी त्याजवर रागावते; कारण तिच्या नवऱ्याला आपल्या उच्च कुलाचा अभिमान आहे आणि विपन्नावस्था आलेली असली तरी तिला त्याच्या अभिमानाचें रक्षण करावयाचें आहे.

● पतिव्रता नायिका. टीकाकार सांगतात, तिला पैशाचा लोभ नाहीं, पतीपुढें तिला बंधुजनांचेंही महत्त्व नाहीं, मग तिला कामीजनाची पर्वा कुठली ! ती असाध्य आहे, अशी सूचना.

## ३९ असाध्य : 39. Duty.

साहीणे वि पिअअमे पत्ते वि खणे ण मण्डिओ अप्पा ।
दुग्गअपउत्थवइअं[1] सअज्झिअं[2] सण्ठन्वतीए ॥३९॥

[ स्वाधीनेऽपि प्रियतमे प्राप्तेऽपि क्षणे न माण्डित आत्मा ।
दुर्गत[3]प्रोषितपतिकां प्रतिवेशिनीं संस्थापयन्त्या ॥ ]

प्रियकर स्वाधीन आहे व उत्सव सुरू आहे, तरी ती वेषभूषा करीत नाहीं, कारण तिच्या गरीब शेजारणीचा पति प्रवासाला गेला आहे व हिला तिचें सांत्वन करावयाचें आहे.

● पतिव्रता नायिका. तिच्या अंगावर अलंकार नाहींत म्हणून ती दरिद्री आहे असें समजूं नको; किंवा अलंकाराच्या आमिषानें ती वश होईल अशी अपेक्षा करूं नको. तिचा पति प्रवासी आहे आणि प्रवासी पतीच्या पत्नीनें अलंकार धारण करावयाचे नाहींत, वेणीफणी करावयाची नाहीं, असा आचार आहे. आपण उत्सवाच्या निमित्तानें अलंकार धारण केले तर आपली गरीब

१. दुक्खिअ. २. सज्झिअं. ३. दुःखित.

शेजारीण उद्विग्न होईल अशी तिला काळजी वाटते, सबब ती असाध्य आहे, अशी दूतीची सूचना. पहा–मेघदूत. १–८ त्वामारूढं पवनपदवी-मुद्गृहीतालकान्ता ।

## ४० अनुराग : 40 Reason

तुज्झ वसइ त्ति हिअअं इमेहिँ दिट्ठो तुमं ति अच्छीहिँ ।
तुह विरहे किसिआइँ ति तीएँ अङ्गाइँ वि पिआइं ॥४०॥

[ तव वसतिरिति हृदयमाभ्या दृष्टस्त्वमित्याक्षिणी ।
तव विरहे कृशितानीति तस्या अङ्गान्यपि प्रियाणि ॥ ]

हृदयात तू आहेस म्हणून तें, दृष्टीला तू दिसतोस म्हणून ती व तुझ्या विरहानें अंग कृश होतें म्हणून तें, तिला प्रिय आहे

● नायकाला अनुकूल करून घेण्यासाठीं नायिकेच्या अनुरागाबद्दल दूतीचे उद्गार.

## ४१ अस्थानीं आसक्ति : 41 Prosperity.

सब्भावणेहभरिए रत्ते रज्जिज्जइ त्ति जुत्तमिणम् ।
अणहिअए उण हिअअं जं दिज्जइ तं जणो हसइ ॥४१॥

[ सद्भावस्नेहभरिते रक्ते रज्यते इति युक्तमिदम् ।
अन्यहृदये पुनर्हृदय यद्दीयते तज्जनो हसति ॥ ]

सद्भाव व स्नेह यानीं युक्त असलेल्या व्यक्तीवर अनुरक्त होण

१ अच्छिद्रम २ कृशितानीति, कृशानीति ३ रत्तिज्जइ, रचिजइ ४ असह
५ रक्तीभयते ६ स्नेहमये, स्नेहभृते

योग्य आहे. (ज्यानें आपलें हृदय दुसऱ्याला दिलें आहे त्यावर म्हणजे) अस्थानीं आसक्ति ठेवल्यास लोक उपहास करतात.

● खण्डिता नायिका. अन्यहृदय म्हणजे दुष्टहृदय, अन्यासक्तहृदय किंवा असद्‌ग्राहृदय. सद्भावाचा रंग शुभ्र आणि प्रीतीचा आरक्त. ज्याला रंग द्यावयाचा तें वस्त्र शुभ्र व स्वच्छ असलें तर त्यावर रंग चांगला चढतो; वस्त्र मलिन असलें किंवा त्यावर दुसऱ्या रंगाची छटा असली तर तें चांगलें रंगत नाहीं !

## ४२ लक्ष्मी : 42. Success.

आरम्भन्तस्स घुअं लच्छी मरणं वि होइ पुरिसस्स ।
तं मरणमणारम्भे वि होइ लच्छी उण ण होइ ॥४२॥

[ आरभमाणस्य ध्रुवं लक्ष्मीर्मरणं वा भवति पुरुषस्य ।
तन्मरणमनारम्भेऽपि भवति लक्ष्मीः पुनर्नभवति ॥ ]

कार्याला सुरुवात करणाऱ्या पुरुषाला लक्ष्मी प्राप्त होते किंवा मृत्यु तरी येतो. जो कार्याला आरंभच करीत नाहीं त्याला मरण तर येतेंच, लक्ष्मी मात्र मिळत नाहीं.

● साशङ्क नायकाला प्रोत्साहन. अति विचार व अति शङ्का यांनीं कार्यनाश होतो, साहसाशिवाय कार्यसिद्धि होत नाहीं, हें तात्पर्य.

## ४३ आशाबन्ध : 43. Hope.

विरहाणलो सहिज्जइ आसाबन्धेणवल्लहजणस्स ।
एक्कग्गामपवासो माए ! मरणं विसेसेइ ॥४३॥

१. घर, पुं. १. दुल्लह.

[ विरहानलः सह्यत आशाबन्धेन वल्लभजनस्य ।
एकग्रामप्रवासो मातर्मरणं विशेषयति ॥ ]

आई ग, प्रवासाला गेलेला प्रियकर परत येईल या आशेवर विरह कसा तरी सहन करता येतो; पण तो गांवातल्या गांवांत इतरत्र गेला तर मरणाहून अधिक त्रास होतो.

● कारण तो सवतीच्या मोहात गुरफटल्यामुळें आपल्याकडे परत येईल अशी आशा करावयाला जागा नसते आणि विरहाहून मत्सराच्या वेदना अधिक तीव्र असतात.

## ४४ अन्य महिला : 44. Memory.

अक्खडइ[२] पिआ हिअए अण्णं महिलाअणं रमन्तस्स ।
दिट्ठे सरिसम्मि गुणेऽसरिसम्मि[४] गुणे अणीसन्ते[३] ॥४४॥

[ आस्खलति[५] प्रिया हृदये अन्य महिलाजन रममाणस्य ।
दृष्टे सदृशे गुणे असदृशे गुणे अदर्श्यमाने[६] ॥ ]

अन्य महिलेबरोबर विलास करीत असताना प्रियेची आठवण झाल्यामुळें वल्लभ विमनस्क होतो, कारण प्रियेसारखे कांहीं गुण त्याला हिच्यात आढळतात तर काहींचा अभाव दिसून येतो.

● अन्यमनस्क होऊं नको, तिच्यापेक्षा सरस असा एकादा गुण येथेंही तुला आढळेल, असें दूतीचें आश्वासन. 'पृथ्वीप्रदक्षिणा' करून आलेल्यानेंही न पाहिलेलीं अशीं अनेक रम्य स्थळें भूतलावर असतातच. आपण जग पालथें घातलें आहे अशी फुशारकी मारण्यात अर्थ नाहीं !

---

१ दुर्लभजनस्य २. आवडइ, अक्खडइ ३. अईसते, अदीसते. ४. असरिस्सम्मे. ५. स्मृतिं याति ६. अतिक्षयेवेति

## ४५ अनित्य : 45. Effervescence.

णइऊरसच्छहे जोव्वणम्मि अइपवसिएसु दिअसेसु ।
अणिअत्तासु अ राईसु पुत्ति किं दड्ढमाणेण ॥४५॥

[ नदीपूरसदृशे यौवने अतिप्रोषितेषु दिवसेषु ।
अनिवृत्तासु च रात्रिषु पुत्रि किं दग्धमानेन ॥ ]

मुली, तारुण्य हें नदीच्या पुरासारखें अनित्य आहे. दिवस व रात्री निघून गेल्या कीं त्या कायमच्या जातात. मानिनी, मग तूं मानानें स्वतःला कां जाळून घेतेस ?

● यौवन नश्वर आहे, दुर्लभ आहे, तें फुकट घालवूं नकोस; तारुण्याची मस्ती नदीच्या पुरासारखी आहे, वाहत्या नदीच्या पाण्याच्या धारेच्या पृष्ठभागासारखी यौवनाची गति आहे, वाहत्या गंगेत डुंबून घे, अशी मानिनी नायिकेला महानुभवी दूतीची सूचना.

## ४६ रजनी : 46. Night.

कल्लं किल खरहिअओ पवसिहिइ पिओत्ति सुण्णइ जणम्मि
तह वड्ढ भअवइ णिसे जह से कल्लं विअ ण होइ ॥४६॥

[ कल्यं किल खरहृदयः प्रवत्स्यति प्रिय इति श्रूयते जने
तथा वर्धस्व भगवति निशे यथा तस्य कल्यमेव न भवति ॥ ]

---

१. सरसहे. २. णिव्वाहिएसु. ३. दिअहेसु. ४. अणिअत्तिअमाणासु ५. निव्य-प्रोषितेषु, अनिवर्तमानेषु ६. किर. ७. पवसिहिइ, पवसिहिइ, पवसिहइ. ८. सुव्वइ. [illegible]. ९. मअ.

पहाट झाली कीं निष्ठुर पति प्रवासाला जाणार असें लोकाकडून ऐकते. भगवती रजनी, तूंच वृद्धिंगत हो, म्हणजे सकाळच होणार नाहीं.

● पति उद्या सकाळीं प्रवासाला जाणार आहे, तेव्हा उद्या ये अशी स्वैरिणीनें उपपतीला दिलेली सूचना. पतिपत्नींचें विशेष रहस्य दिसत नाहीं, कारण पतीच्या प्रवासाची बातमी तिनें इतरेजनाकडून ऐकलेली आहे. पंडित मथुरानाथशास्त्री यांनीं टीकेच्या टीपेंत सदृश हिंदी पद दिलें आहे. सजन सकारे जाँयगे नैन मरैंगे रोय। विधिना ऐसी रैन करि, भोर कबहु ना होय॥

## ४७ उद्यांची तरतूद : 47. Farewell.

होन्तपहिअस्स[1] जाआ आउच्छणजीअधारण[2]रहस्सम्[3]।
पुच्छन्ती भमइ घरं घरेण पिअविरहसहिरीओ ॥४७॥
[ भविष्यत्पाथिकस्य जाया आपृच्छनजीवधारणारहस्यम्।
पृच्छन्ती भ्रमति गृहं गृहेण प्रियविरहसहनशीलाः ॥ ]

जिचा पति प्रवासाला निघणार आहे अशी पत्नी सहनशील विरहिणींच्या घरोघर जाऊन त्याना ( आर्जवून ) विचारते कीं विरहात जीव धारण करण्याचें रहस्य, ( जें तुम्हाला माहीत आहे, तें ) मला सांगा.

● पतिव्रता नायिका. पति प्रवासाला गेला तर पत्नीला जीव कसा धारण करवेल यावद्दल संशय व्यक्त करून सखी नायकाला प्रवासापासून परावृत्त करीत आहे; कुलटा नायिका : तिचा पति लवकरच प्रवासाला जाणार आहे, तोंवर घोर घर, अशी दूतीची कामुकाला सूचना; तिचा पतीच्या प्रवासाची वार्ता ती रसत च इष्ट अशा उपपतींच्या अगर समानशीला मैत्रिणींच्या घरोघरीं जाऊन देत आहे, अशा सूचना.

१. मोन्त. २. आउछ्ग, आउछग, उछ्ग. ३. सहस्समू. ४. आगामिवाश, पुनर्दर्शनप्रश्न. ५. साहसम्

## ४८ अहंकार : 48. Confidence.

अण्णमहिलापसङ्गं दे देव[1] करेसु[2] अह्म[3] दइअस्स ।
पुरिसा एक्कन्तरसा[4] ण हु दोसगुणे विआणन्ति ॥४८॥
[ अन्यमहिलाप्रसङ्गं हे देव कुर्वस्माकं दयितस्य ।
पुरुषा एकान्तरसा[5] न खलु दोषगुणौ विजानन्ति ॥ ]

देवा, अन्य महिलाशीं माझ्या पतींचा संबंध होऊं दे, ( म्हणजे तरी त्याना माझे गुण समजतील ). एकनिष्ठ पुरुषांना गुण समजत नाहींत व दोषही उमगत नाहींत.

● पतिव्रता व सहिष्णु नायिका: रसिकाला अपराधाची क्षमा होते, आणि खुषामत्यालाही, ती अशी. पति अन्यत्र गेला तरच त्याला हिच्या गुणाची जाणीव होणार. स्वैरिणी नायिका : पति अन्यत्र गेला तरच हिलाही अन्यत्र जाण्याला सवड मिळणार. स्वाधीनभर्तृका नायिका: स्वसौभाग्याचें वर्णन. गुणगर्विता नायिका : अगणित गुणाची व दोषरहितत्वाची सूचना. लाणावळींत जेवून आल्याशिवाय घरच्या अन्नाची रुचि उमजत नाहीं, हेंच खरें ! अलंकाररत्नाकरात 'परभाग' अलंकाराचें उदाहरण: 'अनुभूतस्यार्थान्तरोपलब्धौ परभागः ॥'

## ४९ ऐन दुपारीं : 49. Matinee.

थोअं पि ण णीसरई मज्झण्णे उह सरीरतलुक्का[6] । [7]
आअवभएण छाई वि, पहिअ ता किं ण वीसमसि ॥४९॥
[ स्तोकमपि न निःसरति मध्याह्ने पश्य शरीरतललीना ।
आतपभयेन च्छायापि पथिक तत्किं न विश्राम्यसि ॥ ]

१. देव्य, देव. २. कुरुष्व. ३. मह्य. ४. एक्कवत्त. ५ एकरसा. ६. णीइ इमा. ७. छुणा. ८. शिरीष. ९. एसा, मया.

ऐन दुपारीं छायासुद्धा शरीराच्या तळाशीं लपून बसते, जणूं उन्हाच्या धास्तीनें इकडे तिकडे थोडीसुद्धा सरकत नाहीं. मग पथिका, अशा या वेळीं तूं जरा विश्रांति का घेत नाहींस ?

● स्वयंदूती, स्वैरिणी, माध्यान्हाभिसारिका नायिका. एका टीकाकाराच्या मतें हे उद्गार प्रपापालिकेचे–पाणपोईवर पाणी घालणाऱ्या स्त्रीचे आहेत, उन्हातून तापून आलेल्या पथिकाला उद्देशून स्वाभिप्राय व्यक्त करण्यासाठीं ते काढलेले आहेत. आणखी एक टीकाकार सांगतो, रतार्थिनी अंगुलिनिर्देश करून पथिकाला विश्रातिस्थान दाखवीत आहे, किंवा आता थोडी विश्रांति घ्या, असें सुचवीत आहे. म्हणून ' अभिनय ' अलंकार.

## ५० थोर तुझे उपकार : 50. Thanks.

सुहउच्छेअं जणं दुल्लहं पि दूराहि अम्ह आणेन्त ।
उअआरअ जर ! जीअं पि णेन्त ण कआवराहोसि ॥५०॥

[ सुखपृच्छकं जनं दुर्लभमपि दूरादस्माकमानयन् ।
उपकारक ज्वर जीवमपि नयन्न कृतापराधोऽसि ॥ ]

मला ताप येत आहे असें समजल्यामुळें माझ्या प्रकृतीची चौकशी करण्यासाठीं दुर्लभ प्रियकर दूर अंतरावरून आला. ज्वरा, तू माझ्यावर उपकारच केलास, आता तूं माझा जीव घेतलास तरी मी तुला अपराधी मानणार नाहीं.

● तिला ज्वर आला आहे असें समजलें, म्हणून तो तिच्या समाचारासाठीं आला. त्यानें सुखाची पृच्छा केली, सुखाची अपेक्षा केली नाहीं; तो आला तो केवळ लोकापवादाच्या भीतीमुळें, प्रीतीमुळें नव्हे, कुशल विचारलें तें औदासीन्यानें, उत्सुकतेनें नव्हे; आणि तेवढयानेंही तिला किती समाधान

१. उछलअ. २. आणेत. ३. शुभ. ४. गृण्हन.

वाटलें! विरहोत्कण्ठितेचे उपालम्भोद्गार. अलंकारकौस्तुभात परिवृत्ति अलंकाराचें उदाहरण: 'सदृशासदृशैरर्थैरर्थानां विनिमयस्तु परिवृत्तिः।' सरस्वतीकण्ठाभरणात अप्रस्तुतप्रशंसेचें उदाहरण.

## ५१ स्वास्थ्य : 51. Formality.

**आमं जरो मे मन्दो अहव ण मन्दो, जणस्स का तत्ती।**
**सुहउच्छैअ सुहअ सुअन्धअन्ध मा अँन्धिअं छिवसु ॥५१॥**

**[ आमज्वरो मे मन्दोऽथवा न मन्दो जनस्य का चिन्ता।**
**सुखपृच्छक सुभग सुगन्धगन्ध मा गन्धितां स्पृश ॥ ]**

चल! उगाच माझ्या स्वास्थ्याची चौकशी कशाला करतां? माझा ज्वर मन्द झाला आहे कीं नाहीं याची चौकशी लोकांनी कशाला करावी? हे सुभग, *(अन्य महिलासंगामुळें)* तुमच्या अंगाला सुगंध येत आहे आणि (या ज्वरामुळें) माझ्या अंगाला दुर्गंध; म्हणून सांगतें, मला स्पर्श करूं नका.

● स्वभार्येविषयीं उदासीन व अन्यमहिलासक्त पति आणि खण्डिता, ज्वरार्ता पत्नी. विषय पूर्वीचाच, प्रतिक्रिया वेगळी; कारण तो सुखपृच्छे-साठीं लावरून आला होता आणि हा बहुधा गावातल्या गावातून; कारण अन्यमहिलासंगाचे वेळीं याच्या अंगाला लागलेला सुगंध अद्याप घमघमत आहे; कारण त्याच्यापेक्षा याची सुखपृच्छा अधिक औपचारिक आहे. उदासीन पति पत्नीलाहि परका वाटतो. आमज्वर म्हणजे जागरणामुळें किंवा अमाशामुळें आलेला ज्वर. आम हा शब्द ईर्ष्यासूचकही आहे.

१. आमजरो. २. तन्ती. ३. सुहउच्छअ सुहपुच्छअ. ४. गन्धिरि, गंधिरि, *गिंधिरि*. ५. छुव.

## ५२ मोरपंखी : 52. Dishevelled.

सिहिपिच्छलुलिअकेसे वेवन्तोरु विणिमीलिअद्धच्छि ।
दरपुरिसाइरि विसमरि जाणसु पुरिसाणँ जं दुःखम् ॥५२॥

[ शिखिपिच्छलुलितकेशे वेपमानोरु विनिमीलितार्धाक्षि ।
ईषत्पुरुषायिते विश्रामशीले जानीहि पुरुषाणां यद्दुःखम् ॥ ]

थोडा वेळ पुरुषाचें अनुकरण केलेंस, तर तेवढ्यांत तुझे केस मोराच्या पिसाऱ्यासारखे विखुरले, मांड्या थरकापूं लागल्या, डोळ्यांवर झांपड आली व तूं थकून गेलीस. थोडा वेळ विश्रांति घे आणि पुरुषांना किती श्रम होतात याची कल्पना कर.

● अल्प आयासानेंही श्रान्त झालेल्या सुकुमार नायिकेला उद्देशून नायकानें काढलेले सहासोद्गार. प्रोत्साहनार्थ कीं प्रशंसार्थक ? तिच्या डोळ्यावर आलेली झापड कसली ? धुंदीची ? कीं तृप्तीची ? कीं अतृप्तीची ? कीं केवळ परिश्रमाची ? कीं अपेक्षेची ? कीं हा नुसता अभिनय ?

## ५३ बेचव : 53. Tasteless.

पेम्मस्स विरोहिअसंधिअस्स पच्चक्खदिट्ठविलिअस्स ।
उअअस्स व ताविअसीअलस्स विरसो रसो होइ ॥५३॥

[ प्रेम्णो विरोधितसंधितस्य प्रत्यक्षदृष्टव्यलीकस्य ।
उदकस्येव तापितशीतलस्य विरसो रसो भवति ॥ ]

१. वेवन्तोरू. २. अर्धनिमीलिताक्षी सती क्षणेन श्राम्यसि। पुरुषाणाम् अस्माकं यद् दुःखम् तत् जानीहि. ३. विरूअस्स. ४. सन्दिरस्य. ५. विलयस्य.

प्रथम त्याला झिडकारलेंस आणि आता त्याचें प्रेम जोडूं पाहत आहेस. ( या खोटेपणातील ) अपराध दृष्टोत्पत्तीस आला म्हणजे तुझें प्रेम त्याला तापवून गार केलेल्या पाण्यासारखें बेचव वाटेल.

● पूर्वी त्याचा अनुनय अमान्य केलास, कारण तेव्हा त्याचें वैभव नष्ट झालें होतें. आता त्याला पुन्हा वैभव प्राप्त झालेलें आहे, म्हणून त्याचें प्रेम जोडण्यासाठीं तूं उत्सुक आहेस; प्रेमाला खोटेपणा सहन होत नाहीं; असा अपराध पुरुष विसरत नाहींस; सखीचे नायिकेच्या निर्भर्त्सनेचे उद्गार. नायक गरीब होता, तरी माझी खुषी होती, तेव्हा तूं मला त्याच्याकडे जाऊं दिलें नाहींस आणि आता तो सधन झालेला आहे म्हणून त्याच्याकडे जाण्याविषयीं तूं मला प्रोत्साहन देत आहेस; हा अपराध त्याच्या लक्षात आला तर समागमात त्याला सुख वाटणार नाहीं; तरुण वेश्येनें मातेला उद्देशून काढलेले किंवा आत्मनिंदेचे उद्वेगोद्गार. प्रेम हें जिवंत झऱ्याच्या पाण्यासारखें असतें. साठवून ठेवलेलें पाणीसुद्धा बेचव लागतें. तापवून गार केलेलें पाणी फक्त अनुपानासाठीं, विकृतिजन्य शोष शमविण्यासाठीं घ्यावयाचें असतें; नैसर्गिक व तीव्र तृषा त्यानें कशी शमणार !

## ५४ टणत्कार : 54. Women in Bondage.

वज्जवडणाइरिक्कं पइणो सोऊण सिञ्जिणीघोसम् ।
पुसिआइं करिमरीएँ सरिसबन्दीणं पि णअणाइं ॥५४॥

[ वज्रपतनातिरिक्तं पत्युः श्रुत्वा शिञ्जिनीघोषम् ।
प्रोञ्छितानि बन्द्या सदृशबन्दीनामपि नयनानि ॥ ]

ती बंदिवासात होती. पडणाऱ्या विजेच्या कडाडण्यापेक्षांही मोठा असा पतीच्या धनुष्याचा टणत्कार ऐकून तिनें आपल्याबरोबर बंदीत असणाऱ्या स्त्रियांचे अश्रु पुसले ( व जणूं त्यांना सुटकेचें आश्वासन दिलें.)

१. पडणा. २ सारि. ३. करंछीहि. ४. मो.छतानि, प्रोंपितानि. ५. सदृग्.

● वज्र कडाडून कोसळते, अचानकपणे; त्याच्यापुढे कोणाचा निभाव लागत नाही. तुरुगावर अकल्पितपणे हल्ला चढवून, पहारेकऱ्यांचा निःपात करून, प्रियकर आपली सुटका करीलच, अशी बन्दिनीला खात्री होती, इतकी त्याच्या साहसी सामर्थ्यावर तिची श्रद्धा होती; कारण तिला पूर्वी असे अनुभव आलेले होते. दुरवस्थेत असणाऱ्या सहभाग्याच्या उद्धारासाठी सज्जन सदैव सज्ज असतात.

## ५५ उत्साहभंग : 55. False Expectations.

करिमरि ! अआलगज्जिरजलआसणिपडनपडिरवो एसो ।
पइणो धणुरवकङ्खिरि[1] रोमञ्चं किं मुहा वहसि ॥५५॥

[ बन्दि अकालगर्जनशीलजलदाशनिपतनप्रतिरव एषः।
पत्युर्धनूरवाकाङ्क्षणशीले रोमाञ्चं किं मुधा वहसि ॥ ]

अकाली गर्जना करणाऱ्या मेघांतून पडणाऱ्या विजेच्या कडाडण्याचा हा प्रतिध्वनि आहे. पतीच्या धनुष्याच्या टणत्काराची वाट पाहणाऱ्या बन्दिनी स्त्रिये, वृथा कां रोमांचित होतेस ?

● पतिशौर्याभिमानिनी बन्दिनीचा उत्साहभंग करण्याच्या हेतूने तिचा अभिलाष करणाऱ्या तरुण चोराचे उद्गार. रोमाञ्चरूपाने रसोद्भव.

## ५६ दुर्विदग्ध : 56. Rude.

सहइ सहइ त्ति तह तेण रामिआ सुरअदुव्विअड्ढेण ।
पम्माअसिरीसाइँ व जह से जाआइँ अङ्गाइं ॥५६॥

१. सांकिणि, २. शङ्किणि, काङ्क्षिणि. ३. रमिआ. ४. अड्ढेण. ५. पम्माइअ, पच्चाअ, पव्वाअ (म्ला ऐवजी वा-वर : ८·२१; हेम : ४·८)

[ सहते सहत इति तथा तेन रमिता सुरतदुर्विदग्धेन ।
प्रम्लानशिरीषाणीव यथास्या जातान्यङ्गानि ॥ ]

( त्यानें कामशास्त्राच्या सिद्धान्तांचें अध्ययन केलें होतें व आपल्याला सारें कांहीं समजतें असा त्याला दुरभिमान होता.) ती सर्व कांहीं सहन करीत आहे हें पाहून तिला सारें कांहीं सहन होतें अशा गैरसमजुतीनें त्या अडाण्यानें तिचा अनेक प्रकारें यथेच्छ उपभोग घेतला आणि यामुळें बिचारीचें शरीर चुरगळलेल्या शिरीष कुसुमाप्रमाणें म्लान होऊन गेलें.

● शिरीष हें पुष्पसृष्टींतील अत्यंत नाजूक फूल, केवळ स्पर्शानें किंवा निःश्वासाच्या झळीनें म्लान होतें ! आणि तेंही या निर्दयानें चुरगळलें ! वनस्पतिशास्त्राचा अध्यापक असावा ! एक टीकाकार सांगतो, हे वेश्यामातेचे उद्गार आहेत, भुजंगनिंदा हें निमित्त आहे व अभिप्रेत अर्थ आपल्या कन्येच्या सौकुमार्याची, सौंदर्याची, सुरतनैपुण्याची व सहनशीलतेची भलावण हा आहे. की भुजङ्गाची निंदा हा आहे ! अडाण्याला सूचना देतां येते, शिकवितां येते, चुचकारतां येतें व प्रसंगविशेषीं चमकावतांही येतें. पण पण्डिताशीं प्रसङ्ग म्हणजे प्राणाशीं गांठ !

## ५७ लोकमर्यादा : 57. Immodest

अगणिअसेसजुआणा बालअ वोलीणलोअमज्जाआ । [1]
अह सा भमइ दिसामुहपसारिअच्छी तुह कएण ।।५७।।

[ अगणिताशेषयुवा बालक व्यतिक्रान्तलोकमर्यादा ।
अथ सा भ्रमति दिशामुखप्रसारिताक्षी तव कृतेन ॥ ]

1. सहणा.

अरे बाळ, तुझ्याशिवाय बाकीचे तरुण तिच्या गणतींत नाहींत. तुझ्यासाठीं तिनें लोकमर्यादा सोडून दिल्या आहेत. तुझ्या दर्शनासाठीं दिशांच्या क्षितिजाकडे नजर लावून ती भटकत आहे.

● दहा कामदशांपैकीं जडता ही नववी अवस्था. श्रृंगारतिलकात (२-५) सांगितलें आहे; ' अभिलाषोऽथ चिंता स्यात्स्मृतिश्च गुणकीर्तनम् । उद्वेगोऽथ प्रलापः स्यादुन्मादो व्याधिरेवच ॥ जडता मरणं चैव दशम जायते ध्रुवम् । ' दूती नायकाला सांगते, ' यापुढें तिची उपेक्षा करूं नको, नाहींतर तुला स्त्रीहत्येचें पातक लागेल. प्रेमामुळें दृष्टि शून्य होते, मर्यादा नष्ट होतात व लज्जेचें विसर्जन होतें. तिनें जनलज्जा सोडली आणि शठा, तूं तर मनलज्जाही सोडलीस !

## ५८ धिंगाणा : 58. Dissolute.

अज्जं च्चेअ पउत्थो उज्जाअरओ जणस्स अज्जे अ ।
अज्जे अ हलिद्दापिञ्जराइँ गोलाणईतडाँइं ॥५८॥

[ अद्यैव प्रोषित उज्जागरको जनस्याद्यैव ।
अद्यैव हरिद्रापिञ्जराणि गोदानदीतटानि ॥ ]

आजच पति प्रवासाला गेले; आज लोक रात्रभर जागरण करतील आणि गोदावरीचे कांठ हळदकुंकवानें रंगतील.

● हा तिकडे प्रवासाला गेला, इकडे लोकांनीं जागरण का करावें ? कारण, टीकाकार सांगतात, तो गावचा पुढारी होता, शूर होता; त्याच्या हजिरींत गावकरी निर्धास्त असत, त्याच्या गैरहजिरींत त्याना स्वसंरक्षणार्थ

१. अज्ज चेअ, च्चेय, व्वेअ. २. उज्जागरओ, उ`इझगिरओ. ३. गोलाबइ, गोलाइ. ४. तुहाइं, तीराइं, रुहाइं, तोहाइं. ५. तीराणि, स्रोतांसि, तोयाणि, कूलानि.

सज्ज राहणें भाग होतें. हें पटत नाहीं. तसें असतें तर गोदातीरावर हळद-कुंकवाचा सडा कां पडता? एक टीकाकार सुचवतो, तो स्वतःच दरवडेखोर होता; दुसरा सांगतो, तो चौर्यरतार्थ इतरत्र गेला होता! मराठी स्त्रियांची गोदावरीवर आंघोळ करण्याची हौस प्रसिद्ध आहे. कोऊहल कवि लीलावई काव्यांत (संपादक डॉ. उपाध्ये : भारतीय विद्याभुवन. गाथा क्र. ६१) सांगतोः 'मरहट्ठिया पओहर हलिद्द परिपिंजरंबुवाहीए। धुव्वनि जत्थ गोलाणईए तद्दियसियं पाव॥' आज पति प्रवासाला गेला, तो घरीं होता तोंवर त्याच्या स्त्रिया ताटाखालच्या मांजरासारख्या चोर पावलांनीं वावरत होत्या, तो गेला न गेला तोंच त्याचा धिंगाणा सुरू झाला. असती भवती अभिसारासाठीं सज्ज झाल्या आहेत अशी ज्येष्ठ व साध्वी पत्नीची सारूढ तक्रार. टीकेंत वेबरनें जर्मन म्हण दिली आहेः Ist die Katze fort, haben die Mäusa frei Tanzen: मांजर नसलें कीं उंदीर नाचूं लागतात!

## ५९ विकल्प : 59. Option.

> असरिसचित्ते दिअरे सुद्धमणा पिअअमे विसमसीले।
> ण कहइ कुडुम्बविहडणभएण तणुआअए सोह्णा॥५९॥
>
> [असदृशचित्त देवरे शुद्धमनाः प्रियतमे विषमशीले।
> न कथयति कुटुम्बविघटनभयेन तनुकायते स्नुषा॥]

भाऊजींच्या चित्तांतील विकार तापट नवऱ्याजवळ प्रकट केला तर कुटुंब मोडेल म्हणून शुद्ध अंतःकरणाची सून कांहीं बोलत नाहीं, कृश मात्र होते.

● साधु-सामन्यांची व कर्त्या दीरांची सत्ता असलेल्या, मामीं कर्ते मार्गांचे पायदळ नणन्देनें भावजयीला केलेला हा उपदेश आहे, असें एक टीकाकार सांगतो. कीं एका जावेनें दुसरीला! अशील नावापूच्या पुनातेनें कारण.

१. विसमसीले. २. सिहला. ३. सुहा. ४. तनूभवति मुग्ध.

६० शून्य कलह :　　60. Quarrelsome.

चित्ताणिअदइअसमागमम्मि कअमण्णुआइँ भरिऊण[1] ।
सुण्णं कलहाअन्ती सहीहिँ रुण्णा, ण ओहसिआ[2] ॥६०॥

[ चित्तानीतदयितसमागमे कृतमन्युकानि स्मृत्वा ।
शून्यं कलहायमाना सखीभी रुदिता नोपहसिता ॥ ]

नवऱ्याची भेट झाली न झाली तोंच रागाच्या गोष्टी आठवून निरर्थक कलहाला प्रवृत्त होणाऱ्या स्त्रीच्या अवस्थेबद्दल तिच्या मैत्रिणींना खेद होतो; ( सहानुभूतीमुळें ) त्या तिचा उपहास करीत नाहींत.

● सान्त्वन-कोणाचें ? कलहान्तरितेचें ? प्रोत्साहन कोणाला ? अनुनय विफल झालेल्या प्रियकराला ? कीं पतीच्या गैरहजिरींत ती आपल्याशींच बडबडत होती ?

६१ संकल्प :　　61 Log.

हिअअण्णएहिँ[5] समअं असमत्ताइं पि जह सुहावन्ति ।
कज्जाइँ मणे ण तहा इअरेहि सेमाविआइं[6] पि ॥६१॥

[ हृदयज्ञैः सममसमाप्तान्यपि यथा सुखयन्ति ।
कार्याणि मन्ये न तथा इतरैः समापितान्यपि[7] ॥ ]

हृदय जाणणाराशीं ( नुसता संकल्प ठरला आणि ) समागम साधला नाहीं तरी त्यामुळें होतें तेवढें सुख अडाण्याबरोबर समागम पूर्ण होऊनही प्राप्त होत नाहीं.

१. चिन्ताणिइअ. २. भणिऊण. ३. उवहसिआ. ४. न पुनर्हसिता. ५. अणुएहिं' अण्णुएाह. ६. समाणिआइं. ७. समाप्तान्यपि.

● गंगाधर सांगतो, या गाथेची नायिका विदग्धा, कुलजाभिसारिका असावी आणि नायक सदभिरुचिसंपन्न प्रच्छन्नरताभिलाषी नागरिक असावा. किंवा, अडाणी पामर पतीविषयीं नायिकेचें औदासीन्यप्रकटन; किंवा, दूतीनें केलेला अधमानुरक्तीचा निषेध.

## ६२ कोंब : 62. Sprout.

दरफुडिअसिप्पिसंपुडणिलुक्कहालाहलग्गछेप्पणिहम्[१] ।
पक्कम्बाट्ठिविणिग्गअकोमलमम्बङ्कुरं उअह ॥६२॥[२]

[ ईषत्स्फुटितशुक्तिसंपुटनिलीनहालाहलाग्रपुच्छनिभम् ।
पक्काम्रास्थिविनिर्गतकोमलमाम्राङ्कुरं पश्यत ॥ ]

अर्धवट उघडलेल्या शिंपल्यांत लपलेल्या हलाहल सर्पाचें शेंपूट थोडेसें बाहेर रहतें. पिकलेल्या आंब्याच्या कोयींतून जरासा बाहेर आलेला कोवळा कोंब तसाच दिसत आहे.

● कोयींना कोंब फुटूं लागले, आतां लवकरच पावसाळा सुरू होणार, या दिवसांत तुम्हीं मनासाला गेलांत तर या कोंवळ्या कोंबांचें दर्शन मला सर्पदंशासारखें असह्य वाटेल. पतीच्या नियोजित प्रवासाचा निषेध.

## ६३ चक्कुळी : 63. Spider.

उअह पडलन्तरोइण्णणिअअतन्तुद्धपाअपडिलग्गम्[३] ।
दुल्लक्खसुत्तगुत्थेक्कबउलकुसुमं व मक्कडअम्[४] ॥६३॥

१. विवव. २. निलुह. ३. ओाराण्ण. ४. गुच्छेक्क.

[ पश्यत पटलान्तरावतीर्णनिजकतन्तूर्ध्वपादप्रतिलग्नम् ।
दुर्लक्ष्यसूत्रग्रथितैकबकुलकुसुममिव मर्कटकम् ॥ ]

पहा, कोळी स्वत निर्माण केलेल्या व पटईपासून लोंबणाऱ्या तंतूला पाय वर करून लटकला आहे. सूक्ष्म धाग्यात बकुळीचें एकच एक फूल गुफावें, तसा तो दिसत आहे.

● *दिवसा उजेडीं परक्या घरीं जाराला वाटणारी धाकधुक दूर करण्यासाठीं येथें निर्धास्त एकान्त असल्याची सूचना या उद्गारात ध्वनित आहे असें गगाधर सागतो कामशास्त्रावरील सस्कृत ग्रथात असें एकादें आसन असतें तर तेंही अभिप्रेत आहे असें सागावयास टीकाकारानीं कमी केलें नसतें.*

## ६४ पारवा : 64 Pigeon.

उअरि दरदिट्ठथण्णुअणिलुक्कपारावआणॅ विरुएहिं ।
णित्थणइ जाअवेअणॅ सूलाहिण्णं व देउलम् ॥६४॥

[ उपरीदरदृष्टस्थाणुकनिलीनपारावतानां विरुतैः ।
निस्तनति जातवेदन शूलाभिन्नमिव देवकुलम् ॥ ]

पडझड झालेल्या देवळावर पारवे घुमत आहेत. कळस कोसळल्यामुळें मेख वर दिसत आहे. जणू शूलानें भेद केल्यामुळें पारव्यांच्या रूपानें देऊळच स्फुदत आहे.

● *सकेतस्थानाची सूचना किंवा दीर्घकालीन एकान्ताचें आश्वासन. गगाधरानें ' वक्रोल्लिनीराननकदागदौ ' हें वचन या गाथेवरील टीकेंतही उद्धृत केलेलें आहे. ता सागतो, वर पारवे कूजन करीत आहेत आणि आत आपण, असा ध्वनितार्थ आहे।* मग विपरीत रताची सूचना का

१ खण्णुअणिलाण, खण्णुअ २. दउअलम्, देवउलम्. ३ उवरि दरदृष्टस्थाणुकनिलीन.

नाहीं ! एक टीकाकार सांगतो, जीर्णावस्था सर्वांनाच प्राप्त होते, देवळानाही; हें ध्यानात धरून समर्थांनीही धर्माचरण केलें पाहिजे, हें या गाथेचें तात्पर्य आहे.

## ६५ माजलेली पारडी : 65. Calf.

जइ होसि ण तस्स पिआ अणुदिअहं णीसहेहिँ अङ्गेहिं ।
णवसूअपीअपेऊसमत्तपाडि[2] व्व किं सुवसि ॥६५॥ [1]

[ यदि भवसि न तस्य प्रियानुदिवसं निःसहैरङ्गैः ।
नवसूतपीतपीयूषमत्तमहिषीवत्सेव किं स्वपिषि ॥ ]

तू म्हणतेस कीं मी त्याची लाडकी नाहीं. मग तुझें अंग असें विकल का ? कोवळें दूध पिऊन माजलेल्या तान्ह्या पारडीसारखी तूं दिवसभर का झोंपून राहतेस ?

● सपत्नीचे उद्गार; तू नाहीं नाहीं म्हणतेस, तरी तूं नवऱ्याची लाडकी आहेसच, अलीकडे रोज रात्रीं ते तुझ्याकडेच असतात, म्हणूनच तूं दुपारभर झोंपून राहतेस, दिवसभर सुस्तींत असतेस. लाडकी नाहीं असें पुन्हा म्हणणार असलीस तर सांग, रात्रीं कोणाबरोबर धिंगाणा घालतेस !

## ६६ लोकापवाद : 66. Scandal.

हेमन्तिआसु अइदीहरासु राईसु तं सि अविणिद्दा[3] ।
चिरअरपउत्थवइए ! ण सुन्दरं जं दिआ सुवसि ॥६६॥

१ ता दिअहं २. पड्डिव्व. ३ अइदीहराणु, दीघरासु

[ हैमन्तिकास्वतिदीर्घासु रात्रिषु त्वमस्वविनिद्रा।
चिरतरप्रोषितपतिके न सुन्दरं यद्दिवा स्वपिषि ॥ ]

तुझा पति प्रवासाला जाऊन बरेच दिवस झाले आहेत. हिवाळ्यांतल्या रात्री फार मोठ्या असतात; तरी रात्रीं पुरी गाढ झोंप मिळत नाहीं म्हणून तुला दिवसां झोंपावें लागतें; हें ठीक नाहीं, बरें का !

● जनापवादामुळें भयभीत झालेल्या बन्धुवधूचे उद्गार. विरहामुळें डोळ्याला डोळा लागत नाहीं म्हणून, कीं रात्रीं कोठे भटकायला जातेस म्हणून ? कोण जाणे, डोळे लाल दिसतात खरे. कुलस्त्रियानीं दिवसा झोंपणें हें सुद्धा लोकापवादाला कारण पुरतें.

६७ पावलावर पाऊल : 67. Step on Step.

जइ चिक्खल्लभउप्पअपअमिणमलसाइ तुह पए दिण्णम् ।
ता सुहअ कण्टइज्जन्तमङ्गमेह्णि किणो वहसि ॥६७॥

[ यदि कर्दमभयोत्प्लुतपदमिदमलसया तव पदे दत्तम् ।
तत्सुभग कण्टकितमङ्गमिदानीं किमिति वहसि ॥ ]

तिची चालच संथ आहे; पायांना रस्त्यावरला चिखल लागूं नये म्हणूनच ती माझ्या पावलांवर पावलें टाकीत आहे, असें तुम्ही म्हणतां; हे सुभग, हें जर खरें, तर तुमच्या अंगावर हे रोमांच काय म्हणून ?

● ती त्याच्या मागें आली, कीं मागोमाग आली, कीं मागावर आली ! मी तिच्या मागें लागलों असतों किंवा मागोमाग चाललों असतों तर त्याबद्दल आक्षेप घेता आला असता; पण आहे या परिस्थितींत माझ्यावर कोणताही अपराध सिद्ध होत नाहीं, असा आरोपिताचा बचाव. आणि

१. हेमन्तिसु. २. अतिदीर्घतरासु. ३. कण्डइज्जन्तं, कण्डइयुतं. ४. चिक्खिल्ल.

हे रोमांच ! ओले पाय व पावसाळ्याची थंडी ! फिर्यादीचा अखेरचा आधार, परिस्थितीचा पुरावा !

## ६८ विरस : 68. Disgust.

पत्तो छणो[1] ण सोहइ, अइप्पहाए[2] व्व पुण्णिमअन्दो
अन्तविरसो व्व कामो, असंपआणो अ परिओसो ॥६८॥

[ प्राप्तः[3] क्षणो न शोभते अतिप्रभात[4] इव पूर्णिमाचन्द्रः ।
अन्तविरस इव कामो असंप्रदानश्च परितोषः ॥

प्रभातसमयीं पौर्णिमेचा चंद्रहि निस्तेज होतो; सण संपला म्हणजे उत्सवाला शोभा राहत नाहीं. अखेरीस विरस झाला तर सुरतांत मौज नाहीं. त्याचप्रमाणें संतुष्ट केल्यानंतर विदागी न देण्यांत शोभा नाहीं.

● वेश्येच्या कन्येवर भुजंग अति अनुरक्त होता. त्यानें एकदा तिला विदागी दिली नाहीं. म्हणून त्याची निंदा करतांना आपल्या मुलीला शिक्षण देणाऱ्या अनुभवी वृद्धगणिकेचे उद्गार; अशा प्रसंगीं शोभा राहत नाहीं इतकेंच नव्हे तर शोभा केली जाते !

## ६९ पार्वतीचें सौभाग्य : 69. Bracelet

पाणिग्गहणे व्विअ पव्वईएँ णाअं सहीहिँ सोहग्गम् ।
पसुवइणा वासुइकङ्कणम्मि ओसारिए दूरम् ॥६९॥

[ पाणिग्रहण एव पार्वत्या ज्ञातं सखीभिः सौभाग्यम् ।
पशुपतिना वासुकिकङ्कणेऽपसारिते दूरम् ॥ ]

१. छणा, स्थणो. २. अइप्पहाअम्मि. ३. प्राप्तोऽतिक्रान्तः. ४. प्रभाते पूर्णिमा.

पार्वतीच्या सौभाग्याची कल्पना तिच्या पाणिग्रहणाचे वेळींच तिच्या सख्यांना आली; कारण त्या वेळीं पशुपतीनें आपल्या हातावरील वासुकीचें कंकण दूर सारलें.

● मेघदूतातील कालिदासाचे ( १.६३ ) उद्गार पहा : 'हित्वा तस्मिन् भुजगवलयं शम्भुना दत्तहस्ता। क्रीडाशैले यदि च विरहोत्पादचारेण गौरी॥' नागकन्येला नागाची भीति वाटत होती म्हणून नव्हे, मंगलप्रसंगीं अमंगल दिसणारें व लोकविरुद्ध असणारें सर्पकंकण धारण केलेलें नसावें, म्हणून पशुपतीनें वासुकीचें वेटोळें दूर केलें.

## ७० अपन्हुति : 70. Dark Peaks.

गिह्मे दवग्गिमसिमइलिआइँ दीसन्ति विञ्झसिहराइं।
आससु पउत्थवइए! ण होन्ति णवपाउसब्भाइं॥७०॥

[ ग्रीष्मे दवाग्निमषीमलिनितानि दृश्यन्ते विन्ध्यशिखराणि।
आश्वसिहि प्रोषितपतिके न भवन्ति नवप्रावृडभ्राणि॥ ]

विन्ध्य पर्वताचीं शिखरें काळींभोर झालेलीं पाहून तुला वाटत आहे कीं पाणकळ्याच्या आरंभींचे मेघ आकाशात दाटले आहेत. प्रोषितपतिके, धीर धर. हे मेघ नाहींत, उन्हाळ्यांत पेटणाऱ्या वणव्यांच्या धुरामुळें पर्वतशिखरें काळवंडलीं आहेत.

● मेघाच्या भ्रातीनें आर्त झालेल्या प्रोषितपतिकेला सखीचें आश्वासन, कीं धीर सोडूं नको, पति परत येण्याची वेळ अजून टळलेली नाहीं. उन्हाळा संपण्यापूर्वीच तो खास घरीं येईल. सरस्वतीकण्ठाभरणात औपम्यवति अपन्हुतीचें उदाहरणः 'अपन्हुतिरपन्हुत्य किंचिदन्यार्थदर्शनम्।'

१. वध्य. २. हुन्ति.

## ७१ लोंढा : 71. Uniform.

जेत्तिअमेत्तं तीरइ णिव्वोढुं, देसु तेत्तिअं पणअम्।
ण जणो विणिअत्तपसाअदुक्खसहणक्खमो सव्वो ॥७१॥

[यावन्मात्रं शक्यते निर्वोढुं देहि तावन्तं प्रणयम्।
न जनो विनिवृत्तप्रसाददुःखसहनक्षमः सर्वः ॥]

जेवढें प्रेम कायमचें देतां येईल तेवढेंच द्या, कारण प्रेमभंगाचें दुःख सहन करण्याचें सामर्थ्य सर्वांनाच नसतें.

● पहिल्या भेटींत अनुरागातिशय प्रकट करणाऱ्या बहुवल्लभास. मी अल्पसंतुष्ट आहे, माझ्या अपेक्षा वाढवूं नका, मला मनोभंगाच्या वेदना सहन होणार नाहींत.

## ७२ मिठाईची मिठी : 72 Short & Sweet.

बहुवल्लहस्स जा होइ वल्लहा कह वि पञ्च दिअहाइं।
सा किं छट्ठं मग्गइ ? कत्तो मिट्ठं च बहुअं अ ॥७२॥

[बहुवल्लभस्य या भवति वल्लभा कथमपि पञ्च दिवसानि।
सा किं षष्ठं मृगयते कुतो मृष्टं च बहुकं च ॥]

ज्याला पुष्कळ स्त्रिया आहेत त्याचें प्रेम (वर्तमान) वल्लभेवर फार तर पांच दिवस असणार; आणि तीही सहावा दिवस कशाला मागेल ? जें गोड तें विपुल कसें असेल ?

१. णिव्वोढुं. २. ण जणो पिअअमक्खमाणभंगदुक्खसहक्खमो सव्वो.
३. निर्वाहयितुं ददस्व. ४. बहुलं. ५. मागयात. ६. मिट्ठं.

● फारा दिवसांनीं फिरकलेला प्रियकर स्थिरस्नेही मानिनीचें सात्वन करू लागला, तेव्हाचे तिचे उद्गार; किंवा प्रियकर गेले चार दिवस आला, आज आला नाहीं, म्हणून खिन्न झालेल्या नायिकेचें सात्वन करण्यासाठीं सखीचे उद्गार. मिष्टान्न सेवनानंतर उपोषण करावेंच लागतें! किंवा उपोष्णानंतरच साधें अन्नही मिष्ट वाटतें!

## ७३ सांवरी पदर : 73. Exhibition.

जं जं सो णिज्झाअइ अङ्गोआसं महं अणिमिसच्छो ।
पच्छाएमि अ तं तं इच्छामि अ तेण दीसन्तम् ॥७३॥

[ यद्यत्स निर्धायत्यङ्गावकाशं ममानिमिषाक्षः ।
प्रच्छादयामि च तं तामिच्छामि च तेन दृश्यमानम् ॥ ]

माझ्या ज्या ज्या अवयवावर त्याची दृष्टि स्थिर होते तो तो ( वस्त्र सांवरून ) झाकून घेण्याचा मी प्रयत्न करतें. तरीही तो त्याला दिसावा अशीच माझी इच्छा असते.

● *स्वाधीनभर्तृका, स्वसौभाग्यगर्विता नायिका. नायिकेनें ही इच्छा* केवढ्या प्रामाणिकपणें प्रकट केलेली आहे! तिचे अवयव प्रमाणबद्धअसून तिला याची जाणीव असावी. या गाथेच्या नायिकेचाच काय, जिचा पिंड भरदार असतो त्या प्रत्येक प्रमदेचा पावलोपावलीं हाच प्रयत्न प्रत्ययास येत असतो; तें पदर सावरणें, निऱ्याचा घोळ आवरणें! प्रदर्शन हेंच अवगुंठनाच्या शैलीचें रहस्य!

## ७४ मुठींतली वाळू : 74. Handful of Sand.

दिढमण्णुदूणिआएँ वि गहिओ दइअम्मि पेच्छह इमाए ।
ओमरइ वालुआमुट्ठि उव्व माणो सुरसुरन्तो ॥७४॥

१. अङ्ग आसम्मि. २. अङ्ग पार्श्वे मम ३. दढ. ४. दूमिआइ.

[ दृढमन्युदूनयापि गृहीतो दयिते पश्यतानया ।
अपसरति वालुकामुष्टिरिव मानः सुरसुरायमाणः ॥ ]

मनांत क्रोध व खिन्नता दाटलेली असली तरी प्रियकराला पाहतांच तिचा मान मुठींतल्या वाळूसारखा सुरसुर ओसरून जातो.

● पतीला अनुनयाचें प्रोत्साहन देणाऱ्या कलहान्तरितेच्या सखीचे उद्गार.

## ७५ पाचू-माणकांचा हार : 75. Necklace.

उअ पोम्मराअमरगअसंवलिआ णहअलाओ ओअरइ ।
णहसिरिकण्ठब्भट्ठ व्व कण्ठिआ कीररिञ्छोली ॥७५॥

[ पश्य पद्मरागमरकतसंवलिता नभस्तलादवतरति ।
नभःश्रीकण्ठभ्रष्टेव कण्ठिका कीरपङ्क्तिः ॥ ]

पहा, पोपटांची रांग आकाशांतून उतरत आहे, जणूं नभःश्रीच्या कण्ठांतील पाचूंचा व माणकांचा कण्ठाच ओघळत आहे.

● हे उद्गारही मनसिजोद्दीपनार्थ, प्रियकराला अन्यमनस्क करण्यासाठीं आहेत असें गंगाधर सांगतो !

## ७६ बोंचणी : 76. Prick.

ण वि तह विएसवासो दोग्गच्चं मह जणेइ संतावम् ।
आसंसिअत्थविमणो जह पणइजणो णिअत्तन्तो ॥७६॥

[ नापि तथा विदेशवासो दौर्गत्यं मम जनयति संतापम् ।
आशंसितार्थविमना यथा प्रणयिजनो निवर्तमानः ॥ ]

१ दुर्मनस्कया. २. ।भातिरिव. ३. ओमरइ, आवरइ, ओतरइ. ४. दोहग्ग, दुग्गतं, दोगच्चं. ५. आसंघिअत्थ. ६. विमुहो. ७. अभिगंधितार्थे.

परठिकाणीं दारिद्र्यांत राहावें लागतें याबद्दल खेद होत नाहीं. जिवाला बोंचतें तें हें कीं आवेशानें अपेक्षिलेलें प्राप्त न झाल्यामुळें यापुढें प्रियजनाला निराश होऊन परत जावें लागणार.

● दुर्वर्तनी पत्नीला पतीनें परदेशीं, कुग्रामात, बंदीत, दारिद्र्यात ठेवलें. तिला हें बोंचलें नाहीं; सललें हें कीं आता प्रियजनाना आपली भेट कशी होणार ! आज जमणार नाहीं, माझ्यावर पहारा आहे, परत जा, अशी प्रियकराला सूचना.

७७ स्तनोष्मा : 77. Radiation.

खंन्धग्गिणा वणेसुं, तणेहिँ गामम्मि, रक्खिओ पहिओ।
णअरवसिओ णडिज्जइ सासुसएण व्व सीएण ॥७७॥
[ स्कन्धाग्निना वनेषु तृणैर्ग्रामे रक्षितः पथिकः।
नगरोषितः खेद्यते[1] सानुशयेनेव शीतेन ॥ ]

रानात मुक्काम होता तेव्हां ओंडक्याच्या धगीनें व खेड्यांत आला तेव्हां गवताच्या शेकोटीनें पथिकाचें थंडीपासून रक्षण केलें. आतां तो या नगरांत आला आहे. आतांपर्यंत तो आपल्या तडाक्यांतून सुटल्यामुळें रागावलेली थंडी त्याला त्रस्त करीत आहे.

● दूती सखीला सागते, या निर्दय नगरात, शरद् ऋतूंतल्या थंडगार रात्रीं, या अगतिक पथिकाला तुझ्याशिवाय कोण आश्रय देणार ! प्रियकराला ओसरीजवळच्या लाकडें व गवत ठेवतात त्या कोठींत लपवला आहे, तेथें विचारा कुडकुडत बसला आहे ग ! अशी दूतीची नायिकेला सूचना. गंगाधर सागतो, हे उद्गार स्वयंदूतीचे असून ती आपला आश्रय प्रवाशाजवळ प्रकट करीत आहे !

१. बंध. २. काष्ठाग्निना. ३. न नीयते, न खेद्यते.

७८ कमला : 78. Black & White.

भरिमो से गहिआहरधुअसीसपहोलिरालआउलिअम् ।
वअणं परिमलतरलिअभमरालिपइण्णकमलं व ॥७८॥

[ स्मरामस्तस्या गृहीताधरधुतशीर्षप्रघूर्णनशीलालकाकुलितम् ।
वदनं परिमलतरलितभ्रमरालिप्रकीर्णकमलमिव ॥ ]

मी तिचा अधर दांतांत धरला तेव्हां सुटण्यासाठीं ती मुख हलवूं लागली; यामुळें तिचे केस सैल झाले व ते तिच्या मुखावर ओघळले. सुवासानें चंचल झालेले भृंगे कमलाभोंवतीं जमावे, तसें तिचें मुख दिसूं लागलें. तेव्हांची आठवण अजून होते.

● अशी एकादी आठवण कशी जन्मभर जीवाला सलत राहते !

७९ पारोशीं : 79. Superiority.

हत्थफंलण्हाणपसाहिआणँ छणवासरे सवत्तीणम् ।
अज्जाएँ मज्जणाणाअरेण कहिअं व सोहग्गम् ॥७९॥

[ उत्साहतरलत्वस्नानप्रसाधितानां क्षणवासरे सपत्नीनाम् ।
आर्यया मज्जनानादरेण कथितमिव सौभाग्यम् ॥ ]

सणाच्या दिवशीं मोठ्या उत्साहानें उष्ण सुगंधी जलानें न्हाऊन व थाटमाट करून सवती सज्ज झाल्या. श्रेष्ठ पत्नीनें मात्र स्नानाबद्दल अनादर दाखवून आपलें सौभाग्य प्रकट केलें.

१. पहुण्णमासआ, पहोदमालआ. २. भिमरा, भमरा. ३. पह्म ४. हत्थप्फल, हत्थस्फल. ५. किंचिदुष्णसुगन्धिपवित्रजलस्नान, दारिद्र्यस्नान. ६. ईर्ष्यासुनया.

● अभिमानामुळें तिनें स्नानाबद्दल व प्रसाधनाबद्दल पूर्ण आणि प्रियकराबद्दल कृत्रिम अनादर दाखविला आणि आपलें सौभाग्य प्रकट केलें. तिच्या सवती मात्र न्हाल्यानंतर केस सडकतांना बाहुमूलें दाखवून प्रलोभनाच्या खटपटीला लागल्या. ही पत्नी श्रेष्ठ व आर्या होती आणि तिच्या सवती अनार्या होत्या असें कवीला सुचवावयाचें आहे कीं काय ? आर्या या शब्दाचा अर्थ पुत्रवती असाही आढळतो. या आढ्यतेमुळें तिनें अनादर दाखविला कीं काय ? देशी नाममालेंत (१.५०) अज्जा या शब्दाचे अर्थ असती व नववधू असेही दिलेले आहेत. नवऱ्याला प्रसन्न करावयाला नववधूला स्नान-प्रसाधनाची काय जरूर ? कीं ती असती असूनही आपलें सौभाग्य प्रकट करीत होती ? विव्वोक अलंकारः 'विव्वोकस्त्वतिगर्वेण वस्तुनीष्टेऽप्यनादरः'। साहित्यदर्पण.

## ८० जाळीच्या बांगड्या : 80. Blessed.

ह्णाणहलिद्दाभरिअन्तराइँ जालाइँ जालवलअस्स ।
सोहन्ति ! किलिञ्चिअकण्टएण कं काहिसी कअत्थम् ॥८०॥

[ स्नानहरिद्राभृतान्तराणि जालानि जालवलयस्य
शोधयन्ती क्षुद्रकण्टकेन[1] कं करिष्यसि कृतार्थम् ॥ ]

तूं न्हालीस तेव्हां तुझ्या अंगावरून ओघळलेली हरिद्रा तुझ्या बांगड्यांच्या जाळींत अडकून बसली. त्या बांगड्या तूं बारीक काड्यानें स्वच्छ करीत आहेस. सांग, तूं कोणाला धन्य करणार आहेस ?

● जालवलय या शब्दाचे अर्थ गंगाधरानें केशसंमार्जिनी व कङ्कण असे दिलेले आहेत. मी 'जाळीची बांगडी' असा अर्थ घेतलेला आहे. फणीच्या दात्यांत किंवा बांगडीच्या जाळींत अडकलेली हरिद्रा शोधण्याच्या निमित्तानें बाहुमूलाचें दर्शन देणाऱ्या उन्नतस्तनीला पाहून कोणा प्रेक्षकानें

[1] वंशकण्टकेन, काष्ठशलाकया.

हे अभिलाषोद्गार काढलेले आहेत. एक टीकाकार सांगतो की हें म्हणणें पुष्पवतीचें आहे; प्रेक्षक विचारतो, तूं कोणाला धन्य करणार आहेस ? की कोणालाही नाहींस ? गाथेंतील किलिञ्चिअ या देशी शब्दाच्या उपयोगावरून टीकाकार निष्कर्ष काढतात की या गाथेची नायिका स्वैरिणी आहे असें ध्वनित होत आहे. कोणाला धन्य करणार आहेस, या प्रश्नावरूनही हाच ध्वनि निघतो.

## ८१ प्रवास : 81. Stale.

अदंसणणे पेम्मं अवेइ, अइदंसणेण वि अवेइ ।
पिसुणजणजम्पिएण वि अवेइ, एमेअ वि अवेइ ॥८१॥

[ अदर्शनेन प्रेमापैत्यतिदर्शनेनाप्यपैति ।
पिशुनजनजल्पितेनाप्यपैत्येवमेवाप्यपैति ॥ ]

अदर्शनामुळे किंवा अतिदर्शनामुळें प्रेम नाहींसें होतें; त्याचप्रमाणें नीचाचे शब्द ऐकून किंवा अकारणही प्रेम नष्ट होतें.

● म्हणून म्हणतें, तुम्ही चार दिवस प्रवासाला जा, म्हणजे आपलें अवटरलेलें प्रेम पुन्हा टवटवीत होईल. पण फार दिवस परदेशीं राहूं नका हं !

## ८२ प्रेमनाश : 82. Lost Love.

अदंसणेण महिलाअणस्स, अइदंसणेण णीअस्स ।
मुक्खस्स पिसुणअणजम्पिएण, एमेअ वि खलस्स ॥८२॥

[ अदर्शनेन महिलाजनस्यातिदर्शनेन नीचस्य ।
मूर्खस्य पिशुनजनजल्पितेनैवमेवापि खलस्य ॥ ]

फार दिवस दर्शन झालें नाहीं तर स्त्रियांचें, फार दर्शन झालें तर नीचांचें, हलकटांच्या शब्दांमुळें मूर्खांचें व कांहीं कारण नसतां दुष्टांचें प्रेम नष्ट होतें.

● प्रियकराच्या संकल्पित प्रवासाचा निषेध. माझ्यावरलें तुमचें प्रेम नष्ट होणार नाहीं असा मला भरंवसा वाटतो; कारण तुमचें हृदय उदार, उदात्त व विवेकी आहे. सज्जनाचें प्रेम चिरंजीव असतें.

## ८३ काळवंडलेलें माणिक : 83. Dark Ruby.

पोट्टपडिएहिँ दुःखं अच्छिज्जइ उण्णएहिँ होऊण ।
इअ चिन्तेआणँ मण्णे थणाणँ कसणं मुहं जाअम् ॥८३॥

[ उदरपतिताभ्यां दुःखं स्थीयेत[३] उन्नताभ्यां भूत्वा ।
इति चिन्तयतोर्मन्ये स्तनयोः कृष्णं मुखं जातम् ॥ ]

( प्रणयाचा मान मिळत होता तोंवर ) स्तनाग्रें कशीं उंच ( व लालबुंद ) होतीं. ( गर्भधारणेमुळें ) आपणांला अवनत होऊन पोटावर पडून राहावें लागेल, या चिंतेमुळेंच जणूं स्तनांचीं मुखें काळवंडलीं आहेत.

● गर्भधारणेनंतर स्तनाग्रें कृष्णवर्ण होतात. एका छत्तीसगढी लोकगीतांत सांगितलें आहे कीं हें वर्णांतर सातव्या महिन्यांत होतें. (Folk Songs of Chhattisgarh : Verrier Elwin : p. 4.) गर्भावस्थेत असलेल्या बालकाचें प्रसूतीनंतर पोषण करण्याची जबाबदारी आपल्यावर आहे ही जाणीव असल्यामुळें जणूं अगोदरपासूनच त्यांचीं मुखें चिंतेनें काळवंडतात! किती तरी प्रसूतीनंतर आणि किती तरी काळानंतर त्यांना अवनतावस्था यावयाची असते. जणूं या भावी

१. चिंतताण. २. कसिणं. ३. आस्यते, स्थीयते.

परिस्थितीची आतापासूनच शरम वाटूं लागल्यामुळें त्याचीं मुखें काळवंडतात. हा झाला रसिकाच्या सौंदर्यदृष्टीचा कल्पनाविलास. जीवसृष्टीच्या दृष्टीनें मात्र हीच त्यांची कृतार्थता! तिचे स्तन शिथिल झाले व त्याचीं अग्रें कृष्णवर्ण झालीं तरीही तिची सर्व जबाबदारी तुझ्यावर आहे अशी दूतीची नायकाला सूचना.

## ८४ पत्नीदूती : 84. Messenger.

सो तुज्झ कँए सुन्दरि ! तह छीँणो सुमहिला हलिअउत्तो ।
जह से मच्छरिणीएँ वि दोच्चं जाआएँ पडिवण्णम् ॥८४॥

[ स तवकृते सुन्दरि तथा क्षीणः सुमहिलो हालिकपुत्रः ।
यथा तस्य मत्सरिण्यापि दौत्यं जायया प्रतिपन्नम् ॥ ]

सुंदरी, शेतकऱ्याचा मुलगा तुझ्यासाठीं झुरून इतका क्षीण झाला आहे कीं त्याची पत्नी सुंदर व मत्सरी आहे, तरी (त्याच्या जिवासाठीं) दूतीकर्म करावयास स्वतः सिद्ध झाली आहे !

● या गाथेंतील नायिका उच्चवर्णीय असावी असें दिसतें. दूतीची मलावण. केवळ तो शेतकरी आहे म्हणून त्याचा तिरस्कार करूं नको किंवा तो तुझ्या अनुरागाला लायक नाहीं असें मानूं नको. त्याच्या पत्नी-कडे पाहा आणि त्याच्यावर, निदान तिच्यासाठीं दया कर ! आता तूं त्याच्यावर कृपा केली नाहींस तर तुला पुरुषवधाचें व तिला वैधव्य आणल्याचें पातक लागेल ! त्याच्या पत्नीचें सौंदर्य पाहा, म्हणजे तो तुझ्या-वर अनुरक्त झाला हें तुझेंच सद्भाग्य आहे अशी तुझी खात्री पटेल. तो स्वतः हालिक, नांगऱ्या नाहीं, संपन्न जमीनदाराचा पुत्र आहे, असाही एका टीकाकारानें श्लेष काढला आहे !

१. तुह कएण. २. झीणो, खिण्णो, खीणो. ३. खिन्नः.

८५ दाक्षिण्य : 85. Taunt.

दक्खिण्णेण वि एन्तो सुहअ सुहावास अह्म हिअआइं ।
णिक्कइअवेण जाणं गओसि का णिव्वुदी ताणम् ॥८५॥

[ दाक्षिण्येनाप्यागच्छन्सुभग सुखयस्यस्माकं हृदयानि ।
निष्कैतवेन यासां गतोऽसि का निर्वृतिस्तासाम् ॥ ]

सुभग, केवळ दाक्षिण्य म्हणून तुम्ही माझ्याकडे येतां आणि त्यामुळेंही मला इतकें सुख होतें. मग ज्यांच्याकडे तुम्ही निष्कपटपणें जातां त्यांना किती आनंद होत असेल ?

● फार दिवसांनीं फिरकलेल्या पतीला पत्नीनें ऐकविलेले उपालम्भ-मिश्रित स्नेहोद्गार. बहुवल्लभाला जागोजाग हेंच ऐकावें लागतें.

८६ अयाईऽ ! 86. Slap.

एक्कं पहरुव्विण्णं हत्थं मुहमारुएण वीअन्तो ।
सो वि हसन्तीऍ मए गहिओ बीएण कण्ठम्मि ॥८६॥

[ एकं प्रहारोद्विग्नं हस्तं मुखमारुतेन वीजयन् ।
सोऽपि हसन्त्या मया गृहीतो द्वितीयेन कण्ठे ॥ ]

मीं त्यांना एक चापट मारली तर माझ्या हाताला कोण झिण-झिण्या आल्या ! तेव्हां माझा दुखता हात हातीं घेऊन ते त्यावर फुंकर घालूं लागले. मग मीही हंसत हंसत तो हात एका हातानें धरून ठेवला व दुसरा हात त्यांच्या गळ्यांत घातला.

१. णिव्वुई, णिव्वुई. २. पहरुप्पुअं, पहरपधाम. ३. प्रहारपतं, प्रहारोद्धातं.

● स्वाधीनभर्तृकेचें सौभाग्यकथन. असा मार कोणाकोणाला मिळत असेल, कोण जाणे ? ज्याचें भाग्य व भोग्य, त्याचें त्यालाच ठाऊक ! आणि तो फारसा लागतही नाहीं ! असें सांगतात !

## ८७ सन्मुख : 87. Inclination.

अवलम्बिअमाणपरम्मुहीएँ एन्तस्स माणिणि ! पिअस्स ।
पुट्ठेपुलउग्गमो तुह कहेइ संमुहट्ठिअं हिअअम् ॥८७॥
[ अवलम्बितमानपराङ्मुख्या आगच्छतो मानिनि प्रियस्य ।
पृष्ठपुलकोद्गमस्तव कथयति संमुखस्थितं हृदयम् ॥ ]

मानिनी, तुझा प्रियकर अनुनयासाठीं आला आहे व तूं रुसवा धरून त्याला विन्मुख होऊन बसली आहेस; पण तुझ्या पाठीवर उमललेल्या रोमांचावरून दिसतें कीं तुझें हृदय मात्र त्याजकडे सन्मुख आहे.

● अधीरा नायिका. प्रियकराची चाहूल लागताच ती मुख फिरवून बसली; पण त्याच्या नेत्रांतून ओसंडणाऱ्या प्रीतीमुळें तिच्या पाठीवर पुलकांचा उद्भव झाला. यावरून तिच्या पाठराखणी सखीला समजलें कीं ती प्रियकराला शरीरानें पराङ्मुख असली तरी हृदयानें ती त्याला सन्मुख आहे. सखी सांगते, पुष्कळ झालें, आतां हा लटका मान सोडून दे.

## ८८ विनय : 88. Modesty.

जाणइ जाणावेउं अणुणअविद्दविअमाणपरिसेसम् ।
अइरिक्कँम्मि वि विणआवलम्बणं साहिअ कुणन्ती ॥८८॥

१. पुट्ठि. २. सम्मुहट्ठिअं, ठिअं. ३. विरविर, विद्दुवीप, विद्दाणपोल. ४. पइरिक्क म्मिअ, रह विक्कम्मि.

[ जानाति ज्ञापयितुमनुनयविद्रावितमानपरिशेषम्।
विजनेऽपि विनयावलम्बनं सैव कुर्वती ॥ ]

खरोखर, पतीनें मनधरणी केल्यानंतर मन द्रवलें तरीही शिल्लक[१] राहिलेला मान एकान्तांतही केवळ विनयानें कसा व्यक्त करावयाचा हें[२] तीच जाणते.

● मानधारणाचें शिक्षण, गूढ मानधारिणी, उदात्ता नायिका. या गाथेंतील भावना फार सूक्ष्म आहेत. मनधरणीनंतरही मान शिल्लक राहतोच; अपराधाबद्दल शिक्षा भोगली किंवा क्षमा मिळविली तरीही जिच्याविरुद्ध आपण अपराध केला तिच्या अंतःकरणात आपल्या अपराधाची स्मृति राहतेच; त्याप्रमाणें मान राहिला आहे हे व्यक्त करावयाचें नाहीं आणि मान सर्वस्वीं सोडला आहे हेंही दिसू द्यावयाचें नाहीं, अशी बाह्यतः औपचारिक व अंतर्यामीं सहृदय सहानुभूतीची संकीर्ण वृत्ति या गाथेंत आहे; राग व अनुराग, स्मित व उपहास याचें बहारदार संमिश्रण.

## ८९ गोरज : 89. Excuse.

मुहमारुएण तं कह्णु ! गोरअं राहिआएँ अवणेन्तो ।
एताणँ वल्लवीणं अण्णाण वि गोरअं हरसि ॥८९॥

[ मुखमारुतेन त्वं कृष्ण गोरजो राधिकाया अपनयन्।
एतासां वल्लवीनामन्यासामपि गौरवं हरसि ॥ ]

कृष्णा, संध्याकाळीं परतणाऱ्या गाईंच्या पावलांमुळें उडालेले धुळीचे कण राधेच्या डोळ्यात गेले. ते गोरज काढण्यासाठीं तूं तिच्या डोळ्यांत फुंकर घालतोस आणि गवळणींचा व इतर स्त्रियांचाही गौरव व गौरता हरण करतोस.

१. अतिरिक्तमेव, २. सत्यं.

● कृष्णाची चाहूल लागताच डोळ्यात गोरज गेल्याचें निमित्त करून राधा डोळा चोळूं लागली. कृष्ण पाळतीवर होताच. डोळ्यात फुंकर घालण्याच्या निमित्तानें त्यानें तिचें मुख जरा तिरपें करून आणि स्वतःचें मुख जरा ओणवें करून तिचें चुंबन घेतलें. निमित्त खरें होतें की खोटें, राम जाणे–पण तिला काय हवें होतें तें कृष्णानें मान जाणलें. हें इतर गोपींनीं पाहिलें. त्याच्या देखत झालेल्या या प्रकारामुळें त्याचा सौंदर्याभिमान दुखावला गेला आणि त्या काळवंडल्या. गोरज, गौरव व गौरवर्ण याना प्राकृतात गोरअम् हा एकच शब्द असून त्याच्या श्लेषावर या गाथेंत चमत्कृति निर्माण केली आहे. कृष्णानें इतर गोपींचा अपमान केला आणि जणू त्याना कृष्णरूप देऊन त्याचा गौरव केला! बहुवल्लभ नायक एकीवरच अनुरक्त असलेला पाहून अन्येनें कृष्णाच्या निमित्तानें काढलेले उद्गार.

## ९० निर्लज्ज : 90. Shameless.

किं दाव कआ अहवा करेसि कारिस्सि सुहअ ! एत्ताहे ।
अवराहाणँ अलज्जिर ! साहसु कअए खमिज्जन्तु ॥९०॥

[ किं तावत्कृता अथवा करोषि करिष्यसि सुभगेदानीम् ।
अपराधानामलज्जाशील कथय कतरे क्षम्यन्ताम् ॥ ]

निर्लज्जा, साग, मी तुला आतां कसली क्षमा करूं ! केलेल्या अपराधाची, कीं करीत आहेस त्यांची, किंवा करणार आहेस त्या अपराधांची !

● खण्डिता नायिका, बहुवल्लभ नायक. तो तिची मनधरणी करीत होता. त्याचा काही अपराध नुक्ताच तिच्या निदर्शनाला आला होता. तो म्हणाला, प्रिये, क्षमा कर. ती उसळून विचारते, निर्लज्जा, क्षमा कोण-

१. काहिसि. २. कहेसु. ३. करिष्यसि वा सुभग एतावत्काले.

कोणत्या अपराधाची करूं ! निषेधांतही अनुराग अधुकपणें व्यक्त झालेला आहे. आजवर अनेक वेळा तुझ्या अपराधांची मी तुला क्षमा नाहीं का केली ! म्हणूनच आपला स्नेह कायम राहिला. तूं माझा अंत कोठवर पाहणार ! बहुवल्लभ असल्यामुळें नायकाला सुभग म्हटलेलें आहे. होय, जे असे सुभग *असतात ते निर्लज्जही असतातच ! किंवा त्याना लज्जा सोडावी लागते.*

## ९१ मालक : 91. My Lord.

**णूमेन्ति जे पहुत्तं कुविअं दासो व्व जे पसाअन्ति ।**
**ते व्विअ महिलाणँ पिआ, सेसा सामि व्विअ वराआ ॥९१॥**

**[ गोपायन्ति ये प्रभुत्वं कुपितां दासा इव ये प्रसादयन्ति ।**
**त एव महिलानां प्रियाः शेषाः स्वामिन एव वराकाः ॥ ]**

रागावलेल्या स्त्रियांचा अनुनय करतांना जे त्यांच्यावरील आपलें प्रभुत्व प्रकट करीत नाहींत, उलट दासाप्रमाणें त्याची मनधरणी करतात, तेच त्यांना प्रिय असतात. बाकीचे बिचारे नुसते नांवाचे मालक !

● दुर्विदग्ध नायकाला दूतीनें केलेला अनुनयाचा उपदेश. दण्डप्रयोगानें *प्रभुत्वाला मान्यता मिळेल, पण प्रेम निर्माण होणार नाहीं किंवा प्रासही* होणार नाहीं. प्रियकर हृदय नाचवतो आणि मालक फार तर देहावर सत्ता गाजवतो. प्रेम ही लूट नाहीं, प्रेम हा प्रसाद आहे. सरस्वतीकण्ठाभरणात ' दूमेंति जे मुहुत्तं '—' दूनयन्ति ये मुहूर्तम् ' असा पाठ दिला आहे : " जे *महिलाना क्षणभर चिडवतात आणि नंतर दासाप्रमाणें त्याची सेवा* करून त्याना प्रसन्न करून घेतात तेच त्याना प्रिय असतात. " समानार्थी

१. नभुर्गम्ति, गूसंति, दूमेंति, णूयेन्ति. २. मुहुत्तं, पहुत्थं. ३. दामव्व. ४. न कुर्वन्ति, नमन्ति.

सुभाषित पहा : " आश्लिष्टा रभसाद्विलीयत इवाक्रान्ताऽप्यनङ्गेन या, यस्याः कृत्रिमचण्डवस्तुकरणाकूतेषु खिन्नं मनः। कोऽयं काऽहमिति प्रवृत्तसुरता जानाति या नान्तरं, रन्तुः सा रमणी स एव रमणः शेषौ तु जायापती ॥" अमरुक : सुभाषितावली.

## ९२ मालती : 92. Pregnant.

तइआ कअग्ध महुअर ! ण रमसि अण्णासु पुप्फजाईसु ।
बद्धफलभारगुरुइं मालइं एह्णिं परिचअसि ॥९२॥

[ तदा कृतार्घ मधुकर न रमसेऽन्यासु पुष्पजातिषु ।
*बद्धफलभारगुर्वीं मालतीमिदानीं परित्यजसि ॥* ]

मधुकर, तू पूर्वी फक्त मालतीचें पूजन करीत होतास व दुसऱ्या कोणत्याही जातीच्या पुष्पामध्यें रमत नव्हतास; पण आता मालतीनें फल धारण केलेलें पाहून तू तिचा त्याग केलास.

● उदासीन नायकाप्रत दूतीचे निषेधोद्गार. किंवा, गर्भधारणेमुळें आता ती उपभोगाला योग्य नाहीं, विपरीतरताला अक्षम आहे, अशी भ्रमराच्या निमित्तानें दूतीची सूचना. फुलें होतीं तोंवर मकरन्द होता आणि त्याभोंवतीं त्याच्या लोभानें भ्रमर घोंगावत होता. आता फलधारणामुळें फुलें नाहींत व मकरन्दही नाहीं. म्हणून भ्रमरानें तिचा त्याग केला. कृतघ्न!

## ९३ नाहीं मनिंची हौस फिटली : 63. Thirsty.

अविअह्लपेक्खणिज्जेण तक्खणं मामि ! तेण दिट्ठेण ।
सिविणअपीएण व पाणिएण तण्ह च्चिअ ण फिट्टा ॥९३॥

१. विअण्ण, विअण्ह. २. दृश्य, दृश्य. ३. पेच्छिअण.

[अवितृष्णप्रेक्षणीयेन तत्क्षणं मातुलानि तेन दृष्टेन।
स्वप्नपीतेनेव पानीयेन तृष्णैव न भ्रेष्टा॥]

मामी, मी त्याच्याकडे क्षणभरच सतृष्ण नजरेनें रोंखून पाहिलें. स्वप्नांत पाणी प्याल्यानें तहान मिटत नाहीं तसें झालें व मी अतृप्तच राहिलें.

● मामीनें अगोदरच त्याची भलावण केली होती. तेवढ्यावरून नायिका त्याच्यावर अनुरक्त झाली होती. त्याचें प्रत्यक्ष दर्शन झालें तेव्हां तिनें केलेलें वर्णन त्याच्या गुणाच्या पासंगालाही पुरेसें नाहीं, असें नायिकेच्या प्रत्ययाला आलें. मामीनें त्याचा संकेत ठरवून दिला व नंतर त्याची भेट झाली. नंतर मामीनें विचारलें, कसें काय जमलें? नायिका उद्वेगानें सांगते, मला दृष्टिसुख मुद्दा पुरेसें मिळालें नाहीं! स्वप्नांतला घोट, ओंठही ओला झाला नाहीं, मग तहान कशी फिटणार!

## ९४ देशालंकार : 94. Desolate.

सुअणो जं देसमलंकरेइ, तं चिअ करेइ पवसन्तो।
गामासण्णुम्मूलिअमहावडट्ठाणसारिच्छम्॥९४॥

[सुजनो यं देशमलंकरोति तमेव करोति प्रवसन्।
ग्रामासन्नोन्मूलितमहावटस्थानसदृशम्॥]

आपल्या निवासानें सुजन देशाला अलंकृत करतात. त्यानीं त्यागलेला देश उदासवाणा दिसतो. आमच्या गांवाच्या शिंवेवरला मोठा वड, (जणू गांवाचा अलंकार, तो होता;) उन्मळून पडल्यामुळें आतां पार कसा उजाड दिसत आहे.

● महावडाजवळ भेट ठरली होती, कारण तेथें पारंब्याच्या आसऱ्याला दिवसाही अंधःकार असे. तो वृक्ष झंझावातात कोसळल्यामुळें संकेतस्थानांत

---

१. अतुलितेन. २. नापगता, नष्टा. ३. भासण्णुम्मूलिअ.

बदल झाल्याची सूचना; किंवा, वडाजवळ तुझी बराच वेळ वाट पाहून प्रियकर परत गेल्याची सूचना. सुजनांच्या देशांतरामुळें प्रजा दुःखित होते, त्याचप्रमाणें वड पडल्यामुळें स्वैरिणी दुःखित झाल्या.

## ९५ आठवण : 95. Remembrance.

सो णाम संभरिज्जइ पब्भसिओ जो खणं पि हिअआहि।
संभरिअव्वं च कअं गअं, च पेम्मं णिरालम्बम् ॥९५॥

[ स नाम संस्मर्यते प्रभ्रष्टो यः क्षणमपि हृदयात्।
स्मर्तव्यं च कृतं गतं च प्रेम निरालम्बम् ॥ ]

क्षणभरच कां होईना, जें हृदयांतून नष्ट होतें त्याचीच आठवण करावी लागते; आणि ज्याची आठवण करावी लागते तें प्रेम अगोदरच निराधार झालेलें असतें.

● आमची आठवण राहील ना ? प्रियकरानें परत जातांना विचारलें. या प्रश्नाला प्रेयसीचें उत्तर जें निराधार तें नष्ट व्हावयास फारसा वेळ लागत नाहीं. मन्दस्नेह, विरलदर्शन किंवा भविष्यत्विक नायकाप्रत अनुरागकथन.

## ९६ कांटेरी कुंपण : 96. Barbed Fencing.

णासं व सा कवोले अज्ज वि तुह दन्तमण्डलं बाला।
उब्भिण्णपुलअवइवेढपरिगअं रक्खइ वराई ॥९६॥

[ न्यासमिव सा कपोलेऽद्यापि तव दन्तमण्डलं बाला।
उद्भिन्नपुलकवृतिवेष्टपरिगतं रक्षति वराकी ॥ ]

१. स्मरणीयं, संस्मर्तव्यं, संस्मार्यं. २. वेढ, वेट. ३. वेष्टन.

तूं वालेच्या गालावर दन्तव्रणांचें मण्डल उमटविलेस. आपल्याकडे जणूं ही ठेव ठेवलेली आहे ह्या भावनेनें बिचारी त्याभोंवतीं रोमांचांचें कुंपण उभें करून त्यांचें अजून रक्षण करीत आहे.

● ती दन्तमण्डलाचें रक्षण करीत आहे, कारण तुझी ही ठेव परत मागण्यासाठीं तूं येशील अशी तिला आशा व भरंवसा वाटत आहे. तिला तुझी आठवण होते तेव्हा तिच्या गालावर रोमाञ्च उभे राहतात आणि तुझी आठवण हृदयात सारखी स्फुरत असल्यामुळें रोमाञ्चही सदैव फुललेले असतात. ती बालिका मुग्ध व निष्कपट आहे; तिला पुरुषाच्या चारित्र्याचा अनुभव नाहीं. बिचारी ! कारण आपण फसलों आहोंत याची तिला दादही नाहीं; आणि, शठा, तूं मात्र तिला गुंतवून अन्यत्र भटकत आहेस. मन्दस्नेह, विरलदर्शन नायकाला अनुकूल करून घेण्यासाठीं दूतीचे उद्गार.

## ९७ कोण कोणाचा ? — 97. Forlorn.

दिट्ठा चूआ[1], अग्घाइआ सुरा, दक्खिणाणिलो सहिओ।
कज्जाइं व्विअ गरुआइं, मामि[2] ! को वल्लहो कस्स ? ॥९७॥

[ दृष्टाश्चूता[3] आघ्राता सुरा दक्षिणानिलः सोढः।
कार्याण्येव गुरुकाणि मातुलानि[4] को वल्लभः कस्य ॥ ]

मामी–( मन्मथाचा उन्माद यावा म्हणून ) मी आम्राङ्कुरांचें दर्शन व मद्याचा आस्वाद घेतला आणि मलयानिलाची झुळूक अंगावर घेऊन मी सज्ज झालें ( पण पति प्रवासाहून परत आले नाहींत ). माझ्यापेक्षा त्याना आपल्या कामांचेंच महत्त्व अधिक वाटतें. ( एवढी निराशा झाली तरी मी जगलें.) कोण कोणाचा प्रियकर ? ( आणि कोण कोणाची प्रिया ? )

---

१. सुआ. २. यामि. ३. चूता. ४. भगिनी.

● तुझा वल्लभ लवकरच परत येईल, असें आश्वासन देणाऱ्या मामीला उद्देशून नायिकेनें काढलेले उद्वेगोद्गार; किंवा स्वनायकाबद्दल वैराग्य प्रकट करणारे स्वयंदूती प्रोषितभर्तृकेचे उद्गार. प्रवासात असलेल्या पतीनें काय आम्राङ्कुर पाहिले नसतील ? कीं आम्रवनात फेरी टाकली नसेल ? कीं मद्याचा आस्वाद घेतला नसेल ? काय वसंतागम त्याना जाणवला नसेल ? ते माझ्यावर अनुरक्त असते तर अशा दिवसात हजार कामें सोडून घरीं आले नसते काय ? खात्रीनें, ते दुसरीकडे रमले असतील आणि सुखासाठीं हेंच करीत असतील; हींच त्यांचीं महत्त्वाचीं कामें ! मग मीं तरी पातिव्रत्य का सांभाळावें ? मलयानिलाची झुळूक वाहूं लागली कीं स्त्री-पुरुषाना कसलेंही भान राहत नाहीं, हेंच खरें.

## ९८ पहिलें पाऊल

98. First Step.

रमिऊण पअं पि गओ जाहे उवऊहिउं पडिणिउत्तो ।
अहअं पउत्थपइआ व्व तक्खणं सो पवासि व्व ॥९८॥
[ रन्त्वा पदमपि गतो यदोपगूहितुं प्रतिनिवृत्तः ।
अहं प्रोषितपतिकेव तत्क्षणं स प्रवासीव ॥ ]

रममाण झाल्यानंतर ( ते प्रवासाला निघाले ), एक पाऊल गेले न गेले तोंच मला आलिंगन देण्यासाठीं ते परत आले; आणि मध्यंतरींच्या त्या एकाच क्षणीं मीं विरहिणी झालें व ते प्रवासी झाले.

● स्वाधीनभर्तृकेचे उद्गार. एका क्षणात आमची अशी अवस्था झाली. मग ते खरोखरीच लांबच्या प्रवासाला गेले तर काय दशा होईल ? पतीनें अधूनमधून प्रवासाला जात असावें आणि पत्नीनें मान धारण करावा, त्याशिवाय प्रेमविलासाना रंग भरत नाहीं, असें सांगणाऱ्या सखीला नायिकेचें उत्तर.

१. पअं पि ण गओ. २. अवऊहिउं पडिणिअत्तो. ३. पउत्थवइअ व्व. ४. रमित्वा, रमयित्वा. ५. प्रतिनिवर्तमानः ६. अथाहं.

## ९९ पूर्वपुण्याई : 99 Accumulated Merit.

अविइंण्हपेच्छणिज्जं समसुहदुःखं विइण्णसब्भावम् ।
अण्णोण्णहिअअलग्गं पुण्णेहिँ जणो जॅण लहइ ॥९९॥

[ अवितृष्णप्रेक्षणीय समसुखदुःख वितीर्णसद्भावम् ।
अन्योन्यहृदयलग्न पुण्यैर्जनो जनं लभते ॥ ]

ज्याच्याकडे कितीही वेळ पाहत राहिलें तरी तृप्ति होत नाहीं, जो आपल्या सुखदुःखात सहभागी असतो, सद्भावना प्रकट करतो व हृदयाशीं एकरूप होतो असा पुरुष पूर्वपुण्याईमुळेंच प्राप्त होतो.

● मन्दस्नेही पतीला अनुकूल करण्यासाठीं पतिव्रतेचे उद्गार. पतीबद्दल वैराग्य व उपपतीवर प्रीति असणारी कुलटाही असेंच म्हणेल. *प्रियकराच्या किंवा प्रियेच्या प्राप्तीचाही पूर्वपुण्याईशीं संबंध असतो तर !*

## १०० संवेदना : 100. Pain & Pleasure.

दुःखं देन्तो वि सुहं जणेइ जो जस्स वल्लहो होइ
दइअणहदूणिआणं वि वड्ढइ थणाणॅ रोमञ्चो ॥१००॥

[ दुःख ददद‍पि सुखं जनयति यो यस्य वल्लभो भवति ।
दयितनखदूनयोरपि वर्धते स्तनयो रोमाञ्चः ॥ ]

---

१. अविअण्ह, अविण्ह. २. दुक्खसुहम्. ३. अणुण्ण. ४ देत्तो, देतो, दिंतो. ५. सरस्वतीकण्ठाभरणातील व साहित्यमीमांसेंतील पाठः जो जस्स हिअअदइओ दुक्ख देन्तो वि सा सुहं दइ. ६. दुम्मिआण, दूमिआणं. ७. वट्टइ, वड्ढइ, वड्ढर. ८. थणआण, थणयाण ९. दुर्मनस्कयोरपि, दुःखितयोरपि. १०, वर्तते.

जो जिचा वल्लभ त्यानें तिला ( वाह्यत ) दु ख दिलें तरी त्यामुळें तिला ( अतर्यामीं ) सुखच वाटतें. प्रियकराच्या नखाचे व्रण उमटले तरी प्रियेच्या स्तनावर रोमाचच उमलतात.

● नायिकेच्या अत करणाचा ठाव घेऊ पाहणारी दूती विचारते, तो तुला एवढें दु ख देतो, तरी त्याच्यावर तुझें इतकें प्रेम कसें ? या प्रश्नाला पतिव्रतेचें उत्तर जो जिचा प्रियकर त्यानें तिला दु ख दिलें तरी त्यापासून प्रेयसीला सुखच होतें, किंबहुना थोड्याबहुत दु खावाचून सुख समवतच नाहीं कामशास्त्राचा हा सिद्धान्त अनादिसिद्ध व अबाधित आहे क्षत तामस, प्रेम राजस आणि रोमाञ्च सात्त्विक, या तिघाचा सयोग हीच सौख्याची परिसीमा !



रसिअजणहिअअइए कवइच्छलपमुहसुकइणिम्मविए ।
सत्तसअम्मि समत्त पढम गाहासअ एअ ॥

[ रसिक जनहृदयदयिते कविवत्सलप्रमुखसुकविनिर्मिते ।
सप्तशतके समाप्त प्रथम गाथाशतकमेतत् ॥ ]



# द्वितीयं शतकम्

## १०१ अनुपान : 101 Prescription.

घरिओ घरिओ विअलइ उअएसो पिहसहीहिँ दिज्जन्तो ।
मअरद्धअबाणपहारजज्जरे तीअ हिअअम्मि ॥१॥

[ धृतो धृतो विगलत्युपदेशः प्रियसखीभिर्दीयमानः ।
मकरध्वजबाणप्रहारजर्जरे तस्या हृदये ॥ ]

मधून मधून प्रियकरावर रुसत जा, असा प्रिय सख्यांनीं वारंवार दिलेला उपदेश ऐकून तिनें मान धारण केलाच तर प्रियकराचें दर्शन होतांच मकरध्वजाच्या बाणांच्या प्रहारांनीं जर्जर झाल्यामुळें तो तिच्या ध्यानांतच राहत नाहीं.

● प्रियकरानें वारंवार आपला अनुनय करावा अशी स्त्रियाना इच्छा व अपेक्षा असते. प्रेमविवाह झालेला असल्यास विवाहापूर्वी केलेला अनुनय फलद्रूप झालेला असल्यामुळें आणि साधा विवाह झालेला असल्यास संसारातील अडचणींत गुरफटल्यामुळें, किंवा काहीं अन्य कारणामुळें पतीला ही अपेक्षा उमजत नाहीं किंवा पुरी करता येत नाहीं. ही आपली उपेक्षा, असें स्त्रियाना वाटतें. यामुळें पतिपत्नींच्या प्रेमात, कधीं बाह्यतः तर कधीं अंतर्यामींही, अंतर पडतें. कोमेजलेल्या प्रेमाला टवटवी आणण्यासाठीं कृत्रिम उपाय योजावे लागतात. रुसवा हा असाच एक प्रकार आहे; कधीं तो स्त्रियांच्या मनाच्या बांधणींत असतो, तर कधीं तो अपेक्षा-भंगाच्या पोटीं जन्माला येतो. नायिका सागते, आमचें प्रेम इतकें उज्ज्वल आहे कीं तें फुलविण्यासाठीं कृत्रिम उपायाची जरूरच भासत नाहीं; रुसण्याचा विचारच माझ्या मनात येत नाहीं आणि कोणी भरवून दिलाच

१. उवएसो. २. तीएॅ.

तर प्रियकराचें दर्शन होतांच ओढून ताणून धारण केलेला मान आपोआप व एकाएकीं गळून पडतो; अनुनयाची इच्छा-अपेक्षा याचें मानच राहत नाहीं.

## १०२ पूर : 102 Flood.

तडसंठिअणीडेक्कन्तपीलुआरक्खणेक्कदिण्णमणा ।[1]
अगणिअविणिवाअभआ पूरेण समं वहइ काई ॥२॥

[ तटसंस्थितनीडैकान्तशावकरक्षणैकदत्तमनाः ।
अगणितविनिपातभया पूरेण समं वहति काकी ॥ ]

पूर आलेल्या नदीच्या तीरावरील झाडावरल्या घरट्यांत आपल्या पिलांचें रक्षण कसें होईल या विचारानें वृत्ति एकाग्र झाल्यामुळें स्वनाशाची पर्वा न करणारी एकाकी कावळी पुराबरोबर वाहून गेली.

● संकेतस्थानभंगाची सूचना; किंवा नदीला पूर आला होता तरी संकेताप्रमाणें मी झाडाखालीं नायकाची वाट पाहत बसलें होतें, पण तो आलाच नाहीं अशी नायिकेची दूतीजवळ तक्रार. पुरुषापेक्षा स्त्रियांचें प्रेम दृढ असतें, अशी सूचना.

## १०३ निमित्त : 103 Arbour.

बहुपुप्फभरोणामिअभूमीगअसाह सुणसु विण्णत्तिम् ।
गोलातडविअडकुडङ्ग महुअ ! सणिअं गलिज्जासु ॥३॥

[ बहुपुष्पभरावनामितभूमीगतशाख शृणु विज्ञप्तिम् ।
गोदातटविकटनिकुञ्जमधूक शनैर्गलिष्यसि ॥ ]

१. पंलुह, हिम्म.

मधूक वृक्षा, गोदातीरावरील गर्द राईत तुझ्या फांद्या फुलांच्या भारानें जमिनीपर्यंत लवल्या आहेत. माझी विनंति ऐक, तूं आपलीं फुलें अगदीं हळू हळू ढाळ.

● म्हणजे तीं वेंचावयास खूप वेळ लागतो या निमित्तानें माझें अभिसरण पूर्ण होईल. स्वैरिणी नायिका. मोहाचीं फुलें वेंचण्यासाठीं मी नदीतीरीं जाणार आहे, मला खूप सवड आहे, अशी सूचना. मोहाची निशा आणि गोदेचें सान्निध्य !

## १०४ बहराची अखेर : 104 Last Blossoms.

णिप्पच्छिमाइँ असई दुःखालोआइँ महुअपुप्फाइँ ।
चीए बन्धुस्स व अट्ठिआइँ रुअई समुच्चिणइ ॥४॥

[ निष्पश्चिमान्यसती दुःखालोकानि मधूकपुष्पाणि ।
चितायां बन्धोरिवास्थीनि रोदनशीला समुच्चिनोति ॥ ]

मधूकपुष्पांचा हंगाम संपत आल्यामुळें असतीचें अंतःकरण व्यथित झालें आणि ती अश्रु ढाळीत उरलीं सुरलीं फुलें वेंचूं लागली. हें पाहतांना वाटतें कीं जणूं ती आपल्या बांधवांच्या अस्थीच गोळा करीत आहे.

● मधुकाचा बहर संपला आणि स्वैरिणीला मुतक आलें. आता दिवसाउजेडीं नदीकाठच्या झाडींत रेंगाळण्याला सबब राहिली नाहीं व सोइस्कर असें संकेतस्थानही नष्ट झालें.

१. महुअउप्फाइं. २. बंधुअस्स. ३. रुइरी.

## १०५ ओंडका : 105. Drifting Log.

ओ हिअअ मडहसरिआजलरअहीरन्तदीहदारु व्व [1] ।
ठाणे ठाणे व्विअ लग्गमाण केणावि डज्झिहसि ॥५॥

[ हे हृदय स्वल्पसरिज्जलरयन्ह्रियमाणदीर्घदारुवत् [2] ।
स्थाने स्थाने एव लगत्केनापि धक्ष्यसे [3] ॥ ]

थोडें पाणी असलेल्या पण वेगानें धांवणाऱ्या ओढ्यांतून मोठा ओंडका अडखळत वाहत जातो, कोठें कोठें अडकतो व शेवटीं कोणी तरी तो ओढून घेऊन जाळतो. माझें अस्थिर हृदय असेंच वाहवत चाललें आहे. हृदया, तुलाही कोणी तरी असेंच दग्ध करील.

● पाणी उथळ व त्याला खळखळ, म्हणून ओंडका अडखळत वाहत आहे. त्याची मूळची वृत्ति स्थिर, पण प्रवाहपतित झाल्यामुळें त्याचा इलाज चालत नाहीं. त्या वाहत्या ओंडक्याला सुद्धा किनारा जागोजाग आश्रय देतो. डोहाचा आधार मिळाला की तो स्थिर होईल. माझें हृदय अस्थिर आहे, हें खरें, पण म्हणून मी वृत्तीनें अधम आहे असें मात्र नाहीं. माझ्यावर थोडा तरी विश्वास ठेव व अनुभव पहा; मी त्या ओंडक्याइतका नीरस खासच नाहीं. तुझें हृदय विशाल आहे. तेथें मला आश्रय दे, अशी नायकाची विनवणी.

## १०६ अधरराग : 106. Lip-Stick.

जो तीएँ अहरराओ रत्तिं उव्वासिओ पिअअमेण ।
सो व्विअ दीसइ गोसे सवत्तिणअणेसु संकन्तो ॥६॥

---

१. शुष्कदारु. २. क्षुद्रनदी, इत्या. ३. भक्षसे.

[ यस्तस्या अधररागो रात्रावुद्वासितः प्रियतमेन ।
स एव दृश्यते प्रातः सपत्नीनयनेषु संक्रान्तः ॥

तिने ओंठाना लावलेला ( लाल ) रंग रात्रीं प्रियकरानें आपल्या ओठांनीं पुसून घेतला. सकाळीं ( हें दिसलें तेव्हां ) जणूं तोच रंग तिच्या सवतींच्या नेत्रांचे ठिकाणीं प्रकट झाला.

● सवतींच्या अंतःकरणात ईर्ष्या आहे. त्या अतृप्त व सुसाध्य आहेत, असा दूतीचा अभिप्राय. परिवृत्ति अलंकारः ' व्यत्ययो वस्तुना यस्तु यो वा विनिमयो मिथः । परिवृत्तिः ': सरस्वतीकण्ठाभरण.

## १०७ अपेक्षा : 107. Helping Hand.

गोलाअडट्ठिअं पेच्छिऊण गहवइसुअं हलिअसोण्हा ।
आढत्ता[1] उत्तरिउं[3] दुःखुत्ताराएँ[2] पअवीए ॥७॥

[ गोदावरीतटास्थितं प्रेक्ष्य गृहपतिसुतं हलिकस्नुषा ।
आरब्धा[4] उत्तरीतुं दुःखोत्तारया पदव्या ॥ ]

घरधन्याचा मुलगा गोदावरीच्या तीरावर उभा असलेला पाहून शेतकऱ्याची सून मुद्दाम अवघड वाटेनें नदी उतरूं लागली.

● आपली अडचण ओळखून त्यानें आधारासाठीं हात द्यावा म्हणून. कांहीं साधावयाचें असलें म्हणजे बायकाना अडाणीपणाचें ढोंग सहज साधतें. ' *हस्तावलंबदानेन भावयोरङ्गसंगमः ।* ' तो तिचा पति होता कीं प्रियकर ! कीं ती अगर तिचा नवरा कामाला होतीं त्या घरधन्याचा मुलगा ? गंगाधर सांगतो, तो तिचा पति होता. मग त्याचा उल्लेख असा तिऱ्हाइतासारखा का ? भाव अलंकार : ' अभिप्रायानुकूल्येन प्रवृत्तिर्भाव उच्यते । ': सरस्वती-कण्ठाभरण.

---

१. आरद्धा, आढत्ता. २. दुक्खुत्ताराइ. ३. अवतरितुं, उत्तर्तुं. ४. प्रारब्धा.

## १०८ केशाकर्षण : 108. At the Feet of the Mistress.

चलणोआसणिसण्णस्स तस्स भरिमो अणालवन्तस्स ।
पाअङ्गुट्ठावेट्टिअकेसदिढाअड्ढणसुहेल्लिम् ॥८॥

[ चरणावकाशनिषण्णस्य तस्य स्मरामोऽनालपतः ।
पादाङ्गुष्ठावेष्टितकेशदृढाकर्षणसुखम् ॥ ]

माझा राग शांत करण्यासाठीं तो माझ्या पायांजवळ गुपचुप पडला होता आणि त्याचे केस पायाच्या अंगुष्ठाला गुंडाळून मी ओढीत होतें. यांतच त्याला सुख वाटत होतें. त्याची अजून मला आठवण होते.

● काळ बदलला. आता हें सुख किंवा दुःख अप्राप्य झालें आहे. विलास रिवाजाशीं समान्तर असतात. नवरा माझ्या इतका आधीन आहे, तरी मी तुझ्यावर अनुरक्त आहे, हें तुझें भाग्य. माझा अनुनय तूंही तशाच लीनतेनें केला पाहिजेस, अशी स्वैरिणीची नायकाला सूचना.

## १०९ अस्वल : 109. Bear.

फाॅलेइ अच्छभल्लं व उअइ कुग्गामदेउलद्दारे ।
हेमन्तआलपहिओ विज्झाअन्तं पलालग्गिम् ॥९॥

[ पाटयत्यच्छभल्लमिव पश्यत कुग्रामदेवकुलद्वारे ।
हेमन्तकालपथिको विध्मायमानं पलालाग्निम् ॥ ]

हिंवाळ्यांत कुग्रामांतील देवळाच्या दारांत प्रवाशाचा मुक्काम आहे. फाडलेल्या अस्वलासारखी दिसणारी, विझत आलेली, भाताच्या पेंढ्याची शेकोटी फुलविण्यासाठीं ( फुंकर घालून ) तो ती फोडीत आहे.

१. फेडिअ, फेट्टिअ, फेडिभ. २. अट्टण, फट्टण. ३. सुग्गेल्लिम्. ४. फाडेइ. ५. सुज्झाअन्तम्. ६. भल्लम्म्. ७. निर्वान्तमाणं, निर्वांतं.

● देवळात संकेत ठरविला होता, पण आता तेथें एकान्त राहिलेला नाहीं, अशी नायकाला दूतीची सूचना : किंवा संकेताप्रमाणें तूं तिकडे गेली नाहींस म्हणून नायक अस्वस्थ झाला आहे, अशी नायिकेला दूतीची सूचना. अस्वलाचें शरीर फाडताना त्याच्या शरीराचा लालभडक अंतर्भाग दिसतो, तशीच ती शेकोटी दिसत आहे.

## ११० उताणें आभाळ : 110. Reflection.

कमलाअरा ण मलिआ, हंसा उड्डाविआ ण अ पिउच्छा ! ।
केणॉवि गामतंडाए अब्भं उत्ताणअं व्वूढम् ॥ १० ॥

[ कमलाकरा न मृदिता हंसा उड्डायिता न च पितृष्वसः ।
केनापि ग्रामतडागे अभ्रमुत्तानितं क्षिप्तम् ॥ ]

आत्याबाई, आपल्या गावच्या तळ्यांत कोणी तरी आभाळ उताणें टाकलें आहे, ( तें पाहिलेंत का ? तरीही तळ्यांतील ) कमळाचे ताटवे तुडवले गेलेले नाहींत आणि हंसही उडवून लावले गेलेले नाहींत.

● नवकवीला अकल्पित वाटेल अशी कल्पना. एवढें मोठें आभाळ कोणी तरी पाण्यांत टाकलें; पण येथें झटापटीच्या खुणा दिसत नाहींत, हें कसें ? पहाटे संकेत ठरविलास पण तिकडे गेला नाहींस म्हणून दूतीनें केलेला नायकाचा निषेधः किंवा तळ्याजवळ निर्धास्त एकान्त असल्याची सूचना.

## १११ विषबाधा : 111. Poisonous Words.

केण मणे भग्गमणोरहेण संलाविअं पवासो त्ति ।
सविसाइँ व अलसाअन्ति जेण वहुआएँ अङ्गाइं ॥ ११ ॥

१. तलाए. २. उत्ताणणिअ. ३. छूढम्. ४. उत्तानकम्. ५. उल्लाइयं, उल्लाविअं.

[ केन मन्ये भग्नमनोरथेन संलापितं प्रवास इति ।
सविषाणीवालसायन्ते येन वध्वा अङ्गानि ॥ ]

कोणा भग्नमनोरथिनीनें वाटतें प्रवास हा शब्द उच्चारला आणि लगेच वधूचें अंग विषबाधा झाल्यासारखें जड झालें.

● गंगाधर सांगतो, पति प्रवासाला जाणार अशा समजुतीनें तिची अशी अवस्था झाली, सबब ती असाध्य आहे, अशी दूतीची कामुकाला सूचना; किंवा, जार प्रवासाला जाणार असें वाटल्यामुळें ती विमनस्क झाली आणि हें ध्यानीं आलेल्या सासूचे हे उपालम्भोद्गार आहेत; दुसरा टीकाकार सांगतो, ज्येष्ठ सवतीनें सासूजवळ काढलेले हे उद्गार आहेत; किंवा पतीवर अनुरक्त, पण गृहकृत्यपराङ्मुख वधूची सासूनें केलेली निंदा.

## ११२ इङ्गित : 112. Secret.

अज्जवि बालो दामोअरो त्ति इअ जम्पिए जसोआए।
कह्णमुहपेसिअच्छं णिहुअं हसिअं वअवहूहिं ॥१२॥

[ अद्यापि बालो दामोदर इति इति जल्पिते यशोदया ।
कृष्णमुखप्रेषिताक्षं निभृतं हसितं व्रजवधूभिः ॥ ]

बाळ दामोदर अजून ल्हान आहे, हो, आहेच ल्हान, असें यशोदा म्हणाली, तेव्हां कृष्णाकडे पाहून तरुण गोपी चोरून हंसल्या.

● या प्रस्तावनेनंतर गोपींना राहवलें नाहीं, त्यांनीं चोरून काण्या डोळ्यानें बालकृष्णाकडे पाहिलें. यशोदा कृष्णाला कुरवाळीत होती व तो भोंवतालच्या गोपींना दटावीत होता. त्यांना यशोदेची मर्यादा राखावयाची होती आणि त्यांचें हंसूं तर ओठांत मावत नव्हतें; कारण त्यांची रहस्यें

१. प्रंग प्रवासांत. २. फिर. ३. अंहतार.

एकीमेकींना माहीत होतीं; म्हणून त्या वदन वेळावून हंसल्या. इङ्गितगोपन-शिक्षा. पर्याय अलंकारः 'मिषं यदुक्तिभङ्गिर्यावसरो यः स सूरिभिः। निराकाङ्क्षोऽथ साकाङ्क्षः पर्याय इति गीयते॥' येथें साकाङ्क्ष, कारण 'अत्रानेकेनार्थजातेन साकाङ्क्षता व्यक्तैव।'

## ११३ वारसा : 113. Heritage.

ते विरला सप्पुरिसा जाण सिणेहो अहिण्णमुहराओ।
अणुदिअह वड्ढमाणो रिणं व पुत्तेसु संकमइ ॥१३॥

[ ते विरलाः सत्पुरुषा येषां स्नेहोऽभिन्नमुखरागः।
अनुदिवसवर्धमान ऋणमिव पुत्रेषु संक्रामति॥ ]

ज्याच्या मुखावरील भाव कधींही पालटत नाहीं व जो दिवसानुदिवस वृद्धिंगत होत जातो असा दृढ स्नेह ठेवणारा सत्पुरुष विरळा. वडिलोपार्जित कर्जाप्रमाणें अशा स्नेहाचा वारसा पुत्राकडे येतो.

● व्याजामुळें ऋण दिवसानुदिवस वाढत जातें. अदालतीच्या नव्हे, दुर्गतीच्या धास्तीमुळें वडिलार्जित ऋण फेडावेंच लागतें. सज्जनाच्या स्नेहात व्याज नसतें, तो निर्व्याज असतो, म्हणूनच आदिमध्यातीं अभिन्न असतो. ऋण नष्ट होतें, पण असा स्नेह मंद होत नाहीं. उलट, खलाचा स्नेह आरभीं दृढ असतो, पुढें तो विरल होतो आणि अखेरीस त्याचें परिवर्तन द्वेषात होतें. सज्जनस्तुतीच्या निमित्तानें मन्दस्नेह नायकाला उपदेश. प्रीति हृदयाच्या, उरोजाच्या नव्हे, दृढतेवर अवलंबून असते.

## ११४ कौतुक : 114. Proxy.

णच्चणसलाहणणिहेण पासपरिसंठिआ णिउणगोवी।
सरिसगोॅविआणँ चुम्बइ कवोलपडिमागअं कण्हम् ॥१४॥

१. वट्ठ, विवड्ढ

[ नर्तनश्लाघननिभेनं पार्श्वपरिसंस्थिता निपुणगोपी ।
सदृशगोपीनां चुम्बति कपोलप्रतिमागतं कृष्णम् ॥ ]

नाचण्याच्या श्रमांमुळें गोपींना घाम आला होता, त्यांच्या ओल्या गालांवर कृष्णाच्या प्रतिमा उमटल्या होत्या. एक निपुण गोपी मागें ( प्रेक्षकांच्या घोळक्यांत ) उभी होती. नर्तिकांच्या कौशल्याची स्तुति त्यांच्या कानांत सांगण्याच्या निमित्तानें ती पुढें झाली व त्यांच्या गालांवर उमटलेल्या कृष्णाच्या प्रतिबिंबांच्या चुंबनांचे श्रेय तिला ( अनेक वेळा ) मिळालें.

● इतर गोपींप्रमाणें तीही कृष्णावर अनुरक्त होती. पण तिला तोंवर अनुकूल संधि मिळाली नव्हती. मनातली प्रीति जनात प्रकट न करता तिनें प्रियकराच्या अप्रत्यक्ष चुंबनाचें श्रेय एकदा नव्हे, अनेकदा मिळविलें, हेंच तिचें नैपुण्य. चार चौघासमक्ष, पण त्याच्या ध्यानींमनींही येऊ न देता, प्रसंगाला साजेल अशा सबबीवर, तृप्तीचें श्रेय मिळविण्यासाठीं अंगीं असें नैपुण्य असावें लागतें, अशी नायिकेला सखीची सूचना.

## ११५ वल्कल : 115. Bark Garments.

सव्वत्थ दिसा¹मुहपसॉरिएहिँ अण्णोण्णकडअलग्गेहिं ।
छल्लिं² व्व मुअइ विञ्झो मेहेहिँ विसंघडन्तेहिं ॥१५॥

[ सर्वत्र दिशामुखप्रसृतैरन्योन्यकटकलग्नैः ।
छल्लीमिव मुञ्चति विन्ध्यो मेघैर्विसंघटमानैः ॥ ]

सर्व दिशांच्या क्षितिजावरून येणारे आणि कड्यांवर एकांमेकांना भिडून अलग होणारे मेघ, हींच जणूं वल्कलें, विन्ध्य सोडून ठेवतो. ( आणि नवें सौंदर्य धारण करतो )

१. व्याजेन. २. दिम्मुह. . कञ्चुकमिव, त्वचमिव.

● गंगाधर सांगतो, वर्षागमवर्णनाच्या निमित्तानें प्रवासाला न जाण्याबद्दल कांता पतीची विनवणी करीत आहे.

११६ पुलिंद : 116. Vindhya.

आलोअन्ति पुलिन्दा पव्वअसिहरट्ठिआ धणुणिसण्णा[2]।
हत्थिउलेहिँ व विञ्झं पूरिज्जन्तं णवब्भेहिं ॥१६॥

[ आलोकयन्ति पुलिन्दाः पर्वतशिखरस्थिता धनुर्निषण्णाः[3]।
हस्तिकुलैरिव विन्ध्यं पूर्यमाणं नवाभ्रैः ॥ ]

विन्ध्य पर्वतावर नवे मेघ हत्तींच्या जमावाप्रमाणें दाटत आहेत आणि पर्वतशिखरांवर धनुष्यांना टेंकून उभे असलेले ( कुंजरमृगयासक्त ) पुलिंद त्यांकडे पहात आहेत.

● टीकाकार सांगतात, पुलिंद व शबर हे एकच ! रानात हिंडणारे हत्तींचे कळप व डोंगरावर वावरणारे धनुर्धर वन्य यांचें हें शब्दचित्र वास्तविक व फार मनोहर आहे. इतके लोक आजूबाजूला वावरत असल्यामुळें आता वनाभिसार अशक्य आहे अशी सूचना ध्वनित आहे.

११७ तुषार : 117. Spray.

वणदवमासिमइलङ्गो रेहइ विञ्झो गँणेहिँ धवलेहिं।
खीरोअमन्थणुच्छलिअदुद्धसित्तो व्व महुमहणो ॥१७॥

[ वनदवमषीमलिनाङ्गो राजते विन्ध्यो घनैर्धवलैः।
क्षीरोदमथनोच्छलितदुग्धसिक्त इव मधुमथनः ॥ ]

१. पमअ. २. धणुम्मि णिसण्णा. ३. अध्वति, निपण्णा. ४. घणेहि. ५. छीरोअ.

वणव्यांमुळें काळवंडलेल्या विन्ध्य पर्वताच्या कड्यांवर पांढरे ढग भुरभुरले, तेव्हांची शोभा पाहून वाटलें कीं जणूं क्षीरसागराचें मंथन चाललें आहे व मधुमंथन कृष्णाचे अंगावर दुधाचे तुषार उडत आहेत.

● विन्ध्याचा वर्ण काळा, दुरून पाहिल्यास निळा. कृष्णाचा वर्णही तसाच. क्षीरसागर मंथनाचे वेळीं कृष्णाच्या अंगावर उडालेले तुषार पाहून प्रेक्षकाला वाटलें असतें कीं जणूं आभाळात नक्षत्रे उडत आहेत. प्रवासी पति लवकरच परत येईल असें प्रोषितभर्तृकेला सखीचें आश्वासन.

## ११८ गुणग्रहण : 118. Appreciation.

**वन्दीअ णिहअबन्धववमिणाइ वि पक्कलो[१] त्ति चोरजुआ।**
**अणुराएण पलोइओ[२], गुणेसु को मच्छरं वहइ ॥१८॥**

**[ वन्द्या निहतबान्धवविमनस्कयापि प्रवीर इति चोरयुवा ।**
**अनुरागेण प्रलोकितो गुणेषु को मत्सरं वहति ॥ ]**

ती ( चोरांच्या ) कैदेंत होती. ( त्यांच्याबरोबर झालेल्या झटापटींत तिचे ) बान्धव मारले गेल्यामुळें ती विमनस्क होती. तरी विजयी चोरांच्या तरुण नेत्याचें शौर्य प्रत्यक्ष दिसल्यामुळें तिनें त्याच्याकडे प्रेमानें पाहिलें. गुणांबद्दल कोणाला मत्सर वाटेल ?

● पत्नीनें परपुरुषाकडे कौतुकानें पाहिलें, तिच्या अभिप्रायाबद्दल साशंक झालेल्या नायकाला सखीचें आश्वासन. स्निग्ध दृष्टि सुरतेच्छेचीच द्योतक असते असें नाहीं. पाहण्यापाहण्यात फरक असतो; तो सूक्ष्म असतो; त्याचें निदान करण्यास अंगीं विदग्धता पाहिजे आणि सहिष्णुताही.

१. एक्कलो. २. विलोक्किओ, विलोभिओ.

## ११९ उन्मत्त : 119. Heavyweight.

अज्ज कइमो वि दिअहो वाहवहू रूवजोव्वणुम्मत्ता ।
सोहग्गं धणुरुम्पच्छलेण रच्छासु विकिरइ ॥ १९॥

[ अद्य कतमोऽपि दिवसो व्याधवधू रूपयौवनोन्मत्ता ।
सौभाग्यं धनुस्तर्वक्छलेन रथ्यासु विकिरति ॥ ]

आज काहीं दिवस झाले, रूपयौवनोन्मत्त व्याधस्त्री नवऱ्याचें धनुष्य तासून त्याच्या छिलप्या रस्त्यांत विखरीत आहे. जणूं या मिषानें ती आपलें सौभाग्यच प्रकट करीत आहे.

● नायिकेवरील आसक्तीमुळें तो इतका दुबळा झाला कीं पूर्वीचें जाड-जूड धनुष्य त्याला पेलेनासें झालें. म्हणून तिनें तें तासून हलकें केलें. उन्मत्त धनिक रस्त्यावर द्रव्य उधळतो; त्याचप्रमाणें रूपयौवनोन्मत्ता नायिका जणू आपल्या सद्‌भाग्याचे कण उधळीत आहे. अत्यासक्तीच्या दुष्परिणामाचें प्रात्यक्षिक किंवा नायिका असाध्य आहे अशी सूचना.

## १२० वातचक्र : 120. Whirlwind.

उक्खिप्पइ मण्डलिमारुएण गेहङ्गणाहि वाहीए ।
सोहग्गधअवडाअ व्व उअह धणुरुम्परिञ्छोली ॥ २०॥

[ उत्क्षिप्यते मण्डलीमारुतेन गेहाङ्गणाद्व्याधस्त्रियाः ।
सौभाग्यध्वजपताकेव पश्यत धनुं सूक्ष्मत्वक्पङ्क्तिः ॥ ]

१ रम्य २ रत्थासु ३ विकिरइ ४ धनुस्तक्षण, धनुरुल्लिखन. ५ धणुहरोरम्प ६. गेहाङ्गणाद्व्याधात् ७ धनुर्मनोरम्परिच्छोली, पश्य धनुस्तक्षणरिञ्छोली, सूक्ष्मकणपङ्क्ति, धनूरजत्वक्पङ्क्ति

व्याधस्त्री घराच्या अंगणांत धनुष्य छिलीत बसली होती. इतक्यांत सोसाट्याचें वातचक्र आलें व छिलप्यांची रांग आभाळांत उडाली. जणूं तिच्या सौभाग्याच्या ध्वजाची पताकाच आकाशांत फडफडूं लागली.

● विखुरलेल्या छिलप्या वावटळीच्या सोसाट्यासरशीं आभाळांत प्रथम फिरत्या खांबासारख्या वर उडाल्या आणि वाऱ्याचा जोर ओसरल्यावर त्याच्या रांगा वरच्यावर थांबल्या व हळूं हळूं खालीं उतरताना पताका-सारख्या फडफडल्या. तिनें नवऱ्याला जिंकलें व याची खूण म्हणून झेंडा फडकावला. क्र.११९ या गाथेची नायिका रूपयौवनोन्मत्ता आहे आणि या गाथेची नायिका स्वसौभाग्यगर्विता आहे. दोघींच्या कृति त्याच. त्यांच्या स्वभावातील फरक त्यांच्या आसनांवरून दिसून येतो. ती रस्त्यालगत ओट्यावर बसलेली आहे आणि ही घराच्या अंगणात.

## १२१ मद : 121. Rut.

**गअगण्डत्थलणिहसणमअमइलीकअकरञ्जसाहाहिं ।**
**एन्तीअ कुलहराओ णाणं वाहीअ पइमरणम् ॥२१॥**

[ गजगण्डस्थलनिघर्षणमदमलिनीकृतकरञ्जशाखाभिः ।
आगच्छन्त्या कुलगृहाज्ज्ञातं व्याधस्त्रिया पतिमरणम् ॥ ]

व्याधस्त्री माहेराहून परत येत होती. हत्तींनीं गंडस्थळें घासल्यामुळें मदानें मलिन झालेल्या करंजांच्या फांद्या तिला वाटेवर दिसल्या. तेव्हांच आपल्याला वैधव्य आल्याचें तिनें ओळखलें.

● तिचा पति हयात होता तोंवर त्याच्या धास्तीनें त्या रानांत हत्ती फिरकत नसत, आता ते उन्मत्त होऊन निर्धास्तपणें जंगलात धुमाकूळ घालूं लागले आहेत, हें पाहून तिनें आपलें दुर्दैव ओळखलें. आपल्या

१. पराओ णोअं

गैरहजिरींत तो अन्य स्त्रीच्या नादीं लागला असावा आणि म्हणून हत्ती माजले असावेत, अशीही कल्पना तिच्या मनात येऊन गेलेली असावी. स्त्रियांच्या अनुमानाना बुद्धिप्रामाण्याचा आधार नसतो. तीं केवळ स्वभाव-प्रेरित असतात, म्हणून तीं चुकींचीं असतात असें थोडेंच आहे !

## १२२ नवी बायको, जुनें धनुष्य : 122. Burden.

**णववहुपेम्मतणुइओ पणअं पढमघरणीअ रक्खन्तो ।**
**ओलिहिअर्दूप्परिल्लं पि णेइ रण्णं धणुं वाहो ॥२२॥**

[ नववधूप्रेमतनूकृत· प्रणयं प्रथमगृहिण्या रक्षन् ।
तनूकृतदुराकर्षमपि नयत्यरण्यं धनुर्व्याधः ॥ ]

नव्या बायकोच्या प्रेमामुळें व्याध दुबळा झाला आहे; तरीही प्रथम गृहिणीवरील प्रेमाचें तो रक्षण करीत आहे. जुनें धनुष्य ठिळून हलकें केलें, तरीही आता तें त्याला पेलत नाहीं. मात्र ( आपलें दौर्बल्य दिसू नये म्हणून ) तो तेंच घेऊन अरण्यात भटकतो.

● दौर्बल्य व वार्धक्य झांकण्यासाठीं किती तरी लोक तरतरीत व तरुण दिसण्याच्या खटपटींत असतात, त्यातलाच हा प्रकार. कोरें करकरीत, लवचिक व कमानदार धनुष्य हातीं आलें म्हणजे जुनें धनुष्य बोजड, अवजड, अवटरलेलें वाटावयाचेंच ! व्याधाची प्रथम पत्नी सुसाध्य असल्याची दूतीची सूचना !

## १२३ प्रसूति-वैराग्य : 123. Woman's No.

**हासाविओ जणो सामलीअ पढमं पसूअमाणाए ।**
**वल्लहवाएँण अलं मम त्ति बहुसो भणन्तीए ॥२३॥**

१. अलिहिअ. २ दुप्परिअल, दुप्पारिगेज्झम्, दुग्गेज्झम् ३ अलिखितमतनू-कृतम्. ४. राएण

[ हासितो जनः श्यामया प्रथमं प्रसूयमानया।
वल्लभवादेनालं ममेति बहुशो भणन्त्या॥ ]

( सुकुमार ) श्यामला प्रथमच बाळंतीण झाली, तेव्हां वल्लभाचें नांव घेण्याबद्दल तिच्या मैत्रिणी तिला आग्रह करूं लागल्या. तेव्हां ती पुन्हा पुन्हा म्हणाली, ' त्याला माझा वल्लभ म्हणूं नका ग बायांनों; यापुढें मी त्याचें नांवसुद्धां घेणार नाहीं.' मग साऱ्या जणी हसूं लागल्या !

● प्राचीन कौटुम्बिक विनोदाचा एक उत्कृष्ट नमुना. पहिलटकरणीला बाळंतपणात क्लेश होतातच. हिची कुडी लहान व नाजूक, म्हणून हिला विशेष त्रास झाला होता. तिचे त्राग्याचे उद्गार ऐकून ज्या हंसल्या त्या माहेरच्या मैत्रिणी असाव्यात; ज्या हंसल्या त्याना सराव झालेला असावा; कदाचित् त्यांनींही आरंभीं असेच उद्गार काढले असतील !

## १२४ मानवी प्रेम : 124. Mortal Love.

कइअवरहिअं पेम्मं ण त्थि व्विअ मामि ! माणुसे लोए।
अह होइ कस्स विरहो ? विरहे होत्तम्मि को जिअइ ?॥२४॥

[ कैतवरहितं प्रेम नास्त्येव मातुलानि मानुषे लोके।
अथ भवति कस्य विरहो विरहे भवति को जीवति ॥ ]

मामी, मनुष्य लोकांत निष्कपट प्रेम नसतेंच ! असतें, तर विरह कां होता ? आणि विरहानंतर जीव कसा राहता ?

● प्रोषितभर्तृका नायिका; विरहातही मी जीव धरून राहिलें आहे, यावरूनच दिसतें कीं माझ्याही प्रेमात लबाडी आहेच. विरहामुळें मी आसन्नमरण झालें आहे, यावरून माझ्या प्रेमाची अलौकिकता सिद्ध होते, असाही श्लेष निघतो.

१. वचनेन, रागेण. २. भगिनि, मातुलि. ३. भवन्यपि.

## १२५ अमृतानुभव : 125. Exultation.

अच्छेरं व, णिहिं विअ, सग्गे रज्जं व, अमअपाणं व ।
आसि म्ह तं महुत्तं विणिअंसणदंसणं तीए ॥२५॥

[ आश्चर्यमिव निधिमिव स्वर्गे राज्यमिवामृतपानमिव ।
आसीदस्माकं तन्मुहूर्तं विनिवसनदर्शनं तस्याः ॥ ]

मी तिला क्षणभरच नग्नावस्थेत पाहिली. त्याक्षणीं मी आश्चर्यचकित झालों; जणूं मला (परमसुखाचा) निधि सांपडला, स्वर्गाचें राज्य मिळालें; जणूं मी अमृताचा घोंट घेतला.

● गुप्त धन अकल्पितपणें सांपडलें म्हणजे प्रथम आश्चर्याचा झटका बसतो, नंतर आनंदाला उकळी येते; वाटतें, सर्व सुखें हातीं आलीं. तोंच भीतीनें छाती थरारते; *गुप्त संपत्तीचें रक्षण करणारे महासर्प आजूबाजूस* वावरत असावेत अशी धास्ती वाटते; कोणा प्रतिस्पर्ध्याची आपल्यावर *नजर तर नाहीं ना, अशी शंका मनांत येते. जें आपल्याला आढळलें तें* आपलेंच आहे, असें मानण्याकडे मनुष्यमात्राची वृत्ति असते. वस्तुतांत भागीदार नसावा, असेंही वाटतें. या गाथेंतील दृश्य पाहणाराच्या मनांत असेच विचार आले असतील. अमृतसेवन म्हणजे तृप्तीची परिसीमा. अमृत म्हणजे मद्य नव्हे, कीं त्याचे अनेक घोंट घेण्याची लालसा वाटावी. या दृष्टीनें पाहतां अधररसाला अमृत का म्हणतात याचा उलगडा होत नाहीं ! आणि या दृश्याचा प्रेक्षक नुसत्या दर्शनानें एवढा तृप्त व उन्मत्त कसा झाला याचाही.

## १२६ यां चिंतयामि : 126. The Way by All Flesh.

सा तुज्झ वल्लहा, तं सि मज्झ, वेसो सि तीअ, तुज्झ अहम् ।
बालअ ! फुडं भणामो पेम्मं किर बहुविआरं त्ति ॥२६॥

[ सा तव वल्लभा त्वमसि मम द्वेष्योऽसि तस्यास्त्वाहम् ।
बालक स्फुट भणाम प्रेम किल बहुविकारमिति ॥ ]

तुमचें प्रेम तिच्यावर आणि माझें तुमच्यावर, ती तुमचा द्वेष करते व तुम्ही माझा, तुम्ही बाल्कासारखे अजाण आहात, स्पष्ट सागतें, खरोखर, प्रेम बहुविकारी आहे

● मीं तुमच्या शेजारीं, ती तुमच्या हृदयामाझारीं, तरीहि ती मला बोंचते आणि मी तुम्हाला. पति, पत्नी व प्रेयसी हा त्रिकोण अनादिसिद्ध आहे. ह्या त्रिकोणाचें वैशिष्ट्य असें कीं त्याच्या भुजा प्रसगानुरोधानें ल्हान मोठ्या होत असतात आणि कोनाचे अशही [1]

## १२७ मेंदी : 127 Footprints

अहअं लज्जालुइणी, तस्स अ उम्मच्छेराइँ पेम्माइँ ।
सहिआअणो वि णिउणो, अलाहि किं पाअराएण ? ॥२७॥

[ अहं लज्जालुस्तस्य चोन्मत्सराणि प्रेमाणि ।
सखीजनोऽपि निपुणोऽपगच्छ किं पादरागेण ॥ ]

मी अशी लाजाळू, त्याचें प्रेम उत्कट; आणि माझ्या मैत्रिणी तर अशा हुशार ( कीं त्याच्यापासून काहीं लपायचें नाहीं ), जा–माझीं पावलें मूळचींच लाल आहेत, त्याना आणखी रग कशाला [2]

● पावलाना रग लावण्याला आलेल्या दासीप्रत स्वाधीनमर्तृकेचे उद्गार. पावलाना रग लावला व तो वेळेवर नीट वाळला नाहीं तर त्याच्या

१ वल्लभा मम त्व द्वेष्योऽसि वल्लभा त्वमसि मम प्रियस्त्वमसि तस्या
२ लुद्दरी, रज्जुअरूआ ३ उम्मत्तआइ, उम्मन्थराइ ४ हलाओ
५ ऋजुकरूपा, लज्जावती ६ उन्मत्तकानि, उन्मस्तकानि

अंगावर अगर कपड्यावर पोटें तरी त्यूश उमटावयाची आणि तीमुळें रहस्याचा स्फोट व्हावयाचा अशी तिला धास्ती पडली होती. एक टीकाकार सांगतो. ' प्रेमावेशवशः माम् अन्वयम् पुरुषायितम् कारयिष्यति, सदा निपुणसखीजनः शय्यागतैस्तालक्तकपदैः पदाङ्कैस्तदनुमायाऽपहस्येत्। ' पतीचें वैदग्ध्य व आपलें सौभाग्य याचें नायिकेनें केलेलें वर्णन. 'उद्भेदप्रच्छादनं व्याजोक्तिः' अलंकाररत्नाकर.

## १२८ झंकार : 128. Spring.

महुमाससमारुआहअमहुअरझंकारणिब्भरे रण्णे ।
गाअइ विरहक्खरॉवद्धपहिअमणमोहणं गोवी ॥२८॥

[ मधुमाससमारुताहतमधुकरझंकारनिर्भरेऽरण्ये ।
गायति विरहाक्षरावद्धपथिकमनोमोहनं गोपी ॥ ]

रानांत वसंताचा वारा भरला आहे, त्याच्या झोतानें झपाटलेल्या मधुकरांचा झङ्कार घुमत आहे आणि ( विरही ) पांथस्थांचें अंतःकरण व्याकुळ होईल अशी विरहगीतें गोपी गात आहेत.

● संकेताप्रमाणें गोपी रानांत तुझी वाट पाहत आहे, अशी सूचना.

## १२९ सुसंधि : 159. Reaction

तह माणो माणधणाएँ तीअ एमेअ दूरमणुवद्धो ।
जह से अणुणीअ पिओ एक्कग्गाम व्विअ पउत्थो ॥२९॥

[ तथा मानो मानधनया तया एवमेव दूरमनुवद्धः ।
यथा तस्या अनुनीय प्रिय एकग्राम एव प्रोषितः ॥ ]

१. माणहणाए. २. मानहृताया. ३. तस्या मे अदूरमनुवद्धः

मानधन मानिनीनें मान (निष्कारण) इतका ताणून धरला कीं अनुनय करूनही प्रियकर ( तिला प्रसन्न करूं शकला नाहीं व तो ) गांवांतल्या गांवातच प्रवासी झाला.

● निष्कारण मानग्रहणानें प्रेमाचा नाश होतो, प्रियकर पराधीन होतो, अधिक ताणून धरूं नको, असा सखीचा उपदेश. किंवा, नवरा घरीं नाहीं अशी नायकाला आणि प्रियकर आला आहे अशी स्वैरिणी नायिकेला दूतीची प्रच्छन्न सूचना.

१३० पादप्रक्षालन : 130. Fetters.

सालोएँ व्विअ सूरे घरिणी घरसामिअस्स घेत्तूण।
णेच्छन्तस्स वि पाए धुअइ हसन्ती हसन्तस्स ॥३०॥

[ सालोक एव सूर्ये गृहिणी गृहस्वामिनो गृहीत्वा।
अनिच्छतोऽपि पादौ धावति हसन्ती हसतः ॥ ]

( चंचल पतीचें इंगित ओळखून ) पत्नीनें सूर्यास्त होण्यापूर्वीच, त्याची इच्छा नव्हती तरीही त्याचे पाय धरून ते धुतले. एकमेकांनीं एकमेकांचें मनोगत ओळखलें आणि दोघेंहि हसूं लागलीं.

● अंधार पडल्यावर जरा चक्कर मारून येण्याचा त्याचा विचार होता. नायिका मनकवडी खरी. पादप्रक्षालनानन्तर घराबाहेर पडणें निषिद्ध असल्यामुळें तिनें या युक्तीचा अवलंब केला. प्रयोग करून पाहण्यासारखा आहे ! पादप्रक्षालनानें हृदयक्षालनही होतें की काय !

१३१ उपालम्भ : 131. Censure.

वाहरउ मं महीओ ! तिस्सा गोत्तेण किं व्व भणिएण ?
थिरपेम्मा होऊ जहिं तहिं पि, मा किं पि णं भणह ॥३१॥

[ व्याहरतु मां सख्यस्तस्या गोत्रेण किमत्र भणितेन।
स्थिरप्रेमा भवतु यत्र तत्रापि मा किमप्येनं भणत ॥ ]

त्यांनीं मला दुसऱ्याच नांवानें हांक मारली म्हणून काय झालें? तेथें तरी त्यांचें प्रेम स्थिर होऊं द्या, म्हणजे झालें. मात्र त्यांना कोणी कांहीं बोलूं नका.

● विरचिता संकेत. पतीनें पत्नीला मलत्याच नावानें संबोधलें. हें ऐकून तिची सखी चमकली. 'अलीकडे यांची दृष्टि दुर्बल झालेली आहे की काय?' सखीनें विचारलें. पतीला म्हातारपण आल्याचा उल्लेख कोणी केलेला स्त्रियांना रुचत नाहीं, त्याला मद्यपी किंवा बाहेरख्याली म्हटलें तरी चालतें, अशी एक अवस्था स्त्रियांच्या जीवनांत येत असते. सखीच्या कुशंकेचें निवारण करून पत्नी म्हणते, जी त्याची आवडती ती मीच आहे अशा धुंदीमुळें त्यांची गैरसमजूत झालेली आहे; तरीही त्यांचा सहवास मिळत असल्यामुळें मी संतुष्ट आहे; मात्र वस्तुस्थिति त्यांच्या निदर्शनास आणून कोणी माझ्या सुखांत व्यत्यय आणूं नका.

## १३२ वैशिष्टय : 132. Speciality.

रूअं अच्छीसु ठिअं, फरिसो अङ्गेसु, जम्पिअं कण्णे।
हिअअं हिअए णिहिअं विओइअं किं त्थ देव्वेण ॥३२॥

[ रूपमक्ष्णोः स्थितं स्पर्शोऽङ्गेषु जल्पितं कर्णे।
हृदयं हृदये निहितं वियोजितं किमत्र दैवेन ॥ ]

त्यांचें रूप माझ्या नेत्रांत स्थिर झालेलें आहे आणि स्पर्श अंग-प्रत्यंगांत, बोल कानांत आणि हृदय हृदयांत. आमचा वियोग दैवाला तरी कोठें करतां आला?

१. कुत्रापि. २. पंसो. ३. हिअएण समं. ४. वियोतितं तु खलु दैवेन.

● दुष्ट दूती प्रोषितभर्तृकेच्या हृदयाचा ठाव घेत होता. असा कसा तुझा पती, तुझ्या ऐन ज्वानींत याची फिरती! नायिका सांगते, प्रत्यक्ष दैव आमच्या प्रेमांत व्यत्यय आणूं शकलें नाहीं, तें काय तुझ्या गळीला बळी पडणार? अलंकारकौस्तुभात तुल्ययोगिता व विशेष या अलंकारांचें उदाहरण : 'प्रकृताना तादृक्त्वे भिन्नानां यापि तुल्ययोगितेः।' 'स्थिति-राधाराभावे वृत्तिरनेकेषु युगपदेकस्य। एककरणेन दुष्करकार्यान्तरसिद्धिरिति विशेषः।'

## १३३ मनोमय प्रियकर : 133. Self-Embrace.

सअणे चिन्तामइअं काऊण पिअं णिमीलिअच्छीए ।
अप्पाणो उवऊढो पसिठिलवलआहिँ बाहाहिँ ॥३३॥

[शयने चिन्तामयं कृत्वा प्रियं निमीलिताक्ष्या ।
आत्मा उपगूढः प्रशिथिलवलयाभ्यां बाहुभ्याम् ।]

बिछान्यावर पडल्या पडल्या तिनें मनोमय प्रियकर निर्माण केला आणि (विरहामुळें) ज्यांवरील बांगड्या सैल झाल्या आहेत अशा (कृश) बाहूंनीं त्याला आलिंगिलें. तेव्हां (वाटलेल्या सुखामुळें) तिचे डोळे अर्धे मिटले.

● अर्धोन्मीलित नेत्र हें प्रेमतृष्णेचें आणि निमीलित नेत्र हें प्रेमतृप्तीचें लक्षण. वस्तुतः तिनें स्वतःलाच आलिंगिलें होतें. 'स्वमात मुखाची (सख्याची?) मुरत पाहुनि गोमटी। बाहुची उशी करदून मारिते मिठी॥' ही विरहाच्या उन्मादावस्थेत होती. तिच्या भेटीस त्वरित जा, नाहीतर ही हातीं लागणार नाहीं, अशी दूतीची पतीला सूचना.

---

१. णिविणे. २. पसिढिल. ३. आत्मना पद्य वृद्धः.

१३४ कुंटीण : 134. Procuress.

परिहूँएण वि दिअहं घरघरभमिरेण अण्णकज्जम्मि ।
चिरजीविएण इमिणा खविअह्मो दड्ढकाएण ॥३४॥

[ परिभूतनापि दिवसं गृहगृहभ्रमणशीलेनान्यकार्ये ।
चिरंजीवितेनानेन क्षपिताः स्मो दग्धकायेन ॥ ]

लोकांनीं तिरस्कार केला व पुन्हां पुन्हां हांकून लावलें तरी कावळा अन्नासाठीं लोंचटासारखा पुन्हां पुन्हां घरोंघर जातो व जळकें जीवन चिरकाल जगतो. ( म्हातारी कुंटिण म्हणते ) वारंवार अपमान झाला तरी तो सोसून मला पोटासाठीं लोकांच्या घरोघर हिंडावें लागतें; खूप जगलें, दुष्ट शरीर खंगलें आणि जन्मभर केलें काय ? दुसऱ्यांचीं कामें !

● अन्नकार्य व अन्यकार्य आणि दग्धकाकेन व दग्धकायेन या शब्दांच्या श्लेषावर रचना. एक सुभाषित व दुसरें कुभाषित. " पोटासाठीं आम्हाला असा लोंचटपणा करावाच लागतो, धुडकावून लावलें तरी निलाजरेपणानें फिरून यावें लागतें. आमचें आयुष्य कावळ्यासारखें, टपून राहावयाचें, टिपून घ्यावयाचें. तुम्हा राजहंसींना आमच्या अपेष्टाची काय कल्पना ! " वृद्ध कुंटिणीची कार्यसाधु आत्मनिंदा. इतर उपाय हरले म्हणजे या मार्गानें कार्यसिद्धि होते असा तिचा अनुभव असावा ! कलहान्तरिताच्या समजावणी-साठीं हेलपाटे घालून निराश व त्रस्त झालेली दूतीही असेच उद्गार काढील.

१३५ काजळी : 135. Soot.

वसइ जहिं चेअ खलो पोसिज्जन्तो सिणेहदाणेहिं ।
तं चेअ आलअं दीअओ व्व अइरेण मइलेइ ॥३५॥

१. परिभूएण. २. चिरजीवितासुना खादिता स्मो.

[ वसति यत्रैव खलः पाल्यमानः स्नेहदानैः ।
तमेवालयं दीपक इवाचिरेण मलिनयति ॥ ]

दुष्टाला स्नेहभावानें वाढविला व रक्षिला तरी तो दिव्याप्रमाणें आपल्या आश्रयदात्याला लवकरच कालिमा आणतो.

● स्नेह म्हणजे मैत्री आणि तेल; या अर्थांच्या श्लेषावर रचना. दिव्यात तेल घातलें व निवाऱ्यासाठीं तो देवळींत ठेवला तरी तो कोनाड्याला काजळी चढविल्यावाचून राहत नाहीं. उघड्या ज्योतींच्या दिव्याच्या युगात खालीं अंधेर, वर काजळी, शिवाय आगीची धास्ती; म्हणूनच तो कामापुरता वापरावयाचा व दूर ठेवावयाचा. खलाशीं स्नेह करूं नये, त्याना आश्रय देऊं नये, रहस्यें सांगूं नयेत, नाहींतर ते आश्रयदात्याला काळोखी आणल्यावाचून राहणार नाहींत.

## १३६ दुपारची छाया : 136. Futile.

होन्ती वि णिप्फलच्चिअ धणरिद्धी होइ किविणपुरिसस्स ।
गिह्मआवसंतत्तस्स णिअअछाहि व्व पहिअस्स ॥३६॥

[ भवन्त्यपि निष्फलैव धनऋद्धिर्भवति कृपणपुरुषस्य
ग्रीष्मातपसंतप्तस्य निजकच्छायेव पथिकस्य ॥ ]

उन्हाळ्यांतल्या उन्हानें तापलेल्या प्रवाशाला स्वतःच्या छायेचा उपयोग होत नाहीं, त्याचप्रमाणें कृपणाची संपत्ति व समृद्धि हीं निष्फल असतात.

● कृपण भुजङ्गाला दानोन्मुख करण्यासाठीं कुंटिणीनें केलेली निंदा. ती छायेसारखी तुझ्या सन्निध असली तरी तुझ्या चिक्कूपणामुळें तिला काहीं प्राप्ति होणार नाहीं आणि तुलाही सुख मिळणार नाहीं, अशी सूचना.

---

१ दानरहिअस्स. २. रूखस्स ३. दानरहितस्य

## १३७ डावा डोळा : 137. Tremour.

फुरिए वामच्छि ! तुए जइ एहिइ सो पिओ ज्ज ता सुइरम् ।
संमीलिअ दाहिणअं[1] तुइ अवि[2] एहं पलोइस्सम् ॥३७॥

[ स्फुरिते वामाक्षि त्वयि यद्येष्यति स प्रियोऽद्य तत्सुचिरम् ।
संमील्य दक्षिणं त्वयैवैतं प्रेक्षिष्ये ॥ ]

माझा डावा डोळा लवत आहे. या शुभ शकुनामुळें प्रियकर परत आला तर ( कृतज्ञता दर्शविण्यासाठीं ) उजवा डोळा मिटून फक्त डाव्या डोळ्यानेंच मी त्याच्याकडे डोळा भरून पाहीन.

● आणि खरोखर, सुलोचनेनें दोन्ही डोळ्यांनीं त्याच्याकडे पाहण्यापेक्षा हेंच त्याला अधिक आवडेल !

## १३८ सोंगटी : 138 Gambler's Luck.

सुणअपउरम्मि गामे हिण्डन्ती तुह कएण सा बाला ।
पासअसारिव्व घरं घरेण कइआ वि खज्जिहिइ ॥३८॥

[ शुनकप्रचुरे ग्रामे हिण्डमाना तव कृतेन सा बाला ।
पाशकशारीव गृहं गृहेण कदापि खादिष्यते ॥ ]

ह्या गावात हुंगत हिंडणारीं कुत्रीं पुष्कळ आहेत. बाला तुझ्यासाठीं पटावरल्या सोंगटीसारखी घरोघर फिरत आहे. तूं त्वरा केली नाहींस तर कोणीही फासा टाकून तिला खाऊन टाकील.

१. दाहिणणयण. २. अविअण्हं. ३. त्वया अवितृष्णम् , अविघ्नं. ४. प्रलोकयिष्ये, प्रलोकयिष्यामि. ५. रच्छेज, डज्झिहिमि.

● पासअ म्हणजे फास आणि सारि म्हणजे मैना; पासअ म्हणजे फासा आणि सारि म्हणजे सोंगटी. फासेपारधी पांखरें पकडण्यासाठीं जंगलात जाळीं पसरतात आणि त्याभोंवतीं असे आवाज व हालचाली करतात कीं बिचारीं मोहित होऊन, बावरल्यामुळें किंवा स्वसंरक्षणासाठीं आपखुषीनें पाशात चालून येतात; उडत बागडत, चिवचिव करीत. स्त्रियाना, विशेषतः अल्लड तरुणींना गटविण्यासाठीं भुजङ्गानीं टाकविलेले पाश अधिक आकर्षक असतात. अज्ञाताच्या किंवा अज्ञानाच्या कुतूहलामुळें अगर आसक्तीच्या आवेशामुळें त्या जणूं पाशात गुंतण्याला उत्सुक असतात. फास व फासा यात फरक फार थोडा. दैव अनुकूल असलें व हातीं कौशल्य असलें कीं हेरलेली सोंगटी कितीही भटकली तरी उडविता येते. गावात हुंगतीं कुत्रीं सारखीं हिंडत असतात. हुंगावयाचें, जरा उत्तेजन मिळालें कीं गोंडा घोळायचा, लाडी-गोडी लावावयाची, जमलें तर पाय चाटावयाचे, धुडकावलें तर भुंकायचें. नायिकेच्या भोंवतीं कुत्रीं मंडल करीत आहेत; होय, तुझ्याशीं तुलना केली तर तीं कुत्रींच आहेत; तीं तिच्या मागावर आहेत. तिच्या मार्गावर पाश टाकले जात आहेत, तिच्यासाठीं फासे टाकले जात आहेत, दानें पडत आहेत. ती तुझ्यावर अनुरक्त आहे, तरीही कोणीही फशीं पाडावें अशा अवस्थेत आहे; बावरल्यामुळें पटावरल्या सोंगटीसारखी आश्रयाच्या शोधार्थ ती घरोघर हिंडत आहे. म्हणून त्वरा कर, तिला कटीवर आश्रय दे, अशी नायकाला दूतीची विनवणी.

## १३९ दोष कुणाचा ? 139. Honey.

अण्णण्णं कुसुमरसं जं किर सो महेइ महुअरो पाउम् । [1]
तं णीरसाणँ दोसो कुसुमाणं णेअ भमरस्स ॥३९॥

[ अन्यमन्यं कुसुमरसं यत्किल स इच्छति मधुकरः पातुम् ।
तन्नीरसानां दोषः कुसुमानां नैव भ्रमरस्य ॥ ]

१. महपाणणेहलो

आज ह्या, उद्यां त्या, वेगवेगळ्या फुलांचा आस्वाद घेण्याची भ्रमर इच्छा करतो; हा दोष फुलांच्या नीरसतेचा, भ्रमराचा नाहीं.

● वेगवेगळ्या फुलांतील मधुपान हें लोलुप मधुपाला स्वाभाविक आहे. पुष्पमात्राचे ठायीं कमीअधिक रस असतोच. रूप, रंग व गंध हीं प्रसिद्धीचीं साधनें अनुकूल असलीं तरच पुष्पाकडे मधुप आकर्षिला जातो. स्वगुणगर्विता स्वाधीनपतिका नायिका आपल्या अजाण सखीला सांगते, 'मीं माझ्या गुणांनीं प्रियकराचें चाचल्य शमविलें, तुलाही तसें करता येईल. तूं रसपूर्ण आहेस व तो रसज्ञ आहे; पण तुला स्वतःचे गुण व त्याची शक्ति माहीत नाहींत; जरा कळी खुलव, मग पाहा, तुझा मधुकर तुझ्या भोंवतींच भ्रमण करीत राहील.

## १४० वाट बघत द्वारिं उभीं— 140. Blue Carpet.

रत्थापइण्णणअणुप्पला तुमं सा पडिच्छए एन्तम् ।
दारणिहिएहि दोहि वि मङ्गलकलसेहि व थणेहिं ॥४०॥

[रथ्याप्रकीर्णनयनोत्पला त्वां सा प्रतीक्ष्यते आयान्तम् ।
द्वारनिहिताभ्यां द्वाभ्यामपि मङ्गलकलशाभ्यामिव स्तनाभ्याम् ॥]

ती तुझी वाट पाहत दरवाजांत उभी आहे. तुझ्या सुस्वागतासाठीं दरवाजाच्या बाह्यांना तिनें आपल्या स्तनाचे मंगलकलश लावले आहेत आणि दृष्टिक्षेपांनीं रस्त्यावर नील कमलाची पायघडी पसरली आहे.

● दारात उभी राहणारी, नजर अशी गहिरी, यौवनाची अशी उभारी, कौतुकाच्या नाना परी. अमरुशतकातील समानार्थी वचन : " दीर्घा वन्दनमालिका विरचिता दृष्टयैव नेन्दीवरैः । पुष्पाणां प्रकरः स्मितेन रचितो ना कुन्दजात्यादिभिः ॥ दत्तः स्वेदमुचा पयोधरभरेणार्घो न

१. तुम पुत्ति क पलोएसि. २. त्वं पुत्रि क प्रलोकयसि. ३. आगच्छन्तम्.

कुम्मास्मशा । स्वैरेवावयवैः प्रियस्य विशतस्तन्व्या कृत मङ्गलम् ॥" दरवाजात उभे रहावयाचा रिवाज आणि निळ्या डोळ्याचें आकर्षण हीं सकृद्दर्शनीं वाटतात तितकीं आधुनिक नाहींत। पाठभेदातील दूती विचारते, 'मुली, तू कोणाची वाट पाहत आहेस? मला साग, मी त्याची तुझी भेट घडवून आणीन.'

## १४१ दया करा, प्रियकरा— 141. Mercy.

ता रुण्णं जा रुव्वइ, ता छीणं[1] जाव छिज्जए[2] अङ्गम् ।
ता णीससिअँ जाव अ सासा पहुप्पान्ति ॥४१॥
[ तावद्रुदित यावद्रुद्यते तावत्क्षीण यावत्क्षीयतेऽङ्गम् ।
तावन्नि श्वसित वराक्या यावत्[3] श्वासा प्रभवन्ति ॥ ]

रडणें शक्य होते तोंवर ती रडली, शरीराला शक्य होतें तेवढें झिजली, श्वासोच्छ्वास चालू आहे तोंवर बिचारी नि श्वास टाकीत आहे

● तुझ्या अनुनयाचा स्वीकार केला नाहीं याचा तिला पश्चात्ताप झालेला आहे, कलहान्तरिता आता आसन्नमरण अवस्थेत आहे, अपराध तिचाच असला तरी आता तिची उपेक्षा करू नको, अशी पतीला दूतीची सूचना.

## १४२ स्मरण व मरण : 142 Life & Death

समसोक्खदुक्खपरिवँड्ढिआणॅ[4] कालेण रूढपेम्माणम् ।
मिहुणाणॅ मरइ जं, त खु जिअइ. इअरं मुअं होइ ॥४२॥
[ समसौख्यदु खपरिवर्धितयो कालेन रूढप्रेम्णो ।
मिथुनयोर्म्रियते यत्तत्खलु जीवति इतरन्मृत भवति ॥ ]

१ झीण, सीण २ झिज्जए, रिज्जए ३ यावन्निश्वासा ४ समवढ्ढिआण.

सम सुखदुःखांत बरोबर वाढल्यामुळें कालांतरानें प्रेमाला स्थिरता येते. अशा दांपत्यापैकीं जी व्यक्ति अगोदर मरते ती ( दुसऱ्याच्या हृदयांत ) जिवंत राहते व जी जिवंत राहते ती मृतवत् होते.

● विरहाचें दुःख जीवाला जाळतें, त्यापेक्षां मरण पुरवतें. सजीव व्यक्ति सदैव मृताच्या चिंतनात असल्यामुळें मृतवत् होते आणि अशा स्मरणामुळें जणूं निर्जीव व्यक्ति सजीव होऊन सजीवाभोंवतीं वावरत असते.

## १४३ प्रस्थानकलश : 143. Blossom.

**हरिहिइ पिअस्स णवचूअपल्लवो पढममञ्जरिसणाहो ।**
**मा रुवसु, पुत्ति ! पत्थाणकलसमुहसंठिओ गमणम् ॥४३॥**

[ हरिष्यति प्रियस्य नवचूतपल्लवः प्रथममञ्जरीसनाथः ।
मा रोदीः पुत्रि प्रस्थानकलशमुखसंस्थितो गमनम् ॥ ]

मुली, ( पति प्रवासाला निघणार, म्हणून ) खिन्न होऊं नको. ( शुभशकुनासाठीं मी दाराबाहेर ठेवलला ) प्रस्थानकलश ( घराबाहेर पडतांना ) त्याला दिसेल, त्यांतलीं आंब्याचीं कोंवळीं पानें व ताजा मोहोर पाहून ( त्याला वसंताच्या आगमनाची जाणीव होईल आणि ) तो प्रवास रहित करील.

● वसंतातलें वातावरण विलासाला अनुकूल, म्हणून तो प्रवास तहकूब करील असें कुलवधूला विदग्ध सखीचें आश्वासन. अलंकाररत्नाकरात हेतु अलंकाराचें उदाहरण : ' परप्रत्यायकं लिङ्गं हेतुः । '

## १४४ चोरकामुक : 144. Paramour.

**जो कहँ वि मह सहीहिँ छिद्दं लहिऊण पेसिओ हिअए ।**
**सो माणो चोरिअकामुअ व्व दिट्ठे पिए णट्ठो ॥४४॥**

[ यः कथमपि मम सखीभिश्छिद्रं लब्ध्वा प्रवेशितो हृदये ।
स मानश्चोरकामुक इव दृष्टे प्रिये नष्टः ॥ ]

सख्यांच्या प्रोत्साहनामुळें प्रणयकलहाचें छिद्र साधून मान माझ्या हृदयात कसा तरी शिरला. पण पतीला पाहताच चोरकामुकाप्रमाणें मान नष्ट झाला.

● अमरुशतकातील समानार्थी वचन : 'जाता नोत्कलिका कुचौ न लुलितौ गात्रं न रोमाञ्चितं । वक्त्रं स्वेदकणान्वितं न वदनं यावच्छठेनामुना । दृष्टैनैव मनो हृतं धृतिमुषा प्राणेश्वरेणाद्य मे । तत्केनापि निरूप्य माननिपुणो मानः समाधीयताम् ॥' पति कलहान्तरितेचा अनुनय करूं लागला; ती सागते, मी आपण होऊन मान धारण केला नाहीं, मैत्रिणींनीं काहीं तरीच मनात भरवलें, पण आता रुसवा गेला, गोडवा आला.

## १४५ कुसुम्भपुष्पें : 145. Petals.

सहिआहिँ भण्णमाणा थणए लग्गं कुसुम्भपुप्फं ? त्ति ।
मुद्धवहुआ हसिज्जइ पप्फोडन्ती णहवआइं ॥४५॥

[ सखीभिर्भण्यमाना स्तने लग्नं कुसुम्भपुष्पमिति ।
मुग्धवधूर्हस्यते प्रस्फोटयन्ती नखपदानि ॥ ]

मुग्धवधूच्या स्तनावरील नखक्षतें ( युक्तीनें पाहिल्यावर ) पट्टेखोर मैत्रिणींनीं तिला सांगितलें कीं त्यावर कुसुम्भाचीं फुलें चिकटलीं आहेत. ( विचारीला तें खरेंच वाटलें आणि ती टिचकीनें ) फुलें झटकूं लागली, तेव्हां त्या हंसूं लागल्या.

● सख्याचें बोलणें तिला खरें वाटलें, कारण तिनें कुसुम्भाच्या कुञ्जात क्रीडा केली होती. एक टीकाकार सांगतो, ती फुलें वेंचण्याच्या निमित्तानें,

१ चोरिकाकामुक २. उपहस्यते, प्रहस्यते

पण वस्तुतः प्रियकराला भेटण्यासाठीं तिकडे गेली होती, तेथें तिचें शीलखंडन झालें. हा अर्थ लादणें जड वाटतें; कारण, तसें असतें तर सख्यांनीं तिचा उपहास केला असता. कीं कोणत्याही परिस्थितींत समानशील सख्या हंसल्याच असत्या ? आणि फक्त सपत्नांनींच उपहास केला असता ? तिच्या स्तनावर शशप्लुत ( Jump of a Hare ) नखचिन्हें उमटलेलीं होतीं. नागरसर्वस्वात पद्मश्री याचें लक्षण ( २२·४ ) सागतों ' शशप्लुतं पञ्च नखव्रणानि । सान्द्राणि पृष्ठस्तनगुल्फदेशे ॥ स्तनस्य पृष्ठे विरलानि तानि । निगद्यतामुत्पलपत्रमेतत् ॥ ' अनङ्गरङ्गात कल्याणमल्ल सागतोः ' एकपाद शशप्लुतंसर्वनखैः कुचाग्रेः । ' हेतु व अभिनय-अलंकार.

## १४६ अवहेलना : 146. Disdain.

उम्मूलेन्ति व हिअअं इमाइँ रे तुह विरज्जमाणस्स ।
अवहीरणवसविसंठुलवलन्तणअणद्धदिट्ठाइं ॥४६॥

[ उन्मूलयन्तीव हृदयं इमानि रे तव विरज्यमानस्य ।
अवधीरणवशविसंष्ठुलवलन्नयनार्धदृष्टानि ॥ ]

अरे प्रेमहीना, मला टाळू पाहणारी व तिरस्कारानें भरलेली तुझी चंचल व वाकडी नजर पाहिली कीं माझें हृदय जणू उन्मळून पडतें.

## १४७ कर्मभोग : 147. Punishment.

ण मुआन्ति दीहसासं, ण रुआन्ति चिरं, ण होन्ति किसिआओ ।
धण्णाओ ताओ जाणं बहुवल्लह ! वल्लहो ण तुमम् ॥४७॥

१ अवहीरअसविसठुल २ अवधीरितसविसष्ठुल ३ विरहाकिसिआओ

[ न मुञ्चन्ति दीर्घश्वासान्न रुदन्ति चिरं न भवन्ति कृशाः ।
धन्यास्ता यासां बहुवल्लभ वल्लभो न त्वम् ॥ ]

हे बहुवल्लभ, तूं ज्यांचा वल्लभ नाहींस त्या स्त्रिया धन्य होत. त्यांना ( आमच्याप्रमाणें ) दीर्घ निःश्वास टाकावे लागत नाहींत, चिरकालपर्यंत अश्रु ढाळावे लागत नाहींत आणि कृश अवस्था प्राप्त होत नाहीं.

● आम्हीं तुझ्या नादीं लागलों व फसलों, शारीरिक स्वास्थ्य व मानसिक समाधान गमावून बसलों ! निराशेमुळें उसासे टाकावे, आठवणी काढून रडावें आणि जागरणें करून झिजावें, हेंच तुझ्यावरील आमच्या प्रेमाचें फळ !

## १४८ तिरछी नजरियां : 148. Glance·

णिद्दालसपरिघुम्मिरतंसवलन्तद्धतारआलोआ ।
कामस्स वि दुव्विसहा दिट्ठिणिआवा ससिमुहीए ॥४८॥

[ निद्रालसपरिघूर्णनशीलतिर्यग्वलदर्धतारकालोकाः ।
कामस्यापि दुर्विषहा दृष्टिनिपाताः शशिमुख्याः ॥ ]

( पहाटेच्या अंधुक प्रकाशांत ) पापण्या अर्धवट उघडून चंद्रमुखी मजकडे रोखून पाहत आहे. रात्रीच्या जागरणामुळें तिची नजर अजून सुस्त आहे; तिरकी, अस्थिर, भिरभिरती आहे. असा दृष्टिक्षेप प्रत्यक्ष मदनालाहि असह्य होईल.

● त्या नजरेंत काय नाहीं ? भूत, भविष्य व वर्तमान; तृप्ति, अपेक्षा व स्मृति; तृप्तीची सुस्ती व अतृप्तीची मस्ती; स्वप्नाची चंचल तरलता व सिद्धीची जड वास्तवता !

१. विरहकृशा·

## १४९ निरगांठ : 149 Entanglement.

जीविअसेसाइ मए गमिआ कहँ कहँ वि पेम्मदुद्दोली।
एह्नि विरमसु, रे डड्ढहिअअ, मा रज्जसु कहिं पि ॥४९॥

[ जीवितशेषया मया गमिता कथ कथमपि प्रेमदुर्दोली।
इदानीं विरम रे दग्धहृदय मा रज्यस्व कुत्रापि ॥ ]

मी आतापर्यंत कसानसा जीव धरून राहिलें आहे व प्रेमाची निरगाठ उकल ढिली नाहीं, दुष्ट हृदया, आता तरी थांब आणि यापुढें कोठेंही गुंतू नको.

● निषेधातही अनुराग. गंगाधर सांगतो, ही अनुरक्ति व्यभिचारी असावी. वस्तुत पतिपत्नींचा धर्मसंबंध हाच निरगाठीसारखा असतो. आणि जणू म्हणूनच त्यातून सुटण्यासाठीं स्त्री-पुरुष धडपडत असतात !

## १५० पूजा : 150. Admiration.

अज्जाएँ णवणहक्खअणिरीक्खणे गरुअजोव्वणुत्तुङ्गम्।
पडिमागअणिअणअणुप्पलच्चिअं होइ थणवट्टम् ॥५०॥

[ आर्याया नवनखक्षतनिरीक्षणे गुरु यौवनात्तुङ्गम्।
प्रतिमागतनिजनयनोत्पलार्चितं भवति स्तनपृष्ठम् ॥ ]

विशाल व यौवनामुळें उत्तुंग अशा आपल्या स्तनावरील ताजीं व पहिलीं नखक्षतें आर्येनें कौतुकानें पाहिलीं, तेव्हां तिच्या स्तनपृष्ठावर तिच्या नील नेत्राचें प्रतिबिंब उमटलें, जणू तिनें त्याची नीलकमलानीं पूजा केली.

---

१ दुद्दोगी, ददोलि २ णवणहक्खणिविक्खणे ३ स्तनतट, स्तनपट्टम्

● आरक्त कमलदलांची नीलोत्पलांनी पूजा बांधली. जें असाधारण तेंच विशेष आकर्षक वाटतें, उदाहरणार्थ नीलनेत्र !

## १५१ कौस्तुभ : 151. Jewel.

तं णमह जस्स वच्छे लच्छिमुहं कोत्थुहम्मि[1] संकन्तम् ।
दीसइ मअपरिहीणं ससिबिम्बं सूरबिम्ब[2] व्व ॥५१॥
[ तं नमत यस्य वक्षसि लक्ष्मीमुखं कौस्तुभे संक्रान्तम् ।
दृश्यते मृगपरिहीनं शशिबिम्बं सूर्यबिम्ब इव ॥ ]

ज्याच्या वक्षस्थलावरील ( हारामधील ) कौस्तुभ-रत्नांत प्रतिबिंबित झालेलें लक्ष्मीचें मुख – निष्कलंक चंद्राचें प्रतिबिंब सूर्यावर उमटावें तसें दिसत आहे, त्याला नमस्कार असो.

● गंगाधर सांगतो, स्त्रीसेवाविमुख नायकाला अभिमुख करण्यासाठीं आणि विपरीतरताविषयीं अनभिज्ञ असलेल्या नायिकेच्या शिक्षणासाठीं दूतीनें हें विपरीतावस्थेंतील लक्ष्मीचें वर्णन केलेलें आहे. ही टीका निःसंशय विपरीत आहे !

## १५२ मान : 152. Conceit.

मा कुण पडिवक्खसुहं अणुणेहि पिअं पसाअलोहिल्लम्[4] ।
अइगहिअगरुअमाणेण पुत्ति रासि व्व छिज्जिहिसि[3] ॥५२॥
[ मा कुरु प्रतिपक्षसुखमनुनय प्रियं प्रसादलोभयुतम् ।
अतिगृहीतगुरुकमानेन पुत्रि राशिरिव क्षीणा भविष्यसि ॥ ]

१. कोत्थहम्मि, कोथु, कोछ, कोछु. २. सुरबिम्बे. ३ सिज्झिहिसि, झिज्जिहिसि. ४. प्रसादलोभितम्, लोभयुक्तम्.

मुली, फार मान धरूं नको, ज्यामुळें तुझ्या सवतींनाच आनंद होईल असें वागू नको. प्रियकराची मनधरणी कर; त्याला अनुनयाची आवड आहे. धान्याची रास कितीही मोठी असली तरी मोठ्या मापानें तिच्यातलें धान्य काढलें तर तीही क्षीण होते, त्याप्रमाणें या मानामुळें तुझी तूच क्षीण होशील.

● रास कितीही मोठी असली तरी तिच्यावर मोठें वजन ठेवलें म्हणजे ती खचते, असा या गाथेचा आशय आहे असें गंगाधर सांगतो. राशींतलें धान्य मोठ्या मापानें काढलें असता ती ओसरते, हा अर्थ अधिक अन्वर्थक वाटतो. प्रियकर व प्रेयसी यांचें एकमेकावर कितीहि प्रेम असलें तरी रुसव्यामुळें त्याला ओहोटी लागते, असा आशय.

## १५३ काजळ : 153. Collyrium.

विरहकरवत्तदूसहफालिज्जंन्तम्मि तीअ हिअअम्मि ।
अंसू कज्जलमइलं पमाणसुत्तं व्व पडिहाइ ॥५३॥

[ विरहकरपत्रदु सहपाट्यमाने तस्या हृदये ।
अश्रु कज्जलमलिन प्रमाणसूत्रमिव प्रतिभाति ॥ ]

[1] तिला विरह दु सह झाला आहे. काजळामुळें काळवडलेले अश्रु तिच्या हृदयावर ओघळले आहेत व त्यानीं उमटलेली काळसर रेषा जणू प्रमाण दर्शविण्यासाठीं अरेकसानें ओढलेल्या रेषेसारखी दिसत आहे; जणू विरहवेदनाच्या करवतीनें तिचें हृदय कापलें जात आहे.

● लाकूड कापण्यासाठीं अरेकस त्यावर कोळशाची रेघ अजूनही ओढतात. तिचें हृदय कापलें जात होतें व त्यासाठीं जणू प्रमाण रेषा तिची तिनेंच आखली होती.

१ पत्त २ फाडिज्जन्तस्स तीअ हिअअस्स ३. सकज्जलमिस्स

१५४ आकर्षक :		154. Depcsit.

दुण्णिक्खेवअमेअं, पुत्तअ ! मा साहसं करिज्जासु ।
एत्थ णिहिताइँ मण्णे हिअआइँ पुणो ण लब्भन्ति ॥५४॥

[ दुर्निक्षेपकमेतत्पुत्रक मा साहसं करिष्यसि ।
अत्र निहितानि मन्ये हृदयानि पुनर्न लभ्यन्ते ॥ ]

पुत्रा, असें साहस करूं नको. अशा आकर्षक ठिकाणीं हृदय गुतविलें कीं परत न मिळणाऱ्या ठेवीप्रमाणें तें कधींही परतून येत नाहीं.

● ज्या सावकाराचे व्याजाचे दर आकर्षक असतात व गिऱ्हाइकाची सरबराई चाललेली असते तेथेंच ठेवी ठेवावयास लोक उत्सुक असतात, पण शेवटीं तेथें मुद्दलही बुडतें. व्यवहारकुशल लोक अशा सावकाराबद्दल सावधगिरीचीच सूचना देतात. सुंदर व विदग्ध, म्हणून आकर्षक, अशा स्त्रियांना आपण आपलें अंतःकरण अर्पण करतों, पण त्या प्राप्त होत नाहींत आणि हृदयही परतून येत नाहीं; म्हणून सावधगिरीची सूचना, कीं पुत्रा, ती फार आकर्षक आहे, तिच्यापासून दोन पावलें दूरच राहा.

१५५ अथाङ्ग :		155 Innocent.

णिव्वुत्तरआ वि वहू सुरअविरामट्ठिइं अआणन्ती ।
अविरअहिअआ अण्णं पि किं पि अत्थि त्ति चिन्तेइ ॥५५॥

[ निर्वृत्तरतापि वधू सुरतविरामस्थितिमजानंती ।
अविरतहृदयान्यदपि किमप्यस्तीति चिन्तयति ॥ ]

१. दुणेक्खव २ उणो ३ विणिवुत्त ४ अवगान

ती स्वत तृप्त झालेली आहे, पण सुरताची विरामस्थिति अनुभविलेली नसल्यामुळें आणि तुला तृप्त करावयाची इच्छा असल्यामुळें सुरत संपूर्ण झालें तरी या समारभात आणखी काहीं तरी ( विधि ) असेल अशी त्या अजाणतीची समजूत आहे

● मुग्धा नायिका. संशयग्रस्त होऊ नको किंवा खंत करू नको. तुझ्याकडे काहीं दोष नाहीं, त्याचप्रमाणें तिच्याकडेही. ती स्वत संतुष्ट झालेली आहे, तुला संतुष्ट करावयास ती विशेष तत्पर आहे, एवढेंच !

## १५६ वेश्यांचें प्रेम : 156 Hail Harlot

णन्दन्तु सुरअसुहरसतह्लावहराइं सअललोअस्स ।
बहुकैअवमग्गविणिम्मिआई वेसाणँ पेम्माइं ॥५६॥

[ नन्दन्तु सुरतसुखरसतृष्णापहराणि सकललोकस्य ।
बहुकैतवमार्गविनिर्मितानि वेश्याना प्रेमाणि ॥ ],

सर्व ( प्रकारच्या ) लोकाची सुरतसुखाची तहान भागवणारें आणि अनेक लबाड्यानीं भरलेलें वेश्याचें प्रेम विजयी होवो

● प्रशंसेतही निंदा गर्भित आहे वेश्याचें प्रेम सकल लोकाची, म्हणजे उत्तम, मध्यम, कनिष्ठ पुरुषाची तृष्णा हरण करतें, इतकेंच नव्हे, ज्याची ज्या वेळीं जशी वृत्ति तशी तिला अनुकूल साथ देण्यात त्या पटाईत असतात, कारण कालपरत्वें व कारणपरत्वें मनुष्याच्या वृत्तींतही क्षणिक बदल होत असतात सुरत द्विविध असतें, बाह्य व अभ्यतर बाह्य सुरतात वेश्या विशेष प्रवीण असतात, कारण जोडीदाराला त्यातच अधिक गोडी वाटते, हें त्याना

१ बहुमग्गविणिम्मिआइ २ सुरआइ ३ शुभ ४ सुरते सुरभसाणि
५ बहुपतिकाना मार्ग विनिर्मितानि

ठाऊक असतें. गृहिणी प्रेमासक्त व विदग्ध असली तरी कौटुंबिक जीवनाच्या मर्यादांमुळें ती परतंत्रच असणार. तिच्या विलासांत विविधता, निःशंकता व आवेश कसा असणार ? आणि लबाडी तर मुळींच नाहीं. पुरुषाच्या मागण्या किती विविध व केव्हांकेव्हां किती अस्वाभाविक असतात हें मनोविश्लेषण-शास्त्राचे तज्ज्ञ जाणतात; आणि वेश्या त्याचे सर्व आग्रह पुरवितात, म्हणूनच त्या पुरुषांना प्रिय वाटतात. त्या प्रेम करतात व करवितात, एवढेंच नव्हे, प्रेम प्रत्यक्ष निर्माण करतात.

## १५७ मत्सर : 157. Jealousy.

अप्पत्तमण्णुदुक्खो किं मं किसिअत्ति पुच्छसि हसन्तो ?।
पावसि जइ चलचित्तं पिअं जणं ता तुह कहिस्सम्[1] ॥५७॥

[ अप्राप्तमन्युदुःखः[2] किं मां कृशेति पृच्छसि हसन्।
प्राप्स्यसि यदि चलचित्तं प्रियं जनं तदा तव कथयिष्यामि[3] ॥ ]

तूं कृश कां झालीस, असें तुम्ही मला हंसून विचारतां. (संताप येतो, पण इलाज चालत नाहीं, अशा ) क्रोधाचें दुःख तुम्हांला माहीत नाहीं. चवचाल वृत्तीच्या पण प्रिय वाटणाऱ्या स्त्रीच्या प्रेमपाशांत तुम्ही गुरफटाल तेव्हां मी तुम्हांला माझ्या कृशतेचें कारण सांगेन.

● प्रियापराधजनितश्चित्तक्षोभो मन्युः ।

## १५८ इषारा : 158. Warning.

अवहत्थिऊण सहिजम्पिआइँ जाणं कएण रमिओसि[4] ।
एआइँ ताइँ सोक्खाइँ, संसओ जेहिँ जीअस्स ॥५८॥

१. पुच्छिस्सम्. २. मानदुःख ३. प्राप्नुहि यावच्चलचित्तं प्रियं जनं तावत्प्रक्ष्यसि ।
४. एक्क ण, कए तुमं रमिओ.

[ अपहस्तयित्वा सखीजल्पितानि येषां कृतेन रमितोऽसि ।
एतानि तानि सौख्यानि संशयो येर्जीवस्य ॥

सख्याचा इषारा न जुमानता ज्या सुखासाठीं मी तुला रमविलें तें तर मला मिळालें नाहींच, तुझ्यामुळें माझें जीवन मात्र धोक्यात आलें

● किंवा, सख्याचा सल्ला झुगारून मी तुला सतुष्ट केलें नाहीं – यामुळें सुख तर मिळालें नाहींच जीव मात्र धोक्यात आला जें करू नये तें केलें किंवा जें करावें तें केलें नाहीं म्हणजे जें होऊ नये तें होतें

## १५९ घर मोकळें : 159 At Home

ईसालुओ पई से रत्तिं महुअं ण देइ उच्चेउम् ।
उच्चेइ अप्पण च्चिअ माए ! अइउज्जुअसुहाओ ॥५९॥

[ ईर्ष्याशील पतिस्तस्या रात्रौ मधूकं न ददात्युच्चेतुम् ।
उच्चिनोत्यात्मनैव मातरतिऋजुकस्वभाव ॥

आई ग, तिचा पति इतका संशयी आहे कीं मधूकाचीं पुष्पें वेंचण्यासाठीं तो तिला रात्रीं बाहेर जाऊ देत नाहीं आणि इतका सरळ स्वभावाचा आहे कीं ( तिच्यासाठीं ) तो ( रात्रीं अपरात्रीं रानावनात हिंडून ) स्वत च फुलें गोळा करून आणतो

● मधूक-निकुञ्जात संकेत ठरला होता, तिकडे न जाता तिच्या घरींच जा, अशी दूतीची नायकाला सूचना कीं घर तिच्यावर टाकून तिच्या पतीला दुसरीकडे जावयाचें होतें ! गंगाधर सांगतो, शेजारणीच्या वर्णनाच्या निमित्तानें दूती मधूककुञ्जात संकेत देत आहे

१ अपहस्त्य २ कृते त्वं रमित, कृते न रमितोऽसि ३ अपच्चेतुम्

## १६० पदराला धरूं नको, सोड ! : 160. Scarf.

अच्छोडिअवत्थद्धन्तपत्थिए[1] मन्थरं तुमं वच्च ।
चिन्तेसि थणहराआसिअस्स मज्झस्स वि ण भङ्गम् ? ॥६०॥

[ बलादाकृष्टवस्त्रार्धान्तप्रस्थिते[2] मन्थरं त्वं व्रज ।
चिन्तयसि स्तनभरायासितस्य मध्यस्यापि न भङ्गम् ॥ ]

तूं घाईनें जायला निघाली आहेस, म्हणून मी तुझा पदर जोरानें ओढून धरला आहे. आता निदान हळूं तरी चाल; नाहीं तर स्तनांच्या भारानें आधींच लवलेली तुझी कंबर नाहीं का मोडणार ?

● तूं माझें मन मोडून जाऊं नकोस, हिसकाहिसक केलीस तर बिचारी पातळ कमर मात्र मोडेल !

## १६१ पाणपोई : 161. Water-Stand.

उद्धच्छो पिअइ जलं जह जह विरलङ्गुली चिरं पहिओ ।
पावालिआ[3] वि तह तह धारं तणुइं पि तणुएइ ॥६१॥

[ ऊर्ध्वाक्षः पिबति जलं यथा यथा विरलाङ्गुलिश्चिरं पथिकः ।
प्रपापालिकापि तथा तथा धारां तनुकामपि तनूकरोति[4] ॥

पाणपोईवरील पाणी घालणारी स्त्री ( तहानलेल्या ) पथिकाच्या ओंजळींत पाणी ओतीत आहे. त्यानें तिच्यावर नजर रोंखली आहे. ओंजळीचीं बोटें तो विरल करीत आहे व पाण्याची धार ती अधिकाधिक बारीक करीत आहे.

---

१. अक्कोलिअ, अक्कोडइ, अंछोडिअ. २. वर्धैकदेश ३. पपापालिआ, पावलिआ. ४. तन्वीमपि तन्वीं करोति.

● पाणपोईवर पुष्कळ माणसें असावींत; म्हणून तर हे संकेत चालले आहेत. ती त्याच्यावर अनुरक्त झाली, त्याचें सान्निध्य अधिक काळपर्यंत लाभावें म्हणून तिनें पाण्याची धार बारीक केली. तो तहानलेला होताच. ऊर्ध्व दृष्टीनें तो तिचे हावभाव हेरीत होता; त्यानें तिचें इङ्गित ओळखलें आणि तिच्या संकेताला मान्यता दर्शविण्यासाठीं त्यानें बोटें विरळ केलीं. आजूबाजूच्या कोणाला संशय आलाच तर अडाणीपणाची सबब आहेच. अलंकारकौस्तुभात अन्योन्य अलंकाराचें उदाहरण : 'अन्योन्यं वस्तूना परस्परोपकर्तृहेतुत्वे।' श्री अप्पय्य दीक्षितांनीं कुवलयानन्दात ( निर्णयसागरः पृ. ११४ ) याच वचनाचा अनुवाद दिलेला आहे, 'यथोर्ध्वाक्षः पिबत्यम्बु पथिको विरलाङ्गुलिः । तथा प्रपापालिकापि धारां वितनुते तनुम् ॥' श्री. ताम्बे यांनीं याच गाथेवरून 'पाणपोईवाली' ही कविता ( समग्र कविताः पृ. २६६, क्र. २०५ ) लिहिलेली आहे कीं काय ? "झाली तीं ओणवी, तों पदर उरीं सरे ढैल झाला झुले तो । पाणी दे पाणपोई जवळ उभि, पिता, ऊर्ध्वदृष्टी फुले तो ! बोटें तीं ओंजळीचीं विरळ, मग तिची धार बारीक झाली, मद्येच्छू काय पीतो अविचल, मदिराक्षी तरी काय झाली ।"

## १६२ दोघांचें प्रेम, तिसऱ्याचा लाभ : 162 Disguise.

**भिच्छाअरो[1] पेच्छइ णाहिमण्डलं, सावि तस्स मुहअन्दम् ।**
**तं चडुअं-अ करङ्कं[2] दोह्न वि काआ विलुम्पन्ति ॥६२॥**

[ भिक्षाचरः प्रेक्षते नाभिमण्डलं सापि तस्य मुखचन्द्रम् ।
तच्चटुकं च करङ्कं द्वयोरपि काका विलुम्पन्ति ॥ ]

तो भिक्षेकऱ्याला वाढीत आहे तो तिचें नाभिमण्डल पाहत आहे व ती त्याचा मुखचंद्र, आणि दोघांच्याही हातातील पात्रें कावळे उडवीत आहेत.

---

१ भिक्खॉयरो २ तच्च चटुक करङ्क

● नणंदाजावानीं भरलेल्या घरातल्या प्रियेचें दर्शन कसें घ्यावयाचें! त्यानें भिक्षेकऱ्याचा वेष घेतला व दारासमोरून आवाज दिला. ओळख पटताच त्याची प्रिया स्वत च त्याला वाढावयास आली व भान विसरली. सूनबाई एवढा वेळपर्यंत कोठें रेंगाळल्या, म्हणून चौकशी सुरू झाली. तेव्हा कोणी तरी चुगली केली. प्रियकराच्या अचानक दर्शनामुळें तिचें वस्त्र शिथिल झालें व नाभिमण्डल उघडें पडलें. दोघेंही बेभान झालेलीं पाहून कावळ्यानीं अन्नावर ताव मारला. भिन्न पाठ : सा तस्स पेच्छइ मुह भिक्खयरो णाहिमण्डल तिस्सा । दोण्हं पि कइकुं चट्टुअ च काया विलुपंति ॥

## १६३ जीवनाधार :  163. Fire.

जेण विणा ण जिविज्जइ अणुणिज्जइ सो कआवराहो वि ।
पत्ते वि णअरदाहे भण कस्स ण वल्लहो अग्गी ॥६३॥

[ येन विना न जीव्यतेऽनुनीयते स कृतापराधोऽपि ।
प्राप्तेऽपि नगरदाहे भण कस्य न वल्लभोऽग्निः ॥ ]

ज्याच्यावाचून जीवन जगताच येत नाहीं त्यानें अपराध केला तरी उलट त्याचीच मनधरणी करावी लागते. आगीमुळें गाव जळून जाण्याचा समय आला तरी अग्नि कधीं कोणाला अप्रिय होईल काय?

● मुळातील प्रयोगाचा शब्दशः अर्थ : ' सांग, अग्नि कोणांचा वल्लभ नाहीं ? ' अग्नि हा प्रसिद्ध पारदारिक, स्त्रीजनाचा आद्यवल्लभ आहे, असा संकेत आहे.

## १६४ कुग्रामनिंदा :  164. Reproach.

वग्ग को पुलइज्जउ, कस्स कहिज्जउ सुहं व दुक्खं वा ।
केण समं व हसिज्जउ, पामरपउरे हअग्गामे ॥६४॥

१ प. वरिय २ पच्चमाइ ३ हिदगिन्जइ

[ यत्रं कः प्रलोक्यतां कस्य कथ्यतां सुख वा दुःख वा ।
केन समं वा हस्यतां पामरप्रचुरे हतग्रामे ॥ ]

क्षुद्र माणसांनीं भरलेल्या या कुग्रामांत मी वांकड्या नजरेनें कोणाकडे पाहूं ? सुखदुःखें कोणाला सांगूं ? आणि कोणाबरोबर हंसूं ?

● स्वच्छंदचारिणी खेड्यात गेली व तेथील जीवनाला उबगली. अचानक पूर्वपरिचित मित्र भेटला; त्यानें कुशल विचारलें, त्याला उत्तर. ग्रामनिंदेच्या निमित्तानें स्वतःच्या वैदग्ध्याची सूचना.

## १६५ नांगराची पूजा : 165. Plough-Worship.

फलहीवाहणपुण्णाहमङ्गलं लङ्गले कुणन्तीए ।[1]
असईअ मणोरहगब्भिणीअ हत्था थरहरन्ति ॥६५॥

[ कार्पासीक्षेत्रपुण्याहमङ्गलं लाङ्गले कुर्वत्याः ।
असत्या मनोरथगर्भिण्या हस्तौ थरथरायेते ॥ ]

कपाशीच्या शेतात पेरणी सुरू करण्यापूर्वी नांगराची पूजा करतांना मनोरथाच्या आवेगामुळें शेतकऱ्याच्या छिनाल स्त्रीचा हात थरथरतो.

● मनोविकार प्रबळ झाले म्हणजे शरीर आपोआपच थरथरतें. शेत पिकलें म्हणजे त्याच्या आडोशाला काय काय करावयाचें हें तिनें अगोदरच ठरवून ठेवलें होतें. कीं तिला गेल्या हंगामाची आठवण झाली ? शेतात पेरणी होण्यापूर्वीच ती मनोरथगर्भिणी झाली होती, हा शब्दप्रयोग आकर्षक वाटतो. नांगराच्या पूजेच्या वेळींही मनोरथाना प्रेरणा व्हावी, हा विषय आधुनिक मनोविश्लेषणाला योग्य आहे ! नांगराची पूजा चालली आहे, पण आसपास ब्राह्मण दिसत नाहीं !

---

१. वलहीगहन, पलहीवाडय.

## १६६ युक्ति : 166. Ruse.

पहिउल्लूरणसङ्काउलाहिँ असईहिँ बहलतिमिरस्स ।
आइंप्पणेण णिहुअं वडस्स सित्ताइँ पत्ताइं ॥६६॥

[ पथिकच्छेदनशङ्काकुलाभिरसतीभिर्बहलतिमिरस्य ।
आलेपनेन निभृतं वटस्य सिक्तानि पत्राणि ॥ ]

गर्द छाया असलेल्या वडाचीं पानें वाटसरू खुडतील या शंकेनें व्याकुल झालेल्या छिनाल स्त्रियांनीं त्याच्या पानांवर घोळून पिठाचें पाणी शिंपडलें.

● वाटसरूंनीं पत्रावळीसाठीं पानें तोडलीं तर आपलें संकेतस्थान नष्ट होईल अशी त्यांना धास्ती वाटली. पिठाच्या पाण्यामुळें वाटसरूंना अस्वच्छतेची शंका येईल व ते दुसरीकडे उतरतील अशी त्यांची अपेक्षा.

## १६७ धार्मिक : 167. Vigilant.

भअन्तस्स वि तुह सग्गगामिणो णइकरञ्जसाहाओ ।
पाँआ अज्ज वि धम्मिअ ! तुह कहँ धरणिं विह छिवन्ति ॥६७॥

[ भञ्जतोऽपि तव स्वर्गगामिनो नदीकरञ्जशाखाः ।
पादायद्यापि धार्मिक तव कथं धरणीमिव स्पृशतः ॥ ]

१ अलपणेण २ आतपणेन. ३ गवस्स. ४ कण कह पाआ अज्ज वि धम्मिअ धरणिं । दोण्णि वि धम्मिअ अज्ज वि धरणिं छिअ. ५. तव कथं पादायद्यापि धार्मिक धरणीमिव.

नदीकाठच्या करञ्ज वृक्षाच्या फांद्या तू तोडल्यास ? हे धार्मिका, तुला स्वर्गात जाण्याची इच्छा आहे ना ? मग अजून तुझे पाय जमिनीवर कसे आहेत ?

● तू मरत का नाहीस ? दुसऱ्याच्या संकेतस्थानाचा भंग करणारा मनुष्य अवश्य धार्मिकच असला पाहिजे ! धर्माच्या नावाखाली अशी पापे करणारा स्वर्गाला जात नाही, अधोगतीलाच जातो. एक टीकाकार सांगतो, धार्मिकाने करंजाच्या शाखा दंतधावनार्थ तोडल्या. हे शक्य दिसत नाही. करंजाची झाडे बहुश: नदीतीरावर असतात; तेथे कोणा स्वैरिणीचे संकेतस्थान होते. त्याचे सुख पाहवले नाही म्हणून म्हणा, किंवा अधार्मिक अनाचाराला अवसर मिळूं नये म्हणून म्हणा, धार्मिकाने पुष्कळ फांद्या तोडून संकेतस्थान उध्वस्त केले, आणि म्हणूनच तिचा एवढा संताप झालेला असावा. आणखी एक टीकाकार सांगतो : करंजाच्या झाडाखाली एक शिवलिंग होते. त्याची पूजा करण्याच्या निमित्ताने ती तिथे जाई व पुष्कळ वेळपर्यंत पूजा करीत बसे. तिच्या देवाला चांगली सावली होती. ती या दुष्ट पुजाऱ्याने नष्ट केली, म्हणून तिचा संताप झाला. प्राकृतापेक्षा प्राकृतात सांगावयाचे म्हणजे ती म्हणाली असेल, तुझा मुडदा गेला ! स्त्रीवेदासहया एकाद्या दुसऱ्या कथेवर ही गाथा आधारलेली असावी.

## १६८ औत्सुक्य : 168 Embankment·

अच्छउ दाव मणहरं पिआइ मुहदंसणं अइमहग्घम् ।
तग्गामछेत्तसीमा वि झत्ति दिट्ठा सुहावेइ ॥६८॥

[ अस्तु तावन्मनोहरं प्रियाया मुखदर्शनमतिमहार्घम् ।
तद्ग्रामक्षेत्रसीमापि झटिति दृष्टा सुखयति ॥ ]

१ चित्ता, छित्त २ ज्झत्ति, झत्ति, झ्झत्ति

प्रियेच्या अलभ्य, अमूल्य व मनोहर दर्शनाचा आनंद तर राहू द्या, ती राहते त्या गावातल्या शेताचा वारा दिसला तरी दृष्टीला सुख वाटतें

● आत्मनिष्ठ आवडीमुळें आपण वस्तुस्थितीवर आकर्षकतेचा आरोप करतों आसक्ति ओसरली कीं प्रत्यक्ष अगदीं रूक्ष वाटतें तो बाध पाहताच सुख का वाटतें ? वाटतें, कीं संधि सापडताच आपण तिला येथें घेऊन येऊ व बाधाऱ्या आडोशाला बसून तिच्याशीं चार गोष्टी करू

## १६९ मृतभार्या : 169 Rustic

णिक्कम्माहि॑ वि छेत्ताहि॑ पामरो णेअ वच्चए वसइम् । D
मुअपिअजाआसुण्णइअगेहदुःक्खं परिहरन्तो ॥६९॥ *

[ निष्कर्मणोऽपि क्षेत्रात्पामरो नैव व्रजति वसतिम् ।
मृतप्रियजायाशून्यीकृतगेहदुःखं परिहरन् ॥ ]

प्रिय पत्नी मृत झाल्यामुळें शून्य झालेल्या घरीं जाण्याचें दुःख नको म्हणून बिचारा शेतकरी काम नसलें तरी शेतातच वस्ती करतो

● तो बिचारा गरीब आहे व नागऱ्या आहे म्हणून त्याचें कोणी कौतुक करीत नाहीं आणि तुम्हीं ! तुमची भार्या जिवत आहे व ती तुमच्या छदानुसार वागणारी आहे, तरी तुम्हीं बाहेरच भटकत असता— आणि तुमचें मात्र सर्वत्र कौतुक चाललें आहे ! कारण तुम्ही विदग्ध आहात !

## १७० झञ्झावात : 170 Storm

झञ्झावाउत्तिण्णिअघरविवरपलोट्टसलिलधाराहिं । D
कुड्डलिहिओहिदिअह रक्खइ अज्जा करअलेहिं ॥७०॥

१ चित्ताहि छित्ताहि २ मञ्झावाउच्छलिअघर ३ मुद्धा

[ झञ्झावातोत्तृणीकृतगृहविवरप्रपतत्सलिलधाराभिः ।
कुड्यलिखितावधिदिवसा रक्ष्यन्त्यार्या करतले ॥ ]

झझावातामुळें छपरावरील गवत उडून गेलें व छिद्रातून गळणाऱ्या पाण्याच्या धारामुळे भिंतिवर काढलेल्या पतींच्या प्रवासाचे राहिलेले दिवस मोजण्याचीं चिन्हें धुपून जाऊ लागलीं तेव्हा त्यावर आपले हात धरून आर्या त्याचें रक्षण करू लागली.

● विरहकालाचे दिवस मोजण्यासाठीं देहलीवर पुष्पें ठेवणारी कालिदासाची नायिका ( मेघदूत २-२७ ) गाथासप्तशतींतील नायिकाहून जास्त सुशिक्षित व उत्तरकालीन दिसते.

## १७१ माकडचेष्टा : 171. Mustard.

गोलाणइए कच्छे चक्खन्तो राइआइ पत्ताइं ।
उप्फडइ मक्कडो खोक्खएइ पोट्टं अ पिट्टेइ ॥७१॥

[ गोदावरीनद्या कच्छे चर्वयन्राजिकाया पत्राणि ।
उत्पतति मर्कटः खोक्खशब्दं करोत्युदरं च ताडयति ॥ ]

माकडानें मोहरींचीं पानें खाल्लीं गोदावरीच्या काठावर आता तें खोखरत आहे, पोट पिटीत आहे आणि या फांदीवरून त्या फांदीवर उड्या मारीत आहे

● त्या माकडासारखीच नायकाची अवस्था झाली आहे, आपण कोठें आहोंत तें तुला कळावें म्हणून तो सारखा खोकत आहे, तू कोठें आहेस तें कळावें म्हणून झाडावर चढून आजूबाजूला पाहत आहे संकेताप्रमाणें त्याची त्वरित भेट घे अशी नायिकेला सूचना आणि चिडल्या माकडाच्या धास्तीनें तिकडे फिरकू नये म्हणून इतराना धोक्याची सूचना

१ वर्षावातोच्छलितगृहविवरप्रवर्तमानसलिल, झञ्झावातोत्तृणितगृहविवरप्रत्यावर्तमानसलिलधाराभ्यः २ उत्तानितः ३ चिक्खन्तो ४ उप्फडइ, उप्फिडइ

## १७२ घंटांची माळ : 172. Row of Bells.

गहवइणा मुअसेरहहुण्डुअदामं चिरं वहेऊण।
वग्गसआइं णेउण णवरिअ अज्जाघरे बद्धम् ॥७२॥
[ गृहपतिना मृतसैरिभवृहद्घंटादाम चिरमूढ्वा।
वर्गशतानि नीत्वानन्तरमार्यागृहे बद्धम् ॥ ]

आपल्या मेलेल्या रेड्याच्या गळ्यातील मोठ्या घंटाची माळ तशाच एकाद्याच्या गळ्यांत घालावी म्हणून घरधन्यानें ती शेकडों कळपांकडे नेली आणि नंतर त्यानें ती चण्डिकेच्या देवळात बांधली.

● त्या घंटाच्या जोगता रेडा त्याला कोठें आढळला नाही. ' मृतस्य अलंकारादिक देवब्राह्मणयोर्देयम् इति धर्मः । ' तो अडाणी असूनही धर्माचरण करीत आहे आणि तुम्ही ? तुम्ही तर आपल्या जिवंत भार्येचे अलंकार क्षणिक सुखासाठीं दुसरीला देण्याला सज्ज झाला आहात.

## १७३ मोरपीस : 173. Peacock Feathers.

सिहिपेहुणावअंसा वहुआ वाहस्स गव्विरी भमइ।
गअमोत्तिअरइअपसाहणाणँ मज्झे सवत्तीणम् ॥७३॥
[ शिखिपिच्छावतंसा वधूर्व्याधस्य गर्विता भ्रमति।
गजमौक्तिकरचितप्रसाधनानां मध्ये सपत्नीनाम् ॥ ]

१. दुदुभदामे. २. मग्गसयामि. ३. डण्डुम. ४. यूथ. ५ जेहुणा. ६ सिहिपिच्छकण्णऊरा. ७ गह ८ मुत्ताफल. ९. काव्यानुशासन व ध्वन्यालोक यातील पाठ सिहिपिच्छकण्णऊरा जाआ वाहस्स गव्विरी भमइ। मुत्ताफलरइअपसाहणाणँ मज्झे सवत्तीण ॥ १०. कर्णपूरा ११. मुक्ताफल.

हत्तींच्या गंडस्थळांतील मोत्यांचे अलंकार सवतींनीं धारण केले आहेत. व्याधाची नवी वधू मात्र मोरपिसांचा तुरा धारण करून त्यांच्यामध्यें गर्वानें मिरवत आहे.

● नव्या नवरीच्या नादानें व्याध इतका दुबळा झाला की आता तो फक्त मोरांचीच शिकार करूं शकतो, हत्तींच्या वाटेला जात नाहीं; त्याची शक्ति नष्ट झाल्याबद्दल तिला खेद वाटत नाहीं, कारण त्याच्या दौर्बल्याच्या भावी परिणामाची तिला कल्पना नाहीं. तो आपल्या आधीन आहे, यांतच तिचा आनंद व अभिमान आहे, मग तो किती का अविवेकी असेना !

१७४ षोडशी : 174. Sweet Sixteen.

वङ्कच्छिपेच्छिरीणं उङ्कल्लविरीणँ वङ्कभमिरीणम्।
उङ्कहसिरीणँ पुत्तअ पुण्णेहिँ जणो पिओ होइ ॥७४॥

[ वक्राक्षिप्रेक्षणशीलानां वक्रोल्लपन[1]शीलानां वक्रभ्रमणशीलानाम्।
वक्रहासशीलानां पुत्रक पुण्यैर्जनः प्रियो भवति ॥ ]

काण्या डोळ्यानें बघते, लाडे लाडे बोलते, मिरी मिरी चालते, गालांतल्या गालांत हंसते; पुत्रा, अशा स्त्रीची प्राप्ति लाभण्यास पुण्याई लागते.

● गाथासप्तशतींतलें अत्यंत मनोहर वर्णन. नुकत्याच अंगीं आलेल्या शक्तीच्या भारानें जड झालेल्या पापणीच्या आडोशाने फेंकलेली साभिप्राय नजर, रसरशीत व अर्धस्फुट ओठांतून निघणारे व जिवाला भेदून जाणारे लाडके बोल, नितंब वेळावून टाकलेलें मुरकतें पाऊल, नाजूक जिवणीला जराशी कलाटणी देऊन केलेलें खळीचें स्मित—कोणाला वाटेल आधुनिक सायंतारकांनीं किंवा रजततारकांनीं हीं लक्षणें अलीकडेच आत्मसात् केलेलीं असावींत; पण

१. वक्रोद्दीपनशीला.

नाहीं. अशी नखरेबाज स्त्री दिसणें हे भाग्य, तिचा परिचय होणें हें परम-भाग्य आणि तिच्या प्रेमाची प्राप्ति – धन्य, धन्य! अशा भाग्याची आम्हा पामराना कल्पनाही होणार नाहीं. असा वस्तुलाभ होण्याला जन्मजन्मातरींची पुण्याई अवश्य असावी यात काय आश्चर्य! का कोण जाणे, गाथासप्तशतीचे सर्व टीकाकार सागतात कीं भुजंगप्रलोभनासाठीं वेश्येनें हें आपल्या मुलीचें केलेलें वर्णन आहे. बिचारे!

## १७५ भुक्कड : 175. Loafer.

भम धम्मिअ! वीसत्थो[2] सो सुणओ अज्ज मारिओ तेणं[2]।
गोला[3]अडविअडकुडङ्गवासिणा दरिअसीहेण ॥७५॥

[ भ्रम धार्मिक विस्रब्धः[5] स शुनकोऽद्य मारितस्तेन।
गोदातटविकटकुञ्जवासिना दर्ससिंहेन[6]॥ ]

हे धार्मिक, गोदातीरावरील निबिड निकुञ्जांत निवास करणाऱ्या विक्राळ सिंहानें आजच तें कुत्रें मारून टाकलें आहे. तुला आता निर्धास्तपणें हिंडण्यास हरकत नाहीं.

● आनन्दवर्धनाच्या ध्वन्यालोकाच्या भाषांतराच्या टीपेंत श्री. वीरकर (महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, अंक ८३) सांगतात : “ कोणा एका तरुणीचें हें संकेतस्थल आहे. आपल्या प्रियकराची मार्गप्रतीक्षा करीत ती तेथें उभी असताना फुलें वगैरे गोळा करावयास आलेला एक भित्रा पण धर्माचरणी मनुष्य, तिला जवळपास हिंडावयाला नको आहे. म्हणून मोठ्या चातुर्यानें वरील वाक्य उच्चारून ती त्याला तेथें भटकण्यापासून परावृत्त करूं पाहते. येथें ‘ हिंड ’ हा वाच्यार्थ आहे, पण श्लोक जरा बारकाईनें वाचल्यावर ‘ हिंडूं नको ’ असा अर्थ सूचित होतो. कुत्रा मेला; पण

१. वीसद्धो. २. देण. ३. गोलाणइकच्छ. ४. तड. ५ विश्वब्ध, विश्रस्त ६. दरीसिंहेन.

मारणारा क्रुद्ध सिंह इथल्या जाळीत आहे, हें सागण्यानें, ' तूं इथें हिंडूं नकोस ' हेंच ती सुचवीत आहे." वाच्य अर्थाहून व्यङ्ग्य अर्थ वेगळा असतो याचीं उदाहरणें म्हणून गाथासप्तशतींतील ही व ६६७ या गाथा ध्वन्यालोकात दिलेल्या आहेत; वाच्य अर्थ विधिरूप व व्यङ्ग्य अर्थ निषेधपर, या प्रकाराचें उदाहरण म्हणून ही आणि वाच्य अर्थ निषेधपर व व्यङ्ग्य अर्थ विधिरूप याचें उदाहरण म्हणून ती. जेथें चागलें संकेत-स्थान असेल तेथेंच, किंवा जवळपास धुनी अगर समाधि लावून बसण्याची किंवा निवान्तपणें विचार करण्याच्या निमित्तानें भटकण्याची, बऱ्याच धार्मिकाना मोठी हौस असते. पण हा काहीं खरा धार्मिक दिसत नाहीं; असता, तर तो कुत्र्याला भ्याला नसता आणि लोकप्रिय संकेतस्थानाच्या भोंवतीं घुटमळला नसता; किंवा आपल्या एकान्ताचा भंग होताच तेथून निघून गेला असता. पण नाहीं; काहीं धार्मिक असेच असतात कीं ते स्वतः काहीं करीत नाहींत अगर करूं शकत नाहींत आणि दुसऱ्याच्या संकेतात विघ्नें आणतात किंवा डोळे टवकारून आजूबाजूला उगाच लुडबुडत राहतात. मला वाटतें तें चावरें कुत्रें गावातलें असावें आणि त्याच्या भीतीनें या धार्मिकानें गावात हिंडावयाचें सोडलेलें असावें. नायिका त्याला सागते कीं तें कुत्रें मेलें, आता खुशाल गावात भीक मागत हिंड; येथें घोंटाळलास तर तुझी हड्डी नरम करण्यास उत्सुक असलेला माझा क्रूर प्रियकर लवकरच येथें येणार आहे ! श्रीजयदेवाच्या चद्रालोकावरील राकागम व्याख्येंत श्रीगागाभट्ट या गाथेवरील टीकेंत सांगतात: अत्र गोदावरीतीरे सिंहोऽस्तीति तत्रायं मा गच्छत्विति व्यङ्ग्यम् । तद् यद्यपि वक्तृतात्पर्यविषयं, तथापि तन्मदीय सकेतस्थानमिति व्यङ्ग्यमुपेक्षाविषयं सहृदयैकवेद्य च ।

## १७६ वारियानें कुण्डल हाले : 176. Lotus Pollen.

चाएरिएण भरिअं अच्छि कणऊरउप्पलरएण[1]।
फुक्कन्तो अविङ्कं चुम्बन्तो को सि देवाणम् ॥७६॥

१ कण्णरउइप्पल, कण्णऊर

[ वातेरितेन भृतमक्षि कर्णपूरोत्पलरजसा ।
फूत्कुर्वन्नवितृष्णं चुम्बन्कोऽसि देवानाम् ॥ ]

कानावरील कमळांतील परागांना वाऱ्यानें प्रेरणा दिल्यामुळें त्यांवरील रज:कण तिच्या डोळ्यांत गेले. ते काढण्यासाठीं डोळ्यांत फुंकर घालण्याच्या निमित्तानें तूं तिचें पुन: पुन: चुंबन घेत आहेस. तूं धन्य आहेस.

● डोळ्यात रज गेलासें वाटलें म्हणून ती पापणी चोळूं लागली. कदाचित् तिनें त्याच्याकडे काण्या डोळ्यानें, सस्मित, साभिप्राय पाहिलें असेल. एवढें निमित्त त्याला पुरलें. इंगित ओळखणें हें चातुर्य, त्याला व्यावहारिक स्वरूप देणें हें साहस; हीं ज्याच्या अंगीं असतील तो प्रिय वाटतो व यशस्वी होतो. टीकाकार सांगतात, तूं देवच असला पाहिजेस, कारण देवापासून काहीं लपून राहत नाहीं, कारण देवाचे डोळे कधीं मिटत नाहींत; आणि विचारतात, तूं कोणता देव आहेस ? कारण अशी दुर्मिळ व अमूल्य संधि मिळविणारा देवही विशेष भाग्यवान् म्हटला पाहिजे. ' देवानाम् ' याचें हें स्पष्टीकरण पटलें नाहीं, म्हणून मी ' धन्य ' हा अर्थ घेतला आहे. परिवृत्ति अलंकार.

## १७७ गलोल : 177. Sling.

सहि ! दुम्मेन्ति कलम्बाइं जह मं तह ण सेसकुसुमाइं ।
णूणं इमेसु दिअहेसु वहइ गुडिआधणुं कामो ॥७७॥

[ सखि व्यथयन्ति कदम्बानि यथा मां तथा न शेषकुसुमानि ।
नूनमेषु दिवसेषु वहति गुटिकाधनुः कामः ॥ ]

१. कर्णरचितोत्पल, कर्णावतंसीकृतोत्पल. २. जह ण तहा. ३. गुलिआ. ४. दूनयति, व्यथयन्ते

सखि, दुसरीं कोणतींही फुलें मला व्यथित करीत नाहींत, कदम्बाचीं फुलें मात्र मला या दिवसांत व्याकुळ करतात; तीं कामदेवाच्या गलोलांतील गोळ्यांसारखीं दिसतात.

● कदम्बाचीं फुलें गोळ्यांसारखीं असतात. गुटिकाधनु हें कामदेवाचें अभिधान अपरिचित आहे. धनुष्यावरून गुटिका कशा सोडता येतील? म्हणून या कुसुमास्त्रासाठीं धनुष्याऐवजीं गलोल वापरला आहे. टीकाकारानीं न सांगितलेला एक श्लेष देतों. कलम्ब म्हणजे कदम्ब वृक्ष आणि बाण. 'कलम्बमार्गणशरा:' अमरकोश; 'कलम्बी शाकभेदेऽपि कदम्बशरयो: (स्याद्दंडशरयो:) पुमान्।' मेदिनी. वसंतातल्या विरहापेक्षा पावसाळ्यातला विरह अधिक तापदायक. पुष्पित वृक्षाच्या छायेंत मुमुक्षु वसत नाहींत; ते जणू प्रेमिकांसाठीं राखून ठेवलेले असतात. अशा या स्थानीं संकेत निश्चित केल्याची सूचना.

## १७८ धर्मकृत्य : 178. Religious Duty.

**णाहं दूई[१] ण तुमं पिओ त्ति, को अम्ह एत्थ वावारो[२]।**
**सा मरइ, तुज्झ अअसो, तेण अ धम्मक्खरं भणिमो[३] ॥७८॥**

[ नाहं दूती न त्वं प्रिय इति कोऽस्माकमत्र व्यापारः[४]।
सा म्रियते तवायशस्तेन च धर्माक्षरं भणामः ॥ ]

मी तिची दूती नाहीं आणि तूं प्रियकरही नाहींस. आम्हांला या व्यवहाराची काय पंचाईत? पण ती मेली तर तुझी अपकीर्ति होईल, म्हणून धर्माला अनुरूप अशीच गोष्ट मी तुला सांगत आहे.

१. ण तुमम् २. वालअ। णाहं दूई तस्स पिओसि त्ति ण मह वावारो। ३. णाहं दूई सुदर तीए पिओ सि ण अम्ह वावारो। सा मरइ तुज्झ विरहे एअ धम्मक्खरं भणिमो ॥ ४. नाहं दूती सुदर तस्या प्रियोऽस्मीति नास्माकं व्यापार।

● सागणार नव्हतें, पण राहवत नाहीं. मला कशाचीही अपेक्षा नाहीं. तू तिचा प्रियकर आहेस किंवा कसें हेंही मला माहीत नाहीं. तरी सांगतें, तिची अधिक उपेक्षा करू नको. दूतीलाही पारमार्थिक पचाईत आक्षेप अलंकार 'वस्तुनो वक्तुमिष्टस्य विशेषप्रतिपत्तये। निषेधाभास आक्षेपो वक्ष्यमाणोक्तगो द्विधा ॥' साहित्यदर्पण.

## १७९ केशरी कोडें : 179 Puzzle

तीअ मुहाहि तुह मुहँ, तुज्झ मुहाओ अ मज्झ चलणम्मि।
हत्थाहत्थीअ गओ अइदुक्करआरओ तिलओ ॥७९॥

[ तस्या मुखात्तव मुख तव मुखाच्च मम चरणे ।
हस्ताहस्तिकया गतोऽतिदुष्करकारकस्तिलक ॥ ]

ह्या तिलकानें किती बिकट कामें केलीं, पाहा, तिच्या मुखावरून तुमच्या मुखावर, त्यावरून माझ्या चरणावर, त्याच्या हालचाली किती हातोहात झाल्या

हें केशरी कोडें वात्स्यायनानें उलगडलें आहे 'मुखे मुखमासज्जाक्षिणी अक्ष्णोर्ल्ललाटन ललाटमाहन्यासा ललाटिका' या आलिंगनप्रकारामुळें हा चमत्कार झाला. एकीच्या पाया पडण्यापूर्वी दुसरीनें अर्पण केलेलीं प्रेमचिन्हें पुसून न टाकल्याचा परिणाम ! तिलकाची हालचाल हाताच्या मध्यस्थी-शिवाय झालेली असूनही मुळातला हातोहात हा प्रयोग ध्यानात घेण्याजागा आहे पर्याय अलंकार.

## १८० जांभळाचें पान माझ्या कानावरी : 180. Symbol

सामाइ सामलिज्जइ अद्धच्छिपलोइरीअ मुहसोहा।
जम्बूदलकअकण्णावअंसभरिरे हलिअपुत्ते ॥८०॥

१ सामलीए २ भमिरे

[ श्यामायाः श्यामलायतेऽर्धाक्षिप्रलोकनशीलाया मुखशोभा।
जम्बूदलकृतकर्णावतंसभ्रमणशीले हलिकपुत्रे ॥ ]

जामळाची डिकशी कानावर धारण करून शेतकऱ्याचा पोरगा भटकूं लागला. श्यामलेनें हें दृश्य अर्ध्या मिटलेल्या डोळ्यानीं पाहिलें. तेव्हां तिच्या मुखावरील शोभा काळवंडली.

● श्यामलेनें त्याला जाभळाची डिकशी दिली, जाभळीजवळ भेटेन अशी सूचना देण्यासाठीं. बिचाऱ्याला संकेत समजला नाहीं. तिच्या हातून डिकशी मिळाली एवढ्यावरच खूप होऊन ती कानावर ठेवून तो गावभर भटकू लागला. बिचारीचा केवढा विरस झाला! आपला अनुराग कोणाला समजूं नये म्हणून ती डोळाही वर करीत नव्हती, पण आता तिला मान खाली घालावी लागली. शिवाय त्या अडाण्याच्या बडबडीमुळें शोभा झाली असेल ती वेगळीच! रुद्रटाच्या काव्यालंकारात समानार्थी उल्लेख आहे : ' ग्रामतरुणं तरुण्या नववञ्जुलमञ्जरीसनाथकरम्। पश्यन्त्या भवति मुहुर्नितरां मलिना मुखच्छाया ॥ ३ ॥ ७९ ॥ अलंकाररत्नाकरात गूढ अलंकाराचें उदाहरण : ' गूढसाकांक्षोपनिबद्धं गूढम।' व सरस्वतीकण्ठाभरणात सूक्ष्म ( प्रतीयमान ) अलंकाराचें.

१८१ खाज : 181. Diplomacy.

दूइ! तुमं विअ कुसला, कक्खडमउआई जाणसे वोल्लुम्। [1]
कण्डुइअपण्डुरं जह ण होई, तह तं करेज्जासु ॥८१॥

[ दूति त्वमेव कुशला कर्कशमृदुकानि जानासि वक्तुम्।
कण्डूयितपाण्डुरं यथा न भवति तथा त करिष्यसि ॥ ]

१ श्यामायते श्यामलाया

दूती, तू कुशल आहेस; कठोर केव्हा बोलावयाचें व मृदु केव्हा, तें तूं जाणतेस. खाज सुटली म्हणजे खाजवलें तर पाहिजेच, पण (अशा हल्क्या हातानें कीं) व्रण होता कामा नये. जरूर ती खबरदारी घेऊन योग्य तें कर.

● आणि आमचा समेट घडवून आण.

**१८२ कृश :** **182. Emaciation.**

महिलासहस्सभरिए तुह हिअए सुहअ सा अमाअन्ती।
दिअहं अणण्णकम्मा अङ्गं तणुअं पि तणुएइ ॥८२॥

[ *महिलासहस्रभृते तव हृदये सुभग सा अमान्ती।*
*दिवसमनन्यकर्मा अङ्ग तनुकमपि तनूकरोति ॥* ]

सुभग, तुझ्या हृदयात सहस्र स्त्रियांना स्थान आहे; त्यात मावता यावें म्हणून ती मूळची कृश आहे तरी स्वत ला आणखी कृश करून घेण्यातच दिवसभर गढलेली असते.

● श्रीजयदेवाच्या चन्द्रालोकावरील श्रीगागाभट्टाच्या राकागम व्याख्येंतील (चौखम्बा : पृ. १४२) संस्कृत पाठ थोडा वेगळा आहेः 'कान्तासहस्र भरिते हृदये सा न मात्यत । तनूकरोति सुतनुस्तनून्यङ्गान्यपि द्रुतम् ॥' अलंकाररत्नाकरात उत्प्रेक्षेचें उदाहरण. 'विषयित्वेन सम्भावनमुत्प्रेक्षा।' व साहित्यदर्पणात विशेषोक्तीचें.

**१८३ गुप्त पाप :** **183. Sin.**

खणमेत्तं पि ण फिट्टइ अणुदिअहविइण्णगरुअसंतावा।
पच्छण्णपावसङ्के व्व सामली मज्झ हिअआओ ॥८३॥

१ ठाणमलहन्ती २ अणुदिणम् ३ भरिते ४ स्थानमलभन्ती ५ चुक्कइ° ६ दिण्ण

[ क्षणमात्रमपि नापयात्यनुदिवसवितीर्णं गुरुकसंतापा।
प्रच्छन्नपापशङ्केव श्यामला मम हृदयात् ॥ ]

श्यामलेची आठवण हृदयांतून क्षणमात्रही नष्ट होत नाहीं. या आठवणींमुळें होणारा त्रास दिवसानुदिवस वाढतच आहे. गुप्तपणें केलेल्या पापाच्या आठवणीप्रमाणें ती माझ्या हृदयांतून जात नाहीं.

● आमचें एकामेकावर प्रेम आहे, पण त्याची सागता कशी व्हावयाची? प्रेमाची वाच्यता झाली तर तिच्या कुलीनत्वाला धक्का बसेल आणि विरोध निर्माण होईल. हें पाप आहे हें समजतें, पण आठवण बुजत नाहीं, इच्छा नष्ट होत नाहीं. मित्रा, मी हें आजवर कोणाला सांगितलें नाहीं, तुला प्रथम सांगत आहें, कारण तूं माझा जिवलग आहेस.

## १८४ अनभिज्ञ : 184. Ignorant.

अज्जअ! णाहं कुविआ, अवऊहसु! किं मुहा पसाएसि!।
तुह मण्णुसमुप्पाअएँण मज्झ माणेण वि ण कज्जम् ॥८४॥

[ अज्ञ नाहं कुपिता उपगूह किं मुधा प्रसादयसि।
तव मन्युसमुत्पादकेन मम मानेनापि न कार्यम् ॥ ]

हे अज्ञ, मी रागाला आलेली नाहीं ( व तूं माझा अपराधही केलेला नाहींस ). तूं जा बघूं! मला प्रसन्न करण्याचा व्यर्थ प्रयत्न कां करीत आहेस? माझ्या रुसव्यामुळें तुला राग मात्र आला; असा मान मी कशाला धारण करूं?

■ मनधरणीच्या अपेक्षेनें केलेलें मानधारण व्यर्थ झालें, कारण त्यामुळें अनुरागाऐवजीं राग निर्माण झाला. तुझ्यासारख्या अनभिज्ञाला त्याची काय चव? 'माने विसंवादन,' सरस्वतीकण्ठाभरण.

१. ग्रस्यति. २. दत्त. ३ अण्णुअ, उज्जुअ. ४. ऋजुक. ५. अवगूहस्व.

## १८५ श्यामशबल : 185. Hot & Cold.

दीहुण्हपउरणीसासपआविओ॑ बाहसलिलपरिसिंचो ।
साहेइ सामसबलं व तीऍ अहरो तुह विओए ॥८५॥

[ दीर्घोष्णप्रचुरनिःश्वासप्रतप्तो बाष्पसलिलपरिसिक्तः ।
साधयति श्यामशबलमिव तस्या अधरस्तव वियोगे ॥ ]

दीर्घ व उष्ण नि.श्वासांनीं तप्त झालेल्या तिच्या अधरावर अश्रूंचें सिंचन होत आहे. जगूं तुझ्या विरहांत ती श्यामशबल व्रत करीत आहे.

● उन्हाळ्यात ऊन्ह आणि पावसाळ्यात पाऊस किंवा हिंवाळ्यात हींव सोसणें, या व्रताला श्यामशबल किंवा अग्निरानीय व्रत म्हणत. ' यत्र अग्नौ प्रविश्य जले प्रविश्यते तत् ' असेंही एक टीकाकार सांगतो.

## १८६ सरोवर : 186. Lake.

सरए महद्दंदाणं अन्ते सिसिराइँ बाहिरुह्णाइं ।
जाआइँ कुविअसज्जणहिअअसरिच्छाइँ सलिलाइं ॥८६॥

[ शरदि महाह्रदानामन्तः शिशिराणि बहिरुष्णानि ।
जातानि कुपितसज्जनहृदयसदृक्षाणि सलिलानि ॥ ]

शरद ऋतूंत मोठ्या सरोवराचें पाणी रागावलेल्या सज्जनांच्या हृदयाप्रमाणें बाहेरून उष्ण, पण आतून थंड असतें

१ गिण्हन्तो २. अग्निरानीयव्रतमिव ३ महद्दहाणं. ४. सीआइं, सीयाई.
५ सीतानि

● मध्यान्हाभिसारिका सरोवराचे काठीं जाऊन तुझी वाट पाहत असली आहे अशी सूचना.

## १८७ पहिलें साहस : 187. First Venture.

आअस्स किं णु करिहिम्मि? किं बोलिस्सं? कहं णु होइहि ईमं? ति।
पढमुग्गअसाहसआरिआइ हिअअं थरहरेइ ॥८७॥
[आगतस्य किं नु करिष्यामि किं वक्ष्यामि कथं नु भविष्यति इदम् इति।
प्रथमोद्गतसाहसकारिकाया हृदयं थरथरायते ॥ ]

तो आला म्हणजे मी काय करूं? काय बोलूं? काय होईल? अशा विचारांनीं अभिसरणाचें साहस प्रथमच करावयास निघालेल्या स्त्रीचें हृदय थरारतें.

● हे विचार कोणाचे? नायिकेचे? आरंभीं सर्वांनाच अशी धास्ती वाटत असते. दूतीचे? सान्याच दूती नायिकाबद्दल नेहमीं असेंच सागत असतात!

## १८८ नूपुर : 188. Anklet.

णेउरकोडिविलग्गं चिउरं दइअस्स पाअपडिअस्स।
हिअअं पउत्थमाणं उम्मोअन्ती व्विअ कहेइ ॥८८॥
[ नुपुरकोटिविलग्नं चिकुरं दयितस्य पादपतितस्य।
हृदय प्रोषितमानमुन्मोचयन्त्येव कथयति ॥ ]

१. किं णु काहम् किं वोच्छम्, वोच्चिस्सं. २. इमि ति. ३. साहसआए घरिणिहिययं. ४ साहसिकाया हृदय भयेण कम्पते. ५. चिहुरं. ६. पायलग्गस्स. ७. अहिअ माणपउत्थं उम्मोअं त्ति चिअ कहेइ. ८. मानमदोत्थमुन्मुक्तमित्येव. ९. उन्मूलयन्त्येव.

प्रियकर प्रियेच्या पायां पडला तेव्हा त्याचे केस तिच्या नूपुरांच्या जाळींत गुंतले. ते सोडवितांना जणु तिनें त्याला सांगितलें, गेला, माझा रुसवा गेला.

● ती क्रुद्ध होती पण या लीनतेनें प्रसन्न झाली. नूपुरात अडकलेले केस तिनें हलक्या हातानें सोडविले, तरी त्याला त्रास झाला असेलच. तरीही तो म्हणाला असेल, हा सारा माझाच अडाणीपणा; माझ्या ओढाताणीमुळें नूपुर तुझ्या घोंट्यावर घासला नसला म्हणजे झालें; तुझ्या हृदयातून मला असाच काढून टाकूं नको.

## १८९ उच्छिष्टग्रहण : 189. Unguent.

तुज्झङ्गराअसेसेण सामली तह खरेण सोमारा।
सा किर गोलाऊले ह्राआ जम्बूकसाएण ॥८९॥
[ तवाङ्गरागशेषेण श्यामला तथा खरेण सुकुमारा।
सा किल गोदाकूले स्नाता जम्बूकषायेण ॥ ]

श्यामला सुकुमार आहे, तरी तुझ्या अंगाला लावून राहिलेले जांभळाच्या रसाचे कडक उटणें आपल्या अंगाला लावून ती गोदातीरावर स्नान करीत आहे.

● तें कडक उटणें तिनें प्रत्यक्ष अंगाला लावलें कीं प्रवाहाच्या धारेंत खालच्या बाजूला न्हाऊन तिनें उटणें लावण्याचें अप्रत्यक्ष श्रेय मिळविलें ! उच्छिष्टग्रहणांतही अङ्गसंगाभिलाषाचीच भावना असते.

## १९० ओसाड : 190. Deserted.

अज्जं ञ्चेअ पउत्थो, अज्ज च्चिअ सुण्णआइँ जाआइं।
रत्थामुहदेउलचत्तराइँ अह्मं च हिअआइं ॥९०॥

१ सोमाला. २ श्यामली ३. रथामुह देवउल चत्तराइ अम्ह च हिदआइ सुण्णाइ।

[ अद्यैव प्रोषितोऽद्यैव शून्यकानि जातानि ।
रथ्यामुखदेवकुलचत्वराण्यस्माकं च हृदयानि ॥ ]

माझे पती आजच प्रवासाला गेले आणि म्हणून गांवातील चौक, देवळ्यातील पटांगणें व आमचीं हृदयें आजच ओसाड झालीं.

● त्याच्या विरहामुळें जीवनातलें स्वारस्य नष्ट झालें. माझें एकटीचेंच नव्हे, आम्हा सर्वांचीं हृदयें शून्य झालीं. अलंकारकौस्तुभात समुच्चय अलंकाराचें उदाहरण.

## १९१ गौरव : 191 Elevation.

चिरिडिं पि अआणन्तो लोआ लोएहिँ गोरवब्भहिआ ।
सोणारतुले व्व णिरक्खरा वि खन्धेहिँ उब्भन्ति ॥९१॥

[ वर्णावलीमप्यजानन्तो लोका लोकैर्गौरवाभ्यधिकाः ।
सुवर्णकारतुला इव निरक्षरा अपि स्कन्धैरुह्यन्ते ॥ ]

सोनाराच्या तागडीप्रमाणें निरक्षर असलेले लोकसुद्धा गौरवास पात्र मानले जाऊन खांद्यावर घेतले जातात.

● या गाथेचा समाधानकारक खुलासा होत नाहीं. व्यक्तीच्या बाबतींत निरक्षर म्हणजे ज्याला अक्षराचा संस्कार झालेला नाहीं असा; तुलापक्षीं 'अक्षरेखारहित' (गंगाधर), 'अंकरेखारहित' (कुलबालदेव). या अर्थावरून कर्नाटक कॉलेजातील संस्कृतचे प्राध्यापक श्री. रा. ना. वळे, एम्. ए., पीएच्. डी. यांनीं मला पत्रद्वारें (ता. ४-१० ४९)

१ चिरिडिं, विण्इ, विरिडिं. २ सुण्णार. ३. विनतिमप्याजानन्तो ( विनतिं सिद्धिपादिका सिद्धिरस्तु इत्यादिकाम् इति कुलबालदेव ), सिद्धिरस्तु इत्यादि वर्णावली, वर्णमप्यजानन्तो ४ गौरवाभ्यर्हिता, गौरवगृहीता, गौरवेणार्चिता ५. अक्षरेखारहिता

कळविलें तें असें : "निरक्षर शब्दावरची कोटी वाङ्मयात वारंवार येते. सोनाराचा ताजवा 'वोलका' नव्हता. आज वजन किती झालें हें रेघानीं व आकड्यानीं दर्शविणारे लहान मोठे बोलके काटे अनेक आहेत. तथापि आपल्याकडील सोनाराचा नाजूक काटा अजून तसाच आहे. स्वतन्त्रपणें वजन किती झालें हें तो कांहींच सागू शकत नाहीं. सोनें तोलायचा काटा म्हणजे त्याचा भाव फेवढा, पण असलेल्या नावानें पूज्य. त्याला सोनें आणि गुंजा सारख्याच. सोन्यातील गुणदोष अथवा सोन्याचा कस राहू द्या, पण निदान आपण किती वजन केलें याची अक्षरें तरी दाखवावीं कीं नाहीं!" हें स्पष्टीकरण पटत नाहीं. कर्पूरमञ्जरींत ( सः डॉ. मनमोहन घोष. कलकत्ता युनिव्हर्सिटी, पृ. ८७ ) असाच उल्लेख आलेला आहे · 'जदो तुव णाराओ विअ णिरक्खरो वि रअणतुलाए णिउञ्जीअसि। अइ पुण तुल व्व लद्धक्खरा वि ण सुवण्णतोलणे णिउञ्जिआमि।' संपादकीय टीपेंत (पृ. १५४) ते सागतात : 'णाराओ वि णिरक्खरो : As unlettered as jeweller's apparatus in which are used small gunjas and no weight pieces marked with letters", "तुल व्व लद्धक्खरा–" one who has got letters like a big weighing machine which uses big pieces of stone marked with figures indicating weights" डॉ. घोष यांनीं टीपेंत या गाथेचा मुकाबला दिलेला आहे. यावरून दिसतें कीं तुलापक्षी निरक्षर या शब्दाचा सदर्भ तराजूकडे नसून त्यांतील वजनाकडे आहे. पण्डित मथुरानाथशास्त्री सांगतात : ( काव्यमाला प्रत. पृ. १३ ) '*सुवर्णसारतुला अक्षतोऽधिकमतोल्यन्त्य [ निरक्ष रान्तीति निरक्षरा ] अपि गौरवाम्भपिनाः दत्ताधिकगौरवा स्कन्धैर्नीयन्ते सायधानं नीयन्ते। षोडशमाषैरेव इत्यमरः। वैद्यकमते तु तोलकद्वयमित।*' सुवर्णसारतुला दोन तोळ्यांपेक्षा किंवा सोळा माशापेक्षा अधिक तोलूं शकत नाहींत, तरीही जास्त वजन तोलणाऱ्या तागडींपेक्षा त्याना अधिक गौरव मिळतो. कोणताही अर्थ घेतला तरी 'तागडीप्रमाणें न्यायावर येतें जाणें' या प्रयोगाचा खुलासा होत नाहीं. सोनाराच्या तागडीत जें तोललें जातें तें तागडीपेक्षा मौल्यवान असतें, तरीही सोनार तागडीच न्यायावर टाकतो,

पण म्हणून ती काहीं सोन्यापेक्षा जास्त मौल्यवान् ठरत नाहीं; शिवाय ज्या वेळीं तागडींत वजन नसतें किंवा तोलावयाची वस्तु नसते त्या वेळींच ती खाद्यावर टाकली जाते; त्याचप्रमाणें ज्याना काहींही मूल्य नाहीं किंवा वजन नाहीं अशीं निरक्षर माणसें इतरानीं खाद्यावर घेतलीं म्हणून तीं मोठीं ठरतात असें नाहीं. तरीही प्रश्न राहतोच, सामान्य भंगारवाल्याप्रमाणें सोनार तागडी खाद्यावर कशाला घेईल ? म्हणूनच वर म्हटलें आहे कीं या गाथेचा समाधानकारक खुलासा होत नाहीं.

अंगीं एकही गुण नसलेल्या साधारणीची भुजङ्गानें केलेली अवास्तव प्रशंसा असह्य झाल्यामुळें गुणगर्विता गणिकेनें हे उद्गार काढलेले असावेत. किंवा, या चिमुरडीला अद्याप चिरडीमुद्धा नेसता येत नाहीं, पण केवढा तिचा उदो उदो ! किंवा फुशारखोर पतीची वा उपपतीची नायिकेनें केलेली निंदा.

## १९२ लाल गाल : 192. Touch Me Not.

आअम्बन्तकवोलं खलिअक्खरजम्पिरिं फुरन्तोट्ठिम् ।
मा छिवसु त्ति सरोसं समोसरन्तिं पिअं भरिमो ॥९२॥

[ आताम्रान्तःकपोलां[1] स्खलिताक्षरजल्पनशीलां स्फुरदोष्ठीम् ।
मा स्पृशेति सरोषं समपसर्पन्तीं प्रियां स्मरामः ॥ ]

गाल लालसर झाले आहेत, बोलण्यात अक्षरें गळत आहेत, ओंठ थरथरत आहेत, अगाला हात लावूं नका, असें रागानें सांगत आहे, त्या प्रियेची आठवण होते.

● कलहान्तरिता. ती एवढी रागाला का आली होती ? एक टीकाकार सांगतो, ती रजस्वला होती; आणि एवढेंही पुरत नाहीं म्हणूनच कीं काय कोण जाणे, आणखी एक टीकाकार सांगतो, शिवाय ती परस्त्री होती !

१. आताम्रायमाणकपोला

## १९३ पवित्र पाप : 193. Sacred Sin.

गोलाविसमोआरच्छलेण अप्पा उरम्मि से मुक्को ।
अणुअम्पाणिद्दोसं तेण वि सा आढमुवऊढा ॥९३॥

[ गोदावरी विषमावतारच्छलेनात्मा उरसि तस्य मुक्तः ।
अनुकम्पानिर्दोषं तेनापि सा गाढमुपगूढा ॥ ]

गोदावरीचें पात्र ओलांडताना उतार अवघड असल्याच्या निमित्तानें तिनें त्याच्या छातीवर भार टाकला. ( केवळ अनुकम्पेमुळें त्यानें तिला हात दिला होता व आता निवळ नाइलाजामुळें त्यानें ) तिला आलिंगन दिलें. खरोखर तो अगदीं निर्दोष आहे

● विषय पूर्वीचाच ( क्र. १०७ ), प्रणयी युगुलाची आता थोडी प्रगति झाली आहे, एवढेंच. सर्वच पापें प्रारंभीं सरळ किंवा सबळ सबबीवर आधारलेलीं असतात आणि प्रथम पवित्र भासतात. बोभाटा झाला म्हणजे त्यातील रहस्य किंवा रम्यता नष्ट होते आणि पापाचा सागाडा भेडसावूं लागतो. मत्यसृष्टीच्या निकषावर स्वप्नसृष्टीचा कस कसा चमकणार ? सरस्वतीकण्ठाभरणात अन्योन्य ( प्रतीयमान ) अलंकाराचें उदाहरण.

## १९४ निर्माल्य : 194 Worn Garland.

सा तुइ सहत्थदिण्णं अज्ज वि रे सुहअ गन्धरहिअं पि ।
उव्वसिअणअरघरदेवदे व्व ओमालिअं वहइ ॥९४॥

[ सा त्वया स्वहस्तदत्तामद्यापि रे सुभग गन्धरहितामपि ।
उद्वसितनगरगृहदेवतेव अवमालिकां वहति ॥ ]

---

१ गाढं २ हर ३ णोमालिअ, णोमालिअ. ४. नवमालिका, निर्माल्यिकं.

सुभग, तूं तिला दिलीस ती माळ गंधरहित व शिळी आहे, पण ती तूं धारण केली होतीस व तूं ती तिला आपल्या हातानें उतरून दिलीस म्हणून उध्वस्त नगरांतील गृहदेवतेच्या गळ्यांतील माळेप्रमाणें तिनें ती अद्याप धारण केली आहे.

● अचमालिका म्हणजे कोमेजलेली माळ. उध्वस्त नगरातील गृहस्थानें परागंदा होण्यापूर्वी गृहदेवतेची पूजा करून तिच्या गळ्यांत माळ घातली, नंतर देवतेवर अवकळा आली व माळ सुकून कोळ झाली; त्याचप्रमाणें तुझ्या प्रेयसीची अवस्था झालेली आहे; तिच्यावर कृपा कर, असा निर्घृण नायकाला दूतीचा संदेश. एक टीकाकार सांगतो, निर्जन देवळांत संकेत ठरविल्याची या गाथेंत सूचना आहे.

## ९५ उधार-उसनवार : 195. Lease & Lend.

केलीअ वि रूसेउं ण तीरए तम्मि चुक्कविणअम्मि। D
जाइअएहिँ व माए! इमेहिँ अवसेहिँ अङ्गेहिं ॥९५॥

[ केल्यापि रुषितुं न शक्यते तस्मिश्च्युतविनये।
याचितकैरिव मातरेभिरवशैरङ्गैः ॥ ]

आई, त्याला विनय कसा तो माहीतच नाहीं; तरीही त्याच्यावर थट्टेतसुद्धां मला रागावतां येत नाहीं. दुसऱ्याकडून भीक मागून उसनीं आणल्याप्रमाणें माझीं गात्रेंही माझ्या आधीन राहिलेलीं नाहींत.

● आसक्तीमुळें त्याचा विनय नष्ट झाला आहे आणि माझाही. त्याचा अनुनय इतका आकर्षक व आग्रही आहे कीं त्यापुढें माझा निग्रह नष्ट होतो, माझीं पराधीन गात्रें त्याच्याच छंदानें क्रिया करतात. त्याच्या अपराधाची आठवणही होत नाहीं; कारण माझें लौल्य किंवा त्याचें कौशल्य.

## १९६. उत्फुल्लिका : 196. See-Saw.

उप्फुल्लिआइ खेल्लउ, मा णं वारेहि, होउ परिऊढा।
मा जहणभारगरुई पुरिसाअन्ती किलिम्मिहिइ ॥९६॥

[ उत्फुल्लिकया खेलतु मैनां वारयत भवतु परिक्षामा।
मा जघनभारगुर्वी पुरुषायितं कुर्वती क्लमिष्यति ॥ ]

ती वसफुगडी खेळत आहे, मोकळेपणानें खेळूं द्या, निवारण करूं नका, म्हणजे तिचें शरीर आटोपशीर होईल आणि पुढें तिचे जघन विशाल व जड झाले तरी ती पुरुषायिताचे वेळीं दमणार नाहीं.

● फुगडी खेळणाऱ्या मुलींना उत्तेजन देण्याच्या निमित्तानें आपण स्वतः कृशमध्या, जितश्वासा व विपरीतकुशला असल्याची नायिकेची सूचना. 'उत्फुल्लिकया खेलतु' हा प्रयोग 'पत्यानीं खेळू या,' 'झोक्याना घेऊं या' असा कोल्हापुरी थाटाचा भासतो.

## १९७ जुनें मद्य : 197. Old Wine.

पउरजुवाणो गामो, महुमासो, जोअणं, पई ठेरो।
जुण्णसुरा माहीणा, असई मा होउ, किं मरउ? ॥९७॥

[ प्रचुरयुवा ग्रामो मधुमासो यौवनं पतिः स्थविरः।
जीर्णसुरा स्वाधीना असती मा भवतु किं म्रियताम् ॥ ]

१. उप्फुल्लिआ, उप्फल्लिआ, उप्फाल्लिआ, उप्पुल्लिआ, उप्फुल्लिआ, पप्फुल्लिआइ, मन्दुल्लिआइ. २. परिक्खामा. ३. भाग. ४. किलम्महइ, खिलिस्सिहइ. ५. उत्सालिका. ६. परिगूढा परिक्षुठा. ७. थेरो. ८. असतीमालम् भवतु.

ती तरुण व स्वतंत्र आहे, तिचा पति वृद्ध व तिच्या आधीन आहे; गावांत पुष्कळ उनाड तरुण आहेत, वसंत ऋतु आला आहे आणि तिच्या संग्रहीं जुनें मद्य आहे अशा स्थितींत तिनें स्वैरिणी होऊं नये तर काय मरावें ?

● येथे स्थविर याचा अर्थ वृद्ध ( थेरडा ) असा घ्यावयाचा कीं बुद्धभिक्षु ? ज्याच्या वेदना त्याला ठाऊक. अशा परिस्थितींत प्रतिकारशक्ति नष्ट झाल्यामुळें शीलखण्डन झालें तर तो अपराध होणार नाहीं. हें प्रोत्साहन कीं समर्थन ? कीं सांत्वन ? एकूण जुन्या मद्याची लज्जत काहीं नवी नाहीं ! *अलंकारकौस्तुभात तुल्ययोगिता व सरस्वतीकण्ठाभरणात आक्षेप ( रोध ) या* अलंकाराचें उदाहरण : ' विधिनाथ निषेधेन प्रतिषेधोक्तिरत्र या । शुद्धा मिश्रा च साक्षेपो रोधो नाक्षेपतः पृथक् ॥ ' ' क्रियासूत्तिष्ठमानस्य वारणं कारणेन यत् । उक्त्या युक्त्या च रोधो य आक्षेपः सोऽयमुच्यते ॥ प्रति-कूलोऽनुकूलश्च विधौ रोधोऽभिधीयते । निषधेऽप्युक्तियुक्तिभ्या द्विप्रकारः स कथ्यते ॥ '

## १९८ ढोंग : 198. Pretext.

बहुसो वि कहिज्जन्तं तुह वअणं मज्झ हत्थसंदिट्ठम् ।
ण सुअं त्ति जम्पमाणा पुणरुत्तसअं कुणइ अज्जा ॥९८॥

[ बहुशोऽपि कथ्यमानं तव वचनं मम हस्तसंदिष्टम् ।
न श्रुतमिति जल्पन्ती पुनरुक्तशतं करोत्यार्या ॥ ]

माझ्या हातून तुम्हीं पाठविलेला निरोप मी तिला किती वेळा तरी सांगितला म्हणून सांगूं ? पण नीट ऐकूं आला नाहीं, असें म्हणून आर्येनें तो शंभर वेळां तरी सांगावयाला लावला.

१. अज्ज २. ईश्वरसुता.

● पत्र दिलें होतें असा उल्लेख नाहीं व सूचनाही नाहीं, तरी निरोप 'हातून' पाठविलेला आहे, हा प्रयोग विशेष लक्षात घेण्याजोगा आहे; पूर्वी आलेल्या 'तिलकाची हातोहात हालचाल' या प्रयोगाप्रमाणेंच. नायकावरील प्रेमामुळें नायिकेला निरोप पुनःपुनः ऐकावासा वाटला. अलंकाररत्नाकरात विनोदाचें उदाहरण: 'अन्यासङ्गात्कौतुकविनोदो विनोदः।'

## १९९ संवरण : 199. Hide & Seek.

पांअडिअणेहसब्भावणिब्भरं तीअ जह तुमं दिट्ठो ।
संवरणवावडाए अण्णो वि जणो तह च्चेअ ॥९९॥
[ प्रकटितस्नेहसद्भावनिर्भरं तया यथा त्वं दृष्टः ।
संवरणव्यापृतया अन्योऽपि जनस्तथैव ॥ ]

तिनें तुझ्याकडे प्रेमपूर्ण दृष्टीनें पाहिलें; तशाच स्निग्ध दृष्टीनें ती इतरांकडेहि पाहते; मात्र हें तुझ्यावरील आपल्या प्रेमाचा बोभाटा होऊं नये म्हणून.

● ती तुझ्यावर खरोखरच अनुरक्त आहे. सर्वांकडे ती स्निग्ध दृष्टीनें पाहत असल्यामुळें इतरेजनाची समजूत झाली की ती अल्लड आहे, अदूरदृष्टि आहे; पण खरी दूरदृष्टि तिचीच. सरस्वतीकण्ठाभरणात तद्गुण अलंकाराचें उदाहरण: 'वस्त्वन्तरतिरस्कारो वस्तुना मीलितं स्मृतम् निहिता विहिते चैव तद्गुणातद्गुणौ च तत् ॥'

## २०० दंतव्रण : 200. Teeth Marks.

गेल्हह ! पलोअह इमं ! पहसिअवअणा पइस्स अप्पेइ ।
जाआ सुअपढमुब्भिण्णदन्तजुअलङ्किअं बोरम् ॥१००॥

१ पअडिअराणेहसभावविब्भमन्तिअ २ प्रकटितस्नेह सद्भावविभ्रमतया. ३. निर्भरतया ४. जन कथं तथैव ५ गिण्हह, गेण्ह, हद, हदि. ६. विमसिअवयना - वयणा ७ घरिणी.

[ गृण्हीत प्रलोकयतेदं प्रहसितवदना पत्युरर्पयति ।
जाया सुतप्रथमोद्भिन्नदन्तयुगलाङ्कितं वदरम्[२] ॥ ]

मुलाला पहिले दात आले. त्यांचे वण उमटलेलें बोर पतीला दाखवून हंसतमुखानें पत्नी म्हणाली– घ्या, हें बघा.

● काहीं प्रतींत ' वदरम् ' ऐवजीं ' वदनम् ' असा पाठ आढळतो. मुलाच्या दाताचे वण पत्नीच्या गालावर उमटले होते, ते तिनें पतीला दाखविले आणि जणूं त्याच्याकडून त्याची अपेक्षा केली. कीं मुलगा बापाच्या वळणावर आहे हें सुचविलें ? गंगाधर सांगतो, त्या बोरावरील व्रण तिच्याच दाताचे असावेत व ते तिनें अगोदरच करून ठेवलेले असावेत. नाहींतर ती हंसती कशाला ? धर्माचारानुसार प्रसूतीनंतर काहीं कालपर्यंत संभोग वर्ज्य असतो. अत्रिस्मृतींत ( Dharma Sastra or the Hindu Law Codes, Text. Vol. I : P. 195 ) सांगितलें आहे: 'षण्मासान्कामयेन्मर्त्यो गर्भिणीमेव च स्त्रियम् । आदन्तजननादूर्ध्वमेवं धर्मो विधीयते ॥ ': सातव्या महिन्यापासून मुलाला दात येईपर्यंत संभोग करूं नये. म्हणून पत्नी हंसून विचारते, आता मुलाला दात सुद्धा आले, आणखी किती थांबायचें ? अपत्यस्नेहाचा अतिरेक मातापित्याच्या स्नेहांतही व्यत्यय आणूं शकतो ! सरस्वतीकण्ठाभरणात (सोद्भेद) भाव अलंकाराचें उदाहरण: ' अभिप्रायानुकूल्येन प्रवृत्तिर्भाव उच्यते । सोद्भेदोऽथ निरुद्भेदश्चैक्तश्चाभितश्च सः ॥ ऽ

● ● ●

रसिअजणहिअअदइए कइवच्छलपमुहसुकइणिम्मइए ।
सत्तसअम्मि समत्तं बीअं गाहासअं एअम् ॥

● ● ●

१. विकसित नयना विहसित २ वदनम्

# तृतीयं शतकम् ।

## २०१ निंदेसही अपात्र : 201. Beyond Censure.

अच्छउ ता जणवाओ, हिअअं विअ अत्तणो तुह पमाणम् ।
तह तं सि मन्दणेहो जह ण उवालम्भजोग्गो सि ॥१॥

[ अस्तु तावज्जनवादो हृदयमेवात्मनस्तव प्रमाणम् ।
तथा त्वमसि मन्दस्नेहो यथा नोपालम्भयोग्योऽसि ॥ ]

लोकप्रवाद कांहींही असो; तुमचें अंतःकरण हेंच खऱ्याखोट्याचें प्रमाण. मजवरील तुमची प्रीति इतकी मंद झालेली आहे कीं आता निंदा करण्याइतकीही तुमची लायकी नाहीं.

● 'लोक काय वाटेल तें बोलतात, त्यांच्या तोंडाला कोण हात लावणार ?' 'कबूल, तुम्ही तरी छातीला हात लावून सांगाल का, कीं हा बोभाटा सर्वस्वी खोटा आहे ?' निंदा कोणाची करावयाची ? ज्याचें अंतःकरण स्निग्ध असेल त्याची, कारण त्याचे अंगीं दाक्षिण्य असतें व म्हणून त्याचें परिवर्तन शक्य असतें. पण तुम्ही तर पूर्ण उदासीन आहांत; तुमच्यावर अशा मृदु अस्त्राचा काय परिणाम होणार ? हीसुद्धां निंदाच आहे, पण ती स्निग्ध आहे. आक्षेप अलंकार.

## २०२ स्वच्छन्दी : 202. Self-Willed.

अप्पच्छन्दपहाविर ! दुल्लहलम्भं जणं वि मग्गन्त ! ।
आआसपेहिँ भमन्त हिअअ ! कइआ वि भज्जिहिसि ॥२॥

१. अप्पणो.

[ आत्मच्छन्दप्रधावनशील[1] दुर्लभलम्भं जनमपि मृगयमाण।
आकाशपथैर्भ्रमध्दृदय[2] कदापि भङ्क्ष्यसे[3]॥ ]

हृदया, तूं स्वच्छंदानें धावत आहेस, जें अप्राप्य त्याची हांव धरीत आहेस, आभाळात भराऱ्या मारीत आहेस; केव्हां ना केव्हां तरी तूं भग्न होशील.

● आभाळांतली भरारी सारखी निराधार, कारण मनोरथांच्या सिद्धीला दूतीचाही आधार नाहीं. तुझें स्वच्छंदी भ्रमण कोण स्थगित करूं शकेल!

## २०३ गणिका : 203. Courtesan.

अहव गुणव्विअ लहुआ, अहवा गुणँअणुओ[4] ण सो[5] लोओ ।
अहव ह्मि णिग्गुणा वा, बहुगुणवन्तो[6] जणो तस्स ॥३॥

[ अथवा गुणा एव लघवोऽथवा गुणज्ञो न स लोकः ।
अथवास्मि निर्गुणा वा बहुगुणवाञ्जनस्तस्य ॥ ]

जगांत गुणाना किंमत राहिलेली नाहीं; किंवा त्याला गुणाची पारख नाहीं; किंवा मीच निर्गुणा आहे; किंवा त्याची प्रिया गुणी आहे.

● गुणगर्विता गणिकेचे उद्गार. गणिका म्हणजे साधारणी वेश्या नव्हे. गणिकाच्या अंगच्या अगणित गुणाचा संस्कृत साहित्याला परिचय आहे. अशा अनमोल गुणाची किंमत कशी करता येईल ? रसिक बिदागी देतात, ती त्याच्या रसिकतेची किंमत, किंवा दानमर्यादा. या गाथेचा नायक अरसिक

---

१. आत्मच्छन्दप्रभविष्णु दुर्लभलभ्यं जन विमार्गमाण. २. आयासवशी. ३. आत्मच्छन्दप्रभावशीले दुर्लभमलभ्य जनमपि मार्गमाण । अशपथैर्हृदयक्रियापि भग्ना भवति॥ ४. गुणअण्णुओ, गुणअएलओ. ५ बहुगुणो क्खु अण्णो जणो तस्स. ६ बहुगुणवन्तोजनास्तस्य.

नाहीं, कारण त्याला स्वजनांच्या गुणांची पारख आहे. गणिकेनें गुण उधळले असतील, म्हणूनच तो आता तिला टाळीत असावा; किंवा चारुदत्ताप्रमाणें दारिद्र्यामुळें.

## २०४ आरसा : 204. Mirror.

फुट्टन्तेण व्वि हिअएण मामि ! कह णिव्वरिज्जए तम्मि ।
ऑदंसे पडिबिम्बं व्वि ज्जम्मि दुःखं ण संकमइ ॥४॥

[ स्फुटितापि हृदयेन मातुलानि कथं निवेद्यते तस्मिन् ।
आदर्शे प्रतिबिम्बमिव यस्मिन्दुःखं न संक्रामति ॥ ]

मामी, माझें हृदय दुःखानें फुटत आहे; पण हें मी त्याला कशाला सांगूं ? आरशांतल्या प्रतिबिम्बाप्रमाणें माझें दुःख त्याला दिसलें तरी तें कांहीं त्याच्या अंतर्यामांत प्रविष्ट होणार नाहीं.

● त्याचें हृदय आरशासारखें आहे; स्वच्छ, गुळगुळीत व चकचकीत; पण अस्निग्ध; त्याला माझ्याबद्दल आसक्तीच नाहीं, कीं तो अन्यासक्त आहे ! मी मात्र त्याच्यावर अनुरक्त आहे. माझें प्रेम कसें यशस्वी होईल !

## २०५ काकबलि : 205. Hesitation.

पासासङ्की काओ णेच्छेदि दिण्णं पि पहिअघरणीए ।
ओअन्तकरअलोगलिअवलअमज्झट्ठिअं पिण्डम् ॥५॥

[ पाशाशङ्की काको नेच्छति दत्तमपि पथिकगृहिण्या ।
अवनतकरतलावगलितवलयमध्यस्थितं पिण्डम् ॥ ]

१. अद्दाए. २. जम्मि. ३ स्फुटितेनापि हृदयेन कथं भगिनी निर्वृत्तीभूयते तस्मिन् । ४. स्फुटं तेनापि हृदये मातुलि कथं निवारिते तस्मिन् । ५. अवदाते. ६. ण छिवइ, णेच्छवइ. ७. ओणन्त, ओवन्त ८. न स्पृशति दत्तमपि पथि. ९. उन्नत.

पति प्रवासाला गेल्यामुळें कृश झालेली गृहिणी काकबली ठेवण्याकरतां खालीं वांकली, तेव्हां तिच्या हातांतली बांगडी गळून पिंडाभोंवतीं पडली. हा फांस असावा अशा शंकेनें कावळ्यानें त्याला स्पर्श केला नाहीं

● पुष्कळ खटपट करून नायिकेचें मन वळविलें, निमित्त साधून तिला घराबाहेर काढली आणि आता नसत्या शंका घेऊन तूं टाळाटाळ करीत आहेस. नायकाला दूतीचें आश्वासन व प्रोत्साहन.

## २०६ भिंतीवरील रेघा : 206. Calendar.

ओहिदिअहागमासंकिरीहिँ सहिआहिँ कुड्डलिहिआओ ।
दोतिण्णि तहिं विअ चोरिआएँ रेहा पुसिज्जन्ति ॥६॥

[ अवधिदिवसागमाशङ्किनीभिः सखीभिः कुड्यलिखिताः ।
द्वित्रास्तत्रैव चोरिकया रेखाः प्रोञ्छ्यन्ते ॥ ]

प्रवासाला गेलेल्या प्रतीच्या आगमनाची मुदत टळली असावी अशा शंकेनें मैत्रिणींनीं कुडावरील रेघा वाढविल्या; पण पत्नीनें त्यांपैकीं दोन तीन चोरून पुसून टाकल्या.

● वायद्याप्रमाणें पति परत आला नाहीं तर तिची अवस्था कठिण होईल अशी सख्याना धास्ती वाटली म्हणून त्यांनीं रेघा वाढविल्या. प्रवासासाठीं ठरलेल्या दिवसाइतक्या रेघा भिंतीवर काढावयाच्या आणि दिवस उलटला कीं त्यांपैकीं एक रेघ पुसावयाची असा रिवाज असे. मैत्रिणींनीं रेघा वाढविल्या हें पत्नीच्या लक्षात आलें. त्यामुळेंच त्याचें आगमन लांबणीवर पडेल या भीतीनें किंवा अधीरतेमुळें गृहिणीनें त्यापैकीं काहीं पुसल्या.

१. तीएँ लिहिरीए. २ भित्ति ३. संकीर्तिनीभि. सखीभिस्तस्यालिख्यन्त्या. । द्वित्रास्तस्मिन् चोरिक्या रेखा प्रक्षिप्यन्ते ॥

## २०७ विधिघटना : 207. Creation.

तुह मुहसारिच्छं ण लहइ त्ति संपुण्णमण्डलो विहिणा।
अण्णमअं व्व घडेइउं पुणो वि खण्डिज्जइ मिअङ्को ॥७॥

[ तव मुखसादृश्यं न लभत इति संपूर्णमण्डलो विधिना।
अन्यमयमिव घटयितु पुनरपि खण्ड्यते मृगाङ्कः ॥

पौर्णिमेच्या पूर्ण चद्रालाही तुझ्या मुखाचें सादृश्य व सौंदर्य लाभत नाहीं हें पाहून जणूं दुसऱ्या कोणत्या तरी द्रव्यांपासून चंद्र पुन्हा घडवावा म्हणून ब्रह्मा जणूं चद्राचे कलाकलांनीं तुकडे करीत आहे.

● तुलनेसाटी पाहा : "In moon, that waxing waning shines as spots appear, Are any spots discerned in face of maiden here?" (The Sacred Kurral of Tiruvalluva Nayanar Rev G. U Pope p 154) वैशिष्ट्यांची नवीं मिश्रणें करून ब्रह्मा सौंदर्याचे नवेनवे नमुने निर्माण करीत असतो. तुझें सौंदर्य पाहून तो स्वत.च चकित झाला. जणूं त्याला चिरतन स्वरूप देण्यासाठीं तो या नमुन्यावर चद्राची घटना-विघटना करीत आहे. मुग्धामतीची परिसीमा. प्रतीप अलंकार : 'उपमानानर्थक्यं प्रतीपमस्योपमेयत्वम्।' अलंकारकौस्तुभ.

## २०८ गणित : 208 Calculation

अज्जं गओत्ति, अज्जं गओत्ति, अज्जं गओत्ति, गणरीए।
पढम च्चिअ दिअहद्धे कुड्डो रेहाहिँ चित्तलिओ ॥८॥

[ अद्य गत इत्यद्य गत इत्यद्य गत इति गणनशीलया।
प्रथम एव दिवसार्धे कुड्यं रेखाभिश्चित्रितम् ॥ ]

१ मुग्धा २. अन्यमयमज ३ घटेउं ४ पुन पुन

आज पति प्रवासाला जाणार असें पत्नीला कळलें. ते आज जाणार, आज ते गेले, ते आजच गेले, असें म्हणत ती भिंतीवर रेघा काढूं लागली आणि पहिल्या दिवसाच्या प्रथमार्धातच तिनें सारी भिंत रेघांनीं चित्रित केली !

● तरी विचारीची गणना पुरी झाली नाहीं. प्रवासाला निघालेल्या पतीला पत्नीची विरहविकलावस्था दाखवून त्याला प्रवासापासून परावृत्त करण्याचा दूतीचा प्रयत्न.

## २०९ सलज्जा : 209. Bashful.

**ण वि तह पढमसमागमसुरअसुहे पाविएवि परिओसो ।**
**जह बीअदिअहसविलक्खलक्खिए वअणकमलम्मि ॥९॥**

**[ नापि तथा प्रथमसमागमसुरतसुखे[२] प्राप्तेऽपि परितोषः ।**
**यथा द्वितीय[३]दिवससविलक्षलक्षिते वदनकमले ॥ ]**

( रात्रींच्या आठवणीमुळें ) सलज्ज झालेलें तिचें मुखकमल दुसरे दिवशीं पाहतांना होतो तेवढा आनंद काहीं प्रत्यक्ष प्रथम समागमात होत नाहीं.

● *गंगाधर सांगतो, तिनें प्रथम त्याला झिडकारलें होतें;* पुष्कळ प्रार्थनानंतर तिनें संमति दिली. समागमामुळें ती संतुष्ट झाली. 'इतकी, कीं समतीला विलंब लावला याबद्दल विमनस्क झाली. तिच्या मुद्रेवरील भाव पाहून नायकाला स्वत ऱ्या गुणाबद्दल धन्यता वाटली. प्रथम समागमात आनंद असतो हें खरें, पण तो दुष्कर असतो, तोही आपण सुकर केला, याबद्दल नायकाला अभिमान वाटला. त्या लाजऱ्या मुद्रेंत संतोष व अपेक्षा, पश्चात्ताप व कृतार्थता यांचें मधुर संमिश्रण होतें.

---

३ जह बीअदिअहरम्भे चुम्बणवलिए वअणकमलम्मि । २ सुरतेनापि भवति परितोष ३ द्वितीयस्तारम्भे चुम्बनवलिते.

## २१० मदनशर : 210. Arrows of Love.

जे सॅमुहागअवोलन्तवलिअपिअपेसिअच्छिविच्छोहा ।
अम्हं ते मअणसरा, जणस्य जे होन्ति ते होन्तु ॥१०॥

[ ये संमुखागतव्यतिक्रान्तवलितप्रियप्रेषिताक्षिविक्षोभाः ।
अस्माकं ते मदनशरा जनस्य ये भवन्ति ते भवन्तु ॥ ]

( अनुनयासाठीं ) प्रियकर सन्मुख आला. ( मी त्याला उत्तेजन दिलें नाहीं म्हणून ) तो विन्मुख होऊन ( जाऊं लागला. ) जातां जातां त्यानें उत्कण्ठेनें वळून पाहिलें. यामुळें माझें अंत:करण क्षुब्ध झालें. त्याचे दृष्टिक्षेप मला मदनाच्या बाणांसारखे भासले; इतरांना काय वाटत असेल तें असो.

● मदनाचे बाण खरोखरच फुलांचे असतात का ग ! या सखीच्या प्रश्नाला उत्तर.

## २११ कडदोरा : 211. Through Fire & Water.

इअरो जणो ण पावइ तुह जहणारुहणसंगमसुहेल्लिम् ।
अणुहवइ कणअडोरो हुअवहवरुणाणँ माहप्पम् ॥११॥

[ इतरो जनो न प्राप्नोति तव जघनारोहणसंगमसुखकेलिम् ।
अनुभवति कनकदोरो हुतवहवरुणयोर्माहात्म्यम् ॥ ].

तुझ्या जघनांवर आरोहण करण्याचें किंवा त्यांना मिठी घालून डोलण्याचें सुख इतरजनांना मिळत नाहीं व तें तुझ्या सोन्याच्या कड-दोऱ्याला मिळतें. हें अग्नि व वरुण यांच्या कृपेचें माहात्म्य.

१. पमुहागअ. २ ये प्रमुखागतव्युत्क्रान्तवलितप्रियप्रसिताक्षि. ३. कनकसूत्र हुतवहवरुणस्नानमाहात्म्यम् .

● कनकडोर म्हणजे कमरपट्टा नव्हे, कडदोरा. चपटा कमरपट्टा कमरेभोंवतीं गच्च बसतो आणि भरदार कडदोरा सैल असून नितंबावर व जघनांवर ओघळतो आणि तो कडोसरींत गुरफटलेला किंवा कांसोट्यात गुतविलेला असल्यामुळें शरीराच्या हालचालींशीं ताल धरतो. प्राचीन शिल्पात कडदोऱ्याचे अनेक नमुने आढळतात, आणि आता, क्वचित्, ग्रामीण जीवनात सोनार प्रथम सोनें तापवितो आणि तप्त सुवर्णावर कौशल्याचे संस्कार केल्यानंतर पाण्यात बुडवतो. यामुळें अलंकाराना आपोआप अभिमानीय व्रताचें श्रेय व फळ मिळतें. व्रतखंडात असें कांहीं फळ सांगितलेलें असतें तर तें कितीतरींनी स्वीकारलें असतें !

## २१२ आश्चर्य : 212 Wonder

जो जस्स विहॅवसारो तं सो देइ त्ति किं त्थ अच्छेरम् ।
अणहोन्तं पि खु दिण्णं दोहग्गं तइ सवत्तीणम् ॥१२॥

[ यो येस्य विभवसारस्त स ददातीति किमत्राश्चर्यम् ।
अभॅवदपि खलु दत्त दौर्भाग्य त्वया सपत्नीनाम् ॥ ]

आपल्या वैभवाचें सार असें जें धन तें मनुष्य दुसऱ्याना देतो, यात आश्चर्य कसलें ? तुझ्यापाशीं नसलेलें दौर्भाग्य तू आपल्या सवतींना देतेस, हें खरें आश्चर्य

● विरोधालकार “ अविरोधेऽपि विरोधो यत्रोक्त स्याद्विरोध स । स्याज्जातेर्गुणकर्मद्रव्याणा स्वस्वपरयोगात् ॥ ” अलंकारकौस्तुभ. अलकार रत्नाकरात विशेषोक्तीचें उदाहरण ‘ हेतुसाकल्ये फलानुत्पत्तिर्विशेषोक्ति ।’

१, होइ सार २ यदस्य विभवसार तत्स ३ अविद्यमानपि

## २१३ निरुपम : 213. Unique.

चन्दसरिसं मुहं से सरिसो अमअस्स मुहरसो तिस्सा ।
सकअग्गहरहसुज्जलचुम्बणअं कस्स सरिसं से ॥१३॥

[ चन्द्रसदृशं मुखं तस्याः सदृशोऽमृतस्य मुखरसस्तस्याः ।
सकचग्रहरभसोज्ज्वलचुम्बनकं कस्य सदृशं तस्याः ॥ ]

तिचें मुख चंद्रासारखें व अधररस अमृतासारखा आहे. तिचें केस धरून बलात्कारानें, घाईनें व आवेशानें तिचें चुंबन घेतलें, त्याला उपमा कशाची ?

● निरुपम म्हणून अद्वितीय की तोंवर अननुभवित म्हणून ? 'उज्ज्वलं मनोज्ञं,' सरस्वतीकण्ठाभरण. अलंकारकौस्तुभात उपमानलुप्तोपमेचें उदाहरणः 'वाक्यसमासोभयगोपमानलुप्ता...अत्र सकचग्रहरभसहृटचुम्बनं कस्य सदृशमिति उपमानस्याप्रयोगः ।' अलंकाररत्नाकरात सङ्कराचें उदाहरणः 'अङ्गत्वे तु सङ्करः'

## २१४ विचक्षणा : 214. Caution.

उप्पण्णत्थे कज्जे अइचिन्तन्तो गुणागुणे तम्मि ।
चिरआलमन्दपेच्छित्तणेण पुरिसो हणइ कज्जम् ॥१४॥

[ उत्पन्नार्थे कार्येऽतिचिन्तयन्गुणागुणौ तस्मिन् ।
चिरकालमन्दप्रेक्षित्वेन पुरुषो हन्ति कार्यम् ॥ ]

१ अमअगरिच्छो अ मुहरसो २ रहसुम्मेल, रहसाअल. ३ रभसोद्दिल, रभसद्द्ठ, सकचग्रहणभासोज्ज्वल ४ अइ सुन्दर सुन्दपेच्छित्तणेण ५ अतिसुन्दर-मन्दप्रेक्षित्वेने, चिरकालमन्दप्रेक्षित्वेन, चिरकालसूक्ष्म

यशापयशाच्या संभाव्यतेचा व गुणावगुणाचा फाजील विचक्षणा करणारा मनुष्य सावकाशपणें विचार करण्यात काळ दवडतो आणि सिद्ध होत आलेल्या कार्याचा नाश करतो.

● हें शुद्ध सुभाषित आहे; तरीही गंगाधर सांगतो, दीर्घसूत्री नायकाला हें दूतीचें प्रोत्साहन आहे.

## २१५ रागानुराग : 215. Motive.

**वालअ ! तुमाहि अहिअं णिअअं विअ वल्लहं महं जीअम् ।**
**तं तइ विणा ण होइ, त्ति तेण कुविअं पसाएमि ॥१५॥**

**[ बालक त्वत्तोऽधिकं[1] निजकमेव[2] वल्लभं मम जीवितम् ।**
**तत्त्वया विना न भवतीति तेन कुपितं प्रसादयामि ॥ ]**

वालक, तुझ्यापेक्षा मला फक्त माझा जीवच जास्त प्रिय आहे. तुझ्याशिवाय जीव राहत नाहीं, म्हणून राग आवरून तुला प्रसन्न करण्याचा मी प्रयत्न करीत आहे.

● राग व अनुराग, दोघांचाही वर्ण आरक्त, फरक फक्त छटेचा. रागामागें प्रतिपक्षाचा अपराध असतो तर अनुरागामागें अनुनय; त्या मागें अहंकार, या मागें आसक्ति. मी तुझा अनुनय करीत आहे, म्हणून तुझा अपराध माझ्या निदर्शनास आलाच नव्हता किंवा मी तुझ्यावर अप्रसन्न झालेंच नव्हतें, असा गैरसमज करून घेऊ नको.

## २१६ पुरावा : 216. Evidence.

**पत्तिअ ! ण पत्तिअन्ती[3], जइ तुज्झ इमे ण मज्झ रुअईए ।**
**पुट्ठीअ बाहबिन्दू पुलउब्भेएण भिज्जन्ता ॥१६॥**

---

१ त्वत्तोऽप्यधिक २ नियतमेव ३ पत्तअ ण पत्तअन्ती

[ प्रतीहि न प्रतीयन्ती यदि तवेमे न मम रोदनशीलायाः ।
पृष्ठस्य बाष्पबिन्दवः पुलकोद्भेदेन भिद्यमानाः॥ ]

जीव तोडून सांगितलें तरी तुला माझा विश्वास वाटत नाहीं. पहा, तुझे अश्रु माझ्या पाठीवर पडत आहेत आणि माझ्या अंगावर उमलणारे रोमाञ्च त्यांचा भेद करीत आहेत.

● प्रथम मनधरणी केली, नंतर पायधरणी; तेव्हा तिचे अश्रु त्याच्या पाठीवर पडूं लागले व त्याचें शरीर रोमांचित झालें. खऱ्या प्रेमाशिवाय पुलकोद्भव होत नाहीं. रोमाञ्च हाच निरपराधित्वाचा पुरावा व प्रेमाचा प्रत्यय. दुर्जनाच्या चुगल्यावर विसंबूं नको, माझ्या वचनावर विश्वास ठेव, प्रेमाचें प्रमाण पाहा आणि प्रसन्न हो, अशी नायिकेची विनवणी.

## २१७ सन्मित्र : 217. Friend Indeed

तं मित्तं काअव्वं जं किर वसणम्मि देसआलम्मि ।
आलिहिअभित्ति वाउल्लअं व ण परम्मुहं ठाइ ॥१७॥

[ तन्मित्रं कर्तव्य यत्किल व्यसने देशकालेषु ।
आलिखितभित्तिपुत्तलकमिव न पराङ्मुखं तिष्ठति ॥ ]

असा मित्र करावा की जो कोणत्याही काळीं, देशीं व प्रसंगीं पराङ्मुख होणार नाहीं आणि भिंतीवर चित्रित केलेल्या बाहुलीप्रमाणें नेहमीं सन्मुख राहील.

● भारतातील सर्व प्राचीन चित्रें व शिल्पें सन्मुखच असतात.

## २१८ हाय ! हाय ! ! 218 Wail.

वड्डुआइ णइणिउञ्जे पडमुंगअमीलराण्डणाविलक्खम् ।
उड्डेइ विहंगउलं हा हा पक्खेहि ँ व भणन्तम् ॥१८॥

१. अप्यसमस्या २ पुत्तल, पुत्तल्कं ३ आलिखितभित्तिचित्रवत ४. मुग्ध.

[ वध्वा नदीनिकुञ्जे प्रथमोद्गतशीलखण्डनविलक्षम् ।
उड्डीयते विहंगकुलं हा हा पक्षैरिव भणत् ॥ ]

नदीतीरावरील कुञ्जांत वधूचें शीलखण्डन झालें, हें दृश्य पाहून झाडांवरील पक्ष्यांना लाज वाटली आणि त्यांचा समूह पंख फडफडवीत, जणूं हाय ! हाय ! असे उद्गार काढीत तेथून उडून गेला.

● हें शीलखन्डन होत आहे, हें पक्ष्यांना कसें उमजलें ? त्यानाही पातिव्रत्याची जाणीव असते कीं काय ! शिकारी सांगतात कीं परक्याच्या आगमनाची जाणीव जंगलांतल्या जनावराना देण्यासाठीं कांहीं पक्षी शिकाऱ्याच्या माथ्यावर चीत्कार करीत उडत राहतात आणि ही सूचना मिळताच शिकार सावध होऊन इतरत्र झुडपांत आश्रयाला जाते. या गाथेंतल्या पाखरांनीं दिलेली साद कुन्जातल्या मिथुनाला सावध करण्यासाठीं दिली, कीं वाट पाहणाराला जोडीदाराच्या आगमनाची वर्दी देण्यासाठीं ?

## २१९ वसन्तोन्माद : 219. Hot Season.

सच्चं भणामि, बालअ ! णत्थि असक्कं वसन्तमासस्स ।
गन्धेण कुरवआणं मणं पि असइत्तणं ण गआ ॥१९॥

[ सत्यं भणामि बालक नास्त्यशक्यं[१] वसन्तमासस्य ।
गन्धेन कुरवकाणां मनागप्यसतीत्वं न गता ॥ ]

बालक, मी खरेंच सांगतें, ( उन्मादक ) वसंतांत कांहींही अशक्य नाहीं. कुरवकांचा सुगंध दरवळत असूनही ती थोडीही चळली नाहीं.

● बालक, तुला जीवनाचा अनुभव नाहीं, विरहवेदनाच्या तीव्रतेची कल्पना नाहीं, वसंतमास व कुरवकाचा सुवास याच्या सामर्थ्याची जाणीव नाहीं. त्वरा कर, घरीं जा, नाहींतर तिच्या शीलाचा भरंवसा नाहीं.

१. असाध्यं.

## .२२० पिंजऱ्यांतलें पांखरूं : 220. Cage Bird.

एक्केक्कमवइवेढणविवरन्तरदिण्णतरलणअणाए।
तइ वोलन्ते, बालअ! पञ्जरसउणाइअं तीए ॥२०॥

[ एकैकवृतिवेष्टनविवरान्तरदत्ततरलनयनया।
त्वयि व्यतिक्रान्ते बालक पञ्जरशकुनायितं तया ॥ ]

बालक, तूं गेलास तेव्हां कुंपणाच्या एकेका छिद्रांतून तिनें चंचल दृष्टीनें तुझ्याकडे पाहिलें, पिंजऱ्यांतलें पांखरूं पाहतें तसें.

● पिंजऱ्यातलें पांखरूं एकेका काडीआडून मान वांकवून भिरभिरत्या नजरेनें बाहेर पाहत पाहत आतल्या आडव्या दांडीवर अस्वस्थपणें हालचाल करीत असतें; जणूं कोठून, कसें व केव्हां बाहेर पडता येईल याचाच विचार त्याच्या मनात सदैव चाललेला असतो. ती परतंत्र नसती व तूं साद दिली असतीस तर पाखरासारखी ती तुझ्यामागें उडत आली असती.

## २२१ कुंपण : 221. Fence.

ता किं करेउ, जइ तं सि तीअ वइवेढपेल्लिअथणीए। [1]
पाअङ्गुट्ठद्धक्खित्तणीसहङ्गीअ वि ण दिट्ठो ? ॥२१॥

[ तत्किं करोतु यदि त्वमसि तया वृतिवेष्टनप्रेरितस्तनया।
पादाङ्गुष्ठार्धोत्क्षिप्तनिःसहाङ्गयापि न दृष्टः ॥ ]

कुंपणाला अगदीं छाती भिडवून आणि रग लागेपर्यंत पायांच्या अर्ध्या अंगुष्ठांवर उभें राहून विचारीनें हें दर्शन व्हावें म्हणून तडफड केली, पण तूं तिला दिसलाच नाहींस. मग तिनें विचारीनें काय करावें ?

१. वइवेढणविवरन्तरतरलदिण्णणअणाए. २. एक्कम. ३. व्युत्क्रामति.
४. पाअङ्गुट्ठद्धुक्खित्त. ५. पादाङ्गुष्ठाग्रोत्क्षिप्त.

● संकेताप्रमाणें मी तिच्या दारावरून फेरी टाकली पण ती दिसली नाहीं, या नायकाच्या तक्रारीला दूतीचें उत्तर; माझें आणि तुमचें, दोघांचेंही दुर्दैव, दुसरें काय! आणि कुंपणाचें सुदैव!

## २२२ अश्रु : 222. Tears.

पिअसंभरणपलोट्टन्तवाहधाराणिवाअभीआए।
दिज्जइ वङ्कग्गीवाएँ दीवओ पहिअजाआए ॥२२॥

[ प्रियसंस्मरणप्रलुठद्बाष्पधारानिपातभीतया।
दीयते वक्रग्रीवया दीपकः पथिकजायया ॥ ]

प्रियकराच्या आठवणीमुळें डोळ्यांत दाटलेल्या अश्रुधारा ओघळून ज्योत विझेल या भीतीनें प्रवाशाच्या पत्नीनें मान वळवून दिवा दिला.

● प्रोषितपतिकेचा अभिलाष करणाराला ती असाध्य आहे अशी दूतीची सूचना.

## २२३ लवचिक : 223. Fragile.

तइ वोलन्ते, बालअ! तिस्सा अङ्गाइँ तह णु वलिआइं।
जह पुट्ठिमज्झणिवंतन्तवाहधाराओ दीसन्ति ॥२३॥

[ त्वयि व्यतिक्रामति बालक तस्या अङ्गानि तथा नु वलितानि।
यथा पृष्ठमध्यनिपतद्बाष्पधारा दृश्यन्ते ॥ ]

बालक, तूं जाऊं लागलास तेव्हां ( तुझ्याकडे पहात पहात ) तिनें आपलें अंग बसल्या जागीं इतकें वळविलें कीं तिचे अश्रु तिच्या पाठीच्या मध्यावर पडतांना दिसले.

● तुझ्यावरील प्रेमामुळें तिच्या शरीराची अशी दैना झालेली आहे.

१. धरणीए. २ प्रगलत्, प्रपतद्. ३. णिवलंत, णिवदंत.

## २२४ चालेल : 224. Common Man.

ता मज्झिमो च्चिअ वरं, दुज्जणसुअणेहि दोहि वि ण कज्जम् ।
जह दिट्ठो तवइ खलो, तहेअ सुअणो अईसन्तो ॥२४॥

[ तन्मध्यम एव वरं दुर्जनसुजनाभ्यां द्वाभ्यामपि न कार्यम् ।
यथा दृष्टस्तापयति खलस्तथैव सुजनोऽदृश्यमानः । ]

तो मध्यम गुणी आहे, हेंच ठीक आहे. दुर्जन व सज्जन या दोघांचेंहि कार्य नाहीं. दुर्जनाचें दर्शन तापदायक असतें आणि सज्जनाचें तर दर्शनही होत नाहीं.

● सज्जन दुर्मिळ व भेटला तरी निरुपयोगी; जगदुद्धारावर प्रवचन सुरू करावयाचा; दुर्जन भेटला कीं आयुष्याचें मातेरें व्हावयाचें. म्हणून ज्याचे गुणदोष सामान्य आहेत असाच पुरुष स्त्रियांना अधिक इष्ट वाटतो; तसें नसतें तर सामान्य जनांना कोण विचारता !

## २२५ कटाक्ष : 225. Side Glance.

अद्धच्छिपेच्छिअं मा करेहि, साहाविअं पलोएहि ।
सो वि सुदिट्ठो होहिइ, तुमं पि मुद्धा कलिज्जिहिसि ॥२५॥

[ अर्धाक्षिप्रेक्षितं मा कुरु स्वाभाविकं प्रलोकय ।
सोऽपि सुदृष्टो भविष्यति त्वमपि मुग्धा कलिष्यसे ॥ ]

पुं. त्याच्याकडे कटाक्ष टाकूं नकोस, स्वाभाविकपणेंच पहा; म्हणजे तो तुला नीट दिसेल आणि फार तर लोक तुला अल्लड म्हणतील.

---

१. अर्धागत्वां. २. न मे कार्यम्. ३. [illegible] भविष्यसि.

● आपल्या पतीकडे कण्या डोळ्यानें पाहणाऱ्या स्त्रीव्रत पत्नीचे ईर्ष्योद्गार. अलंकार-रत्नाकरांत तंत्र अलंकाराचें उदाहरणः ' नानाफलप्रयुक्तः तन्त्रम् । '

## २२६ गुपचुप : 226. Silent Surrender.

दिअहं खुंडक्किआए तीए काऊण गेहवावारम् ।
गरुए वि मण्णुदुःखे भरिमो पाअन्तसुत्तस्स ॥२६॥

[ दिवसं रोषमूकायास्तस्याः कृत्वा गेहव्यापारम् ।
गुरुकेऽपि मन्युदुःखे स्मरामः पादान्तसुप्तस्य ॥ ]

दिवसभर ती घुस्स्यांत होती, गुपचूप होती. कामधाम आटोपल्यावर रागाचें दुःख विशेष असतानांही ती माझ्या पायांजवळ येऊन झोंपली, त्याची आठवण होते.

● जो अपराधी, त्याच्याच पायाचा विचारीला आश्रय करावा लागला. कारण ती कुलीन, पतिव्रता होती. दशरूपकांत औदार्याचें उदाहरण.

## २२७ उपदेश : 227. Counsel.

पाणउडीअ वि जलिऊण, हुअवहो जलइ जण्णवाडम्मि ।
ण हु ते परिहरिअव्वा विसमदसासंठिआ पुरिसा ॥२७॥

[ पानकुटयामपि ज्वलित्वा हुतवहो ज्वलति यज्ञवाटेऽपि ।
न खलु ते परिहर्तव्या विषमदशासंस्थिताः पुरुषाः ॥ ]

अग्नि काय, झोंपडींत पेटतो, तसाच यज्ञस्थानींही प्रज्वलित होतो पुरुषाना विपन्नावस्था प्राप्त झालेली असली तरी त्याना टाकूं नको.

१. खु डुक्खिआए सअल.

● पानकुटी म्हणजे चाण्डालकुटी (गगाधर), पर्णकुटी (वेबर), महाराचें घर, पिठा (भागवत), शौण्डिककुटी (सरस्वतीकण्ठाभरण) आणि मदिरापानकुटी, गुत्ता (मथुरानाथ) पण गुत्त्यात अमीचें काय प्रयोजन ? कीं गुत्त्यातच हातभट्टी लावीत असत ? गगाधर सागतो, अधम स्त्रीसगामुळें दूषित झालेल्या धनिकाला झिडकारण्याच्या विचारात असलेल्या दुहितेला व्यवहारचतुर वेश्यामातेनें केलेला हा उपदेश आहे सरस्वतीकण्ठाभरणात वक्र निदर्शनेचें उदाहरण 'दृष्टान्त प्रोक्तसिद्ध्यै य सिद्धेऽर्थे तन्निदर्शनम्। पूर्वोत्तरसमत्वे तदृजु वक्र च कथ्यते।'

## २२८ मूलकारण : 228 Basic Principle

ज तुज्झ सई जाआ, असईओ जं च सुहअ! अह्मे वि।
ता किं फुट्टउ? बीअ तुज्झ समाणो जुआ णत्थि ॥२८॥

[यच्चत्र सती जाया असत्यो यच्च सुभग वयमपि।
तत्किं स्फुटतु बीज तव समानो युवा नास्ति ॥]

सुभग, तुझी पत्नी सती आहे व आम्ही असती आहोंत, याचें मूलकारण स्पष्ट सागत, तुझ्यासारखा तरण (तिला प्राप्त झाला व आम्हाला लाभला) नाहीं

● आग्रही मित्राबरोबर एक तरुण एका गणिकेकडे गेला त्याच्या आयुष्यातला हा पहिलाच प्रसग तिचा निरोप घेताना, तिच्या मदिरात पाऊल टाकताना नव्हे, त्यानें विचारलें, तुम्ही इतक्या सुदर, एवढ्या गुणी, या मार्गात कशा पडलात? त्याला तो प्रश्न नवा होता, तिला नेहमीचाच होता, कारण नवशिके बाचीराव आरभीं हाच प्रश्न विचारतात गिऱ्हाइकाची व त्याच्या धर्मपत्नीची स्तुति हें गणिकाच्या कैतवाचें एक वैशिष्ट्य आहे आणि तेंच रहस्याला गुगविलें।

## २२९ हाताला हात : 229. Co-operation.

सव्वस्सम्मि वि दड्ढे तहवि हु हिअअस्स णिव्वुदि च्चेअ।
जं तेण गामडाहे हत्थाहत्थि कुडो गहिओ ॥२९॥

[ सर्वस्वेऽपि दग्धे तथापि खलु हृदयस्य निर्वृतिरेव।
यत्तेन ग्रामदाहे हस्ताहस्तिकया कुटो गृहीतः ॥ ]

गावाला आग लागली, तींत तिचें सर्वस्व जळून गेलें; तरीही प्रियकरानें तिच्या हातातून घडा घेतला तेव्हां तिच्या हृदयाला परम सुख झालें.

● आग विझविण्यासाठीं गावकऱ्यांनीं पाणवठ्यापासून रांग लावली होती. पाण्यानें भरलेला घडा शेजाऱ्याला देताना हिच्या हाताला त्याचा हात लागला. त्या परिस्थितींत व मनःस्थितींत एवढ्यानेंही तिला सुख वाटलें.

## २३० चारुदत्त : 230. Poverty.

जाएज्ज वणुद्देसे कुंज्जो वि हु णीसाहो झंडितपत्तो।
मा माणुसम्मि लोए ताई रसिओ दरिद्दो अ ॥३०॥

[ जायता वनोद्देशे कुब्जोऽपि खलु निःशाखः शिथिलपत्रः।
मा मानुषे लोके त्यागी रसिको दरिद्रश्च ॥ ]

एकाद्या निर्जन जंगलात वेड्यावाकड्या व खुरटलेल्या, फांद्या नसलेल्या व पानें झडलेल्या वृक्षाच्या जन्माला आलों तरी चालेल, पण

१. डड्ढे, डड्ढे, दड्ढे २. कुण्डो ३. खुज्जो ४. साहओ. ५ गलित, पडिअ, झडिअ ६ एक्करमो ७ स्थाणुको गलितपत्र , घटितपत्र , शटितपत्रः

मनुष्यलोकांत मात्र दानशील व रसिक, पण दरिद्री, अशाच्या जन्माला येऊं नये.

● गंगाधर सांगतो : 'दरिद्रो निर्धन: । अवसररहितश्च ।' आणि रसिक म्हणजे 'सानुरागः शृंगारी च ।' धनाचे अभावीं दरिद्री रसिकाला इच्छित स्थानीं प्रवेश मिळत नाहीं, त्याप्रमाणें गृहकृत्यांमुळें मला भेटीला येण्याला सवड नाहीं, असा असतीनें दरिद्री भुजंगाला दूतीकरवीं सुभाषित रूपात पाठविलेला निरोप. गुणी परंतु दरिद्री चारुदत्तावर अनुरक्त होणारी वसंतसेना विरळा. अलंकाररत्नाकरात विध्याभासाचें उदाहरणः 'अनिष्टविधानं विध्याभास : ।'

## २३१ साहस : 231 Daring.

तस्स अ सोहग्गगुणं अमहिलसरिसं च साहसं मज्झ ।
जाणइ गोलाऊरो वासारत्तोद्धरत्तो अ ॥३१॥

[ तस्य च सौभाग्यगुणममहिलासदृशं च साहसं मम ।
जानाति गोदापूरो वर्षारात्रोऽर्धरात्रश्च ॥ ]

महिलांचे ठायीं सहसा आढळणार नाहीं असें माझें साहस आणि त्याचें सद्भाग्य हीं दोन्ही गोदावरीच्या पुराला व पावसाळ्यांतील मध्यरात्रीला माहीत आहेत.

● साहसावाचून अपूर्व फललाभ होत नाहीं. वेबरनें टीकेंत हेरो व लेॲंडर यांच्या कथेचा उल्लेख केलेला आहे. हेरो ही ॲफ्रोडीट या सौंदर्य-देवतेची पुजारीण. तिला भेटण्यासाठीं लेॲंडर हा रोज रात्रीं हेलेस्पॉंटची सामुद्रधुनी पोहून तिच्या मठात येत असे. एका रात्रीं तो वादळात बुडून मेला. त्याचें प्रेत पाहतांच हेरोनें समुद्रात उडी घेऊन आत्मार्पण केलें. या

१. वारिसआल्द्द २ वर्षाकालार्धरात्र्य., धाराल्द्धार्थ.

गाथेची नायिका अधिक साहसी. शुकबहात्तरींत कथा आहे: भ्रमवती नदीतीरीं शेषपुर गावीं सुराक्षस नामा शेती होता. त्याची स्त्री कालिका. नदीपार सिद्धेश्वरपुरींत एक ब्राह्मण होता. पालथ्या घागरीचे साह्यानें नदीपार होऊन ही त्याशीं संग करी. हें वर्तमान कर्णोपकर्णीं समजल्यावरून शोध करावा म्हणून सुराक्षस कृत्रिम निद्रा करता झाला. रात्रीं कालिका चालली, तिचे पाठीमागून आपण गेला, नदीपार गेला. तिनें पति पाहिला. घागर पाण्यानें भरून ती सिद्धेश्वराचे देवळात गेली व उदकाचा अभिषेक करून म्हणाली -' देवा ! तूं स्वप्नात सांगितलेंस कीं जर मध्यरात्रीस मजला अभिषेक केलास तर तुझा पति वाचेल, नाहींतर पाच दिवसात मरेल यास्तव अभिषेक केला. आता शतायु होऊं दे.' तिची सखी अंधारात उभी होती. ती तथास्तु म्हणाली. ही आकाशवाणी ऐकून सुराक्षस संतुष्ट होऊन मागचे मार्गें घरास माघारीं आला आणि पाठीमागून स्वकार्य साधून कालिका स्वगृहास परत येती झाली. असेंच काहीं साहस, कदाचित् ते समकालीन असेल, या गाथेंत अभिप्रेत असावें असें वाटतें.

## २३२ गेले ते दिवस : 232. Bygone Days.

ते वोलिआ वअस्सा, ताण कुडङ्गाण थाणुआ सेसा ।
अह्मे वि गअवआओ मूलुच्छेअं गअं पेम्मम् ॥३२॥

[ ते व्यतिक्रान्ता वयस्यास्तेषां कुञ्जानां स्थाणव: शेषा: ।
वयमपि गतवयस्का मूलोच्छेद्य गतं प्रेम ॥ ]

ते आमचे मित्र गेले, त्या कुंजातील वृक्ष वठून त्यांचीं खोडें झालीं, आम्ही वृद्ध झालो आणि आमचें प्रेमही समूळ नष्ट झालें.

१ रण्णुआ, रणुआ, खुणुआ २ व्यतीता वेतसा ३ कुरङ्गाणा
४ स्थाणुका

● या ना त्या निमित्तानें वयस्क असतो ग्रामतरुणाना जागोजाग व वेळोवेळीं भेटत असे आणि त्यांनीं अडलीं कामें करीत असे. बरेच दिवस या पापमूर्तीचें दर्शन झालेलें नसल्यामुळें एका उनाड तरुणानें विचारलें, का हो, अलीकडे कोठें भेटत नाहीं ? या उपहासगर्भ प्रश्नाला वठलेल्या वृद्धेचें उत्तर : आज तुम्ही मस्तीत आहात, उद्या तुम्हीही वयस्क व्हाल, तुमचे समानशील दोस्त सोडून जातील, उतारावरून घसरत असताना आठवणी करता येतील असें काहीं तरी या वयात करून ठेवा

## २३३ हिरवें खोड : 233 Strumpet

थणजहणणिअम्बोवरि णहरङ्का गअवआणॅ वणिआणम् ।
उव्वसिआणङ्गणिवासमूलबन्ध व्व दीसन्ति ॥३३॥
[ स्तनजघननितम्बोपरि नखराङ्का गतवयसां वनितानाम् ।
उद्वसितानङ्गनिवासमूलबन्धा इव दृश्यन्ते ॥ ]

वय उलटून गेलेल्या स्त्रियांच्या स्तनजघननितम्बावरील नखाचे ओरखडे मदनाच्या उध्वस्त निवासस्थानाच्या अवशेषासारखे दिसतात

● निवासमूल =भित्तिमूल= घराचा पाया ओसाड घराच्या पायातले दगडही शेजारीपाजारी उकरून नेतात, मग पायाचे खदक जमीनीवर ओढलेल्या ओरखड्यासारखे दिसतात.

## २३४ सौंदर्य : 234 Beauty.

जस्स जहं विअ पढमं तिस्सा अङ्गम्मि णिवडिआ दिट्ठी ।
तस्स तहि चेअ ठिआ सव्वङ्गं केण वि ण दिट्ठम् ॥३४॥

१ दशणाङ्का २ विलआण ३ नखाङ्का ४ दशनाङ्का

[ यस्य यत्रैव प्रथमं तस्या अङ्गे निपतिता दृष्टिः।
तस्य तत्रैव स्थिता सर्वाङ्गं केनापि न दृष्टम् ॥ ]

तिच्या ज्या अवयवावर दृष्टि पडते तेथेंच ती खिळून राहते. (दुसरीकडे पाहावयाचें भानच राहत नाहीं.) यामुळें तिचें संपूर्ण सौंदर्य कोणीच पाहिलेलें नाहीं.

● तिच्यावर अनेकांची नजर आहे, पण आजवर ती कोणालाही वश झालेली नाहीं.

## २३५ विष व अमृत : 235. Poison & Nectar.

विरहे विसं व विसमा, अमअमआ होइ संगमे अहिअम् ।
किं विहिणा समअं विअ दोहिं वि पिआ विणिम्मिआ ? ॥३५॥

[ विरहे विषमिव विषमामृतमया भवति संगमेऽधिकम् ।
किं विधिना सममेव द्वाभ्यामपि प्रिया विनिर्मिता ॥ ]

तिचा विरह विषासारखा असह्य व समागम अमृतासारखा सुखद आहे. विधीनें विष व अमृत यांचें मिश्रण करून प्रिया निर्माण केली की काय ?

● तुलनेसाठीं पहा: ' नामृतं न विषं किंचिदेकां मुक्त्वा नितम्बिनीम् । सैवामृतलता रक्ता विरक्ता विषवल्लरी ॥ ४४॥ ' ' मधु तिष्ठति वाचि योषितां । हृदि हलाहलमेव केवलम् ॥ अतएव निपीयतेऽधरो । हृदयं मुष्टिभिरेव ताड्यते ॥ ६०॥ ' (शृङ्गारशतकम् : भर्तृहरी : निर्णयसागर : श्री. पणशीकर)

१. किं सममेव विधिना.

## २३६ ओंजळींतलें पाणी : 236. Handful of Coins.

अदंसणेण पुत्तअ ! सुट्ठु वि णेहाणुबन्धघंडिआइं।
हत्थउडपाणिआइँ व कालेण गलन्ति पेम्माइं ॥३६॥

[ अदर्शनेन पुत्रक सुष्ट्वपि स्नेहानुबन्धघटितानि ।
हस्तपुटपानीयानीव कालेन गलन्ति प्रेमाणि ॥ ]

पुत्रा, सतत स्नेहानें दृढ झालेलें प्रेमही दर्शनाभावामुळें ओंजळींतल्या पाण्यासारखें कालान्तरानें नष्ट होतें.

● दुहितेच्या दोषपरिहारार्थ वेश्यामातेचे भुजंगाप्रत उद्गार. गेल्या खेपेला तुम्हीं ओंजळ भरून द्रव्य दिलें होतें, त्याची मलाही आठवण आहे; इतक्या दिवसात राजणही झिरपून कोरडा झाला असता, मग ओंजळीची काय कथा ! तिनें तुम्हाला ओळखलें नाहीं यात त्या बिचारीचा काय बरें दोष ?

## २३७ विंचू : 237. Scorpion.

पइपुरओ व्विअ णिज्जइ विच्छुअदट्ठेत्ति जारवेज्जघरम्।
णिउणसहीकरधारिअ भुअजुअलन्दोलिणी बाला ॥३७॥

[ पतिपुरत एव नीयते वृश्चिकदष्टेति जारवैद्यगृहम् ।
निपुणसखीकरधृता भुजयुगलान्दोलनशीला बाला ॥ ]

१. वन्धिहियआणं, बन्धगहिआइ २ वाळन्ति. ३ गृहीतानि, स्नेहानुबद्धमनसो ४ विंचुअदट्ठा, विचिअदक्खे, विछुआउक. ५ महीकरलम्बिअकरवलअन्दोलिरी, सहिअअसहीअणपसारिअ. ६ सहृदयसखीजनप्रसारिता.

विंचू चावल्याचें ढोंग करवून निपुण सखीनें दोन्ही दंडांना झटके देणारी बाला नवऱ्यासमोरून हात धरून जार वैद्याच्या घरीं नेली.

● वेबर सांगतो, स्त्रीवेदात अशा अनेक युक्त्या आढळतात. विंचू चावल्याचें ढोंग करून विषवैद्याच्या वेषात परपुरुषाला सखीच्या साह्यानें घरीं आणणाऱ्या धान्यकूटच्या तनुकेची गोष्ट शुकबहात्तरींत आहे. भूत उतरविणाऱ्या मांत्रिकासह छप्परपलंगावरून गावच्या रस्त्यावरून मिरवून घेणाऱ्या व्यभिचारिणीची गोष्ट श्रुतस्मृतींत आहे[1] ' विंचु मोठा रंगेला सईबाई, माझा उतरून गेला चेहरा । येती मज लहरावरती लहरा । कोणी तरी माणूस धाडा शहरा ।[1] ( लावणी-संग्रह' पृ. १५२ ). सखी सांगते, मी निपुण आहे, माझ्यावर विश्वास ठेव, काहीं तरी युक्ति काढून मी तिला घरातून काढीनच.

## २३८ बैल : 238 Hearth.

णिक्किणइ माहमासम्मि पामरो पाइँडिं वइल्लेण । ?

णिध्दूममुम्मुर व्विअ सामलीअ थणो पडिच्छँन्तो ॥३८॥

[ विक्रीणीते माघमासे पामरः प्रावरणं बलीवर्देन ।

निर्धूममुर्मुरनिभौ श्यामलयाः स्तनौ पश्यन् ॥ ]

धूम्ररहित व अग्निगोलासारखे लकाकणारे आपल्या श्यामल पत्नीचे स्तन पाहताच गरीब शेतकऱ्यानें ऐन हिंवाळ्यात आपलीं ऊबदार पांघरणें देऊन त्याच्या मोबदल्यात बैल खरेदी केला

● माघातली थंडी आणि यौवनाचा उष्मा—दोन्ही कल्पनांनीं हुडहुडी भरते ! काश्मीरात अंगात ऊबदार कपडे व त्यावर गरम पांघरणें असलीं

१ विक्केइ २ पारइ, पारिडिं, पावर्लि ३ मुम्मुरसच्छहे ४ णिअच्छन्तो
५. निर्धूमाङ्गारसदृशौ श्यामायाः स्तनयोर्नियच्छत

तरी आत पेटती शेगडी ठेवावी लागते. तेवढी थंडी आपल्याकडे नसते. म्हणून नव्या नवरीच्या उपस्थितीत एकीकडच्या थंडीची त्याला दिक्कत वाटली नाही. नागरटीसाठी त्याला बैल ध्यायचाच होता. या गाथेतील वस्तुविनिमयाचा व्यवहार लक्षात घेण्यासारखा आहे. परिवृत्ति अलंकार. 'रतिरूपेण हीनपात्रेषु रसाभास :!' सरस्वतीकण्ठाभरण.

## २३९ ओढ : 239. Magnetism.

सच्चं भणामि, मरणे ट्ठिअह्मि, पुण्णे तडम्मि तावीए।
अज्ज वि तत्थ कुडङ्गे[1] णिवडइ दिट्ठी तह च्चेअ ॥३९॥

[ सत्य भणामि मरणे[2] स्थितास्मि पुण्ये तटे ताप्त्या।
अद्यापि तत्र निकुंजे[3] निपतति दृष्टिस्तथैव ॥ ]

खरें सांगतें, तापीच्या पवित्र तीरावर मी आसन्नमरण अवस्थेत पडलें आहे, तरी काठावरच्या कुंजाकडे माझी दृष्टि अजून ओढ घेत आहे.

● स्त्रीचें वय झालें तरी तिचा भरवसा देता येत नाहीं असें पुरुषवेदात वचन आहे. आसन्नमरण अवस्थेत मनात कोणते विचार व आठवणी येतात? या प्रश्नावर एकमत होणें शक्य नाहीं!

## २४० संकट : 240. Calamity.

अँन्धअरचोरपत्तं[4] व माउआ! मह पइं[5] विलुम्पन्ति।
ईसाअन्ति महं विअ, छेप्पाहिन्तो फणो जाओ ॥४०॥

---

१ तत्थ तहिं चिय वलति णयणा कुडङ्गम्मि २ गृहीतमरणव्रताऽस्मि
३ कुरङ्गे ४ अन्धलयवयर ५ पहिंथ

[ अन्धकरवदरपात्रमिव मातरो मम पतिं विलुम्पन्ति ।
ईर्ष्यन्ति मह्यमेव लाङ्गूलेभ्यः फणो जातः ॥ ]

आई, आधळ्याच्या हातातल्या भांड्यांतलीं बोरें लुटलीं जातात; त्याचप्रमाणें इतर स्त्रियांनीं माझ्या पतीचें प्रेम लुटलें; आणि वर त्याच माझा मत्सर करतात. सर्पाला शेंपटीकडे आणखी एक फणा फुटावी, तशांतलाच प्रकार !

● त्याना काय वाटतें, मीही आधळीच आहे !

## २४१ ऐट : 241. Display.

अप्पत्तपत्तअं पाविऊण णवरङ्गअं हालिअसोण्हा ।
उअह ! तणुई ण माअइ रुन्दासु वि गामरच्छासु ॥४१॥

[ अप्राप्तप्राप्तं प्राप्य नवरङ्गकं हालिकस्नुषा ।
पश्यत तन्वी न माति विस्तीर्णास्वपि ग्रामरथ्यासु ॥ ]

आपल्याला कधीं मिळेल अशी कल्पनाही नव्हती असें नवें रंगीत लुगडें शेतकऱ्याच्या सुनेला मिळालें. यामुळें ती इतकी फुगली कीं ती अगानें सडपातळ होती व गावातले रस्ते रुद होते तरी ती त्यात मावेनाशी झाली !

● अल्पधनप्राप्तीनेंही नीचांचे अंगीं गर्वातिशयाचा संचार होतो. शेतकऱ्याची तरुणी बांड, अवखळ व हौशी सून अल्पात साध्य आहे अशी दूतीची सूचना. आठवड्याच्या बाजारांत व सणासुदीच्या दिवशीं अशीं दृश्यें खेड्यापाड्यात दिसतातच.

१. अन्धस्य बेलिफलवण्टोल. २. मायाविन्य ३. ईर्ष्यायति मह्यमेव पुन्छात्फणा १ कुसुम्भवस्त्र, रक्तवस्त्र

## २४२ बोलणें :　　242. Argument.

आक्खेवआइं पिअजम्पिआइं परहिअअणिव्वुदिअराइं।
विरलो खु जाणइ जणो उप्पण्णे जम्पिअव्वाइं ॥४२॥
[ वाक्क्षेपकाणि प्रियजल्पितानि परहृदयनिर्वृतिकराणि ।
विरल: खलु जानाति जन उत्पन्ने जल्पितव्यानि ॥ ]

बोलणें कसें असावें ? ऐकणाराला संतोष होईल व गोड वाटेल आणि प्रतिपक्षाला निरुत्तर करील असें असावें. वेळप्रसंग पाहून योग्य तें बोलणें सुचतें अशीं माणसें विरळा.

## २४३ शोभा :　　243. Grace.

छज्जइ पहुस्स ललिअं, पिआइ माणो, खमा समत्थस्स।
जाणन्तस्स अ भणिअं, मोणं च अआणमाणस्स ॥४३॥
[ शोभते प्रभोर्ललितं प्रियाया मानः क्षमा समर्थस्य ।
जानतश्च भणितं मौनं चाजानतः ]

सशक्ताची क्रीडा, प्रियेचा रुसवा, समर्थाची क्षमा, जाणत्याचें बोलणें व अजाणत्याचें मौन हीं शोभतात

● दैनिक व्यवहारात व राजकारणातही ह्या सुभाषितांतील आशय प्रत्ययास येतो. तूं नावडती आहेस, सबब तुला मान शोभत नाहीं. अलंकार-कौस्तुभात दीपक अलङ्काराचें उदाहरण 'प्रकृताप्रकृताना यथैकान्वयितास्ति दीपक तत्यात् ।'

१ वक्खेवआइ, सच्च पिआइ २ सत्य प्रियाणि

## २४४ पत्रलेखन : 244. Letter.

वेविरसिण्णकरङ्गुलिपरिग्गहक्खलिअलेहणीमग्गे ।
सोत्थि च्चिअ ण समप्पइ पिअसहि ! लेहम्मि किं लिहिमो ? ॥४४॥

[ वेपनशीलस्विन्नकराङ्गुलिपरिग्रहस्खलितलेखनीमार्गे ।
स्वस्त्येव न समाप्यते प्रियसखि लेखे किं लिखामः ॥ ]

बोटें थरकापत आहेत, स्वेदानें ओलीं झालीं आहेत; त्यांतून लेखणी घरंगळत आहे. प्रियसखी, ' स्वस्ति ' एवढेंही लिहून होत नाहीं, मी पत्र कशी लिहिणार ?

## २४५ वाळूचें घर : 245. House of Cards.

देव्वम्मि पराहुत्ते पत्तिअ ! घडिअं पि विहडइ णराणम् ।
कज्जं वालुअवरणं व्व कहँ वि बन्धं चिअ ण एइँ ॥४५॥

[ दैवे पराङ्मुखे प्रतीहि घटितमपि विघटते नराणाम् ।
कार्यं वालुकावरण इव कथमपि बन्धमेव न ददाति ॥ ]

माझ्यावर विश्वास ठेव; दैव फिरलें म्हणजे माणसानें कामाची कशीही उभारणी केली तरी ती कोसळते; वाळूचा तट उभारूं पहावा, तो धर वरीत नाहीं, तसें होतें.

● तुझें काम यशस्वी करण्यासाठीं मी फार खटपट केली, जमलें नाहीं, यात माझा दोष नाहीं.

---

१. क्खलियलेयणीसमग्गे २ परसस्विन्नकराङ्गुली ३. वालुअउब्भम्. ४. देइ, ल्हइ. ५. वालुकाप्राकारमिव कथमपि बन्धमेव न गच्छति ।

## २४६ घोंट : 246. Draught.

मामि ! हिअअं च पीअं तेण जुआणेण मज्जमाणाए।
ण्हाणहलिद्दाकडुअं अणुसोत्तजलं पिअन्तेण ॥४६॥

[ मातुलानि हृदयमिव पीतं तेन यूना मज्जन्त्याः।
स्नानहरिद्राकटुकमनुस्रोतोजलं पिबता ॥ ]

मामी, मी नदींत न्हात होतें, तो प्रवाहांत खालीं उभा होता. माझ्या अंगावरील हळदीनें कडू झालेल्या पाण्याचा घोट घेऊन त्यानें जणूं माझ्या हृदयाचा घोट घेतला.

● औषधें कडू पण परिणामीं मधुर असतात. त्यानें घेतलेला घोट हरिद्रेमुळें कटु होता, पण तिच्या संसर्गामुळें तो तिला मधुर वाटला. त्याचें कडू झालेलें तोंड गोड कसें करावें यावद्दल मामीभाचींत वाटाघाट चालली आहे.

## २४७ अशाश्वत : 247. Problem.

जिविअं[1] असासअं चिअ, ण णिवत्तइ जोव्वणं अतिक्कन्तम्।
दिअहा दिअहेहिँ समा ण होन्ति, किं णिट्ठुरो लोओ ?॥४७॥

[ जीवितमशाश्वतमेव न निवर्तते यौवनमतिक्रान्तम्।
दिवसा दिवसैः समा न भवन्ति किं निष्ठुरो लोकः ॥ ]

जीवन अशाश्वत आहे; तारुण्य उलटलें कीं तें परत येत नाहीं; दिवसासारखे दिवसही येत नाहींत; मग माणसें निष्ठुर कां होनात ?

१. हरिद्रासुरभिसमुष्णोतो. २. जीवं असासिअं. ३. जीवमशाश्वतमेव.

● जीवित क्षणभंगुर आहे, अशी संधि पुन्हा येणार नाहीं. निष्ठुर होऊं नको, कृपा कर, अशी विनंति.

## २४८ कृष्णहट्टी : 248. Black Market.

उप्पाइअदव्वाणँ वि खलाणँ को भाअणं ? खलो च्चेअ।
पक्काइँ वि णिम्बफलाइँ णवरँ काएहि खज्जन्ति ॥४८॥

[ उत्पादित[1]द्रव्याणामपि खलानां को भाजनं खल एव।
पक्वान्यपि निम्बफलानि केवलं काकैः खाद्यन्ते ॥ ]

दुष्टानीं द्रव्य संपादन केलें तर ते त्याचें दान कोणाला करतात ? अर्थात् हलकटांनाच. लिंबाचीं फळें पिकलीं तरी तीं कावळेच खाणार.

● कृष्णहट्टी म्हणजे काळा बाजार करणारे व्यापारी. ते असहाय लोकांना लुटतात आणि यांना कचेरी, कलाल व कोतवाल लुटतात. सफेत वस्त्रें परिधान करून व लोकोपयोगी संस्थांना दानें देऊन पापक्षालन करण्याची व मानमान्यता मिळविण्याची प्रथा मात्र आधुनिक आहे. सारेच कावळे. अलंकाररत्नाकरात सम अलंकाराचें उदाहरण. अलंकारकौस्तुभातील व्याख्या पहा : ' अन्योन्यसंगमाहीं संबध्येते यदा समं तस्यात् । '

## २४९ शतपावली : 249. Practice.

अज्ज मए गन्तव्वं घणन्धआरे वि तस्स सुहअस्स ।
अज्जा[2] णिमीलिअच्छी पअपरिवाडिं घरे कुणइ ॥४९॥

[ अद्य मया गन्तव्यं घनान्धकारेऽपि तस्य सुभगस्य ।
आर्या निमीलिताक्षी पदपरिपाटिं गृहे करोति ॥ ]

१. उपार्जित. २. अक्का.

अंधार असला तरी आज रात्रीं भाग्यवान् प्रियकराची भेट घेण्याला जायचें ठरलेलें असल्यामुळें ती घरांतल्या घरांत डोळे मिटून चालण्याचा सराव करीत आहे.

● कोणी तरुणी डोळे मिटून अंगणात शतपावली करीत होती. तरी तिचें इंगित ओळखलें गेलें ! मांजर डोळे मिटून बसलें तरी त्याच्यावर इतरांची नजर असतेच !

## २५० सुजनप्रशंसा : 250. In Praise of Goodness.

सुअणो ण कुप्पइ व्विअ, अह कुप्पइ विप्पिअं ण चिन्तेइ ।
अह चिन्तेइ ण जम्पइ, अह जम्पइ लज्जिओ होइ ॥५०॥

[ सुजनो न कुप्यत्येव अथ कुप्यति विप्रियं न चिन्तयति ।
अथ चिन्तयति न जल्पति अथ जल्पति लज्जितो भवति ॥ ]

सुजन सहसा संतापत नाहींत, संतापले तरी कोणाचें अप्रिय चिंतीत नाहींत, चिंतिलें तरी बोलून दाखवीत नाहींत आणि बोललेच तर त्याना स्वतःची लाज वाटते.

● अलंकाररत्नाकरात अतिशय अलंकाराचें उदाहरण : 'सम्भावन-यान्यथा वातिशयोऽतिशय :'

## २५१ गुणप्रशंसा : 251. Reality.

सो अत्थो जो हत्थे, तं मित्तं जं णिरन्तरं वसणे ।
तं रूअं जत्थ गुणा, तं विण्णाणं जहिं धम्मो ॥५१॥

१. अमंगलं.

[ सोऽर्थो यो हस्ते तन्मित्रं यन्निरन्तरं व्यसने ।
तद्रूपं यत्र गुणास्तद्विज्ञानं यत्र धर्मः ॥ ]

प्रत्यक्ष हातात असतें तें धन; संकटात अंतर देत नाहीं तो मित्र; गुणांचें सान्निध्य असतें तेंच रूप; धर्माचें साहचर्य असतें तेंच विज्ञान.

● गंगाधर सांगतो, कोरडीं वचनें देणाऱ्या भुजंगाच्या आहारीं चाललेल्या सौंदर्यगर्विता दुहितेला हा वेश्यामातेचा उपदेश आहे ! अलंकार-कौस्तुभात परिसंख्या अलंकाराचें उदाहरण : 'पृष्ठमपृष्टं चोक्तं यद्व्यङ्ग्यं वापि वाच्यं वा । फलतीतरव्यपोह परिसंख्या सा तु संख्याता ।'

## २५२ चांदणी रात : 252. Moonlit.

चन्दमुहि ! चन्दधवला दीहा, दीहच्छि ! तुह विओअम्मि ।
चउजामा सअजाम व्व जामिणी कहँ वि वोलीणा ॥५२॥

[ चंद्रमुखि चंद्रधवला दीर्घा दीर्घाक्षि तव वियोगे ।
चतुर्यामा शतयामेव यामिनी कथमप्यतिक्रान्ता ॥ ]

चंद्रमुखी, दीर्घाक्षी, चार प्रहराची चांदणी रात्र तुझ्या वियोगामुळें शंभर प्रहराएवढी दीर्घ झाली. ती मीं कशी घालविली तें माझें मला माहीत.

● चंद्रदर्शनामुळें चंद्रमुखीची आठवण झाली आणि यामिनीच्या दीर्घत्वामुळें तिच्या दीर्घाक्षाची. आठवणीमुळें एकान्त असह्य झाला. प्रवासाहून परत आलेल्या पतीचें पत्नीशीं चाटुवचन. 'पडलें शुभ्र चांदणें, काय मी करूं । अशा चांदण्यामध्यें नाहीं पारूं ॥' ( सगनभाऊ, लावण्या व पोवाडे. पृ. ३१. ) विरोधालङ्कारध्वनि.

## २५३ मृदंग : 253 Drum

अउलीणो दोमुहओ, ता महुरो भोअणं मुहे जाव ।
मुरओ व्व खलो, जिण्णम्मि भोअणे विरसमारसइ ॥५३॥

[ अकुलीनो द्विमुखस्तावन्मधुरो भोजन मुखे यावत् ।
मुरज इव खलो जीर्णे भोजते विरसमारसति ॥ ]

अकुलीन दुतोंडे असतात, भोजन चालू आहे तोंवर ते गोड बोलतात, खल हे मृदगासारखे असतात, तोंडावरला ( पिठाचा ) लेप जरा कमी पडला ( किंवा सुकला ) कीं लगेच बदसूर होतात

● ज्या तोंडानें जेवावयाचें त्याच तोंडानें बोलावयाचें असल्यामुळें भोजन चालू आहे तोंवर अकुलीनाची वाणी मिठास असते, तोंड बद झालें किंवा फिरलें कीं लगोलग निंदा सुरू होते मुखलेप कमी झाला कीं खल यजमानाची निंदा त्याच्या परोक्ष सुरू करतात दुर्जन मुखीं पिंडदान केलें पाहिजे, सारखें पिंडदान करीत राहिलें पाहिजे

## २५४ चिथावणी : 254 Instigation

तह सोण्हाइ पुलइओ दरवलिअन्तद्धतारअं पहिओ ।
जह वारिओ वि घरसामिएण ओलिन्दए वसिओ ॥५४॥

[ तथा स्नुषया प्रलोकितो दरवलितार्धतारक पथिक ।
यथा वारितोऽपि गृहस्वामिना अलिन्दके सुप्त ॥ ]

---

१ रन इव खञ्जीगो भाजने २ अतद्ध, वङ्क, अवङ्ग ३ मनाग्वलित-तिर्यक्तारक, दरविवलितार्द्धतारक, अन्तर्द्धारकम्

घरधन्यानें पथिकाला ( पथारी पसरण्याला ) मनाई केली; पण तेवढ्यात सुनेनें नखऱ्यात मान वेळावून अपाग दृष्टीनें त्याच्याकडे असें पाहिलें कीं तो नि:शंकपणें ओसरीवर झोंपला.

● या गाथेंतील गृहस्वामी हा शब्द स्नुषेच्या साहचर्यात आल्यामुळें त्याचा अर्थ सासरा असाच घेतला पाहिजे. तिचा पति प्रवासी होता किंवा घरीं असूनही ती त्याला जुमानीत नव्हती. सासऱ्याचीही सुनेपुढें मात्रा चालत नव्हती. तिनें पथिकाला सुचविलें, विन्मुख जाऊं नको, देवडीवर नोकर माणसें झोंपतात, तूं ओसरीवर पथारी लाव आणि माझी वाट पहा. ही नाट्यवस्तु असावी असें वाटतें.

## २५५ फुशारकी : 255. Bragging.

लहुआन्ति लहुं पुरिसं पव्वअमेत्तं पि दो वि कज्जाइं ।
णिव्वरणमणिव्वूढे णिव्वूढे जं अ णिव्वरणम् ॥५५॥
[ लघयतो लघु पुरुषं पर्वतमात्रमपि द्वे अपि कार्ये ।
निर्वरणमनिर्व्यूढे निर्व्यूढे यच्च निर्वरणम् ॥ ]

मनुष्य पर्वताएवढा मोठा असला तरी दोन गोष्टी त्याला तावडतोब लघुता आणतात; कार्य केलेलें नसता तें केलें आहे अशी फुशारकी मारणें आणि जें काहीं केलेलें असेल त्याबद्दल प्रौढी सांगणें.

● पुनर्भेटीची अपेक्षा असेल तर बभ्रा करूं नये; संकेत ठरला असेल तर बकवा करूं नये. प्रेमाचें स्वारस्य रहस्यात असतें.

## २५६ अर्घकमल : 256. Lotus Offering.

कं तुङ्गथणुक्खित्तेण पुत्ति ! दारट्ठिआ पलोएसि ।
उण्णामिअकलसणिवेसिअग्घकमलेण व मुहेण ॥५६॥

[ क तुङ्गस्तनोत्क्षिप्तेन पुत्रि द्वारस्थिता प्रलोकयसि ।
उन्नामितकलशनिवेशितार्घकमलेनेव मुखेन ॥ ]

मुली, उच्च कलशावर पूजेचें कमळ ठेवावें त्याप्रमाणें उभार उरोजावर मुख ठेवून, दारात उभी राहून तू कोणाची वाट पहात आहेस ?

● दारात उभी राहणारी ( ' द्वारावस्थितिशीलिका ' अनगरग ८. १७ ) स्त्री सहजसाध्य असते असा कामशास्त्राचा सिद्धान्त आहे. ती संकेतानुसार उभी होती की संकेतासाठीं ? दूरचें दिसावें म्हणून आपण मान थोडी खालीं, थोडी पुढें करतों व छाती फुगवतों, नतर नजर एकाग्र करतों, तसाच हा प्रकार दिसतो दूती विचारते, तू कोणाची वाट पहात आहेस ? साग, मी त्याला घेऊन येतें, आणि सुचविते, तू कोणीकडेही येण्याला तयार असलीस तर तसें साग.

## २५७ प्रसिद्धि :　　　　257 Advertisement.

वइविवरणिग्गअदलो एरण्डो साहइ व्व तरुणाणम् ।
एत्थ घरे हलिअवहू एद्दहमेत्तत्थणी वसइ ॥५७॥

[ वृतिविवरनिर्गतदल एरण्ड साधयतीव तरुणेभ्य ।
अत्र गृहे हलिकवधूरेतावन्मात्रस्तनी वसति ॥ ]

कुपणाच्या छिद्रातून बाहेर डोकावणारीं एरंडाचीं पानें तरुणाना जाहीर करतात कीं त्या पानाएवढे विशाल स्तन असलेली शेतकऱ्याची तरुण स्त्री येथें राहते

● नायिकेच्या घराचा नक्की पत्ता दूती नायकाला समजावून सागत आहे पांचहि बोटें थोडीं वाकवलीं कीं एरंडाच्या पानासारखीं दिसतात.

१ स्तपा

एरण्ड हा खल, त्याच्या तोंडीं रहस्य राहतच नाहीं; घरधनीणीच्या सौंदर्याचें दिग्दर्शन तो प्रतीक रूपानें येणाऱ्याजाणाऱ्याला दाखवीत आहे. अभिनयअलंकारः 'तदाभूतार्थविज्ञानजनकत्वेन हेतुना। नास्मादभिनयालेख्यमुद्राविम्बादयःपृथक्॥' सरस्वतीकण्ठाभरण.

## २५८ गजगति : 258. Slow Motion.

गअकलहकुम्भसंणिहघणपीणणिरन्तरेहि तुङ्गेहिं।
उस्ससिउं पि ण तीरइ किं उण गन्तुं हअथणेहिं ॥५८॥

[ गजकलभकुम्भसंनिभघनपीननिरन्तराभ्यां तुङ्गाभ्याम्।
उच्छ्वसितुमपि न तीरयति किं पुनर्गन्तुं हतस्तनाभ्याम्॥]

हत्तीच्या छाव्याच्या गंडस्थळासारखे मोठे, भरदार, उंच व मध्यें अंतर नसलेले असे स्तन असल्यामुळें तिला नीट श्वासही घेतां येत नाहीं, मग झपाझप चालतां कसें येईल?

● केव्हा केव्हा गुण हे अवगुणासारखे वाटतात, अडचण करतात, अडवणूक करतात.

## २५९ रतिरहस्य : 259 Love Technique.

मासपसूअं, छम्मासगब्भिणिं, एक्कदिअहजरिअं च।
रङ्गुत्तिण्णं च पिअं पुत्तअ! कामन्तओ होहि ॥५९॥

[ मासप्रसूतां षण्मासगर्भिणीमेकदिवसज्वरितां च।
रङ्गोत्तीर्णां च प्रियां पुत्रक कामयमानो भव ॥ ]

१. उअसिउं. २. दिवहजरिअं.

अतिसुख देणारी स्त्री कोणती ? एक महिन्याची बाळंतीण, किंवा सहा महिन्याची गर्भिणी; एकच दिवस ज्वर येऊन गेलेली अगर नृत्य संपवून नुकतीच रंगपटात आलेली. पुत्रा, अशा स्त्रीवर प्रेम कर.

● गंगाधर सांगतो, नृत्यकुशल कन्येची कुट्टिनीनें केलेली ही भलावण आहे. सुखसाध्य व सुखदायक स्त्रीबद्दलचें 'अनङ्गरङ्गा'तील वचन पहा: 'रङ्गाद्विश्रांतदेहा चिरविरहवती मासमात्रप्रसूता । गर्भालस्या च नव्यज्वर-युततनुका त्यक्तमानप्रसन्ना ॥ स्नाता पुष्पावसाने नवरतिसमये मेघकाले वसन्ते । प्रायःसम्पन्नरागा मृगशिशुनयना स्वल्पसाध्या रते स्यात्' ॥४·३६॥

## २६० स्तनप्रशंसा : 260. Glowing Globes.

**पडिवक्खमण्णुपुंञ्जे[1] लावण्णउंडे[2] अणङ्गगअकुम्भे ।**
**पुरिससअहिअअधरिए कीस थणन्ती[3] थणे वहसि ? ॥६०॥**

[ प्रतिपक्षमन्युपुञ्जौ लावण्यकुटावनङ्गगजकुम्भौ ।
पुरुषशतहृदयधृतौ किमिति स्तनन्ती स्तनौ वहसि ॥ ]

तुझे स्तन तुझ्या सवतींच्या क्रोधाच्या पुंजासारखे आहेत; जणू सौंदर्याचे घट आहेत, मदनरूपी हत्तीच्या गण्डस्थळासारखे आहेत. शेंकडों पुरुषांचीं हृदयें त्याचा अभिलाष करीत आहेत. सौंदर्याची गर्जना करणारें हें वक्षस्थल एवढ्या गर्वानें तू कोणासाठीं धारण करीत आहेस ?

● स्तन कसे असावेत ? क्रोधपुञ्जासारखे लाल, लावण्यघटासारखे घट्ट, अनङ्गगजाच्या गण्डस्थळासारखे विशाल !

१ पुञ्जे २ उडे ३ थणन्ती ( थुण्ण इस ) श्री मथुरानाथशास्त्री.

## २६१ शुभ : 261. Auspicious.

घरिणिघणत्थणपेल्लणसुहेल्लिपडिअस्स होन्तपहिअस्स ।
अवसउणङ्गारअवारविट्ठिदिअहा सुहावेन्ति ॥६१॥

[ गृहिणीघनस्तनप्रेरणसुखकेलिपतितस्य भविष्यत्पथिकस्य ।
अपशकुनाङ्गारकवारविष्टिदिवसाः सुखयन्ति ॥ ]

गृहिणीच्या घट्ट स्तनांच्या प्रेरणेमुळें सुखद वाटणाऱ्या क्रीडेंत रत झालेल्या भविष्यत्पथिकाला प्रवासाकरितां अशुभ असलेले मंगळवार व विष्टीचे दिवस शुभ वाटतात.

● शुक्लपक्षातील द्वितीया, सप्तमी व द्वादशी हे विष्टीचे दिवस आणि मंगळवार हे प्रवासाला अशुभ होत. ते गृहस्वामीला शुभ वाटले, कारण त्याच्या सबबीवर त्याला प्रवास लांबणीवर टाकता आला. जें विरोधी तेंही अनुकूल होऊं शकतें.

## २६१ वन्दनमालिका : 262. Expectancy.

सा तुह कएण, बालअ ! अणिसं घरदारतोरणणिसण्णा ।
ओससइ वन्दणमालिअ व्व दिअहं विअ वराई ॥६२॥

[ सा तव कृतेन बालकानिशं गृहद्वारतोरणनिषण्णा ।
अवशुष्यति वन्दनमालिकेव दिवसमेव वराकी ॥ ]

बाळक, तुझ्या दर्शनासाठीं ती घराच्या दरवाजावरील गच्चीवर सारखी बसून आहे दारावर बांधलेल्या तोरणासारखी बिचारी कोमेजून गेली आहे.

---

१. साहित्यमीमांसेंतील पाठ : सातुग्धज्जणबाळअणिच्चघरदारतोरणिणाओ । सूररवंदणमालिणव्वदिअहमिन्विमाहिच्चिरं अवारारं ॥

● घरदार म्हणजे घराचें दार. हा शब्द इथें आपण प्रपंचाचा पसारा या अर्थानें वापरतों. तोरण म्हणजे घरदारावरील गच्ची किंवा गवाक्ष, वदनमाला म्हणजे त्यावर लावलेली माळ, इथें आपण वदनमालेलाच तोरण म्हणतों.

## २६३ वठलेला वड : 263 Flock of Parrots

हसिअं सहत्थतालं सुक्खवडं उवगएहिं पहिएहिं ।
पत्तअफलाणॅ सरिसे उड्डीणे सूअविन्दम्मि ॥ ६३ ॥

[ हसित सहस्तताल शुष्कवटमुपगतै पथिकै ।
पत्रफलाना सदृशे उड्डीने शुकवृन्दे ॥ ]

( पर्णफळांनीं गर्द दिसणाऱ्या ) वडाजवळ वाटसरू आले तेव्हा त्याची चाहूल लागताच झाडावरल्या पानाफळासारखा दिसणारा राघूचा समुदाय उडून गेला व वृक्ष शुष्क झाला. हें पाहताच ते टाळ्या वाजवून हंसले.

● पोपटाचीं शरीरें हिरवीं व चोंची लाल, तशींच वडाचीं पानें व फळें नियोजित संकेतस्थानाजवळ परक्याचा मुक्काम पडल्यामुळें संकेत रद्द केल्याची सूचना, किंवा, तीं पानें फळें जशीं लटकीं तसाच तुझा अनुराग, अशी निर्भर्त्सना, किंवा, अंगावर अलंकार चढविले तरी शुष्कपणा लोपत नाहीं, अशी सूचना, किंवा, मूर्खांनीं वैदग्ध्याचें अगर वृद्धानें हिरवटपणाचें ढोंग आणलें तरी तें टिकत नाहीं सरस्वतीकण्ठाभरणात भ्रांतीचें ' अतत्त्वे तत्त्वरूपा बाधिता ) उदाहरण ' भ्रांतिर्विपर्ययज्ञान द्विधा सापि प्रयुज्यते । अतत्त्वे तत्त्वरूपा च तत्त्वे चातत्त्वरूपिणी ॥ अतत्त्वे तत्त्वरूपा या त्रिविधा सापि पठ्यते । अबाधिता बाधिता च तथा कारणबाधिता ॥' (३ ३५-३६)

---

१ पत्तप्फलसारिच्छे २ पूसवग्गमि

## २६४ दृष्टिसुख : 264 Key-hole.

अज्ज म्हि हासिआ, मामि ! तेण पाएसु तह पडन्तेण।
तीए वि जलन्ति दीववत्तिमब्भु[1]ण्णअन्तीए ॥६४॥

[ अद्यास्मि हासिता मातुलानि तेन पादयोस्तथा पतता।
तथापि ज्वलन्तीं दीपवर्तिमभ्युत्तेज[2]यन्त्या ॥ ]

पति अनुनय करताना पत्नीच्या पाया पडत होता आणि ती दिव्याची ज्योत उजळवीत होती. मामी, हें पाहून मी मात्र हंसत होतें.

● अनुनयाचें दृश्य दाखवीन असे पत्नीनें सखीला कबूल केलें होतें, सारा प्रकार दिसेल अशा जागीं बसविलें होतें आणि स्पष्ट दिसावें म्हणून दिव्यातली वात ती पुढें पुढें सरकवीत होती. अशीं व याहून अधिक जिव्हाळ्याचीं दिलखुष दृश्यें अधूनमधून आजूबाजूला दिसतात; पण एवढ्या सोयी करणाऱ्या मित्रमैत्रिणी विरळा. फार वर्षांपूर्वी वाचलेली व आता संदर्भ विसरलेली एक जर्मन गोष्ट आठवते. कथावस्तु अशीः राणीचें संपूर्ण सौंदर्य व कौशल्य निरखता यावें म्हणून राजानें जिवलग मित्राला अतः-पुरातील सूक्ष्म गवाक्षाआड लपवून बसविलें. राणी इतकी नाजूक व पतिव्रता कीं परक्याच्या दृष्टिक्षेपानीं तिचें अंग भाजलें. याचें रहस्य ओळखून तिनें दोघानाही या अत्याचाराचें योग्य प्रायश्चित्त दिलें. तसा कांहीं प्रकार येथें झाला नाहीं. शारीरिक पावित्र्याच्या दृष्टीनें परस्त्री व परपुरुष दोघेंही सारखेच; पण मनोवृत्तींत व प्रतिक्रियेंत केवढा फरक !

## २६५ सौजन्य : 265 Mask.

अणुवत्तणं कुणन्तो वेसे वि जणे अहिण्णं[3]मुहराओ।
अप्पवसो च्चि हु सुअणो परव्वसो आहिआईए ॥६५॥

१. अब्भुत्तअतीए २ उज्वलयन्त्या, अभ्युन्नयन्त्या ३ अभिण्ण.

[ अनुवर्तन कुर्वन्द्वेष्येऽपि जनेऽभिन्नमुखरागः ।
आत्मवशोऽपि खलु सुजनः परवशः कुलीनतायाः ॥ ]

सुजन हा वृत्तीनें स्वाधीन असला तरी आभिजात्यामुळें पराधीन असतो. त्याला द्वेष्याना तोषवावें लागतें आणि मनोविकार मुखावर प्रकट होणार नाहींत अशी खबरदारी घ्यावी लागते.

● सखी सांत्वन करते कीं पति सवतीकडे स्नेहामुळें किंवा स्वखुषीनें गेला नाहीं, कुलीनत्वामुळें, नाइलाज म्हणून गेला.

## २६६ आदर : 266. Honour.

अणुदिअहवड्ढिआअरविण्णाणगुणेहिँ जणिअमाहप्पो ।
पुत्तअ ! अहिआअजणो विरज्जमाणो वि दुल्लक्खो ॥६६॥

[ अनुदिवसवर्धितादरविज्ञानगुणैर्जनितमाहात्म्यः ।
पुत्रकाभिजातजनो विरज्यमानोऽपि दुर्लक्ष्यः ॥ ]

पुत्रा, ती कुलीन व विदग्ध आहे. दिवसानुदिवस ती तुझ्याबद्दल अधिकाधिक आदर दर्शवीत आहे. आपले गुण व ज्ञान हीं तिच्या प्रत्ययास आल्यामुळें आपलें माहात्म्य वाढलें आहे असा गैरसमज करून घेऊं नको. ती तुझ्याविषयीं विरक्त होत आहे आणि तू तिच्याकडे दुर्लक्ष करीत आहेस.

● विदग्ध व कुलीन वनिताच्या वर्तनाचें रहस्य तुला समजत नाहीं. तुझी अन्यवनितासक्ति तिच्या निदर्शनास आलेली आहे. हा आदर औदासीन्याचा द्योतक आहे. तिची विरक्ति दृढ होण्यापूर्वीच तिला प्रसन्न करून घे.

---

१ अपरवशो. २ आभिजात्या

## २६७ लज्जा : 267 Disgrace

विण्णाणगुणमहग्घे पुरिसे वेसत्तणं पि रमणिज्जम् ।
जणणिन्दिए उण जणे पिअत्तणेणावि लज्जामो ॥६७॥

[ विज्ञानगुणमहार्घे पुरुषे द्वेष्यत्वमपि रमणीयम् ।
जननिन्दिते पुनर्जने प्रियत्वेनापि लज्जामहे ॥ ]

ज्ञानी, गुणी व पूज्य अशा पुरुषाबरोबर वैर केलेलें पुरवलें, पण लोकनिंदेला पात्र झालेल्याबरोबर स्नेह केला तर त्यामुळें लज्जा प्राप्त होते.

● गगाधर सागतो, नायिका नवऱ्याबद्दल वैराग्य आणि अन्य विदग्धा बद्दल अभिलाष प्रकट करीत आहे ।

## २६८ अस्थिर : 268 Transitory

कहँ णाम तीअ तह सो सहावगुरुओ वि थणहरो पडिओ ।
अहवा महिलाणँ चिरं को वि ण हिअअम्मि संठाइ ॥६८॥

[ कथ नाम तस्यास्तथा स स्वभावगुरुकोऽपि स्तनभर पतित ।
अथवा महिलाना चिर कोऽपि न हृदये संतिष्ठते ॥ ]

स्वभावत भरदार व विशाल अशा तिच्या स्तनाचें अध पतन कसें झालें ? खरोखर, महिलाच्या हृदय त कोणीही चिरकाल राहू शकत नाहीं

● सौंदर्याचा व यौवनाचा गौरव करण्यासाठीं निसर्ग स्तनाना उच्च स्थान व उत्तुग स्थिति देतो प्रजोत्पादनामुळें होणारें त्याचें अध पतनही नैसर्गिकच आहे. स्त्रियाच्या हृदयात प्रेम तरी चिरकाल कोठें टिकतें ! जें चचल तें उच्च कसें असणार !

१ दासत्तण २ स्तनयुग्म ३ हृदये न सस्थायी, हृदय को नाम सतिष्ठति

## २६९ माथ्यावर पदर : 269. Veil.

सुअणु ! वअणं छिवन्तं सूरं मा साउलीअे वारेहि ।
एअस्स पङ्कअस्स अ जाणउ कअरं सुहप्फंसम् ॥६९॥

[ सुतनु वदनं स्पृशन्तं सूर्यं मा वस्त्राञ्चलेन वारय ।
एतस्य पङ्कजस्य च जानातु कतरत्सुखस्पर्शम् ॥ ]

सुंदरी, तुझ्या मुखाला सूर्यकिरण स्पर्श करीत आहेत. पदरानें त्याचें निवारण करूं नकोस. कमळाचा स्पर्श अधिक सुखदायक कीं तुझा, हें सूर्याला कळूं दे.

● मला वाटतें, तिनें माथ्यावर पदर घेतला होता. तिचें सौंदर्य नीट दिसावें, म्हणून ही खुशामत चालली आहे.

## २७० रुसव्यावर औषध : 270. Dose.

माणोसहं व पिज्जइ पिआइ माणंसिणीअ दइअस्स ।
करसंपुडवलिउद्धाणणाइ मइराइ गण्डूसो ॥७०॥

[ मानौषधमिव पीयते प्रियया मनस्विन्या दयितस्य ।
करसंपुटवलितोर्ध्वाननया मदिराया गण्डूषः ॥ ]

रुसलेल्या प्रियेचें मुख दयितेनें ओंजळींत धरून वर उचललें, जरासें वळवलें आणि आपल्या मुखांतील मदिरेचा घोंट तिला पाजला. रुसव्यावरील औषध म्हणूनच ती तो प्याली.

● औषध पाजताना थोडीबहुत जबरदस्ती करावीच लागते. जणूं तिला तें किंवा ती नकोच होती ! आणि या औषधाचा गुण तरी किती त्वरित !! मात्र तें अनुपानासह दिलें तरच ! ! !

१. साहुली, साऊलीअ. २ पल्लवछत्तिक्या, पर्णछत्रया. ३ उत्ताण.

## २७१ दौर्बल्य : 271 Weakness

कहँ सा णिव्वण्णिज्जइ जीअ जहा लोइअम्मि अङ्गम्मि ।
दिट्ठी दुव्वलगाई व्व पङ्कपडिआ ण उत्तरइ ? ॥७१॥

[ कथ सा निर्वर्ण्यता यस्या यथालोकितेऽङ्गे ।
दृष्टिर्दुर्वला गौरिव पङ्कपतिता नोत्तरति ॥ ]

चिखलात रुतलेल्या दुबळ्या गाईला पाय बाहेर काढता येत नाहीं; सुंदरीच्या एकेका अवयवाकडे पाहताना दृष्टि तशीच, तेथेंच खिळून राहते; तेव्हा तिच्या सपूर्ण सौंदर्याचें अवलोकन कसें करायचें ?

● गाथा क्र. २३४ पहा; पुनरुक्ति.

## २७२ मैत्री : 272 Friendship

कीरन्ती व्विअ णासइ उअए रेह व्व खलअणे मेत्ती ।
सा उण सुअणम्मि कआ अणहा पाहाणरेह व्व ॥७२॥

[ क्रियमाणैव नश्यत्युदके रेखेव खलजने मैत्री ।
सा पुन सुजने कृता अनघा पाषाणरेखेव ॥ ]

खलाची मैत्री, पाण्यावरली रेघ, ओढली न ओढली तोंच नष्ट होते. सज्जनाची मैत्री, पाषाणावरली रेघ, एकदा कोरली कीं कायमची.

● अलंकाररत्नाकरात उपमेचें उदाहरण 'उपमानोपमेयस्य सादृश्यमुपमा ।'

## २७३ जटा : 273. Matted Locks

अव्वो दुक्करआरअ ! पुणो वि तन्ति करेसि गमणस्स ।
अज्ज वि ण होन्ति सरला वेणीअ तरङ्गिणो चिउँरा ॥७३॥

१. पाहाण. २. चिहुरा.

[ अव्वो दुष्करकारक पुनरपि चिन्तां करोषि गमनस्य ।
अद्यापि न भवन्ति सरला वेण्यास्तरङ्गिणश्चिकुराः ॥ ]

माझ्या केसांच्या जटा अजून सुटल्या नाहींत, तोंच तुम्ही फिरून प्रवासाला जाण्याचा विचार करीत आहांत. च् च् ! तुम्हांला अवघड कामांचीच आवड भारी.

● पति प्रवासात असताना पत्नीनें वेणीफणी करावयाची नसते. गुंता झालेल्या जटांच्या झुलत्या सौंदर्यबटा होण्याला किती तरी काळ लागतो !

## २७४ चर्वितचर्वण : 274. Repetition.

ण वि तह छेअरआइँ वि हरन्ति पुणरुत्तराअरसिआइं ।
जह जैत्थ व तत्थ व जह व तह व सब्भावणेहरमिआइं ॥७४॥

[ नापि तथा छेकरतान्यपि हरन्ति पुनरुक्तरागरसिकानि ।
यथा यत्र वा तत्र वा यथा वा तथा वा सद्भावस्नेहरमितानि ॥ ]

अंत:करणपूर्वक झालेला संभोग, मग तो कोणत्याही जागीं व कशाही प्रकारें केलेला असो, त्यामुळें रसिकांना होतें तेवढें सुख सुरतशास्त्रोक्त समागमात होत नाहीं.

● कारण तें शिळें, तांत्रिक, चर्वितचर्वणासारखें वाटतें. खऱ्या प्रेमाला शास्त्राधार लागत नाहीं. त्याला कामशास्त्राचे तात्त्विक ज्ञान नाहीं, म्हणून त्याचा अव्हेर करूं नको. काव्यालंकाराचें विवरण फक्त पण्डितानाच करता येईल, पण रसग्रहण कोणाही विदग्ध रसिकाला. गंगाधर सांगतो, दुर्विदग्ध धनिकाचा घसमुसळेपणा झाकण्यासाठीं धूर्ता स्नेहप्रशंसा करीत आहे !

१. सुरआइं. २. रमिआइं. ३. जत्थव तत्थव. ४. सब्भावरमिआइं.

२७५ सवतींचें ओझें : 275. Load.

उज्झसि पिआइ समअं तह वि हु रे भणसि कीस किसिअं ? त्ति ।
उवरिभरेण अ अण्णुअ ! मुअइ वइल्लो वि अङ्गाइं ॥७५॥

[ उह्यसे प्रियया समं तथापि खलु रे भणसि किमिति कृशेति ।
उपरि भरेण च हे अज्ञ मुञ्चति बलीवर्दोऽप्यङ्गानि ॥ ]

कां ग, तूं एवढी कशानें वाळलीस, असें तुम्ही मला विचारतां; माझ्या हृदयांत तुम्ही आलांत आणि तुमच्याबरोबर तुमच्या प्रिया व माझ्या सवती. हे अज्ञ, एवढें ओझें लादलें तर बैल सुद्धां कृश होईल.

● आणि मी तर बोलून चालून अबला. बैल वाळला ओझ्यानें, बायको सुकली मत्सरानें ! तुम्ही एकटे असे मला कधीं दिसतच नाहीं; एकान्तातही त्या तुमच्याभोंवतीं दिसतात, त्या साऱ्या जणी माझा उपहास करीत आहेत असा भास होतो. सरस्वतीकण्ठाभरणात सहोक्तीचें उदाहरणः ' कर्त्रादीनां समावेशः सहान्यैर्यः क्रियादिषु । विविक्तश्चाविविक्तश्च सहोक्तिः सा निगद्यते ॥ वैसादृश्यवती चेयमुच्यमाना मनीषिभिः । सहैवादिप्रयोगेषु ससादृश्याच दृश्यते ॥ ' ( ४:५७-५८ )

२७६ गांठभेट : 276. Knot.

दिढमूलबन्धगण्ठि व्व मोइआ कहँ वि तेण मे बाहू ।
अम्हेहिँ वि तस्स उरे खुत्त व्व समुक्खआ थणआ ॥७६॥

[ दृढमूलबन्धग्रन्थी इव मोचितौ कथमपि तेन मे बाहू ।
अस्माभिरपि तस्योरसि निखाताविव समुत्खातौ स्तनौ ॥ ]

१. गूढ.

त्यांची जणूं घट्ट गांठ बांधलेली आहे असे माझे बाहु त्यांनीं कसे तरी सोडविले आणि माझे स्तन जणूं त्यांच्या छातींत रुतले होते ते मी उपसून काढले.

● जें मौल्यवान तें अवगुंठित करताना गाठ जरा घट्टच मारावी लागते; जें मौल्यवान तेंच पुरून ठेवण्यात व उकरून काढण्यात येतें.

२७७ अगणित : 277. Innumerable.

अणुणअपसाइआए तुज्झ वराहे चिरं गणन्तीए ।
अपहुत्तोहअहत्थङ्गुलीअ तीए चिर रुण्णम् ॥७७॥
[ अनुनयप्रसादितया तवापराधांश्चिरं गणयन्त्या ।
अप्रभूतोभयहस्ताङ्गुल्या तया चिरं रुदितम् ॥ ]

अनुनयामुळें प्रसन्न झाल्यानंतर ती तुझ्या अपराधांची गणना करूं लागली; मोजतांना दोन्ही हातांचीं बोटें संपलीं; तेव्हां ती रडूं लागली.

२७८ घाम : 278. Sweat.

सेअच्छलेण पेच्छइ ! तणुए अङ्गम्मि से अमाअन्तम् ।
लावण्णं ओसरइ व्व तिवलिसोवाणवत्तीए ॥७८॥
[ स्वेदच्छलेन पश्यत तनुकेऽङ्गे तस्या अमात् ।
लावण्यमपसरतीव त्रिवलीसोपानपङ्क्तिभिः ॥ ]

नाजूक शरीरात लावण्य मावत नाहीं, म्हणूनच जणूं घामाच्या रूपानें व त्रिवलीच्या मार्गानें तें ओसंडत आहे.

---

१. रुण्णं वराईए २. रुदितं वराक्या.

● नर्तनाच्या परिश्रमामुळें स्वेदयुक्त झालेल्या दुहितेच्या सौंदर्याची वेश्यामातेनें प्रलोभनार्थ केलेली प्रशंसा; किंवा, चौर्यरतगोपनार्थ सखीची उक्ति. या गाथेंतील त्रिवलीची योजना यथार्थ वाटत नाहीं.

## २७९ समाधान : 279. Fate.

देव्वाअत्तम्मि फले किं कीरइ, एत्तिअं पुणो भणिमो ।
कङ्केल्लिपल्लवाणं ण पल्लवा होन्ति सारिच्छा ॥७९॥

[ दैवायत्ते फले किं क्रियतामियत्पुनर्भणामः ।
कंङ्केल्लिपल्लवानां न पल्लवा भवन्ति सदृशाः ॥ ]

पुन्हां सांगतें, आपण फक्त कर्म करावयाचें, फळ मिळणें न मिळणें दैवाचे हातीं असतें. अशोकासारखीं सुंदर पानें दुसऱ्या कोणत्याही झाडाला येत नाहींत.

● अशोकाला सुंदर पानें फुलें असतात, पण आंब्यासारखीं मधुर फळें नसतात, म्हणून काय त्याचें सौंदर्य हिणकस ठरतें ? गुणी नायकापासून द्रव्यलाभ झाला नाहीं तरी हरकत नाहीं, मिळेल त्यात समाधान मानलें पाहिजे, कारण त्याच्या सहवासात सुखसर्वस्वाची प्राप्ति होणार. अलंकारकौस्तुभात संकराचें उदाहरण : 'साधकबाधकमानाभावाच्चैकस्य निर्णयाभावे ।' श्रीविश्वेश्वर पण्डित टीकेंत सांगतात : 'अत्र प्रकृष्टगुणनायकप्रतीतिः प्रकृताशोकवृत्तान्तेनेति समासोक्तिः । किं वा अप्रस्तुताशोकवृत्तान्तेन प्रस्तुतपुरुषप्रतीत्या अप्रस्तुतप्रशंसेत्युभयसंभावात्संदेहः । प्रकरणादेर्निर्वाहकस्याभावात् ।'

## २८० कलङ्क : 280. Spot.

धुअइ व्व मअकलङ्कं कवोलपडिअस्स माणिणी, उअह ! ।[1]
अणवरअवाहजलभरिअणअणकलसेहिँ चन्दस्स ॥८०॥

१. रक्ताशोकपल्लवा, पल्लवानामन्येषां.

[ धावतीव मृगकलङ्कं कपोलपतितस्य मानिनी पश्यत ।
अनवरतबाष्पजलभृतनयनकलशाभ्यां चन्द्रस्य ॥ ]

पहा, तिच्या गालावर प्रतिबिंबित झालेला चंद्र हा जणूं चंद्रावरील मृगकलङ्कासारखा दिसत आहे; जणूं नेत्रांच्या कलशातून सारख्या वाहणाऱ्या अश्रूंच्या धारांनी मानिनी हा कलङ्क धुवून काढीत आहे.

● कलहान्तरिता नायिका: वस्तुतः अश्रूबरोबर ओघळणाऱ्या काजळामुळें तिच्या आरसपाणी गालावर चंद्रावरील मृगाङ्कासारखा कलङ्क निर्माण झाला होता. ' चंद्र तुझा पहा मुखचंद्रावर येउनिया बैसला कसा । प्रत्यक्ष भासलो फणीवर त्या नागाच्या मणी जसा ॥ ' [अनतफंदी : लावण्या पृ. ८०.]

## २८१ अङ्ग सुगन्ध : 281. Aroma.

**गन्धेण अप्पणो मालिआणँ णोमालिआ ण फुट्टिहइ ।**
**अण्णो को वि हआसइ मंसलो परिमलुग्गारो ॥८१॥**

[ गन्धेनात्मनो मालिकानां नवमालिका न च्युता भविष्यति ।
अन्याः कोऽपि हताशाया मांसलः परिमलोद्गारः ॥ ]

नवमालिकेचें फूल इतर फुलांबरोबर माळेंत गुंफलें तरी तें आपल्या सुगंधापासून च्युत होत नाहीं. हा गर्द सुगंध इतराहून वेगळाच असतो व तो इतरांना हताश करतो.

● तिचा पति बहुवल्लभ असला तरी हिचे गुण अद्वितीय आहेत, म्हणून तो तिच्यावर अत्यंत अनुरक्त आहे, म्हणून ती अप्राप्य आहे अशी सूचना; किंवा, निराश होऊं नको, तिला अनेक सवती असल्यामुळें ती आज नाहीं उद्या अनुकूल होईल, असें आश्वासन. देहाचा विशिष्ट सुगंध मांसल या शब्दानें व्यक्त केलेला आहे, कीं केवळ गर्द गंध अभिप्रेत आहे !

१ नवमल्लिका

## २८२ संपत्ति–विपत्ति : 282. Prosperity & Adversity.

फलसंपत्तीअ समोणआइँ तुङ्गाइँ फलविपत्तीए।
हिअआइ सुपुरिसाणं महातरूणं व सिहराइं ॥८२॥

[ फलसंपत्त्या समवनतानि तुङ्गानि फलविपत्त्या ।
हृदयानि सुपुरुषाणां महातरूणामिव शिखराणि ॥ ]

· मोठ्या झाडांच्या फांद्यांप्रमाणें मोठीं माणसें संपन्न झालीं कीं नम्र होतात आणि विपत्काळीं उन्नत होतात.

● फलभारानें फांद्या लवतात. वैभवप्राप्तीमुळें सुजन विनीत होतात आणि समृद्धीचा बहर संपला कीं उन्नत होतात. तुलनेसाठीं (नीतिशतकम् : ६१ ) ' भवन्ति नम्रास्तरवः फलोद्गमैर्नवाम्बुभिर्दूरविलंबिनो घनाः। अनुद्धताः सत्पुरुषा समृद्धिभिः स्वभाव एवैष परोपकारिणाम् ॥ त्याचप्रमाणें ' विपदिधैर्यमथाभ्युदये क्षमा ' हें महात्मनाचें लक्षण होय असें भर्तृहरीनें (नीति : ५२ ) सांगितलेलें आहे. गंगाधर सांगतो, या गाथेतील उद्गार कुट्टिनीचे आहेत व ते नष्टधन भुजंगाला उत्साहित करण्यासाठीं काढलेले आहेत ! ' दीपकअलंकार.'

## २८३ धुगधुगी : 283. Pulsation.

आसासेइ परिअणं परिवत्तन्तीअ पहिअजाआए ।
णित्थाणुवत्तणे वालिअहत्थम्गुहलो वलअसद्दो ॥८३॥

[ आश्वासयति परिजनं परिवर्तमानायाः पथिकजायायाः ।
निःस्थामवर्तने वलितहस्तमुखरो वलयशब्दः ॥ ]

१ सुउरिसाणं. २. .णि स्थृवर्तनवलित.

प्रवासाला गेलेल्या पतीची जाया विरहाच्या दु खामुळें दुबळी झाली आहे कुशीवरून वळताना तिच्या बागड्याचा आवाज होतो व तेवढ्यानें नोकर माणसाच्या जीवात जीव येतो

## २८४ सूर्यास्त : 284 Setting Sun

तुङ्गो चिअ होइ मणो मणंसिणो अन्तिमासु वि दसासु ।
अत्थमणम्मि वि रइणो किरणा उद्ध चिअ फुरन्ति ॥८४॥

[ तुङ्गमेव भवति मनो मनस्विनोऽन्तिमास्वपि दशासु ।
अस्तमनेऽपि रवे किरणा ऊर्ध्वमेव स्फुरन्ति ॥ ]

मोठ्या मनाचे लोक निकृष्टावस्थेस पोंचले तरी त्याचा स्वाभाविक मोठेपणा कायम असतो सूर्य अस्तमानाला जात असताही त्याचे किरण उर्ध्व दिशेलाच स्फुरण पावतात

## २८५ उद्धार : 285 Natural Inclination

पोट्ट भरन्ति सउणा वि माउआ ! अप्पणो अणुव्विग्गा ।
विहलुद्धरणसहावा हुवन्ति जइ के वि सप्पुरिसा ॥८५॥

[ उदरं बिभ्रति शकुना अपि हे मातर आत्मनोऽनुद्विग्ना ।
विह्वलोद्धरणस्वभावा भवन्ति यदि केऽपि सत्पुरुषा ॥ ]

आई, पाखरें सुद्धा पोट भरतात, त्याना कशाचीही काळजी नसत पण जे सत्पुरुष असतात त्याचा स्वाभाविक प्रवृत्ति दीनाचा उद्धार करण्याकडे असते

१ विअलुद्धरणसमत्था २ विक्लोद्धरण

● पक्षी मांसभक्षक असतात, आपल्या उदरंभरणासाठीं इतराची हिंसा होते याची त्याना जाणीव नसते, दुसरा तृप्त झाला आहे किंवा कसें याची पर्वा नसते. दूती सांगते, नायकाची विपन्नावस्था असली तरी ती त्याला विह्वलोद्धारामुळें प्राप्त झालेली आहे; त्याला विन्मुख पाठवूं नको, तो गुणी आहे, त्याचा उद्धार कर.

## २८६ कांजी : 286. Old-Fox.

ण विणा सब्भावेण ग्घेप्पइ परमत्थजाणुओ लोओ ।
को जुण्णमज्जरं कञ्जिएण वेआरिउं तरइ ? ॥८६॥ D

[ न विना सद्भावेन गृह्यते परमार्थज्ञो लोकः ।
को जीर्णमार्जारं काञ्जिकया प्रतारयितुं शक्नोति ॥ ]

ज्ञानी मनुष्य सद्भावाशिवाय आपलासा होत नाहीं. कांजी दाखवून म्हाताऱ्या मांजराला कसें फसवितां येईल ?

● कृत्रिम हावभावानीं हुरळण्याइतका तो प्रेमव्यवहारात नवखा नाहीं, अशी विदग्ध सखीची सूचना.

## २८७ प्रेम : 287. Love.

रण्णाउ तणं रण्णाउ पाणिअं सव्वअं सअंगाहम् ।
तह वि मआणॅ मईणँ अ आमरणन्ताइँ पेम्माइं ॥८७॥

[ अरण्यात्तृणमरण्यात्पानीयं सर्वतः स्वयंग्राहम् ।
तथापि मृगाणां मृगीणां चामरणान्तानि प्रेमाणि ॥ ]

१. घेप्पइ २. अरण्णादु. ३ सव्वदो

अरण्यांत पाणी व तृण आपोआप व हवें तेवढें मिळतें. मृग व मृगी एकमेकाना काहीं देत घेत नाहींत, तरी त्याचें प्रेम आमरण कायम असतें. प्रेम देवघेवीवर अवलंबून नसतें.

● कबूल केल्याप्रमाणें त्यानें अलंकार आणले नाहींत म्हणून असंतुष्ट होऊ नको, त्याचा अव्हेर करू नको अगर त्याचें प्रेम शिथिल झालें आहे असें मानू नकोस. कुशल दूतीचें आश्वासन व प्रोत्साहन. अलंकार-कौस्तुभात अप्रस्तुतप्रशंसेचें उदाहरण. 'अप्रस्तुतप्रशंसा प्रकृतप्रतिपत्तिरेया यत्र। कार्ये हेतौ व्याप्यव्यापकयोरन्यगीः समेतस्य ॥'

## २८८ चन्दन : 288. Sandal Paste.

तावमवणेइ ण तहा चन्दणपङ्को वि कामिमिहुणाणम्।
जह दूसहे वि गिम्हे अण्णोण्णालिङ्गणसुहेल्ली ॥८८॥

[ तापमपनयाति न तथा चन्दनपङ्कोऽपि कामिमिथुनानाम्।
यथा दुःसहेऽपि ग्रीष्मे अन्योन्यालिङ्गनसुखकेलिः ॥ ]

असह्य अशा ग्रीष्मातही प्रेमी जोडप्याचा ताप चन्दनाच्या लेपानें नष्ट होत नाहीं, आलिंगनाच्या विलासामुळें प्राप्त होणाऱ्या सुखानेंच तो शात होतो.

● उन्हाळ्यात कोणी जवळपास फिरकलें तरी काहिली होते, स्वत:च्या अवयवानाही परस्पराचा स्पर्श असह्य होतो. पण प्रेमाचें तंत्रच वेगळें. प्रेमाचा उद्भव मनस्तापजनक व आलिंगन ऊष्मोत्पादक. तरीही आणि उन्हाळ्यातही प्रेमामुळें तें सुखकारक व शीतल वाटतें. चंदनाची मध्यस्थीही असह्य होते. विरहिणी म्हणते, सख्यानों, माझ्या अंगाला चंदन कशाला

[1] महती [2] सुखार्द्र

लावता ? या तापाचे नीट निदान करून योग्य तो उपाय अनुपानासह योजा. अलंकाररत्नाकरात संकराचें उदाहरण : 'अङ्गत्वे तु संकरः ।' 'अत्र चन्दनपङ्करूपादुपमानादन्योन्यालिङ्गनस्याधिक्येन तापापनयाद् व्यतिरेकस्य तापजनकाद् गाढालिङ्गनात् तापस्योपशम इति व्याघातसंकरः ।'

## २८९ न्हाणुली : 289. Face Cream.

तुप्पाणणा किणो चिट्ठसि त्ति पडिपुच्छिआएँ वहुआए ।
विउणावेट्ठिअजहणत्थलाइ लज्जोणअं हसिअम् ॥८९॥

[ घृतलिप्तानना किमिति तिष्ठसीति परिपृष्टया वध्वा ।
द्विगुणावेष्टितजघनस्थलया लज्जावनतं हसितम् ॥ ]

तूं तोंडाला तूप लावून कां उभी आहेस, असें वधूला विचारलें, तेव्हां तिनें लाजून, जरासें हंसून, मान खालीं घातली आणि नेसतें वस्त्र जघनाभोंवतीं दुहेरी गुंडाळून घेतलें.

● ती कांहीं बोलली नाहीं, कारण रजस्वलेला पतीशीं बोलणेंही निषिद्ध आहे. आरंभीं तरी असे आचार पाळीत असत असें दिसतें.

## २९० विलीन : 290. Merger.

हिअअ च्चेअ विलीणो ण साहिओ जाणिऊण घरसारम् ।
बान्धवदुव्वअणं विअ दोहलओ दुग्गअवहूए ॥९०॥

[ हृदय एव विलीनो न कथितो ज्ञात्वा गृहसारम् ।
बान्धवदुर्वचनमिव दोहदो दुर्गतवध्वा ॥ ]

१. घृतलिप्तालका.

दरिद्री कुटुंबांतच्या वधूनें घरची परिस्थिति जाणून डोहाळे कोणाला सांगितले नाहींत. कानीं आलेल्या बान्धवांच्या दुर्वचनांप्रमाणें तेही हृदयांत जिरवून टाकले.

● दरिद्री कुलंवधूला परिस्थित्यनुरूप संयमाचा व मौनधारणाचा उपदेश.

## २९१ अंबाडा : 291. Barber.

धावइ विअलिअधम्मिल्लसिचअसंजमणवावडकरग्गा ।
चन्दिलभअविचलाअन्तडिम्भपग्गिम्गिणी घरिणी ॥९१॥

[ धावति विगलितधम्मिल्लसिचयसंयमनव्यापृतकराग्रा ।
चन्दिलभयविपलायमानाडिम्भपरिमार्गिणी गृहिणी ॥

न्हाव्याच्या धास्तीनें धांवणाऱ्या मुलग्याला धरण्यासाठीं पळणारी गृहिणी आपला सैल झालेला अंबाडा बोटांनीं सावरीत आहे.

● धावपळीमुळें सैल झालेला अंबाडा ती बोटांनीं सावरीत आहे, हातानीं नव्हे; एवढ्या गडबडींत केवढा नखरा! आणखी हें पाहिलेंत का? तिचा पदरही जाग्यावर नाहीं. यामुळें प्रकट झालेली शोभा कवि दाखवीत आहे. गगाधराच्या मतें हे उद्गार तिच्या सवतींचे आहेत. मुलगा एवढा मोठा झाला आणखी ही निलाजरी भरररत्यांतून उंडारल्यासारखी, बगला दाखवीत, धावपळ करीत आहे; कुलस्त्रियांना हें शोभत नाहीं, असे सपत्नीचे निषेधोद्गार. अलंकाररत्नाकारात स्वभावोक्तीचें उदाहरण : 'सम्यक् स्वभाववर्णनं स्वभावोक्तिः ।'

## २९२ भरती–ओहोटी : 292. Ebb & Tide.

जह जह उव्वहइ वहू णवजोव्वणमणहराइँ अङ्गाइं ।
तह तह से तणुआअइ मज्झो, दइओ अ पडिवक्खो ॥९२॥

१. मग्गेसिणि, मग्गोसिणी

[ यथा यथोद्वहते वधूर्नवयौवनमनोहराण्यङ्गानि ।
तथा तथा तस्यास्तनूयते मध्यो दयितश्च प्रतिपक्षः ॥ ]

वधूच्या अंगप्रत्यंगावर नवयौवनाचें सौंदर्य बहरूं लागलें; तसतशी तिची कंबर, तिचा पति व तिच्या सवती कृश होऊं लागल्या.

● तुल्ययोगिता अलंकार

## २९३ पक्व प्रेम : 293. Ripe Love.

जह जह जरापरिणओ होइ पई दुग्गओ विरूओ वि ।
कुलवालिआणं तह तह अहिअअरं वल्लहो होइ ॥९३॥

[ यथा यथा जरापरिणतो भवति पतिर्दुर्गतो विरूपोऽपि ।
कुलपालिकानां तथा तथाधिकतरं वल्लभो भवति ॥ ]

पति दरिद्री व कुरूप असला तरी तो जसजसा म्हातारा होत जातो तसतसा कुलीन पत्नीला तो अधिकच प्रिय होतो.

● बिजवराबद्दल किंवा वयस्क पतीबद्दल उदासीन असणाऱ्या तरुण वधूप्रत पतिव्रता सखीचे उपदेशोद्गार. समसुखदुःखामुळें व माद्दवर्यामुळें पतिपत्नीचें प्रेम अकृत्रिम व निरुपाधिक असतें; तें रूप, वय, गुण यांवर अवलंबून नसतें. एक टीकाकार सांगतो, दारिद्र्यामुळें व वृद्धावस्थेमुळें तो यापुढें इतरत्र प्रेमप्रसंग करू शकणार नाही म्हणून तो पत्नीला अधिकाधिक प्रिय होतो.

## २९४ पाळी : 294. Queue.

एसो मामि ! जुवाणो वारंवारेण जं अडअणाओ । (1)
गिम्हे गामेक्कवडोअअं व किच्छेण पावन्ति ॥९४॥

[ एष मातुलानि युवा वारंवारेण यमसत्यः ।
ग्रीष्मे ग्रामैकवटोदकमिव कृच्छ्रेण प्राप्नुवन्ति ॥ ]

मामी, गांवांतल्या वडाखालच्या एकाच एका विहिरीचें पाणी उन्हाळ्यांत मोठ्या कष्टानें, पाळीपाळीनें मिळतें; त्याचप्रमाणें या एकाच एका तरुणाचा लाभ येथील स्वैरिणींना फार आयासानें होतो.

● आणि तो मला अनायासें प्राप्त झाला असे असतीचे अभिमानोद्गार.

## २९५ हर्षखेद : 295. Falling Leaves.

गामवडस्स, पिउच्छा ! आवण्डुमुहीणँ पण्डुरच्छाअम् ।
हिअएण समं असईणँ पडइ वाआहअं पत्तम् ॥९५॥

[ ग्रामवटस्य पितृष्वस आपाण्डुमुखीनां पाण्डुरच्छायम् ।
हृदयेन सममसतीनां पतति वाताहतं पत्रम् ॥ ]

आत्याबाई, गांवाजवळच्या वडाचीं पानें वाऱ्याच्या सोंसाट्यानें गळून पडत आहेत आणि एकेका पानाबरोबर एकेका असतीची मुद्रा पांढरी फटफटीत होत आहे; जणूं एकेकीचें हृदयच गळून पडत आहे.

● संकेतस्थान नष्ट झाल्यामुळें आपला परसुरतलम्पट पति याउपर तिकडे जाणार नाहीं म्हणून कुलवधूला संतोष वाटला आणि असतीला खेद.

## २९६ प्रथमानुराग : 296. Inaudible.

पेच्छइ अलद्धलक्खं, दीहं णीससइ, सुण्णअं हसइ ।
जह जम्पइ अफुडत्थं तह से हिअअट्ठिअं किं पि ॥९६॥

[ पश्यत्यलब्धलक्ष्यं दीर्घं निःश्वसिति शून्यं हसति ।
यथा जल्पत्यस्फुटार्थं तथा तस्या हृदयास्थितं किमपि ॥ ]

ती विमनस्क दृष्टीनें पाहत आहे, दीर्घ नि:श्वास टाकीत आहे, शून्य मुद्रेनें हंसत आहे, अस्फुट व असंबद्ध बोलत आहे; तिच्या मनांत कांहीं तरी घोटाळत आहे.

● प्रथमानुरागातील विप्रलंभ.

## २९७ सारवासारव : 297. Bold.

गहवइ ! गओम्ह सरणं रक्खसु एअं त्ति अडअणा भणिरी ।[1]
सहसागअस्स तुरिअं पइणो व्विअ जारमप्पेइ ॥९७॥

[ गृहपते गतोऽस्माकं शरणं रक्षैनमित्यसती भणित्वा ।
सहसागतस्य त्वरितं पत्युरेव जारमर्पयति ॥ ]

पति अकल्पितपणें घरीं आलेला पाहताच पुढें होऊन व्यभिचारिणी म्हणाली, कारभारी, हा आपल्याला शरण आलेला आहे, आतां तुम्हींच याचें रक्षण करा. एवढें बोलून तिनें आपला जार पतीच्या हवालीं केला.

● प्रत्युत्पन्नमती असती. ती पतीला गृहपति, घरधनी म्हणते; बिचारा फक्त घराचा धनी होता. स्त्रीचरित्रात अशा आशयाच्या अनेक गोष्टी आहेत. सावकार व त्याचा पुत्र, किंवा प्रधान व त्याचा पुत्र, दोघेही एकमेकाना न कळत अगर चुकवून व्यभिचारिणीकडे येत असत. एके दिवशीं संकेताच्या गफलतीमुळें पुत्र आंत असताना पिताजी दाखल झाले. तिनें त्याला काहीं तरी सबब सांगून बाहेरच्या बाहेर वाटेला लावलें. तोंच नवराही हजर झाला ! परक्या पुरुषाला घरातून बाहेर पडताना

१. जार समप्पइ, कण्ठम्मि लाएइ. २. रक्षस्वैनमित्यतिनिपुणं भणित्वा.

पाहून नवऱ्याला संशय आला. हें ओळखून तिनें आत लपलेल्या व या घटनामुळें थरथर कापत असलेल्या पुत्राला बाहेर बोलावलें. बापलेकाच्या भांडणामुळें बापाला चुकविण्यासाठीं हा आत लपला होता, एवढा वेळपर्यंत मी याचें रक्षण केलें आणि मुलगा येथें आहे कीं काय याची चौकशी करावयास आलेल्या त्याच्या पित्यालाहि मी वाटेला लावलें, आता याचें रक्षण तुम्ही करा, असें सांगून तिनें त्याचा परिचय करून दिला. संशयास्पद परिस्थितीचा हा उलगडा त्याला पटलाही. नशीब, कीं हा ढवा बापलेकाचा समेट करण्यासाठीं पुन्हा बाहेर गेला नाहीं. अलंकाररत्नाकरात व्याजोक्तीचें उदाहरणः ' उद्भेदप्रच्छादनं व्याजोक्तिः । '

## २९८ मूर्च्छा : 298 Swoon.

हिअअट्ठिअरस दिज्जउ तणुआअन्तिं ण पेच्छह पिउच्छा[1]।
हिअअट्ठिओम्ह कंतो भणिउं मोहं गआ कुमरी[2] ॥९८॥

[ हृदयेप्सितस्य दीयतां तनूभवन्तीं न पश्यथ पितृष्वसः ।
हृदयेप्सितोऽस्माकं कुतो भणित्वा मोहं गता कुमारी ॥ ]

आत्याबाई, ही दिवसानुदिवस कृश होत आहे हें तुम्हाला दिसत नाहीं का ? तिच्या मनात जो कोणी असेल त्याला ती देऊन टाका. सखीचें हें बोलणें ऐकताच ती म्हणाली, माझ्या हृदयात कोण असणार ? एवढें बोलून ती बेशुद्ध झाली.

● कुमारीला हृदयेप्सित कोठलें ? अशा मनोवृत्तीच्या आत्याबाई व प्रियकराचें चिंतन करणाऱ्या कुमारिका, सकृद्दर्शनीं वाटतात तितक्या अर्वाचीन नाहींत.

---

१ हियइच्छइअस्स, हिअअेछिअस्स २ कुमरी.

## २९९ ओला केशभार : 299. Wet Locks.

खिण्णस्स उरे पइणो ठवेइ गिम्हावरण्हरमिअस्स ।
ओलं गलन्तकुसुमं ण्हाणसुअन्धं चिउरभारम् ॥९९॥
[ खिन्नस्योरसि पत्युः स्थापयति ग्रीष्मापराह्णरमितस्य ।
आर्द्रं गलत्कुसुमं स्नानसुगन्धं चिकुरभारम् ॥ ]

भर उन्हाळ्यात ऐन दुपारीं तिनें पतीला रमविलें. तो दमला तेव्हा त्याचा श्रमपरिहार करण्यासाठीं न्हाल्यामुळें ओलसर, सुगंधित व मऊ झालेला व ज्यातून फुलें गळत आहेत असा आपला केशभार तिनें त्याच्या हृदयावर टाकला.

● गगाधर सागतो, सुरतावसानोपचारचातुर्याचें हें वर्णन दूतीनें भुजग-प्रलोभनार्थ केलेलें आहे. वर्णनाचे निमित्तान देण्यात यणाऱ्या शृंगार-शिक्षणातील हा एक पाठ असण्याचा सभव आहे. उन्हाळ्यातल्या दुपारीं ओल्या अबाध्याचें आकर्षण उत्तेजक असतें. रवींद्रनाथाच्या ' नौकाडुबी 'त असाच प्रसंग वर्णिलेला आहे. सरस्वतीकण्ठाभरणात या गाथेची नायिका ' वयःकौशलाभ्या सपूर्णा प्रगल्भा ' असल्याचें मागितलें आहे.

## ३०० मध्यरात्रीं चांदण्यांत : 300. Moonlight.

अह सरसदन्तमण्डलकवोलपडिमागओ मअच्छीए ।
अन्तो सिन्दूरिअसङ्खवत्तकरणिं वहइ चन्दो ॥१००॥
[ असौ सरसदन्तमण्डलकपोलप्रतिमागतो मृगाक्ष्याः ।
अन्तः सिन्दूरितशङ्खपात्रसादृश्य वहति चन्द्र. ॥ ]

१ क्षिणस्स २ ठवेइउ ३ गिम्हावरणहरणमिअस्स ४ उप्फ, फुल्ल.
५ मकरान्तप्रतिबिंब

दंतव्रणाच्या मण्डलानें युक्त अशा ह्या मृगाक्षीच्या गोऱ्या गालावर प्रतिबिंबित झालेला चंद्र जणूं आत शेंदूर ठेवलेल्या शंखपात्रासारखा दिसतो.

● चांदण्यात क्रीडा करण्याची हौस असलेल्या रसिक तरुणाचे उद्गार. तिच्या सौंदर्याची प्रशंसा व स्वतःच्या कौशल्याची प्रस्तावना. अशा गालावर चंद्राचें प्रतिबिंब उमटलेलें पाहून रसिकाला केवळ उपमासाफल्या-साठीं किंवा प्रतिबिंब स्थिर करण्यासाठीं दंतव्रण करण्याची स्फूर्ति व्हावयाची!



रसिअजणहिअअदइए कइवच्छलपमुहसुकइणिम्मइए।
सत्तसअम्मि समत्तं तीअं गाहासअं एअम् ॥



# चतुर्थं शतकम्

## ३०१ माहेरचा मित्र : 301. Family Friend.

अह अम्ह आअदो अज्ज कुलहराओ त्ति छेम्छंई[1] जारम् ।
सहसागअस्स तुरिअं पइणो कण्ठं मिलोवेइ[2] ॥१॥

[ असावस्माकमागतोऽद्य कुलगृहादित्यसती जारम् ।
सहसागतस्य त्वरितं पत्युः कण्ठे लगयति ॥ ]

अकस्मात नवरा घरीं आला तेव्हां हा आमचा, माझ्या माहेरचा, आजच आला, असें सांगून व्यभिचारिणीनें त्या उभयतांची गळाभेट करविली.

● माझ्या एकटीच्या ओळखीचा नव्हे, आम्हा सर्वांच्या परिचयाचा, आतांच माझ्या माहेराहून आला. कथावस्तु असलेली गाथा. शुकबहात्तरींत जवळ जवळ अशीच गोष्ट आहे. दाभोळचा ग्रामाधिकारी विलोचन याची पत्नी रंभिका, जलाशयावर गेली असता एका तरुणाशीं संकेत करती झाली. तिनें सांगितलें, आपण पाठोपाठ घरीं यावें व भ्रताराला नमस्कार करून बसावें, पुढचें साधन मी करीन. त्याप्रमाणें तो येऊन ओसरीवर बसला. त्याला पाहताच रंभिका घरांतून बाहेर आली व भ्रताराप्रत बोलली, याला ओळखलें नाहीं काय? हा माझे मावशीचा मुलगा. हें ऐकून विलोचन त्यास गळा भेटता झाला व स्त्रीला म्हणाला, आपले बंधूस वर नेऊन भोजनादिक सत्कार करावा. भोजनानंतर तिनें विषय काढला, तेव्हा तिचा निषेध करून तो म्हणाला, आता तूं माझी बहीण झालीस. ती म्हणाली ही नुसती सबब—हल्लीं सगळेच प्रथम एकमेकाना भाऊ-बहीण म्हणवितात! तिनें अनेक प्रकारें विनविलें, पण तो ऐकेना. तेव्हा तिनें मोठ्यानें पुकार

१. अडअणा, चिछइ, छिम्छई. २. कण्ठम्मि लाएइ, लावेइ.

केला–धावारे धावा! भयभीत होऊन तो म्हणाला, मी तुझें वचन मान्य करतों–पण आता माझें रक्षण कर. लगेच त्याला जमिनीवर लोळावयास सांगून तिनें भात चहूंकडे उडविला आणि शेगडींतला अंगार ती फुलवूं लागली. पुकार ऐकून विलोचन माडीवर आला; त्याला तिनें सांगितलें, याला अकस्मात् मोडशी झाली, सबब पुकार केला, आतांच सावध झाला. एवढें बोलून ती त्याचें पोट शेकूं लागली. हें सत्य मानून विलोचन खालीं गेला. पुढें मोडशीच्या निमित्तानें हा महिनाभर तेथें राहिला!

## ३०२ डूल : 302. Ear Rings.

पुसिआ अण्णाहरणेन्दणीलकिरणाहआ ससिमऊहा।
माणिणिवअणम्मि सकज्जलंसुसङ्काइ दइएण ॥२॥
[ प्रोञ्छिताः कर्णाभरणेन्द्रनीलकिरणाहताः शशिमयूखाः।
मानिनीवदने सकज्जलाश्रुशङ्कया दयितेन ॥ ]

मानिनी चांदण्यांत बसली होती. तिच्या कानात इंद्रनीलांचे डूल होते. नीलावर पडलेल्या चंद्रकिरणांचें परावर्तन झाल्यामुळें तिच्या मुखावर निळसर छाया उमटली. काजळ घातलेल्या डोळ्यांतून अश्रु ओघळले असावेत अशा कल्पनेनें दयितानें तिचे गाल हलक्या हातानें पुसले.

● अलंकारकौस्तुभ व अलंकाररत्नाकर यांत भ्रांतिमान् अलंकाराचें उदाहरण: 'तदभाववती मतिस्तत्प्रकारिका भ्रांतिमान्भवति।'

## ३०३ बिनजोड : 303. Matchless.

एंद्दहमेत्तम्मि जए सुंदरमहिलासहस्सभरिए वि।
अणुहरइ णवर तिस्सा वामद्धं दाहिणद्धस्स ॥३॥

१. पुञ्छिआ. २. कण्णा ३. एद्दहमेत्ते भुवणे सुंदरमहिलासहस्ससंकिण्णे। ४. तिस्सा.

[ एतावन्मात्रे जगति सुंदर महिलासहस्रभृतेऽपि ।
अनुहरति केवल तस्या वामार्धं दक्षिणार्धस्य ॥ ]

जगात हजारों सुंदर स्त्रिया आहेत, पण हिच्यासारखी सुंदरी हीच. हिच्या डाव्या अंगाला तोड हिच्याच उजव्या अंगाची.

३०४ नृत्त : 304. Dance

जह जह वाएइ पिओ तह तह णच्चामि चञ्चले पेम्मे ।
वल्ली वलेइ अङ्गं सहावथद्धे वि रुक्खम्मि ॥४॥

[ यथा यथा वादयति प्रियस्तथा तथा नृत्यामि चञ्चले प्रेम्णि ।
वल्ली वलयत्यङ्गं स्वभावस्तब्धेऽपि वृक्षे ॥ ]

प्रियकर जसें वाद्य वाजवीत आहे तसी मी प्रेमचञ्चल होऊन नाचत आहे. वृक्ष स्वभावत स्तब्ध असतो, तरी वेली आपलें अङ्ग त्याच्याभोंवतीं वळविते.

● ' तुझ्या अंगीं एवढासासुद्धा अभिमान कसा नाहीं ? अन्य महिला तुझ्या पतीला बोटावर नाचवितात आणि हें माहीत असूनही तू त्याच्याभोंवतीं नाचतेस ! हें कसें ? ' ह्या सखींच्या प्रश्नाला नायिकेचें उत्तर. स्त्रिया स्वभावत च पतिछंदानुवर्ती असतात. नाजूक वेली आधाराशिवाय उभी राहू शकत नाहीं, नीरस ओंडक्याला किंवा ओबडधोबड बुंध्याला स्वभावत विळखा घालते, तशीच स्त्रियांची स्थिति असते, आणि येथें तर पति नृत्यसंगीतात रंगला आहे ! मग मी प्रेमाच्या उन्मादानें चचल व्हावें व तालावर नाचावें यात आश्चर्य कसलें ? पति वृत्तीनें अधम व नाटकी असला तरी किती रसिक आहे तें पाहा. त्याच्या आधाराशिवाय मी जगूही शकणार नाहीं वादन व नर्तन याचा टेका जमला म्हणजे कसा

१ उट्ठे ट्ठिए २ रुक्खम्मि ३ वेष्टयति

रंग येतो तें पहा; दंपत्याचा संसारही असाच तालबद्ध असला पाहिजे. या उत्तरामुळें सखीचें उद्दिष्ट साधलें नाहीं. तुझ्या मनासारखा उत्तम नायक मला मिळवून दे अशी नायिकेची दूतीजवळ विनवणी या गाथेंत सूचित आहे असें गंगाधर सांगतो.

## ३०५ यातायात :    305. Effort.

दुक्खेहिँ लब्भइ पिओ लद्धो दुक्खेहिँ होइ साहीणो।
लद्धो वि अलद्धो व्विअ जइ जह हिअअं तह ण होइ॥५॥

[दुःखैर्लभ्यते प्रियो लब्धो दुःखैर्भवति स्वाधीनः।
लब्धोऽप्यलब्ध एव यदि यथा हृदयं तथा न भवति॥]

प्रियकराची प्राप्ति करून घेण्याला आणि नंतर त्याला स्वाधीन ठेवायाला केवढी यातायात करावी लागते! आणि एवढें करूनही त्याचें हृदय अनुकूल झालें नाहीं तर तो मिळाला न मिळाला, सारखाच.

● विशिष्ट गुणसंपन्न असेल अशा समजुतीनें, महत्प्रयासानें नायकाची प्राप्ति करून घेतली; त्याच्या अनभिज्ञतेमुळें निराशा झाली; शिवाय तो आतां हृदयानुवर्तनही करीत नाहीं; यामुळें रुष्ट झालेल्या नायिकेचे उद्गार. अलंकाररत्नाकरात अतिशय अलंकारानें उदाहरणः 'सम्भावनयान्यथा यातिशयोऽतिशयः।'

## ३०६ अनुनय :    306. Courtship.

अव्वो! अणुणअसुहकङ्खिरीअ अकअं कअं कुणन्तीए।
सरलसहावो वि पिओ अविणअमग्गं चलण्णीओ॥६॥

१. लम्भइ. लम्भइ.

[ कष्टमनुनयसुखकाङ्क्षणशीलयाकृतं कृतं कुर्वत्या ।
सरलस्वभावोऽपि प्रियोऽविनयमार्गं बलान्नीतः ॥ ]

अरेरे ! तिला अनुनयाच्या सुखाची अपेक्षा होती. म्हणून, त्यानें पूर्वी कधीं केलें नव्हतें तें तिनें त्याला करावयाला लावलें. तिचा प्रियकर सरळ स्वभावाचा होता; बिचाऱ्याला तिनें जबरीनें अविनयाच्या मार्गाला लावलें.

● सरल व निरपराध नायकाला छळणारी स्वच्छन्दी नायिका.

## ३०७ गणना : 307. Calculus.

हत्थेसु अ पाएसु अ अङ्गुलिगणणाइ अइगआ दिअहा ।
एण्हिं उण केण गणिज्जउ त्ति भणेउं रुअइ मुद्धा ॥७॥

[ हस्तयोश्च पादयोश्चाङ्गुलिगणनयातिगता दिवसाः ।
इदानीं पुनः केन गण्यतामिति भणित्वा रोदिति मुग्धा ॥ ]

पति प्रवासाला गेल्याचे दिवस मोजतांना हातांपायांचीं बोटें संपलीं. आतां गणना कशानें करूं, असें बोलून मुग्धा रडूं लागली.

● वीस हें मूलमान मानून त्याच्या गुणकांत अजूनही खेड्योपाडीं गणना करण्यात येते. या गणनापद्धतीची बैठक बोटांच्या संख्येवर असावी असें यावरून दिसतें.

## ३०८ बुद्धभिक्षुसंघ : 308. Buddhists.

कीरमुहसच्छहेहिं रेहइ वसुहा पलासकुसुमेहिं ।
बुद्धस्स चलणवन्दणपडिएहिं व भिक्खुसंघेहिं ॥८॥

१. गणणाहिं. २. भणऊ.

[ कीरमुखसदृक्षै राजते वसुधा पलाशकुसुमैः ।
बुध्दस्य चरणवन्दनपतितैरिव भिक्षुसंघैः ॥ ]

पोपटाच्या चोंचीप्रमाणें लालभडक अशा पलाशपुष्पांनीं पृथ्वी शोभायमान झालेली आहे. जणूं बुद्धाच्या चरणांशीं वंदन करण्यासाठीं लोटांगण घालणाऱ्या भिक्षुसंघासारखें हें दृश्य दिसत आहे.

● पलाशपुष्पें लालभडक असतात; तीं वसंतांत रानावनांत फुलतात. इतकीं, कीं जणूं जंगलात वणवा पेटल्यासारखें भासतें. ही गाथा लिहिली त्या काळात महाराष्ट्रात पुष्कळच बौद्ध भिक्षू असावेत. त्यांचे कपडे पलाशपुष्पासारखे लालभडक असत. प्रवासाला किंवा यात्रेला निघताना पलाशपुष्पांचें व बौद्धभिक्षूंचें दर्शन अपशकुनी मानण्यांत येत असे. म्हणून या गाथेंत पतीच्या संकल्पित प्रवासाचा निषेध ध्वनित आहे असें गंगाधर सांगतो. तसा अर्थ निघत नाहीं असें वेबर सांगतो. आणखी एक टीकाकार सांगतो कीं हें स्तनपृष्ठावरील दंतव्रणाचें व नखक्षताचें वर्णन असून त्यांच्या दर्शनामुळें व्याकुल झालेल्या नायिकेचे हे उद्गार आहेत !

## ३०९ झुरणी : 309. Pining.

जं जं पिहुलं अङ्गं तं तं जाअं किसोअरि ! किसं ते ।
जं जं तणुअं तं तं पि णिट्ठिअं, किं त्थ माणेण ॥९॥

[ यद्यत्पृथुलमङ्गं तत्तज्जातं कृशोदरि कृशं ते ।
यद्यत्तनुकं तत्तदपि निष्ठितं किमत्र मानेन ॥ ]

तुझा जो जो अवयव भरदार असावयाचा तो तो कृश झाला आहे व जो नाजुक असावयाचा तो शुष्क झाला आहे. कृशोदरि, निष्कारण मानधारणानें दुसरें काय प्राप्त होणार ?

● अनुनयाचा स्वीकार करण्याची मानिनीला सखीची विनंति.

## ३१० भडक : 310 Gaudy

ण गुणेण हीरइ जणो हीरइ जो जेण भाविओ तेण।
मोत्तूण पुलिन्दा मोत्तिआइँ गुञ्जाओ गेह्णन्ति ॥१०॥

[ न गुणेन ह्रियते जनो ह्रियते यो येन भावितस्तेन ।
मुक्त्वा पुलिन्दा मौक्तिकानि गुञ्जा गृह्णन्ति ॥ ]

नुसत्या गुणानींच मनुष्य वश होतो, असें नाहीं ज्याला जें आवडतें तें त्याला मिळालें म्हणजे तो प्रसन्न होतो. जगलातले पुलिंद पहा, मोतीं टाकून देतात व गुंजा वेंचतात.

● दूतीनें केलेली नायकाची निर्भत्सना. तूं माझ्या गुणी सखीचा त्याग केलास आणि तू अलीकडे जिच्यावर आसक्त झाला आहेस तिच्या गुणावगुणावरून वाटतें कीं तू अविदग्ध, जगली आहेस. किंवा नायकाचा दूतीला प्रश्न . ती एवढी गुणी आहे असें तू सागतेस, मग तिला तिच्या नवऱ्यानें का टाकलें? या प्रश्नाचें उत्तर.

## ३११ बहर : 311 Red Blossoms.

लङ्कालआणँ, पुत्तअ ! वसन्तमासेक्कलद्धपसराणम् ।
आपीअलोहिआणं बीहेइ जणो पलासाणम् ॥११॥

[ लङ्कालयानां पुत्रक वसन्तमासैकलब्धप्रसराणाम् ।
आपीतलोहितानां बिभेति जन पलाशानाम् ॥ ]

---

१ श्री मथुरानाथ शास्त्री याचा पाठ वसान्तमार्गैकलब्धविभवानाम ।
२ वज्जालग्गातील छाया लङ्कालयेभ्य ( शाखालयेभ्यो ) पुनक वसन्तमास ( वसान्तमासे ) लब्धप्रसरेभ्य । आपीतलोहितेभ्यो ( रुधिरेभ्यो ) बिभेति जन पलाशेभ्य ( राक्षसेभ्य ) ॥

पळसाच्या फांद्यावर पिंवळसर तांबडीं फुलें डंवरलीं आहेत. मुग्धा, या बहारांत वसंताचें सामर्थ्य दिसत असल्यामुळें लोकांना त्याची भीति वाटते.

● लङ्का म्हणजे वृक्षाची, येथें पळसाची फांदी; पलाशपुष्पें वसतात फुलतात. तीं पाहून विरहिणी व्याकुल होतात. लङ्का म्हणजे राक्षसनगरी. 'पल मांसमदन्ति भक्षयन्तीति पलाशा राक्षसा ' पळसाची फुललेली फांदी पाहून मांसभक्षक राक्षसाची आठवण होऊन लोक व्याकुल, भयभीत होतात. लङ्का म्हणजे कुलटा, वेश्या, पिंवळीं धमक व लालभडक वस्त्रें परिधान केलेली वेश्या वावरताना पाहून लोकांना धास्ती वाटते कीं ही या वसंतात काय अनर्थ करील कोण जाणे! अलङ्काररत्नाकरात श्लेषाचें उदाहरण. " ' विशेषस्यापि साम्ये द्वयोर्वाच्यत्वे श्लेष । '...अत्र तरूणां वाच्यत्वं प्रस्तुताना निशाचराणां व्यङ्ग्यत्वम् । "

## ३१२ गन्धोदक : 312 Powder and Paste

घेत्तूण चुण्णमुट्ठिं हरिसूससिआए वेपमाणाए ।
भिसिणेमित्ति पिअअमं हत्थे गन्धोदअं जाअम् ॥१२॥

[ गृहीत्वा चूर्णमुष्टिं हर्षोत्सुकितया वेपमानाया ।
अवकिरामीति प्रियतम हस्ते गन्धोदकं जातम् ॥ ]

प्रियकराच्या अंगावर उधळण्यासाठीं तिनें सुगंधि चूर्ण हातीं घेतलें होतें. त्याचें दर्शन होताच तिचें हृदय हर्षोत्सुक झालें आणि तिचें शरीर थरारलें तिला घाम आला आणि तिच्या हातातल्या चूर्णाचें गन्धोदक झालें

१ भगणेमि, भसिणेमि २ वर्णमुष्टिं ३ हर्षाच्छ्वसितायाः ४ प्रहरामि, विद्रुरामि

● वाञ्छितप्राप्तीमुळें सात्त्विक स्वेदोद्भव. येथें मेघदूतात ( २-८ ) रत्नदीपावर फेंकलेल्या चूर्णमुष्टीची आठवण होते; 'अर्चिस्तुङ्गानभिमुखमपि प्राप्य रत्नप्रदीपान् । ह्रीमूढाना भवति विफलप्रेरणा चूर्ण मुष्टिः ॥' चूर्ण म्हणजे 'कर्पूरादिसुगंधिद्रव्यधूलिः' याचा वशीकरणासाठींही उपयोग करीत असत.

## ३१३ अंकोट : 313. Tell-Tale.

पुट्ठिं पुससु, किसोअरि ! पडोहरङ्कोल्लपत्तचित्तलिअम् ।
छेआहिँ दिअरजाआहिँ उज्जुए ! मा कलिज्जिहिसि ॥१३॥

[ पृष्ठं प्रोञ्छ कृशोदरि पश्चाद्गृहाङ्कोटपत्रचित्रितम् ।
विदग्धाभिर्देवरजायाभि ऋजुके मा कलिष्यसे ॥ ]

तुमच्या घराच्या परसातल्या अंकोटाचीं पानें तुझ्या पाठीला चिकटलीं आहेत. कृशोदरि, पाठ पुसून टाक. तूं सरळ स्वभावाची आहेस. तुझ्या चतुर जावांना तुझ्या रहस्याचा मागमूसही लागू देऊं नकोस.

● नायिका दीरावर अनुरक्त आहे. सपत्नी म्हणते, मी तर येव्हाच ओळखलें आहे, पण मी बभ्रा करणार नाहीं. जावांना ओळखूं देऊं नकोस, म्हणजे मिळविलें.

## ३१४ कदम्ब : 314. Filaments.

अच्छीइँ ता थइस्सं दोहिँ वि हत्थेहिँ वि तस्सिं दिट्ठे ।
अङ्गं कलम्बकुसुमं व पुलइअं कहँ णु ढक्किस्सम् ॥१४॥

१. छेआभि : २. तम्मिदिट्ठम्मि. ३. मुउलिय.

[अक्षिणी तावत्स्थगयिष्यामि द्वाभ्यामपि हस्ताभ्यां तस्मिन्दृष्टे।
अङ्गं कदम्बकुसुममिव पुलकितं कथं नु च्छादयिष्यामि ॥]

प्रियकर दृष्टीस पडतांच मी दोन्ही हातांनीं डोळे झांकून घेतले; पण कदम्बाच्या अंगप्रत्यंगांवर फुलें डेवरतात, त्याप्रमाणें माझ्या सर्वांगावर रोमाञ्च फुल्ले, ते कसे झांकू ?

● त्याला पाहतांच तिचा रुसवा ओसरला. हें त्याच्या लक्षात येऊं नये व त्यानें अनुनय करावा म्हणून तिनें डोळे झाकून घेतले. कदम्बपुष्पाना केसर असतात, म्हणून त्याचें रोमाञ्चांशीं विशेष साम्य.

## ३१५ विद्युत् : 　　315. Lightning.

झञ्झावाउत्तिणिए घरम्मि रोऊण णीसहणिसण्णम्।
दावेइ व गअवइअं विज्जुज्जोओ जलहराणम् ॥१९॥

[झञ्झावातोत्तृणिते गृहे रुदित्वा निःसहनिषण्णाम्।
दर्शयतीव गतपतिकां विद्युद्द्योतो जलधराणाम् ॥]

तिचा पति प्रवासाला गेला आहे; झंझावातानें घराचें छपर उडून गेलें आहे; असहाय पत्नी घरांत रडत बसली आहे वीज चमकून मेघांना तिचें दर्शन करवीत आहे.

● विद्युत् ही सहृदय प्रमदा आणि मेघ निष्टुर पुरुष. मेघाना तिची दया यावी व त्यानीं वर्षाव स्थगित करावा म्हणून विद्युत् त्याना तिचें दर्शन करवीत आहे. मृच्छकटिकात (५ : ३२) अशीच कल्पना आहे : 'यदि गर्जति वारिधरो गर्जतु तन्नाम निष्ठुराः पुरुषाः। अयि विद्युत्प्रमदाना त्वमपि च दुःखं न जानासि ॥'

१. मुकुलितम् २. पउत्थपइअं.

## ३१६ गांवरान :  316. Village Maiden.

भुञ्जसु जं साहीणं, कुत्तो लोणं कुग्गामरिद्धम्मि[१]।
सुहअ ! सलोणेण वि किं तेण, सिणेहो जहि ण त्थि ॥१६॥

[ भुङ्क्ष्व यत्स्वाधीनं कुतो लवणं कुग्रामरिध्दे[२]।
सुभग सलवणेनापि किं तेन स्नेहो यत्र नास्ति ॥ ]

कुग्रामातल्या स्वयंपाकात मीठ कोठून मिळणार ? आणि मीठ मिळालें व तूप नसलें तर काय उपयोग ? सुभग, जें आहे त्याचें सेवन कर.

● लोण = लवण व लावण्य; सिणेह = स्नेह = घृत व प्रेम; या जोड अर्थांच्या श्लेषावर रचना. खेडेगावात संवर्धित सौंदर्य कोठून मिळणार ! हिची धाटणी गबदळ आहे, वेषभूषा आकर्षक नाहीं व सौंदर्य दिखाऊ नाहीं, म्हणून अव्हेरू नकोस. कलमी आंब्यासारखा गावरान आंबा गोंडस नसला तरी रंगदार व रसपूर्ण असतो; शिवाय प्रत्येक झाडाच्या फळाची चव जवळ जवळ अद्वितीय असते.

## ३१७ समाचार :  317. Scented Breath.

मुहपुच्छिआइ हलिओ मुहपङ्कअसुरहिपवणणिव्वविअम् ।
तह पिअइ पअइकडुअं पि ओसहं जण ण णिट्ठाइ ॥१७॥

[ मुखपृच्छिकाया हलिको मुखपङ्कजसुरभिपवननिर्वापितम् ।
तथा पिबति प्रकृतिकटुकमप्यौषधं यथा न तिष्ठति ॥ ]

---

२. रिद्धम्मि = सिद्धे.

आजारी शेतकऱ्याच्या प्रकृतीची चौकशी करावयास आलेल्या स्त्रीनें त्याच्यासाठीं आणविलेलें काढ्याचें औषध आपल्या मुखाच्या कमलसदृश सुगंधि निःश्वासानीं निववलें. ते कडू होतें, तरी तो तें असें प्याला कीं त्याला थेंबही राहिला नाहीं.

● जें नीरस तेंच अनुरागामुळें सुरस होते. अलंकारकौस्तुभात तद्गुणाचें उदाहरण. ' परकीयगुणतिरोहितगुणस्य भानं तु तद्गुणः प्रोक्तः । '

## ३१८ शोधुं कुठें ?  318. Buried Treasure

अह सा तहिं तहिं व्विअ वाणीरवणम्मि चुक्कसंकेआ । १
तुह दंसणं विमग्गइ पब्भट्ठणिहाणठाणं व ॥१८॥

[ अथ सा तत्र तत्रैव वानीरवने विस्मृतसंकेता ।
तव दर्शनं विमार्गति प्रभ्रष्टनिधानस्थानमिव ॥ ]

संकेताप्रमाणे ती वेळूच्या वनातच गेली आहे. वनातलें ठरलेलें नक्की स्थान तिच्या ध्यानात राहिलें नसेल व ती तुला शोधण्यासाठीं इकडे तिकडे भटकत असेल ठेव पुरून ठेवावी व जागेचें विस्मरण व्हावें, तशी तिची अवस्था झाली असेल

● मी ठरल्याप्रमाणें जागेवर गेलों, पण ती आलीच नाहीं, या नायकाच्या तक्रारीला दूतीचें उत्तर सरस्वतीकण्ठाभरणात विप्रलंभाचें उदाहरण

## ३१९ राहू :  319 Eclipse.

दढरोसकलुसिअस्स वि सुअणस्स मुहाहिं विप्पिअं कत्तो ।
राहुमुहम्मि वि ससिणो किरणा अमअं विअ मुअन्ति ॥१९॥

१. कन्तो

[ दृढरोपकलुषितस्यापि सुजनस्य मुखादप्रियं कुतः ।
राहुमुखेऽपि शशिनः किरणा अमृतमेव मुञ्चन्ति ॥ ]

कितीही राग आला तरी सज्जनांच्या मुखातून अप्रिय वचनें निघत नाहींत. चंद्राला राहूनें ग्रासलें तरी त्याचे किरण अमृतमयच असतात.

● तो रुष्ट असला तरी रहस्यस्फोट किंवा प्रेमभङ्ग करणार नाहीं, अगर मर्मभेदक वचनें बोलणार नाहीं; त्याचा रोष अल्पकालीन आहे, असें सखीचें आश्वासन. अलंकाररत्नाकरात दृष्टान्ताचें उदाहरणः 'प्रतिबिंबेन दृष्टान्तः ।'

## ३२० मानापमान : 320. Reception.

अवमाणिओ वि ण तहा दुम्मिज्जइ सज्जणो विहवहीणो ।
पडिकाउं असमत्थो माणिज्जन्तो जह परेण ॥२०॥

[ अवमानितोऽपि न तथा दूयते सज्जनो विभवहीनः ।
प्रतिकर्तुमसमर्थो मान्यमानो यथा परेण ॥ ]

ज्याचें वैभव नष्ट झालेलें आहे अशा सज्जनाचा कोणी सत्कार केला तर त्याची फेड करतां येत नाहीं याबद्दल त्याला जितकें दुःख होतें तितकें त्याचा कोणी अपमान केला तरी त्याबद्दल त्याला वाटत नाहीं.

● तो तुझ्यावर अनुरक्त नाहीं असें नाहीं; आपण विरक्त आहों असें तो भासवीत आहे; कारण तूं त्याचा स्वीकार करशील किंवा कसें, याबद्दल त्याला संशय वाटत आहे.

## ३२१ रहस्य : 321. Secret.

कुलहन्तरे वि अविणिग्गआइँ हिअअम्मि जरमुवगआइं ।
सुअणकआइ रहस्साइँ डहइ आउक्खए अग्गी ॥२१॥

[ कलहान्तरेऽप्यविनिर्गतानि हृदये जरामुपगतानि ।
सुजनश्रुतानि[1] रहस्यानि दहत्यायुःक्षयेऽग्निः ॥ ]

सज्जनांनीं ऐकलेलीं रहस्यें कलहांतही त्यांचे तोंडून बाहेर पडत नाहींत. तीं त्याच्याबरोबर वृद्ध होतात व अंतीं त्याच्याबरोबर दग्ध होतात.

## ३२२ माधवी : 322. Bower.

लुम्बीओ[2] अङ्गणमाहवीणँ दारग्गलाउ जाआउ ।
आसासो पान्थपलोअणे वि पिट्ठो[3] गअवईणम् ॥२२॥

[ स्तवका अङ्गणमाधवीनां द्वारार्गला जाताः ।
आश्वासः पान्थप्रलोकनेऽपि नष्टो गतपतिकानाम् ॥ ]

पत्नी प्रवासी पतीची मार्गप्रतीक्षा करीत होती. अंगणांतल्या माधवीला गुच्छ आले व त्यांनीं जणूं दाराला अडसरच घातला. ते झुपके पाहून प्रोषितपतिकाचा धीर खचतो

● वसंतागमामुळें उत्कण्ठित झालेली नायिका माधवीच्या कुंजात तुझी वाट पाहत बसली आहे. दाराला अडसर लावलेला आहे व वेलीला फुलाचे घोंस लागले आहेत, म्हणून एकान्ताचा भंग होणार नाहीं, अशी नायकाला दूतीची सूचना. अलङ्काररत्नाकरात अर्थापत्तीचें उदाहरण.

## ३२३ निळे डोळे : 323. Blue Lotus

पिअदंसणसुहरसमउलिआइँ जइ से ण होन्ति णअणाइं ।
ता केण कण्णरइअं[5] लक्खिज्जइ कुवलअं तिस्सा ॥२३॥

१. कृतानि. २. लुम्बो अलाबुलताः ३. अङ्कण. ४. नट्ठो. ५. कण्णलग्ग.

[ प्रियदर्शनसुखरसमुकुलिते यदि तस्या न भवतो नयने।
तदा केन कर्णरचित लक्ष्यते कुवलय तस्या ॥

प्रियकराच्या दर्शनामुळें झाल्या सुखामुळें तिनें डोळे अर्धे मिटले. ती ते न मिटती तर तिच्या कानावरील नील कमलाकडे कोणाचें लक्ष गेलें असतें !

● अलंकाररत्नाकरात विवेकाचें उदाहरणः 'तस्या कुतश्चिद्विवेको विवेकः।'...'गुणसाम्याद्भेदाप्रतीतौ सत्यामपि केनचिन्निमित्तेन वैलक्षण्यागतेर्विवेको विवेकः।' सरस्वतीकण्ठाभरणात मीलिताचें उदाहरणः 'वस्त्वन्तरतिरस्कारो वस्तुना मीलितं स्मृतम्। पिहितापिहिते चैव तद्गुणातद्गुणौ च तत् ॥'

## ३२४ शाप : 324. Ploughman.

चिक्खिल्लखुत्तहलमुहकड्ढणसिढिले पइम्मि पासुत्ते।
अप्पत्तमोहणसुहा घणसमअं पामरी सवइ ॥२४॥

[ कर्दममग्नहलमुखकर्षणशिथिले पत्यौ प्रसुप्ते।
अप्राप्तमोहनसुखा घनसमय पामरी शपति ॥ ]

जमीन नांगरताना चिखलात रुतणारा फाळ वारवार ओढून काढावा लागल्यामुळें शेतकरी दमला व गाढ झोंपला, म्हणून त्याच्या पत्नीला मोहनसुख मिळालें नाहीं, म्हणून तिनें पावसाळा शाप दिला.

● शेतात दिवसभर ऊर फुटेपर्यंत काम करून दमून भागून सन्ध्याकाळी घरीं आलेला शेतकरी आता गाढ झोंपला असेल; तो घरीं असला तरी घाम्तीचें कारण नाहीं ती सुसाध्य आहे, जागी आहे, अशी दूतीची सूचना.

१. सुदिए २ पिआम्मि. ३ क्खित्त ४ परिश्रान्ते ५ प्रिये

३२५ मदनबाण :　　325. Love Arrows.

दुम्मेन्ति देन्ति सोक्खं कुणन्ति अणुराअं रमावेन्ति ।
अरइरइबन्धवाणं णमो णमो मअणबाणाणम् ॥२५॥

[ दून्वन्ति ददति सौख्यं कुर्वन्त्यनुराग रमयन्ति ।
अरतिरतिबान्धवेभ्यो नमो नमो मदनबाणेभ्य ॥ ]

प्रथम अनुराग निर्माण करून मनुष्याला मदनबाण व्याकुळ करतात आणि नतर त्यामुळेच सुखवितात. सुखदु खाना बाधव करणाऱ्या मदनबाणाना नमस्कार असो.

३२६ कामशर :　　326. Flowery Arrows.

कुसुममआ वि अइखरा अलद्धफंसा वि दूसहपआवा ।
भिन्दन्ता वि रइअरा कामस्स सरा बहुविअप्पा ॥२६॥

[ कुसुममया अप्यतिखरा अलब्धस्पर्शा अपि दु.सहप्रतापाः ।
भिन्दन्तोऽपि रतिकरा. कामस्य शरा बहुविकल्पा ॥ ]

कामशर फुलासारखे मृदु, तरी असे तीक्ष्ण असतात की स्पर्शापूर्वीच त्याचा प्रताप असह्य वाटतो, आणि असे विलक्षण की ते शरीराचा भेद करतात तेव्हा सुख वाटतें.

● विरोध अलकार ' विरोधाभासत्व विरोध । '

१ दूनयति, दुर्मनायते २. अभिरतिबाधवाना

## ३२७ बहुगुणी : 327 Effect.

ईसं जणेन्ति, दावेन्ति मम्महं, विप्पिअ सहावेन्ति।
विरहे ण देन्ति मरिउं, अहो ! गुणा तस्स बहुमग्गा ॥२७॥

[ ईर्ष्यां जनयन्ति दीपयन्ति मन्मथं विप्रियं साहयन्ति ।
विरहे न ददति मर्तुमहो गुणास्तस्य बहुमार्गाः ॥ ]

प्रियकर मनात ईर्ष्या उत्पन्न करतो, प्रेम जागृत करतो, जें अप्रिय तें सहन करावयास लावतो आणि विरहांत मरूंही देत नाहीं; असे विविध बहुगुण त्याचे अंगीं आहेत.

● प्रियकर अन्य स्त्रियांबद्दल आसक्त असेल अशा कल्पनेनें स्त्रियांच्या मनात ईर्ष्या उत्पन्न होते, इतरापेक्षा आपण त्याला अधिक रमवावें अशा ईर्ष्येनें त्याच्या प्रेमचेष्टामध्यें कौशल्य व विविधता निर्माण होते; त्याचा हिरमोड करूं नये, या इच्छेमुळें अनुनयाचे वेळीं त्या अनेक अप्रिय गोष्टी सहन करतात; आणि त्याचे संगतींत मिळणारीं सुखें पुन्हा मिळावीं म्हणून विरहातही जीव धरून राहण्याची शक्ति निर्माण होते.

## ३२८ वायन : 328. Sweets.

णीआइँ अज्ज णिक्किव ! पिणद्धणवरङ्गआँइ वराईए।
घरपरिवाडीअ पेहेणआइँ तुह दंसणासाए ॥२८॥

[ नीतान्यद्य निष्कृप पिनध्दनवरङ्गकया वराक्या ।
गृहपरिपाट्या प्रहेणकानि तव दर्शनाशया ॥ ]

---

१ दावेन्ति, वड्ढेन्ति. २. वम्महं. ३. दर्शयन्ति, वर्धयन्ति. ४. मनोरथं. ५. साधयन्ति. ६. वहेणअणाइ. ७. परिपाला पयिनयनानि.

अरे निर्दया, तुझ्या दर्शनासाठीं बिचारी नवें रंगीत वस्त्र नेसून वायनें देण्याच्या निमित्तानें घरोघर हिंडली.

● केवळ तुझ्यासाठीं तिनें सारा शृंगार केला होता. ज्याच्यावर प्रेम असतें त्याला आपलें दर्शन सुवस्त्रालंकारविभूषित होईल अशी स्त्रिया खबरदारी घेतात. वस्तुतः तुझ्या दर्शनासाठीं तुझ्या एकट्याच्याच घरीं तिला जावयाचें होतें, पण तसे केलें तर तिऱ्हाइताना व तुझ्या मंडळींना संशय येईल, म्हणून बिचारीला घरोघर हिंडावें लागलें.

## ३२९ दरिद्री : 329. Tattered Garment.

सूइज्जइ हेमन्तम्मि दुग्गओ पुप्फुआसुअन्धेण ।
धूमकविलेण परिविरलतन्तुणा जुण्णवडएण ॥२९॥
[ सूच्यते हेमन्ते दुर्गतः करीषाग्निसुगन्धेन ।
धूमकपिलेन परिविरलतन्तुना जीर्णपटकेन ॥ ]

हिंवाळा सुरू झालेला आहे, तरी त्याच्यापाशीं एकच वस्त्र आहे, तेंही जीर्ण व मळकट झालेलें आहे; शिवाय त्याच्या विरलेल्या तंतूंना रानशेणींचा वास येत आहे. यावरून दिसतें कीं तो दरिद्री असला पाहिजे.

● अशा दरिद्याच्या नादीं लागूं नको अशी दूतीची सूचना.

## ३३० ओरखडे : 330. Grass.

खरसिप्पिरउल्लिहिआइँ कुणइ पहिओ हिमागमपहाए ।
आअमणजलोल्लिअहत्थफंसमसिणाइँ अङ्गाइं ॥३०॥

१. फुंफुआ, फुम्फुआ. २. अइ. ३. पडएण. ४. सिप्पिरुल्लिहिआइ.

[ *तीक्ष्णपलालोल्लिखितानि करोति पथिको हिमागमप्रभाते।*
**आचमनजलार्द्रितहस्तस्पर्शमसृणान्यङ्गानि ॥ ]**

खरखरीत गवतातून जाताना प्रवाशाच्या अंगावर ओरखडे उठले हिंवाळ्यात पहाटे आचमनासाठीं घेतलेल्या पाण्यानें हात ओले करून त्यानें रखरखीत झालेलें आपलें अंग मऊ केलें

● सिप्पिर = पलाल = पेंढा, भातशेतात कापणी झाल्यानतर राहणारे तीक्ष्ण बुडखे, सिप्प = शिपी = शिंपी = एक प्रकारचें गवत, शिपटी = फॉक. प्रवाशानें क्रमिलेला मार्ग भात शेतातला असला तरी तेथें अंगावर ओरखडे उठण्यासारखे बुडखे असणें संभवनीय नसल्यामुळें गवत हा अर्थ घेतला आहे हेमंतकालातील प्रवासाचा निषेध.

## ३३१ पाठलाग : 331 Persuit

**णक्खुक्खुडिअं सहआरमञ्जरिं पामरस्स सीसम्मि।**
**बन्दिम्मिव हीरन्तीं भमरजुआणा अणुसरन्ति ॥३१॥**

[ *नखोत्खण्डितां सहकारमञ्जरीं पामरस्य शीर्षे।*
**बन्दीमिव ह्रियमाणां भ्रमरयुवानोऽनुसरन्ति ॥ ]**

नखानीं ओरबाडलेला आंब्याचा मोहोर शिरावर घेऊन चाललेल्या पामराचा भ्रमरानीं पाठलाग केला. अधम पुरुष एखाद्या स्त्रीला जबरीनें पळवून नेऊ लागला म्हणजे त्याचा तरुणाकडून असाच पाठलाग होतो.

● तो सहृदय असता तर त्यानें मोहोर हलक्या हातानें खुडला असता. मग त्याचा घमघमाट इतका सुटला नसता आणि भुंग त्याच्या मागें लागले नसते तो मवाली नसता व त्यानें जबरदस्ती करून तिला ओढली नसती तर गावच्या तरुणानीं त्याचा पाठलाग केला नसता तिच्या मर्जी

१ तीक्ष्ण तृणाग्रो, गरपलागे - णक्खुक्खुडिय

विरुद्ध तो तिला घेऊन जात आहे, त्याचा पाठलाग करून तिला सोडव, भ्रमराएवढीही रसिकता व धैर्य तुझ्या अंगीं नाहींत काय !

## ३३२ अञ्जलि : 332 Oblation.

सूरच्छलेण पुत्तअ ! कस्स तुमं अञ्जलि पणामेसि ।
हासकडक्खुम्मिसा ण होन्ति देवाणॅ जेक्कारा ॥३२॥

[ सूर्यच्छलेन पुत्रक कस्मै त्वमञ्जलिं प्रणामयसि ।
हास्यकटाक्षोन्मिश्रा न भवन्ति देवानां जयकाराः ॥

मुला, सूर्याच्या निमित्तानें तू कोणाचें ध्यान करीत आहेस, कोणाला अञ्जलि अर्पण करीत आहेस ? सस्मित मुखानें व काण्या नजरेनें देवाचा जयजयकार करावयाचा नसतो.

● वेबरनें ' मुला ' ऐवजीं ' मुली ' हा पाठ स्वीकारला आहे. भारतात स्त्रियांनीं सूर्याला अञ्जलि दिल्याचे उल्लेख आढळतातही. 'मुली, तुला कोणाची आठवण झाली आहे तें सांग, मी तुझी इच्छा पुरी करीन', असें आश्वासन. जेक्कार, जोक्कार हें जोहाराचें मूळ स्वरूप असें यावरून स्पष्ट दिसतें. अलङ्काररत्नाकरात उद्भेदाचें उदाहरण.

## ३३३ चौर्यरत : 333. Rendezvous.

मुहविज्झविअपईवं णिरुद्धसासं ससङ्किओल्लावम् ।
सवहसअरक्खिओट्ठं चोरिअरमिअं सुहावेइ ॥३३॥

---

१ पुत्तअ - जोक्कारा, जेक्कारा, जंगारा - अर्पयसि, समर्पयसि.
४ ज्योत्कारा - ससङ्किरलाव, ससङ्किउल्लाम

[ मुखविध्मापितप्रदीपं निरुध्दश्वासं सशङ्कितोल्लापम् ।
शपथशतरक्षितोष्ठं चोरिकारमितं सुखयति ॥ ]

फुंकर घालून दिवा विझविण्यात आला आहे, श्वास रोधून धरला आहे, बोलणें कुजबुजत चाललें आहे, ओठांच्या सुरक्षिततेसाठीं शंभर शपथा घालण्यांत आल्या आहेत; असें चोरटें रत फार सुख देतें.

● कोणाला दिसूं नये, चाहूल लागूं नये, स्वरावरून ओळख पटूं नये, काहीं खूण राहू नये, म्हणून भरल्या घरात एवढी खबरदारी घ्यावीच लागते. हाताच्या झटक्यानें ज्योत विझवता आली असती, पण काकणाचा आवाज झाला असता, म्हणून निषिद्ध असलें तरी फुंकर घालून ज्योत विझविली आहे. चौर्यरताच्या सुखाची कल्पना अनुभवाशिवाय येणार नाहीं अशी दूतीची सूचना.

## ३३४ धनाश्री : 334. Song.

गेअच्छलेण भरिउं कस्स तुमं रुआसि णिब्भरुक्कण्ठम् ।
मण्णुपडिरुद्धकण्ठद्धणिन्तखलिअक्खरुल्लावम् ॥३४॥

[ गेयच्छलेन स्मृत्वा कस्य त्वं रोदिपि निर्भरोत्कण्ठम् ।
मन्युप्रतिरुद्धकण्ठार्धनिर्यत्स्खलिताक्षरोल्लापम् ॥ ]

दुःखानें कण्ठ रुद्ध झाल्यामुळें तुझ्या गाण्याचे स्वर अस्पष्ट आहेत. तुझें गायन इतकें करुण आहे कीं वाटतें गाण्याच्या निमित्तानें तूं रुदन करीत आहेस. तुला कोणाची आठवण झाली आहे ?

● दूती सांगते, माझ्यावर विश्वास ठेव, तुझें रहस्य मला सांग, मी तुझें दुःख दूर करीन.

---

१. गीत.

## ३३५ आमंत्रण : 335 Invitation

चहलतमा हअराई, अज्ज पउत्थो पई. घरं सुण्णम्।
तह जग्गेसु सअंज्जिअ ! ण जहा अम्हे मुसिज्जामो ॥३५॥

[ बहुलतमा हतरात्रिरद्य प्रोषित. पतिर्गृहं शून्यम् ।
तथा जागृहि प्रतिवेशिन्न यथा वैय मुष्यामहे ॥ ]

मेली अन्धारी रात्र मोठी दुष्ट आहे. पति प्रवासाला गेले आहेत. घरात मी एकटीच आहे म्हणून म्हणते, शेजाऱ्या, जागा राहा, म्हणजे आपल्या घरीं चोरी होणार नाहीं

● स्वयंदूती नायिका, शेजाऱ्याला आमंत्रण. मध्ययुगीन कवींनीं या संकेताचा वारंवार उपयोग केलेला आहे. सअज्जिअ = शेजारी, यापासून सयाजी हें विशेषनाम साधित असावें.

## ३३६ पहारा : 336. Watch.

संजीवणोसहिम्मिव सुअस्स रक्खइ अणण्णवावारा ।
सासू णवब्भदंसणकण्ठागअजीविअं सोह्नम् ॥३६॥

[ संजीवनौषधिमिव सुतस्य रक्षत्यनन्यव्यापारा ।
श्वश्रूर्नवाभ्रदर्शनकण्ठागतजीवितां स्नुषाम् ॥ ]

आभाळात अभ्रें आल्यामुळें विरहिणी सुनेचे प्राण कंठीं आलेले आहेत तिच्या पतीच्या अनुपस्थितींत तिचें रक्षण हाच आपला एकमेव व्यवसाय असें तिची सासू मानते आणि ती आपल्या पुत्राची संजीवनौषधि आहे हें जाणून तिचें रक्षण करते !

१ सआमअ, सयाज्जअ २ बहलान्धकारा ३ अस्मान्मुष्णायु, वय समुदिजाम

● सासूचा बंदोबस्त फार कडक आहे अशी सूचना. अशा पहाऱ्यांतून निसटणाऱ्या सुनांच्या अनेक गोष्टी स्त्रीचरित्रात आहेत. अलंकाररत्नाकरात हेतु अलंकाराचें उदाहरण.

## ३३७ रहस्यस्फोट : 337. Double Entry.

णूणं हिअअणिहित्ताइ वससि जाआइ अम्ह हिअअम्मि ।
अण्णह मणोरहा मे सुहअ कहं तीअ विण्णाआ ? ।।३७।।

[ नूनं हृदयनिहितया वससि जायय्यास्माकं हृदये ।
अन्यथा मनोरथा मे सुभग कथं तया विज्ञाताः ॥ ]

हे सुभग, तुम्हांला मी माझ्या हृदयांत स्थान दिलें आणि माझ्या दुर्दैवानें तुमच्याबरोबर तुमची पत्नीही येथेंच ठाण देऊन राहिली आहे. तसें नसतें तर आपल्या गुप्त गोष्टी तिला कशा समजल्या ?

● गंगाधर सांगतो, या गाथेची नायिका खण्डिता असून तिनें हे उद्गार प्रातःकाळीं, नखदन्तक्षताङ्कित स्थितींत, तिच्या दारीं आलेल्या पतीला उद्देशून काढलेले आहेत. हें पटत नाहीं. तसें असतें तर हिनें तिचा उल्लेख करताना 'जाया' हा शब्द वापरला नसता. या गाथेची नायिका ही त्याची प्रिया, त्याच्या पत्नीची सखी असावी; नाहीं तर या दोघातलें रहस्य तिला कळलें आहे हें हिला कसें समजलें असतें ?

## ३३८ अश्रूंची अञ्जलि : 338. Release.

तइ सुहअ ! अईसन्ते तिस्सा अच्छीहिँ कण्णलग्गेहिं ।
दिण्णं घोलिरबाहेहिँ पाणिअं दंसणसुहाणम् ॥३८॥

१. मे कथय कथं, मे शंस कथ.

[ त्वयि सुभग अदृश्यमाने तस्या अक्षिभ्यां कर्णलग्नाभ्याम् ।
दत्तं घूर्णनशीलबाष्पाभ्यां पानीयं दर्शनसुखेभ्यः ॥

. सुभग, तूं तिच्या दृष्टिपथांतून गेलास तेव्हां तुझ्या दर्शनाच्या कौतुकामुळें तिचे डोळे इतके विकसित झाले कीं ते जणूं तिच्या कानांना जाऊन भिडले. अश्रु ओघळत असलेल्या डोळ्यांनीं तिनें तुझ्या दर्शनसुखावर पाणी सोडलें.

● आकर्ण नेत्र हें सौंदर्यलक्षण तिला अनुरागातिशयामुळें प्राप्त झालें. काय, ती रडली ? नाहीं, तिनें सुखाना जलाञ्जलि दिली. छेकोक्ति.

## ३३९ उत्प्रेक्षा : 339. Imagination.

उप्पेक्खागअ तुह मुहदंसण पडिरुद्धजीविआसाइ ।
दुहिआइ मए कालो कित्तिअमेत्तो व्व णेअव्वो ? ॥३९॥

[ उत्प्रेक्षागत त्वन्मुखदर्शनप्रतिरुद्धजीविताशया ।
दुःखितया मया कालः कियन्मात्रो वा नेतव्यः ॥

तुझें दर्शन मला केवळ कल्पनेंत मिळत आहे; त्याच्या आधारानें मी आतांपर्यंत जीव धरून राहिलें आहे. अशा दुःस्थितींत मी आणखी किती व कसा काळ काटावयाचा ?

● मी तुझीं स्तुतिस्तोत्रें ऐकलीं; त्यावरून तुझी मूर्ति मी कल्पनेनें निर्माण केली आहे; उपमा व उपमेय यांची तुलना करावयाची संधि तूं मला कधीं देणार ? भेट कधीं होणार व कोठें ?

१. अदीमन्ते. २. व्यतिक्रान्ते.

३४० अलक्षित : 340. Desolate.

वोलीणालक्खिअरूअजोवणा पुत्ति ! कं ण दुम्मेसि ?।
दिट्ठा पणट्ठपोराणजणवआ जम्मभूमि व्व ॥४०॥

[ व्यतिक्रान्तालक्षितरूपयौवना पुत्रि कं न दुनोषि ।
दृष्टा प्रणष्टपौराणजनपदा जन्मभूमिरिव ॥ ]

मुली, तूं कोणाच्याही मनांत भरण्यापूर्वीच तुझें यौवन फुकट गेलें व सौंदर्य नष्ट झालें. लहानपणचे स्नेहीसोबती नष्ट व्हावे आणि नंतर आपण जन्मभूमीचें दर्शन घ्यावें, म्हणजे मनाला दुःख होतें; त्याप्रमाणें आतां तुझ्याकडे पाहून कोणाला खेद होणार नाहीं ?

● पूर्वी तुझ्या नुसत्या दर्शनासाठीं गर्दी जमत असे, आता कोणी ढुंकूनही पाहत नाहीं. निर्मनुष्य झालेल्या गावाच्या दर्शनानें खेद होतो, त्याचप्रमाणें तुझी अवस्था पाहून दुःख होतें. या स्थितींत जें मिळत आहे त्यातच समाधान मानलें पाहिजे.

३४१ अङ्गीकार : 341. Acceptance.

परिओसविअसिएहिं भणिअं अच्छीहिँ तेण जणमज्झे ।
पडिवण्णं तीअ वि उव्वमन्तसेएहिँ अङ्गेहिं ॥४१॥

[ परितोषविकसिताभ्यां भणितमक्षिभ्यां तेन जनमध्ये ।
प्रतिपन्नं तयाप्युद्वमत्स्वेदैरङ्गैः ॥ ]

१. दिट्ठप्पणट्ठ. २. व्यतिक्रान्तोपलक्षित, व्यपलीन. ३. दुर्मनायमाना भवसि. ४. दृष्टा प्रनष्ट.

लोकाच्या समोर त्याला तिच्याशीं बोलता आलें नाहीं; पण (अनुरागजन्य) आनंदानें फुललेल्या नजरेनें तिच्याकडे दृष्टिक्षेप करून त्यानें आपल्या भावना प्रकट केल्या; त्याच्या नजरेला नजर मिळताच तिच्या अंगप्रत्यंगाना घाम आला आणि जणू तिनें त्याचा अङ्गीकार केला.

● अलंकाररत्नाकरात उद्भेदाचें उदाहरणः 'यत्र किञ्चिदाच्छादित्वेन निगूढमपि कुतश्चित्प्रतिभिन्नते प्रकटीभवति स उद्भेद ।'

३४२ संदेश : 342. Message.

एक्केक्कमसंदेसाणुराअवड्ढन्त कोउहल्लाइं ।
दुःखं असमत्तमणोरहाइँ अच्छन्ति मिहुणाइं ॥४२॥
[ अन्योन्यसंदेशानुरागवर्धमानकौतूहलानि ।
दु:खमसमाप्तमनोरथानि तिष्ठन्ति मिथुनानि ॥ ]

एकामेकाना संदेश जातात. त्यातील प्रेमामुळें उत्सुकता वृद्धिंगत होते. मनोरथ सिद्धीला जात नाहींत तोंवर जोडपीं दुःख अनुभवीत राहतात.

● आणि मनोरथ सिद्धीला गेल्यानंतर अपेक्षा व अनुभव यातील विसंवादामुळें कुरापती काढून असंतुष्ट होतात !

३४३ प्रफुल्ल : 343 Bloom.

जइ सो ण वल्लहो च्चिअ गोत्तग्गहणेण तस्स सहि ! कीस ।
होइ मुहं ते रविअरफंसविसट्टं व तामरसम् ॥४३॥

१ एक्वेक्कम, एक्केक्क २ अच्छन्त, वड्ढत, वाहुन्त ३ अट्ठति ४ एक्वैक्कमसंदर्शनानुराग, एकक्रमसंदेशानुराग ५ सन्ति. ६ णाम ७ विसट्ट, विसअ, विमट्ट

[ यदि स न वल्लभ एव गोत्रग्रहणेन तस्य सखि किमिति ।
भवति मुख तव रविकरस्पर्शविकसितमिव तामरसम् ॥ ]

तो तुझा वल्लभ नाहीं ना ? मग सूर्यस्पर्श होताच कमळ विकसतें, तसें त्याचें नुसतें नाव घेताच तुझें मुख प्रफुल्ल का होतें ?

● रजनी अरुणाचें नाव घेऊन लाजते, तेव्हा पृथ्वीवर लाल कमळ फुलतें।

## ३४४ पूर्वरङ्ग : 344 Prologue

माणदुमपरुसपवणस्स मामि ! सव्वङ्गणिव्वुइअरस्स ।
अवऊहणस्स भद्दं रइणाडअपुव्वरङ्गस्स ॥४४॥

[ मानद्रुमपरुषपवनस्य मातुलानि सर्वाङ्गनिर्वृतिकरस्य ।
अवगूहनस्य भद्रं रतिनाटकपूर्वरङ्गस्य ॥ ]

मामी, सर्व गात्राना सुख देणाऱ्या व रतिनाटकाचा पूर्वरङ्ग असणाऱ्या आलिंगनाचे कल्याण असो सोसाट्याच्या वाऱ्यानें वृक्ष उन्मळून पडतो, त्याप्रमाणें आलिंगनानें मानाचा वृक्ष कोल्मडतो.

● नाटकाच्या पूर्वरङ्गात रङ्गदेवतेला आवाहन असतें, विघ्नांच्या शान्त्यर्थ नान्दी वगैरे योजना असतात आणि कथावस्तूचा प्रस्ताव असतो पूर्वरङ्गाप्रमाणेंच आलिंगनाला स्वतन्त्र अस्तित्व नाहीं. आलिंगनात आवाहन आहे आणि प्रस्तावही. नाटकात जशीं पात्रें तशीं येथें गात्रें, अशीं आणखी किती साम्यें सागावीत ? रूपक अलंकार 'आरोपो रूपकम् ।' अलंकार-कौस्तुभातील विवरण पाहा 'मानरत्योर्द्रुमनाटकाभेदारोपोऽत्र उपगूहन-पवनपूर्वरङ्गाभेदारोपे निमित्तम् । अत्र विरोधितासबन्धेनानुग्राह्यानुग्राहकभाव एति विशेष ।'

---

१ मामि - मव्वाङ्गणिव्वइ ३ उप

## ३४५ निःशङ्क : 345 Misplaced Confidence.

णिअआणुमाणणीसङ्क हिअअ ! दे पसिअ, विरम एत्ताहे ।
अमुणिअपरमत्थजणाणुलग्ग ! कीस म्ह लहुएसि ? ॥४५॥

[ निजकानुमाननिःशङ्क हृदय हे प्रसीद विरमेदानीम् ।
अज्ञातपरमार्थजनानुलग्न किमित्यस्मांल्लघयसि ॥ ]

हृदया, कृपा कर, जरा थांब तू स्वत वरून तर्क केलास कीं त्याच्याही हृदयात प्रेम असेल. या स्वच्छंदी विचारानें तू निःशंक झाला आहेस. दुसऱ्याच्या सुखदुःखाची पर्वा न करणारावर तू आसक्त आहेस. मला कमीपणा का आणतोस ?

● त्यालाही विरहवेदना जाणवत असतील अशा कल्पनेने मनोरथ-भङ्गाबद्दल निःशंक झालेल्या हृदया, जरा थांब, प्रियकर स्वच्छन्दी आहे, आसक्तीमुळें तूं मला कमीपणा मात्र आणशील, थांब, यापुढें कोणाच्याही आधीन होऊं नकोस.

## ३४६ मंत्रपुष्पाञ्जलि : 346. Moon-Worship.

ओसहिअजणो पइणा सलाहमाणेण अइचिरं हसिओ।
चन्दो, त्ति तुज्झ वँअणे विइण्णकुसुमञ्जलिविलक्खो ॥४६॥

[ आवसथिकजनः पत्या श्लाघमानेनातिचिरं हसितः ।
चन्द्र इति तव वदने वितीर्णकुसुमाञ्जलिविलक्ष ॥ ]

१ अमुत २ अवमहइजणो, ममुहि सहिअणो ३ एन्थिर. ४ मुहमम्मुह-दिण्ण ५ विकिण्ण, विमुक्क ६ आवसथिका, अवशहत, मुमुरि मलीजनेन. ७ विकीर्ण

मठात राहणाऱ्या धार्मिकांना तुझें मुख पाहून वाटलें कीं हा चद्रच आहे. या कल्पनेनें त्यांनीं तुझ्यावर फुलें उधळलीं. आपली चूक समजून आल्यानंतर ते लज्जित झाले. तेव्हां तुझ्या पतीनें तुझी स्तुति व त्यांची थट्टा केली.

● चंद्राचा उदय झाला कीं त्यावर फुलें उधळणें हें एक मत होतें. ओहो, काय हें सौंदर्य ! असें उद्गारून तुझ्या प्रियकरानें तुझ्या मुखचंद्रावर फुलें उधळलीं. मठातल्या धार्मिकानीं हें पाहिलें; तेव्हा त्यांनीं तुझी स्तुति केली व त्याचा उपहास; तेव्हा तो लज्जित झाला. अलंकारकौस्तुभात भ्रान्तिमान् अलंकाराचें उदाहरण.

## ३४७ शठ : 347. Impertinence.

छिज्जन्तेहिँ अणुदिणं पच्चक्खम्मि वि तुमम्मि अङ्गेहिं ।
बालअ ! पुच्छिज्जन्ती ण आणिमो कस्स किं भणिमो ॥४७॥

[ क्षीयमाणैरनुदिनं प्रत्यक्षेऽपि त्वय्यङ्गैः ।
वालक पृच्छ्यमाना न जानीमः कस्य किं भणामः ॥ ]

बालक, मी रोज कृश होत आहे हें तुला प्रत्यक्ष दिसत आहे. तूं विचारतोस, याचें कारण काय ? या प्रश्नाचें उत्तर कोणाला काय द्यावें, तेंच कळत नाहीं

● प्रथम तूं प्रवासाला गेलास म्हणून मी कृश झालें. परत आल्यानंतर तूं सवतीच्या हातीं गेलास, म्हणून मी दुबळी झालें. हें मी माझ्या सख्यांना कसें सांगूं ! आणि हें तुला सांगावयाला का पाहिजे !

१, छिज्जन्तेहिँ

## ३४८ यातना : 348. Anguish.

अङ्गाणं तणुआरअ ! सिक्खावअ दीहरोइअव्वाणम् !।
विणआइक्कमआरअ ! मा मा णं पम्हसिज्जासु ॥४८॥

[ अङ्गानां तनुकारक शिक्षक दीर्घरोदितव्यानाम्।
विनयातिक्रमकारक मा मा एनां प्रसरिष्यसि ॥ ]

तूं शरीर कृश करतोस, दीर्घरुदन शिकवितोस आणि विनयाचा अतिक्रम करवितोस. नको, नको, तिची आठवण सुद्धां काढूं नकोस.

● मन्दस्नेहादर नायकाला अनुकूल करण्यासाठीं दूतीचे उद्गार. तुझ्यासाठीं तिनें गुरुजनांच्या आज्ञांचें उल्लंघन केलें आणि तूं तिचें शीलखण्डन केलेंस. तिचें चित्त विकल झालें, शरीर खंगलें. तुझ्यासाठीं तिनें अन्नावर पाणी सोडलें, आता ती प्राणावर पाणी सोडण्याच्या तयारींत आहे आणि तुला तिची आठवणही नाहीं, तिनें सोसलेल्या यातनांची जाणीव नाहीं. एवढा निर्दय होऊं नकोस ! त्वरा कर आणि तिचें रक्षण कर.

## ३४९ विनोद : 349. Remedy.

अण्णह ण तीरइ च्चिअ परिवड्ढन्तगरुअं पिअअमस्स ।
मरणविणोएण विणा विरमावेउं विरहदुक्खम् ॥४९॥

[ अन्यथा न शक्यत एव परिवर्धमानगुरुकं प्रियतमस्य ।
मरणविनोदेन विना विरमयितुं विरहदुःखम् ॥ ]

१. मा माणं. २. विम्हरिज्जासु. ३. शिक्षापक, शिक्षायक ४. प्रभ्रमय.
५ पडिवड्ढन्तस्स गेरुअपेम्मस्स. ६ विणिवारेउं. ७ परिवर्धमानस्य गुरुकप्रेम्ण

प्रियतमाच्या विरहामुळें होणारें दु ख दिवसानुदिवस वाढतच आहे. मरणाशिवाय दुसऱ्या कोणत्याही उपायानें तें विरमणार नाहीं.

● विनोद म्हणजे परिहार. ह्या दुःखाचा परिहार करणारा विनोद म्हणजे मृत्यूच.

## ३५० प्रमाद : 350. Mistake.

वण्णन्तीहिँ तुह गुणे बहुसो अम्हेँ छिन्छईपुरओ ।
बालअ ! सअमेअ कओसि दुल्लहो, कस्स कुप्पामो ? ॥५०॥

[ वर्णयन्तीभिस्तव गुणान्बहुशोऽस्माभिरसतीपुरतः ।
बालक स्वयमेव कृतोऽसि दुर्लभः कस्मै कुप्यामः ॥ ]

बालक, आम्ही तुझ्या अनेक गुणाचें वर्णन स्वैरिणींच्या समोर केलें ही आमचीच चूक. आम्ही आपण होऊन तुला दुर्लभ करून घेतलें; आता आम्ही कोणावर रागवावें ?

● आम्हींच त्याना तुझा परिचय करून दिला. त्यांनीं तुझें अनुरञ्जन आमच्याहून अधिक केलें म्हणून तू आम्हाला पारखा झालास. आमच्या अविवेकाचीं फळें आम्ही भोगीत आहोंत. आम्ही स्वतःवरच रुष्ट झालों आहोंत. तू मात्र आमच्यावर रुष्ट होऊ नकोस, अशी पत्नीची पतीला विनवणी. आक्षेप-अलंकार.

## ३५१ निरीगांठ : 351. Knot on Folds.

जाओ सो वि विलक्खो, मए वि हसिऊण गाढमुवगूढो ।
पढमोसरिअस्स णिअंसणस्स गण्ठि विमग्गन्तो ॥५१॥

१ छिछई

[जातः सोऽपि विलक्षो मयापि हसित्वा गाढमुपगूढ ।
प्रथमापसृतस्य निवसनस्य ग्रंथिं विमार्गयमाण ॥]

तो माझ्या वस्त्राची गाठ शोधीत होता व ती तर अगोदरच सुटलेली होती त्याची हालचाल लक्षात आली तेव्हा मी हसून त्याला गाढ आलिंगन दिलें, तेव्हा तोही लाजला.

● गगाधर सागतो, अनुरागातिशयामुळे प्रियकराच्या स्पर्शाच्याही अगोदर तिच्या वस्त्राची गाठ शिथिल व स्खलित झाली होती. वेबर सागतो, आपोआप नव्हे, तिच्या हस्तकौशल्यामुळे पण अगोदर कोण लाजले ?

## ३५२ अपराध व शिक्षा : 352 Crime & Punishment.

कण्डुज्जुआ वराई अज्ज तए सा कआवराहेण ।
अलसाइअरुण्णविअम्भिआइँ दिअहेण सिक्खविआ ॥५२॥

[कोण्डर्जुका वराकी अद्य त्वया सा कृतापराधेन ।
अलसायितरुदितविजृम्भितानि दिवसेन शिक्षिता ॥]

बिचारी अगदी सरळ स्वभावाची आहे, दिवसभर ग्लानि आल्यामारखी आळसावून राहते, जांभया देते व रडते. अपराधी तू व आणि शिक्षा मात्र तिला !

● काण्ट-कांण्डे, काठी, पेर, बाण, मोड ही वृत्तीनें सरळ व कणखर. काट-काट्यात नव्हे-चालणाऱ्या स्त्रीला उद्देशून कांण्डे हा शब्द ग्राम्य भाषेत ऐकलेला आठवतो. दिवसभर तिची अवस्था अशी असते व रात्री

१ कण्डुज्जुआ कण्डुज्जुआ २ अज्जुआ ३ अलसाइअरुण्णविअम्भिआइ
३ कण्डा ऋजुका कण्डर्जुका, कण्डूर्जुका ४ जृम्भायितरुदितविजृम्भितानि

तर बिचारी ढसढसा रडत असेल. ' कर्णदुर्बला ' हा पाठ स्वीकारला तर– ती वदंतावर विसंबून विकल झाली आहे. अन्यासक्त नायकाला अनुकूल करून घेण्यासाठी दूतीचे उद्गार.

## ३५३ शिष्ट : 353 Courtesy.

अवराहेहिँ वि ण तहा पत्तिअ ! जह मं इमेहिँ दुम्मेसि ।
अवहत्थिअसब्भावेहिँ सुहअ ! दक्खिण्णभणिएहिं ॥५३॥

[ अपराधैरपि न तथा प्रतीहि यथा मामेभिर्दुनोषि ।
अपहस्तितसद्भावैः सुभग दाक्षिण्यभणितैः ॥

सुभग, तुझ्या सभ्य पण प्रेमहीन अशा बोलण्यानें व स्नेहाच्या लटक्या प्रदर्शनानें मला जितका त्रास होतो तितका तुझ्या अपराधांनीं- सुद्धा होत नाहीं.

## ३५४ स्वयंस्फूर्ति : 354. Inspiration.

मा जूर पिआलिङ्गणसरहसभमिरीणॅ बाहुलइआणम् ।
तुह्लिक्कपरुण्णेण अँ इमिणा माणंसिणि ! मुहेण ॥५४॥

[ मा क्रुध्यस्व प्रियालिङ्गनसरभसभ्रमणशीलाभ्यां बाहुलतिकाभ्याम् ।
तूष्णीकप्ररुदितेन चानेन मनस्विनि मुखेन ॥

मानिनी, मुकाट्या मुकाट्यानें रडून रडून तुझें मुख मळूल झालें आहे. प्रियकराला आलिंगन देण्यासाठीं स्वयंस्फूर्तीनें व आवेशानें सरसावणाऱ्या आपल्या बाहुलतांवर रागावू नको.

---

१. मामेतैरपद्धर्मनायसे, मामेभिर्नोदयसि. २. अपहसित. ३. सुण्णोवाराभमिरीण बाहाण. ४ अयि मुक्तमु मणंसिणि मुहेण ५. अयि स्वपिहि मनस्विनि मुखेन.

● प्रियकर अपराधी होता, पण चतुर होता. तो तिचा अनुनय करूं लागला. तिच्या अंतःकरणात राग होता, तसाच अनुरागही होता. अनुरागाच्या आदेशानुसार बाहु स्फुरण पावले आणि अपमानामुळें उद्विग्न झालेलें मन थरथरणाऱ्या बाहूंचीच निर्भर्त्सना करू लागलें. विरोधी वृत्तींच्या संघर्षामुळें शिथिल झालेल्या मनाचा शरीरावर ताबा राहत नाहीं आणि अवयवांची हालचाल प्रबल अतःप्रवृत्तींच्या अनुरोधानें होते. तिच्या बाहूंनीं अंतर्यामींचा भाव प्रकट केला.

## ३५५ गोदातीर : 355. River Side.

मा वच्च, पुप्फलाविर ! देवा उअअञ्जलीहिँ तूसन्ति ।
गोआअरीअ पुत्तअ ! सीलुम्मूलाइँ कूलाइं ॥५५॥

[ मा व्रज पुष्पलवनशील देवा उदकाञ्जलिभिस्तुष्यन्ति ।
गोदावर्याः पुत्रक शीलोन्मूलानि कूलानि ॥ ]

बाळ, गोदातीरीं फुलें वेंचायला जाऊं नकोस. उदकाच्या अञ्जलीनेंही देव संतुष्ट होतात. गोदावरीच्या तीरावर शीलखण्डन होतें.

● तूं गोदातीरीं कशासाठीं, कोणासाठीं जात आहेस तें मला माहीत आहे. आमच्या चलतीच्या काळात आम्ही पुष्कळ मानगडी पाहिल्या आहेत, सगळी ऐकल्या आहेत. तुझ्या सङ्केताला माझा विरोध आहे असें नाहीं, पापा देऊं नकोस, एवढेंच.

## ३५६ अनवधान : 356. Listless.

वअणे वअणम्मि चलन्तसीससुण्णावहाणहुंकारम् ।
सहि ! देन्ती णीसासन्तरेसु कीस म्ह दुम्मेसि ॥५६॥

१. गोलाणईअ, गोआवरिअ.

[ वचने वचने चलच्छीर्षशून्यावधानहुंकारम् ।
सखि ददती नि श्वासान्तरेषु किमित्यस्मान्दुनोषि ॥ ]

सखि, आमच्या बोलण्याकडे तुझें लक्ष नाहीं, तू अधूनमधून मान डोलावतेस, केव्हा हुंकार देतेस व मधीं नि श्वास सोडतेस. आमच्यावर कशाला रागावतेस ?

● आम्हा मैत्रिणींना विश्वासात घे, आम्ही तुला मदतच करू.

<u>३५७ शपथ :</u> 357. Oath.

सब्भावं पुच्छन्ती बालअ ! रोआविआ तुअ पिआए ।
णत्थि च्चिअ कअसवहं हासुम्मिस्सं भणन्तीए ॥५७॥

[ सद्भाव पृच्छन्ती बालक रोदिता तव प्रियया ।
नास्त्येव कृतशपथ हासोन्मिश्र भणन्त्या ॥ ]

बालक, तुझ्यावर प्रेम आहे की नाहीं असें मी तुझ्या प्रियेला विचारलें, तेव्हा शपथेवर नकार देऊन ती कृत्रिमपणें हसली हें पाहून मला मात्र रडू आलें.

● दूती सांगते, प्रेमव्यवहारात तू किती अरसिक आहेस आणि ती किती मुग्ध आहे व तुझ्यावरलें तिचें प्रेम किती उत्कट आहे हें तत्क्षणीं माझ्या लक्षात आलें

<u>३५८ तूर :</u> 358 Sowing.

एत्थ मए रमिअव्वं तीअ समं चिन्तिऊण हिअएण ।
पामरकरसेओल्ला णिवडइ तुवरी वविज्जन्ती ॥५८॥

१ सब्भा · २ तारइ

[ अत्र मया रन्तव्यं तया समं चिन्तयित्वा हृदयेन ।
पामरकरस्वेदार्द्रा निपतति तुवरी उप्यमाना ॥ ]

गरीब शेतकरी तूर पेरीत होता. ( पीक आल्यावर ) आपण येथें प्रियेशीं रममाण होऊं असा विचार त्याच्या मनांत आला व ( मनोविकारांच्या आवेगामुळें ) त्याच्या हातांतली तूर ओली झाली.

३५९ बोण्ड : 359. Nipple.

गहवइसुओच्चिएसु वि फलहीवेण्टेसु उअह ! वहुआए ।
मोहं भमइ पुलइओ विलग्गसेअङ्गुली हत्थो ॥५९॥

[ गृहपतिसुतावचितेष्वपि कर्पासवृन्तेषु पश्यत वध्वाः ।
मोघं भ्रमति पुलकितो विलग्नस्वेदाङ्गुलिर्हस्तः ॥]

घरधन्याच्या मुलानें कापसाचा पुंजका देंठावरून काढून घेतला होता, तरी वधू त्या देंठावरून उगाच हात फिरवूं लागली. यामुळें तिचा हात थरथरला आणि पुलकित व स्वेदयुक्त झाला.

● मोलानें कापूस वेंचायला आली; आली न आली तोंच आपल्या पतीवर अनुरक्त झाली, अशी सुनेची सखीजवळ तक्रार. कामकरणीचा कापूस वेंचण्याचा बहाणा सफळ झाला नाहीं. या तक्रारींत असूयेचा अंशही नाहीं, पतीच्या आकर्षकत्वाबद्दल अभिमानाची छटा मात्र आहे. अलंकाररत्नाकरात उद्भेदाचें उदाहरण.

---

१. तुवरी वपमाना, कोशातकी उप्यमाना. २. गहवइसु ३. फलहिसु ४. वांटेसु, वटेसु, बोण्टेसु, व्रण्टेसु ५ सेअल्लङ्गुलगी ६ गृहपतेरुच्चितेषु. ७ फलहीनेषु ८ वांटेषु, वाटेषु

## ३६० कपाशी : 360. Cotton.

अज्जं मोहणसुहियं मुॅअत्ति मोत्तू पलाइए हलिए।
दरफुडिअवेंण्टभारोणआइ हसिअं व फलहीए ॥६०॥

[आर्यां मोहनसुखितां मृतेति मुक्त्वा पलायिते हलिके।
दरस्फुटितवृन्तभारावनतया हसितमिव कार्पास्या ॥६०॥]

मोहनसुखानें तृप्त झाल्यामुळें आर्येनें डोळे मिटले, तेव्हां नांगऱ्याला वाटलें कीं ती मेली, म्हणून तिला तेथें तशीच सोडून त्यानें पळ काढला. नुकत्याच उमललेल्या बोंडाच्या भारानें लवलेली कपाशी ही हें दृश्य पाहून हंसली

● आर्या = श्रेष्ठा, कनिष्ठ भार्या; ईश्वरसुता, ग्रामनेतृसुता; नववधू, पुत्रवती; आर्यकुलोत्पन्ना, असती; असे अनेक व परस्परविरोधी अर्थ आढळतात. सुरततृप्तीमुळें स्त्रियांचे नेत्र मिटतात हा कामशास्त्राचा सिद्धान्त माहीत असण्याइतका हलिक विदग्ध, रसिक वा डोळस नव्हता. तिचे डोळे मिटलेले पाहून त्याला वाटलें कीं ती मेली. हलिकाला वाटलें, आपला आवेग आर्येला कसा सहन होणार! आपला आवेग असह्य आहे असें कोणाला वाटत नाहीं! त्याला स्वतःच्या अडाणीपणाची जाणीव होती, तशीच तिच्या नाजूकपणाचीही. आपल्यावर तोहमत येऊं नये म्हणून तो पळाला. थोडा वेळ थांबता तर त्याला आढळतें कीं एवढ्या तेवढ्यानें स्त्रिया गतप्राण होत नाहींत. कपाशी ही तशी स्त्रीच; तिला स्त्रियांचीं रहस्यें माहीत; त्याची धांदल व तिची अवस्था किंवा अभिनय पाहून ती हंसली. हास्याचा रंग धवल, असा कविसंकेत आहे. कपाशीचीं उमललेलीं बोण्डें पांढरीं शुभ्र असतात, यावर उत्प्रेक्षा. साहित्यदर्पणात विश्वनाथ सांगतो, 'यशसि धवलता वर्ण्यते हास्यकीर्त्योः।' या गाथेंत आहे तशी दंतकथा

१. सिढिलं, सुहिअं, सुडिअ. २. मुअन्ति. ३. फुलिअ. ४. बोंट, वेठ. ५. भारणयाहि, भारोण्णआहि ६. ईश्वरसुता, वरतनु. ७. सुरतशिथिला.

स्त्रीवेदातही आहे. काश्मीरचा राजा जयापीड कर्कोटक (७७९-८०८) याचा मुख्य मंत्रि दामोदर गुप्त याच्या कुट्टनीमतम् (शम्भलीमतम्) या काव्यात ह्या गाथेसारखीच आर्या आढळते: श्रुणु सखि कौतुकमेकं ग्रामीणककामिना यदद्य कृतम्। सुरतरसमीलिताक्षी मृतेति भीतेन मुक्ताऽस्मि ॥३९१॥ श्री. तनसुखराम त्रिपाठी यावरील टीकेत मागतात: 'अत्र हीनपात्रत्वात् शृंगारस्य रसाभावेऽपि अद्भुतहास्ययोः शबलत्व स्पष्टमेव।' या उद्गारावर टीका न करणेच बरें.

## ३६१ धन्य :                                   361. Accursed.

णीसासुक्कम्पिअपुलइएहिँ जाणन्ति णच्चिउं धण्णा।
अम्हारिसीहिँ दिट्ठे पिअम्मि अप्पा वि वीसरिओ ॥६१॥
[ निःश्वासोत्कम्पितपुलकितैर्जानन्ति नर्तितुं धन्याः।
अस्मादृशीभिर्दृष्टे प्रिये आत्मापि विस्मृतः ॥ ]

प्रियकराचें दर्शन झालें की आम्ही देहभानही विसरतों. नि:श्वास, कंप व रोमाञ्च यांनीं युक्त असूनही ज्यांना नाचण्याचें भान राहतें त्या धन्य होत

● आत्मनिंदेच्या निमित्तानें सवतीची निंदा. त्याना धन्य म्हटलें आहे, पण खरें म्हणावयाचें आहे दग्ध. त्याना विभ्रम सुचतात, आम्हांला तर देहभानही राहत नाहीं. व्यतिरेकालंकारः 'उपमेयादन्यस्य न्यूनत्व प्रतिपूरत्वं वा व्यतिरेकः।' (अलङ्काररत्नाकर). तुलनेसाठीं पद्यः 'धन्याऽसि या कथयसि प्रियसङ्गमेऽपि। विस्रब्धचाटुकशतानि रतान्तरेषु॥ नीवीप्रति प्रणिहिते तु करे प्रियेण। सख्यः शपामि यदि किंचिदपि स्मरामि॥ (शार्ङ्गधरपद्धति).

**३६२ मध्यस्थ :** 362. Mediator.

तणुएण वि तणुइज्जइ खीएण वि खिज्जिए बला इमिणा।
मज्झत्थेण वि मज्झेण पुत्ति ! कहँ तुज्झ पडिवक्खो ।।६२।।
[ तनुकेनापि तनूयते क्षीणेनापि क्षीयते बलादनेन ।
मध्यस्थेनापि मध्येन पुत्रि कथं तव प्रतिपक्षः ॥ ]

मुली, तुझी कंबर कृश व दुर्बल आहे आणि मध्यस्थ आहे, तरी ती तुझ्या प्रतिपक्षीयांना कृश व दुर्बल करते; हें कसें काय ?

● खरें पाहिलें असता मध्यस्थांनीं व्यवस्थाप्रमाणें उदासीन राहिलें पाहिजे. तुझी कमर पातळ व दिसण्यात दुर्बल आहे, तरी तिच्या प्रभावानें प्रतिपक्षीयांना दौर्बल्य प्राप्त होतें. अपि या शब्दामुळें विरोधाभास. दूतीनें कार्यसिद्धीसाठीं केलेली व्याजस्तुति.

**३६३ असह्य :** 363. Unbearable.

वाहिव्व वेज्जरहिओ धणरहिओ सुअणमज्झवासो व्व ।
रिउरिद्धिदंसणम्मिव दूसहणीओ तुह विओओ ॥६३॥
[ व्याधिरिव वैद्यरहितो धनरहितः स्वजनमध्यवास इव ।
रिपुऋद्धिदर्शनमिव दुःसहनीयस्तव वियोगः ॥ ]

वैद्याशिवाय व्याधि, संपत्तीवांचून नातेवाइकांचे घरीं निवास आणि शत्रूच्या वैभवाचे दर्शन, ह्यांप्रमाणें तुझ्याशिवाय जीवन असह्य वाटतें.

१. ग्गामेण खामिज्जए २. क्षामेणापि क्षाम्यते. ३ मअण, सजन. ४. सृजन ५ गृह. ६ . वधूरिव.

● माहेरीं गेलेल्या पत्नीला पतीनें दूतीबरोबर पाठविलेला निरोप. अलंकारकौस्तुभात मालोपमेचें उदाहरण : 'मालोपमोपमेयेऽप्येकस्मिन्नेकेऽनेकोपमानसंबन्धः', 'अत्र दुःसहत्वं सर्वत्रैको धर्मः।'

## ३६४ पयोधर :

## 364. Milk & Water.

को त्थ जअम्मि समत्थो थइउं वित्थिण्णणिम्मलुत्तुङ्गम् ।
हिअअं तुज्झ, णराहिव ! गअणं च पओहरं मोत्तुम् ॥६४॥

[ कोऽत्र जगति समर्थः स्थगयितुं विस्तीर्णनिर्मलोत्तुङ्गम् ।
हृदयं तव नराधिप गगनं च पयोधरान्मुक्त्वा ॥ ]

राजा, तुझें हृदय आकाशासारखें विस्तीर्ण, निर्मळ व उत्तुंग आहे; तें व्यापण्याचें सामर्थ्य पयोधरांशिवाय जगांत कोणाला आहे !

● पयोधर=ढग व स्तन; 'हृदये स्तनः गगने मेघः।' विलासी राजाच्या भुलावणीसाठीं कन्येची भलावण करताना वेश्यामातेचे उद्गार.

## ३६५ चाल चवड्यावर :

## 365. Lightfoot.

आअण्णेइ अडअणा कुडङ्गहेट्ठम्मि दिण्णसंकेआ ।
अग्गपअपेल्लिआणं मम्मरअं जुण्णपत्ताणम् ॥६५॥

[ आकर्णयत्यसती कुञ्जाधो दत्तसंकेता ।
अग्रपदप्रेरितानां मर्मरकं जीर्णपत्राणाम् ॥ ]

१. अडाणिउणा. २ को सीरअ समत्थेउ विरियण्णं णिम्मलं समुत्तुग । को त्थद समुत्तारेउं विउिण णिम्मल सुमुत्तुंग ३ पोदर. ४ क॰ गमपों भवति विधणादिहु विमार्गे निर्मल समुत्तुग

संकेतानुसार असती कुञ्जाकडे येत आहे. वाळलेल्या पाचोळ्यावर पावलें वाजूं नयेत म्हणून ती चोरपावलांनीं चालत आहे व मधून मधून कान देऊन ऐकत आहे.

● किंवा, ती कुञ्जात तुझी वाट पाहत बसली आहे, तुझ्या पावलावर चित्त एकाग्र करून बसली आहे, अशी दूतीची सूचना.

## ३६६ अपराजित : 366. Fragrance.

अहिलेन्ति सुरहिणीसासिअपरिमलाबद्धमण्डलं भमरा।
अमुणिअचन्दपरिहवं अपुव्वकमलं मुहं तिस्सा ॥६६॥
[ अभिलीयन्ते सुरभिनिःश्वासितपरिमलाबद्धमण्डलं भ्रमराः।
अज्ञातचन्द्रपरिभवमपूर्वकमलं मुखं तस्याः ॥ ]

चंद्राकडूनहीं पराभव माहीत नसलेलें तिचें मुखकमल अपूर्व आहे; निःश्वासाबरोबर दरवळणाऱ्या सुगंधासाठीं भृंगे त्या भोंवतीं मंडल करीत आहेत.

● भ्रमर व भुजंग, दोघेहीं भ्रमणशील. भ्रमरांना वाटलें, हें कमल अपूर्व आहे, कारण याचा विकास चंद्रसूर्यावर अवलंबून नाहीं. भुजंगाना वाटलें हा मुखचंद्र चंद्राहून सुंदर व शीतल आहे; कारण हा निष्कलंक आहे, सुगंधित आहे आणि जे होते त्याला पोंचूं शकत नाहींत ते याला कुरवाळूं शकतात; तो फक्त उत्तेजन देतो आणि हा समाधानहि !

## ३६७ धीर : 367. Hidden Grief.

धीरावलम्बिरीअ वि गुरुअणंपुरओ तुमम्मि वोलीणे।
पडिओ से अच्छिणिमीलणेण पम्हट्ठिओ वाहो ॥६७॥

१. अभिलय्यन्ति सुरभिनिर्मयित २ जणमज्झे

[ धैर्यावलम्बनशीलाया अपि गुरुजनपुरतस्त्वयि व्यतिक्रान्ते ।
पतितस्तस्या अक्षिनिमीलनेन पक्ष्मस्थितो बाष्पः ॥ ]

तिचा पति प्रवासाला गेला तेव्हां वडील माणसें आजूबाजूला होतीं; म्हणून तिनें धीर धरला; तिनें डोळे मिटले तेव्हां पापण्याच्या आडोशाला असलेले अश्रु ओघळले.

■ गुरुजनांचा असा दरारा कीं त्यांच्यासमोर अश्रुसुद्धा ढाळावयाचे नाहींत. ती अनुगमन करू शकली नाहीं, अश्रूंनीं मात्र अनुसरण केलें.

## ३६८ समेट :　　368. Compromise.

भरिमो से सअणपरम्मुहीअ विअलन्तमाणपसराए ।
कइअवसुत्तव्वत्तणथणकलसप्पेल्लणसुहेल्लिम् ॥६८॥

[ स्मरामस्तस्याः शयनपराङ्मुख्या विगलन्मानप्रसराया ।
कैतवसुप्तोद्वर्तनस्तनकलशप्रेरणसुखकेलिम् ॥ ]

ती माझ्यावर रुसून तोंड फिरवून पडली होती. तिच्या मानाचा जोर हळू हळू ओसरत होता. झोपेचें सोंग घेऊन मीही बिछान्यावर शेजारींच पडलो होतों. इतक्यांत तिनें एकाएकीं वळून स्तनकलशांनीं मला आलिंगन दिलें. त्या क्रीडेची आठवण होते.

## ३६९ फाल्गुनोत्सव :　　369. Mud Ornament.

फग्गुच्छणणिद्दोसं केण वि कद्दमपसाहणं दिण्णम् ।
थणअलसमुहपलोट्टन्तसेअधोअं किणो धुअसि ? ॥६९॥

१. अलमुहपेल्लण, थणजुअलमुहपेल्लण, थणकलसापीडण, थणअलगवेल्लण.
२ खेपण ३ फग्गुच्छव, फग्गुणछण ४ नेण इम तुद

[ फाल्गुनोत्सवनिर्दोषं केनापि कर्दमप्रसाधनं दत्तम् ।
स्तनकलशमुखप्रलुठत्स्वेदधौतं किमिति धावयसि ॥ ]

फाल्गुनोत्सवांत निर्दोष असणारा चिखलाचा अलंकार कोणी तरी तुझ्या अंगावर चढविला आहे. ज्यानें हें केलें त्याच्याबद्दलच्या प्रेमामुळें सुटलेल्या घामाच्या धारांनीं तुझे स्तनकलश आधींच धुतले गेले आहेत. आता ते आणखी कशाला धुतेस ?

● 'पश्चिमदेशे फाल्गुनपौर्णमास्याम् नानाविधाः क्रीडाः क्रियन्ते ।' अशाच अर्थाची गाथा सरस्वतीकण्ठाभरणांत आढळते : अज्ज वि सेअजलोल्लं पव्वाइ ण तीअ हलिअसोण्हाए। फग्गुच्छणचिक्खिल्लं जं तइ दिण्ण थणुच्छङ्गे॥ अलंकाररत्नाकरात विचित्र अलंकाराचें उदाहरण.' विफलः प्रयत्नो विचित्रम्।'

## ३७० अपाङ्ग : 370. Look.

किं ण भणिओ सि, बालअ ! गामणिधूआइ गुरुअणसमक्खम् ।
अणिमिसमीसीसिवलन्तवअणणअणद्धदिट्ठेहिं ॥७०॥

[ किं न भणितोऽसि बालक ग्रामणीपुत्र्या गुरुजनसमक्षम् ।
अनिमिषमीषदीषद्वलद्वदननयनार्धदृष्टैः ॥ ]

बालक, गुरुजनांच्या समक्ष पाटलाच्या मुलीनें मुख जरासें वळवून अर्ध्या मिटल्या दृष्टीनें तुझ्याकडे रोखून पाहिलें. तिच्या त्या नजरेनें काय सांगितलें नाहीं ?

१ पौर्णमास्युत्सव. २ प्रवर्तमान. ३. ईमन्तसवलन्तवयणणयण, अणिमिग-तिरिछदरवलिअवअण, अनिमिसर्सीसुव्वलणरतलंतणअण, वंकवलंतअआणण. ४. स्नुषया ५. अनिमिषशीर्षोद्वर्तनवलनयना, अनिमिषमीषदीषद्वलद्वलन. ६. *तिर्यग्वदनवलित*.

● गुरुजनांसमोर मानही वर करायची नाहीं असा शिष्टाचार असल्या-मुळें ती तुझ्याशीं बोलूं शकली नाहीं. एका दृष्टिक्षेपानेंहि आपलें मनोगत तुला अवगत होईल अशी तिची कल्पना होती. तूं इतका अनभिज्ञ, शुंभ असशील याची विचारीला काय कल्पना ?

## ३७१ नेत्रपल्लवी : 371. Sematology.

णअणब्भन्तरघोलन्तबाहभरमन्थराइ दिट्ठीए ।
पुणरुत्तपेच्छिरीए बालअ ! किं जं ण भणिओ सि ? ॥७१॥

[ नयनाभ्यन्तरघूर्णमानबाष्पभरमन्थरया दृष्ट्या ।
पुनरुक्तप्रेक्षणशीलया बालक किं यन्न भणितोऽसि ॥ ]

बालक, तिच्या डोळ्यांत अश्रु दाटले आहेत व त्यांमुळें तिची नजर जड झाली आहे. सुस्त नजरेनें, पण उत्कण्ठेनें, ती पुनः पुनः तुजकडे पाहत आहे. तिच्या त्या दृष्टीनें काय सांगितलें नाहीं ?

● तुझ्या दर्शनानें तिला इतका आनंद झाला कीं तिच्या नेत्रांत अश्रु दाटले. ओलाव्यानें वस्त्र जड होतें, तशीच दृष्टीही ! तूं तिला हवा होतास, आहेस व असशील, माझा होशिलका ! हा प्रश्न तिच्या नजरेंत भरलेला आहे.

## ३७२ गणपति : 372. Pillow.

जो सीसम्मि विइण्णो मज्झ जुआणेहिँ गणवई आसी ।
तं च्चिअ एह्निं पणमामि, हअजरे ! होहि संतुट्ठा ॥७२॥

[ यः शीर्षे वितीर्णो मम युवभिर्गणपतिरासीत् ।
तमेवेदानीं प्रणमामि हतजरे भव सन्तुष्टा ॥ ]

---

१. स्तोर्ण-छलनया ( 'स्तर्णितन गुमभाषितम्' इति कुलबालदेव ).

२. पटतकर्णो, पटवर्णे, पटकर्णे.

तारुण्यात समवयस्कांशीं क्रीडा करतांना मी गणपतीची मूर्ति उशीसारखी वापरली. आता म्हातारपणीं मी त्याच गणपतीला प्रणाम करतें दुष्ट वार्धक्या, संतुष्ट हो.

● या गाथेची नायिका दमली भागली, देवपूजेला लागली. गणपती-पेक्षां वटयक्ष हाच पाठ अधिक इष्ट वाटतो. तो अधिक हस्तलिखितात आढळतोही. तोच मूळचा पाठ असला पाहिजे. शिवेवरल्या वडाखालीं क्षेत्रपालाच्या मूर्ति असतात आणि तिकडेच असल्या भानगडी चालावयाच्या. अलंकारकौस्तुभात पर्यायाचें उदाहरणः ' एकमनेकमनेकैकस्मिन्क्रमतोऽस्ति स पर्यायः । '

## ३७३ विधुर : 373. Widower.

अन्तोहुत्तं डज्जइ जाआसुण्णे घरे हलिअउत्तो[1]।
उक्खाअणिहाणाइँ व रमिअट्ठाणाइँ पेच्छन्तो ॥७३॥

[ अन्तरभिमुखं[2] दह्यते जायाशून्ये गृहे हालिकपुत्रः ।
उत्खातनिधानानीव रमितस्थानानि पश्यन् ॥ ]

शेतकऱ्याचा मुलगा विधुर झाला होता. पुरलेलें द्रव्य उकरून काढल्यानंतर ती जागा जशी भकास दिसते, त्याप्रमाणें आपल्या जायाशून्य घरांतील पूर्वी विलास केलेल्या जागा पाहतांना तो उदास होतो.

● तो पामर तरी एवढा कष्टी झाला आहे ! तूं स्वतःला रसिकचूडामणि म्हणवितोस पण प्रियेच्या विरहाचें तुला यत्किंचितही दुःख झालें नाहीं, असा तूं निष्ठुर आहेस. गंगाधरानें वेगळाच अर्थ दिला आहे; धर्मपत्नीच्या

१. चिर हलिओ. २. अन्तर्भूतं दह्यते.

वियोगामुळे पामर मनांतल्या मनांत कुढतो आणि तूं ! तुझ्यावर चोरटें प्रेम करणाऱ्या महिलेच्या मृत्यूबद्दल उघड शोक करतोस; हें युक्त नाहीं, कारण यामुळे तुला व तिलाहि कमीपणा येणार आहे, अशी सखीची सूचना.

## ३७४ अशक्य : 374. Impossible.

णिद्दाभङ्गो आवण्डुरत्तणं दीहरा अ णीसासा ।
जाअन्ति जस्स विरहे, तेण समं कीरिसो माणो ? ॥४७॥

[ निद्राभङ्ग आपाण्डुरत्वं दीर्घाश्च निःश्वासाः ।
जायन्ते यस्य विरहे तेन समं कीदृशो मानः ॥ ]

ज्याच्या विरहामुळें निःश्वास दीर्घ होतात, पांडुरता येते व झोंप उडते नाहीं त्याच्यावर रुसून कसें चालेल ?

● मानधारणाची सूचना देणाऱ्या सखीला नायिकेचें उत्तर. किंवा, तूं माझ्यावर रागावलीस ? या प्रश्नाला धीरा नायिकेचें उत्तर.

## ३७५ पुनर्जन्म : 375. Rebirth.

तेण ण मरामि मण्णूहिँ पूरिआ अज्ज, जेण, रे सुहअ ! ।
तोग्गअमणा मरन्ती मा तुज्झ पुणो वि लग्गिस्सम् ॥७५॥

[ तेन न म्रिये मन्युभिः पूरिताद्य येन रे सुभग ।
त्वद्गतमना म्रियमाणा मा तव पुनरपि लगिष्यामि ॥ ]

सुभग, तुझ्या अंतरामुळें माझ्या मनांत राग धुमसत आहे, तरीही मी जीव धरून राहिलें आहे; कारण मनांत तुझ्याविषयींचे

१. लग्गिस्सं.

विचार असतांना मरण आलें तर पुढल्या जन्मींही तूंच नशीबीं येशील अशी मला खात्री वाटत आहे.

● 'मरणे या मतिः सा गतिः ।' हे उद्गार प्रणयरोषाचे आहेत. मी इतकी कष्टी झालेली आहे तरी अनुनयानें प्रसन्न होण्यास राजी आहे; जन्मजन्मांतरीं तूंच लाभावास अशीच माझी अंतर्यामींची इच्छा आहे.

## ३७६ उपरोध : 376. Tolerance.

अवरज्झसु वीसद्धं[1] ! सव्वं ते सुहअ विसहिमो अम्हे ।
गुणणिब्भरम्मि हिअए पत्तिअ[2] ! दोसा ण माअन्ति ॥७६॥

[ अपराध्यस्व विस्रब्धं सर्वं ते सुभग विषहामहे वयम् ।
गुणनिर्भरे हृदये प्रतीहि दोषा न मान्ति ॥ ]

सुभग, तूं निःशंकपणें अपराध करीत रहा; आम्ही सर्व कांहीं निमूटपणें सहन करूं शकतों. तुझ्या गुणांमुळें आमचें हृदय भरलेलें असल्यामुळें त्यांत तुझ्या दोषांना जागाच नाहीं.

● परस्त्रियाविषयीं आसक्त आणि स्वस्त्रियाविषयीं उदासीन असणाऱ्या पतीप्रत क्रुद्ध पत्नीचे उद्गार.

## ३७७ पाझर : 377. Grief.

भरिउच्चरन्तपसरिअपिअसंभरणपिसुणो वराईए ।
परिवाहो विअ दुक्खस्स वहइ णअणट्ठिओ वाहो ॥७७॥

[ भृतोच्चरत्प्रसृतप्रियसंस्मरणपिशुनो वराक्याः ।
परीवाह इव दुःखस्य वहति नयनस्थितो बाष्पः । ]

१. विसत्थं. २. जाणसु. ३. विश्वस्त. ४. जानीहि. ५ भरिओचरन्त, भरिउद्धरन्त ६. भृतोच्चरन्, भरितोद्धरन्, भृतोद्भ्रियमाणा, भृतोच्छलन् ७. सूचको. ८. परीवाहमिव

विचारीचें हृदय प्रियकराच्या आठवणींनीं भरून आलें आहे तिच्या डोळ्यातून वाहणारे अश्रु पाहिले म्हणजे वाटतें की तिचें विरहदुःखच तिच्या नेत्रातून ओघळत आहे.

● तिची प्रीति अथांग, तिच्या दुःखाचे आवर्तही अपरिमित हृदयातून ओसंडणाऱ्या आठवणी अश्रूंच्या रूपानें ओघळत आहेत

## ३७८ अनुकरण : 378 Imitation.

जं जं करेसि, जं जं जंपसि, जह तुम णिअच्छेसि ।
तं तमणुसिक्खिरीए दीहो दिअहो ण संपडइ ॥७८॥

[ यद्यत्करोषि यद्यज्जल्पसि यथा त्वं निरीक्षसे ।
तत्तदनुशिक्षणशीलाया दीर्घो दिवसो न संपद्यते ॥ ]

जसें पाहतोस, बोलतोस व वागतोस तसें तसें पाहणें, बोलणें व वागणं शिकण्याचा ती प्रयत्न करीत आहे. यासाठीं दिवस दीर्घ आहे, तरी तो तिला पुरत नाहीं

● ती तुझें अनुकरण इतकें करते कीं जणू स्वत चें जीवन जगतच नाही त्वन्मयतेच्या तन्मयतेत तिचे दिवस व्यतीत होत आहेत. नियतन-चेष्टानुकृतिर्लीला.

## ३७९ अनुमत : 379 Love on the Haystack.

भण्डन्तीअ तणाइं सोत्तुं दिण्णाइँ जाइँ पहिअस्स ।
ताइं चेअ पहोए अज्जा आअड्ढइ रुअन्ती ॥७९॥

१ नियमयसि निर्ध्यायसि २. तत्तदनुशिक्षणशीलाया ३ संपद्यते ४ गमायन, स्वपिति ५ प्रहात ६ आअड्ढ आअड्ढ आअड्ढद

[ भर्त्सयन्त्या तृणानि स्वतु दत्तानि यानि पथिकस्य ।
तान्येव प्रभाते आर्या आकर्षति रुदती ॥ ]

पथिकाबद्दलचा तिरस्कार व्यक्त करण्यासाठीं आर्येनें त्याला झोंपण्या-करितां गवताच्या पेंढ्या दिल्या; आणि पहाटेस रडत रडत (त्याचे गुण आठवून) ती तेंच गवत कुरवाळूं लागली.

● गवताच्या स्पर्शानें जणूं त्याच्या अंगस्पर्शाचें श्रेय तिनें पुनः पुनः मिळविलें.

## ३८० सत्पुरुषलक्षण : 380. Imperterbable.

वसणम्मि अणुव्विग्गा, विहवम्मि अगव्विआ, भए धीरा।
होन्ति अहिण्णसहावा समेसु विसमेसु सप्पुरिसा ॥८०॥

[ व्यसनेऽनुद्विग्ना विभवेऽगर्विता भये धीराः ।
भवन्त्यभिन्नस्वभावाः समेषु विषमेषु सत्पुरुषाः ॥ ]

सत्पुरुष दुर्दैवाच्या फेऱ्यात उद्विग्न होत नाहींत, वैभवप्राप्तीमुळें गर्विष्ठ होत नाहींत; संकटात धीरानें वागतात; परिस्थिति अनुकूल असो अगर प्रतिकूल असो, तीमुळें त्यांच्या स्वभावांत बदल होत नाहीं.

## ३८१ सहसंवेदना : 381. Provocation.

अज्ज सहि ! केण गोसे कं पि मणे वल्लहं भरन्तेण ।
अम्हं मअणसराहअहिअअव्वणफोडनं गीअम् ॥८१॥

१. असती, तरुणी, वनिता, ईश्वरसुता, वरतनू २. वैभवे ३. धैर्यान्विताः
४. म्हरतेण

[ अद्य सखि केन प्रातः कामपि मन्ये वल्लभां स्मरता ।
अस्माकं मदनशराहतहृदयव्रणस्फोटनं गीतम् ॥ ]

आज पहाटे कोणी तरी आपल्या वल्लभेची आठवण काढून प्रेमगीत गात होता. सखि, मदनबाणाच्या आघातानें माझ्या हृदयाला झालेली जखम त्या गीताच्या आघातानें पुन्हा उकलली.

● तें विरहगीत असलें तर त्याच्या करुणस्वरानीं आणि तें प्रेमपूर्तीचें आनंदगीत असलें तर त्यातील मधुरस्वरानीं तिला स्वत:चें विरहदु:ख विशेष जाणवलें. पीतांबर सांगतो, प्रभातकाळीं ब्राह्म मुहूर्तावर ज्ञानी जनानीं सुखदु:खाची आठवण काढू नये, फक्त धर्माचें स्मरण करावें, असा या गाथेचा निष्कर्ष आहे.

## ३८२ विषण्ण : 382 Dejection.

उद्धुन्तमहारम्भे थणए दट्ठूण मुद्धवहुआए ।
ओसंण्णकवोलाए णीससिअं पढमघरिणीए ॥८२॥

[ उत्तिष्ठन्महारम्भौ स्तनौ दृष्ट्वा मुग्धवध्वाः ।
अवसन्नकपोलया निःश्वसितं प्रथमगृहिण्या ॥ ]

आरंभींच उठावदार असणारे नववधूचे स्तन पाहून खोल गाल गेलेल्या प्रथम गृहिणीनें निःश्वास सोडला.

● पतितस्तनी व्यतीतयौवना प्रथमपत्नी नववधूचें सौंदर्य पाहून बावरली. तिला वाटलें, मुग्धावस्थेंत एवढें सौंदर्य, प्रौढावस्थेंत तें आणखी वृद्धिंगत होणार, यापुढें आपण केवळ गृहिणी राहणार! पीतांबर सांगतो, इतराच्या उत्कर्षाचा हेवा करू नये हा धर्म, शत्रूचें रक्षण करू नये ही नीति व संसार दुर्गमय असतो ही युक्ति!

१. ओसिण्ण २ शुष्क.

## ३८३ उद्विग्न : 383. Anxiety.

गरुअछुआउलिअस्स वि वल्लहकरिणीमुहं भरन्तस्स ।
मरसो मुणालकवलो गअस्स हत्थे च्चिअ मिलाणो ॥८३॥

[ गुरुक्षुधाकुलितस्यापि वल्लभकरिणीमुखं स्मरतः ।
सरसो मृणालकवलो गजस्य हस्त एव म्लानः ॥ ]

हत्ती भुकेनें अत्यंत व्याकुळ झाला होता. कमळाच्या देंठाचा सरस घास त्यानें सोंडेंत घेतला, तोंच त्याला हत्तिणीच्या मुखाची आठवण झाली व तो घास तेथेंच सुकून गेला.

● मन्दस्नेह नायकाला अनुकूल करण्यासाठीं दूतीनें दिलेला दृष्टान्त.

## ३८४ सवाल जबाब : 384 Duet.

पसिअ पिए ! का कुविआ? सुअणु ! तुमं, परअणम्मि को कोवो?।
को हु परो ! नाथ ! तुमं, कीस अपुण्णाण मे सत्ती ! ॥८४॥

[ प्रसीद प्रिये का कुपिता सुतनु त्वं परजने[3] कः कोपः ।
कः खलु परो नाथ त्वं किमित्यपुण्यानां मे शक्तिः ॥ ]

प्रिये, प्रसन्न हो. पण रागावलें आहे कोण ! सुतनु, तू ! परक्यावर कोण रागावेल ! मी परका का ! तूं माझा नाथ ! हा माझ्याच पापाचा प्रभाव !

● धीरा नायिका. तिचा राग एवढा प्रेमळ तर अनुराग किती सरस असेल ! अलंकाररत्नाकरात नियमाचें उदाहरण : ‘ अन्यनिषेधार्थोऽपि विधिर्नियम । ’

१ खुहा २ म्हरन्तस्स, सुमरन्तस्स ३ परिजने

## ३८५ वासकसज्जा : 385. Expectant.

एहिसि तुमं त्ति णिमिसं व जग्गिअं जामिणीअ पढमद्धम् ।
सेसं संतावपरव्वसाइ वेरिसं व वोलीणम् ॥८५॥

[ एष्यसि त्वमिति निमिषमिव जागरितं यामिन्याः प्रथमार्धम् ।
शेषं संतापपरवशाया वर्षमिव व्यतिक्रान्तम् ॥

तूं येशील अशी आशा होती तोंवर रात्रीचा प्रथमार्ध संपला; तूं येत नाहींस असें दिसून आल्यानंतर ती संतापानें देहभान विसरली व राहिलेली रात्र तिला वर्षासारखी वाटली.

● पहाटे नायक चोरपावलांनीं घरीं आला व चौकशी करूं लागला, वादळ शांत झालें कीं नाहीं, तेव्हां नायिकेच्या सखीनें केलेलें निवेदन. 'प्रीतरंगासारिखा रंग नाहीं। मनभंगासारिखा भंग नाहीं॥' (लावणीसंग्रह: क्र. १०). पीतावर सांगतो, पश्चात्तापाचा प्रसंग येईल असें कर्म करूं नये, हा धर्म; सुखांत गेलेल्या काळाचें मनुष्याला भान राहात नाहीं, ही नीति; आणि अवस्था-भेदामुळें एकच वस्तु सुखकर किंवा दुःखकर वाटावी अशी संसाराची गति अनित्य व विचित्र असल्यामुळें मनुष्यानें सुखदुःखाविषयीं उदासीन रहावें, ही युक्ति ।

## ३८६ उन्माद : 386. Intoxication.

अवलम्बह ! मा सङ्कह ! ण इमा गहलङ्घिआ परिब्भमइ ।
अत्थक्कगज्जिउब्भन्तहित्थहिअआ पहिअजाआ ॥८६॥

[ अवलम्बध्वं मा शङ्कध्वं नेयं ग्रहलङ्घिता परिभ्रमति ।
आकस्मिकगर्जितोद्भ्रान्तत्रस्तहृदया पथिकजाया ॥ ]

१ एष्य २ कम्मं ३ अद्धयं, अणाइ, अंछए, अप्पोछ ४ मुण्णाइअआ. ५ अगर्जित, अकस्मात्.

## ३८३ उद्विग्न : 383. Anxiety.

गरुअछुआउलिअस्स वि वल्लहकरिणीमुहं भरन्तस्स ।
सरसो मुणालकवलो गअस्स हत्थे च्चिअ मिलाणो ॥८३॥

[ गुरुकक्षुधाकुलितस्यापि वल्लभकरिणीमुखं स्मरतः ।
सरसो मृणालकवलो गजस्य हस्त एव म्लानः ॥ ]

हत्ती भुकेनें अत्यंत व्याकुळ झाला होता. कमळाच्या देंठांचा सरस घांस त्यानें सोंडेंत घेतला, तोंच त्याला हत्तिणीच्या मुखाची आठवण झाली व तो घांस तेथेंच सुकून गेला.

● मन्दस्नेह नायकाला अनुकूल करण्यासाठीं दूतीनें दिलेला दृष्टान्त.

## ३८४ सवाल-जबाब : 384 Duet.

पसिअ पिए ! का कुविआ? सुअणु ! तुमं, परअणम्मि को कोवो?।
को हु परो ! नाथ ! तुमं, कीस अपुण्णाण मे सत्ती ! ॥८४॥

[ प्रसीद प्रिये का कुपिता सुतनु त्वं परजने कः कोपः ।
कः खलु परो नाथ त्वं किमित्यपुण्यानां मे शक्तिः ॥ ]

प्रिये, प्रसन्न हो. पण रागावलें आहे कोण ! सुतनु, तूं ! परक्यावर कोण रागावेल ! मी परका का ! तूं माझा नाथ ! हा माझ्याच पापाचा प्रभाव !

● धीरा नायिका. तिचा राग एवढा प्रेमळ तर अनुराग किती सरस असेल ! अलंकाररत्नाकरात नियमाचें उदाहरण : 'अन्यनिषेधार्थोऽपि विधिर्नियमः ।'

१. छुहा. २. म्हरन्तस्स, सुमरन्तस्स. ३. परिजने.

## ३८५ वासकसज्जा : 385. Expectant.

एहिसि तुमं त्ति णिमिसं व जग्गिअं जामिणीअ पढमद्धम् ।
सेसं संतावपरव्वसाइ वैरिसं व वोलीणम् ॥८५॥

[ एष्यसि त्वमिति निमिषमिव जागरितं यामिन्याः प्रथमार्धम् ।
शेषं संतापपरवशाया वर्षमिव व्यतिक्रान्तम् ॥

तूं येशील अशी आशा होती तोंवर रात्रीचा प्रथमार्ध सपला; तूं येत नाहींस असें दिसून आल्यानंतर ती संतापानें देहभान विसरली व राहिलेली रात्र तिला वर्षासारखी वाटली.

● पहाटे नायक चोरपावलांनी घरीं आला व चौकशी करूं लागला, याद्ळ शांत झालें कीं नाहीं, तेव्हा नायिकेच्या सखीनें केलेलें निवेदन. 'प्रीतरंगासारिखा रंग नाहीं। मनमगासारिखा मग नाहीं॥' (लावणीसंग्रह: क्र. ९०). पीतावर वागतो, पश्चात्तापाचा प्रसंग येईल असें कर्म करूं नये, हा धर्म; सुखांत गेलेल्या काळाचें मनुष्याला भान राहात नाहीं, ही नीति; आणि अवस्था-भेदामुळें एकच वस्तु सुखकर किंवा दु:खकर वाटावी अशी संसाराची गति अनित्य व विचित्र असल्यामुळें मनुष्यानें सुखदु:खाविषयीं उदासीन रहावें, ही युक्ति!

## ३८६ उन्माद : 386. Intoxication.

अवलम्बह ! मा सङ्कह ! ण इमा गहलङ्घिआ परिब्भमइ ।
अत्थक्कगज्जिउब्भन्तहित्थहिअआ पहिअजाआ ॥८६॥

[ अवलम्बध्वं मा शङ्कध्वं नेयं ग्रहलङ्घिता परिभ्रमति ।
आकस्मिकगर्जितोद्भ्रान्तत्रस्तहृदया पथिकजाया ॥ ]

१ कण = कम्प २ अट्ठध, अणर, अउव, अगह ४ गुम्मादिअआ.
५ अर्णवेन, अकम्मर.

तिचा पति प्रवासाला गेला आहे. एकाएकीं मेघगर्जना झाल्यामुळें तिचें हृदय त्रस्त झालें आहे व गोंधळून गेल्यामुळें ती घर सोडून भटकत आहे. तिला ग्रहबाधा झालेली नाहीं. भिऊं नको, पुढें हो व तिला धर.

● भुताटकीनें पछाडल्यासारखी ती बेफाम झालेली आहे, पण ही भूतबाधा नाहीं किंवा ग्रहबाधाही नाहीं; हा कामोन्माद आहे. तिला आवरून धर आणि ती गोंधळलेल्या स्थितींत आहे तोंवर जमव. पण पीतांबर सांगतो, मुमुक्षूंनीं दीनावर दया करावी ही युक्ति !

## ३८७ पृथ्वीप्रदक्षिणा : 387. Around the World.

**केसरंरअविच्छेड्डे मअरन्दो होइ जेत्तिओ कमले ।**
**जइ भमर ! तेन्तिओ अण्णहिं पि, ता सोहसि भमन्तो ॥८॥**

**[ केसररजःसमूहे मकरन्दो भवति यावान्कमले ।**
**यदि भ्रमर तावानन्यत्रापि तदा शोभसे भ्रमन् ॥ ]**

हे भ्रमर, कमलाच्या केसरांवरील परागांच्या समूहांत प्राप्त होतो तेवढा मकरन्द दुसरीकडे मिळणार असेल तरच तुझ्या इतरत्र हिंडण्यांत शोभा.

● मधुकर कमलाभोंवतीं भ्रमण करतो, कारण तेवढा मकरन्द इतरत्र नसतो. भ्रमर रसिक असतो म्हणूनच भ्रमणशील असतो. लंपट नायकाला नायिकेची सखी सांगते, अशी गुणी स्त्री दुर्लभ; तुला गुणांची पारख नाहीं, म्हणूनच तुला भ्रमणात स्वारस्य वाटतें. पीतांबर सांगतो, अधिक फलप्राप्तीसाठीं कर्म करीत राहणें हा धर्म, अधिक लाभाच्या निश्चितीशिवाय प्रचलित स्थितीचा त्याग करूं नये ही नीति !

---

१. रअम्मि. २. विछड्ड, विछडे. ३. भमर होइ तेन्तिओ. ४. तेत्तिअं चिअ अण्णे कुसुमे. ५. रजोविस्तृते. ६. तावानन्यस्मिन्.

## ३८८ चंद्र चवथिचा : 388 Churning of the Ocean.

पेच्छन्ति अणिमिसच्छा पहिआ हलिअस्स पिट्ठपण्डुरिअम्।
धूअं दुद्धसमुद्दुत्तरन्तलच्छि विअ सअह्णा ॥८८॥

[ प्रेक्षन्तेऽनिमिषाक्षाः पथिका हलिकस्य पिष्टपाण्डुरिताम्।
दुहितरं दुग्धसमुद्रोत्तरलक्ष्मीमिव सतृष्णाः ॥ ]

दळतांना अंगावर पीठ उडाल्यामुळें शेतकऱ्याच्या मुलीच्या शरीरावर पाण्डुरता आलेली आहे. दुग्धसमुद्रांतून निघणाऱ्या लक्ष्मीकडे देवांनीं पाहिलें असेल त्याप्रमाणें वाटसरू हिच्याकडे अनिमिष व सतृष्ण दृष्टीनें पाहत आहेत.

● सौंदर्यसंवर्धनासाठीं दुग्धस्नानाची योजना वाटते तेवढी आधुनिक नाहीं. देवाचे नेत्र मिटत नाहींत असा संकेत आहे. हिचें सौंदर्य पाहून वाटसरू चकित झाले, नेत्रांच्या अनिमिषतेमुळें जणू देवत्व पावले. ' किमिवहि मधुराणा मण्डनं नाकृतीनाम् । '

## ३८९ सहानुभूति : 389. Sympthy

कस्स भरिसि ? त्ति भणिए, को मे अत्थि ? त्ति जम्पमाणाए।
उव्विग्गरोइरीए अम्हे वि रुआविआ तीए ॥८९॥

[ कस्य स्मरसीति भाणिते को मेऽस्तीति जल्पमानया।
उद्विग्नरोदनशीलया वयमपि रोदितास्तया ॥ ]

तूं कोणाची आठवण करीत आहेस असें विचारलें तेव्हां ती उद्विग्न होऊन म्हणाली, मला आठवण करायला आहे तरी कोण ? एवढें बोलून ती रडू लागली. मग आम्हांलाही रडायला आलें.

---

१ जोच्छामि २. पुट्टि ३. पासुरिअ ४. घराओ. ५. म्हरिसि. ६. उव्विण्ण.

● पीतांबर सांगतोः परदुःखानें दुःखित होणें हा धर्म, ज्याचे अंतःकरणात आपल्याविषयीं स्नेह नसेल त्याचेजवळ आपलीं सुखदुःखें प्रकट करू नयेत, ही नीति; आणि ज्याचे अंतःकरणांत करुणा असते तेच मुक्तीचे अधिकारी होतात ही युक्ति.

## ३९० सांभाळ ग ! 390. Beware !

पाअपडिअं अहव्वे ! किं दाणिं ण उट्ठवेमि भत्तारम्[१] ।
एअं विअ अवसाणं दूरं पि गअस्स पेम्मस्स ॥९०॥

[ पादपतितमभव्ये किमिदानीं नोत्थापयसि भर्तारम् ।
एतदेवावसानं दूरमपि गतस्य प्रेम्णः ॥ ]

दुर्दैवी स्त्रिये, भ्रतार तुझ्या पायां पडत आहे, त्याला उत्थापन का देत नाहींस ! सांभाळ, प्रेमाचीं मुळें कितीही खोल व दूरवर गेलेलीं असलीं तरी अशा वर्तनामुळें त्याचा नाशच होईल.

● अनभिज्ञे[२], अनुनयाचें ग्रहण केलें नाहींस तर त्याचें रूपान्तर द्वेषांत होईल. पीतांबर सांगतो, शरण आलेल्या अपराध्यावर क्रोध करू नयें हां धर्म.

## ३९१ बेडकी : 391. Frog

तडविणिहिअग्गहत्था वारितरङ्गेहिँ घोलिरणिअम्बा ।
सालूरी पडिबिम्बे पुरिसाअन्तिव्व पडिहाइ ॥९१॥

[ तटविनिहिताग्रहस्ता वारितरङ्गैर्घूर्णनशीलनितम्बा ।
शालूरी प्रतिबिम्बे पुरुषायमाणेव प्रतिभाति ॥ ]

---

१ भट्टारम् २ अनभिज्ञे

सरोवराच्या तीराजवळ बेडकी मंजे टेकून बसली आहे. हलत्या पाण्यावरील तरंगामुळें ती जणू आपल्या प्रतिबिंबाशीं पुरुषायित करीत आहे असे वाटतें.

● सरोवराचे तीरावरील संकेतस्थानीं नायिकेला प्रोत्साहित करण्यासाठीं दूती हें दृश्य साभिनय दाखवीत आहे. अमरुशतकांतील वचन पहा : ललितमुरसा तरन्ती तरलतरङ्गौघचालितनितम्बा । विपरीतरतासक्तेव दृश्यते सरसि सा सख्या ॥ ११ ॥ धृत्र प्रत : श्लोकांतरपूर्ति.

## ३९२ आडोसा : 392. Tutor.

सिक्करिअमणिअमुहवेविआइँ धुअहत्थसिञ्जिअव्वाइं ।
सिक्खन्तु वोडहीओ[1] कुसुम्भ ! तुम्ह प्पसाएण ॥९२॥
[ सीत्कृतमणितमुखवेपितानि धुतहस्तशिञ्जितव्यानि ।
शिक्षन्तु कुमार्य[2] कुसुम्भ युष्मत्प्रसादेन ॥ ]

कुसुम्भ वृक्षा, सीत्कार, मणित, मुखवेप, हस्तकंप आणि नूपुराचें व कंकणाचें शिञ्जित या प्रेमक्रीडा कुमारिकांना तुझ्या कृपेमुळें समजल्या.

● कुसुम्भाला काटे असतात; म्हणून ज्यांना एकान्त हवा असतो त्याशिवाय दुसरे कोणी त्याच्या आश्रयाला जात नाहींत. त्याच्या सह-वासामुळें सीत्कार, मणित, मुखवेपित, शिञ्जित वगैरे विलास त्याच्या नेहमींच्या परिचयाचे होते नायिका एकटीच तेथें गेली तेव्हा कुसुम्भ इतरांपासून जें शिकला होता तेंच त्यानें तिला शिकविलें : काटा बोंचला कीं सीत्कार, काटेरी फांदी आडवी येऊं नये म्हणून मुखवेप व चीत्कार, फांद्या आजु-बाजूला करतांना हस्तकंप आणि शिञ्जित, आणि या हालचाली होत

१ वोडहि, दुहिओ, वोठ्ठहि, वोड्डाहिओ २ क्खिमुमहि. ३ चोन्कार. ४ पामर्य

असताना मणित. नायिका सांगते, मला हें सारें कुसुम्भानें शिकविलें, अनुभवानें नव्हे ! पीतांबर सांगतो, या गाथेची नायिका ग्राम्य स्त्री असून कुसुम्भस्तुतीच्या निमित्तानें ती विदग्धनायकाची स्तुति करीत आहे.

## ३९३ ढुसणी : 393. Bump.

जेत्तिअमेत्ता रच्छा णिअम्ब ! कह तेत्तिओ ण जाओ सि ? ।
जं छिप्पइ गुरुअणलज्जिओ सरन्तो वि सो सुहओ ॥९३॥

[ यावत्प्रमाणा रथ्या नितम्ब कथं तावन्न जातोऽसि ।
येन स्पृश्यते गुरुजनलज्जापसृतोऽपि स सुभगः ॥ ]

नितंबांनो, तुम्हीं रस्त्याच्या रुंदीच्या प्रमाणानुसार विस्तृत कां झाले नाहीं ? तसे झालां असतां तर वडील माणसांच्या सान्निध्यामुळें संकोच वाटल्यानें मुद्दाम दुरून जाणाऱ्या प्रियकराला मला सहज स्पर्श करतां आला असता !

● हाताला हात लागला तर पाहणारांना नसता संशय यावयाचा; म्हणून काय बिचाऱ्या प्रियकरावर हा प्रयोग करावयाचा ? पीतांबर सांगतो, ज्यांचे चित्त कामानें व्याकुल असतें ते अचेतन वस्तूंनाहि प्रार्थना करतात. जणूं ती अरुंद होण्याबद्दल रस्त्याची प्रार्थना करीत आहे ! गुरुजनासमक्ष स्त्रियांशीं बोलणेंहि निषिद्ध होतें, आहे.

## ३९४ अप्राप्य : 394. Peacock.

मरगअसूईविद्धं व मोत्तिअं पिअइ आअअग्गीओ ।
मोरो पाउसआले तणग्गलग्गं उअअबिन्दुम् ॥९४॥

---

१. जेण छिवज्जइ गुरुअणलज्जोसरिओ. २. यावन्मात्रा.

[ मरकतसूचीविद्धमिव मौक्तिकं पिबत्यायतग्रीवः ।
मयूरः प्रावृट्काले तृणाग्रलग्नमुदकबिन्दुम् ॥ ]

पावसाळ्यांत गवताच्या टोकावर लटकणारा व पाचूच्या सुईनें विद्ध झालेल्या मोत्याप्रमाणें दिसणारा पावसाचा थेंब–पाण्याचा थेंब, मोर मान उंच करून चोंचीनें टिपून घेत आहे.

● नायिका अप्राप्य आहे अशी सूचना; किंवा तृणलतागृहात संकेत.

## ३९५ चंद्रकोर : 395. Crescent Moon.

अज्जाइ णीलकञ्चुअभरिउव्वरिअं विहाइ थणवट्टम्[2] ।
जलभरिअजलहरन्तरदरुग्गअं चन्दबिम्ब व्व ॥९५॥

[ आर्याया नीलकञ्चुकभृतोर्वरितं[3] विभाति स्तनपृष्ठम् ।
जलभृतजलधरान्तर[4]दरोद्गतं चंद्रबिंबमिव ॥ ]

पाण्यानें दाटलेल्या काळ्याभोर मेघांतून थोडेंसें बाहेर पडलेलें चंद्रबिंब शोभतें; त्याचप्रमाणें आर्येच्या नील कञ्चुकींतून थोडासा बाहेर डाकावणारा स्तनभाग शोभतो.

● कविसंकेतानुसार कृष्णपक्षाभिसारिकेनें कृष्ण वा नील वस्त्रें परिधान करावयाचीं असतात नील वस्त्रें धारण करून ही अभिसाराला सज्ज होत आहे. उतावीळ होऊं नको, आज रात्रीं संकेत ठरविला आहे, असें नायकाला दूतीचें आश्वासन. ढगानीं नभ व्यापलें तरी वाऱ्याच्या झुळुकीनें केव्हा केव्हा चंद्रकोर दिसतेच, मग पदर व कञ्चुकी याच्या बाबतींत तरी वाऱ्यानें दुजाभाव का ठेवावा ? अलंकारकौस्तुभांत बिंबप्रतिबिंबभावाचें उदाहरणः 'कञ्चुकाशे नीलत्वं शब्दोपात्तम्। जलधरांशे तु जलभरित्वगम्यं इति बिम्बप्रतिबिम्बभावविशेषणतया वस्तुप्रतिवस्तुभावः।'

१. भरिउब्बरिअं. २. पट्ट. ३. भृतोद्धृतं, भृतोद्ध्रियमाण, भृतोर्ध्वचलितं.
४ जलधरान्तरादीषदुत्तं, जलधरान्तर्गत.

## ३९६ राजद्रोह : 396. Treason.

राअविरुद्धं व कहं पहिओ पहिअस्स साहेइ ससङ्कम् ।
जत्तो अम्बाण दलं तत्तो दराणिग्गअं किं पि ॥ ९६ ॥

[ राजविरुद्धामपि कथां पथिकः पथिकस्य कथयति सशङ्कम् ।
यत आम्राणां दलं तत ईषन्निर्गतं किमपि ॥ ]

आंब्याचीं कोंवळीं पानें डोकावूं लागलीं; ही बातमी एक वाटसरू दुसऱ्याला अशी भीत भीत सांगतो कीं जणूं ते राजद्रोहाच्या गोष्टी कुजबुजत आहेत.

● आम्राङ्कुराच्या दर्शनानें मन्मथोन्माद येतो, म्हणून विरही जन त्याकडे पहावयाचें टाळतात; पाहिलें तर न पाहिल्यासें करतात; पाहिलें तर पाहिलें असें स्पष्टपणें सांगत नाहींत. राजद्रोहाचे बाबतींत कटवालेहि एकमेकांशीं अशाच साशङ्क वृत्तीनें वागतात. नायिका सांगते, ऋतुराज वसंत आला, त्याच्या प्रेरणेशीं द्रोह करूं नको, प्रवासानें रेंगाळूं नको.

## ३९७ स्वप्नसुख : 397. Dreamland.

धण्णा ता महिलाओ जा दइअं सिविणए वि पेच्छन्ति ।
णिद्द च्चिअ तेण विणा ण एइ के पेच्छए सिविणम् ॥९७॥

[ धन्यास्ता महिला या दयितं स्वप्नेऽपि प्रेक्षन्ते ।
निद्रैव तेन विना नैति का प्रेक्षते स्वप्नम् ॥ ]

ज्यांना स्वप्नांत तरी प्रियकराचें दर्शन होतें त्या स्त्रिया धन्य होत. जिला विरहामुळें झोंपच येत नाहीं तिला स्वप्न तरी कसें पडणार ?

१ कहइ २ शसति

● व्यतिरेकालङ्कार–ध्वनि, विप्रलम्भ–ध्वनि पीतांबर म्हणतो, प्रोषितपतिकेनें दिवसा झोपू नये, हा धर्म !

## ३९८ तालवृन्त : 398 Sprout

परिरंद्धरुणअकुण्डलगण्डत्थलमणहरेसु सेवणेसु ।
अण्णअसमअप्तसेण अ पहिरज्जइ तालवेण्टजुअम् ।।९८।।
[ परिरंध्यकनककुण्डलगण्डस्थलमनोहरयो श्रवणयो ।
अन्यसमयदर्शेन च परिध्रियते तालवृन्तयुगम् ॥ ]

काळ बदलला गालाना स्पर्श करणाऱ्या सुवर्णकुण्डलानीं ज्याना शोभा येत होती त्या तिच्या कानावर आता तालवृक्षाचे कोंवळे कोंब ठेवले जातात

● दूती सागत, नायिकेची वेषभूषा ग्रामीण असली तरी ती लावण्य वती आहे तू गरीब आहेस, म्हणून सकोच करू नको, तीहि गरीबच आहे

## ३९० दुपारी चादणे : 399 Moon at Noon

मज्झह्णपत्थिअस्स वि गिम्हे पहिअस्स हरइ संतावम् ।
हिअअट्ठिअजाआमुहमअङ्कजोह्लाजलप्पवहो ।।९९।।
[ मध्याह्नप्रस्थितस्यापि ग्रीष्मे पथिकस्य हरति सतापम् ।
हृदयस्थितजायामुखमृगाङ्कज्योत्स्नाजलप्रवाह ॥ ]

उन्हाळ्यात भर दुपारी प्रवासाला उन्हापासून त्रास होता हें खरें, पण त्याच्या हृदयात अहर्निश असलल्या पत्नीच्या मुखचद्रापासून झरणाऱ्या चादण्याच्या शीतल प्रवाहामुळें आतपाचा ताप नाहींसा होतो

१ परिहरिअ २ वण्णसु ३ पारहिज्जइ ४ परिहरस्व ५ परिधीयते ६ मज्झण्णे मयण ७ हरित ८ हृदयेप्सित

● या कडक उन्हांतून बचावून माझे पति घरीं सुखरूप कसे येतील, अशी काळजी करणाऱ्या विरहिणीला दूतीचें आश्वासन.

## ४०० अवेळ तरिही : 400 Inopportune.

मण ! को ण रूसइ जणो पत्थिज्जन्तो अएसकालम्मि ।
रतिवा[२]अडा रुअन्तं पिअं वि पुत्तं सवइ माआ ॥१००॥

[ भण को न रुष्यति जनः प्रार्थ्यमानोऽदेशकाले ।
रतिव्यापृता रुदन्तं प्रियमपि पुत्रं शपते माता ॥ ]

अयोग्य वेळीं किंवा स्थळीं प्रार्थना केली तरी रागच येणार, नाहीं का ? ऐन रंगांत असताना लाडकें पोर रडूं लागलें तर आई त्याला शापच देणार.

● ती तुझ्यावर अनुरक्त आहे हें खरें; पण येथें किंवा या वेळीं कसें जमणार ? आताच मनधरणीची खटपट केलीस तर अनुरागभङ्ग मात्र होईल.

● ● ●

एत्थ चउत्थं विरमइ गाहाणं सअं सहावरमणिज्जं ।
सोउण जं ण लग्गइ हिअए महुरत्तणेण अमिअं पि ॥

[ अत्र चतुर्थं विरमति गाथानां शतं स्वभावरमणीयम् ।
श्रुत्वा यत्र लगति हृदये मधुरत्वेनामृतमपि ॥ ]

या ठिकाणीं गाथांचें रम्य असें चवथें शतक संपतें. हें इतकें मधुर आहे कीं तें ऐकल्यानंतर अमृतालाही हृदयात प्रवेश मिळत नाही.

● ● ●

---

१ आलम्म २ वावडा, वावुडा, वाउला.

## ४०१ सद्भाव : 401. Amiability.

डज्झमि, डज्झसु ! कुट्ठसि[1] कुट्ठसु! अह फुडेसि,हिअअ! ता फुडसु ।
तह वि परिसेसिओ[3] च्चिअ सोहु मए गलिअसब्भावो ॥ १ ॥

[ दह्यसे दह्यस्व कथ्यसे कथ्यस्व अथ स्फुटसि हृदय तत्स्फुट ।
तथापि परिशेषित एव स खलु मया गलितसद्भावः ॥ ]

हृदया, तुला आतल्या आत आणखी किती जळावयाचें आहे ? दु:खाचे आणखी किती कढ यावयाचे आहेत ? तुला फुटायचें का आहे ? जळ, कढ, फूट; आता सारें काहीं संपलें आहे. दर्ळू पाहणारा सद्भाव मात्र मी अजून टिकवला आहे.

● दाह, क्वाथ व स्फोट याची क्रमिकत्वानुसार योजना. विरहार्ता नायिका; प्रियकराकडून अवहेलना सहन करावी, पण धूर्तांच्या मनधरणीला बळी पडू नये. आक्षेपालङ्कार.

## ४०२ भोण्डी : 402. Wild Boar.

दट्ठुण रुंन्दतुण्डग्गणिग्गअं णिअसुअस्स दाढग्गम् ।
भोण्डी विणावि कज्जेण गामणिअडे जवे चरइ ॥ २ ॥

[ दृष्ट्वा विशालतुण्डाग्रनिर्गतं निजसुतस्य दंष्ट्राग्रम् ।
सूकरी विनापि कार्येण ग्रामनिकटे यवांश्चरति ॥ ]

१ कड्ढसि कड्ढसु, कट्ठसि कट्ठसु, कत्थसि कत्थसु २. फुट्टसि. ३. फुट्ट. ४. परिसेसिअव्वो. ५. कुथ्यसे कुत्थस्व, ६. तुण्डतुण्डग्ग. ७. तोण्ड. ८. तुण्डतुण्डाग्र. बृहत्तुण्डाग्र

पिलाच्या तोंडातून निघालेलें दाताचें टोक पाहून रानडुकरी निर्भय होऊन कारण नसतांही गावाच्या अगदीं शिवेजवळ असलेल्या शेतात पिलासह घुसून यव खाऊ लागली.

● वेगवेगळ्या टीकाकारांनीं या गाथेंत निरनिराळ्या सूचना ध्वनित असल्याचें कथन केलें आहे. यवक्षेत्रात संकेत ठरल्याची सूचना; किंवा, संकेताप्रमाणें यवक्षेत्रात नायिकेची वाट पाहिली, पण ती आली नाहीं, अशी तक्रार; किंवा, संकेतस्थान बदलल्याची सूचना; किंवा तेथें धोका असल्यामुळें नायिका येऊ शकणार नाहीं, अशी सूचना, रानडुकरी शेतात शिरल्यामुळें शेतकरी शिकारीसाठीं धावतील, गावच्या शिवेच्या आसपास एकान्त राहणार नाहीं, अशी सूचना. पुष्कळ मुलगे असलेली माता निर्भय असते, मुलगे वयात आले कीं मातेची कोणी काळजी करीत नाहींत, रानडुकराच्या जोडीवर सिंहहि हल्ला करूं शकत नाहीं, योग्य पुत्र लोकद्वयसाधक असतो, साह्य मिळताच अशक्तानाही जोर चढतो, वगैरे तात्पर्येंहि टीकाकारांनीं काढलेलीं आहेत.

## ४०३ गणाधिपति : 403 Leader.

हेलाकरग्गअड्ढिअजलरिक्कं साअरं पआसन्तो ।
जअइ अणिग्गअवडवग्गिभरिअगगणो गणाहिवई ॥ ३ ॥
[ हेलाकराग्राकृष्टजलरिक्तं सागरं प्रकाशयन् ।
जयत्यनिर्गतवडवाग्निभृतगगनो गणाधिपतिः ॥ ]

सोंडेच्या अग्रानें समुद्राचें पाणी सहज शोषून घेऊन समुद्र कोरडा करणाऱ्या व त्यामुळें अनिर्बंध झालेल्या वडवाग्नीला आकाश व्यापूं देणाऱ्या गणाधिपतींचा जय असो.

१ अड्ढिअ, कड्ढिअ, वड्ढिअ २ णिखग्गहुग्गअवाडवभरिअ ३. वड्वग्गि ४ आकर्षणेत ५ निरवग्रहोद्गतवडवाभृत.

● गणाधिपतीच्या निमित्तानें नायकाची स्तुति. नायक ग्राममण्डलाचा किंवा गणाचा अधिपति आहे, सर्वसमर्थ आहे, त्याला कोणी प्रतिस्पर्धी नाहीं; त्याच्याशीं खेद करण्यात धास्ती नाहीं, मात्र त्याच्या इच्छेला विरोध करण्यात धोका आहे, असें नायिकेला दूतीचें आश्वासन व सूचना.

## ४०४ सुसंपन्नः 404. Affluence.

एएण च्चिअ, कङ्केल्लि ! तुज्झ तं णत्थि जं ण पज्जत्तम् ।
उवमिज्जइ जं तुह पल्लवेण वरकामिणीहत्थो ॥ ४ ॥

[ एतेनैव कङ्केल्ले तव तन्नास्ति यन्न पर्याप्तम् ।
उपमीयते यत्तव पल्लवेन वरकामिनीहस्तः ॥ ]

हे अशोक, सुंदर स्त्रियांच्या हातांना तुझ्या पानांची उपमा देतात. यावरूनच दिसतें कीं तुझ्याजवळ पुरेसें नाहीं असें कांहींहि नाहीं.

● पाणिग्रहण झालें कीं त्यात सारें काहीं आलें !

## ४०५ समयज्ञः 405 Propriety.

रसिअ ! विअड्ढ[1] ! विलासिअ ! समअण्णअ[2] ! सच्चअं असोओ सि ।
वरजुअइचलणकमलाहओ[3] वि जं विअससि सअण्हम्[4] ॥ ५ ॥

[ रसिक विदग्ध विलासिन्समयज्ञ सत्यमशोकोऽसि ।
वरयुवतिचरणकमलाहतोऽपि यद्विकससि सतृष्णम्[6] ॥ ]

१ विअड्ढ. २. समअण्णुण. ३. कमलाहयेण. ४ मरआअं ५. कमलघातेन. ६. मरागं.

हे अशोक, तूं रसिक, विदग्ध, विलासी व समयज्ञ आहेस; तूं खरोखरीच अशोक आहेस. सुंदर स्त्रियांनीं चरणकमलांनीं लाथ मारली असता तूं दु:खित होत नाहींस; उलट विकसित होतोस आणि आपल्याला आणखी अशाच प्रहारांची अपेक्षा आहे, असें व्यक्त करतोस.

● प्रणयकुपितेच्या कटु वचनांमुळें उद्विग्न झालेल्या नायकाप्रत दूतीचे उद्गार; नायिकेनें झिटकारलें तरी तिची मनधरणी करण्यांतच खरी रसिकता व समयज्ञता आहे. परस्त्रीच्या पदाघातानें अशोक अपमानित होत नाहीं, पुष्पित होतो. वृथाभिमानाच्या आहारीं जाऊन नायिकेचा पद.घात हा अपमानाचा द्योतक आहे असें समजूं नको; प्रसाद आहे, दोहद आहे असें मान; म्हणजे थोड्याशा अनुनयानंतर सुखनिधान तुझ्या हातीं येईल, अशी शिकवण. अप्रस्तुतप्रशंसा.

## ४०६ बलीबन्धः

406. Contract.

बलिणो बाआबन्धे चोज्जं णिउअत्तणं च पअडन्तो ।
सुरसत्थकआणन्दो वामणरूवो हरी जअइ ॥ ६ ॥

[ बलेर्वाचाबन्धे आश्चर्यं निपुणत्वं च प्रकटयन् ।
सुरसार्थकृतानन्दो वामनरूपो हरिर्जयति ॥ ]

बळीला वचनांत बांधून घेतांना प्रकट केलेल्या कौशल्यामुळें सर्वांना चकित व देवांच्या समूहाला आनंदित करणाऱ्या वामनरूपी हरीचा जय असो.

---

१. चौर्य, चोर्य.

● मेदिनीकोषात 'चोद्य'चा अर्थ आश्चर्य असा दिलेला आहे; यावरून मूळ पाठ हाच असावा असें गगाधर सागतो. टीकाकारानीं या गाथेचेही शृंगारिक अर्थ सांगितले आहेत. नायिकेचा समागम हवा असेल तर वामनरूप धारण करून तिच्या घरीं जा, म्हणजे कार्यसिद्धि होईल, अशी दूतीनें नायकाला सूचना दिलेली आहे, असें एक टीकाकार सांगतो. नायक वयानें लहान होता व नायिकेच्या घरातील माणसें जबरदस्त होतीं, तरी त्यानें आपल्या नैपुण्यानें त्या सर्वांना निरुत्तर केलें व वेळ निभावून नेली, अशी नायकाची प्रशंसा अभिप्रेत अर्थ आहे असें दुसरा टीकाकार सांगतो. या दृष्टीनें पाहिलें असता या गाथेंत एकाद्या लोककथेवर आधारलेला प्रसग असावा असें वाटतें. नायिकेची ओळख करून घेतल्यावर या वामनमूर्तीनें तिच्या घरात ठाणें दिलें आणि बलिष्ठ पण विनडोक यरधन्याला बनवून आपला कार्यभाग साधला, अशी काहीं कथा सूचित केलेली असावी असें वाटतें. त्रिविक्रमवधाची सूचना मात्र कोणी केलेली नाहीं.

## ४०७ सती : 407. Immolation.

विज्झाविज्जइ जलणो गहवइधूआइ वित्थअसिहो वि।
अणुमरणघणालिङ्गणपिअअमसुहसिज्जिरङ्गीए ॥ ७ ॥

[ निर्वाप्यते ज्वलनो गृहपतिदुहित्रा विस्तृतशिखोऽपि ।
अनुमरणघनालिङ्गनप्रियतमसुखस्वेदशीताङ्ग्या ॥ ]

घरधन्याची मुलगी सती जाण्यासाठीं चितेवर चढली. तिनें पतीच्या प्रेताला गाढ आलिंगन दिलें, तेव्हां झालेल्या सुखामुळें तिला घाम आला आणि त्यामुळें भडकलेला अग्नीही विझून गेला.

● पीतांबर सांगतो, पतिव्रतांना धर्मपरायणतेमुळें मरणही सुखावह वाटतें आणि अंत करणात आनंद असला म्हणजे शरीराला क्लेशाची मातब्बर नसते.

१ विज्झा, विज्ञा २. °घणालिङ्गिअ ३ विष्मायते, विनिर्वाप्यते
४. घनालिङ्गित. ५ लिङ्गितमृतप्रियतमसुखस्विद्यन्त्या ।

**४०८ कापालिका :** 408 Ash.

जारमसाणसमुब्भवभूइसुहप्फंससिज्जिरङ्गीए ।
ण समप्पइ णवकावालिआइ उद्धूलणारम्भो ॥ ८ ॥
[ जारश्मशानसमुद्भवभूतिसुखस्पर्शस्वेदशीलाङ्ग्याः ।
न समाप्यते नवकापालिक्या उद्धूलनारम्भः ॥ ]

तरुण कापालिका स्मशानात अंगाला राख लावीत आहे. पुष्कळ वेळ लोटला तरी तिचें प्रसाधन संपत नाहीं; कारण ती आपल्या जाराच्या प्रेताची राख अंगाला लावीत आहे आणि त्यामुळें होणाऱ्या सुखानें तिच्या अंगाला घाम येत आहे.

● बोटें ओलसर असली की प्रसाधन साधत नाहीं. पीतांबर सांगतो, रहस्य लपविलें तरी अभिज्ञाना इङ्गित ओळखतें. जार व स्मशान हे शब्द अश्लील असल्यामुळें पण्डित मथुरानाथ शास्त्री यांनीं आपल्या संस्कृत छायेंत उपपति व चिता या शिष्ट शब्दाची योजना केलेली आहे !

**४०९ पान्हा :** 409. Effusion.

एक्को पण्हुअइ थणो बीओ पुलएइ णहमुहालिहिओ ।
पुत्तस्स पिअअमस्स अ मज्झणिसण्णाएँ घरणीए ॥ ९ ॥
[ एकः प्रस्नौति स्तनो द्वितीयः पुलकितो भवति नखमुखालिखितः ।
पुत्रस्य प्रियतमस्य च मध्यनिषण्णया गृहिण्याः ॥ ]

पुत्र व पति याच्यामध्यें माता पहुडलेली आहे पुत्राचें नख लागतें तो स्तन पान्हवतो आणि पतीचें नख लागतें तो पुलकित होतो.

---

१. णवकावालिणीए, पढुमकॉपालिणीअ २. फुरिअमुह ३ स्फुरितमुख

● तिच्या हृदयांत उपपतीला स्थान नाहीं, अशी दूतीची सूचना. काय म्हणतोस ? तिची तुझी पूर्वीची ओळख आहे ? तुला माहीत नाहीं या की लग्न झालें म्हणजे स्त्रिया पूर्वीचें सारें, सारें विसरून जातात, आणि प्रसूती-नंतर तर त्यांना अशा कशाचीही आठवण राहात नाहीं ! धनञ्जयाच्या दशरूपकांत असेंच वचन उध्दृत केलेलें आहे : एक्कत्तो रुअइ पिआ अण्णत्तो समरतूरणिग्घोसो । पेम्मेण रणरसेण अ भडस्स डोलाइअ हिअअम् ।' (*निर्णयसागर* : पृ. ११ ). भावसंकराचें उदाहरण.

## ४१० विषवल्ली : 410. Poison Plant.

एत्ताइच्चिअ मोहं जणेइ बालत्तणे वि वट्टन्ती ।
गामणिधूआ विसकन्दलिव्व वड्ढीऑ काहिइ अणत्थम् ॥१०॥

[ एतावत्येव मोहं जनयति बालत्वेऽपि वर्तमाना ।
ग्रामणीदुहिता विषकन्दलीव वर्धिता करिष्यत्यनर्थम् ॥ ]

पाटलाची पोरगी एवढीशी आहे; इतक्या लहान वयांत ती तरुणांना मोहित करूं लागली आहे. विषवल्लीच्या कोंबाप्रमाणें ती आतां मोहक दिसत आहे; पण मोठी झाल्यावर ही अनर्थ करील.

● उष्ण कटिबंधातलें यौवन हें वसंतांतल्या वाऱ्याच्या झुळुकीसारखें क्षणभंगुर असतें. कळी फुलण्यापूर्वीच खुडली जाते; वाकुळे, दुर्दैवानें, भरदार यौवनाचें स्वास्थ्य मध्यमवयाच्या पेठ नाहीं. अशा आसक्तीचें विलक्षणाचें स्वरूप परशरामाच्या ( चित्रशाळा : पृ. ७० ) एका लावणीत आढळतें; 'लहान वराई (= भगनी ) उंबर कवठी चार तेराची, प्रायश: आवडई पोराची !'

१. बाल्पणांत लहानपणीं. २ धूआ ३. गुण ४. वर्णी

## ४११ त्रिविक्रम : 411. Posture.

अपहुप्पन्तं महिमण्डलम्मि णहसंठिअं चिरं हरिणो ।
तारापुप्फप्पअरञ्चिअं व तइअं पअं णमह ॥११॥

[ अप्रभवन्महीमण्डले नभःसंस्थितं चिरं हरेः ।
तारापुष्पप्रकराञ्चितमिव तृतीयं पदं नमत ॥ ]

हरीचें तिसरें पाऊल पृथ्वीवर मावलें नाहीं; तें आकाशात गेलें. तेथें त्यावर नक्षत्रांचे गुच्छ वाहण्यांत आले. त्यामुळें तें शोभायमान झाले. त्याला नमन असो.

● क्र. ४०६ या गाथेंत वामनाचा जयजयकार केलेला आहे. पाताल व भूतल याच्या आक्रमणानंतर गगनात गेलेल्या तिसऱ्या पावलाचा जयजयकार या गाथेंत केलेला आहे. टीकाकार सागतात, त्रिविक्रमाच्या नमनाच्या निमित्तानें नायिका सखीला घडलेला वृत्तान्त सागत आहे. पंडित मथुरानाथशास्त्री सागतात: ' हरेः परदारापहारिणस्तस्योपपतेः स्कन्धोपरि गत्वा नभःस्थितम्। ऊर्ध्वमुच्छ्रितं तारा-( नेत्रकनीनिका )-रूपेण पुष्पप्रकरेणाञ्चितं तृतीयं चरणमानमत संमानेन बहु मानयतेति व्यङ्ग्योर्थः । ' गगाधर सागतो, या गाथेंत त्रैविक्रमबन्ध आसनाचा उल्लेख आहे. पञ्चसायकात ( पञ्जाब संस्कृत पुस्तकालयः पृ. ५६ ) याचें वर्णन दिलेलें आहेः ' एकं युवत्याश्चरणं पृथिव्यामूर्ध्वे तथान्यं परिकल्प्य कान्तः । पदस्या स्थितो हस्तयुगश्च भूमौ त्रैविक्रमः स्यादिति निम्बराजः ॥ ५·११ ॥ नागरसर्वस्वावरील ( गुजराती प्रेसः पृ: ९६ ) टीकेंत जगज्जोतिर्मल्ल सागतोः ' स्त्रियः एक' पादः नरस्य च द्वौ पादौ भूम्या इति त्रिपदत्वान् हरि. विष्णुः वामनरूपः तस्य विक्रम इव विक्रमः त्रिपादमितः यत्र तत् । '

## ४१२ शेफालिका : 412 Past Midnight.

सुप्पउ ! तइओ चि गओ जामोत्ति सहीओ ! कीस मं भणह ?।
सेहालिआणॅ गन्धो ण देइ सोत्तुं, सुअह तुम्हे ? ॥१२॥

[ सुप्यतां तृतीयोऽपि गतो याम इति सख्यः किमिति मां भणथ।
शेफालिकाना गन्धो न ददाति स्वप्तुं स्वपित यूयम् ॥ ]

रात्रीचा तिसरा प्रहरही सपला; यापुढे प्रियकर येणें शक्य नाही, आता झोंप, असें तुम्हीं मला का सागता ? सख्यानों, तुम्हीं झोंपा, शेफालिकेचा सुगंध दरवळत आहे, तो मला झोपू देत नाहीं.

● शेफालिकेचीं फुलें मध्यरात्रीनतर दरवळू लागतात त्यांचा सुगंध मन्मथोद्दीपक असतो.

## ४१३ सुरतरसिक : 413. Appreciation.

कहॅ सो ण संभरिज्जइ जो मे तह संठिआई अङ्गाइं।
णिव्वत्तिए वि सुरए णिज्झाअइ सुरअरसिओव्व ॥१३॥

[ कथ स न सस्मर्यते यो मम तथासस्थितान्यङ्गानि।
निवर्तितेऽपि सुरते निर्ध्यायति सुरतरसिक इव ॥ ]

सुरत सपल्यानंतरही तो माझ्या विकल अंगाकडे आसक्तीनें पाहतो. अशा रसिकाचा विसर पडणें शक्य तरी आहे का ?

● तुला फिरून फिरून त्याचीच आठवण का होत असते ग ! सखीच्या या प्रश्नाला नायिकेनें जणू मनोमय प्रियकराची दृष्ट काढण्यासाठीं कान-शिलांवर बोटे मोडून दिलेलें उत्तर !

१ सेहालिआण २ णिउत्तम्मि ३ निर्ध्यायति

## ४१४ सुकलेलें तळें : 414. Dry.

सुक्खन्तबहलकद्दमघम्मविसूरन्तकमठपाठीणम् ।
दिट्ठं अदिट्ठउव्वं कालेण तलं तडाअस्स ॥१४॥

[ शुष्यद्बहलकर्दमघर्मखिद्यमानकमठपाठीनम् ।
दृष्टमदृष्टपूर्वं कालेन तलं तडागस्य ॥ ]

पूर्वी कधींही न दिसलेला तळ्याचा तळ यंदांच्या उन्हाळ्याच्या कडकपणामुळें उघडा पडला आहे. त्यांत नेहमीं पुष्कळ चिखल असे; आतां तोही वाळत आलेला असून मासे व कासवें तडफडत आहेत. हा काळाचा प्रभाव.

● तळ्यात पाणी होतें तोंवर त्यावर धुण्यापाण्यासाठीं सारखी वर्दळ असे. आता तें निर्जल, म्हणून निर्जन झालें आहे, म्हणून तिकडे कोणीच येणार नाहीं अशी सूचना. किंवा, पूर्वी साधन, पण आता निर्धन झालेल्या नायकाचें दूतीनें केलेलें सांत्वन; किंवा, स्वतःचे दोष झांकण्यासाठीं वयस्क कुलटेचे उद्गार, कीं काळापुढें कोणाचीही मात्रा चालत नाहीं; किंवा, नायकाला उत्साहित करण्यासाठीं नायिकेचे उद्गार.

## ४१५ ज्योति : 415. Will-o'-Wisp.

चोरिअरअसंद्धालुइ[3] ! मा पुत्ति ! भमसु अन्धआरम्मि ।
अहिअअरं लक्खिज्जासि तमभरिए दीवसीहव्व ॥१५॥

[ *चौर्यरतश्रद्धाशीले मा पुत्रि भ्रमान्धकारे ।*
*अधिकतरं लक्ष्यसे तमोभृते दीपशिखेव ॥* ]

१. सूसन्त, वाअन्त. २. सद्धालुणि. ३ श्रद्धालुके.

मुली, तुला चौर्यरताची हौस आहे. अंधारांत भटकूं नकोस, कारण त्यांत तूं दिव्याच्या ज्योतीसारखी जास्तच ठळक दिसतेस.

● म्हणजे, मला इकडे येतांना कोणी पाहिलें की काय ? नाहीं ग, मी तुझ्या वाटेकडे डोळे लावून बसलें होतें, म्हणूनच तूं मला अंधारांतहि दिसलीस. मुली, माझ्यापासून कांहीं लपवूं नकोस. मी तुझें संरक्षण करीन आणि तुझ्या रहस्याची वाच्यता होऊं देणार नाहीं.

## ४१६ संकेतभंग : 416. Conflagration.

वाहित्ता पडिवअणं ण देइ, रूसेइ एक्कमेक्कस्स ।
असई कज्जेण विणा पइप्पमाणे णईकच्छे ॥१६॥

[ व्याहृता प्रतिवचनं न ददाति रुष्यत्येकैकस्य ।
असती कार्येण विना प्रदीप्यमाने नदीकच्छे ॥ ]

वणव्यामुळें प्रकाशित झालेल्या नदीकांठीं उद्विग्नपणें भटकणाऱ्या स्वैरिणीला कोणी कांहीं विचारलें तर ती प्रत्युत्तर देत नाहीं, प्रत्येकावर निष्कारण रागावते मात्र.

● वणव्यामुळें अंधार नाहींसा झाला, वणव्याची शोभा पाहावयास नदीकांठीं लोक लोटले आणि संकेतभंगामुळें नायिका चिडली. प्रतीयमान-इङ्गितलक्ष्य सूक्ष्मभेद : सरस्वतीकण्ठाभरण.

## ४१७ सव्याज : 417. With Interest.

आम ! असंइ म्ह, ओसंर पइव्वए ! ण तुह मइलिअं गोत्तम् ।
किं उण जणस्स जाअव्व चन्दिलं ता ण कामेमो ॥१७॥

१. अम्मा. २. असइओं. ३. ओरम ४. सीलम्.

[ आम असत्यो वयमेपसर पतिव्रते न तव मलिनितं गोत्रम् ।
किं पुनर्जनस्य जायेव नापितं तावद्म कामयामहे ॥ ]

काय म्हणणें आहे तुझें ? आम्ही छिनाल आहोंत, एवढेंच ना ? ठीक आहे; पतिव्रते, तूं आमच्यापासून दूर रहा कशी ! नाहीं तर तुझ्या कुळाला बट्टा लागेल. पण आम्ही एखाद्या वेश्येप्रमाणें वागत नाहीं किंवा न्हाव्याकडेही जात नाहीं.

● शेजारणीचें किंवा सवतीचें भांडण जुपलें म्हणजे अशीं कुरघोडी निघावयाचींच. दोघीही समानशील होत्या, मात्र आपलें रहस्य दुसरीला माहीत नाहीं अशा समजुतीनें छिद्र दिसताच कलहाला प्रवृत्त झाल्या होत्या. एक दुसरीला सांगते, आम्ही फक्त आपलें नाव खराब करून घेतलें आहे, पण निदान उत्तम नायकावर अनुरक्त आहोंत, न्हाव्याच्या नादानें तुझ्याप्रमाणें जातकुळीला बट्टा लावून घेतला नाहीं ! हा फरक अशाचा नसून धृवाचा आहे ! सारे गड नष्ट होतील, पण हा टिकेल ! हा उल्लेख नन्दावद्दलच्या प्रवादाला अनुलक्षून तर केलेला नसेल ? पीतांबर या गाथेचें तात्पर्य सांगतोः शत्रूच्याहि मर्माचें उद्घाटन करू नये, हा धर्म ! ध्वन्यालोकातील व उद्योतातील टीका पहा ' अर्थान्तरगतिः काक्वा या चैषा परिदृश्यते । सा व्यङ्ग्यस्य गुणीभावे प्रकारमिममाश्रिता ।'.. 'आम असइओ इत्यभ्युपगमकाकुः साकाङ्क्षोपहासा । उपरमेति निराकाङ्क्षतया सूचनगर्भा । . किं पुनर्जनस्य जायेव पामरप्रकृति न कामयामहे इति निराकाङ्क्षगद्गदोपहासगर्भा । एषा हि कयाचिन्नायिकानुरक्तया कुलवध्वा दृष्टाविनयाया उपहास्यमानायाः प्रत्युपहासावेशगर्भोक्तिः. काकुप्रधानैवेति । गुणीभाव दर्शयितुं शब्दस्य स्पष्टता तावत् साधयति । '

१ भवामोऽसत्य २. उपरम

## ४१८ पाहिले नाहीं तोंवर : 418. Heartache

णिद्दं लहन्ति कहिअ सुणान्ति खलिअक्खरं ण जम्पन्ति।
जाहिँ ण दिट्ठो सि तुमं ताओ च्चिअ सुहअ ! सुहिआओ ।।१८।।

[ निद्रा लभन्ते कथित शृण्वन्ति स्खलिताक्षर न जल्पन्ति ।
यामिर्न दृष्टोऽसि त्व ता एव सुभग सुखिता ॥ ]

सुभग, ज्या स्त्रियांनीं तुला पाहिलेलें नाहीं तोंवरच त्या सुखी तोंवरच त्याना निद्रा लाभणार, स्पष्ट बोलता येणार आणि बोललेलें ऐकू येणार

● तुझ्या दर्शनानें अगीं मन्मथाचा सचार होतो, सुख नष्ट होतें, झोंप उडून जाते व ज्ञानेंद्रियांच्या शक्ति स्थगित होतात दर्शन दिलेंस, आता प्रसन्न तरी हो. विदग्ध प्रियकराच्या प्राप्तीसाठीं तळमळणाऱ्या नायिकेचे उद्गार अप्रस्तुतप्रशंसा.

## ४१९ बोरांचा गुच्छ : 419 Jujube

बालअ ! तुमाइ दिण्णं कण्णे काऊण बोरसंघाडिम्[१]।
लज्जालुइणी[२] वि वहू घरं गआ गामरच्छाए[३] ।।१९।।

[ बालक त्वया दत्तां कर्णे कृत्वा बदरसघाटीम् ।
लज्जालुरपि[४] वधूर्गृह गता ग्रामरथ्यया ॥ ]

बालक, तू दिलेल्या बोरांचा सपर्ण गुच्छ वधूनें कानावर धारण केला तिला लाज वाटत होती, तरी ती भर रस्त्यानें घरीं गेली.

---

१ बोरसवाडि २ लज्जालुइव्वि अजा ३ बदरगुच्छम्, सहितम्, संघातम् ४ लज्जालुरप्यीश्वरसुता

● अलंकार अगर वस्तु म्हणून मोराच्या जोडीला काहींच किंमत नाहीं, पण तो तुम्ही तू दिलास, म्हणून तो तिला बिनमोल वाटला, तेवढीच तुझी आठवण म्हणून तो तिनें धारण केला दूती सांगते, तिची तुझ्यावर एवढी प्रीति आहे आणि तुला त्याची जाणीवहि नाहीं. स्त्रियांच्या प्रीतीची प्रचीति अशा क्षुल्लक वाटणाऱ्या चेष्टावरूनहि येते.

## ४२० दुर्दैवी : 420. Neglect.

अह सो विलक्खहिअओ मए अहव्वाएँ अगहिआणुणओ।
परवज्जणच्चरीहिं तुह्मेहिँ उवेक्खिओ णेन्तो ? ॥२०॥

[ अथ स विलक्षहृदयो मया अभव्यया अगृहीतानुनय ।
परवाद्यनर्तनशीलाभिर्युष्माभिरुपेक्षितो निर्यन् ॥ ]

मीच दुर्दैवी त्यानें अनुनय केला, पण मी त्याचा स्वीकार केला नाहीं सख्यानो, लज्जित होऊन तो जाऊ लागला तेव्हा तुम्हीही त्याची उपेक्षा केलीत तुम्ही वाद्य वाजवून दुसऱ्याला नाचवणाऱ्या ! तुम्हाला काय ? तो जो गेला तो गेलाच !

● तुम्ही दुसऱ्याचें ढोलकें बडवून त्याच्या तालावर नाचणाऱ्या किंवा नाचविणा या रुसण्याचें शिक्षण देऊन तुम्ही मला कुमार्गाला लावलें व माझा घात केला, अशी कलहान्तरितेची मैत्रिणींजवळ तक्रार. पीतांबरानें समानार्थी वचन दिलेलें आहे " निरस्तो मन्युना कान्तो नमन्नपि यथा पुन ( नमन्नप्रियया पुरा )। दु स्थिता त विना सेय कलहान्तरिता यथा ( — सातिशयचिहिता यथा — मता ) ॥

१ अभव्वाए २ अगणिअप्पणओ ३ कज्ज, वज्ज, वसण ४ चिरीहिँ ५ णिंतो ६ कार्य, वाद्य व्यसन

## ४२१ निर्वृति : 421. Unobtainable.

दीसन्तो णअणसुहो णिव्वुइजणओ करेहिँ वि छिवन्तो ।
अब्भत्थिओ ण लब्भइ चन्दो व्व पिओ कलाणिलओ ॥२१॥

[ दृश्यमानो नयनसुखो निर्वृतिजननः कराभ्यां अपि स्पृशन् ।
अभ्यर्थितो न लभ्यते चन्द्र इव प्रियः कलानिलयः ॥ ]

चंद्र दिसला कीं दृष्टीला सुख होतें; इतकेंच नव्हे, तो शरीराला स्पर्श करून अलौकिक आनंद देतो. मात्र कितीही प्रार्थिला तरी हातीं येत नाहीं. कलावान् चंद्राप्रमाणें कलानिपुण प्रियकरही लाभत नाहीं.

● चंद्राचे अंगीं सोळा, तर प्रियकराचे अंगीं चौसष्ट कला; हा त्याच्या पेक्षा निपुण. तो करस्पर्श तरी करतो आणि हा हाताला हातहि लागूं देत नाहीं; दोघेही हस्तगत होत नाहींत. अब्भत्थिओ—चंद्रपक्षीं अभ्रस्थित आणि प्रियकरपक्षीं अभ्यर्थित, असा श्लेष शक्य आहे. पीतांबर सागतो, जन्मजन्मान्तरींच्या पुण्यावांचून प्रार्थिताची प्राप्ति होत नाहीं, हा धर्म; जें अलभ्य त्याची याञ्चा करूं नये, ही नीति.

## ४२२ शोकगीत : 422. Swan-Song.

जे णीलब्भमरभरग्गगोछँआ आसि णइअडुच्छङ्गे ।
कालेण वञ्जुला, पिअवँअस्स ! ते थण्णुआँ जाआ ॥२२॥

[ ये नीलभ्रमरभरभग्नगुच्छका आसन्नदीतटोत्सङ्गे ।
कालेन वञ्जुलाः प्रियवयस्य ते स्थाणवो जाताः ॥ ]

१. सीण. २. गोच्छआ ३. पिअवतंस. ४. खण्णुआ. ५. खीन. ६. असोका
७. प्रियावतंसस्यानका

प्रिय मित्रा, तीं नदीकांठचीं अशोकाचीं झाडें, फुलांच्या गेंदांनीं डंवरून जात व त्यांभोंवतीं घोंगावणाऱ्या काळ्याभोर भ्रमरांच्या भारानें त्यांचे दांडे तुटत असत. आता ते वृक्ष वठून त्यांचीं खोडें मात्र राहिलीं आहेत हा काळाचा प्रभाव.

● सर्वंकष काळाच्या माहात्म्यवर्णनाच्या निमित्तानें संकेतस्थानभङ्गाची सूचना.

## ४२३ क्षणभङ्गुर : 423. Transient.

खणभङ्गुरेण पेम्मेण माउआ ! दुम्मिअम्ह एत्ताहे ।
सिविणअणिहिलम्भेण व दिट्ठपणट्ठेण लोअम्मि ॥२३॥

[ क्षणभङ्गुरेण प्रेम्णा मातृष्वसः दूनाः स्म इदानीम् ।
स्वप्ननिधिलम्भेनेव दृष्टप्रनष्टेन लोके ॥ ]

मावशी, स्वप्नांत मिळालेली संपत्ति दिसते न दिसते तोंच नष्ट होते. त्याचप्रमाणें मला प्रेम क्षणमात्रच लाभल्यामुळें माझें हृदय व्यथित झालें आहे.

● अस्थिरस्नेही नायकाबद्दल निराश प्रेयसीचे उद्वेगोद्गार. प्रीतीची रीतच न्यारी ! कधीं ती द्वैतावर अधिष्ठित असते, तर कधीं अद्वैतावर; कधीं स्वत्वाच्या अधिष्ठानावर, तर कधीं विसर्जनावर. प्रीतीचा फासा मनासारखा अनुकूल पडला तर जीवनाचा डाव खेळावयास आयुष्य अपुरें वाटतें, युग क्षणासारखें भासतें; आणि डाव उलटला तर फाशाचा फास गळ्याभोंवतीं करकचल्यामुळें जीव गुदमरतो आणि क्षण युगासारखा भासतो. विफल प्रीतीचें शल्य जन्मभर सलत राहतें.

## ४२४ निष्कपट : 424. Candid

चावो सहावसरलं विच्छिवइ सरं गुणम्मि वि पडन्तम्।
वङ्कस्स उज्जुअस अ संबन्धो किं चिरं होई ? ॥२४॥

[चाप॰ स्वभावसरलं विक्षिपति शरं गुणेऽपि पतन्तम्।
वक्रस्य ऋजुकस्य च सबन्ध॰ किं चिर भवति ॥]

बाण स्वभावत सरळ असतो ( व धनुष्य वक्र असतें ). धनुष्याच्या दोरीवर बाण चढविला की तें तात्काळ त्याला फेकून देतें. सरळ व वक्र याचा संबध चिरकाल कसा टिकेल ?

● धनुष्याच्या दण्डासाठीं उत्तम जातीचा बांबू वापरतात. त्याचा वश शुद्ध असतो धनुष्याची क्षमता त्याच्या वक्रतेवर अवलंबून असते. दोनहि टोकाना बांधलेल्या *गुणामुळें धनुष्याला वक्रता प्राप्त होते. नायकाच्या कुळावर* व शौर्यावर तू भाळली आहेस, पण साभाळ, तुला त्याचे गुण माहीत नाहींत, तुझा स्वभाव सरळ, तुला छक्केपंजे माहीत नाहींत, तो तुला ओढून घेऊन केव्हाच झोकून देईल; अशी नायिकेला सखीची सूचना कपटी पुरुषाशीं सबध येताच स्त्री कोठल्या कोठें फेंकली जाते !

## ४२५ वामन : 425 Pigmy.

पढमं वामणविहिणा पच्छा हु कओ विअम्भमाणेण।
थणजुअलेण इमीए महुमहणेण व्व वलिबन्धो ॥२५॥

[प्रथम वामनविधिना पश्चात्खलु कृतो विजृम्भमाणेन।
स्तनयुगलेनैतस्यां मधुमथनेनेव वलिवन्ध ॥]

१ जेइविसुद्धम् २ विच्छुहइ ३ वशविशुद्धम् ४ विघटयति ५ गुणे वर्तमानम्, गुणे निपतन्तम् ६ पुढम ७ मज्झस्स ८ मध्यस्य

वामनरूप धारण करणाऱ्या विष्णूनें वृद्धिंगत होऊन त्रैलोक्य व्यापलें व बळीला बंदीत टाकलें, त्याचप्रमाणें प्रथम लहान असून नंतर विशाल झालेल्या तिच्या स्तनयुग्मानें त्रिवली व्यापून टाकली.

● वलिबन्ध यातील ' वलि'चा संबंध प्रथम बळीशीं व नंतर त्रिवलीशीं जोडलेला आहे.

## ४२६ कुन्द : 426. Winter.

मालइकुसुमाइँ कुलुञ्चिऊण मा जाणि णिव्वुओ सिसिरो ।
काअव्वा अज्जवि णिग्गुणाणँ कुन्दाणँ वि समिद्धी ॥२६॥

[ मालतीकुसुमानि दग्ध्वा[2] मा जानीहि निर्वृतः शिशिरः ।
कर्तव्याद्यापि निर्गुणानां कुन्दानामपि समृद्धिः ॥ ]

मालती कुसुमें जाळून शिशिराचें समाधान झालें असें समजूं नको. त्याला अजून गुणरहित कुन्दांची समृद्धि करावयाची आहे.

● मालतीचीं फुलें नाजूक व एकाकी असतात आणि त्याचा सुगंध आकर्षक असतो. कुंदाचीं फुलें देखणीं व झुपकेदार असतात आणि त्याचा दर्प उग्र असतो. शिशिरात मालती कोळपते व कुंद उमलतो. दुष्ट लोक सज्जनांवर अपकार करतात, इतकेंच नव्हे, दुर्जनांवर उपकार करतात. तूं माझी उपेक्षा करतोस, इतकेंच नव्हे, सवतींवर अनुग्रह करतोस, अशी अप्रियवादिनी नायिकेची तक्रार.

## ४२७ वीरपतन : 427. Warriors.

तुङ्गाणँ विसेसनिरन्तराणँ सरस वणलद्धसोहाणम् ।
कअकज्जाणँ भडाणँ व थणाणँ पडणं वि रमणिज्जम् ॥२७॥

१. मुळांचें चाऊण. २. म्लानानि कृत्वा, सल्लक्षीयमानानीव निर्वृतः

[ तुङ्गयोर्विशेषनिरन्तरयोः सरस व्रणलब्धशोभयोः ।
कृतकार्ययोर्भटयोरिव स्तनयोः पतनमपि रमणीयम् ॥ ]

वाघ्यानें उच, (ताज्या) जखमानीं सजलेली व अगंकित कार्य यशस्वी करीपर्यंत खाद्याला खादा भिडवून लढणारी वीराची जोडी युद्धात पतन पावली तरी मनोहर दिसते, त्याचप्रमाणें उच, (आर्द्र) नखक्षतानीं सुशोभित व परस्पराना भिडलेले स्तन कृतकृत्य होऊन पतन पावले तरीही शोभायमान दिसतात.

● मध्यमयौवनेचें कौतुक पीताबर सागतो, कृतपरोपकारस्य पतनमपि श्लाघ्यम् ।

## ४२८ काव्य : 428 Poetry.

पॅरिमलणसुहा गुरुआ अलद्धविवरा सलक्खणाहरणा ।
थणआ कव्वालाव व्व कस्स हिअए ण लग्गन्ति १॥२८॥

[ परिमेलनसुखा गुरुका अलब्धविवरा सलक्षणाभरणा ।
स्तनका काव्यालापा इव कस्य हृदये न लगन्ति ॥ ]

काव्यें पठणास सुखकारक, गभीर, निर्दोष व साल्कृत असल्यामुळें कोणाला प्रिय वाटत नाहींत ? त्याचप्रमाणें मर्दन करताना सुख देणाऱ्या उन्नत, निरतर, सुचिन्हानीं युक्त व साल्कृत अशा स्तनाशीं सबध येताच कोणाचें हृदय सतुष्ट होत नाहीं ?

● काव्यपक्षीं परिमलन = परामर्श, विचारपुनर्विचार, गुरु = गभीर, अर्थपूर्ण, अलब्धविवर = ज्याचीं अगप्रत्यगें परस्पराशीं एकजीव झालेलीं आहेत, निर्दोष, लक्षण = भरतोक्त त्रिंशत्काव्यलक्षणयुक्त, आभरण = वाग्यालकार. स्तनपक्षा परिमलन = मर्दन, गुरु = पीन व उन्नत, अलब्ध-

१ परिमिलण २ सरुसा ३ परिमलेन

विवर = ज्यामध्यें विवर — मोकळी जागा नाहीं असे, निरंतर; लक्षण = श्रीफलाकार, सौभाग्यसूचक अथवा तिळासारख्या सुलक्षणांनीं युक्त; आभरण = अलंकार. काहीं टीकाकारांनीं काव्य या शब्दाचा अर्थ महाकाव्य असा घेतला आहे आणि कांहींनीं त्याची व्याप्ति मर्यादित केलेली नाहीं. स्तनद्वयामध्यें विवर असणें हा दोष मानण्यांत येत असे. स्तनाप्रमाणें काव्यें हृदय आकर्षितात. पीतांबर सागतो, काव्यालाप संसारी जनाना आकर्षक वाटतात, तत्त्वज्ञाना नाहीं.

## ४२९ कालप्रभाव : 429. Removal·

खिप्पइ हारो थणमण्डलाहि तरुणीअ रमणपरिरम्भे।
अच्चिअगुणा वि गुणिनो लहन्ति लहुअत्तणं काले ॥२९॥

[ क्षिप्यते हारः स्तनमण्डलात्तरुणीभी रमणपरिरम्भे।
अर्चितगुणा अपि गुणिनो लभन्ते लघुत्वं कालेन ॥ ]

प्रियकराला आलिंगन देण्यासाठीं सज्ज होतांना तरुणी हारादि अलंकार स्तनमण्डलावरून काढून ठेवतात. सद्गुणांमुळें पूज्य असांनाही कालप्रभावामुळें लघुत्व प्राप्त होतें.

● परिरम्भ हा सुरतनाटकाचा पूर्वरङ्ग, असें इतरत्र (क्र. ३४४) सांगितलें आहे. या गाथेंत पूर्वरङ्गाच्या प्रारंभींची नान्दी वर्णिलेली आहे. रङ्गभूमीवरील नाटक रंगावें म्हणून पात्रांच्या अंगावर व वचनांवर अलंकार चढविण्यांत येतात; येथें ते उतरण्यात येतात. नेत्राना अलंकार आकर्षक वाटतात पण अंतःकरणाला त्याच्या आडोशाला असलेला अर्थपूर्ण गाभा अधिक आवडतो.

---

१. छिप्पइ. २. अर्धित.

## ४३० अनैसर्गिक : 430 Unnatural

अण्णो को वि सुहाओ मम्महसिहिणो हला ! हआसस्स ।
विज्झाइ णीरसाणं हिअए, सरसाणॅ झत्ति पज्जलइ ॥३०॥

[अन्य कोऽपि स्वभावो मन्मथशिखिनो हला हताशस्य ।
निर्वाति नीरसाना हृदये सरसाना झटिति प्रज्वलति ॥]

सखि, प्रेमाची आग मेली मोठी विलक्षणच असते कोरड्या हृदयात ता विझत आणि ओल्या हृदयात झटकन् पेट घेते

● हा स्वत ऱ्या हृदयाच्या सरसतेची ग्वाही, की प्रियकराऱ्या शुष्कते मुळें बोंचणारी निराशा[१]

## ४३१ उन्मूलन : 431 Crash

तह तस्स माणपरिवड्ढिअस्स चिरपणअवद्धमूलस्स ।
मामि ! पडन्तस्स सुओ सद्दो वि ण पेम्मरुक्खस्स ॥३१॥

[तथा तस्य मानपरिवर्धितस्य चिरप्रणयबद्धमूलस्य ।
मातुलानि पतत श्रुत शब्दोऽपि न प्रेमवृक्षस्य ॥]

मामी, प्रमाचें रापटें तिनें बाल्पणापासून मोठ्या आदरानें व आपुलकान वाढविलें त्याचीं मुळें खालवर गेलीं व विस्तार दूरवर झाला पण हा प्रमवृक्ष कोसळला तव्हा आवाजसुद्धा झाला नाहीं.

● वृक्ष कोसळतो तेव्हा कडाडता प्रेमवृक्ष कोसळला तेव्हा तिचें हृदय विदीर्ण झालें आणि दु खातिरेकामुळें जणू तिचा वाचा नष्ट झाली

१ गिव्वाइ

## ४३२ कोणासाठीं ? 432. Disregard.

पाअपडिओ ण गणिओ पिअं भणन्तो वि अप्पिअं भणिओ।
वच्चन्तो वि ण रुद्धो भण ! कस्स कए कओ माणो ? ॥३२॥

[ पादपतितो न गणितः प्रियं भणन्नप्रिय भणित ।
व्रजन्नपि न रुद्धो भण कस्य कृते कृतो मानः ॥ ]

प्रियकर पाया पडत होता, तेव्हा त्याची पर्वा केली नाहींस, तो गोड गोड बोलत होता, तेव्हा त्याला दुरुत्तरें दिलीस; तो जाऊ लागला, तेव्हा त्याला अडविलें नाहींस ! साग, एवढा मान कोणासाठीं ?

## ४३३ बोलकीं क्षतें : 433. Nail Marks.

पुसइ खणं, धुवेइ खणं, पप्फोडइ तक्खणं अआणन्ती ।
मुद्धवहू थणवट्ठे दिण्णं दइएण णहरवअम् ॥३३॥

[ प्रोञ्छति क्षण प्रस्फोटयति तत्क्षणमजानती ।
मुग्धवधूः स्तनपंदे दत्त दयितेन नखरपदम् ॥ ]

मुग्ध वधूच्या स्तनाच्या पृष्ठभागावर प्रियकरानें नखक्षतें उमटविलीं त्या अजाणतीनें तीं क्षणभर वस्त्रानें पुसलीं, टिचकीनें झटकलीं, पाण्यानें धुतलीं; पण व्यर्थ !

● नायकाची उत्कण्ठा वृद्धिगत करण्यासाठीं नायिकेच्या नवयौवनाचें वर्णन, कीं सपत्नीच्या दुश्चरित्राची सूचना ?

१ विप्पिय २ वच्चतो न निरुद्धो ३ विप्रिय ४ व्रजन्त निरुद्धो ५ धुणइ ६ णक्खवअम् ७ मार्जयति ८ पृष्ठे, पट्टे.

## ४३४ काश : 434 Grass Flowers.

चासारत्ते उण्णअपओहरे जोव्वणे व्व वोलीणे ।
पढमेक्ककासकुसुमं दीसइ पलिअं व धरणीए ॥३४॥
[ वर्षाकाले उन्नतपयोधरे यौवन इव व्यतिक्रान्ते ।
प्रथमैककाशकुसुमं दृश्यते पलितमिव धरण्या ॥ ]

पावसाळ्यात पयोधर ( –ढग ) उच्च स्थानीं असतात, त्याचप्रमाणें यौवनात पयोधर ( –स्तन ) उन्नत असतात. पावसाळा सपल्यावर धरणीवर पाढरीं शुभ्र काशपुष्पें जागोजाग दिसतात, त्याचप्रमाणें यौवन ओसरल्यावर स्त्रियाचे केस हळू हळू शुभ्र होऊं लागतात.

● फुलेरी गवताच्या माळावर संकेतस्थान निश्चित केल्याची सूचना. वृद्धेसमोर शृंगारचेष्टा करू नयेत असा आचार असल्यामुळें गवती माळावरील संकेत रद्द केल्याची सूचना ! वृद्ध वेश्या विटाला सांगते, मीच म्हातारी झालें आहे असें नाहीं, पहा, पृथ्वीसुद्धा वृद्ध झालेली दिसत आहे. पण बये, धरणीचे हें वार्धक्य ह्रगामी आहे !

## ४३५ होरा : 435 Horoscope

कत्थ गअं रइबिम्बं ? कत्थ पणट्ठाओं चन्दताराओ ? ।
गअणे वलाअपन्तिं कालो होरं व कड्ढेइ ॥३५॥
[ कुत्र गतं रविबिम्बं कुत्र प्रणष्टाश्चन्द्रतारका ।
गगने बलाकापङ्क्तिं कालो होरामिवाकर्षति ॥ ]

१ वरिसारत्ते २ बलआवत्तिं बलाअरातिं

रविबिम्ब कोठें गेलें ? चंद्र व तारे कोठें गेले ? ग्रहमान पाहण्यासाठीं होराशास्त्रज्ञ रेषा काढतो, त्याप्रमाणें आकाशांत बगळ्यांच्या रांगांनीं काळ रेषा ओढीत आहे.

● पतीला प्रवासापासून परावृत्त करण्यासाठीं पत्नीनें काढलेले हे उद्गार आहेत असें गंगाधर सांगतो; पण हें पटत नाहीं. कारण, आकाशात बगळ्याच्या रांगा बहुशः पावसाळ्यात आणि त्याहि सायंकाळीं दिसतात; आणि ही वेळ प्रवासाची नव्हे. सखी सांगते, सायंकाळ झाली खरी, पण अजून रात्र पडलेली नाहीं; नभ मेघानीं आक्रमिलें व चंद्र अदृश झाला खरा, पण अजून वाटचालीपुरता उजेड आहे. चल, भिऊं नको; पहा, आकाशांत काळ्याभोर ढगाच्या पार्श्वभूमीवर बगळ्याच्या रांगेचा कीन जणूं मदनाच्या फुलाच्या बाणाच्या फाळासारखा चालला आहे; हा तुझ्या अभिसाराला शुभ शकुन आहे. मेघदूतात कालिदास सांगतो; ' गर्भाधानक्षणपरिचयान्नूनमाबद्ध मालाम् । सेविष्यन्ते नयनसुभगं खे भवन्तं बलाका ॥' (पूर्व. ९) आकाशांतून भ्रमण करणाऱ्या बलाकापङ्क्तीचें दर्शन हा शुभशकुन असल्याचें मल्लीनाथानें नमूद केलें आहे. हा प्रवासाचा शकुन नव्हे, प्रेमपूर्तीचा ! बगळ्याची रांग कुण्डलींतल्या कोनासारखी असते हें सांगावयास नकोच.

## ४३६ अशा पावसांत : 436. Rain.

अविरॅलपडन्तणवजलधाररज्जुघडिअं पअत्तेण ।
अॅपहुत्तो उॅक्खेत्तुं रसइ व मेहो महिं, उअह ! ॥३६॥
[ अविरॅलपतन्नवजलधाररज्जुघटितां प्रयत्नेन ।
अप्रभवन्नुत्क्षेप्तुं रसतीव मेघो महीं पश्यत ॥ ]

१ अविरय. २. जलहरधारारयरज्जुघडियबन्धेहिं. ३. प्रअन्तेण. ४. असमत्थो, अवयन्तो ५ उक्खिविउं, उक्खेत्तुं. ६. अवयन्तो उक्खिवइव्व महियलं पाउसो उअह. ७ अविरत.

पहा! पहिल्या पावसाच्या दाट धारांच्या दोऱ्यांनीं पृथ्वीला बांधून वर खेंचण्याचा मेघ प्रयत्न करीत आहेत व जणूं तो विफल झाल्यामुळेंच ते ओरडत आहेत.

● जनापवादाच्या धास्तीनें साशङ्क झालेल्या नायकाला दूतीचें आश्वासन; अशा पावसात ती इतक्यांत कशी येईल, जरा धीर धर.

४३७ व्याकुल : 437. Distrust.

ओ हिअअ! ओहिदिअहं तइआ पडिवज्जिऊण दइअस्स।
अत्थेक्काउल! वीसम्भघाइ! किं तइ समारद्धम् ॥३७॥

[हे हृदय अवधिदिवसं तदा प्रतिपद्य दयितस्य।
अकस्मादाकुल विस्रम्भघातिन् किं त्वया समारब्धम् ॥]

हाय, हृदया, पतीनें प्रवासाचा अवधि सांगितला तेव्हां तो तूं निमूटपणे मान्य केलास आणि आतां एकाएकीं व्याकुल का झाला आहेस! विश्वासघातक्या! हें तूं आरंभलें आहेस तरी काय!

● प्रियकर परतेण्याला अवधि आहे हें माहीत असून, हृदया, तूं अधीर का झालास! सखी, दयिताला ताबडतोब परत आण, नाहींतर माझी आशा नाहीं.

४३८ भग्नवलय : 338. Broken Bangle.

जो वि ण आणइ तस्स वि कहेइ, भग्गाइँ तेण वलआइँ।
अइउज्जुआ वराई अह च पिओ से हआसाए ॥३८॥

१. समाधत्तम्. २. अवधिदिवसपर्यन्तम्

[ योऽपि न जानाति तस्यापि कथयति भग्नानि तेन वलयानि।
अतिऋजुका वराकी अथवा प्रियस्तस्या हताशायाः॥ ]

निचें रहस्य माहीत नाहीं त्यालाही तिच्या पिचलेल्या बांगड्यां-वरून त्याबद्दल अनुमान काढतां येतें. बिचारीचा स्वभाव अगदीं सरळ आहे किंवा तिचा प्रियकर हतभागी आहे.

● अग्गो बाई, अन् तुझ्या बागड्या ग कशा वाढल्या ? ऑ— मध्यारीं तर मी पाहिल्या होत्या ! सासूनें, नणंदेनें किंवा सवतीनें कुत्सीत विचारलें. ऐन वेळीं बिचारीला कांहीं सबब सुचली नाहीं आणि तिच्या रहस्याचा स्फोट झाला. प्रेमप्रसङ्गात ती इतकी रंगली होती कीं तिला कंकणभङ्गाचें भान राहिलें नाहीं. त्यानें तरी तिचें लक्ष त्याकडे वेधावें ? त्याच्या दुर्दैवानें त्यालाहि तशी बुद्धि झाली नाहीं. दुर्दैवानें, कारण यामुळेंच त्याची पुनर्भेट अशक्य होणार होती. अंगाखांद्यावरलें चाचपून पाहण्याची तिलाहि बुद्धि झाली नाहीं; नाहींतर जरा पदर सावरून तिला सहज सटकता आलें असतें. पीतांबर सांगतो, ज्यामुळें अपमान सहन करण्याचा प्रसंग येईल असें कर्म कधीं करूं नये, हा धर्म ! उलट असेंही सांगता येईल कीं कर्म कौशल्यानें करावें व तें तडीला न्यावें हा योग !

## ४३९ अवतंस : 439. Ear Drops.

सामाइ गरुअजोव्वणविसेसभरिए कवोलमूलम्मि ।
पिज्जइ अहोमुहेण व कण्णवअंसेण लावण्णम् ॥३९॥

[ श्यामाया गुरुकयौवनविशेषभृते कपोलमूले ।
पीयतेऽधोमुखेनेव कर्णावतंसेन लावण्यम् ॥ ]

ओसंडणाऱ्या यौवनाच्या भरामुळें श्यामलेचे गाल गुबगुबीत झाले आहेत. तिच्या कानावरील अवतंस जणूं अधोमुख होऊन तिच्या सौंदर्याचें पान करीत जाहे.

● स्वयंदूत नायक लावण्यवर्णनाच्या निमित्तानें चुम्बनाचा अभिलाष; एक्दाच न हे, अनेकदा; कारण पदन्यासार्शी अवलसाच्या डोलण्याचा ताल असतो. *नाहीं तरी कपोलचुम्बनासाठीं वाकावेंच लागतें.* पीतांबर मागतो, उत्तम वस्तूंविषयीं अचेतनतानाही अभिलाष वाटतो, ही नीति.

## ४४० भान हरपलें : 440 Inadvertence

**सेउल्लिअसव्वङ्गी गोत्तग्गहणेण तस्स सुहअस्स।**
**दूइं पट्टाएन्ती तस्सेअ घरङ्गणं पत्ता ॥४०॥**

**[ स्वेदार्द्रीकृतसर्वाङ्गी गोत्रग्रहणेन तस्य सुभगस्य।**
**दूतीं प्रस्थापयन्ती तस्येव गृहाङ्गणं प्राप्ता ॥ ]**

तो धन्य कीं ज्याच्या केवळ नामोच्चारामुळें तिचें सर्वांग स्वेदानें ओलें झालें, त्याच्याकडे दूतीला पाठविण्याची तजवीज करताना ती इतकी बेभान झाली कीं स्वत च त्याच्या घराच्या अंगणांत येऊन दाखल झाली.

● दूतीला त्याचा ठिकाणा समजावून सांगताना बेभान होऊन ती स्वत च दूतीबरोबर वाट चालू लागली; आणि दूतीही अशी अडाणी, किंवा समयज्ञ, कीं त्याच्या अंगणात दाखल होईपर्यंत तिला त्याचा ठिकाणा काहीं समजला नाहीं.

## ४४१ प्राणपूजा : 441. Wounded.

**जम्मन्तरे वि चलणं जीएण खु मअण तुज्झ अच्चिस्सम्।**
**जइ तं पि तेण वाणेण विज्झसे जेण हं विज्झा ॥४१॥**

१ णाम २ दूर ( दूतामिति भवेत् ) ३ अप्पाहेन्ति ( संदिट्ठ अप्पाहियम् इति पाइअलच्छी), पचाहेन्ति ४ अन्कण ५ व्याहरन्ती, सन्देशयन्ती. ६ जम्मन्तरे तुह चलणकमल जीवेण मअण, जम्मान्तराइ वीसवी. ७ अंचिस्सम्.

[ जन्मान्तरेऽपि चरणौ जीवेन खलु मदन तवार्चयिष्यामि ।
यदि तमपि तेन बाणेन विध्यसि येनाहं विद्धा ॥ ]

मदना–तू ज्या बाणानें मला विद्ध केलेंस त्यानेंच माझ्या प्रियकरालाही जखमा केलेंस तर मी जन्मजन्मान्तरीं माझ्या प्राणानीं तुझ्या चरणाची पूजा करीन

● तुझ्यापाशीं पच शर आहेत, त्याचे परिणाम भिन्न असतील, म्हणून त्याच शरानें त्याला विद्ध कर, म्हणजे तो तातडीनें मजकडे येईल प्रियकराला जखमी कर अशी प्रार्थना प्रेयसी दुसऱ्या कोणत्याही देवाजवळ करणार नाहीं

## ४४२ कौशल्य : 442 Dexterity.

णिअवक्खारोविअदेहभारणिउणं रसं लिहन्तेण ।
विअसाविऊण पिज्जइ मालइकलिआ महुअरेण ॥४२॥

[ निजपक्षारोपितदेहभारनिपुण रस लभमानेन ।
विकास्य पीयते मालतीकलिका मधुकरेण ॥ ]

मालतीचा कळी उमलवून कौशल्यानें तिच्या रसाचा आस्वाद घेताना चतुर मधुकर आपला भार तिच्यावर टाकीत नाहीं, आपल्या पखाच्या आधारानं तिचाच भार तोलून धरतो व तिला हळू हळू उमलवतो.

● नायकाच्या उपचारकौशल्याबद्दल अतिबाला नायिकेला आश्वासन किंवा अनभिज्ञ पण उत्कण्ठित नायकाला उत्फुल्लकरणाचें शिक्षण वात्स्यायन

१ जन्मान्तराणि अपि शतम्, जन्मसहस्राणि अभिव्याप्य कर्म तव, विंशतिजन्मान्तराणि २ अर्पयिष्यामि अर्थयिष्यामि ३ णियपक्खारोविय-
४ लहन्तेण ५ माउल

याचें लक्षण सांगतो: " शिरोविनिपात्योर्ध्वं जघनमुत्फुल्लकम्। " आणि रतिरहस्यांत: " करयुगमधृतत्रिकमूर्ध्वलसज्जघनं पतिहस्तनिविष्टकुचम्। स्फिग्बिम्बबहिर्धृतपार्ष्णियुगं ह्युत्फुल्लकमुक्तमिदं करणम्॥ " (१०.१६).

## ४४३ माधव : 443 South Wind.

**कुरुणाहो व्विअ पहिओ दूमिज्जइ माहवस्स मिलिएण।**
**भीमेण जहिछिआए दाहिणवाएण छिप्पन्तो ॥४३॥**

*[ कुरुनाथ इव पथिको दूयते माधवस्य मिलितेन।*
*भीमेन यथेच्छया दक्षिणवातेन स्पृश्यमानः ॥ ]*

माधवाच्या सहकार्यानें भीम प्रबळ झाला आणि त्यानें कुरुनाथाला उजव्या पायानें लाथ मारली. त्याचप्रमाणें वसंताच्या सहवासानें मस्त झालेला दक्षिणवारा पथिकाच्या अंगाला झोंबून त्रस्त करूं लागला;

● माधव म्हणजे कृष्ण आणि वैशाखमास किंवा वसंत ऋतु; दक्षिण म्हणजे उजवी बाजू आणि दक्षिण दिशा. मलयावरून येणारा वारा प्रेमिकांना परस्पराच्या सहवासांत सुखावह वाटतो, पण तोच विरही जनांना दुःसह वाटतो. मलयावरून येणारा वारा दक्षिणेकडला खरा, पण त्याचे अंगीं दाक्षिण्य मुळींच नाहीं. दाक्षिणात्यांना दाक्षिण्याचें श्रेय क्वचितच देण्यात येतें ! वसंत आला, दक्षिणेकडले वारे वाहू लागले, आतां प्रियकर लवकरच परत येईल, असें विरहिणीला सखीचें आश्वासन.

## ४४४ कलिकाभङ्ग : 444. Initiation.

**जाव ण कोसविकासं पावइ ईसीस मालईकलिआ।**
**मअरन्दपाणलोहिल्ल भमर ! तावच्चिअ मलेसि ॥४४॥**

१. दुर्मनस्क: क्रियते. २. यदृच्छया. ३. आस्वादयाण.

[ यावन्न कोपविकास प्राप्नोतीषन्मालतीकलिका ।
मकरन्दपानलोभयुक्त भ्रमर तावदेव मर्दयसि ॥ ]

लम्पट भ्रमरा—मालतीची कळी अजून उमललेली नाहीं; कोपविकास झालेला नसल्यामुळें तिचे पराग अजून रसपूर्ण झालेले नाहींत; तोंच मकरन्दपानाच्या लोभानें तू अकालीं तिचें मर्दन करीत आहेस, ( हें ठीक नाहीं ).

● काहीं टीकाकारांनीं या गाथेचा अर्थ प्रोत्साहनपर घेतलेला आहे आणि निष्कर्ष काढला आहे कीं कळी उमलेपर्यंत मर्दन केलें पाहिजे. कोणी वेगळा अर्थ घेतला आहे, हे सुचवितात, कळी उमललेली नाहीं, तुझे श्रम व्यर्थ आहेत, तुला रसप्राप्ति होणार नाहीं. पीतांबर सांगतो, कलिकाभङ्ग निषिद्ध आहे, हा धर्म, अकालीं कार्य सुरू केलें कीं उपहास होतो, ही नीति.

## ४४५ अकृतज्ञ : 445 Ingratitude

अकअण्णुअ ! तुज्झ कए पाउसराईसु जं मए खुण्णम् ।
उप्पेक्खामि, अलज्जिर ! अज्ज वि तं गामचिक्खल्लम् ॥४॥

[ अकृतज्ञ तव कृते प्रावृड्रात्रिषु यो मया क्षुण्णः[१] ।
उत्पश्याम्यलज्जाशील अद्यापि त ग्रामपङ्कम् ॥ ]

निर्लज्जा, पावसाळ्यातल्या रात्रीं मी तुझ्यासाठीं चिखल तुडवीत गावभर भटकलें चिखल अजून वाळलाही नाहीं, ( तोंच तू मला विसरलास ). अकृतज्ञ

१ खुन्जम् २ भग्नम् ३ उत्प्रेक्षते, उत्प्रेक्ष्यामि

## ४४६ उडती परी : 446 Madonna

रेहइ गलेन्तकेसंखलन्तकुण्डलंलन्तहारलआ ।
अद्धुप्पइआ विज्जाहरि व्व पुरुसाइरी वाला ॥४६॥

[ राजते गलत्केशस्खलत्कुण्डलललद्धारलता ।
अर्धोत्पतिता विद्याधरीव पुरुषायिता वाला ॥ ]

पुरुषायित करणाऱ्या बालेचे कुन्तल निगळित झाले आहेत, तिचीं कुण्डलें विचलित झालीं आहेत आणि तिच्या गळ्यातला हार ओघळत आहे उड्डाण करणाऱ्या विद्याधरीप्रमाणें ती शोभत आहे.

● अप्सराचे चरण भूमीला लागत नाहीत असा कविसंकेत आहे. ही गाथा वाचताना अजळ्याच्या विद्याधरीची आठवण होते.

## ४४७ सुलभा : 447. Rambler.

जइ भमसि, भमसु एमेअ कण्ह ! सोहग्गगव्विरो गोट्ठे ।
महिलाणं दोसगुणविआरक्खमो अज्ज वि ण होसि ॥४७॥

[ यदि भ्रमसि भ्रम एवमेव कृष्ण सौभाग्यगर्वितो गोष्ठे ।
महिलानां दोषगुणौ विचारक्षमोद्यापि न भवसि ॥ ]

कृष्णा, तुला आपल्या सुदैवाचा गर्व झालेला आहे तू गोठ्या-गोठ्यातून खुशाल हिंडत रहा तुला अजून स्त्रियांच्या गुणदोषाची पारखच नाहीं

१ सुअत, विअलन्त २ केसहत्थ ३ चलन्त ४ उध्दुप्पइआ ५ विरल. ६ केशसमूह ७ ऊर्ध्वोत्पतिते ८ महिलाण दोसगुणे विचारइऊ जइ समों सि। ९ विराइउ, विचारयितु

● नायिका सांगते, मत्सदृशी वल्लभा दुर्लभा. गुणगर्वितेची दर्पोक्ति-स्त्रियांच्या गुणदोषांची पारख करण्याचें ज्ञान अनुभवानें प्राप्त झालें कीं तूं माझ्याकडेच येशील. येथे मी स्वीकारलेला अर्थ अधिकृत नाहीं, पण यथार्थ आहे.

## ४४८ कोपपान : 448 Ordeal.

संझासमए जलपूरिअञ्जलि विहडिएक्कवामअरम् ।
गोरीअ कोसपाणुज्जअं व पमहाहिवं णमह ॥४८॥
[ सन्ध्यासमये जलपूरिताञ्जलिं विघटितैकवामकरम् ।
गौर्यै कोषपानोद्यतमिव प्रमथाधिपं नमत ॥ ]

संध्यासमयीं जणूं कोपपान करण्यासाठीं ज्यानें ओंजळींत जल घेतलें आहे आणि ज्याचा डावा हात गौरीनें अलग केलेला आहे त्या प्रमथाधिप शंकराला नमन असो.

● दुसऱ्या कोणावरही आपली प्रीति नाहीं ह्याबद्दल गौरीची खात्री करण्यासाठीं शंकरानें कोषपानाचें दिव्य करावयाचें ठरविलें. पार्वतीला संध्येबद्दल इतकी ईर्ष्या व शंकराच्या अपराधित्वाबद्दल तिची इतकी खात्री कीं तिनें त्याच्या हाताला हिसका दिला व त्यामुळें अञ्जलींतलें जल गळून गेलें. दूती नायकाला सांगते, प्रियेच्या समाधानासाठीं दिव्यही करावें लागतें; अनुनयपराङ्मुख होऊन किंवा संकोच करून कसें चालेल ?

## ४४९ अखेरची दृष्टि : 449. Parting Glance.

गामणिणो सव्वासु वि पिआसु अणुमरणगहिअवेसासु ।
मम्मच्छेएसु वि वल्लहाइ उवरी वलइ दिट्ठी ॥४९॥

[ ग्रामण्या सर्वास्वपि प्रियास्वनुमरणगृहीतवेषासु ।
मर्मच्छेदेष्वपि वल्लभाया उपरि वलते दृष्टिः ॥ ]

पाटील आसन्नमरण झालेला आहे, त्याच्या सर्व स्त्रियांनीं सतीवेष धारण केला आहे प्राण व्याकुळ होत आहे, तरीही त्याची दृष्टि त्याच्या आवडतीकडे वळली.

● त्याचें फक्त आपल्यावरच प्रेम आहे अशी तुझी कल्पना होती, आता तरी भ्रमनिरास झाला ना ? तू नावडती. मग निष्कारण सती का जातेस ?

## ४५० स्वर व संगीत : 450. Cacophony

मामि ! सरसक्खराणँ वि अत्थि विसेसो पअम्पिअव्वाणम् ।
णेहमइआणँ अण्णो अण्णो उवरोहमइआणम् ॥५०॥

[ मातुलानि सदृशाक्षराणामप्यस्ति विशेषः प्रजल्पितव्यानाम् ।
स्नेहमयानामन्योऽन्य उपरोधमयानाम् ॥ ]

मामी-शब्द तेच असले तरी अर्थात फरक होतो. प्रेमाचें बोलणें वेगळें आणि उपरोधिक बोलणें वेगळें.

● स्वर बदलले कीं राग बदलतो. बोलण्यातली माधुरी शब्दांच्या निवडीवर अवलंबून नसते, स्वरांच्या कंपनांतूनच खरा भाव प्रकट होतो.

## ४५१ ओठांचे बोल : 451 Lip Service.

हिअआहिन्तो पसरन्ति जाइँ, अण्णाइँ ताइँ वअणाइं ।
ओसरसु ! किं इमेहिं अहरंतरमेत्तभाणिएहि ? ॥५१॥

[ हृदयेभ्य प्रसरन्ति यान्यन्यानि तानि वचनानि ।
अपसर किमेभिरधरोत्तरमात्रभणितैः ॥ ]

१ सुहअ २ ओरहभणिआण, उवरोहमरियाण, ३ ओरमसु ४ हृदयस्थानि ५ अधरान्तर

हृदयापासून निघतात ते बोल वेगळेच असतात. तुमचें बोलणें फक्त ओठांपासून आहे. त्याचा काय उपयोग ? तुम्ही जा पाहूं !

## ४५२ दान : 452. Gift.

कहँ सा सोहग्गगुणं मए समं वहइ, णिग्घिण ! तुमम्मि ?
जीअ हरिज्जइ गोत्तं हरिऊण अ दिज्जए मज्झ ।।५२।।

[ कथ सा सौभाग्यगुणं मया समं वहति निर्घृण त्वयि ।
यस्या ह्रियते नाम हृत्वा च दीयते मह्यम् ॥ ]

ती नाहीं, मीच सुदैवी; कारण तिच्यापासून तिचें नाव हिरावून घेऊन तें तूं मला अर्पण केलेंस. आणि तूं मात्र निर्दय.

● पीतांबर सांगतो, मनुष्यमात्रानें यत्नपूर्वक वचन संवरण करावें अशी नीति आहे. ' रक्षितव्यं सदा वाक्यं वाक्याद्भवति नाशनम् । हंसाभ्यां नीयमानस्य कूर्मस्य पतनं यथा ।' अलंकारकौस्तुभांत पर्यायाचें उदाहरण : ' एकमनेकमनेकैकस्मिन्क्रमतोऽस्ति स पर्यायः । '

## ४५३ शोप : 453. Expansion.

सहि ! साइसु सब्भावेण पुच्छिमो, किं असेसमहिलाणम् ।
वड्ढन्ति करठिआ व्विअ वलआ दइए पउत्थम्मि ।।५३।।

[ सखि कथय सद्भावेन पृच्छामः किमशेषमहिलानाम् ।
वर्धन्ते करस्थिता एव वलया दयिते प्रोषिते ॥ ]

---

१. णिग्गुण २ णाम.

सखि, खरें साग, मी सद्भावानें विचारीत आहे; ज्यांचे पति प्रवासाला जातात त्या सगळ्याच स्त्रियांच्या बागड्या हातातल्या हातांत मोठ्या होतात का ?

● विरहामुळें आपण स्वतः कृश झालों आहोंत याची तिला दादही नव्हती.

## ४५४ हत्तीण : 454. Trunk.

भमइ पलित्तइ जूरइ उक्खिविउं से करं पसारेइ ।
करिणो पङ्कक्खुत्तस्स णेहणिअलइआ करिणी ॥५४॥

[ भ्रमति परितैः खिद्यते उत्क्षेप्तु तस्य करं प्रसारयति ।
करिणः पङ्कनिर्मग्नस्य स्नेहनिगडिता करिणी ॥ ]

हत्ती चिखलात फसला आहे. त्याच्या स्नेहानें निगडित झालेली हत्तिण त्याच्या भोंवतीं फिरते; दु:ख, संताप व चीड व्यक्त करते आणि त्याला वर उचलण्यासाठीं आपली सोंड देते.

● जोडीदार संकटात सांपडला असता जनावरें सुद्धा त्याचा त्याग करीत नाहींत, त्याचा उद्धार करण्याची खटपट करतात; आणि तूं ! रोगी, वृद्ध वा दरिद्री पतीचा त्याग करून परपुरुषाकडे निघाली आहेस, पशूहून हीन आहेस; तुझा धिःकार असो.

१ पलित्तो विगूरइ, परितो जूरइ, पलिप्पइ २ खुत्तस्स, गुत्तस्स ३ णिअलिआ ४. परितं कृप्यति खिद्यते ५ परिलमा ६ पङ्कनिमग्नस्य ७. निगलयिता.

## ४५५ प्रसंगावधान : 455. Tact.

रइकेलिहिअणिअंसणकरकिसलअरुद्धणअणजुअलस्स ।
रुद्दस तइअणअणं पव्वइपरिउम्बिअं जअइ ॥५५॥

[ रतिकेलिहृतनिवसनकरकिसलयरुद्धनयनयुगलस्य ।
रुद्रस्य तृतीयनयनं पार्वतीपरिचुम्बितं जयति ॥ ]

विलास करतांना शंकरानें पार्वतीला विवस्त्र केलें; तेव्हां तिनें प्रसंगावधान राखून आपल्या करकमलांनीं शंकराचे दोन्ही डोळे झांकले व त्याच्या तृतीय नेत्राचें चुंबन घेतलें; त्याचा विजय असो.

● रतिसंभ्रमातही पार्वतीनें अवधान सांभाळलें. भिवईखालच्या नेत्राहून कपाळावरल्या नेत्राचें स्थान उच्च; म्हणून दोन डोळ्यांना केवळ करस्पर्शाचा लाभ झाला आणि तृतीय नेत्राला चुंबनाचा; कारण तो उत्कृष्ट व अद्वितीय, शंकराचें प्रतीक म्हणून त्याचा विजय असो. नग्न स्त्रीचें दर्शन शास्त्रकारांनीं निषिद्ध मानलेलें आहे. पीतांबरानें आधार दिला आहे; 'अरं (अन्नं) भुङ्क्ते चिरं स्नाति दत्तं पुष्पं न जिघ्रति । न पश्यति स्त्रियं नग्नां मत्प्रियास्तेनमाधवः (अप्रियस्ते न मानवाः) ॥ इति लक्ष्मीवचनं.' शंकराला हा दोष लागूं नये म्हणूनच पार्वतीनें ही खबरदारी घेतली कीं काय? कुमारसंभवांत (८·७) कालिदास सांगतो : "शूलिनः करतलद्वयेन सा । संनिरुध्य नयने हृतांशुका ॥ तस्य पश्यति ललाटलोचने । मोघयत्नविधुरा रहस्यभूत् ॥" येथें पार्वतीचा प्रयत्न विफल झालेला आहे; शालिवाहनानें तिला वैदग्ध्य व व्यवधान देऊन यशस्वी केलें आहे. तिच्यापेक्षा ही अधिक चतुर!

१. परिहासवासछोडण.

४५६ चूतलतिका : 456. Sadism.

घावइ पुरओ, पासेसु भमइ, दिट्ठीपहम्मि संठाइ ।
णवलइकरस्स तुह हलिअउत्त ! दे पहरंसु वराइम् ॥५६॥

[ धावति पुरतः पार्श्वयोर्भ्रमति दृष्टिपथे संतिष्ठते ।
नवलतिकाकरस्य तव हलिकपुत्र हे प्रहरस्य वराकीम् ॥ ]

शेतकऱ्याच्या पोरा, ती तुझ्या पुढें पुढें करीत आहे, तुझ्या आजूबाजूला घोंटाळत आहे, पण दृष्टिपथाच्या बाहेर मात्र जात नाहीं; तुझ्या हातातल्या वेलीच्या फोंकाचा एक फटका उडव पाहूं विचारीवर !

● अडाण्या, तिला चूतलतिका क्रीडेची हौस आहे, एवढें मुद्दां तुला कसें समजत नाहीं ? माराच्या भीतीनें ती पळत आहे असें मानू नको. विचारी, कारण तिला जें हवें आहे तें तुला उमजत नाहीं.

४५७ आनन्दपट : 457. Bridal Banner.

कारिममाणन्दवड भामिज्जन्तं वहूअ सहिआहिं ।
पेच्छइ कुमारिजारो हासुम्मिस्सोहिं अच्छीहिं ॥५७॥

[ कृत्रिममानन्दपटं भ्राम्यमाणं वध्वा सखीभिः ।
प्रेक्षते कुमारीजारो हासोन्मिश्राभ्यामक्षिभ्याम् ॥ ]

वधूच्या मैत्रिणी कृत्रिम आनंदपट मिरवूं लागल्या. तिचा कौमार्यातील प्रियकर सहास्य मुद्रेनें व विकसित नेत्रांनीं हें दृश्य पाहातच राहिला.

● वधूच्या मैत्रिणी तिच्या कृत्रिम कौमार्याची जाहिरात करीत होत्या. जें कृत्रिम तें हास्यास्पद असावयाचेंच.

१ पहरसु २ प्रजाहि ३. वंधूदि. ४ हरिगपुम्हेहि. ५. हर्षोत्फुल्लाभ्यां.

४५८ मदनपट : 458. Cold Cream.

सणिअं सणिअं ललिअङ्गुलीअ मअणवडलाअणमिसेण।
बन्धेइ धवलवणवट्टअं व वणिआहरे तरुणी ॥५८॥
[शनकैः शनकैर्ललिताङ्गुल्या मदनपटलापनमिषेण ।
बध्नाति धवलव्रणपट्टमिव व्रणिताधरे तरुणी ॥]

नाजूक अङ्गुलीवर मेण घेऊन ती तें हळुवारपणें ओठांना लावीत आहे. जणूं ओठावरल्या जखमावर ती पांढरी पट्टीच लावीत आहे.

● मदन म्हणजे मेण. दंतव्रणावर लावण्याच्या लेपाला मदनपट हें नाव किती यथार्थ आहे! थंडीनें ओठ फुटले तर त्यावर कोकम तेल लावतात. 'निघट्टरत्नाकरा'त मदन याला कोशाम्र = लाल रान अंबा (कोकम) असाही अर्थ दिलेला आढळतो. ह्या गाथेंतील वर्णन किती वास्तविक आहे पहा : अजूनही ओठांना अङ्गुलीनेंच लेप केला जातो; सर्व बोटांत अङ्गुली नाजूक म्हणून आणि थोडाबहुत नखराही !

४५९ घाई : 459. Haste.

रइविरमलज्जिआओ अप्पत्तणिअंसणाओ सहस व्व ।
ढक्कन्ति पिअअमालिङ्गणेण जहणं कुलवहूओ ।।५९॥
[रतिविरामलज्जिता अप्राप्तनिवसनाः सहसैव ।
आच्छादयन्ति प्रियतमालिङ्गनेन जघनं कुलवध्वः ॥]

सुरत संपल्यानंतर वस्त्र सापडलें नाहीं म्हणून कुलवधू लज्जित झाली; जघन झाकण्यासाठीं तिनें प्रियतमाला घाईघाईनें हसतें आलिंगन दिलें.

---

१ अङ्गुलीहिं, अग्गङ्गुलिआ, मयणङ्गुलिआ २ अग्राङ्गुल्या, मदनाङ्गुल्या.
३ णिअसणा हसन्तीओ

● केवळ वित्रस्त होती म्हणूनच ती लज्जित झाली, की हा पहिलाच प्रसंग होता म्हणून ! पीतावर सागतो, पतीला अपेक्षित असें आचरण करणें, हा धर्म. पण येथें तर तिनें जें आचरण केलें तें त्याला अनपेक्षित होतें; शिवाय, तो सागतो, विषय विरामस्थितीप्रत पोंचताच विरस होतो, ही नीति ! अमरुशतकांतील वचन ( ध्रुव प्रत : १८ ) पहा : " सुरतविरतौ क्रीडावेशश्रमश्लथहस्तया। रहसि गलितं तन्व्या प्राप्तुं न पारितयांशुकं ।। रतिरसजडैरङ्गैरङ्गं पिधातुमशक्यया। प्रियतमतनौ सर्वाङ्गीणं प्रविष्टमधृष्टया ।। "

## ४६० कण्डु : 460. Eyelid.

पाअडिअं सोहग्गं तम्बाए, उअह ! गोट्ठमज्झम्मि।
दुट्ठवसहस्स सिङ्गे अक्खिउडं कण्डुअन्तीए ।।६०।।

[ प्रकटितं सौभाग्यं गवा[1] पश्यत गोष्ठमध्ये।
दुष्टवृषभस्य शृङ्गे अक्षिपुटं कण्डूयन्त्या ।। ]

पहा, गोठ्यांत तांबी गाय आपलें सौभाग्य प्रकट करीत आहे. बैल मारका आहे खरा, तरी पापणीला सुटलेली खाज शमविण्यासाठीं ती त्याच्या शिंगावर डोळा घांशीत आहे.

● नवरा तापट आहे, पण हिला त्यानी धास्ती वाटत नाही; त्याला पुष्कळ बायका आहेत, पण हिच्यापुढें त्याचें कांही चालत नाही. दादानें घळ पहिनीला माहीत !

१. धवल. २. ताम्रया. ३. अपद.

## ४६१ झेंडा : 461. Flag.

उअ संभमविक्खित्तं रमिअव्वअलेहलाएँ असइँए ।
णवरङ्गअं कुडङ्गे धअं व दिण्णं अविणअस्स ॥६१॥

[ पश्य सम्भ्रमविक्षिप्तं रमितस्यकलम्पट्या असत्या
नवरङ्गकं कुञ्जे ध्वजमिव दत्तमविनयस्य ॥ ]

पहा, लम्पट स्वैरिणीनें आपलें नवें रंगीत वस्त्र बेभानपणें कुञ्जावर फेंकून दिलें आहे. जणूं तिच्या उनाडपणाचा, झेंडाच असें तें फडकत आहे.

◉ वेबर सांगतो, तिनें फक्त आपली चोळी काढून झाडावर फेंकली होती. टीकाकार सांगतात, हा ध्वज तिच्या सासूला दिसला आणि ओळखला. गावानजीक माळावर किंवा रानांत कोल्हाट्याचीं पालें पडतात, तेव्हा असेच भडक झेंडे फडफडतांना दिसतात.

## ४६२ पुण्यप्रभाव : 462. Reaction.

हत्थप्फंसेण जरग्गवी वि पण्हअइ दोहअगुणेण ।
अवलोअणपण्हुइरिं पुत्तअ ! पुण्णेहिँ पाविहिसि ॥६२॥

[ हस्तस्पर्शेन जरद्गव्यपि प्रस्नौति दोहदगुणेन ।
अवलोकनप्रस्नवनशीलां पुत्रक पुण्यैः प्राप्स्यसि ॥ ]

धार काढणारा कुशल असला म्हणजे त्याच्या हाताचा नुसता स्पर्श झाला कीं म्हातारी गाय सुद्धा पान्हावते. पुत्रा, नुसत्या दृष्टिक्षेपानें अनुरक्त होणारी स्त्री पुण्याईमुळेंच प्राप्त होते.

---

१. उह. २. लम्पडाएँ, लेहडाइ, सणेहलाइ ३. तरुणीए, सोण्हाए. ४. रतिरङ्गक, नवसंगम. ५. स्निग्धया, स्नेहलया. ६. सिंदूरीवस्त्रम्, कुसुम्भवस्त्रम्. ७. दुक्खेहिं. ८. दोहक.

● हस्तकौशल्यानें भाकड गाय पान्हवते, त्याचप्रमाणें अनुनयानें प्रौढा प्रसन्न होते पुण्याईच्या प्रभावामुळें पहिल्या दृष्टिक्षेपातच नायिका तुझ्यावर अनुरक्त झाला आहे आता विलम्ब करू नको

## ४६३ मेखलिका : 463 Waist Chain.

मसिणं चङ्कम्मन्ती पेए पए कुणड कीस मुहभङ्गम् ? ।
णूण से मेहलिआ जहणगअ छिनइ णहवन्तिम् ॥६३॥

[मसृण चङ्क्रम्यमाणा पदे पदे करोति किमिति मुखभङ्गम् ।
नून तस्या मेखलिका जघनगता स्पृशति नखपङ्क्तिम् ॥]

ती अगदीं मंद गतीनें चालत आहे, तरी चालताना पावलोपावलीं होणारा त्रास तिच्या मुखावर दिसत आहे तिचा मेखला पदोपदीं तिच्या जघनावरील नखक्षतावर घासत आहे

● हे बाह्योपचार नुकतेच झाले असले पाहिजेत अशी सूचना ही मेखलिका कडदोऱ्यासारखी असावी, त्याशिवाय ती जघनांवर ओघळणार नाही. ग्राम्य स्त्रियाहना असे कडदोरे अजूनही वापरतात

## ४६४ विक्रमादित्य : 464 Munificence

सवाहणसुहरसतोसिएण देन्तेण तुह करे लक्खम् ।
चलणेण विक्कमाइत्तचरिअँ अणुसिक्खिअं तिस्सा ॥६४॥

[संवाहनसुखरसतोषितेन ददता तव करे लाक्षाम् ।
चरणेन विक्रमादित्यचरितमनुशिक्षितं तस्या ॥]

१ सण गम २ विक्कमाइच, विक्कमादित्त, विक्कमच ३ अनुपादिअ
४ चरणग्गाधन ५ लम्खम् ६ अनुर्यान

तूं तिचें पादसंवाहन केलेंस तेव्हां संतुष्ट होऊन आपल्या पायांना लावलेला लाक्षारस तिनें तुला अर्पण केला; जणूं खुद्द विक्रमादित्या-पासून तिला हें शिक्षण मिळालें होतें.

● संवाहण = पादसंवाहन आणि शत्रुमर्दन; लक्खम् = लाक्षारस आणि लक्ष मुद्रा. तिच्या पायांना लाखेचा रंग लावलेला होता. प्रियकर तिचे पाय चुरूं लागला तेव्हां तो रंग त्याच्या हातावर उमटला. विक्रमादित्य प्रसन्न झाला म्हणजे शत्रूंना जेरीस आणणाऱ्या शूरांना लाखांनीं देणग्या देत असे. तुझ्या संवाहनानें ती संतुष्ट झाली आणि विक्रमादित्याचें अनुकरण करून तिनें तुझ्या हातावर लाक्षामुद्रा ठेवल्या. एका पत्नीचे चरण चुरून पति दुसरीकडे आला. हिनें त्याचें लक्षण ओळखलें आणि ईर्ष्येनें हे उद्गार काढले. अलंकारकौस्तुभांत सूक्ष्म अलंकाराचें उदाहरण : 'प्रतिमाति-शयाज्ज्ञातो यद्याकारेङ्गितादर्थः। विशदीक्रियतेऽन्यस्मै तथैव तत्सूक्ष्म-मित्युक्तम् ॥

## ४६५ अपेक्षाभंग : 465. Forfeiture.

पाअपडणाणँ, मुद्धे ! रहसबलामोडिचुम्बिअव्वाणमं[1] ।
दंसणमेत्तपसण्ण[2] ! चुक्कासि[3] सुहाणँ[4] बहुआणम् ॥६५॥

[ पादपतनानां मुग्धे रभसबलात्कारचुम्बितव्यानाम्[5][6] ।
दर्शनमात्रप्रसन्ने भ्रष्टासि[7] सुखानां बहुकानाम् ॥ ]

अनुनय करतांना तो तुझ्या पायां पडला असता, त्यानें बलात्कारानें तुझें चुंबन घेतलें असतें. मुग्धे, नुसत्या दर्शनानें तूं त्याच्यावर प्रसन्न झालीस आणि या व अशा अनेक सुखांना मुकलीस.

---

१. बलामोडिअचिअव्वाणम्. २. पसिज्झिरि. ३. चुक्किहिसि. ४. सोक्खाणँ. ५. रभसबलान्मौलि. ६. बलात्कृतार्चितव्यानाम् ७. मुक्तासि.

● अपराधी पतीवर एकाएकीं प्रसन्न झालेल्या नायिकेचा निषेध. धारण केला नाहीं तर मान रहातही नाहीं. पादवंदनावांचून प्रेमाची समस्या पुरी होत नाहीं; त्यावाचून देव प्रसन्न होत नाहीं, मग देवी कशी प्रसन्न होणार ! ही अधीरा प्रसन्न झाली व आळवणीला मुकली.

## ४६६ मृगाक्षि : 466. Festival.

दे सुअणु ! पसिअ एण्हिं, पुणो वि सुलहाइं रुसिअव्वाइं ।
एसा मआच्छि ! मअलञ्छणुज्जला गळइ छणराई ॥६६॥

[ हे सुतनु प्रसीदेदानीं पुनरपि सुलभानि रोषितव्यानि।
एषा मृगाक्षि मृगलाञ्छनोज्ज्वला गलति क्षणरात्रिः ॥ ]

मृगाक्षि, मृगलांछन चंद्राच्या प्रकाशानें उज्ज्वल झालेली उत्सवाची रात्र संपत आली आहे. सुतनु, आतां प्रसन्न हो, पुन्हा रागावणें सोपें आहे.

● रुसण्याला योग्य असे प्रसंग पुन्हां येतील, पण अशी रात्र पुन्हा येणार नाहीं. सुभग हा पाठ घेतला तर दोघांनींही मानग्रहण केलेलें आहे व सखी त्यांचा समेट करीत आहे; पहिला चरण नायकाला उद्देशून व दुसरा नायिकेला.

## ४६७ शालिवाहन : 467. Uplift.

आवण्णाइँ कुलाइं दो व्विअ जाणन्ति उण्णइं णेउम् ।
गोरीअ हिअअदइओ, अहवा सालाहणणरिन्दो ॥६७॥

[ आपन्नानि कुलानि द्वावेव जानीत उन्नतिं नेतुम् ।
गौर्या हृदयदयितोऽथवा शालिवाहननरेन्द्रः ॥ ]

१. सुदअ. २. णाहो. ३. सालिवाहन, सालवाहन, सालिवाहन. ४. आपण्णाति.

विपन्नावस्थेतलि कुलाचा उद्धार करणें फक्त दोघेच जाणतात; एक गौरीचा हृदयेश्वर आणि दुसरा शालिवाहन.

● नायिका कामार्ता आहे, तिचें समाधान तूंच करूं शकशील, असें सुचविण्यासाठीं दूतीनें हे उद्गार काढलेले आहेत, असें गंगाधर सुचवितो. ही सूचना गाथेंत कशी अभिप्रेत आहे हें समजत नाहीं. वेबरनें वेगळाच अर्थ सुचविला आहे : अपर्णा म्हणजे दुर्गा पार्वती आणि कुल म्हणजे देऊळ; शालिवाहनानें अपर्णेच्या देवळाचा जीर्णोद्धार नुक्ताच केलेला असावा आणि म्हणून त्याची तुलना शंकराशीं करण्यात आली असावी. पीतांबर सांगतो, दारिद्र्यानें गांजलेलें दांपत्य भविष्याबद्दल विचार करीत असताना पत्नी पतीला सांगते, आपला उद्धार एक शंकर करील किंवा शालिवाहन. शंकर-पार्वती विमानातून प्रवास करीत असताना कोणा दुःखिताचे आर्त उद्गार त्याच्या कानीं गेले आणि त्यानीं त्याच्या दुःखाचें निवारण केलें, या पार्श्वभूमीवर अनेक कथा उभारलेल्या आहेत. शालिवाहनाच्या बाबतींतही असाच प्रसंग झाला असल्याचा संभव आहे. त्या वेळीं ताजा असलेला असाच एखादा प्रसंग या गाथेंत अभिप्रेत असावा असें वाटतें.

## ४६८ पाटली : 468. Mischief.

णिक्कण्ड दुरारोहं पुत्तअ ! मा पाडलिं समारुहसु ।
आरूढणिवडिआ के इमीअ ण कआ हआसाए ? ॥६८॥

[ निष्कौण्डदुरारोहां पुत्रक मा पाटलिं समारोह ।
आरूढनिपतिताः के अनया न कृता हताशया ॥ ]

१. णिक्खध, दुक्कन्ध, दुक्कान्ध, निग्गड २. हअग्गामे, इहग्गामे. ३. निष्कन्ध, निर्गण्ड. ४. इह ग्रामे.

पुत्रा, पाटलीच्या झाडाला फांबा नाहींत, म्हणून तें चढावयाला अवघड आहे. त्यावर चढूं नको; त्या दुष्टानें वर चढणाऱ्या कोणाला पाडलें नाहीं ?

● पाटली हें वृक्षनाम व स्त्रीचें विशेषनामही आहे. ती कुटिल आहे, तिनें अनेकांचा हिरमोड केला आहे, अनेकांची धूळधाण केली आहे. तिच्या नादीं लागूं नको. पण्डित मथुरानाथ शास्त्री 'हताशया' या शब्दावरून सुचवितात : आम्हीही अशा पडलेल्यापैकीच आहोंत, म्हणून आमच्यावर विश्वास ठेव, अशी सूचना. काव्यानुशासनात संकराचें उदाहरणः " स्वातन्त्र्याङ्गत्वसंशयैकपद्यैरेषामेकत्र स्थितिः संकरः । "

## ४६९ संधान : 469. Indication.

गामणिघरम्मि, अत्ता ! एक्क च्चिअ पाडला इह ग्गामे ।
बहुपाडलं च सीसं दिअरस्स, ण सुन्दरं एअम् ॥६९॥

[ ग्रामणिगृहे श्वश्रु एकैव पाटला इह ग्रामे ।
बहुपाटलं च शीर्षं देवरस्य न सुन्दरमेतत् ॥ ]

सासूबाई, आपल्या गांवांत पाटलीचें एकच झाड आहे आणि तें पाटलाच्या घरांत आहे. अलीकडे भाऊजींच्या डोक्यावर पुष्कळदां पाटलपुष्पें दिसतात, हें ठीक नाहीं.

● भाऊजींनीं पाटलिणीशीं संधान बांधलेलें दिसतें.

## ४७० कटाक्ष : 470. Optics.

अण्णाण वि होन्ति मुहे पम्हलधवलाइँ दीहकसणाइं ।
णअणाइँ सुन्दरीणं, तह वि हु दट्ठुं ण जाणन्ति ॥७०॥

१ गामिणि. १. आणन्ति, यानन्ति.

[ अन्यासामपि भवन्ति मुखे पक्ष्मधवलानि दीर्घकृष्णानि ।
नयनानि सुंदरीणां तथापि खलु द्रष्टुं न जानाति ॥ ]

लांब पापण्या असलेले, स्वच्छ, विशाल व काळेभोर डोळे अनेक स्त्रियांना असतात, पण अशा नेत्रांनीं पहावयाचें कसें हें सर्वांनाच समजतें असें नाहीं.

● कटाक्ष ही एक कला आहे. कोणाचे अंगीं ती नैसर्गिक असते तर कोणी ती अभ्यासानें, अनुभवानें अगर अनुकरणानें प्राप्त करून घेतात. भुजंगप्रलोभनासाठीं दूतीनें केलेलें नायिकेचें वर्णन. अलंकारकौस्तुभांत व्यतिरेकाचें उदाहरण : ' वर्णनीयनायिकानिष्ठविजातीयदर्शनप्रतियोगिकसादृश्यवद्दर्शनानभिज्ञत्वमितरनायिकानाम् । '

## ४७१ शरणागति : 471. Flight.

हंसेहि ँ व तुह रणजलअसमअभअचलिआविहलवक्खेहिं ।
परिसेसिअपोम्मासेहि ँ माणसं गम्मइ रिऊहिं ॥७१॥

[ हंसैरिव तव रणजलदसमयभयचलितविह्वलपक्षैः ।
परिशेषितपद्माशैर्मानसं गम्यते रिपुभिः ॥ ]

ढग गडगडूं लागले कीं जलवर्षावाच्या भीतीनें हंस विव्हल होतात आणि उरलेल्या कमलांची आशा सोडून ते पंख फडफडवीत मानस सरोवराकडे धांव घेतात. (राजा), तुझे शत्रु त्यांचेंच अनुकरण करतात.

● वर्षावर्णनाच्या निमित्तानें राणीनें केलेली राजाची स्तुति. दुसरा अर्थ असाः राजा, तुझ्याशीं युद्धप्रसंग ओढवला व नौबती घडाडूं लागल्या कीं बाणाच्या वर्षावाच्या भीतीमुळें तुझे शत्रु व त्याचे पक्षपाती विव्हल होतात आणि यशाची आशा सोडून तुझ्या इच्छेकडे धांव घेतात, तुला शरण

१. वलिअ, गलिअ.

येतात. पावसाळ्यांत हंस उत्तरेकडे धांव घेतात हा संकेत प्रसिद्ध आहे. उत्तरेकडे धाव घेणाऱ्या हंसाशीं राजाच्या शत्रूंची तुलना केलेली असल्यामुळें हा राजा दाक्षिणात्य असावा आणि त्याचे शत्रु उत्तर हिंदुस्थानी असावेत असा तर्क करण्यास जागा आहे.

## ४७२ डोहाळे : 472. Fancy.

दुग्गअधरम्मि घरिणी रक्खन्ती आउलत्तणं पइणो ।
पुच्छिअदोहलसद्धा पुणो वि उअअं विअ कहेइ ।।७२।।

[ दुर्गतगृहे गृहिणी रक्षन्ती आकुलत्वं पत्युः ।
पृष्टदोहदश्रद्धा पुनरप्युदकमेव कथयति ॥ ]

दुर्गतीला गेलेल्या कुटुंबांतील गर्भिणी गृहिणीला कोणी विचारलें कीं तुला कसले डोहाळे लागले आहेत, तर ती फक्त पाणी मागते आणि पतीची विपन्नावस्था प्रकट होऊं देत नाहीं.

● येथेंही टीकाकार सांगतात कीं ती अल्पायासानें साध्य आहे !

## ४७३ ओलेती : 473. Red and White.

आअम्बलोअणाणं ओल्लंसुअपाअडोरुजहणाणम् ।
अवरह्णमज्जिरीणं कए ण कामो वहइ चावम् ।।७३।।

[ आताम्रलोचनानामार्द्रांशुकप्रकटोरुजघनानाम् ।
अपराह्णमज्जनशीलानां कृते न कामो वहति चापम् ॥ ]

ऐन दुपारीं पाण्यांत डुंबणाऱ्या स्त्रियांचे डोळे लालसर झाले आहेत, अंगाला चिकटलेल्या ओल्या वस्त्रांतून त्यांच्या मांड्या व जघन प्रकट

१. उत्तुंसुअ.

होत आहेत. त्यांच्यासाठीं मदनाला आपलें धनुष्य हातीं घ्यावें लागत नाहीं.

● रागानें, त्याचप्रमाणें अनुरागानें डोळे लाल होतात. स्त्रियांचें सौंदर्य अवगुंठित असतें तोंवरच मदनाला धनुष्याचें प्रयोजन!

## ४७४ अनुक्रमणिका : 474. Ledger.

के उव्वरिआ? के इह ण खण्डिआ? के ण लुत्तगुरुविहवा? ।
णहराइं वेसिणिओ गणणारेहा उव वहन्ति ॥७४॥

[ के उर्वरिताः के इह न खण्डिताः के न लुप्तगुरुविभवाः ।
नखराणि वेश्या गणनारेखा इव वहन्ति ॥ ]

कोण कोण राहिले ? कोणाचा व्रतभंग करावयाचा राहिला ? कोणाची संपत्ति लुटावयाची राहिली ? जणूं याचीच गणना करण्यासाठीं वेश्या नखरेखा धारण करतात.

● हें पटत नाहीं. या रेखा ही फार तर जिंकलेल्यांची गणना असें म्हणता येईल.

## ४७५ मंथन : 475. Separation.

विरहेण मन्दरेण व हिअअं दुद्धोअहिं व महिऊण ।
उम्मूलिआइँ, अव्वो ! अम्हं रअणाइँ व सुहाइं ॥७५॥

[ विरहेण मन्दरेणेव हृदयं दुग्धोदधिमिव मथित्वा ।
उन्मूलितानि कष्टमस्माकं रत्नानीव सुखानि ॥ ]

१. उचरिआ. २. क्खुडिआ. ३. उद्वृत्ता॰, उद्धताः ४. लब्ध.

हाय, विरहाच्या मंदर पर्वतानें माझ्या हृदयाचें दुग्धसागराप्रमाणें मंथन करून त्यांतील सुखाचीं रत्नें काढून घेतलीं.

● माझें हृदय दुग्धसागराप्रमाणें निष्पाप व गंभीर आहे. समुद्रमंथन करून काढलेलीं रत्नें प्रलयापर्यंत पुन्हा सागरात प्रविष्ट होत नाहींत. त्याच-प्रमाणें मी आता सुखाना पारखी झालें आहे.

## ४७६ कुशंका : 476. Dilemma.

उज्जुअरए ण तूसइ वक्कम्मि वि आअमं विअप्पेइ।
एत्थ अहव्वाएँ मए पिए पिअं कहँ णु काअव्वम् ? ॥७६॥

[ ऋजुकरते न तुष्यति वक्रेऽप्यागमं विकल्पयति।
अत्राभव्यया मया प्रिये प्रियं कथं नु कर्तव्यम् ॥ ]

मीच दुर्दैवी. सरळ रीतीनें तो संतुष्ट होत नाहीं आणि नखरे केले तर त्याला कुशंका येते. अशा स्थितीत मी काय करूं ? त्याची हौस कशी पुरवूं ?

● पतीला आवडेल असें वागावें असा अनुभवी सखीनें नववधूला उपदेश केला, त्याला वधूचें उत्तर. सरळ रीतीनें वागलें तर त्याला वाटतें ही अडाणी आहे आणि जरा चुणूक दाखवली कीं त्याला वाटतें ही शिकलेली आहे. स्त्रियांच्या बाबतींत पुरुषाची वृत्ति संमिश्र असते. त्याला वाटतें कीं आपली पत्नी गणिकेसारखी विदग्ध व कुशल असावी. आणि आपण जिच्याशीं लग्न बांधलें आहे अशी गणिका आपल्याशीं पतिव्रता धर्मानें वागणारी असावी ! अपेक्षा पूर्ण होण्याजोगा वस्तुलाभ झाला कीं चित्तात विकल्प निर्माण होतो. हें पुरुषाचें दुर्दैव आणि स्त्रियांचेंही. पीतांबर सांगतो, व्यवहार सरळपणें करावे, हा धर्म आणि दुर्विदग्धाला प्रसन्न करणें अशक्य आहे, ही नीति : ' अज्ञः सुखमाराध्य सुखतरमाराध्यते

१. आगमं.

विशेषज्ञः । ज्ञानलवदुर्विदग्धं ब्रह्मापि नरं न रञ्जयति ॥ ' अलंकाररत्नाकरात अशक्य अलंकाराचें उदाहरण : ' प्रतिबन्धकादेर्विधानासामर्थ्यमशक्यम् । '

## ४७७ उपाध्याय : 477. Preceptor.

बहुविहविलासरसिए सुरए महिलाणँ को उवज्झाओ ? ।
सिक्खइ असिक्खिआइँ वि सव्वो णेहाणुबन्धेण ॥७७॥

[ बहुविधविलासरसिके सुरते महिलानां क उपाध्यायः ।
शिक्ष्यते अशिक्षितान्यपि सर्वः स्नेहानुबन्धेन ]

स्त्रियांना सुरतांतील बहुविध विलास व रसिकता कोण शिकवितो ? अशिक्षितांनाही स्नेहानुबन्ध हें शिक्षण देतो.

● पत्नीचें कौशल्य अनुभविल्यामुळें साशङ्क झालेल्या पतीनें विचारलें, हें सारें तुला कोणी शिकविलें ? त्याचा आशय ओळखून ती उत्तरली, नाहीं, नाहीं ! हें कोणी शिकविलें नाहीं व हें शिकावेंही लागत नाहीं. प्रेमाचें नैसर्गिक अंतर्ज्ञान हाच स्त्रियाचा उपाध्याय !

## ४७८ वशीकरण : 478. Fascination.

वेण्णसिएव ! विअत्थसि, सच्चं विअ सो तुए ण संभविओ ।
ण हु होन्ति तम्मि दिट्ठे सुत्थावत्थाइँ अङ्गाइँ ॥७८॥

[ वर्णवंशिके विकत्थसे सत्यमेव स त्वया न संभावितः ।
न खलु भवन्ति तस्मिन्दृष्टे स्वस्थावस्थान्यङ्गानि ॥ ]

१. मरिए, रसिते २ रण्णरसिए ३. सचरिओ. ४. वर्णवाशिते, अरण्यरसिके. ५ सचरित ६. सुत्थ, स्वस्थान्यङ्गानि.

त्याच्या गुणांचें फक्त वर्णन ऐकून तूं त्याच्यावर भाळली आहेस, त्याची आपली भेट झालेली आहे अशी फुशारकी तूं मारीत आहेस. हें खरें नाहीं. कारण त्याचें दर्शन झालें कीं शरीर स्वस्थ राहणें शक्यच नाहीं.

● तुला त्याचें दर्शन झालें असतें तर तूं रात्रीनें त्याच्यामागें गेली असतीस. अलंकाररत्नाकरांत अनुमान अलंकाराचें उदाहरणः 'साधनात्साध्यप्रतीतिरनुमानम् ।'

## ४७९ नवज्योत : 479. Novelty.

आसण्णविआहदिणे अहिणववहुसंगमस्सुअमणस्स ।
पढमघरिणीअ सुरअं वरस्स हिअए ण संठाइ ॥७९॥

[ आसन्नविवाहदिने अभिनववधूसंगमोत्सुकमनसः ।
प्रथमगृहिण्याः सुरतं वरस्य हृदये न संतिष्ठते ॥ ]

त्याच्या ( दुसऱ्या ) विवाहाचा दिवस जवळ आला आहे. नववधूच्या अभिनव संगमासाठीं तो उत्सुक झाला आहे. म्हणून प्रथम पत्नीच्या समागमांत त्याचा जीव रमत नाहीं.

● जें प्राप्त झालेलें नसतें तें मिळेपर्यंतच त्याबद्दल उत्सुकता वाटते आणि तें प्राप्त झालें न झालें तोंच नव्या उत्सुकता निर्माण होतात. भिन्न रुचीच्या तृषेवर तर पापपुण्यांचा संघर्ष उभारलेला आहे.

## ४८० रजस्वला : 480. Prohibition.

जइ लोकणिन्दिअं, जइ अमङ्गलं, जइ विमुक्तमज्जाअम् ।
पुप्फवइदंसणं तह वि देइ हिअअस्स णिव्वाणम् ॥८०॥

१. पुप्फवइ दंसणं पुइ तह वि दु मह देइ हिअअणिव्व. २. तव तथापि मम दर्शने हृदये.

[ यदि लोकनिन्दितं यद्यमङ्गलं यदि विमुक्तमर्यादम् ।
पुष्पवतीदर्शनं तथापि ददाति हृदयस्य निर्वाणम् ॥ ]

रजस्वलेचें दर्शन लोकांनीं निंदिलें, अमंगळ ठरविलें, सदाचारा-विरुद्ध मानलें तरी तें हृदयाला जणूं मोक्षसुख देतें.

● दोष समजतो, अपराध उमजतो, पण उत्कण्ठा आवरत नाहीं; मन मनाई जुमानीत नाहीं.

## ४८१ शिवाशीव : 481 Touch and Go.

जइ ण छिवसि पुप्फवइं, पुरओ ता कीस वारिओ ठासि ।
छित्तोसि चुलचुलन्तेहिँ धाविउण अॅम्ह हत्थेहिं ॥८१॥

[ यदि न स्पृशसि पुष्पवतीं पुरतस्तत्किमिति वारितस्तिष्ठसि ।
स्पृष्टोऽसि चुलचुलायमानैर्धावित्वास्माकं हस्तै ॥ ]

मला शिवायचें नाहीं, मला शिवण्याची तुमची इच्छा नाहीं, मग तुम्ही माझ्यासमोर नुसते उभे कशाला राहिला आहांत ? आमचे हात सळसळले, त्यानीं तुम्हाला स्पर्श केला, मी काहीं तुम्हाला शिवलें नाहीं.

● वेबरनें वेगळा अर्थ दिला आहे : तुम्ही जा, नाहीं तर आम्ही हातानीं धरून तुम्हाला घालवून देऊं. गगाधर सागतो, ती पुष्पवती होती हें त्याला माहीत नव्हतें. नेहमींप्रमाणें त्यानें तिला स्पर्श केला, नतर तिची अवस्था समजल्यामुळें तो शरमला, त्याच्या सात्वनासाठीं नायिकेनें हे सविनय उपालम्भोद्गार काढले. तुम्ही मला शिवला नाहींत, मीच तुम्हाला शिवलें—नाहीं, माझे हात शिवले, मी नाहीं. मनुष्य पाप असें हातोहात झटकून टाकतो.

---

१ छिक्कोसि २ चुलचुलन्तेहिं ३ क्षिप्तोऽसि सुप्तोऽसि ४. चुरायमानाभ्या, कण्डूयमानाभ्या, चुरचुरायमानाभ्या, चुलचुलायमाने

## ४८२ लाजरी :    482. Blush.

उज्जागरअकसाइअगुरुअच्छी मोहमण्डणविलक्खा ।
लज्जइ लज्जालुइणी सा सुहअ ! सहीहिँ वि वरोई ॥८२॥

[ उज्जागरककषायितगुरुकाक्षी मोघमण्डनविलक्षा ।
लज्जते लज्जाशीला सा सुभग सखीभ्योऽपि वराकी ॥ ]

हे सुभग, तिचे विशाल डोळे जागरणामुळें लाल झाले आहेत. अलंकारधारण निष्फळ झाल्यामुळें ती विमनस्क आहे. बिचारी लाजरी तर इतकी आहे कीं ती आपल्या मैत्रिणींनाही लाजत आहे.

● टीकाकार सांगतात, हें जागरण विरहाचें होतें गंगाधर सांगतो, सखी नायकाचा अपराध प्रकट करीत आहे. पीतांबर सांगतो, कान्ता-गमनापेक्षेनें तिनें अलंकार धारण केले होते, तो आला नाहीं म्हणून अलंकार निष्फल झाले. मला वाटतें, जागरण, अलंकारधारण व लज्जा यांचा संबंध तिच्या गर्भाधानाच्या समारंभाशीं असावा. आदल्या रात्रीं मैत्रिणींनीं धिंगाणा घातला होता; समारंभाच्या दिवशीं तिला साजशृंगार चढविला तेव्हां भावी घटनेच्या कल्पनेमुळें ती लाजली.

## ४८३ विश्लेषण :    483. Psycho-Analysis.

ण वि तह अइ गरुएण वि तम्मइ हिअए भरेण गब्भस्स ।
जह विपरीअणिहुअणं पिअम्मि सोह्ला अपावन्ती ॥८३॥

[ नापि तथातिगुरुकेणापि ताम्यति हृदये भरेण गर्भस्य ।
यथा विपरीतनिधुवनं प्रिये स्नुषा अप्राप्नुवती ॥ ]

१ भुवनपाल प्रतींतील पाठ गामणिसुआ विरमइ, विहमई कस्स साहेमो ।

सूनबाई गरोदर आहे. गर्भाचा भार मोठा असला तरी तिला त्याचें इतकें दुःख वाटत नाहीं. प्रिय असलेल्या विपरीत रताचा यापुढें लाभ होणार नाहीं यामुळें मात्र तिचें हृदय व्याकुल होतें.

## ४८४ प्रवाद : 484. Improper.

अगणिअजणाववाअं अवहत्थिअगुरुअणं वराईए ।
तुह गलिअदंसणाए तीए वलिउण चिरं रुण्णम् ॥८४॥

[ अगणितजनापवादमपहस्तितगुरुजनं वराक्या ।
तव गलितदर्शनया तया वलित्वा चिरं रुदितम् ॥ ]

तुझें दर्शन दुरावल्यामुळें लोकापवादाची अगर गुरुजनांची पर्वा न करतां बिचारी मान वळवून पुष्कळ वेळ रडली.

## ४८५ प्रेमपत्रिका : 485. Love Letter.

हिअअं हिअए णिहिअं चित्तालिहिअ व्व तुह मुहे दिट्ठी ।
आलिङ्गणरहिआइं णवरं खिज्जन्ति अङ्गाइं ॥८५॥

[ हृदयं हृदये निहितं चित्रालिखितेव तव मुखे दृष्टिः ।
आलिङ्गनरहितानि केवलं क्षीयन्तेऽङ्गानि ॥ ]

माझें हृदय मी तुझ्या हृदयांत ठेवलें आहे. तुझें मुख सन्मुख आहे असें कल्पून त्यावर माझी निश्चल दृष्टि चित्राप्रमाणें स्थिर केली आहे. अङ्गाला आलिंगनसुख मिळत नसल्यामुळें तें मात्र क्षीण होत आहे.

---

१. हिअआइं. २. सिज्जन्ति. ३. दुःखितानि.

## ४८६ सुज्ञ सखी : 486. Life is Short.

अहअं विओअतणुई, दुसहो विरहाणलो, चलं जीअम् ।
अप्पाहिज्जउ कि सहि ! जाणासि तं चेव जं जुत्तम् ॥८६॥

[ अहं वियोगतन्वी दुःसहो विरहानलश्चलं जीवम् ।
अभिधीयेतां[१] किं सखि जानासि त्वमेव यद्युक्तम् ॥ ]

वियोगामुळे मी क्षीण झाले आहे. विरहाची धग मला सहन होत नाहीं. जीवन चंचल आहे. सखी, मी आणखी काय सांगूं ? तुला सारें माहीतच आहे. जें योग्य वाटेल तें कर.

## ४८७ दुर्दैवी : 487. Unfortunate.

तुह विरहुज्जागरओ सिविणे वि ण देइ दंसणसुहाइं ।
बाहेण जहालोअणविणोअणं से हअं तं पि ॥८७॥

[ तव विरहोज्जागरकः स्वप्नेऽपि न ददाति दर्शनसुखानि ।
बाष्पेण यदालोकनविनोदनं तस्या हतं तदपि ॥ ]

तुझ्या विरहामुळें तिला झोंप येत नाहीं ; म्हणून स्वप्नातही तिला तुझें दर्शन घडत नाहीं. जागेपणीं जिवाला विरंगुळा म्हणून तुझी वाट पहात बसावें तर डोळ्यांत सारखे अश्रु आल्यामुळें तिला कांहीं दिसत नाहीं. बिचारी, तिच्यासारखी दुर्दैवी तीच !

---

१. आदिश्यताम्, संदिश्यताम्.

**४८८ द्वेष :** 488. Aversion.

अण्णावराहकुविओ जहतह कालेण गम्मइ पसाअम् ।
वेसत्तणावराहे कुविअं कहँ तं पसाइस्सम्[१] ॥८८॥

[ अन्यापराधकुपितो यथातथा कालेन गच्छति प्रसादम् ।
द्वेष्यत्वापराधे कुपितं कथं तं प्रसादयिष्यामि[२] ॥ ]

आपण कांहीं अपराध केला व त्यामुळें कोणी आपल्यावर राग केला तर कालांतरानें त्याला प्रसन्न करतां येतें. त्याला माझ्याबद्दल द्वेष वाटतो, हाच माझा अपराध. आतां मी त्याला कोणत्या उपायानें प्रसन्न करावें ?

● *माझा कांहींही अपराध नाहीं, मी कांहींही केलें तरी तुम्ही माझ्यावर प्रसन्न होणार नाहीं, हें माहीत असूनही मी अवगत उपचाराचा अवलंब करीत आहे, कारण तें माझें कर्तव्य आहे.*

**४८९ कृत्रिम :** 489. Duplicity.

दीससि, पिआणि जम्पसि[३], सब्भावो सुहअ ! एत्तिअ च्चेअ ? ।
फालेइऊण हिअअं, साहसु ! को दावए कस्स ? ॥८९॥

[ दृश्यसे प्रियाणि जल्पसि सद्भावः सुभग एतावानेव ।
पाटयित्वा हृदयं कथय को दर्शयति कस्य ॥ ]

सुभग, तूं दृष्टीला गोड दिसतोस आणि गोड गोड बोलतोस, एवढेंच तुझें प्रेम. हृदय उघडून कोण कोणाला दाखविणार ?

● पाठभेदाच्या आधारानें वेबर सांगतो, निर्दया, मला दुःख देण्यांतच तुला सुख वाटतें काय ?

१. पसाइस्सं. २. प्रसादयिष्यामि. ३. भण्णसि.

## ४९० रहाटगाडगें : 490 Persian Wheel

उअअं लहिउण उत्ताणिआणणा होन्ति के वि सविसेसम् ।
रित्ता णमन्ति सुइरं रहट्टघडिअ व्व कापुरिसा ॥९०॥

[ उदक लब्ध्वा उत्तानिताननाः भवन्ति केऽपि सविशेषम् ।
रिक्ता नमन्ति सुचिरं रहट्टघटिका इव कापुरुषाः ॥ ]

रहाटाच्या गाडग्यात पाणी भरलेलें असत तोवर त्याचीं तोंडें वर असतात आणि रिकामीं झालीं कीं तीं माना खालीं घालतात दुर्जनाचें वर्तन असेंच असतें.

● अल्पलाभानेंही दुर्जन उन्मत्त होतात गाथाधरानें समानार्थी वचन उद्धृत केलें आहे ' जीवनग्रहणे नम्रा गृहीत्वा पुनरुन्नता । किं कनिष्ठा किमुज्येष्ठा घटीयन्त्रस्य दुर्जना ॥ ' क्षुद्र व कृतघ्न पुरुषाबद्दल नायिकेचे उद्गोद्गार.

## ४९१ ज्योत्स्ना : 491 Flood-Light.

भग्गपिअसंगमं केत्तिअं व जोह्लाजलं णहसरम्मि ।
चॅन्दअरपणालणिज्झरणिवहपडन्तं ण णिट्ठाइ ॥९१॥

[ भग्नप्रियसगमं कियदिव ज्योत्स्नाजल नभःसरसि ।
चन्द्रकरप्रणालनिर्झरनिवहपतन्न निस्तिष्ठति ॥ ]

चंद्रकिरणाच्या परपरेंतून झऱ्याप्रमाणें स्रवणारें चांदणें आकाशाच्या सरोवरात लोटत आहे हा प्रवाह थांबणार नाहीं तोंवर माझी प्रियकराशीं भेट होणार नाहीं.

१ अरघट्ट कूपघटिका ३ ओसर

● अन्वकाराभिसारिकेचे उद्गार विचारीला फक्त कृष्णपक्षातील अधाऱ्या रात्रींच प्रियकराची भेट घेणें शक्य होतें कोणाला अधाराची अडचण, तर कोणाला चादण्याची ।

## ४९२ निर्जन : 492 Wilderness

सुन्दरजुआणजणसंकुले वि तुह दंसणं विमग्गन्ती ।
रण्ण व्व भमइ दिट्ठी वराइआए समुव्विग्गा ॥९२॥
[ सुन्दरयुवजनसकुलेऽपि तव दर्शन विमार्गयन्ती ।
अरण्य इव भ्रमति दृष्टिर्वराकिकाया समुद्विग्ना ॥ ]

सुदर तरुणाची येथें एवढी गर्दी लोटली आहे, तरीही तुला शोधणारी बिचारीची उद्विग्न दृष्टि जणू निर्जन रानात भटकत आहे

● येथे इतके तरुण आहेत, पण ते तिच्या गणतीत नाहीत, ती तुला शोधीत आहे, अशी दूतीची सूचना.

## ४९३ खाष्ट सासू : 493 Mother-in-Law

अइकोवणा वि सासू रुआविआ गअवईअ सोह्लाए ।
पाअपडणोणआए दोसु वि गलिएसु वलएसु ॥९३॥
[ अतिकोपनापि श्वश्रू रोदिता गतपतिकया स्नुषया ।
पादपतनावनतया द्वयोरपि गलितयोर्वलययो. ॥ ]

पतिविरहामुळे क्षीण झालेली सून सासूच्या पाया पडण्यासाठीं वाकली तेव्हा बिचारीच्या दोन्ही हातातल्या बागड्या गळून पडल्या. सासू खाष्ट होती, तरी हें पाहून तिला रडें कोसळलें

१ अणुव्विग्गा अणुव्विण्णा २ सइकोवणा, आइकोवणा ३ दोण्हवि. ४ सदाकोपना

## ४९४ उन्हाळा : 494. Wail

रोवन्ति व्व अरण्णे दूसहरइकिरणफंससंतत्ता ।
अइताराझिल्लिविरुएहिँ पाअवा गिम्हमज्झह्ने ॥९४॥

[ रुदन्तीवारण्ये दुःसहरविकिरणस्पर्शसंतप्ताः ।
अतितारझिल्लीविरुतैः पादपा ग्रीष्ममध्याह्ने ॥ ]

उन्हाळ्यांतल्या दुपारच्या कडक उन्हानें तापलेले अरण्यांतील वृक्ष जणूं त्यावरील कीटकाच्या अति कर्कश स्वरांच्या रूपानें आक्रोश करीत आहेत.

● उन्हाळ्यामुळें अचेतन वृक्षांची एवढी दुर्दशा झाली, मग. नाग-रिकाची काय अवस्था झाली असेल ? प्रवासाला निघालेल्यानें हें रुदन ऐकलें आणि अपशकुन झाला असें मानून तो घराकडे परतला. किंवा संकेता-प्रमाणें त्याची जंगलांत भेट झाली, इतक्यांत कांहीं कर्कश ध्वनि कानीं आल्यामुळें तो दचकला. त्याचा धीर देऊन नायिका सांगते— ऊंः, तो रानकिड्याचा सूर आहे; एवढ्या उन्हांत आणि अशा जंगलात कोणी फिरकणार सुद्धा नाहीं, मुळींच विचकूं नको.

## ४९५ प्रभात : 495. Lotus-Bed.

पढमणिलीणमहुरमहुलोहल्लालिउलबद्धझंकारम् ।
अहिमअरकिरणणिउरम्बचुम्बिअं दलइ कमलवणम् ॥९५॥

[ प्रथमनिलीनमधुरमधुलुब्धालिकुलबद्धझंकारम् ।
अहिमकरकिरणनिकुरम्बचुम्बितं दलति कमलवनम् ॥ ]

---

१. रविअरजरणियरफरससंतत्ता. २. महुअरीलोहिल्लालि. ३. मधुक्करवधू.

मधुर अशा मधूवर लुब्ध असलेल्या भ्रमरांनी अगोदरपासूनच ज्यांत आश्रय घेतलेला आहे व आंतल्या आंत ज्यांचा झंकार चाललेला आहे अशा कमलांचा समुदाय सूर्यकिरणांच्या चुंबनामुळें उमलत आहे.

● संकेताप्रमाणें मी कमळाच्या तळ्याजवळ गेलें आणि त्याची वाट पाहिली पण तो आलाच नाहीं, अशी नायिकेची दूतीजवळ तक्रार. कमलात पूर्वीच निर्लीन झालेल्या मधुश्रीवर लुब्ध असलेले भ्रमर प्रभातकाळीं तिच्या निवासस्थानाभोंवतीं घिरट्या घालीत आहेत ! गंगाधर सांगतो, प्रातःकाळीं स्तुतिपाठ म्हणून राजाला जागृत करणाऱ्या वैतालिकांचें हें गीत असावें.

४९६ बळी : 496. Decoration.

गोत्तक्खलणं सोऊण पिअअमे अज्ज तीअ खणदिअहे ।
वज्झमहिसस्स माल व्व मण्डणं उअह[1] पडिहाइ ।।९६।।

[ गोत्रस्खलनं श्रुत्वा प्रियतमे अद्य तस्याः क्षणदिवसे ।
वध्यमहिषस्य मालेव मण्डनं पश्यत प्रतिभाति ।।

सणाच्या दिवशीं तिच्याशीं बोलतांना त्यानें चुकून दुसरीचें नांव घेतलें तें ऐकतांच अंगावरले अलंकार जणू बळी देण्यासाठीं सज्ज केलेल्या रेड्याच्या गळ्यांत घातलेल्या माळेसारखे तिला वाटले.

● आपल्या अपेक्षा विफल आहेत असें तिला तुझ्या चुकीमुळें समजून आलें आणि तिचा अभिमान हतप्रभ झाला. अपमानामुळें ती कदाचित् आत्मत्याग करील, त्या पूर्वीच तिचा अनुनय करून तिला प्रसन्न करून घे.

१. मामि.

४९७ अंकोल्ल : 497. Bouquet.

महमहइ मलअवाओ अत्ता वारेइ मं घराणेन्तीम ।
अङ्कोल्लपरिमलेण वि जो क्खु मओ सो मओ व्वेअ ॥९७॥

[ महमहायते मलयवात श्वश्रूर्वारयति मां गृहान्निर्यान्तीम् ।
अङ्कोटपरिमलेनापि यः खलु मृतः स मृत एव ॥ ]

मलयावरून येणाऱ्या वाऱ्यामुळें सुगंध सर्वत्र दरवळत आहे, म्हणून घरातून बाहेर पडण्याला सासूने मला बंदी केली आहे. पण खुद्द अंगणातच अङ्कोल्लाचा सुगंध भरला आहे. जें माणूस मरणार तें तेवढ्यानेंही मरणारच.

● मी घराबाहेर पडलें तर वसंताच्या सुगंधानें उन्मत्त होईन अशी सासूला धास्ती वाटते. उन्मत्त होण्याला किंवा मरण्याला अंगणातल्या अंकोलाचा कोमल परिमलही पुरेसा आहे. सखि, माझे प्राण कंठाशीं आले आहेत, सासूचा पहारा आहे, तरी अंगणात संकेत ठरव, अशी सूचना.

४९८ कृतकृत्य : 498. Ecstacy.

मुहपेच्छओ पई से सा वि हु सविसेसदंसणुम्मइआ ।
दोवि कअत्था पुहई अमहिलपुरिसं व मण्णन्ति ॥९८॥

[ मुखप्रेक्षकः पतिस्तस्याः सापि खलु सविशेषदर्शनोन्मत्ता ।
द्वावपि कृतार्थौ पृथिवीममहिलापुरुषामिव मन्येते ॥ ]

१. अकोट, अकोठ, अवोल. २. माता ३. पेच्छिरो. ४. पिअरुअ. ५. मण्णति ६. दर्शनोन्मादिता.

तिचें मुख पाहून पति प्रसन्न झाला आणि त्याच्या दर्शनानें पत्नी उन्मत्त झाली. दोघेंही कृतार्थ झालीं. पृथ्वीवर जणू दुसरी स्त्रीच नाहीं आणि दुसरा पुरुषही नाहीं, असें तीं वागू लागलीं.

● ती असाध्य आहे अशी सूचना.

## ४९९ क्षेम : 499. How Do You Do?

खेमं ? कन्तो खेमं ? जो मो खुज्जम्बओ घरद्दारे ।
तस्स किल मत्थआओ को वि अणत्थो समुप्पण्णो ॥९९॥

[ क्षेम कुत क्षेमं योऽसौ कुब्जाम्रको गृहद्वारे ।
तस्य किल मस्तकात्कोऽप्यनर्थः समुत्पन्न ]

खुशाली ? आता कसली खुशाली ? घराच्या दारात आंब्याचे खुजट व वेडेंवाकडें झाड आहे, त्यावरही मोहोर आला आहे. आता कोणता तरी अनर्थ ओढवणार आहे

● प्रोषितपतिकेला कोणी सहज कुशल विचारलें, त्याला उत्तरादाखल हे उद्वेगोद्गार वसतागमामुळें हा रुक्ष वृक्षही डवरला. तो सारखा नजरेसमोर आहे मग माझी अवस्था काय होत असेल ? परमेश्वरानें मनुष्याला यौवन कशासाठीं दिलें ? प्रवासासाठीं व विरहासाठीं ? जीवसृष्टीचें चैतन्य जागृत करण्याची शक्ति वसताला कशाला दिली ? फक्त आंब्याच्या हंगामासाठीं व उन्हाळ्यासाठीं ? कीं आंब्यानजीक सकेताची सूचना ?

---

१ कत्तो क्षेम कत्तो

५०० विह्वल : 500. Dolour.

आउच्छणविच्छाअं जाआइ मुहं णिअच्छमाणेण ।
पहिएण सोअणिअलाविएण गन्तुं व्विअ ण इट्ठम् ॥१००॥
[ आपृच्छनविच्छायं जायाया मुख निरीक्षमाणेन ।
पथिकेन शोकनिगडितेन गन्तुमव नेष्टम् ॥ ]

प्रवासाला निघतेवेळीं पति पत्नीचा निरोप घेऊं लागला. तिचें निस्तेज मुख पाहून तो इतका विव्हळ झाला कीं प्रवासाला निघणें त्याला इष्ट वाटलें नाहीं.

● होय, तो प्रवासाला जाणार होता, पण गेला नाहीं, म्हणून ती येऊं शकली नाहीं, अशी दूतीची समजावणी.

● ● ●

रसिअजणहिअअदइए कइवच्छल पमुहसुकइणिम्मिइए ।
सत्तमअम्मि समत्त पञ्चमं गाहासअं एअम् ॥

● ● ●

१. आंछण, आपृछण २ णिभालअन्तेण. ३. पेद्द. ४. तिम्मं. ५ आअअ.
६. निगडयितेन.

# षष्ठं शतकम्

## ५०१ सूचीवेधे मुसलः 501 Much Ado

सूईवेहे मुसलं विच्छुहमाणेण दड्ढलोएण ।
एक्कग्गामे वि पिओ सँमअं अच्छीहिँ वि ण दिट्ठो ॥१॥
[ सूचीवेधे मुसलं निक्षिपता दग्धलोकेन ।
एकग्रामेऽपि प्रिय समाभ्यामक्षिभ्यामपि न दृष्ट ॥]

जगाला पराचा कावळा करण्याची मेली खोडच असते. प्रियकर गावातल्या गावातच आहे, तरी जनापवादाच्या भीतीनें त्याच्याकडे डोळा वर करून पाहता आलें नाहीं.

● मग प्रेमपूर्ण दृष्टीनें किंवा डोळे भरून कसें पाहणार ? आजूबाजूला कुटाळ कपू आहेत, फार सावध गिरी बाळगली पाहिजे, अशा सूचना सुईच्या नेढ्यातून धागा जाताना पुरेवाट, पण टवाळ त्यातून मुसळ आरपार काढतात 'सूचीवेधे मुसल' असा प्रयाग दुसऱ्या काणत्याही भाषेत आढळत नाहीं, असें वेबर सागतो

## ५०२ जीवितसंशय : 502 Last Spasm

अज्ज पि तोव एक्क माँ मं वारेहि पिअसहि ! रुअन्तिम् ।
कँल्लि उण तम्मि गए जइ ण मुआ ता ण रोदिस्सम् ॥ २ ॥
[ अद्यापि तावदेक मा मा वारय प्रियसखि रुदताम् ।
कल्ये पुनस्तस्मिन्गते यदि न मृतां तदा न रोदिष्यामि ॥]

१ विच्छह विछुह् विछुभ २ दट्ठ धड्ढ ३ समेहि ४ प्राक्षिपता' विक्षिपता ५ दाव ६ मास ७ कल्ल ८ पुण ९ नइ ण मरिस्स ण रोदिस्सम् १० प्रिये न रोदिष्ये

प्रिय सखि, मी फक्त आजचा दिवस रडून घेतें, आज माझें निवारण करू नकोस. उद्या ते प्रवासाला गेले म्हणजे विरहामुळें मी मरेनच; आणि मेलें नाहींच तर मी रडणारही नाहीं.

**५०३ व्यञ्जित :** 503 Suggestion.

एहि त्ति वाहरन्तम्मि पिअअमे उअह ! ओणअमुहीए ।
विउणावेड्डिअजहणत्थलाइ लज्जाणअं हसिअम् ॥ ३ ॥

[ एहीति व्याहरति प्रियतमे पश्यतावनतमुख्या ।
द्विगुणावेष्टितजघनस्थलया लज्जावनतं हसितम् ॥ ]

ती मान खालीं घालून उभी होती. तिला पाहून तो म्हणाला, ए, इकडे ये ना ! तिनें नेसतें वस्त्र जघनाभोंवतीं दुहेरी गुंडाळून घेतलें होतें, तें सांवरून मान आणखी खालीं घातली व ती हसली.

● 'ओणवें मुख' हा प्रयोग प्रचलित करण्याजोगा आहे. तिच्या स्मितात खेद होता आणि निषेधही; कदाचित् प्रोत्साहनही असेल ! पीतावर वागतो, पापाकडे प्रवृत्त झालेल्या स्वामीचेंही आदरपूर्वक निवारण करावें हा धर्म आणि कौशल्यानें इङ्गित प्रकट करावें ही नीति.

**५०४ नयनबाण :** 504. Piercing Look

मारेमि कँ ण, मुद्धे ' इमेण पेरन्तरत्तविसमेण ।
भुलैआचावविणिग्गअतिक्खअच्छच्छिमल्लेण ? ॥ ४ ॥

१ एहिमाद एताद २ ओनअमुहीअ दिग्गो विउणावेढि णिअंवस्त्र ३ कनुमाया ४. [ि ५ रत्तन्ततिक्ख ६ भुमआ

[ मारयसि क न मुग्धे अनेन पर्यन्तरक्तविषमेण ।
भ्रूलताचापविनिर्गततीक्ष्णतराघांक्षिभल्लेन ॥ ]

मुग्धे, तुझ्या भिंवयांच्या धनुष्यातून वेगानें सुटणाऱ्या तिरप्या दृष्टीच्या बाणाच्या अर्धचंद्राकृति पानाचीं टोकें लालभडक आहेत आणि त्याची धार अति तीक्ष्ण आहे. त्यामुळें कोण घायाळ होणार नाहीं ?

● तिला मुग्धा म्हटलेलें आहे, कारण तिला आपल्या सामर्थ्याची किंवा कटाक्षाच्या परिणामाची जाणीव नाहीं. तुझा खेळ झाला, पण घायाळ होऊन माझा जीव चालला. प्रेमाच्या आवेशानें नेत्र आरक्त होतात आणि दृष्टिक्षेपही. या बाणाना विष लावलें होतें कीं पूर्वीच्या शिकारीचें रक्त लागलेलें होतें ! हिंदी कलासकेतानुसार कटाक्ष सोडणारे अर्धोन्मीलित नेत्र भल्लास्त्रासारखे अर्धचंद्राकृति असतात.

## ५०५ उपेक्षा : 505. Prostration.

तुह दंसणे सअह्णा सद्दं सोऊण णिग्गदा जाइं ।
तइ वोलीणे ताइं पआइं वोढव्विआ जाआ ॥ ५ ॥

[ तव दर्शने सतृष्णा शब्दं श्रुत्वा निर्गता यानि ।
त्वयि व्यतिक्रान्ते तानि पदानि वोढव्या जाता ॥ ]

तुझ्या दर्शनासाठीं ती तहानलेली होती. तुझा शब्द ऐकून तुझ्या दर्शनासाठीं ती दोन पावलें बाहेर आली. पण तूं दिसला नाहींस. तेव्हां ती बेशुद्ध झाली आणि तिला तेथून उचलून घरात न्यावें लागलें.

१. रक्तान्ततीक्ष्ण. २. वोलन्ते.

## ५०६ निर्विकार : 506. Indifference.

ईसामच्छररहिएहिँ णिव्विआरेहिँ मामि ! अच्छीहिं ।
एह्लि जणो जणम्मिव णिरिच्छए, कहँ ण छिज्जामो ? ॥ ६ ॥

[ ईर्ष्यामत्सररहिताभ्यां निर्विकाराभ्यां मातुलान्यक्षिभ्याम् ।
इदानीं जनो जनमिव निरीक्षते कथं न क्षीयामहे ॥ ]

मामी, ते माझ्याकडे कसे निर्विकार नजरेनें पाहतात. त्यांच्या दृष्टींत ईर्ष्या नसते किंवा मत्सरही नसतो. तिऱ्हाइताकडे पहावें तसे ते मला न्याहाळतात. मग मीं कां झुरूं नये ?

● सर्वांनी विचारलें, तूं इतकी वाळलीस (खिज्जामो) कशानें ? झुरतेस (छिज्जामो) कशामुळें ? अशी चिडतेस (खिज्जामो) का ?

## ५०७ निधान कलश : 507. Sure Proof.

वाउद्धअसिचअविहाविओरुदिट्ठेण दन्तमग्गेण ।
वहुमाआ तोसिज्जइ णिहाणकलसस्स व मुहेण ॥ ७ ॥

[ वातोद्धतसिचयविभावितोरुदृष्टेन दन्तमार्गेण ।
वधूमाता तोष्यते निधानकलशस्येव मुखेन ॥ ]

वधूच्या मांडीवर दंतव्रण होते. वाऱ्याच्या झोतानें निचें वस्त्र उडालें तेव्हां ते तिच्या आईला दिसले. गुप्त धनाच्या कळशीचें तोंड दिसलें म्हणजे होतो तसा आनंद तिला ते पाहून झाला.

१. णिव्विआरेहिं. २. खिज्जामो, झिज्जामो. ३. वाअन्दोलिअ, वाउवेल्लिअ.
४. वहुमाया. ५. वातोद्धत, वातोद्धिप्त.

● दुहितेचें सौभाग्य व सद्भाग्य हीं मातांना परम प्रिय वाटतात. कुमारसंभवांत (८·१२) कालिदास सांगतोः 'भर्तृवल्लभतया हि मानसीं। मातुरस्यति शुचं वधूजनः॥' जांवयाला मुलीनें लावलेल्या वेडाची व जामाताच्या नैपुण्याची अशी निशाणी पाहून कोणत्या सासूचें हृदय आनंदानें भरून येणार नाहीं ? टीकाकार सांगतात, हे व्रण बिंदुमालाकृति होते.

## ५०८ प्रेमशंका : 508. Suspicion.

हिअअम्मि वससि, ण करेसि मण्णुअं, तह वि णेहभरिएँहिं।
सङ्किज्जसि जुअइसुहावगलिअधीरेहिँ अम्हेहिं ॥ ८॥

[ हृदये वससि न करोषि मन्युं तथापि स्नेहभृताभिः।
शङ्कयसे युवतिस्वभावगलितधैर्याभिरस्माभिः॥ ]

तूं माझ्या हृदयांत राहतोस आणि माझ्यावर कधीं रागावत नाहींस; तथापि तुझ्याबद्दल नाहीं नाहीं ते संशय मनांत येतात; कारण तुझ्यावर माझे प्रेम आहे आणि संशयी वृत्ति हा आम्हां भीरु स्त्रियांचा स्वभावच आहे.

● स्त्रियाची वृत्ति अधीर असते. जरा इकडे तिकडे पाहिलें किंवा घरीं परतण्याला थोडा उशीर झाला कीं लगेच कुशङ्काना सुरवात होते.

## ५०९ शाश्वत त्रिकोण : 509. Eternal Triangle.

अण्णं पि किं पि पाविहिसि मूढ ! मा तम्म दुक्खमेत्तेण।
हिअअ ! पराहीणजणं मग्गन्त तुह केत्तिअं एअम् ॥ ९॥

---

१. णडिएहिं. २. नाटितैः, खेडितैः २. मढंत, रुदंत, सहं

[ अन्यदपि किमपि प्राप्स्यसि मूढ मा ताम्य दुःखमात्रेण ।
हृदय पराधीनजनं मृगयमाण तवे कियन्मात्रमिदम् ॥ ]

हृदया, एवढ्याशा दुःखानें इतकें व्यथित होऊं नकोस. अन्य स्त्रीच्या आधीन असलेल्या पुरुषावर तूं आसक्त झालें आहेस. मूढा, यापुढें तुला आणखी किती तरी दुःखें सहन करावयाचीं आहेत !

५१० पांसुल : 510. Libertine.

वेसोसि जीअ पंसुल ! अहिअअरं सा हु वल्लभा तुज्झ ।
इअ जाणिऊण वि मए ण ईसिअं दड्ढेम्मस्से ॥ १० ॥

[ द्वेष्योऽसि यस्याः पांसुल अधिकतरं सा खलु वल्लभा तव ।
इति ज्ञात्वापि मया न ईर्ष्यितं दग्धप्रेम्णः ॥ ]

मी तुझ्यावर अनुरक्त आहे आणि जी तुझा द्वेष करते तीच तुला विशेष प्रिय वाटते. हें मला माहीत असल्यामुळें खरें म्हटलें असतां मीच तुझा द्वेष करावा. पण मला तुझा रागसुद्धां येत नाहीं. लंपटा, याचें कारण हें जळ्लें प्रेम !

५११ अधम : 511. Admission.

सा आम सुहअ ! गुणरूअसोहिरी, आम णिग्गुआ अ अहम् !
भण तीअ जो ण सरिसो किं सो सव्वो जणो मरउ ? ॥११॥

१. प्रार्थयमान तव कियदेतत्, इच्छन् तव कियदेतत्. २. जीसे वेसो पंसुल अहिअअरं सा वि वल्लहा होइ। इअ जाणिऊण अम्हं ण णिग्गहइ उसु हिअअस्स.

[सा सत्यं सुभग गुणरूपशोभनशीला सत्यं निर्गुणा चाहम् ।
भण तस्या यो न सदृशः किं स सर्वो जनो म्रियताम् ॥ ]

सुभग, ती सुंदर आहे, सद्‌गुणी आहे, सुशील आहे; कबूल. माझ्या अंगीं कोणतेही चांगले गुण नाहींत; मान्य. ज्यांची योग्यता तिच्या तोलाची नाहीं त्या सर्वांनीं मरावें कीं काय ? हें तरी सांग.

● निर्गुण पण प्रिय अशा परस्त्रीबद्दल प्रशंसोद्गार काढणाऱ्या पतीला उद्देशून पत्नीचे ईर्ष्योद्गार. वस्तुतः तिचे गुण माझ्या पासंगालाही पुरवण्याचे नाहींत असेंच पत्नी या वक्रोक्तीनें सुचवीत आहे.

## ५१२ सुगृहिणी : 512. House-Wife.

सन्तमसन्तं दुक्खं सुहं च जाओ घरस्स जाणन्ति ।
ता पुत्तअ ! महिलाओ सेसाओ जरा मनुस्साणम् ॥१२।

[ सदसद्दुःखं सुखं च या गृहस्य जानन्ति ।
ताः पुत्रक महिलाः शेषा जरा मनुष्याणाम् ॥ ]

मुला, ज्याना संसारांतील सुखदुःखांचा अनुभव आहे त्यांनाच महिला म्हणावें. इतर स्त्रिया पुरुषाला केवळ म्हातारपण आणतात.

● घरांत काय आहे, काय नाहीं, हें ज्याना माहीत असतें आणि सर्वांना सुख मिळेल अशा रीतीनें ज्या संसार करतात, त्याच खऱ्या महिला. ज्या अशा नसतात त्या इतराना क्लेश देतात आणि म्हातारपण आणतात. " संपत्तौ च विपत्तौ च मरणे न च मुञ्चति । दारस्वीयां ता प्रति प्रेम जायते पुण्यकर्मणः । " म्हणून मुला, परस्त्रीचा अभिलाष धरूं नको आणि पत्नीबद्दल वैराग्य बाळगूं नको.

## ५१३ सुमहिलामार्ग : 513. Cross Cut.

हसिएहिँ उवालम्भा, अच्चुवयारेहिँ रूसिअव्वाइं ।
अंसूहिँ भण्डणाइं, एसो मग्गो सुमहिलाणम् ॥ १३ ॥

[ हसितैरुपालम्भा अत्युपचारैः खेदितव्यानि ।
अश्रुभिः कलहा एष मार्गः सुमहिलानाम् ॥ ]

निषेध करावयाचा तो नुसतें हंसून; खेद व्यक्त करावयाचा तो प्रमाणाबाहेर सेवा करून आणि भांडावयाचें तें नुसतें अश्रु ढाळून; हाच सुमहिलाचा मार्ग.

■ मात्र त्या हसितात उपालम्भाची सूक्ष्म छटा असावी, उपचाराच्या अतिरेकात उद्वेगाचें मिश्रण असावें आणि जणू आपल्याच अपराधाच्या परिमार्जनार्थ अश्रू ओघळत आहेत असा आभास असावा. अशी तपस्या पतीला हमखास असह्य होते.

## ५१४ लोकविरुद्ध : 514. Evasion.

उल्लावो मा दिज्जउ लोअविरुद्ध त्ति णाम काऊण ।
सँमुहापडिए को उण वेसे वि दिट्ठिं ण पाडेइ ॥ १४ ॥

[ उल्लापो मा दीयतां लोकविरुद्ध इति नाम कृत्वा ।
संमुखापतिते कः पुनर्द्वेष्येऽपि दृष्टिं न पातयति ।

शिष्टाचाराचे नांवाखालीं फार तर परक्यानें विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर देऊं नये, पण समोरून आलेलें माणूस अप्रिय असलें म्हणून त्याच्याकडे दृष्टिक्षेपही करूं नये की काय ?

१. खिज्ज, लज्ज. २. खण्ड. ३. कुलवहूण. ४. उपकारैः ५. दूपितव्यानि. ६. खण्डनानि. ७. वेरिए. ८. संमुखागते.

● दृष्टिभेट झाली की तो सस्मित दृष्टिक्षेपाची मागणी करणार, मग म्हणणार चार शब्द बोलायला काय हरकत आहे? आणि बोललेंच तर संकेताचें बोलणें लावणार. यापेक्षां आरंभींच सावधगिरी बरी.

## ५१५ संपन्न दारिद्र्य : 515. Asset.

साहीणपिअअमो दुग्गओ वि मण्णइ कअत्थमप्पाणम् ।
पिअरहिओ उण पुहविं वि पाविऊण दुग्गओ च्चेअ ॥ १५ ॥

[ स्वाधीनप्रियतमो दुर्गतोऽपि मन्यते कृतार्थमात्मानम् ।
प्रियरहितः पुनः पृथिवीमपि प्राप्य दुर्गत एव ॥ ]

दारिद्र्य असलें तरी पति स्वाधीन असण्यांतच पत्नी धन्यता मानते. प्रियकर स्वाधीन नाहीं आणि पृथ्वीची संपत्ति हातीं आहे, तरी तें दारिद्र्यच.

● सासरीं एवढी संपत्ति आहे तरी तूं इतकी चाळशीस कशानें? सखीच्या या प्रश्नाला असंतुष्टेचें उत्तर. किंवा एवढें ऐश्वर्य आहे तरी प्रिया प्राप्त झाली नाहीं म्हणून असंतुष्ट धनेश्वरानें मित्राजवळ काढलेले उद्गार.

## ५१६ प्रेम हें विष : 516. Poison.

किं रुवसि किं अ सोअसि किं कुप्पसि, सुअणु ! एक्कमेक्कस्स ? ।
पेम्मं विसं व विसमं साहसु ! को रुन्धिउं तरइ ॥ १६ ॥

१. पुहविं. २. पाऊण. ३. किमासि ? ४ विसंवयंतं. विसंवदंतं. ५. रुंभिउं.

[ किं रोदिषि च शोचसि किं कुप्यसि सुतनु एकैकस्मै ।
प्रेम विषमिव विषमं कथय को रोद्धुं शक्नोति ॥ ]

सुतनु, रडतेस¹ का ? खिन्न कां झालीस ? ज्याच्या त्याच्यावर एवढी रागाला कां येत आहेस ! प्रेम हें विषासारखें विषम आहे; सांग, प्रेमाला रोखून धरण्याचें सामर्थ्य कोणाला आहे ?

## ५१७ आख्यान : 517. Legend.

**ते अ जुआणा, ता गामसंपआ, तं च अम्ह तारुण्णम् ।
अक्खाणअं व लोओ कहेहि, अम्हे वि तं सुणिमो ॥ १७ ॥**

[ ते च युवानस्ता ग्रामसंपदस्तच्चास्माकं तारुण्यम् ।
आख्यानकमिव लोकः कथयति वयमपि तच्छृणुमः ॥ ]

त्या काळची गांवांतील सुखसमृद्धि, ते तरुण व आमचें तारुण्य, यांच्या हकीगती लोक एकाद्या ऐतिहासिक कथानकाप्रमाणें एकमेकांना सांगतात आणि आतां आम्हीही त्या ऐकतों.

● तेव्हां आम्ही जें केलें तेंच आतां इतर करीत आहेत, तरीही ती सर यावयाची नाहीं ! गोष्टी जुन्या व सर्वांच्या परिचयाच्या, पण आतां आम्ही त्या फक्त ऐकावयाच्या; आणि प्रत्यक्षांत जें शिळें-पाकें वाट्याला येईल त्यावर निर्वाह करावयाचा ! वृद्धेची आत्मनिंदा; मी म्हातारी झालें आहे असें वाटल्यामुळें त्यानें संकेत टाळला की काय ? सामान्य जन शहाणांगा-यरच भुलायचे. किंवा, संसार अनित्य आहे, परिस्थित्यनुसार जें मिळत आहे त्याचा अनादर करूं नको, अशी दूतीची सूचना.

---

१. किं रुदासि

## ५१८ खोटी शपथ : 518. Perjury.

वाहोहभरिअगण्डाहराएँ भणिअं विलक्खहसिरीए ।
अज्ज वि किं रूसिज्जइ सवहावत्थं गअं पेम्मम् ॥ १८॥

[ बाष्पौघभृतगण्डाधरया भणितं विलक्षहसनशीलया ।
अद्यापि किं रुष्यते शपथावस्थां गतं प्रेम ॥ ]

तिचे गाल व ओठ अश्रूंच्या ओघांनीं ओले चिंब झाले होते. ती उद्वेगानें म्हणाली, 'आपलें प्रेम आतां शपथ घेण्याच्या अवस्थेला येण्याइतकें क्षीण झालें आहे. आतां मी रागावूं कशाला ?'

● मनुष्य शपथेवर कांहीं सांगूं लागला म्हणजे तें खोटें आहे असें खुशाल समजावें !

## ५१९ नीरस : 519. Insipid.

वण्णअघअलिप्पमुहिं जो मं अइआअरेण चुम्बन्तो ।
एह्णिं सो भूसणभूसिअं पि अलसाअइ छिवन्तो ॥ १९ ॥

[ वर्णघृतलिप्तमुखीं यो मामत्यादरेण चुम्बन् ।
इदानीं स भूषणभूषितामप्यलसायते स्पृशन् ॥ ]

मुखाला वर्णघृत लावलेलें असलें तरी पूर्वी तो माझें चुम्बन विशेष उत्सुकतेनें घेत असे; आतां मी अलंकारांनीं सजलेली असलें तरी मला नुस्ता स्पर्श करावयालाही तो आळस करतो.

---

१. वाहुल्लफुरिअ. २. बाष्पार्द्रस्फुरित. ३. विलक्षं हसन्त्या. ४. वणघिअ, वण्णग्घय. ५. वण्णग्घअतुप्प. ६. वर्णक.

● अस्पर्श व स्पर्श या शब्दांवर चमत्कृति. जें निषिद्ध त्यांतच विशेष सुख वाटतें. औत्सुक्यामुळें ही विकृति नसून प्रकृति आहे असेंच वाटतें. औत्सुक्य ओसरलें कीं सारेंच सुमार वाटूं लागतें.

## ५२० कृष्णवसना : 520. Costume.

णीलपडंपाउअङ्गी त्ति मा हु णं परिहरिज्जासु ।
पट्टंसुअं पि णड्ढं रअम्मि अवणिज्जइ च्चेअ ॥ २० ॥
[ नीलपटप्रावृताङ्गीति मा खल्वेनां परिहर ।
पट्टांशुकमपि नद्धं रतेऽपनीयत एव ॥ ]

तिचें वस्त्र काळें आहे म्हणून तिला टाळूं नको. वस्त्र रेशमी असलें तरी रतिप्रसंगीं तें सुद्धां दूर करावेंच लागतें.

● वस्त्राची किंमत फक्त बाजारात. या उपाधिविरहित वस्तु कशी आहे तें पहा. मलिनवसनेचा स्वीकार करण्यावद्दल नायकाला प्रोत्साहन.

## ५२१ मार्जारसुरत : 521. Cat.

सच्चं कलहे कलहे सुरआरम्भा पुणो णवा होन्ति ।
माणो उण, माणंसिणि ! गरुओ पेम्मं विणासेइ ॥ २१ ॥
[ सत्यं कलहे कलहे सुरतारम्भाः पुनर्नवा भवन्ति ।
मानः पुनर्मनस्विनि गुरुकः प्रेम विनाशयति ॥ ]

अभिमानिनी, दरवेळीं सुरतातील थोडेसें भांडण करावें, म्हणजे सुरताला टवटवी येते, हें खरें; पण फार वेळ रुसून बसल्यानें मात्र प्रेमाचा नाश होतो.

१. बद्ध. २. परिहर जुआण.

## ५२२ मार्जोरी : 522. Possessed.

माणुम्मत्ताइ मए अकारणं कारणं कुणन्तीए ।
अद्दंसणेण पेम्मं विणासिअं पोढवाएण ॥ २२ ॥
[ मानोन्मत्तया मया अकारणं कारणं कुर्वत्या ।
अदर्शनेन प्रेम विनाशितं प्रौढवादेन ॥ ]

मी मानोन्मत्त झालें आणि थोरवींच्या गोष्टी करून निष्कारण कुरापत काढली. अदर्शनामुळें प्रेमनाश मात्र झाला.

● त्याचा कांहीं अपराध नव्हता. काल्पनिक कारणें निर्माण करून मी त्याला दोषी ठरविलें. माझ्या संशयाचें निरसन करण्यासाठीं त्यानें भेटीचा प्रयत्न केला, तो मी झिडकारला. मी त्याला शिक्षा केली, पण आतां ती मलाच भोगावी लागत आहे. प्रौढवाद = सप्रतिज्ञ प्रत्याख्यानम् (गंगाधर), थोरवीच्या गोष्टी.

## ५२३ गुरु : 523. Beau.

अणुऊलं विअ वोत्तुं[1] बहुवल्लह ! वल्लहे वि वेसे वि[2] ।
कुविअं अ पसाएउं सिक्खइ लोओ तुमाहित्तो ॥ २३ ॥
[ अनुकूलमेव वक्तुं बहुवल्लभ वल्लभेऽपि द्वेष्येऽपि ।
कुपितं च प्रसादयितुं शिक्षते लोको युष्मत्तः ॥ ]

हे बहुवल्लभ, आवडतीप्रमाणेंच नावडतीशींही तुला गोड गोड बोलतां येतें आणि त्यांना अनुकूल करून घेतां येतें. कुपितेला प्रसन्न कसें करून घ्यावयाचें ही कला लोकांनीं तुझ्यापासूनच शिकावी.

● मधुर निर्भर्त्सना.

१. ओत्तुं, पोत्तु, वत्तु, वोत्तुं. २. वोत्तुं जोव्वारं बहुवल्लहम्मि वेसे वि.

५२४ नाचक्की : 524. Disrepute.

लज्जा चत्ता, सीलं अ खण्डिअं, अजसघोसणा दिण्णा।
जस्स कएणं, पिअसहि! सो च्चेअ जणो जणो जाओ ॥ २४ ॥

[ लज्जा त्यक्ता शीलं च खण्डितमयशोघोषणा दत्ता।
यस्य कृतेन प्रियसखि स एव जनो जनो जातः ॥ ]

त्याच्यासाठीं मी लाज सोडली, शीलभ्रष्ट झालें; त्याच्यामुळें जगांत माझ्या नाचक्कीचा डंका वाजला; आणि प्रियसखी, हें सारें मी ज्याच्यासाठीं केलें तो मात्र मला पारखा झाला.

● इतका तो निर्लज्ज, भ्रष्ट व अकृतज्ञ आहे.

५२५ कुलवधू : 525. Coy.

हसिअं अदिट्ठदन्तं, ममिअमणिक्कन्तदेहलीदेसम्।
दिट्ठमणुक्खित्तमुहं एसो मग्गो कुलवहूणम् ॥ २५.॥

[ हसितमदृष्टदन्तं भ्रमितमनिष्क्रान्तदेहलीदेशम्।
दृष्टमनुत्क्षिप्तमुखमेष मार्गः कुलवधूनाम् ॥ ]

हंसायचें, पण दांत दिसूं द्यावयाचे नाहींत; फिरावयाचें, पण तें घरांतल्या घरांत, उंबरठा ओलांडावयाचा नाहीं; पहावयाचें, पण मुख वर न उचलतां. ही वागणूक कुलस्त्रियांची.

१. मुक्का २. अजसघोसणा ३. ल्लो. ४. अयशोघोषणा. ५. वर्तान्तरितेन. ६. अणुक्खित्तं. ७. मुहं.

५२६ डंका : 526. Royal Drum.

धूलिमइलो वि पङ्कङ्किओ वि तणरइअदेहभरणो वि।
तह वि गइन्दो गरुअत्तणेण ढक्कं समुव्वहइ ॥ २६ ॥

[ धूलिमलिनोऽपि पङ्काङ्कितोऽपि तृणरचितदेहभरणोऽपि।
तथापि गजेन्द्रो गुरुकत्वेन ढक्कां समुद्वहति ॥ ]

हत्तीचें अंग धुळीनें मळलेलें व चिखलानें माखलेलें असतें आणि तो गवत खातो. तरी नैसर्गिक मोठेपणामुळें डंका धारण करण्याचा मान गजेंद्रालाच मिळतो.

● जननिन्दित नायकाविषयीं नायिकेला अनुकूल करण्यासाठीं दूतीचे प्रशंसोद्गार. लोकांनीं त्याची कितीहि निंदा केली व त्याची दुर्गति असली तरी त्याचा मोठेपणा झाकणार नाहीं. इतरांना पेलणार नाहीं असा डंका याचेंच माहात्म्य गर्जून सांगत असतो. अलंकारकौस्तुभांत अप्रस्तुतप्रशंसेचें उदाहरण.

५२७ अपहृता : 527. Abduction.

करमरि! कीस ण गम्मइ? को गव्वो जेण मसिणगमणासि?।
अद्दिट्ठदन्तहसिरीअ जम्पिअं चोर! जाणिहिसि ॥ २७ ॥

[ वन्दि किमिति न गम्यते को गर्वो येन मसृणगमनासि।
अदृष्टदन्तहसनशीलया जल्पितं चोर ज्ञास्यसि ॥ ]

१. टक्कां. २. दरदिठ्ठ ३. मंद.

चोरानें विचारलें, वान्दिनी, मला फळत नाहीं, तुला एवढा फशाचा गर्व आहे, कीं तूं इतकी हळूहळू चालत आहेस ! ओंठांतल्या ओठांत हंसून ती पुटपुटली, चोरा, याचें कारण तुला लवकरच समजेल.

● तिनें झपाझप चालावें म्हणून यानें तिला वारंवार दरडावलें, पण तिनें आपली गति वाढवली नाहीं. त्याला पाठलागाची भीति वाटत होती आणि तिला आशा. पति लगोलग आपल्या मागावर येईल या अपेक्षेनें अपहृता मुद्दाम रेंगाळत होती.

## ५२८ डाग : 528. Mark.

थोरंसुएहिँ रुण्णं सवत्तिवग्गेण पुप्फवइआए ।
भुअसिहरं पइणो पेच्छिऊण सिरलग्गतुप्पालिअम् ॥ २८ ॥
[ स्थूलाश्रुभी रुदितं सपत्नीवर्गेण पुष्पवत्याः ।
भुजशिखरं पत्युः प्रेक्ष्य शिरोलग्नवर्णघृतलिप्तम् ॥ ]

पुष्पवतीनें मुखाला लावलेलें वर्णघृत पतीच्या दंडाच्या बाहुल्याला लागलेलें पाहून तिच्या सवती ढसढसा रडल्या.

## ५२९ आवाहन : 529. Temptation.

लोओ जूरइ, जूरउ ! वअणिज्जं होइ. होउ तं णाम ।
एहि ! णिमज्जसु पासे, पुप्फवइ ! ण एइ मे णिद्दा ॥ २९ ॥

१. गिरमग्ग, गिरगंत. २. निगिज्जसु.

[ लोकः खिद्यते खिद्यतु वचनीयं भवति भवतु तन्नाम ।
एहि निमज्ज पार्श्वे पुष्पवति नैति मे निद्रा ॥ ]

. पुष्पवती, काय म्हणतेस ? लोक रागावतील ? रागावूं देत. निंदा करतील ? करूं देत मला तुझ्याशिवाय झोंप येत नाहीं. ये, इकडे ये आणि माझ्याशेजारीं झोंप.

## ५३० चित्रपट : 530. Omnipresent.

जं जं पुलएमि दिसं पुरओ लिहिअ व्व दीससे तत्तो ।
तुह पडिमापडिवाडिं वहइ व्व सअलं दिसाअक्कम्[३] ॥ ३० ॥

[ यां यां प्रलोकयामि दिशं पुरतो लिखित एव दृश्यसे तत्र ।
तव प्रतिमापरिपाटीं वहतीव सकलं दिशाचक्रम् ॥ ]

मी ज्या ज्या दिशेला पाहतें त्या त्या क्षितिजावर तूं मला चित्रासारखा दिसतोस. जणूं दिशाचक्र माझ्यापुढें तुझ्या प्रतिमांची रांग फिरवीत आहे.

## ५३१ भुंगा : 531. Black-Berry.

ओसरइ, धुणइ साहं, खोक्खामुहलो पुणो समुल्लिहइ ।
जम्बूफलं ण गेह्णइ भमरो त्ति कई पढमडक्को ॥ ३१ ॥

१. गर्हति. २. निषिद्ध. ३. चक्र ४. सततं. ५. धुणइ. ६. पंपा. भंभा. ७. पड्डम.

[ अपसरति धुनोति शाखां खोक्खामुखरः पुनः समुल्लिखति ।
जम्बूफलं न गृह्णाति भ्रमर इति कपिः प्रथमदष्टः ॥ ]

माकडाला एकदां भुंगा चावला होता. त्याला एक जांभूळ दिसलें. त्याला वाटलें भुंगाच आहे. लगेच माकड चमकून एकदम दूर सरकलें, खाकरूं लागलें, फांदी हलवूं लागलें व पानें ओरबाडूं लागलें; पण जांभळाला हातही लावीना.

● एकदां बोभाटा झाला म्हणून पुन्हांही तसेंच होईल अशा कल्पनेनें भिऊं नको, असें नायकाला दूतीचें आश्वासन. याला तिच्या यजमानानें पूर्वी चोपून काढलें होतें कीं काय ? कीं हा तिला चावला होता, म्हणून ती बिचकत होती ?

## ५३२ खाजरी : 532. Monkey.

ण छिवइ हत्थेण कई कण्डूइभएण पत्तलणिउज्जे ।
दरलॅम्बिअगोच्छकइकच्छुसच्छहं वाणरीहत्थम् ॥ ३२ ॥

[ न स्पृशति हस्तेन कपिः कण्डूतिभयेन पत्रलनिकुञ्जे ।
ईषल्लम्बितगुच्छकपिकच्छुसदृशं वानरीहस्तम् ॥ ]

वानराचा हात एकदां खाजरीला लागला होता. कुंजांतील पानांच्या गर्दीत वानरीचा केसाळ हात लोंबत होता. खाजरीच्या शंकेनें वानर तिच्या हाताला स्पर्शही करीना.

● खाजरीची लव रंगानें ताम्रुस असते. समजावून सांगितलें तरी मूढाना उमजत नाहीं.

५३३ शुष्क : 533. Contradiction.

सरसा वि सूसइ च्चिअ जाणइ दुक्खाइँ मुद्धहिअआ वि ।
रत्ता वि पण्डुर च्चिअ जाआ वराई तुह विओए ॥ ३३ ॥

[ सरसापि शुष्यत्येव जानाति दुःखानि मुग्धहृदयापि ।
रक्तापि पाण्डुरैव जाता वराकी तव वियोगे ॥ ]

सरस आहे तरी तुझ्या विरहामुळें बिचारी कोमेजल्यासारखी दिसत आहे, मुग्धहृदया आहे तरी आता तिला दुःखाची जाणीव झालेली आहे आणि अनुरक्ता आहे तरी पांढरी फटफटीत झाली आहे.

● जें सरस, आर्द्र होतें तें विरहामुळें नीरस, शुष्क झालें, अजाण होतें, त्यालाही दुःखाची जाणीव झाली, अनुरक्तीमुळें आरक्त होतें तें पांडुर झालें; जसें हृदय, तसाच देहही. अलंकारकौस्तुभांत विरोधाचें उदाहरण : 'अविरोधेऽपि विरोधो यत्रोक्तः स्याद्विरोधः सः । स्याज्जातेर्गुणकर्मद्रव्याणां स्वस्वपरयोगात् ॥'

५३४ सुगंधित मद्य : 534. Scented Wine.

आरुहइ जुण्णअं खुज्जअं वि जं उअह वल्लरी तउँसी ।
णीलुप्पलपरिमलवासिअस्स सरअस्स सो दोसो ॥ ३४ ॥

[ आरोहति जीर्णं कुब्जकमपि यत्पश्यत वेल्लनशीला त्रपुसी ।
नीलोत्पलपरिमलवासितायाः शरदः स दोषः ॥ ]

---

१. मुद्ध. २. सुट्ठं, जुण्णअं, वजुलं. ३. जुण्णखज्जूण्णअं. ४. तउसी.
५. जीर्णखजूरमपि. ६. वेपमाना दन्तुरि.

विळखा घालणें हा वेलीचा धर्म आहे. पहा, वृक्ष वठलेला व वेडावांकडा आहे, तरी कांकडीची वेली त्यावर चढली आहे. निळ्या कमळाचा सुगंध सर्वत्र दरवळविणाऱ्या शरद् ऋतूचाच हा दोष.

● दुसरी ओळ ' नीलोत्पलपरिमलवासितायाः सरकस्य दोषः ' अशी वाचली तर अर्थ बदलतो. ' सरकस्य इक्षुमद्यस्य. ' हा दोष मद्याचा, नीलोत्पलाच्या परिमलानें सुगंधित झालेल्या मद्याचा. जुन्या झाडाना व वेलींना शरद् ऋतूंत नेव जीवन प्राप्त होतें. त्याचप्रमाणें सुगंधित मद्याच्या सेवनानें वृद्धांना मस्ती येते आणि वृद्धाही तरुणींप्रमाणें वागहू लागतात. नायिका उन्मत्त झाली होती म्हणूनच तिनें वृद्धनायकाचा स्वीकार केला !

## ५३५ वसंतोत्सव : 535. Revelry.

उप्पहपहाविहजणो पविजिम्हिंअकलअलो पहअतूरो ।
अव्वो सो च्चेअ छणो तेण विणा गामडाहो व्व ॥ ३५ ॥

[ उत्पथप्रधावितजनः प्रविजृम्भितकलकलः प्रहततूर्यः ।
दुःखं स एव क्षणस्तेन विना ग्रामदाह इव ॥ ]

वसंतोत्सव सुरू आहे; लोक रस्ता सोडून धांवत आहेत, सगळीकडे गोंगाट चालला आहे, नगारे वाजत आहेत; पण प्रियकराच्या विरहामुळें मला मात्र वाटत आहे कीं जणूं गांवाला आग लागली आहे व त्यामुळेंच हा गोंधळ चालला आहे.

● विरहाग्नीच्या तापामुळें ती तळमळत होती म्हणूनच गांवाला आग लागल्याची उपमा तिला सुचली. उत्सवाची, त्याचप्रमाणें दरोडा, आग अशा संकटाची गावकऱ्याना सूचना देण्यासाठीं नगारे वाजवीत असत.

१. पविअंभिअ, पविअंभिप.

५३६ वेताळ : 536. Ghost.

उल्लावन्तेण ण होइ कस्स पासट्ठिएण ठड्डेणं ।
सङ्का मसाणपाअवलम्बिअचोरेण व खलेण ॥ ३६ ॥

[ उल्लापयमानेन न भवति कस्य पार्श्वस्थितेन स्तब्धेन ।
शङ्का श्मशानपादपलम्बितचोरेणेव खलेन ॥ ]

दुष्टापासून कोणाला भय नाहीं ? तो काहीं न बोलता नुसता बाजूला स्तब्ध उभा राहिला तरी भीतिप्रद असतो. तो गोड बोलला तर त्याहून भयंकर. अगदीं स्मशानातल्या झाडावरील फासावर लटकविलेल्या चोराप्रमाणें भयंकर.

● श्लेष : पार्श्वस्थितेन = संनिहितेन अथवा पाशस्थितेन; स्तब्धेन = अहंकारात् अथवा प्राणवायुविरहात्; शंका = वितर्क अथवा भयम्. फासावर लटकलेला चोर मेलेला आहे हें माहीत असलें तरी त्याच्या दर्शनानें भीति वाटते. फासावर लटकलेलें प्रेत एकाएकीं बोलू लागलें तर जीवाचें पाणी पाणी होईल. चोर जिवंत असला तर सोडवणीसाठीं विनवणी करील आणि ती ऐकली तर तो मदतगाराचा घात करील. वेताळपंचविशींतील मूळ वस्तु या गाथेंत असावी असें वाटतें.

५३७ कुटज : 537. Ridicule.

असमत्तगुरुअकज्जे एह्णिं पहिए घरं णिअत्तन्ते ।
णवपाउसो पिउच्छा हसइ व कुडअट्टहासेहिं ॥ ३७ ॥

१. ठड्डेण, थड्डेण, दिठ्ठेण. २. दग्धेन. २. पाउडो, पाउलो, पावसो.

[ अन्यदपि किमपि प्राप्स्यसि मूढ मा ताम्य दुःखमात्रेण ।
हृदय पराधीनजनं मृगयमाण तव कियन्मात्रमिदम् ॥ ]

हृदया, एवढ्याशा दुःखानें इतकें व्यथित होऊं नकोस. अन्य स्त्रीच्या आधीन असलेल्या पुरुषावर तूं आसक्त झालें आहेस. मूढा, यापुढे तुला आणखी किती तरी दुःखें सहन करावयाचीं आहेत !

## ५१० पांसुल : 510. Libertine.

वेसोसि जीअ पंसुल ! अहिअअरं सा हु वल्लभा तुज्झ ।
इअ जाणिऊण वि मए ण ईसिअं दड्ढपेम्मस्स ॥ १० ॥

[ द्वेष्योऽसि यस्याः पांसुल अधिकतरं सा खलु वल्लभा तव ।
इति ज्ञात्वापि मया न ईर्ष्यितं दग्धप्रेम्णः ॥ ]

मी तुझ्यावर अनुरक्त आहे आणि जी तुझा द्वेष करते तीच तुला विशेष प्रिय वाटते. हें मला माहीत असल्यामुळें खरें म्हटलें असतां मीच तुझा द्वेष करावा. पण मला तुझा रागसुद्धां येत नाहीं. लंपटा, याचें कारण हें जळ्ळें प्रेम !

## ५११ अधम : 511. Admission.

सा आम सुहअ ! गुणरूअसोहिरी, आम णिग्गुआ अ अहम् ।
भण तीअ जो ण सरिसो किं सो सव्वो जणो मरउ ? ॥ ११ ॥

१. कामयमान तव कियदेतत्, इच्छन् तव कियदेतत्. २. जीसे वेसो पंसुल अभियअरं सा वि वल्लहा होइ । इय भाविऊण अगई ण विसूरइ उठ हिययस्स.

[ सा सत्यं सुभग गुणरूपशोभनशीला सत्यं निर्गुणा चाहम् ।
भण तस्या यो न सदृशः किं स सर्वो जनो म्रियताम् ॥ ]

सुभग, ती सुंदर आहे, सद्गुणी आहे, सुशील आहे; कबूल. माझ्या अंगीं कोणतेही चांगले गुण नाहींत; मान्य. ज्यांची योग्यता तिच्या तोलाची नाहीं त्या सर्वांनीं मरावें कीं काय ? हें तरी सांग.

● निर्गुण पण प्रिय अशा परस्त्रीबद्दल प्रशंसोद्गार काढणाऱ्या पतीला उद्देशून पत्नीचे ईर्ष्योद्गार. वस्तुतः तिचे गुण माझ्या पासंगालाही पुरावयाचे नाहींत असेंच पत्नी या वक्रोक्तीनें सुचवीत आहे.

## ५१२ सुगृहिणी : 512. House-Wife.

सन्तमसन्तं दुक्खं सुहं च जाओ घरस्स जाणन्ति ।
ता पुत्तअ ! महिलाओ सेसाओ जरा मनुस्साणम् ॥१२॥

[ सदसद्दुःखं सुखं च या गृहस्य जानन्ति ।
ताः पुत्रक महिलाः शेषा जरा मनुष्याणाम् ॥ ]

मुला, ज्याना संसारांतील सुखदुःखांचा अनुभव आहे त्यांनाच महिला म्हणावें. इतर स्त्रिया पुरुषाला केवळ म्हातारपण आणतात.

● घरांत काय आहे, काय नाहीं, हें ज्याना माहीत असतें आणि सर्वांना सुख मिळेल अशा रीतीनें ज्या संसार करतात, त्याच खऱ्या महिला. ज्या अशा नसतात त्या इतरांना क्लेश देतात आणि म्हातारपण आणतात. " संपत्तौ च विपत्तौ च मरणे न च मुञ्चति । या स्त्रीयां ता प्रति प्रेम जायते पुण्यकर्मणः । " म्हणून मुला, परस्त्रीचा अभिलाष धरूं नको आणि पत्नीबद्दल वैराग्य बाळगूं नको.

५१३ सुमहिलामार्ग : 513. Cross Cut.

हसिएहिँ उवालम्भा, अच्चुवचारेहिँ खूसिअव्वाइं[1]।
अंसूहिँ भण्डणाइं, एसो मग्गो सुमहिलाणम् ॥ १३ ॥

[ हसितैरुपालम्भा अत्युपचारैः खेदितव्यानि।
अश्रुभिः कलहा एष मार्गः सुमहिलानाम् ॥ ]

निषेध करावयाचा तो नुसतें हंसून; खेद व्यक्त करावयाचा तो प्रमाणाबाहेर सेवा करून आणि भांडावयाचें तें नुसतें अश्रु टाळून; हाच सुमहिलांचा मार्ग.

● मात्र त्या हसितांत उपालम्भाची सूक्ष्म छटा असावी, उपचारांच्या अतिरेकांत उद्वेगाचें मिश्रण असावें आणि जणू आपल्याच अपराधाच्या परिमार्जनार्थ अश्रू ओघळत आहेत असा आभास असावा. अशी तपस्या पतीला हमखास अवश्य होते.

५१४ लोकविरुद्ध : 514. Evasion.

उल्लावो मा दिज्जउ लोअविरुद्ध त्ति णाम काऊण।
सँमुहापडिए को उण वेसे वि दिट्ठिं ण पाडेइ ॥ १४ ॥

[ उल्लापो मा दीयतां लोकविरुद्ध इति नाम कृत्वा।
संमुखापतिते कः पुनर्द्वेष्येऽपि दृष्टिं न पातयति।

शिष्टाचाराचे तावाखालीं फार तर परक्यानें विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर देऊं नये, पण समोरून आलेलें माणूस अप्रिय असलें म्हणून त्याच्याकडे दृष्टिक्षेपही करूं नये की काय ?

1. णिव्वि, लज्जि. २. खण्ट. ३. कुत्सयितुणं. ४. उपचारैः ५. दयितव्यानि. ६. लम्भनानि. ७. वेरिए. ८. संमुखागते.

● दृष्टिभेट झाली की तो सस्मित दृष्टिक्षेपाची मागणी करणार, मग म्हणणार चार शब्द बोलायला काय हरकत आहे? आणि बोललेंच तर संकेताचें बोलणें लावणार. यापेक्षा आरंभींच सावधगिरी बरी.

## ५१५ संपन्न दारिद्र्य : 515. Asset.

साहीणपिअअमो दुग्गओ वि मण्णइ कअत्थमप्पाणम् ।
पिअरहिओ उण पुहविं वि पाविउण दुग्गओ चेअ ॥ १५ ॥

[ स्वाधीनप्रियतमो दुर्गतोऽपि मन्यते कृतार्थमात्मानम् ।
प्रियरहितः पुनः पृथिवीमपि प्राप्य दुर्गत एव ॥ ]

दारिद्र्य असलें तरी पति स्वाधीन असण्यांतच पत्नी धन्यता मानते. प्रियकर स्वाधीन नाहीं आणि पृथ्वीची संपत्ति हातीं आहे, तरी तें दारिद्र्यच.

● सासरीं एवढी संपत्ति आहे तरी तूं इतकी वाळलीस कशानें? सखीच्या या प्रश्नाला असंतुष्टेचें उत्तर. किंवा एवढें ऐश्वर्य आहे तरी प्रिया प्राप्त झाली नाहीं म्हणून असंतुष्ट धनेश्वरानें मित्राजवळ काढलेले उद्गार.

## ५१६ प्रेम हें विष : 516. Poison.

किं रुवसि किं अ सोअसि किं कुप्पसि, सुअणु ! एक्कमेक्कस्स ? ।
पेम्मं विसं वँ विसमं साहसु ! को रुन्धिउं तरइ ॥ १६ ॥

१. पुहविं. २. पाऊण. ३. किंगाअसि ? ४. विसंवयंतं, विसंवदंतं. ५ रुंभिउं

[ किं रोदिषि च शोचसि किं कुप्यसि सुतनु एकैकस्मै ।
प्रेम विषमिव विषमं कथय को रोद्धुं शक्नोति ॥ ]

सुतनु, रडतेस कां ? खिन्न कां झालीस ? ज्याच्या त्याच्यावर एवढी रागाला कां येत आहेस ? प्रेम हें विषासारखें विषम आहे; सांग, प्रेमाला रोखून धरण्याचें सामर्थ्य कोणाला आहे ?

## ५१७ आख्यान : 517. Legend.

ते अ जुआणा, ता गामसंपआ, तं च अम्ह तारुण्णम् ।
अक्खाणअं व लोओ कहेहि, अम्हे वि तं सुणिमो ॥ १७ ॥

[ ते च युवानस्ता ग्रामसंपदस्तच्चास्माकं तारुण्यम् ।
आख्यानकमिव लोकः कथयति वयमपि तच्छृणुमः ॥ ] ,

त्या काळची गांवांतील सुखसमृद्धि, ते तरुण व आमचें तारुण्य, यांच्या हकीगती लोक एकाद्या ऐतिहासिक कथानकाप्रमाणें एकमेकांना सांगतात आणि आतां आम्हीही त्या ऐकतों.

● तेव्हां आम्ही जें केलें तेंच आतां इतर करीत आहेत, तरीही ती सर यावयाची नाहीं ! गोष्टी पुन्या व सर्वांच्या परिचयाच्या, पण आतां आम्ही त्या फक्त ऐकावयाच्या; आणि प्रत्यक्षात जें शिळें-पाकें वांट्याला येईल त्यावर निर्वाह करावयाचा ! वृद्धेची आत्मनिंदा; मी म्हातारी झालें आहे असें पाहल्यामुळें त्यानें संकेत टाळला की काय ? सामान्य जन वार्तागा-यरच भुलायचे. किंवा, संसार अनित्य आहे, परिस्थित्यनुसार जें मिळत आहे त्याचा अव्हेर करूं नको, अशी सखीची सूचना.

१. दि कृतानि

## ५१८ खोटी शपथ : 518 Perjury.

वाहोहभरिअगण्डाहराएँ भणिअं विलक्खहसिरीए ।
अज्ज वि किं रूसिज्जइ सवहावत्थं गअं पेम्मम् ॥ १८ ॥

[ बाष्पौघभृतगण्डाधरया भणितं विलक्षहसनशीलया ।
अद्यापि किं रुष्यते शपथावस्थां गतं प्रेम ॥ ]

तिचे गाल व ओंठ अश्रूंच्या ओघानीं ओले चिंब झाले होते. ती उद्वेगानें म्हणाली, 'आपलें प्रेम आता शपथ घेण्याच्या अवस्थेला येण्याइतकें क्षीण झालें आहे. आता मी रागावूं कशाला ?'

● मनुष्य शपथेवर कांहीं सांगूं लागला म्हणजे तें खोटें आहे असें खुशाल समजावें ।

## ५१९ नीरस : 519. Insipid.

वण्णघअलित्तमुहिं जो मं अइआअरेण चुम्बन्तो ।
एह्णिं सो भूसणभूसिअं पि अलसाअइ छिवन्तो ॥ १९ ॥

[ वर्णघृतलिप्तमुखीं यो मामत्यादरेण चुम्बन् ।
इदानीं स भूषणभूषितामप्यलसायते स्पृशन् ॥ ]

मुखाला वर्णघृत लावलेलें असलें तरी पूर्वी तो माझें चुम्बन विशेष उत्सुकतेनें घेत असे, आता मी अलङ्कारानीं सजलेली असलें तरी मला नुस्ता स्पर्श करावयालाही तो आळस करतो.

---

१ वाहुल्लफुरिअ २ वाष्पार्द्रस्फुरित ३ विलक्ष हसन्त्या ४ वणाधिअ, वण्णघय ५ वण्णघअनुप्प ६ वर्णक

● अस्पर्श व स्पर्श या शब्दांवर चमत्कृति. जें निषिद्ध त्यांतच विशेष सुख वाटतें. औत्सुक्यामुळें ही विकृति नसून प्रकृति आहे असेंच वाटतें. औत्सुक्य ओसरलें कीं सारेंच सुमार वाटूं लागतें.

## ५२० कृष्णवसना : 520. Costume.

णीलपडपाउअङ्गी त्ति मा हु णं परिहरिज्जासु ।
पट्टंसुअं पि णट्ठं रअम्मि अवणिज्जइ च्चेअ ॥ २० ॥

[ नीलपटप्रावृताङ्गीति मा खल्वेनां परिहर।
पट्टांशुकमपि नष्टं रतेऽपनीयत एव ॥ ]

तिचें वस्त्र काळें आहे म्हणून तिला टाळूं नको. वस्त्र रेशमी असलें तरी रतिप्रसंगीं तें सुद्धां दूर करावेंच लागतें.

● वस्त्राची किंमत फक्त बाजारात. या उपाधिविरहित वस्तु कशी आहे तें पहा. मलिनवसनेचा स्वीकार करण्याबद्दल नायकाला प्रोत्साहन.

## ५२१ मार्जारसुरत : 521. Cat.

सच्चं कलहे कलहे सुरआरम्भा पुणो णवा होन्ति ।
माणो उण, माणंसिणि ! गरुओ पेम्मं विणासेइ ॥ २१ ॥

[ सत्यं कलहे कलहे सुरतारम्भाः पुनर्नवा भवन्ति ।
मानः पुनर्मनस्विनि गुरुकः प्रेम विनाशयति ॥ ]

अभिमानिनी, दरवेळीं सुरवातीला थोडेंसें भांडण करावें, म्हणजे सुरताला टवटवी येते, हें खरें; पण फार वेळ रुसून बसल्यानें मात्र प्रेमाचा नाश होतो.

१. वट. २. परिहर सुअणु.

## ५२२ माजोरी : 522. Possessed.

माणुम्मत्ताइ मए अकारणं कारणं कुणन्तीए ।
अदंसणेण पेम्मं विणासिअं पोढवाएण ॥ २२ ॥
[ मानोन्मत्तया मया अकारणं कारणं कुर्वत्या ।
अदर्शनेन प्रेम विनाशितं प्रौढवादेन ॥ ]

मी मानोन्मत्त झालें आणि थोरवीच्या गोष्टी करून निष्कारण कुरापत काढली. अदर्शनामुळें प्रेमनाश मात्र झाला.

● त्याचा कांहीं 'अपराध नव्हता. काल्पनिक कारणें निर्माण करून मी त्याला दोषी ठरविलें. माझ्या संशयाचें निरसन करण्यासाठीं त्यानें भेटीचा प्रयत्न केला, तो मी झिडकारला. मी त्याला शिक्षा केली. पण आतां ती मलाच भोगावी लागत आहे. प्रौढवाद = सप्रतिज्ञ प्रत्याख्यानम् (गंगाधर), थोरविच्या गोष्टी.

## ५२३ गुरु : 523. Beau.

अणुऊलं विअ वोत्तुं[1] बहुवल्लह ! वल्लहे वि वेसे वि[2] ।
कुविअं अ पसाएउं सिक्खइ लोओ तुमाहित्तो ॥ २३ ॥
[ अनुकूलमेव वक्तुं बहुवल्लभ वल्लभेऽपि द्वेष्येऽपि ।
कुपितं च प्रसादयितुं शिक्षते लोको युष्मत्तः ॥ ]

हे बहुवल्लभ, आवडतीप्रमाणेंच नावडतीशींही तुला गोड गोड बोलतां येतें आणि त्यांना अनुकूल करून घेतां येतें. कुपितेला प्रसन्न कसें करून घ्यावयाचें ही कला लोकांनीं तुझ्यापासूनच शिकावी.

● मधुर निर्भर्त्सना.

१. ओत्तुं, योत्तुं, वत्तु, वोक्तुं. २. वोत्तुं जोक्कारं बहुवल्लहम्मि वेसे वि.

## ५२४ नाचक्की : 524. Disrepute.

लज्जा चत्ता, सीलं अ खण्डिअं, अजसघोसणा दिण्णा ।
जस्स कएणं, पिअसहि ! सो च्चेअ जणो जणो जाओ ॥ २४ ॥

[ लज्जा त्यक्ता शीलं च खण्डितमयशोघोषणा दत्ता ।
यस्य कृतेन प्रियसखि स एव जनो जनो जातः ॥ ]

त्याच्यासाठीं मी लाज सोडली, शीलभ्रष्ट झालें; त्याच्यामुळें जगांत माझ्या नाचक्कीचा डंका वाजला; आणि प्रियसखी, हें सारें मी ज्याच्यासाठीं केलें तो मात्र मला पारखा झाला.

● इतका तो निर्लज्ज, भ्रष्ट व अकृतज्ञ आहे.

## ५२५ कुलवधू : 525. Coy.

हसिअं अदिट्ठदन्तं, भमिअमणिक्कन्तदेहलीदेसम् ।
दिट्ठमणुक्खित्तमुहं एसो मग्गो कुलवहूणम् ॥ २५ ॥

[ हसितमदृष्टदन्तं भ्रमितमनिष्क्रान्तदेहलीदेशम् ।
दृष्टमनुत्क्षिप्तमुखमेष मार्गः कुलवधूनाम् ॥ ]

हंसावयाचें, पण दांत दिसूं द्यावयाचे नाहींत; फिरावयाचें, पण तें घरांतल्या घरात, उंबरठा ओलांडावयाचा नाहीं; पहावयाचें, पण मुख वर न उचलतां. ही वागणूक कुलवधूंची.

१. मुक्का. २. अजसघोसणा ३. रत्तो. ४. असतीघोषणा. ५. क्वोल-कहिंयं. ६. अणुट्ठदप्पं. ७. मुहं.

५२६ डंका : 526. Royal Drum.

धूलिमइलो वि पङ्कङ्किओ वि तणरइअदेहभरणो वि ।
तह वि गइन्दो गरुअत्तणेण ढक्कं समुव्वहइ ॥ २६ ॥

[ धूलिमलिनोऽपि पङ्काङ्कितोऽपि तृणरचितदेहभरणोऽपि ।
तथापि गजेन्द्रो गुरुकत्वेन ढक्कां समुद्वहति ॥ ]

हत्तीचें अंग धुळीनें मळलेलें व चिखलानें माखलेलें असतें आणि तो गवत खातो. तरी नैसर्गिक मोठेपणामुळें डंका धारण करण्याचा मान गजेंद्रालाच मिळतो.

● जननिन्दित नायकाविषयीं नायिकेला अनुकूल करण्यासाठीं दूतीचे प्रशंसोद्गार. लोकांनीं त्याची कितीहि निंदा केली व त्याची दुर्गति असली तरी त्याचा मोठेपणा झांकणार नाहीं. इतरांना पेलणार नाहीं असा डंका याचेंच माहात्म्य गर्जून सांगत असतो. अलंकारकौस्तुभांत अप्रस्तुतप्रशंसेचें उदाहरण.

५२७ अपहृता : 527. Abduction.

करमरि ! कीस ण गम्मइ ? को गव्वो जेण मसिणगमणासि ? ।
अंदिट्ठदन्तहासिरीअ जम्पिअं चोर ! जाणिहिसि ॥ २७ ॥

[ बन्दि किमिति न गम्यते को गर्वो येन मसृणगमनासि ।
अदृष्टदन्तहसनशीलया जल्पितं चोर ज्ञास्यसि ॥ ]

---

१. ढक्काः २. दरदिट्ठ ३. मंद.

चोरानें विचारलें, बन्दिनी, मला कळत नाहीं, तुला एवढा कशाचा गर्व आहे, कीं तूं इतकी हळूहळू चालत आहेस ? ओंठांतल्या ओठांत हंसून ती पुटपुटली, चोरा, याचें कारण तुला लवकरच समजेल.

● तिनें झपाझप चालावें म्हणून यानें तिला वारंवार दरडावलें, पण तिनें आपली गति वाढवली नाहीं. त्याला पाठलागाची भीति वाटत होती आणि तिला आशा. पति लगोलग आपल्या मागावर येईल या अपेक्षेनें अपहृता मुद्दाम रेंगाळत होती.

## ५२८ डाग : 528. Mark.

थोरंसुएहिँ रुण्णं सवत्तिवग्गेण पुप्फवइआए ।
भुअसिहरं पइणो पेच्छिऊण सिरलग्गतुप्पलिअम् ॥ २८ ॥

[ स्थूलाश्रुभी रुदितं सपत्नीवर्गेण पुष्पवत्याः ।
भुजशिखरं पत्युः प्रेक्ष्य शिरोलग्नवर्णघृतलिप्तम् ॥ ]

पुष्पवतीनें मुखाला लावलेलें वर्णघृत पतीच्या दंडाच्या बाहुट्याला लागलेलें पाहून तिच्या सवती ढसढसा रडल्या.

## ५२९ आवाहन : 529. Temptation.

लोओ जूरइ, जूरउ ! वअणिज्जं होइ, होउ तं णाम ।
एहि ! णिमज्जसु पासे, पुप्फवइ ! ण एइ मे णिद्दा ॥ २९ ॥

१. सिरमग्ग, सिरसंग. २. णिमिज्जसु.

[ लोकः खिद्यते खिद्यतु वचनीयं भवति भवतु तन्नाम ।
एहि निमज्ज पार्श्वे पुष्पवति नैति मे निद्रा ॥ ]

पुष्पवती, काय म्हणतेस ! लोक रागावतील ? रागावूं देत. निंदा करतील ? करूं देत मला तुझ्याशिवाय झोंप येत नाहीं. ये, इकडे ये आणि माझ्याशेजारीं झोंप.

## ५३० चित्रपट : 530. Omnipresent.

जं जं पुलएमि दिसं पुरओ लिहिअ व्व दीससे तत्तो ।
तुह पडिमापडिवाडिं वहइ व्व सअलं दिसाअक्कम् ॥ ३० ॥

[ यां यां प्रलोकयामि दिशं पुरतो लिखित एव दृश्यसे तत्र ।
तव प्रतिमापरिपाटीं वहतीव सकलं दिशाचक्रम् ॥ ]

मी ज्या ज्या दिशेला पाहतें त्या त्या क्षितिजावर तूं मला चित्रासारखा दिसतोस. जणूं दिशाचक्र माझ्यापुढें तुझ्या प्रतिमांची रांग फिरवीत आहे.

## ५३१ भुंगा : 531. Black-Berry.

ओसरइ, धुणइ साहं, खोक्खामुहलो पुणो समुल्लिहइ ।
जम्बूफलं ण गेह्णइ भमरो त्ति कई पढमडक्को ॥ ३१ ॥

१. गर्हति. २. निषिद्ध. ३. चक्रं ४. सतत. ५. धुणइ. ६. पंपा, भंभा. ७. पडुम.

[ अपसरति धुनोति शाखां खोक्खामुखरः पुनः समुल्लिखति ।
जम्बूफलं न गृह्णाति भ्रमर इति कपिः प्रथमदष्टः ॥ ]

माकडाला एकदां भुंगा चावला होता. त्याला एक जांभूळ दिसलें. त्याला वाटलें भुंगाच आहे. लगेच माकड चमकून एकदम दूर सरकलें, खाकरूं लागलें, फांदी हलवूं लागलें व पानें ओरबाडूं लागलें; पण जांभळाला हातही लावीना.

● एकदां बोभाटा झाला म्हणून पुन्हांही तसेंच होईल अशा कल्पनेनें भिऊं नको, असें नायकाला दूतीचें आश्वासन. याला तिच्या यजमानानें पूर्वी चोपून काढलें होतें की काय ? की हा तिला चावला होता, म्हणून ती विचक्त होती !

## ५३२ खाजरी : 532. Monkey.

ण छिवइ हत्थेण कई कण्डुइभएण पत्तलणिउञ्जे ।
दरलम्बिअगोच्छकइकच्छुसच्छहं वाणरीहत्थम् ॥ ३२ ॥

[ न स्पृशति हस्तेन कपिः कण्डूतिभयेन पत्रलनिकुञ्जे ।
ईषल्लम्बितगुच्छकपिकच्छुसदृशं वानरीहस्तम् ॥ ]

वानराचा हात एकदां खाजरीला लागला होता. कुंजांतील पानांच्या गर्दीत वानरीचा केसाळ हात लोंबत होता. खाजरीच्या शंकेनें वानर तिच्या हाताला स्पर्शही करीना.

● खाजरीची लव रंगानें तांबूस असते. समजावून सांगितलें तरी मूढाना उमजत नाहीं.

५३३ शुष्क : 533. Contradiction.

सरसा वि सूसइ च्चिअ जाणइ दुक्खाइँ मुद्धहिअआ वि ।
रत्ता वि पण्डुर च्चिअ जाआ वरई तुह विओए ॥ ३३ ॥

[ सरसापि शुष्यत्येव जानाति दुःखानि मुग्धहृदयापि ।
रक्तापि पाण्डुरैव जाता वराकी तव वियोगे ॥ ]

सरस आहे तरी तुझ्या विरहामुळें बिचारी कोमेजल्यासारखी दिसत आहे, मुग्धहृदया आहे तरी आतां तला दुःखाची जाणीव झालेली आहे आणि अनुरक्ता आहे तरी पांढरी फटफटीत झाली आहे.

● जें सरस, आर्द्र होतें तें विरहामुळें नीरस, शुष्क झालें; अजाण होतें, त्यालाही दुःखाची जाणीव झाली, अनुरक्तीमुळें आरक्त होतें तें पांडुर झालें; जसें हृदय, तसाच देहही. अलंकारकौस्तुभांत विरोधाचें उदाहरण,: 'अविरोधेऽपि विरोधो यत्रोक्तः स्याद्विरोधः सः । स्याज्जातेर्गुणकर्मद्रव्याणां स्वस्वपरयोगात् ॥'

५३४ सुगंधित मद्य : 534. Scented Wine.

आरुहइ जुण्णअं खुज्जअं वि जं उअह वल्लरी तउसी ।
णीलुप्पलपरिमलवासिअस्स सरअस्स सो दोसो ॥ ३४ ॥

[ आरोहति जीर्णं कुब्जकमपि यत्पश्यत वेल्लनशीला त्रपुसी ।
नीलोत्पलपरिमलवासितायाः शरदः स दोषः ॥ ]

१. मुद्ध. २. खुटकं, जुण्णअं, वंजुलं. ३. जुण्णखज्जूरणअं. ४. उडसी.
५. जीर्णखजूरमपि. ६. वेपमाना दन्दुरिः

विळखा घालणें हा वेलीचा धर्म आहे. पहा, वृक्ष वठलेला व वेडावाकडा आहे, तरी काकडीची वेली त्यावर चढली आहे. निळ्या कमळाचा सुगंध सर्वत्र दरवळविणाऱ्या शरद् ऋतूचाच हा दोष.

● दुसरी ओळ ' नीलोत्पलपरिमलवासितायाः सरकस्य दोषः ' अशी वाचली तर अर्थ बदलतो. ' सरकस्य इक्षुमद्यस्य.' हा दोष मद्याचा, नीलोत्पलाच्या परिमलानें सुगंधित झालेल्या मद्याचा. जुन्या झाडांना व वेलींना शरद् ऋतूंत नेव जीवन प्राप्त होतें. त्याचप्रमाणें सुगंधित मद्याच्या सेवनानें वृद्धांना मस्ती येते आणि वृद्धाही तरुणींप्रमाणें वागूं लागतात. नायिका उन्मत्त झाली होती म्हणूनच तिनें वृद्धनायकाचा स्वीकार केला !

## ५३५ वसंतोत्सव : 535 Revelry.

उप्पहपहाविहजणो पविजिम्हिंअकलअलो पहअतूरो ।
अव्वो सो च्चेअ छणो तेण विणा गामडाहो व्व ॥ ३५ ॥

[ उत्पथप्रधावितजन· प्रविजृम्भितकलकलः प्रहततूर्यः ।
दुःख स एव क्षणस्तेन विना ग्रामदाह इव ॥ ]

वसंतोत्सव सुरू आहे; लोक रस्ता सोडून धावत आहेत, सगळीकडे गोंगाट चालला आहे, नगारे वाजत आहेत; पण प्रियकराच्या विरहामुळें मला मात्र वाटत आहे कीं जणूं गावाला आग लागली आहे व त्यामुळेंच हा गोंधळ चालला आहे.

● विरहाग्नीच्या तापामुळें ती तळमळत होती म्हणूनच गांवाला आग लागल्याची उपमा तिला सुचली. उत्सवाची, त्याचप्रमाणें दरोडा, आग अशा संकटाची गावकऱ्यांना सूचना देण्यासाठीं नगारे वाजवीत असत.

१· पविअभिअ, पविअभिय

५३६ वेताळ : 536. Ghost.

उल्लावन्तेण ण होइ कस्स पासट्ठिएण ठड्ढेणं ।
सङ्का मसाणपाअवलम्बिअचोरेण व खलेण ॥ ३६ ॥
[ उल्लापयमानेन न भवति कस्य पार्श्वस्थितेन स्तब्धेन ।
शङ्का श्मशानपादपलम्बितचोरेणेव खलेन ॥ ]

दुष्टापासून कोणाला भय नाहीं ? तो कांहीं न बोलतां नुसता बाजूला स्तब्ध उभा राहिला तरी भीतिप्रद असतो. तो गोड बोलला तर त्याहून भयंकर. अगदीं स्मशानांतल्या झाडावरील फांसावर लटकविलेल्या चोराप्रमाणें भयंकर.

● श्लेष : पार्श्वस्थितेन = संनिहितेन अथवा पाशस्थितेन; स्तब्धेन = अहंकारात् अथवा प्राणवायुविरहात्; शंका = वितर्क अथवा भयम्. फासावर लटकलेला चोर मेलेला आहे हें माहीत असलें तरी त्याच्या दर्शनानें भीति वाटते. फासावर लटकललें प्रेत एकाएकीं बोलूं लागलें तर जीवाचें पाणी पाणी होईल. चोर जिवंत असला तर सोडवणीसाठीं विनवणी करील आणि तो ऐकली तर तो मदतगाराचा घात करील. वेताळपंचविशींतील मूळ वस्तु या गाथेंत असावी असें वाटतें.

५३७ कुटज : 537. Ridicule.

असमत्तगुरुअकज्जे एह्लिं पहिए घरं णिअत्तन्ते ।
णवपाउसो पिउच्छा हसइ व कुडअट्टहासेहिं ॥ ३७ ॥

१. ठड्ढेण, थड्ढेण, दिट्ठेण. २. दग्धेन. २. पाउडो, पाउलो, पावसो.

[ असमाप्तगुरुककार्ये इदानीं पथिके गृह प्रतिनिवर्तमाने।
नवप्रावृट् पिव्रुप्स हसतीव कुटजाट्टहास ॥ ]

आत्याबाइ, महत्त्वाच्या कामासाठीं प्रवासाला गेलेला प्रियकर काम अपुरें टाकून परत आला हें पाहून नवा पावसाळा जणू शुभ्र व विकसित कुटज पुष्पाच्या रूपानें त्याला हसत आहे

● पावसाळ्यानेंही कुटज पुष्पें उमलवून कौतुक केलें हास्य व कुटज या दोहोंचाही वर्ण शुभ्र

## ५३८ वात्सल्य :　　　　538 Affection

दठूणं उण्णमन्ते मेहे आमुक्कजीविआसाए ।
पहिअवरिणीअ डिम्भो ओरुण्णमुहीअ सच्चविओ ॥ ३८ ॥

[ दृष्ट्वा उन्नमतो मेघानामुक्तजीविताशया ।
पथिकगृहिण्या डिम्भोऽवरुदितमुख्या दृष्ट ॥ ]

पति प्रवासाला गेला होता. आभाळात ढग दिसू लागले तेव्हा पत्नीनें प्राणाची आशा सोडली आणि पुत्राकडे पाहून ती रडू लागली. तिला वाटलें, पुढें याचें कसें होईल ?

## ५३९ कासारीण:　　　　539 Bangles

अग्गिहलवरणवलअ ठाणं णेन्तो पुणो पुणो गलिअम् ।
सहिमत्थो चिअ माणसिणीअ वलआरओ जाओ ॥ ३९ ॥

१ दच्छूण २ अच्चविओ सव्वविआ ३ अवनत

[ अविधवालक्षणवलयं स्थानं नयन्पुनःपुनर्गलितम् ।
सखीसार्थ एव मनस्विन्या वलयकारको जातः ॥ ]

( विरहजन्य कृशतेमुळें ) तिच्या मनगटांवरल्या सौभाग्यसूचक बांगड्या वारंवार गळून पडत होत्या आणि तिच्या मैत्रिणी त्या पुन्हा पुन्हा तिच्या हातांत चढवीत होत्या. तिला धीर देतां देतां त्या कासारणी झाल्या.

● विरहिणी आभूषणें धारण करीत नाहींत. ही तर इतकी कृश झाली होती कीं तिचीं सौभाग्यलक्षणेंही ढळत होतीं. तिच्या मैत्रिणी आश्वासनें देऊन तिच्या जीवनाचें आणि बांगड्या चढवून जणू तिच्या सौभाग्याचें रक्षण करीत होत्या.

## ५४० जीर्णगृहः 540. Pessimism.

पहिअवहू वि[1]वरन्तगलिअजलोल्ले घरे अणोल्लं[2] पि ।
उद्देसं अविरअवाहसलिलणि[3]वहेण उल्लेइं ॥ ४० ॥

[ पथिकवधूर्विवरान्तरगलितजलार्द्रे गृहेऽनार्द्रमपि ।
उद्देशमविरतवाष्पसलिलनिवहेनार्द्रयति ॥ ]

पति प्रवासाला गेला होता. पावसामुळे घर गळत होतें. जी थोडी जागा कोरडी राहिली होती तीही नववधूनें अश्रुसिंचनानें ओली केली.

१ सहीहस्त २ वलयाकारो, वलयारजो ३ कुड्डतर, णेद्धतर, निव्वतर, नेद्धतर, पडलतर ४ पवहेण ५ ओल्लेइ ६ नीव्रान्तर ७ प्रदेश

५४१ ऊंस :　　541 Sugar Cane.

जीहाइ कुणन्ति पिअं भवन्ति हिअअम्मि णिव्वुइं काउम् ।
पीडिज्जन्ता वि रसं जणन्ति उच्छू कुलीणा अ ॥ ४१ ।

[ जिह्वायां कुर्वन्ति प्रियं भवन्ति हृदये निर्वृतिं कर्तुम् ।
पीड्यमाना अपि रस जनयन्तीक्षवः कुलीनाश्च ॥ ]

कुलीन लोक उंसासारखे असतात; जिभेला गोड असतात हृदयाला सुख देतात व प्रिय वाटतात. त्याना पिळून काढलें तरी ते सरसच ठरतात

● निष्ठुरानीं सज्जनाचा छळ केला तरी त्याच्या स्वभावातलें माधुर्य नष्ट होत नाहीं छळानें ते संतापत नाहींत, द्रवतात, सज्जनाची वाणी श्रवण करणाराला गोड वाटते आणि ऊस सेवन करणाराला, एवढाच फरक. या गाथेंत संपुटक गुंफनाची सूचना असावी असा संशय येतो.

५४२ उत्कण्ठा :　　542. Predilection

दीसइ ण चूअमउलं, अत्ता ! ण अ वाइ मलअगन्धवहो ।
पत्तं वसन्तमासं साहइ उक्कण्ठिअ चेअम् ॥ ४२ ॥

[ दृश्यते न चूतमुकुलं श्वश्रु न च वाति मलयगन्धवहः ।
प्राप्त वसन्तमासं कथयत्युत्कण्ठित चेत ॥ ]

सासूबाई, आंब्याला अझून मोहोर आलेला नाहीं आणि मलयाचा सुगंध आणणारे वारे अद्याप वाहू लागले नाहींत, पण माझ्या मन तलें उत्कंठा सांगते कीं वसंत जवळ आलेला आहे.

१. वरेन्ति २ हरन्ति ३ जिव्हया ४ हरन्ति हृदयम् ५ वेअ.

५४३ आम्रवनांत : 543. Grove.

अम्बवणे भमरउलं ण विणा कज्जेण ऊसुअं भमइ ।
कत्तो जलणेण विणा धूमस्स सिहाउ दीसन्ति ? ॥ ४३॥

[ आम्रवने भ्रमरकुलं न विना कार्येणोत्सुकं भ्रमति ।
कुतो ज्वलनेन विना धूमस्य शिखा दृश्यन्ते ॥ ]

आंबेवनात भुंगे उत्सुकतेनें भ्रमण करीत आहेत, ते काहीं विनाकारण नव्हे. अग्नीशिवाय धुराचे लोट कोठून दिसणार ?

● सखीचें आश्वासन. धीर धर, अझून वसंत आलेला नाहीं. आताच कोठें आंब्यावर मोहोर आलेला आहे आणि आंबेवनात भुंग्याचा झंकार सुरु झालेला आहे. वसंत येईल तेव्हा प्रियकरही आलेला असेल.

५४४ शृंगार : 544. Summer Festival

दइअकरग्गहलुलिओ धम्मिल्लो सीहुगन्धिअं वअणम्[1] ।
मअणम्मि एत्तिअं चिअ पसाहणं हरइ तरुणीणम् ॥ ४४ ॥

[ दयितकरग्रहलुलितो धम्मिल्लः सीधुगन्धितं वदनम् ।
मदने एतावदेव प्रसाधनं हरति तरुणीनाम् ॥ ]

प्रियकरानें कुरवाळल्यामुळें विस्कटलेले केंस आणि मद्यामुळे सुगंधित झालेलें मुख – मदनोत्सवात एवढाही शृंगार तरुणींना शोभतो.

● मदने = मदनत्रयोदशीच्या सामुदायिक उत्सवात अगर वैयक्तिक मदनोत्सवात. भुवनपालानें ' सअणम्मि ' असा पाठभेद दिलेला आहे त्याचा अर्थ स्पष्ट आहे. हा पाठ विचारात घेण्याजोगा आहे मैत्रिणी घाई करू

१ मिलिओ २ सअणम्मि ३. होइ ४. वचनम्. ५ मदनोऽप्येतावदेव

लागल्या नायिका म्हणते, जरा वेगी फणी करतें, मुखप्रक्षालन करतें, दोन दागिने घालतें सखी सांगते, आहे हा शृंगार पुरा आहे, अलंकाराचा भार कशाला?

## ५४५ कञ्चुकी : 545 Bodice

गामतरुणीओ हिअअं हरन्ति छेआणं थणहरिल्लीओ।
मअणे कुसुम्भरंञ्जिअकञ्चुआहरणमेत्ताओ ॥ ४५ ॥

[ ग्रामतरुण्यो हृदयं हरन्ति विदग्धानां स्तनभारवत्यः।
मदने कुसुम्भरागयुक्तकञ्चुकाभरणमात्राः ॥ ]

पुष्ट स्तनावर कुसुम्बी कञ्चुकी एवढेंच आभरण धारण करणाऱ्या ग्रामतरुणी मदनोत्सवात मार्मिकांचीं हृदय हरण करतात

● जातीच्या सुंदरींना कांहींही शोभतें यौवनामुळें सौंदर्याची शोभा वृद्धिंगत होते आणि वसंतोत्सव आला कीं विचारूच नका तटतटीत लालभडक कञ्चुकी हें विलासी यौवनाचें प्रतीक त्याच्या झळाळीला तोड नाहीं. " आधींच जोबन निब्बर त्यावर पीतांबराची चोळी जबर "

## ५४६ क्षितिज : 546 Horizon

आलोअन्त दिसाओ ससन्त जम्भन्त गन्त रोअन्त।
मुच्छेन्त पडन्त खलेन्त पहिअ किं ते पउत्थेण ? ॥ ४६ ॥

१ पोढाण, पोत्तुण वेढाल्ल २ पीवरथणहरल्लीउ ३ मअणूसम्मि, सअणे ४ राइल्ल ५ कञ्चुलीआहरण ६ प्रौढ प्रोत्तुग ७ गुरुत्व, भारा ८ मदन त्रयोदश्याम् मदनोत्सवे मदनोत्सवत्रयोदश्याम् ९ मदयन्ति कुसुम्भरक्तकञ्चुकी मात्रा भरणा । मन्ये कुसुम्भरञ्जितकञ्चुकिकाहरणमात्रा । १० मुज्यन्त ११ हसत

[ आलोकयन्दिशः श्वसञ्जृम्भमाण गायन्रुदन् ।
मूर्छन्पतन्स्खलन्पथिक किं ते प्रवसितेन ॥ ]

पथिका, तूं क्षितिजांकडे विमनस्कपणें पहात आहेस व निश्वास टाकीत आहेस; मध्येंच जांभया देत आहेस; कधीं गात आहेस आणि कधीं रडत आहेस; चालतांना अडखळत आहेस, वळून पहात आहेस व मूर्च्छित होत आहेस. तूं हा प्रवास कशासाठीं चालविला आहेस !

● हा तुझा पहिलाच प्रवास असावा असें वाटतें. तूं मागें वळून पहात आहेस, यावरून दिसतें कीं तूं घरापासून फारसा लांबवर आलेला नाहींस. आताच तुझी ही अवस्था, पुढें काय होईल !

## ५४७ स्वयंप्रकाश ! 547. Self-Illumination.

· दट्ठूण तरुणसुरअं विविहविलासेहिँ करणसोहिल्लम् ।
दीओ वि तग्गअमणो गअं पि तेल्लं ण लक्खेइ ॥ ४७ ॥

[ दृष्ट्वा तरुणसुरतं विविधविलासैः करणशोभितम् ।
दीपोऽपि तद्गतमना गतमपि तैलं न लक्षयति ॥ ]

अनेक प्रकारच्या विलासांनीं व आसनांनीं सुशोभित झालेलें तरुणांचें[1] सुरत पाहतांना दिवा इतका तल्लीन होतो कीं तेल संपलें हेंही त्याच्या लक्षात येत नाहीं !

● तेल संपलें तरी तल्लीनतेमुळें दिवा तसाच तेवत राहतो. गवाक्षातून मैत्रिणीच्या लीला पाहणाऱ्या सखीचे हे उद्गार असावेत. रत्नदीपाचा प्रकाश विझविण्यासाठीं त्यावर चूर्णमुष्टि फेंकणाऱ्या अलकावर्तीतील विलासिनीची

१. तरुणी.

येथें आठवण होते. " नीवीबन्धोच्छ्वसितशिथिलं यत्र बिम्बाधराणाम् । क्षौमं रागादनिभृतकरेष्वाक्षिपत्सु प्रियेषु ॥ अर्चिस्तुङ्गानभिमुखमपि प्राप्य रत्नप्रदीपान् । ह्रीमूढाना भवति विफलप्रेरणा चूर्णमुष्टिः " ( मेघदूत २·८ ) कालिदासाच्या रत्नदीपाहून हा तैलदीप अधिक रसिक, हें मात्र खरें !

## ५४८ नर्मदाः

548. Annoyance.

पुणरुत्तकरप्फालणउहअतडुल्लिहणवड्डणसआइं ।
जूहाहिवस्स माए पुणो वि जइ णम्मआ सहइ ॥ ४८ ॥

[ पुनरुक्तकरास्फालनोभयतटोल्लिखनपीडनशतानि ।
यूथाधिपस्य मातः पुनरपि यदि नर्मदा सहते ॥ ]

आयाई — हत्तींच्या कळपाचा पुढारी नर्मदेला अनेक प्रकारें त्रस्त करीत आहे; तिच्या प्रवाहाच्या पृष्ठभागावर सोंडेनें पुनः पुनः प्रहार करून पाणी घुसळीत आहे; दोन्ही किनारे दांतांनीं उकरीत आहे. हें नर्मदाच सहन करूं जाणे.

● नर्मदा म्हणजे नर्मदा नदी किंवा सुख देणारी क्रीडानुकूला स्त्री. तरुणांच्या टोळीचा पुढारी आपल्या प्रेयसीला इतराच्या समक्ष सरमस आलिंगितो, तिच्या देहावर कामशास्त्रोक्त प्रहार करतो, तिचें सर्वांग नखदंतक्षतयुक्त करतो. हा आवेश ती कशी सहन करते हें तिचें तीच जाणे. पण सखि, तुला भिण्याचें कारण नाहीं, तूंही काहीं कमी नाहींस. तुला हें सहन होतें; एवढेंच नाही, आवडतें. प्रौढेला दूतीचें प्रोत्साहन.

१. ताडण, पीडण, मर्दण, वट्टण. २. कर्षणशतानि.

## ५४९ संकटपरंपरा : 549. Opportunity.

वोडंसुणओ विअण्णो, अत्ता मत्ता, पई वि अण्णत्थो।
फलिहं व मोडिअं महिसएण, को तस्स साहेउं ?॥ ४९ ॥

[ वृद्धशुनको विपन्नः श्वश्रूर्मत्ता पतिरप्यन्यस्थः।
कार्पास्यपि भग्ना महिषकेण कस्तस्य कथयतु॥ ]

वृद्ध कुत्रा मेला, सासूला वेड लागलें; नवरा दुसरीकडे गेला आहे आणि इकडे रेड्यांनीं कपाशीचें शेत उध्वस्त केलें आहे, हें त्याला कोण कळविणार ?

● आमचा भुकरा व चावरा किंवा वृद्ध व इमानी कुत्रा नुकताच मेला. तो परक्याची चाहूल जाहीर करीत असे. सासूला आताच वेडाची छर आली आहे. तिकडे कपाशींत रेडे घुसले आहेत आणि मी ही अशी एकटी. अन्यस्थ पतीला निरोप पाठवावा, तर हाताशीं माणूस नाहीं. मी आतां काय करूं ? कपाशीच्या शेतांत संकेत ठरला होता, तिकडे नको, व्यत्यय येईल, घर निर्धास्त आहे, इकडेच यावें; अशी सूचना. 'अत्ता मत्तो पइ णवसुराए' हा पाठभेद स्वीकारला तर अर्थ थोडा बदलतो. अहो सासूबाई, ताजी दारू प्याल्यामुळें पति झिंगला आहे, किंवा सासूला वेड लागलें आहे व नवरा झिंगून पडला आहे.

## ५५० चिमणीचा घोंट : 550. Libation.

सकेअग्गहरहसुत्ताणिआणणा पिअइ पिअमुहविइण्णम्।
थोअं थोअं रोसोसहं व उअ ! माणिणी मंइरम् ॥ ५० ॥

१. पोढ, बोड, वाड, वुड्ढ, वोण. २. णवसुराहे. ३. फडही, फलिहि. ४. साहेज्ज ५. विक्कणो. ६. सकर. ७. तंसुण्णामि. ८. रभसुत्ताणिअणणं, सुहुउण्णामिआणणा. ९. पिअअम १०. सरअं.

[ सकचग्रहरभसोत्तानितानना पिबति प्रियमुखवितीर्णाम् ।
स्तोकं स्तोकं रोषौषधमिव पश्य मानिनी मदिराम् ॥ ]

पहा, केस ओढून धरून जिचें मुख जबरदस्तीनें वर केलेलें आहे अशी मानिनी प्रियकरानें आपल्या मुखांतून दिलेली मदिरा हळूहळू थोडी थोडी पीत आहे; जणूं ती रुसव्यावरचें औषधच घेत आहे.

● हें औषध क्वचित प्रसंगीं आणि अगदीं थोडें, थोडें थोडें, दिलें पाहिजे. अनुपान किंवा परिमाण चुकलें कीं स्त्रियांना रुसण्याचीच चटक लागावयाची !

## ५५१ गिरिस्रोत : 551 Mountain Torrent

गिरिसोत्तो त्ति भुअंगं महिसो जीहइ लिहइ संतत्तो ।
माहिसस्स कल्हवत्थरझरो त्ति सप्पो पिअइ लालम् ॥ ५१ ॥

[ गिरिस्रोत इति भुजंगं महिषो जिह्वया लेढि संतप्तः ।
महिषस्य कृष्णप्रस्तरझर इति सर्पः पिबति लालाम् ॥ ]

उन्हामुळें ( काळाभोर रेडा तहानला होता व चकचकीत साप निपचित पडला होता ) तापलेला रेडा सापाला चाटूं लागला; रेड्याला वाटलें का तो डोंगरांतला झराच आहे रेड्याच्या तोंडांतून गळणारी लाळ साप पिऊं लागला; सापाला वाटलें कीं तो काळ्या फत्तरांतून वाहणारा प्रपात आहे.

● तृषार्तांना विवेक राहत नाहीं, धोका उमजत नाहीं; मग तहान कशाचीही असो. संकट सर्वांना समान असतें तेंव्हा प्राणी निःशंक होतात.

---

१ त्रस्तावनामित २ प्रियतमवितीर्णम् ३. णइसाउ, णइसोत्ति, णइसोत्तो, वणसोत्तो. ४ कणसपत्थर, पत्थरझर, ५ नदी.

मृत्यु समोर ठाकला तरी मनुष्य मदनाच्या पाशातून मुक्त होऊ शकत नाहीं. मद्दिप व सर्प याचें वैर नैसर्गिक आहे. पीतांबर सागतो, असा विरोध निवरून सर्वांना सम मानणें हा धर्म, गेयाचा त्याग करून योगाभ्यास करणें ही युक्ति अलकारकौस्तुभात भ्रांतिमान् अलकाराचें उदाहरण • ' तदभाव वति मतिस्तत्प्रकारिका भ्रान्तिमान्भवति । '

## ५५२ साळुंकी : 552 Infamous Bird

पञ्जरसारिं अत्ता[1] ण णेसि किं एत्थ रइहराहिन्तो ? ।
वीसम्भजम्पिआइं एसा लोआणं पअडेइ ॥ ५२ ॥

[ पञ्जरशारीं मातुलानि न नयसि किमत्र रतिगृहात् ।
विस्रम्भ जल्पितान्येषा लोकानां प्रकटयति ॥ ]

रतिगृहात नि शकपणें केलेलें बोलणें ही पिंजऱ्यातली मैना सर्वांना उघड करून सागते आत्याबाई, तू तिला दुसरीकडे का नेऊन ठेवीत नाहींस ?

● या गाथेची नायिका कुलवधू असेल किंवा स्वैरिणी, कोणीही असली तरी तिला रतिगृहातील वृत्तान्ताचा वाच्यता रुचणार नाहीं, स्त्रियानाच काय, पुरुषानाहि ! देशोदेशींच्या प्राचीन व मध्ययुगीन लोककथात शुकसारिका सकेत विख्यात आहे स्वैरिणीच्या व्यभिचाराचा वृत्तान्त प्रवासाहून परतलेल्या पतीला सागणें, व्यभिचाराला उद्युक्त झालेल्या स्त्रीला त्यापासून परावृत्त करण्यासाठीं गोष्टी सागून उपदेश करणें किंवा या निमित्तानें स्त्रीवेदातील श्रुतींचें कथन करणें अशीं अनेक कार्यें या अज्ञात कथाकारानीं शुकसारिकांमार्फत

१ पिञ्जर २ पिअसहि

करविलेली आहेत. पद्मावतीच्या नागकुलोत्पन्न नागसेन राजाच्या राजकीय रहस्याचा सारिकेनें स्फोट केल्यामुळें ओढवलेल्या प्रसंगाचा उल्लेख बाणभट्टानें हर्षचरितात सहाव्या उच्छ्वासात केलेला आहे. रसिक नागरकाला बोलक्या राघू-मैनाची हौस असते, पण त्याच्या बोलामुळें रहस्यें प्रकट होण्याची शक्यता आहे हें अदाजून वात्स्यायन ( कामसूत्रम : १.४.१३ ) सागतो, वासगृहात क्रीडाशकुनिपञ्जर असावेत, पण ते बाहेरच्या बाजूला टागावेत !

## ५५३ असहिष्णु :                    553. Intolerant.

एद्दहमेत्ते गामे ण पडइ भिक्ख त्ति कीस मं भणसि ? ।
धम्मिअ ! करञ्जभञ्जअ ! जं जीआसि तं [1]पि दे वहुअम् ॥५३॥

[ एतावन्मात्रे ग्रामे न पतति भिक्षेति किमिति मां भणसि ।
धार्मिक करञ्जभञ्जक यज्जीवसि तदपि ते बहुकम् ॥ ]

हे धार्मिक, या एवढ्याच गांवांत भिक्षा मिळत नाहीं हें मला कशाला सांगतोस ? तूं करंजाच्या फांद्या मोडतोस; तू आतांपर्यंत जिवंत राहिलास हेंच विशेष.

● मुळातील ' भिक्षा पडत नाहीं ' हा प्रयोग ध्यानात घेण्याजोगा आहे. वेबर सागतो, हा धार्मिक करंजाच्या इतक्या फाद्या कशासाठीं मोडीत होता याचा खुलासा होत नाहीं. काहीं टीकाकार सागतात कीं तो या फाद्या निष्कारण मोडीत होता. काय तो वेडा होता ? गगाधर सागतो, तो करंजाच्या फाद्या दातवणासाठीं मोडीत होता ! हें युक्त दिसत नाहीं. स्वतःसाठीं तो अशा कितीशा फाद्या मोडणार ? त्या काळीं आजच्याप्रमाणें दातवणाच्या मालाला मोठ्या प्रमाणावर शहरी मागणी असणे संभवत नाहीं. मला वाटतें याचें स्पष्टीकरण धार्मिक या शब्दात, स्वधर्मानुसार अभिप्रेत

१. तं महच्चरिअ.

असलेल्या अर्थात, सापडण्याजोगें आहे. हें संबोधन तिरस्कारव्यंजक आहे. करजाच्या आडोशाला होणारे व्यभिचार थांबावे म्हणून तो सद्बुद्धीनें त्याच्या फांद्या मोडीत असावा, किंवा वरून वैराग्याचा आव आणून, पण वस्तुतः प्रणयी जनांच्या लीला पाहून आपल्या अतृप्त वासना शांत करण्यासाठी तो करजाच्या झाडींत घुटमळत असावा, आणि याच्या आगातुकीमुळें संकेतभंग झालली व्यभिचारिणी त्याच्यावर चिडलेली असावी अशा चोंबड्याला कोणत्या उदार स्त्रिया भिक्षा वाढणार? स्वैरिणींच्या स्वातंत्र्य त हस्तक्षेप करणाराला मिळणारें प्रायश्चित्त शापरूपात ध्वनित केलेलें अ हे

**५५४ चरक : 1554 Crusher.**

जन्तिअ! गुलं विमग्गसि ण अ मे इच्छाइ वाहसे जन्तम्।
अरसिअ! किं ण आणसि : ण रसेण विणा गुलो होइ?॥५४॥

[ यान्त्रिक गुड विमार्गयसे न च ममेच्छया वाहयसि यन्त्रम्।
अरसिक किं न जानासि न रसेन विना गुडो भवति॥ ]

हे चरक चालविणाऱ्या यान्त्रिका, तू माझ्या मर्जीनुसार चरक नीट चालवीत नाहींस. कामावर तुझें चित्त नाहीं, तू पुरेसा रस काढीत नाहींस. तुला गूळ पाहिजे, पण रसाशिवाय गूळ तयार होत नाहीं, हें तुला कळत नाहीं काय?

● चरक चालविणाराला त्याच्या कामाचा मोबदला गुळांत मिळत असे, असें दिसतें हे यान्त्रिक, तुला चरक चांगला चालवता येत नाहीं, तू उसातला सारा रस पिळून काढीत नाहींस; मग हा व्यवहार मालकाला कसा परवडणार? आणि तुला तुझ्या कामाचा मोबदला कसा मिळणार? हे यान्त्रिक, तुझ्या नैपुण्याची कीर्ति ऐकून मी तुला जवळ केलें, पण तुझें

१ गुड २ अरसन्त, अरसाण, अरासिअ ३ अन्यरासिक, अरसज्ञ. ४. गुणो.

कौशल्य तुझ्या कीर्तीला साजेसें नाहीं, तुझें तथाकथित कर्तृत्व केवळ तांत्रिक आहे, असें अनुभवानें माझ्या प्रत्ययास आलेलें आहे. तूं माझ्या मर्जीसारखा वागत नाहींस व मला संतुष्ट करीत नाहींत. तुझें चित्त अन्यत्र गुंतलेलें दिसतें. नुसता चरक फिरवतोस व बक्षीस मागतोस; हें कसें जमणार? मला संतुष्ट कर म्हणजे रसनिष्पत्ति व फलप्राप्तीही होईल! वज्जालग्गांतील (क्र. ५३३) छाया: 'यान्त्रिक (मैथुनकर्तर्) गुलं (द्रवीकरणत्व) विमार्गयसे न च ममेच्छया वहसे यन्त्रं (मैथुनं)। अरसज्ञ किं न जानासि न रसेन (शोभन मैथुनेन) विना गुलो भवति ॥

## ५५५ विनयभंग :  555 Short Enjoyment.

पत्तणिअम्बप्फंसा ण्हाणुत्तिण्णाएँ सामलङ्गीए।
जलबिन्दुएहिँ चिहुरा रुअन्ति बन्धस्स व भएण ॥ ५५ ॥

[ प्राप्तनितम्बस्पर्शाः स्नानोत्तीर्णायाः श्यामलाङ्ग्याः।
जलबिन्दुकैश्चिकुरा रुदन्ति बन्धस्येव भयेन ॥ ]

श्यामला न्हात होती. तेव्हां तिच्या कुंतलांनीं तिच्या नितंबांना स्पर्श केला. यासाठीं स्नानानंतर आपल्याला बद्ध व्हावें लागणार या धास्तीनेंच जणू तिचे चिकुर अश्रु ढाळीत आहेत.

● ओल्या केसातून ठिबकणारे बिन्दु हेच त्याचे अश्रु. ते अश्रु का ढाळीत होते? अपराधाबद्दल बंधनाची शिक्षा होणार म्हणून, कीं बंधनामुळें पुन्हा नितंबांना स्पर्श करण्याची संधि मिळणार नाहीं म्हणून? अभिलाष व्यक्त करण्याकरिता आसक्तानें काढलेले उद्गार, कीं त्याना व मला दोघानाहीं नितंबस्पर्शाची संधि दे, अशी नायिकेशी विनवणी. काव्यानुशासनात अस्थानस्थपद या अप्रेक्षादोषाचें उदाहरण (अ. ३; सू. ५)

१. चिहुरा.

## ५५६ कृष्णपक्ष : 556. Protection·

गामङ्गणणिअडिअकह्लवक्खे वड ! तुज्झ दूरमणुलग्गो ।
तिचिल्लपडिक्खकभोईओ वि गामो ण उव्विग्गो ॥ ५६ ॥

[ ग्रामाङ्गणनिगडितकृष्णपक्ष वट तव दूरमनुलग्न. ।
दौ·साधिकप्रतीक्षकभोगिकोऽपि ग्रामो नोद्विग्न ॥ ]

गावाच्या शिवेला वटवृक्ष दूरवरपर्यंत भिडलेला आहे. गावाच्या त्या बाजूला नेहमीं जणू कृष्णपक्षच असतो. दक्ष पहारेकरी कामी जनाच्या पाळतीवर आहेत. तरीही, हे वटवृक्षा, तुझ्या कृपेमुळें गावात कोणीही उद्विग्न नाहीं

● या गावाच्या प्रभूचा स्वभाव कडक आहे. तो असहिष्णु आहे कोठेंही व्यभिचार होऊ नये असा त्याचा कटाक्ष आहे. म्हणून त्यानें जागरूक पहारेकरी नेमलेले आहत, तरी या वडाच्या कृपेमुळें येथील प्रेमीजन त्याच्या उपसर्गापासून अलिप्त आहेत. शिवेजवळच्या वडाखाली संकेत निश्चित केल्याची सूचना.

## ५५७ भुनांपुढें बांसरी : 557. In Vain.

सुप्पं डड्ढं, चपआ ण भज्जिआ, सो जुआ अइक्कन्तो ।
अत्ता वि घरे कुविआ, भूआणँ व्र वाइओ वंसो ।।५७॥

---

१ वण, वसण २ पक्ख, वक्ख ३ तत्तिल्ल, ततिण, ततिल्ल ४. उत्ति ष्णतिव्वअरभोइयो ५ उत्तीर्णतीव्रतरभो इतोऽपि, चिंतापरप्रति स्वरभोगिकोऽपि, चिंतापरामर्पणभोक्तृको, चिंतापरासहनभोगिस्यो, तत्वज्ञप्रातिपक्षभोगिकोऽपि

[शूर्पं दग्धं चणका न भृष्टाः स युवातिक्रान्तः ।
श्वश्रूरपि गृहे कुपिता भूतानामिव वादितो वंश ॥]

इकडे सूप जळालें व चणे भाजले गेले नाहींत; तिकडे तो तरुण निघून गेला; घरांत सासूबाई रागावल्या; जणू भुतापुढें बासरी वाजवली.

●नव्या सवतीच्या दुर्वर्तनाबद्दल प्रथम पत्नीची नवऱ्याजवळ तक्रार. 'अहो, काय मज्जा झाली ती कळली का तुम्हाला? ही चुलीजवळ चणे भाजीत बसली होती, तोंच सोद्याची चाहूल लागली, तेव्हा चणे तसेच टाकून ही बया बाहेर धावली, चणे भाजले नाहींत आणि इकडे सूप मात्र जळालें; तिकडे तोही निघून गेला. सासूबाई चिडी रागावल्या, पण ह्या भाबड-भुताला त्याचें काहीं शुभाशुभ आहे का? म्हणतात ना, भुतापुढें बासरी वाजवली, त्यानें कशाला ऐकली? किंवा: मी चणे भाजीत बसलें होतें, त्याच्या खुणे-सरशीं ते तसेच टाकून मी मोठ्या उत्साहानें त्याला इषारा देण्यासाठीं पैंजण छुमकावीत अंगणांत आले, बाहेर आलें, पण त्या बहिरटानें मान वळविली नाहीं किंवा तो जरासासुद्धा थांबला नाहीं आणि मग घरात केवढा अनर्थ झाला: अशी नायिकेची दूतीजवळ तक्रार. भुतें बहिरीं असतात असा संकेत आहे. 'भुतापुढें बासरी' ही म्हण 'गाढव्यापुढें गीता' अशाच धर्तीची आहे. भूआ या देशी शब्दाचा अर्थ बहिरा असाही आहे. तो अर्थ घेतला तर 'बहिऱ्यापुढें बांसरी' एवढाच फरक करावा लागेल.

५५८ जलक्रीडा : 558 Secret Joy.

पिसुणन्ति कामिणीणं जललुक्कपिआवऊहण सुहेल्लिम् ।
कण्डइअकवोलुप्फुल्लणिच्चलच्छीइँ वअणाइं ॥ ५८ ॥

१ धनका २ भ्रष्टा ३ बधिराणाम् ४ लिक्क, ल्कि, लुक्क, लुक्काइआवऊहहा ५ सुहाइम, सुहेल्लिम् ६ कवोलाइ मउलंतच्छाइ, कण्ठ-इअकवोला पुल्ल, कवोला पप्फुल्ल

[ पिशुनयन्ति कामिनीना जलनिलीनप्रियावगूहनसुखकेलिम् ।
कण्टकितकपोलोत्फुल्लनिश्चलाक्षीणि वदनानि ॥ ]

जलक्रीडा करणाऱ्या कामिनीच्या कपोलावर काटा आलेला आहे तिची नजर निश्चल आहे व मुद्रा प्रफुल्ल आहे, तिच्या प्रियकरानें पाण्यात डुबी घेऊन घेतलेल्या आलिंगनामुळें तिला होणारें सुख या चिन्हावरून सूचित होतें

● हा शृंगार किती आधुनिक व परिचित वाटतो ! शृंगाराच्या बाबतींत प्राचीनाना शिकविण्यासारखें काहीं नवें तत्र अर्वाचीनापाशीं आहे असें दिसत नाहीं. ही क्रीडा ग्रीष्मातली आहे असें भोजदेव सरस्वती कण्ठाभरणात ( ५·३१८ ) सांगतो

## ५५९ मयूरनृत्य : 559. Dance of Peacocks

अहिणवपाउसरसिएसु सोहइ साआइएसु दिअहेसु ।
रहसपसारिअगीवाणं णच्चिअं मोरवुन्दाणम् ॥ ५९ ॥

[ अभिनवप्रावृड्रसितेषु शोभते श्यामायितेषु दिवसेषु ।
रभसप्रसारितग्रीवाणां नृत्यं मयूरवृन्दानाम् ॥ ]

पावसाळा नुकताच सुरू झाला आहे मेघगर्जना चालली आहे दिवस असूनही आभाळात अंधार दाटला आहे माना उंच करून नाचणाऱ्या मोराचा समुदाय या श्याम पार्श्वभूमीमुळें विशेष शोभतो

● या अंधारांत तू दिवसांही प्रियकराकडे जाऊ शकशील अशी दूतीची सूचना वनशोभावर्णनाच्या निमित्तानें प्रवासाला उद्युक्त झालेल्या

१ पओअ पहुस, पाउड २ रसिए. ३ वुन्दाण्ण विन्दाण ४ रसिके ५. सामाजिवेषु

नायकाचें दूतीनें केलेलें निवारण. साहित्यदर्पणातील पाठ : अहिणअप-ओअरसिएसु पहिअसामाइएसु दिअहेसु । रहस पसारिअगीआणं णच्चिअं मोरावन्दाणम् ॥

## ५६० गोठा : 560. Cowpen.

महिसक्खन्धविलग्गं घोलइ सिङ्गाहअं सिमिसिमन्तम् ।
आहअवीणाझंकारसद्दमुहलं मसअवुन्दम् ॥ ६० ॥

[ महिषस्कन्धविलग्नं घूर्णते शृङ्गाहतं सिमसिमायमानम् ।
आहतवीणाझंकारशब्दमुखरं मशकवृन्दम् ॥ ]

रेड्यानें शिंगें हलविलीं म्हणजे त्याच्या आघातानें त्याच्या खांद्यावर बसलेलीं चिलटें उडतात आणि गोठ्यात वीणाझंकारासारखा निनाद सुरू होतो.

● गंगाधर सांगतो, नायिका गोठ्याचे दोष झाकून त्याच्या गुणांचें वर्णन करीत आहे. साधारणदेव सांगतो, या गाथेच्या द्वारें नायिका आपलें वीणावादनकौशल्य ध्वनित करीत आहे. गोठ्यात संकेत ठरल्याची सूचना.

## ५६१ अंधाराचा गोंडा : 561. Lump of Darkness.

रेहन्ति कुमुअदलणिच्चलट्ठिआ मत्तमहुअरणिहाआ ।
ससिअरणीसेसपणासिअस्स गण्ठि व्व तिमिरस्स ॥ ६१ ॥

[ राजन्ते कुमुददलनिश्चलस्थिता मत्तमधुकरनिकायाः ।
शशिकरनिःशेषप्रणाशितस्य ग्रन्थय इव तिमिरस्य ॥ ]

१. खन्धालग्गम्. २. वण. ३ कुमुद्दन्व

मधुपानानें मस्त झालेल्या भुंग्याचा समुदाय कमळांच्या पाकळ्यांवर निश्चल बसलेला शोभत आहे. जणूं चंद्रकिरणांनीं नष्ट केलेल्या अंधाराच्या या गाठीच गुंफल्या आहेत.

● गंगाधर सांगतो, कमळाच्या तळ्याजवळ चंद्रोदयापर्यंत तुझी वाट पाहिली पण तूं आली नाहींस अशी नायकाची तक्रार.

## ५६२ ढोलीच्या झाडाजवळ : 562. Hollow in the Tree.

उअह तरुकोडंराओ णिक्कन्तं पुंसुआणँ रिञ्छोलिम् ।
सरिए जरिओ व्व दुमो पित्तं व्व सलोहिअं वमइ ॥ ६२ ॥

[ पश्यत तरुकोटरान्निष्क्रान्तां पुंशुकानां पङ्क्तिम् ।
शरदि ज्वरित इव द्रुमः पित्तमिव सलोहितं वमति ॥ ]

पहा, झाडाच्या ढोलींतून पोपटाची राग बाहेर पडत आहे. जणूं शरद् ऋतूंत झाडाला ज्वर आला असून त्याच्या मुखांतून रक्तमिश्रित पित्त बाहेर पडत आहे.

● ढोलीच्या झाडाजवळ संकेत ठरल्याची सूचना. ही अभद्र उपमा संपादकाना कशी रुचली, कोण जाणे.

## ५६३ कावळा : 563. Crow.

धाराधुव्वन्तमुहा लम्बिअपक्खा णिउञ्चिअग्गीवा ।
वइवेढनेसु काआ सूलाहिण्णा व्व दीसन्ति ॥ ६३ ॥

[ धाराधाव्यमानमुखा लम्बितपक्षा निकुञ्चितग्रीवाः ।
वृतिवेष्टनेषु काकाः शूलाभिन्ना इव दृश्यन्ते ॥ ]

१. कोटराओ, कोलराओ. २. पक्खा. ३. मुली. ४. भिण्णा.

पाऊस कोसळत असल्यामुळें कुंपणावर बसलेल्या कावळ्यांनीं चोंची वर करून माना आंखडून धरल्या आहेत व पंख पसरले आहेत. जणुं त्याना सुळावर चढविलें आहे असें वाटतें.

● पत्नी पतीला सागते, आज हवा वाईट पडलेली आहे, तुम्ही प्रवासाला जाऊ नका; किंवा दूती नायिकेचें निवारण करण्यासाठीं सागते, हीं चिन्हें अपशकुनाचीं आहेत, आता अभिसाराला जाऊं नको, किंवा जारिणी यजमानाला सागते, अशा हवेंत टक्के कोणी फिरकणारही नाहीं, कोणाची चाहूल लागली तर कावळे लगेच काव काव करतील, म्हणून घाईचें किंवा भीतीचें कारण नाहीं. कुंपणावर भर पावसांत चिंब होऊन बसलेल्या कावळ्याचें वर्णन किती यथार्थ आहे याची खात्री प्रत्यक्ष दृश्य पाहून करून घेता येईल.

## ५६४ तिन्हाईत : 564. Passive.

ण वि तह अणालवन्ती हिअअं दूमेइ माणिणी अहिअम् ।
जह दूरविअम्भिअगरुअरोसमज्झत्थभणिएहिं ॥ ६४ ॥

[ नापि तथानालपन्ती हृदयं दुनोति मानिन्यधिकम् ।
यथा दूरविजृम्भितगुरुकरोपमध्यस्थभणितैः ॥ ]

मानिनीनें अबोला धरला तर इतकें वाईट वाटत नाहीं. रागातिशयामुळें ती तिन्हाइतासारखी स्नेहशून्यपणें बोलली तर मात्र फार खेद होतो.

● कलहान्तरितेला संभाषणाभिमुख करण्यासाठीं नायिकेच्या सखीचें वचन गंगाधरानें टीकेंत मातृगुप्ताचार्याचें पुढील वचन उध्दृत केलें आहे; "निष्ठुराणि न वक्तव्यो नातिक्रोधं च दर्शयेत् । न वाक्यैर्वाच्यसमिश्रैरुपालम्यो मनोरमः ।"

## ५६५ आश्वासन : 565 Assurance.

गन्धं अग्घाअन्तअ पक्ककलम्बाणं वाहभरिअच्छ।
आससु, पहिअजुआणअ ! घरिणिमुहं मा ण पेच्छिहिसि ॥६५॥

[ गन्धमाजिघ्रन्पक्ककदम्बानां वाष्पभृताक्ष ।
आश्वसिहि पथिकयुवन् गृहिणीमुखं मा न प्रेक्षिष्यसे । ]

तरुण पथिका, पक्व कदंबांचा वास घेतांना तुझे डोळे अश्रूंनी भरून आले आहेत. गृहिणीचें दर्शन होणार नाहीं असें मानूं नको. धीर धर.

● पावसाळ्याच्या आरंभीं पहिली मेघगर्जना झाली कीं कदम्ब फुलतात असा संकेत आहे. कदम्ब डंवरले तरी प्रवास पुरा झाला नाहीं म्हणून तरुण पथिक व्याकुल झाला. कदम्बाच्या गेंदाचे ठायीं प्रियेचें मुख कल्पून तो त्याचा वास घेत आहे, त्याना कुरवाळीत आहे.

## ५६६ लम्बालकिका : 566. Flowing Tresses

गज्ज महं चिअ उवरिं सव्वत्थामेण लोहहिअअस्स ।
जलहर ! लम्बालइअं मा रे मारेहिसि वराइम् ॥ ६६ ॥

[ गर्ज ममैवोपरि सर्वस्थाम्ना लोहहृदयस्य ।
जलधर लम्बालकिकां मा रे मारयिष्यसि वराकीम् ॥ ]

हे जलधर, माझें हृदय लोखंडासारखें आहे. शक्तिसर्वस्व एकत्रित करून तूं माझ्यावरच गर्जना कर; मात्र माझ्या लम्बालकिका प्रियेवर गर्जून बिचारीचा बळी घेऊ नकोस.

१. पिक २. पेक्खिहिमि. ३. लोह. ४. ता वालिका

● जलधारणामुळें कृष्णवर्ण असलेल्या मेघा, माझ्या प्रियेचा केशकलाप विपुल, काळाभोर आणि लावलचक आहे; विरहिणी असल्यामुळे ती वेणी घालीत नाहीं. आपल्याला खिजवण्यासाठीं तिनें आपला केशभार मोकळा सोडला आहे अशी गैरसमजुतीनें तूं बिचारीवर गर्जू नकोस. मेघदूतांत कालिदासानें ( २·२४ ) हाच प्रयोग केलेला आहे : " हस्तन्यस्तं मुखमसकलव्यक्ति लम्बालकत्वात् । इन्दोर्दैन्यं त्वदनुसरणक्लिष्टकान्तेर्बिभर्ति ॥ " संजीवनींत मल्लीनाथ सांगतो, ' संस्काराभावाल्लम्बमानकुन्तलत्वाद् ।' पण्डित मथुरानाथ शास्त्री मात्र कृष्णवर्णजन्य ईर्ष्या हा भाव गृहीत धरतात. अलंकाररत्नाकरात ( ८२ ) विधि अलंकाराचे उदाहरण : " असंभाव्य हेतुफलप्रेषणं विधिः । "

## ५६७ पीकपाहणी : 567. Rice Field.

**पङ्कमइलेण छीरेक्कपाइणा दिण्णजाणुवडणेण ।**
**आनन्दिज्जइ हलिओ पुत्तेण व सालिछेत्तेण ॥ ६७ ॥**

[ पङ्कमलिनेन क्षीरैकपायिना दत्तजानुपतनेन ।
आनन्द्यते हालिकः पुत्रेणेव शालिक्षेत्रेण ॥ ]

चिखलानें माखलेलें, पाण्यानें भरलेलें व गुडघ्याएवढें वाढलेलें साळीचें शेत शेतकऱ्याला पोटच्या पोराप्रमाणें प्रिय वाटतें. त्याचेही आंग चिखलानें माखलेलें असतें, तो दुधावर वाढतो व गुडघ्यावर रांगतो.

● संस्कृतात व प्राकृतात ही क्षीर म्हणजे दूध किंवा पाणी. भाषानिर्मात्यांनीं कल्पिलेल्या ह्या अद्वैताला अलीकडे व्यावहारिक स्वरूप आलेलें आहे, एवढेंच. साळीचें शेत गुडघ्याएवढें वाढलें आहे, तेथें संकेत ठरविल्याची सूचना या गाथेंत आहे असें टीकाकार सांगतात; पण गुडघ्याएवढा चिखल व पाणी असलेल्या या शेतात संकेताची पूर्तता कशी व्हावयाची ?

१. दिण्णजाणुन्दरणेण. २. दत्तजानुकपदेन.

**५६८ साळी :** 568. Dew Drops.

कहँ मे परिणइआले खलसङ्गो होहिइ त्ति चिन्तन्तो ।
ओणअमुहो ससूओ रुवइ व साली तुसारेण ॥ ६८ ॥
[ कथं मे परिणतिकाले खलसङ्गो भविष्यतीति चिन्तयन् ।
अवनतमुखः सशूको रोदितीव शालिस्तुषारेण ॥ ]

साळीच्या लोंब्यावरून दंवाचे तुषार ठिबकत आहेत. परिणतावस्थेत आल्यानंतर दुष्टांची संगति भोगावी लागणार, या भीतीनेंच जणूं त्यांनीं माना खालीं घातल्या आहेत, त्यांच्या अंगावर कांटा आलेला आहे आणि त्या अश्रु ढाळीत आहेत.

● या लोंब्या पिकल्यानंतर उखळ व मुसळ या खलाच्या तावडींत सापडणार. टीकाकार सांगतात, संकेताप्रमाणें मी पहाटे शालिक्षेत्रात गेलें होतें, पण प्रियकर फिरकलाही नाहीं, अशी नीहाराभिसारिकेची ही दूतीजवळ तक्रार आहे. कीं खळ्यावर दवाळाच्या टोळक्याचा तळ असल्यामुळें संकेतभंगाची ही सूचना आहे ? कीं ज्याच्याशीं आपला विवाह होणार आहे तो दुर्जन आहे असें समजल्यामुळें उपवधू अश्रु ढाळीत आहे !

**५६९ प्रतिपदा :** 569. First Moon.

संझाराओत्थइओ दीसइ गअणम्मि पडिवआचन्दो ।
रत्तदुऊलन्तरिओ थणणहलेहो व्व णववहुए ॥ ६९ ॥
[ संध्यारागावस्थगितो दृश्यते गगने प्रतिपच्चन्द्रः ।
रक्तदुकूलान्तरितः स्तननखलेख इव नववध्वाः । ]

---

१. संझा. २. राअत्थ. ३. विहाइ. ४. णहपअं. ५. विभाति. ६. प्रतिचन्द्रः

आभाळात संध्याकाळची लाली पसरली आहे. या छटेनें रंगलेली प्रतिपदेची चंद्रकोर अशी दिसते कीं जणूं नववधूच्या लाल वस्त्रांतून तिच्या वक्षस्थलावरील नखक्षतच.

● सखी, तुझ्या प्रेमप्रसंगाचीं चिन्हें माझ्यापासून लपणार नाहींत असे कौतुकोद्गार. किंवा, संध्याकाळ झाली, आज प्रतिपदा आहे, लवकरच अंधार होईल, संकेताची वेळ टळेल किंवा जागा चुकेल, म्हणून चपळाई कर, अशी दूतीची प्रदोषाभिसारिकेला सूचना. अलंकारकौस्तुभात बिंबप्रतिबिंबभावाचें उदाहरण

## ५७० परिहास : 570. Disclosure.

अइ दिअर ! किं ण पेच्छसि आआसं किं मुहा पलोएसि ? ।
जाआइ बाहुमूलम्मि अद्धअन्दाणँ परिवाडिम् ? ॥ ७० ॥
[ अयि देवर किं न प्रेक्षसे आकाशं किं मुधा प्रलोकयसि ।
जायाया बाहुमूलेऽर्धचन्द्राणां परिपाटीम् ॥ ]

भाउजी, चंद्रकोरीच्या दर्शनासाठीं आभाळाकडे फशाला उगाच टक लावता ! तुमच्या पत्नीच्या वक्ष स्थलावर अर्धचंद्राची रांगच लागली आहे, ती का पहात नाहीं !

● हे उद्गार कौतुकाचे आहेत कीं उपहासाचे ? ही नखक्षताची कारागिरी नवऱ्याचीच असती तर एवढें खोंचून बोलण्याचे कारण काय ? जाऊबाईंना काहीं गडबड भाउजींच्या दृष्टीस आणावयाची ही कारवाई असावी. माझे पति व तुमची पत्नी परस्परावर अनुरक्त आहेत हें कसें तुमच्या ध्यानीं आलें नाहीं ? एखाद्या ज्योतिषासारखी किंवा कवीप्रमाणें आभाळावर नजर रोखूं नका, घरात काय चाललें आहे तें पहा. खरोखर, खोंचून बोलावें थायकांनींच. काव्यानुशासनात अतिशयोक्तीचें उदाहरणः "विशेषविवक्षया भेदाभेदयोगायोगव्यत्ययोऽतिशयोक्तिः ।

---

१. दिअर २. इंदाण ३. पडिवाडिम्, परिपाडिम्.

५७१ अंतरीच्या वेदना : 571. Pangs.

वाआइ किं भणिज्जउ? केत्तिअमेत्तं व लिक्खए लेहे[1]।
तुह विरहे जं दुक्खं तस्स तुमं चेअ गहिअत्थो ॥ ७१ ॥
[ वाचया किं भण्यतां कियन्मात्रं वा लिख्यते लेखे।
तव विरहे यद्दुःखं तस्य त्वमेव गृहीतार्थः ॥ ]

तुमच्या विरहामुळें मला किती दुःख होत आहे तें तुम्हांला माहीतच आहे. तें वाचेनें किती सांगणार आणि लेखणीनें कसें लिहिणार !

● माझ्या विरहदुःखाची तुम्हांला जाणीव आहे, कारण माझ्या विरहामुळें सध्या तुम्हीही तसेंच दुःख भोगीत आहांत. दोघांचेंही दुःख नष्ट करणें तुमच्याच हातीं आहे, म्हणून त्वरित परत या, असा प्रोषितपतिकेचा प्रवासी पतीला निरोप.

५७२ इंद्रजाल : 572. Magic.

मअणग्गिणो व्व धूमं, मोहणपिंच्छिं व लोअदिट्ठीए।
जोव्वणधअं व मुद्धा वहइ सुअन्धं चिउरभारम्[2] ॥ ७२ ॥
[ मदनाग्नेरिव धूमं मोहनपिच्छिकामिव लोकदृष्टेः।
यौवनध्वजमिव मुग्धा वहति सुगन्धं चिकुरभारम् ॥ ]

मुग्धेचा सुगंधित चिकुरभार पाहून वाटतें कीं हा जणूं तिच्या हृदयांत धुमसणाऱ्या मदनाग्नीचा धूर आहे; किंवा हा तिच्या यौवनाचा ध्वज फडकत आहे; किंवा लोकांच्या दृष्टीला भुलविणारें हें जादूचें पीस आहे.

१. छिपि. २. अज्झा.

● तिचे कुंतल मोकळे व कुरळे असावेत; म्हणूनच त्यांच्या बटा वाऱ्याच्या लाटेसरशीं मोरपंखासारख्या भुरभुरत होत्या. येवर सागतो, हिंदुस्थानांतल्या स्त्रिया केसांत फुलें माळतात व तीं ज्यांच्या दृष्टीस पडतात ते वावचळतात.

## ५७३ निःशब्द : 573. Mute.

रूअं सिट्ठं चिअ से असेसपुरिसे णिअत्तिअच्छेण ।
वाहोल्लेण इमीए अजम्पमाणेण वि मुहेण ॥ ७३ ॥

[ रूपं शिष्टमेव तस्याशेषपुरुषे निवर्तिताक्षेण ।
बाष्पार्द्रेणास्या अजल्पतापि मुखेन ॥ ]

अन्य पुरुषांपासून तिनें आपली दृष्टि निवर्तित केली होती. तिच्या प्रियकराचें रूप तिच्या डोळ्यांत भरून राहिलें होतें. डोळ्यांतून झरणारे अश्रु तिच्या मुखावरून ओघळत होते आणि तिच्या मुखांतून अक्षरही निघत नव्हतें. अशा रीतीनें तिनें आपल्या प्रियकराच्या रूपाचें वर्णन केलें.

● सखीनें नायिकेला विचारलें, ज्याच्यासाठीं तूं झुरत आहेस तो तुझा प्रियकर आहे तरी कसा ? या प्रश्नाचें हें उत्तर !

## ५७४ वासंती : 574. Girdle of Beads.

रुन्दारविन्दमन्दिरमअरन्दाणन्दिआलिरिञ्छोली ।
झणझणइ कसणमणिमेहल व्व महुमासलच्छीए ॥ ७४ ॥

[ पृथ्वरविन्दमन्दिरमकरन्दानन्दितालिपङ्क्तिः ।
झणझणायते कृष्णमणिमेखलेव मधुमासलक्ष्म्याः ॥ ]

१. इन्दा. २. सदिर. ३. स्यंदिर.

विकसित अरविन्दांच्या हृदयातील मकरन्दाच्या सेवनानें आनंदित झालेल्या मधुकरांच्या पङ्क्ति झणत्कार करीत हिंडत आहेत. वाटतें कीं जणू ही वसंतलक्ष्मीची कृष्णमण्याची मेखलाच रुणझुणत आहे.

● टीकाकार सांगतात, या उद्गारात उद्दीपनविभावप्रतिपादन आहे किंवा संकेतस्थानस्तुति आहे.

## ५७५ तो धन्य पुरुष जो— 575. Good Luck.

कस्स[1] करो बहुपुण्णप्फलेक्कतरुणो[2] तुहं विसम्मिहइ ।
थणपरिणाहे मम्महणिहाणकलसे व्व पारोहो ? ॥ ७५ ॥

[ कस्य करो बहुपुण्यफलैकतरोस्तव विश्रमिष्यति ।
स्तनपरिणाहे मन्मथनिधानकलश इव प्ररोह ॥ ]

शुभ व पुण्यप्रद अशाच वृक्षाच्या पालवीला मंगल कलशावर स्थान प्राप्त होतें. तुझे विशाल स्तन मदनाच्या सपत्तीच्या कलशासारखे आहेत. त्यावर कोणा भाग्यवताच्या शुभ हाताना विश्रांति मिळणार ?

● विशाल स्तन हें स्त्रीचें भाग्य आणि त्याना स्पर्श करणें हें पुरुषाचें. असें भाग्य हें अनेक पूर्व सत्कृत्याचें फळ पूर्वपुण्याईवाचून गुप्त धनाची प्राप्ति होत नाहीं. “ कोण्या सुभगाची मदनमंजिरी सांग सखे सुंदरी । तो धन्य पुरुष जो—” सरस्वतीकण्ठाभरणात ‘ अनूढा कुमारी ’ चें उदाहरण.

१ मामलि कस्स करे तुह २ पुण्णफले, पुण्यफले, पुण्यफुले

## ५७६ चोरटी नजर : 576. Stealthy Glances.

चोरा सभअसतह्न पुणो पुणो पेसंअन्ति दिट्ठीओ ।
अहिरक्खिअणिहिकलसे व्व पोढवइआयणुच्छङ्गे ॥ ७६ ॥
[ चोराः सभयसतृष्ण पुनः पुनः प्रेषयन्ति दृष्टीः ।
अहिरक्षितनिधिकलश इव प्रौढपतिकास्तनोत्सङ्गे ॥ ]

सर्पांनी रक्षिलेली संपत्तीची कळशी पाहून चोराना लोभ वाटतो, भीतीही वाटते तिजकडे ते सतृष्ण दृष्टीनें पुन पुन· पाहतात, पण तिचा स्पर्श करावयास धजत नाहीत. जिचा पति शूर आहे अशा स्त्रीच्या स्तनाकडे चोर कामुक अशाच सतृष्ण व सभय दृष्टीनें पाहतात.

● भूमिगत द्रव्याचें महासर्प संरक्षण करीत असतात हा संकेत प्राचीन व प्रसिद्ध आहे. हे सर्प सदैव पहाऱ्यावर असतात असें नाहीं, मात्र ते जवळपास कोठें तरी असतात आणि द्रव्यस्थानाच्या आसपास फिरकणाराला दंश करतात, अशी समजूत आहे. तीमुळें गुप्त संपत्तीचें थोडेंबहुत रक्षण होतें, हें मात्र खरें. तद्वतच चोरकामुकापासून शूराच्या स्त्रियाचें रक्षण नुसत्या दराऱ्यानें होतें. किंवा, जे स्त्रियांचा उपभोग घेत नाहींत, केवळ त्यांचेभोंवतीं वेटोळें घालून बसतात ते कामुकांना सर्पासारखे भासतात.

## ५७७ रोमांचित : 577 Close Embrace.

उग्गहइ णवतणंकुररोमञ्चपसाहिआइँ अङ्गाइं ।
पाउसलच्छीअ पओहरेहिँ परिपेल्लिओ विञ्झो ॥ ७७ ॥

१ पेक्खवन्ति, पेच्छंति २ पोढमहिला, पिअवहुआ ३ प्रवीरपतिका. सरस्वतीकण्ठाभरणातील पाठ चोरा भअमतहण्ह पुणो पेसवन्ति दिट्ठीओ । अहिरक्खिअनिहिकलसे पओहरुच्छङ्गवहुअच्छङ्गे ॥ ५ तिण ६ पाउस. ७ परि-पिल्लिओ, परिपेल्लिओ

[ उद्वहति नवतृणाङ्कुररोमाञ्चप्रसाधितान्यङ्गानि ।
प्रावृड्लक्ष्म्याः पयोधरैः परिप्रेरितो विन्ध्यः ॥ ]

प्रावृड्लक्ष्मीच्या पयोधराच्या स्पर्शानें विन्ध्य रोमांचित होतो आणि देहावर तृणांकुरांची शोभा धारण करतो.

● वर्षाऋतूच्या देवतेनें प्रेरणा दिलेले मेघ (पयोधर) विन्ध्य पर्वताला आलिंगन देतात (त्यावर जलवर्षाव करतात) आणि पर्वतावर उगवणारे हिरवेगार तृणांकुर रोमांचासारखे शोभतात. अलंकारकौस्तुभात रूपक अलंकाराचें उदाहरण : ' तद्रूपकं त्वभेदः स्यादुपमानोपमेययोर्यत्र । '

## ५७८ गुणविशेषः 578. Water Fowls.

आम! बहला वणोली, मुहला जलरङ्कुणो, जलं सिसिरम् ।
अण्णणईण वि, रेवाइ तह वि अण्णे गुणा के वि ॥ ७८ ॥

[ सत्यं बहला वनाली मुखरा जलरङ्कवो जलं शिशिरम् ।
अन्यनदीनामपि रेवायास्तथाप्यन्ये गुणाः केऽपि ॥ ]

होय; ह्या नदीचें पाणी गार आहे, हिच्या प्रवाहांत पाणकोंबड्या आवाज करीत आहेत; हिच्या कांठावर दाट झाडी आहे; मान्य; इतर अनेक नद्यांमध्यें हे गुण आहेत. रेवा नदीमध्यें मात्र असे आणखी काहीं गुण आहेत कीं जे इतरत्र आढळत नाहींत.

● नदी व स्त्री याचे गुण त्याच शब्दांनीं सूचित केले आहेत. ही सुवसना आहे, हिचा स्पर्श शीतल आहे. हिच्या चरणातून नूपुरांचा झंकार निघत आहे; हिच अंगा आणखी अनेक गुण आहेत — पण हिच्याहून

१. प्रतिप्रेरित, प्रतिपीडित. २. वणोली. ३. वुकुणो, रावुणो, रंक्वो. ४. गोलाइ. ५. आम्रबहुला. ६. गोदावया.

मला माझी प्रियाच अधिक आवडते; कारण माझी प्रिया आहेच तशी; शिवाय तिच्या अंगीं असे काहीं आगळी गुणविशेष आहेत कीं ते माझे मलाच माहीत !

## ५७९ वेलफळ :  579. Trangression.

एइ ! इमीअ णिअच्छइ परिणअमालूरसच्छहे थणए।
तुङ्गे सप्पुरिसमणोरहे व्व हिअए अमाअन्ते ॥ ७९ ॥

[ आगच्छतास्या निरीक्षध्वं परिणतमालूरसदृशौ स्तनौ ।
तुङ्गौ सत्पुरुषमनोरथाविव हृदये अमान्तौ ॥ ]

या आणि निरखून पहा. तिचे उंच स्तन कसे पिकलेल्या वेलफळासारखे दिसत आहेत. सत्पुरुषाचे मनोरथ उत्तुंग असतात, ते त्याच्या हृदयांत मावत नाहींत, प्रत्यक्षात प्रकट होतात; त्याचप्रमाणें हे स्तन तिच्या वक्षःस्थळाचे ठायीं मावले नाहींत, म्हणून ते उत्तुंग स्वरूपांत प्रकट झाले आहेत.

● तिला आपले मनोविकार यापुढें हृदयांत लपवून ठेवता येणें शक्य नाहीं.

## ५८० नभ मेघांनीं आक्रमिलें :  580. Rains Came.

हत्थाहत्थि अहमहमिआइ वासागमम्मि मेहेहिम् ।
अव्वो ! किं पि रहस्सं छण्णं पि णहङ्गणं गलइ ॥ ८० ॥

[ हस्ताहस्ति अहमहमिकया वर्षागमे मेघैः ।
आश्चर्यं किमपि रहस्यं छन्नमपि नभोङ्गणं गलति ॥ ]

1. मान्दूर ण मायंते, ण सम्माते

कधीं एकमेकाशीं सहकार्य करून, तर कधीं परस्पराशीं स्पर्श करून वर्षागमकालीं मेघ आभाळाचें अंगण झाकतात, तरी ही वर्षाकालात नभ पाझरतें व त्याचें हृदय व्यक्त होतें हें एक आश्चर्यकारक रहस्य आहे.

● आभाळात मेघ जमू लागले म्हणजे विरहिणींच्या हृदयात अनेक भावना दाटतात आणि त्याना वियोगदु:ख असह्य होतें, अखेरीस त्यातून त्याच्या अंतर्यामींची प्रीति व्यक्त होते. म्हणून पीतांबर सांगतो, वर्षाकालीं तीर्थयात्रागमन निषिद्ध मानणें हा धर्म आणि रहस्य फार दिवस गुप्त रहात नाहीं हें लक्षात बाळगून सावधगिरीनें कर्तव्य करावें ही नीति.

## ५८१ भटक्या : 581 Wanderer.

केत्तिअमेत्तं होहिइ सोहग्ग पिअअमस्स भमिरस्स ।
महिलामअणछुहाउलकडक्खविक्खेवघेप्पन्तम् १।। ८१ ।।
[ कियन्मात्र भविष्यति सौभाग्यं प्रियतमस्य भ्रमणशीलस्य ।
महिलामदनक्षुधाकुलकटाक्षविक्षेपगृह्यमाणम् ॥ ]

माझ्या भटक्या प्रियतमाला भटकण्यात आणखी किती दिवस सुख वाटणार ? मदनक्षुधेनें व्याकुल झालेल्या महिलांच्या नुसत्या कटाक्षावर तो आणखी किती दिवस झुलत राहणार !

● गुणगर्विता नायिका पतीला उद्देशून सखीला सांगते, माझी खात्री आहे कीं मी त्याला पुन्हा जिंकीनच, कारण माझ्या हृदयात सद्भाव आहे, केवळ मदनक्षुधा नाहीं, आणि पुनर्मीलन होईल तव्हा आम्हां उभयताना सदा आनंद होईल। पीतांबर सांगतो, ज्याचें चित्त अस्थिर असतें त्यानें हातीं घेतलेलें कोणतेही कार्य सिद्धीस जात नाहीं, ही नीति.

---

१ क्षुधातुर २ वपमानम्

## ५८२ कोंबडा : 582. Fright.

णिअघंणिअं उवऊहसु, कुक्कुडसद्देन झत्ति पडिबुद्ध ।
परवसइवाससङ्किर ! णिअए वि घरम्मि, मा भासु ।। ८२ ।।
[ निजगृहिणीमुपगूहस्व कुक्कुटशब्देन झटिति प्रतिबुद्ध ।
परवसतिवासशङ्किन्निजकेऽपि गृहे मा भैषीः ॥ ]

प्रियकरा, कोंबडा आरवला आणि तू दचकून जागा झालास. आपण परगृहीं झोंपलो आहोंत अशी का तुला धास्ती वाटली ! तूं स्वगृहींच आहेस, भिऊं नकोस, जागा हो आणि आपल्या भार्येला आलिंगन दे.

● पहाटे दारावर थाप पडली तेव्हा प्रवासी पति अवेळीं परतला असावा अशा कल्पनेनें दोघेही घाबरलीं. त्यानें खिडकींतून बाहेर उडी टाकली व आजूबाजूला पाहिलें, तेव्हा त्याला आढळून आलें कीं हें आपलेंच घर आहे; आणि तिनें थरथरत्या हातानीं दार उघडलें व पाहते तों रतीबाचा गवळी ! तेरी चूप, मेरी चूप ! अशी कथा अर्वाचीन पाश्चात्य स्त्रीचरित्रात आहे.

## ५८३ दुर्दिनाभिसारिका : 583. Storm Scene.

खरपवणरअगलत्थिअगिरिऊडावडणभिण्णदेहस्स ।
धुगधुगइ जीअं व विज्जुआ कालमेहस्स ।। ८३ ।।
[ खरपवनरयगलहस्तितगिरिकूटापतनभिन्नदेहस्य ।
धुकधुकायते जीव इव विद्युत्कालमेघस्य ॥ ]

१. घरिणि २ धन्या. ३. गलत्थहण, गलत्थिअ. ४. धुकधुकइ ५ विज्जुलिआ

सोसाट्याच्या वाऱ्यानें काळया कभिन्न मेघाला गचांडी देऊन पर्वत-शिखरावर आपटलें. या आघातामुळें मेघाचा देह छिन्नविच्छिन्न झाला आणि त्याची जीवनज्योति जी वीज ती सकंप झाली.

● मेघदर्शनानें तप्त झालेल्या प्रोषितपतिकेचें सखीला निवेदन. माझे प्राण कंठाशीं आले आहेत, प्रियकर लवकर परत आला नाहीं तर माझी धडगत नाहीं. किंवा अशा कोलाहलातही अभिसाराला उद्युक्त झालेल्या नायिकेची अवस्था.

## ५८४ मेघगर्जना : 584. Rainbow.

मेहमहिसस्स णज्जइ उअरे सुरचावकोडिभिण्णस्स ।
कन्दन्तस्स सविअणं अन्तं व पलम्बए विज्जू ॥ ८४ ॥

[ मेघमहिषस्य ज्ञायते उदरे सुरचापकोटिभिन्नस्य ।
क्रन्दतः सवेदनमन्त्रमिव प्रलम्बते विद्युत् ॥ ]

इंद्रधनुष्यानें मेघरूपी महिषाच्या उदराचा भेद केला आणि त्याचें वीजरूपी आतडें लोंबूं लागलें, तेव्हां वेदनांनीं व्याकुळ झालेला मेघ मोठ्यानें ओरडला.

● वर्ण व आकारसादृश्यामुळें मेघावर महिषत्वाचा आरोप केलेला आहे. टीकाकार सागतात; महिषासुराच्या वधानें स्वर्गांत देवानाही आनंद झाला, मग पृथ्वीवरील मानवाना किती आनंद झाला असेल ! यावरून असा समज होण्याचा संभव आहे कीं ही गाथा रचण्यात आली तेव्हा महिषासुरमर्दनाची पौराणिक कथा प्रचलित झालेली होती. या संदर्भावरून गाथासप्तशतीचा काळ अलीकडे ओढण्याचा यत्न होणें शक्य आहे. वस्तुतः अशा अनुमानाला कांहीं आधार नाहीं; कारण महिषासुराच्या वधाशीं इंद्राचा किंवा त्याच्या धनुष्याचा यत्किंचितही संबंध नाहीं. इंद्रवृत्र युद्धाशींही या गाथेचा संबंध जोडता येईल असें वाटत नाहीं.

**५८५ माला :** 585. Spear.

णवपल्लवं विसण्णा पहिआ पेच्छन्ति चूअरुक्खस्स ।
कामस्स लोहिउप्पङ्कराइअं हत्थमल्लं व ॥ ८५ ॥

[ नवपल्लवं विषण्णाः पथिकाः पश्यन्ति चूतवृक्षस्य ।
कामस्य लोहितसमुद्दराजितं हस्तमल्लमिव ॥ ]

रक्तानें माखलेल्या कामदेवाच्या हातमाल्यासारखी दिसणारी आंब्याची नवी पालवी दृष्टीस पडतांच प्रवासी विषण्ण होतात.

● वसंतातील वातावरणामुळें हृदय विशेष संवेदनाग्रहणक्षम असतें. आम्याची ताजी पानें भाल्याच्या आरक्त पानांसारखीं भासतांत व तीं हृदयाला बोचतात. प्रेमी जनांच्या हृदयाचा वारंवार भेद करणारा कामदेवाचा माला नेहमींच आरक्त असतो.

**५८६ महिलांचा दोष :** 586. Cruelty.

महिलाणं चिअ दोसो जेण पवासम्मि गव्विआ पुरिसा ।
दोतिण्णि जाव ण मरन्ति ता ण विरहा समप्पन्ति ॥ ८६ ॥

[ महिलानामेव दोषो येन प्रवासे गर्विताः पुरुषाः ।
द्वे तिस्रो यावन्न म्रियन्ते तावन्न विरहाः समाप्यन्ते ॥ ]

प्रवासात काळ घालविण्यांत पुरुषांना भूषण वाटावें हा महिलांचाच दोष. विरहामुळें यांच्या दोन तीन स्त्रिया मरणार नाहींत तोंवर इतर स्त्रियांचें विरहदुःख समाप्त होणार नाहीं.

१. विमला. २. विकला, विरहलोला. ३. लोहपुङ्खराजितम्, लोहितपुङ्खः, लोहितोऽप्यंगः, लोहितोपरञ्जितम्. ४. द्विम्राः.

## ५८७ दर्शन : 587. Crisis.

बालअ! दे वच्च लहुं! मरइ वराई, अलं विलम्बेण ।
सा तुज्झ दंसणेण वि जीवेज्जइ, णत्थि संदेहो ।। ८७ ।।

[ बालक हे व्रज लघु म्रियते वराकी अलं विलम्बेन ।
सा तव दर्शनेनापि जीविष्यति नास्ति संदेहः ॥ ]

हे बालक, विलंब पुरे झाला; आतां लवकर घरीं जा, नाहींतर बिचारी मरून जाईल. तुझें नुसतें दर्शन झालें तरी ती वांचेल, यांत संशय नाहीं.

● परवेदनानभिज्ञ, म्हणून बालक. नेत्रीं प्राण आणून ती जीव धरून राहिलेली आहे. तुझ्या दर्शनानें तिच्या जीवशक्तीचें पुनरुज्जीवन होईल. दर्शनानंतर प्रेम प्रकट केलेंस तर ती तावडतोब खडखडीत बरी होईल.

## ५८८ सजणा पहाट झाली— 588. Foolish Deer.

तम्भिरपसरिअहुअवहजालालिपलीविएं वणाहोए ।
किंसुअवणन्ति कलिऊण मुद्धहरिणो ण णिक्कमइ ।। ८८ ।।

[ ताम्रवर्णप्रसृतहुतवहज्वालावलिप्रदीपिते वनाभोगे ।
किंशुकवनमिति कलयित्वा मुग्धहरिणो न निष्क्रामति ॥ ]

रानांत जागोजाग पेटलेल्या वणव्यांच्या तांबड्या लाल ज्वालांच्या ओळींनीं वनप्रदेश प्रकाशीत झाला. अज्ञ हरणाला त्या ज्वाला पळसाच्या फुललेल्या झाडीसारख्या वाटल्या; म्हणून बिचारा अरण्यांतून बाहेर पडलाच नाहीं.

---

१. अविरअ, तम्बिरपसारिअ. २. वेढिअ. ३. अविरत.

● हरणाला त्याच्या मूर्खपणाचें व निष्काळजीपणाचें प्रायश्चित्त मिळालें; वेळींच योग्य ती खबरदारी घे, नाहीतर तुझी अवस्था तशीच होईल, अशी परस्त्रीलंपट नायकाला सूचना. उजाडलें, रहदारी सुरू होण्यापूर्वी घरीं जा; तिच्या घरीं तूं चोरून येत असतोस अशी शेजाऱ्यांना कुणकुण लागलेली आहे व ते तुझ्यावर चिडलेले आहेत. विलंब केलास तर त्याच्या क्रोधाग्नींत होरपळशील. आजूबाजूच्या लोकांना आपल्या प्रेमसंबंधाबद्दल कौतुक वाटतें अशी तुझी समजूत असेल तर ती चुकीची आहे.

## ५८९ मैना : 589. Myna.

णिहुअणसिप्पं तह सारिआइ उल्लाविअं म्ह गुरुपुरओ ।
जह तं वेलं माए! ण आणिमो कत्थ वच्चामो ॥ ८९ ॥

[ निधुवनशिल्पं तथा शारिकयोल्लपितमस्माकं गुरुपुरतः ।
यथा तां वेलां मातर्न जानीमः कुत्र व्रजामः ॥ ]

अयाई ! आमच्या प्रेमविलासांचें वर्णन मैनेनें गुरुजनांसमक्ष केलें; त्यावेळीं मला इतकी लाज वाटली कीं कोठें जावें तेंच कळेना !

● शुकशारिका संकेत. संदर्भावरून वाटतें कीं मैनेनें वर्णिलेला प्रेमविलास[1] दंपतीचा असावा. टीकाकार मात्र सांगतात कीं नायिकेच्या सख्यांनीं व सपत्नींनीं तिच्या मंदिरांतून बाहेर पडणाऱ्या तिच्या उपपतीला पाहिलें आणि याची जाणीव झाली तेव्हा तिला वाटलें कीं या वेळीं धरणी आपल्याला पोटांत घेईल तर बरें. तुलनेसाठीं आर्यासप्तशतींतील वचन पहा :

मदनार्दर्पति दयितो हसति सखी विशति धरणिमिव बाला ।
ज्वलति सपत्नी कीरे जल्पति मुग्धे प्रसीदेति ॥ ६५३ ॥

१. णिहुवणम्. २. गुरु. ३. शिप्पम्. ४. तह.

## ५९० नवती: 590. Puberty.

पच्चग्गप्फुल्लदलुल्लसन्तमअरन्दपाणलेहलओ ।
तं णत्थि कुन्दकलिआइ जं ण भमरो महइ काउम् ॥९०॥

[ प्रत्यग्रोत्फुल्लदलोल्लसन्मकरन्दपानलुब्धः ।
तन्नास्ति कुन्दकलिकाया यन्न भ्रमरो वाञ्छति कर्तुम् ॥ ]

ताज्या उमलणाऱ्या कुंदकळीच्या पाकळ्यापाकळ्यातून स्रवणारा मधु पिण्यास लुब्ध असलेला लम्पट भ्रमर कलिकेशीं सर्व प्रेमविलास करूं पाहतो. विलासाच्या साधनापैकीं येथें नाहीं असें कांहींही नाहीं.

असा एकही प्रेमविलास नाहीं कीं जो भ्रमर कलिकेशीं करीत नाहीं. प्रथम तो वेलीभोंवतीं घिरट्या घालतो व कलिका हेरतो; नंतर तिच्याभोंवतीं घोंटाळतो, मग तिच्यासमोर घुमतो व तिच्याशीं कुजबुजतो, नंतर तिच्या पाकळी पाकळीचें चुंबन घेतो – तृप्तीसाठीं तो काय करणार नाहीं याचा नेम नाहीं; कळी कुरतडूनही टाकील.

## ५९१ कुन्दा: 591. Vision.

सो को वि गुणाइसओ ण आणिमो मामि ! कुन्दलइआए।
अच्छीहिं च्चिअ पाउं अहिलसइ जेण भमरेहिम् ॥ ९१ ॥

[ स कोऽपि गुणातिशयो न जानीमो मातुलानि कुन्दलतिकायाः ।
अक्षिभ्यामेव पातुमभिलष्यते येन भ्रमरैः ॥ ]

१. लेहडओ, लोहिल्लो. २. पाउम्. ३. उन्मीलित, फुल्ल. ४. लम्पट, लोलुप. ५. पातुम् ६ महिणी. ७ कलिआए. ८. अहिलक्खइ. ९. अभिलक्ष्यते.

मार्मा; कुन्दलतांचे अंगीं आकर्षक असे कोणते विशेष गुण असतात, कोण जाणे. कुंदांचा आस्वाद नेत्रांनींही घ्यावयास भ्रमर उत्सुक असतात, हें मात्र खरें.

● कांहीं रसाचा आस्वाद नेत्रांनीं घ्यावयाचा असतो तर कांहींचा ओठांनीं. डोळे काय, कोठेंही रोखतां येतात; ओठ टेंकण्याला अनुमति घ्यावी लागते अगर संधि साधावी लागते. येथें दृष्टिसुखापलीकडे मजल मारतां येणार नाहीं अशी सूचना. अलंकारकौस्तुभांत विशेषोक्तीचें उदाहरणः 'हेतौ सत्यपि कार्यानुत्पत्तिः स्याद्विशेषोक्तिः।'

## ५९२ पाटलाच्या पोरी — 592. Beauty Queen.

एक्कः चिअ रूअगुणं गामणिधूआ समुव्वहइ।
अणिमिसणअणो सअलो जीए देवीकओ गामो ॥ ९२ ॥

[ एकैव रूपगुणं ग्रामणीदुहिता समुद्वहति ।
अनिमिषनयनः सकलो यया देवीकृतो ग्रामः ॥ ]

पाटलाची मुलगी इतकी सुंदर आहे कीं ती दृष्टिपथांत येतांच सारे लोक तिच्याकडे अनिमिष नेत्रांनीं पाहतात. तिच्या सौंदर्यामुळें सारे गांवकरी देवपण पावले.

● देव कधींही डोळे मिटीत नाहींत असा समज आहे. दुर्दैव त्यांचें, कारण आमचे सारे अनाचार बिचाऱ्यांना उघड्या डोळ्यांनीं पहावे लागतात! तिच्या त्या गावकऱ्यांना लोक पाटलाच्या मिरच्याची नैसर्गिक किमारी बिचारे; कवींच्या दृष्टीनें एवढ्यामुळें गावांना देवपण प्राप्त झालें.

## ५९३ समुद्रमंथन : 593. Luscious Lips.

मण्णे आसाओ च्चिअ ण पाविओ पिअअमाहररसस्स ।
तिअसेहिँ जेण रअणाअराहि अमअं समुद्धरिअम् ॥ ९३ ॥

[ मन्ये आस्वाद एव न प्राप्तः प्रियतमाधररसस्य ।
त्रिदशैर्येन रत्नाकरादमृतं समुध्दृतम् ॥ ॥ ]

: सदैव तरुण असणाऱ्या देवांनी अमृतासाठीं समुद्रमंथन केलें, त्या अर्थी वाटतें कीं त्यांना प्रियतमाच्या अधररसाचा आस्वाद मिळालेला नसावा.

● नाहीं तर नित्य तारुण्य अंगीं असलेले अमर देव केवळ अमृतासाठीं एवढा खटाटोप कशाला करते ? पीतांबर सांगतो, ' अर्के चेन्मधु विन्देत किमर्थं पर्वतं व्रजेत्, इति नीतिः ।' देवांची जातच हव्यासी. अधरामृताचा आस्वाद मिळत असता तरी केवळ तुलनेसाठीं अमृत मिळविण्याकरितां त्यांनीं समुद्र-मंथन केलेंच असतें ! तुलनेसाठी पहा :

" संदष्टेऽधरपल्लवे सचकितं हस्ताग्रमाधुन्वती ।
मा मा मुञ्च शठेति कोपवचनैरानर्तितभ्रूलता ॥ -
सीत्कारांचितलोचना सरभसं यैश्चुंबिता मानिनी ।
प्राप्तं तैरमृतं श्रमाय मथितो मूढैः सुरैः सागरः ॥३२॥

अमरुशतक : ध्रुव प्रत.

## ५९४ हरिणी : 594. Last Look.

आअण्णाअड्ढिअणिसिअभल्लमम्माहआइ हरिणीए ।
अदंसणो पिओ होहिइ त्ति वलिउं चिरं दिट्ठो ॥ ९४ ॥

१. मअसंमुद्दाहआइ. २. दुद्दंसण.

[ आकर्णाकृष्टनिशितमल्लमर्माहतया हरिण्या ।
अदर्शनः प्रियो भविष्यतीति वलित्वा चिरं दृष्टः ॥ ]

धनुष्याची दोरी कानापर्यंत ओढून सोडलेल्या तीक्ष्ण बाणानें मर्मस्थानीं जखमी झालेली हरिणी मान वळवून आपल्या प्रियकराकडे पाहते. पुन्हा त्याचें दर्शन होणार नाहीं म्हणून त्याला अखेरचें डोळे भरून पाहून घेते.

● जीव जाणार म्हणून नव्हे, यापुढें प्रियकराचें दर्शन होणार नाहीं म्हणून हरिणी व्याकुल झाली. पूर्वी रोज भेटणाऱ्या पण अलीकडे अन्य स्त्रीवर आसक्त झाल्यामुळें दुर्लभदर्शन झालेल्या नायकाला उद्देशून नायिकेचे उद्गार.

## ५९५ दारारः 595. King's Enemy.

विसमट्टिअपिक्केक्कम्बदंसणे तुज्झ सत्तुघरिणीए ।
को को ण पत्थिओ पहिआणं डिम्भे रुअन्तम्मि ॥ ९५ ॥

[ विषमस्थितपक्वैकाम्रदर्शने तव शत्रुगृहिण्या ।
कः को न प्रार्थितः पथिकानां डिम्भे रुदति ॥ ]

अरण्यांत आम्र्याचें झाड अवघड जागीं होतें व त्यावर पिकलेला असा एकच एक आंबा होता. त्याचा हट्ट धरून मूल रडूं लागलें. तो पाडून देण्यासाठीं तुझ्या शत्रूच्या स्त्रीनें कोणकोणत्या पथिकाची विनवणी केली नाहीं !

● पण राजा, तुझा दरारा असा का तें फळ तिला कोणीही काढून दिलें नाहीं, कारण तिच्या पतीशीं असलेलें तुझें शत्रुत्व सर्वांना माहीत होतें.

१. पातने

क्षुल्लक बाबतींतही राजाच्या मर्जीविरुद्ध जाण्याचे साहस सहसा कोणी करीत नाही. ही गाथा एकाद्या समकालीन पण आता अज्ञात असलेल्या प्रसंगावर आधारलेली असावी.

## ५९६ पुष्प-नृत्य : 596. Flower Dance.

मालारी ललिउल्लुलिअबाहुमूलेहिँ तरुणहिअआइं ।
उल्लुरइ सज्जुल्लूरिआइँ कुसुमाइँ दावेन्ती ॥ ९६ ॥
[ मालाकारी ललितोल्लुलितबाहुमूलाभ्यां तरुणहृदयानि ।
उल्लुनाति सद्योऽवलूनानि कुसुमानि दर्शयन्ती ॥ ]

नुकत्याच तोडलेल्या फुलांचे गेंद तरुणांना दाखवितांना माळीण दंड उभारून आपल्या स्फुरणाऱ्या स्तनांचें सौंदर्य दाखविते आणि त्यांच्या हृदयांचें चट्कन अपहरण करते.

● मुळांत बाहुमूल असा शब्द आहे; त्याचा अर्थ बगल, बाहुटा. मार्दव व माधुर्य निर्माण करण्यासाठीं या गाथेंत 'ल' हें कोमल अक्षर अनेक वेळां येईल अशी योजना केलेली आहे. तोडलेलीं फुलें दाखवतांना ती एवढा नखरा करीत आहे. फुलें तोडतांनाच्या तिच्या लीला पहावयास कोणी उभा राहता तर त्याला तिनें आणखी किती किती विलास दाखविले असते !

## ५९७ पंचकडी : 597. Irresistible.

मज्झो, पिओ, कुअण्डो, पल्लिजुआणा, सवत्तीओ ।
जह जह वड्ढन्ति थणा तह तह छिज्जन्ति पञ्च वाहीए ॥९७॥
[ मध्यः प्रियः कुटुम्बं पल्लीयुवानः सपत्न्यः ।
यथा यथा वर्धेते स्तनौ तथा क्षीयन्ते पञ्च व्याध्याः ॥ ]

---

१. कोदण्ड.

व्याधाच्या तरुण स्त्रीचे स्तन पुष्ट होऊं लागले तसतशी तिची कमर, तिचा पति, त्याचें धनुष्य, तिच्या सवती व गांवचे तरुण, अशी पंचकडी क्षीण होऊं लागली.

● मुळांतील ' मज्झो ' 'मध्यः' याचा अर्थ भाषांतरांत ' कमर ' असा दिलेला आहे; कारण कमर शरीराच्या मध्यस्थानीं असते, इतकेंच नव्हे, तिच्या मध्यस्थीनें अंगप्रत्यंगाच्या विविध विलासांना वैशिष्ट्य प्राप्त होतें; शिवाय या अर्थानें हा शब्द मुळांत अनेक वेळां आलेला आहे. वेबरनें मात्र याचा अर्थ 'मध्यस्थ, त्रयस्थ,' असा दिला आहे; तिचें सौंदर्य बहराला येऊं लागलें तसतशी मध्यस्थांची तटस्थता नष्ट झाली आणि तेही तिच्याविषयीं आसक्त झाले. 'कुअण्ड' या प्राकृत शब्दाचें संस्कृतीकरण एका पाठभेदात ' कोदण्ड ' असें आढळतें. तें मला स्वीकारार्ह वाटतें; कारण नवपत्नीवरील आसक्तीमुळें व्याधानें आपलें धनुष्य ताणून हलकें केल्याचे उल्लेख मुळांत इतरत्र आलेले आहेत. व्याध शिकारीला जाईनासा झाला, म्हणून कुटुंबाची उपासमार होऊं लागली आणि कुटुंबांतील माणसें क्षीण झालीं, हा अर्थ अगदींच व्यावहारिक व रूक्ष वाटतो.

५९८ माळीण : 598. Darling.

मालेरीए वेल्लहलथोहुमूलावलोअणसअह्लो ।
अलिअं पि भमइ कुसुमग्घपुच्छिरो पंसुलजुआणो ॥ ९८ ॥
[ मालाकार्याः सुन्दरस्ताहुमूलावलोकनसतृष्णः ।
अलीकमपि भ्रमति कुसुमार्घप्रश्नशीलः पांसुलयुवा ॥ ]

माळणीचे सुंदर स्तन पाहण्याच्या इच्छेनें तहानलेले छंदट तरुण फुलांची किंमत विचारण्याच्या निमित्तानें तिच्या भोंवतीं घोंटाळतात.

१. मालाआरीए. २. वल्लल, वेल्लहल, वेल्लहल. ३. कोमल.

● मोल विचारलें माळेचें पण हवें होतें माळिणीचें. पहिल्या प्रश्नाला उत्तर मिळालें कीं पुढें प्रश्न विचारीत विचारीत पाठलाग करतां येतो. 'अरे ! मला वाटलें होतें हीं फुलें आता फार महाग झालीं असतील;' किंवा, 'वा: ! फुलें स्वस्त झालेलीं दिसतात; बाग कोठें आहे ? फुलें वेंचायला फार पहाटे उठावें लागत असेल, नाहीं ? मग मुक्काम मळ्यांतच करावा लागत असेल ? मळ्यात रात्री चोराचिलटाची एकटीला भीति वाटत नाहीं ?' जमलें तर जमलें, नाहीं तर चाललें पुढल्या गाळ्यावर; आपल्याला हिरमोड नाहीं, विधिनिषेध नाहीं. कोठेंही व केव्हाही, लंपटाची एकच रीत. मुळात बाहुमूल शब्द आहे. त्या काळीं माळणी चोळ्या घालीत नव्हत्या कीं काय ? कीं बिन-बाह्यांच्या कांचोळ्या घालीत होत्या ? बाहूमूलांना मुळात वेल्लहल्ल = वेल्हाळ = विस्तृत किंवा सुंदर हें विशेषण योजलेलें आहे; त्यावरूनही स्तन हेच अभिप्रेत असावेत असें दिसतें.

## ५९९ रेवा : 599. Short Memory.

अकअण्णुअ ! घणवण्णं घणपण्णन्तरिअतराणिअराणिअरम् ।
जइ रे रे वाणीरं रेवाणीरं पि णो भरसि ? ॥ ९९ ॥

[ अकृतज्ञ घनवर्णं घनपर्णान्तरिततरणिकरनिकरम्[1] ।
यदि रे रे वानीरं रेवानीरमपि न स्मरसि ॥ ]

अरे कृतघ्ना, दाट पालवीमुळें रविकिरणांचा प्रवेशही ज्यांत होत नाहीं अशा घनपर्ण व कृष्णवर्ण वांबूंच्या बनाची आठवण विसरलास तरी हरकत नाहीं, पण नर्मदेचें पाणी तूं कसा विसरलास ?

● त्याला तिचा विसर पडला होता. साहजिक आहे. माणसानें आठवणी ठेवावयाच्या तरी किती ? त्यानें विचारलें, क्षमा करा, कुठे बरें आपली भेट झाली होती ? यावर नायिकेनें उद्वेगानें वरील उद्गार काढले. ज्या घन-

१. रजनिकरनिकरम्.

दाट बनांनी सूर्याचे किरण झाकले, त्यानें आपले प्रेमप्रसंगही झाकले, त्याचा तुला विसर पडला असेल, कारण माझ्यासारख्या अनेक मैत्रिणींना तू तेथें नेलें असशील पण तुझ्या भेटीसाठीं जिवावर उदार होऊन मी नर्मदेचें पाणी पोहून आलें होतें, ती आठवणसुद्धा विसरलास काय? किंवा नर्मदेच्या प्रवाहात आपण ज्या अलौकिक क्रीडा केल्या त्याचीसुद्धा तुला आठवण नाहीं काय? असें साहस किंवा कौशल्य तुला इतरच क्वचितच आढळलें असेल. काय, त्याचेंही स्मरण नाहीं? खरा कृतघ्न आहेस. या गाथेंत राग व्यक्त करण्यासाठीं 'र' हें खर अक्षर चार वेळा योजलेलें आहे.

## ६०० वैद्य :　　600 Doctor

**मंन्द पि ण आणइ हलिअणन्दणो, इव हि डड्ढगामम्मि।**
**गहवइसुआ विवज्जइ, अवेज्जइ, कस्स साहामो?॥ १००॥**

[ मन्दमपि[1] न जानाति हलिकनन्दन इह हि दग्धग्रामे।
गृहपतिसुता विपद्यतेऽवैद्यके कस्य कथयाम ॥]

धरधर्याच्या मुलीची तब्बेत बिघडली आहे. तिचा नवरा तर शुद्ध नागरगठ्ठ्या आहे. त्याला काहींसुद्धा कळत नाहीं. या भिकार गावांत वैद्यही नाहीं. आता तिच्या आजाराचें दुःख कोणाला सांगू?

● गृहपतिसुता व हालिकनन्दन या जोड उल्लेखांवरून वाटतें कीं हे जामात जन्मदरिद्री घरजावई असावेत आणि सासरे गर्भश्रीमंत पाटीलबुवा असावेत, शिवाय आजाराचे वेळीं ती आपल्या दरिद्री सासरीं आलेली असावी आणि या गाथेंतील उद्गार काढणारी सखी तिच्याबरोबर पाठराखीण म्हणून आलेली असावी अशा परिस्थितीत सासरीं व माहेरीं नायिकेचें वर्चस्व असावयाचेंच आजाराचें निदान करण्यासाठीं परगावच्या वैद्याला आणावें कीं तिलाच परगावीं वैद्याकडे न्यावें अशी वाटाघाट चाललेली

[1] मन्नमपि

दिसते. तिचा प्रियकर वैद्य असावा अगर वैद्याच्या बतावणीखालीं त्याला घरात आणण्याचा किंवा तिला त्याच्या घरीं नेण्याचा हा मनसुबा असावा. हालिकनन्दनाला या कटाचा संशयसुद्धां यावयाचा नाहीं, असें सखीचें आश्वासन. स्त्रीचरित्रात या मासल्याच्या अनेक गोष्टी आहेत. 'मंत्रमपि न जानाति' असा पाठभेद आहे : 'हालिकपुत्राला साधा मंत्रसुद्धा घालता येत नाहीं, मग रोगनिदान कसें करता येणार?' बैल वळण्यांत बिचाऱ्याचा जन्म गेला, त्याला स्त्रियांचें मनोगत किंवा कारस्थान कसें उमजणार! निर्बुद्ध म्हणून शेतकऱ्याचा उपहास करण्याची प्रथा फार पुरातन आहे असें या गाथेवरून दिसतें.

● ● ●

रसिअजणहिअअदइए कइवच्छलपमुहसुकइणिम्मिइए ।
सत्तसअम्मि समत्तं सट्ठं गाहासअं एअम् ॥

● ● ●

# सप्तमं शतकम् ।

६०१ अहिंसा : 601. Passive Resistance.

एक्कक्कमपरिरक्खणपहारसँमुहे कुरङ्गमिहुणम्मि ।
वाहेण मण्णुविअलन्तवाहधोअं धणुं मुक्कम् ॥ १ ॥
[ अन्योन्यपरिरक्षणप्रहारसंमुखे कुरङ्गमिथुने ।
व्याधेन मन्युविगलद्बाष्पधौतं धनुर्मुक्तम् ॥ ]

रोखलेल्या धनुष्यातून सुटणाऱ्या बाणापासून एकमेकांचें रक्षण करण्यासाठीं हरिण व हरिणी परस्परांपुढें येऊन प्रहाराला सन्मुख होऊं लागलेलीं पाहून व्याधाच्या डोळ्यांत आलेले अश्रु धनुष्यावर ओघळले व तें त्यानें टाकून दिलें.

● तो नेहमींच पशुवध करीत असल्यामुळें त्याच्या धनुष्यावर व अंतःकरणावर हिंसेचा कलंक चढला होता. असें करुण दृश्य त्यानें पूर्वी कधीं पाहिलें नव्हतें. त्या अश्रूंनीं त्याचें पाप धुऊन निघालें. पुन्हां त्या कराव‌याची नाहीं असें तत्क्षणीं ठरवून त्यानें धनुष्य टाकून दिलें. या गाथेतील प्रसंग क्रौंचवधावरून कल्पिलेला आहे कीं तत्कालीन अहिंसा तत्त्वाच्या प्रचारासाठीं जातकरूपात प्रचलित केलेल्या दृष्टान्तावरून घेतलेला आहे ? नायकाला ही गाथा ऐकून विदग्धा नायिका म्हणते, 'पाषाणहृदया, मी तुझ्यासाठीं एकदां जीव टाकतें पण तूं माझ्याशीं निष्ठुरपणें वागतोस. या व्याधापासून धडा घे आणि माझ्याशीं प्रेमानें वाग.'

---

१. एकक्रम. २. प्रधरद्वाण.

## ६०२ निर्वाणीचे उद्गार : 602. Ultimatum.

ता सुहअ ! विलम्ब खणं, भणामि कीअ वि कएण अलमह वो।
अविआरिअकज्जारम्भआरिणी मरउ, ण भणिस्सम् ॥ २ ॥

[ तत्सुभग विलम्बस्व क्षणं भणामि कस्या अपि कृतेनालमथ वा ।
अविचारितकार्यारम्भकारिणी म्रियतां न भणिष्यामि ॥ ]

सुभग, क्षणभर थांब; मी तुला कोणाबद्दल तरी कांहीं सांगणार आहे; पण न बोललेलेंच बरें; तिनें अविचारानें कार्य आरंभिलें. मरूं दे.

● तुझ्यावरील प्रेमामुळें ती आसन्नमरण झालेली आहे. तिची तावडतोब भेट घे, नाहींतर तुला स्त्रीहत्येचें घोर पातक लागेल, अशी दूतीची सूचना. तिच्या दुःखाची अवर्णनीयता अव्यक्त ठेवून सूचित केलेली आहे, म्हणून आक्षेप अलंकार. " निषेधो वक्तुमिष्टस्य यो विशेषाभिधित्सया । वक्ष्यमाणोक्तविषयः स आक्षेपो...॥ " काव्यप्रकाश; पञ्चमोल्लासः ४७१.

## ६०३ चटकः 603. Taste.

भोइणिदिण्णपहेणअचक्खिअदुस्सिक्खिओ हलिअउत्तो ।
एत्ताहे अण्णपहेणआणँ छिओल्लअं देई ॥ ३ ॥

[ भोगिनीदत्तप्रहेणकास्वादनदुःशिक्षितो हलिकपुत्रः ।
इदानीमन्यप्रहेणकानां छी इति वचनं ददाति ॥ ]

१. काव्यप्रकाशातील पहिल्या ओळीचा पाठ थोडा वेगळा आहे ए एहि किंपि कीएवि कएण णिक्किव भणामि अलमह वा। [ ए एहि किमपि कस्या अपि कृते निष्कृप भणामि अलमथवा। ] २. मोदकभक्षण. ३. एतावताशेषप्रहेणकाना मुखविधूननं ददाति ।, इदानीं अन्यमोदकानामक्षिविकारं ददाति ।

वाणिणींनें शेतकऱ्याच्या पोराला मिष्टान्नाचीं वायनें देऊन चटक लावली व वाईट वळण लावलें, आता दुसरीकडून आलेल्या सामान्य वायनांबद्दल तो तिरस्कार दाखवितो.

● भोगिनी = ग्रामव्यापारिक स्त्री. पूर्वी त्याचें माझ्यावर प्रेम होतें, पण अलीकडे शेटाणीनें मोदक चारून त्याला नादीं लावल्यामुळे माझ्या-सारख्या गावरान स्त्रीनें मोदकाकारखें मुख करून ग्रुह् ग्रुह् केलें तर तो तोंड वाकडें करतो, छी छी करतो, अशी त्याच्या प्रियेची तक्रार. मोदकांची चटक लागली कीं भाकरी आवडत नाहीं.

## ६०४ पहांट : 604 Morning.

पच्चूसमऊहावलिपरिमलणसमूससन्तवत्तोणम् ।
कमलाणं रअणिविरमे जिअलोअसिरी महम्महइ ॥ ४ ॥
[ प्रत्यूषमयूखावलिपरिमलनसमुच्छ्वसत्पत्राणाम् ।
कमलानां रजनिविरामे जितलोकश्रीर्महमहायते ॥ ]

रात्र सपली; सूर्याच्या प्रभातकालच्या कोमल किरणांच्या पर्शानीं स्पर्श केल्यामुळें कमलांच्या पाकळ्या उमलल्या आणि जगाला जिंकणारी प्रफुल्ल कमलाची शोभा आपला मोहक सुगंध सर्वांकडे दरवळवूं लागली.

● रात्र सपली तरी क्रीडासक्तीमुळें बेभान असलेल्या सखीला प्रभात-वर्णनाच्या निमित्तानें आवरतें घेण्याची दूतीची सूचना; किंवा, संकेताप्रमाणें मी कमलवनात गेलें होतें पण प्रियकर आला नाहीं अशी नायिकेची तक्रार; किंवा, सकाळीं संकेत निश्चित केल्याची दूतीची सूचना.

१ पत्ताणम् २. अआणि ३ आमोअसिरी. ४. आमोदश्री , जीवलोकश्री

**६०५ चावट वारा :** 605. Behind the Curtains.

वाउंव्वेल्लिअसाउलि ! थएसु फुडदन्तमण्डलं जहणम् ।
चडुआरअं पइं मा हु पुत्ति ! जणहासिअं कुणसु ॥ ५ ॥
[ वातोद्वेल्लितवस्त्रे स्थगय स्फुटदन्तमण्डलं जघनम् ।
चटुकारकं पतिं मा खलु पुत्रि जनहास्यं कुरु ॥ ]

मुली, वाऱ्यानें तुझें लुगडें फडफडत आहे, तें आवरून जघन झाकून घे; कारण त्यावर दंतव्रण स्पष्ट दिसत आहेत. तुझ्या समाधाना-साठीं तुला आवडणाऱ्या प्रेमलीला करणाऱ्या तुझ्या पतीला लोकांच्या उपहासाला पात्र करूं नको.

● टीकाकार सांगतात, हे मत्सरग्रस्त सपत्नीचे उद्गार आहेत. तसें असतें तर 'पुत्ति' हें संबोधन कवीनें योजिलें नसतें. हें उद्गार सासूचे असावेत. 'चौररअं' हा पाठभेद स्वीकारला तर हे उद्गार दूतीचे ठरतात. पत्नीनें पतीच्या बहुमानाचें व रहस्याचें प्रयत्नपूर्वक रक्षण केलें पाहिजे. मुळातील 'साउली' या शब्दाचा अर्थ पदर असा आहे. तो येथें संभवत नाहीं.

**६०६ आतां असाध्य :** 606. Responsibility.

वीसत्थहसिअपरिसक्किआणँ पढमं जलञ्जली दिण्णो ।
पच्छा वहूअ गहिओ कुडम्बभारो णिमज्जन्तो ॥ ६ ॥
[ विश्रब्धहसितपरिक्रमाणां प्रथमं जलाञ्जलिर्दत्तः ।
पश्चाद्वध्वा गृहीतः कुटुम्बभारो निमज्जन् ॥ ]

१. पवणु २. ठएसु ठिअदंतमंडले ऊरू, थएव. ३. चौररअ ४. मा दर्शय, मा धावस्व. ५. मण्डलं. ६. प्रियं. ७. संकिआणं. ८. विश्रब्ध, विश्रंभ. ९. विसब्धहासितपरिशिक्षिताना, विश्वस्तहासितपरिशङ्किताना. १०. परिहारवचनं.

पूर्वी ती निःशंकपणें हंसत खिदळत आणि मुरकत ठुमकत मटकत असे. आतां लग्नानंतर कुटुंबाचा भार धारण करावा लागत असल्यामुळें तिनें आपल्या चांचल्यावर पाणी सोडलें आहे.

● खालावलेल्या कुटुंबाचें धारण करण्याच्या जबाबदारीमुळें तिच्या अंगीं पोक्तपणा आला. तिच्या यौवनाचा अवखळ खळखळाट शांत झाला. नदीच्या डोंगरी अरुंद प्रवाहांत असतें तें सौंदर्य तिच्या मैदानी रुंद पात्रांत प्रत्ययाला येत नाहीं; मैदानांतील गजबजलेल्या वस्तीच्या पोषणाचा भार मात्र ती सांभाळूं शकते. नदीचें अरुंद पात्र मोहक असतें व रुंद पात्र पोषक असतें. स्त्रियांच्या सौंदर्याच्या व मोहकतेच्या बाबतींतहि हाच प्रकार दिसून येतो.

## ६०७ गोरी : 607. Light.

गम्मिहिसि तस्स पासं, सुन्दरि ! मा तुरअ ! वड्ढउ मिअङ्को ।
दुद्धे दुद्धं मिअ चन्दिआइ को पेच्छइ मुहं दे ? ॥ ७ ॥

[ गमिष्यसि तस्य पार्श्वं सुन्दरि मा त्वरस्व वर्धतां मृगाङ्कः ।
दुग्धे दुग्धमिव चन्द्रिकायां कः प्रेक्षते मुखं ते ॥ ]

सुंदरी, तूं त्याच्या मागोमाग जात आहेस; पण घाई करूं नको. चंद्रप्रकाश वृद्धिंगत होऊं दे, म्हणजे दुधांत दूध मिसळून जातें, त्याप्रमाणें चांदण्यांत तुझे गौर मुख कोणाला दिसेल ?

● चांदण्यात तुझी हालचाल दिसली तर पाहणाराला वाटेल कीं ही चांदण्याचीच लहर आहे. मात्र नामसादृश्यावर विसंबून चंद्रकळा नेसूं

१. रम्मिहिसि तस्स ण संमार सूरस्स. २. सआसं. ३. मा जूरसु तरुणि ४. चन्दिमाए. ५. सकाशम्.

नको, पादरें स्वच्छ पातळ नेसून बाहेर पड म्हणजे झालें. अलंकार-कौस्तुभांत सामान्य अलंकाराचें उदाहरण : 'स्वगुणसजातीयगुणाश्रयैकरूप्यं तु सामान्यम् ।'

६०८ नजर : 608. Censors.

जइ जूरइ जूरउ णाम मामि ! परलोअवसणिओ लोओ ।
तह वि बला गामणिणंन्दणस्स वअणे वलइ दिट्ठी ॥ ८ ॥

[ यदि खिद्यते खिद्यतां नाम मातुलानि परलोकव्यसनिको लोकः ।
तथापि बलाद्ग्रामणीनन्दनस्य वदने वलते दृष्टिः ॥ ]

पाटलाच्या पोराकडे पाहावयाचें नाहीं, असा निश्चय केला तरी एखाद्या बलवत्तर शक्तीनें ओढावी, तशी माझी दृष्टि त्याच्या मुखाकडे वळते. मामी, परलोकाचें व्यसन असलेल्या लोकाना यामुळें राग येत असला तर येऊं दे बापडा !

● 'खिद्यति क्रुध्यतीति विज्ञानं भट्टीकायाम् ।' मी परपुरुषाकडे पाहिलें तर मला दुर्गति प्राप्त होईल अशी या नकली धार्मिकांना धास्ती वाटते. नकली, कारण त्यांची वृत्ति धार्मिक व प्रामाणिक असती तर त्याना खेद वाटला असता, राग आला नसता. पारलौकिक कल्याणाच्या दृष्टीनें ऐहिक जीवन जगणाऱ्याना आयुष्यातील आनदाची व उपभोगाची सुमारी कशी कळणार ? इतर व्यसनाहून परलोकाचें व्यसन फारच भयंकर. या व्यसनानें पछाडलेल्या लब्धप्रतिष्ठिताची वृत्ति विकृत असते, प्रकृति स्वसंतुष्ट असते. जगाला वळण लावण्याची जबाबदारी आपल्यावर आहे आणि चाकोरी सोडून जाणारांना शिक्षा करण्याचा अधिकार आपल्याला आहे, असें मानणाऱ्या या लोकांच्या उद्योगामुळें समाजाला उपद्रव

---

१. इष्यति ( खिद्यति ) क्रुध्यताम् ( कुप्यतु, खिद्यतु ) २ उत्तवयणिकमले.

मात्र होतो. प्राचीन परलोकव्यसनिक हेच अर्वाचीन संस्कृतिसंरक्षक. परलोकव्यसनिकांना मुक्ति मिळत नाहीं असें पीतांबरही सांगतो.

## ६०९ शून्य : 609. Grotto.

गेहं व वित्तरहिअं, णिज्झरकुहरं व सलिलसुण्णविअम् ।
गोहणरहिअं गोट्ठं व तीअ वअणं तुह विओए ॥ ९ ॥

[ गृहमिव वित्तरहितं निर्झरकुहरमिव सलिलशून्यम् ।
गोधनरहितं गोष्ठमिव तस्या वदनं तव वियोगे ॥ ]

वित्त निघून गेलेलें घर, पाणी आटलेली झऱ्याची पोकळी आणि गोधन नाहींसें झालेला गोठा हीं शून्य दिसतात; त्याचप्रमाणें ( तुझ्या वियोगामुळें ) तिचें मुख शून्य दिसत आहे.

● तिचें चित्त थाऱ्यावर नाहीं, तिचें तेज लोपलें आहे, तूंच तिचें वैस्व आहेस, अशी नायकाला दूतीची सूचना. ' पाण्यानें धुपलेलें चित्र ' पाठभेदही ठीक आहे. अलंकारकौस्तुभात मालोपमेचें उदाहरणः मालोपमोपमेयेऽप्येकस्मिश्चेद्दृश्यमानसंबन्धः । सामान्यधर्मभेदाभेदाभ्यां सापि द्वेधा ॥ ''

## १० लाजाळू : 610. Stifled Love.

तुह दंसणेणँ जणिओ इमीअ लज्जाउलाइ अणुराओ ।
दुग्गअमणोरहो विअ हिअअ च्चिअ जाइ परिणामम् ॥१०॥

१. धोयं व चित्तयम्मं. २. उज्झर, ओज्झर. ३. झुणविअम्. ४. जलधौतं नकर्मेव. ५. विवरम्. ६. शून्यीकृतम्. ७. दंसणसज्जणिओ. ८. लुआइ, ाए, लुइऑ, लुरीएँ.

[ तव दर्शनेन जनितोऽस्या लज्जालुकाया अनुरागः ।
दुर्गतमनोरथ इव हृदय एव याति परिणामम् ॥ ]

तुझ्या दर्शनानें लाजरीच्या मनात प्रेम उत्पन्न झालें; पण दरिद्र्याच्या मनोरथांप्रमाणें तें तिच्या हृदयांतच जिरलें.

● नायिका उत्कण्ठित आहे, पण कुलीन असल्यामुळें लाजाळू आहे. प्रीतीची धुगधुगी प्रज्वलित कर असें दूतीचें नायकाला प्रोत्साहन. पीतांबर सागतो, उपाय योजल्यावाचून अभीष्टाची प्राप्ति होत नाहीं, ही नीति.

## ६११ संतापः 611. Agony.

जं तणुआअइ सा तुह कएण ? किं जेण पुच्छसि हसन्तो ।
अह गिम्हे मह पअई, एव्वं भणिऊण ओरुण्णा[1] ॥ ११ ॥

[ या तनूयते सा तव कृतेन किं येन पृच्छसि हसन् ।
असौ ग्रीष्मे मम प्रकृतिरिति भणित्वावरुदिता ॥ ]

जी कोणी कृश होते, ती तुझ्यासाठींच कीं काय ? माझ्या कृशतेचें कारण हंसतमुखानें विचारून माझा उपहास कां करीत आहेस ? असो. माझी प्रकृतीच अशी आहे कीं मी उन्हाळ्यांत नेहमींच कृश होतें. एवढें उद्गारून ती रडूं लागली.

● तुझा वियोग हेंच माझ्या कृशतेचें कारण; हें तुला माहीत असूनही माझ्या दुःखावर डागण्या कां देतोस ? त्यानें जिला प्रश्न विचारला ती त्याची पत्नी नसावी, असें तिच्या प्रश्नावरून वाटतें. पीतांबर सागतो; प्रीतीमुळें प्रेरित झालेला मिथ्यावाद हा हेतूचे अभावामुळें अधर्म ठरत नाहीं आणि ज्यानें क्लेश दिले त्यानेंच उपहास केला म्हणजे जीवाचा संताप होतो.

१. चिरं रुण्णा.

## ६१२ चित्राचा गुण : 612. Constancy.

वण्णक्कमरहिअस्स वि एस गुणो णवरि चित्तकंम्मस्स ।
णिमिसं पि जं ण मुञ्चइ पिओ जणो गाढमुवऊढो ॥१२॥

[ वर्णक्रमरहितस्याप्येष गुणः केवलं चित्रकर्मणः ।
निमिषमपि यन्न मुञ्चति प्रियो जनो गाढमुपगूढः ॥ ]

रेखाचित्रात रंग भरलेले नसले तरी चित्राचें वैशिष्ट्य त्यांतही असतेंच; तें हें कीं त्यातील एकमेकांना गाढ आलिंगन दिलेले प्रियजन परस्परांना क्षणभरही सोडीत नाहींत.

● मुळांत रंगीत असलेल्या चित्रातील रंग उडून गेले तरी चित्रित केलेल्या जोडप्यापैकीं कोणाचेंही प्रेम केव्हाही उडून जात नाहीं, हाच चित्राचा विचित्र पण विशिष्ट गुण. प्रत्यक्ष जीवनात ताजेपणाची टवटवी आहे तोंवरही प्रेम टिकत नाहीं. ' चित्रकर्मण. ' याचा अर्थ एका टीकाकारानें ' विविध सुरत प्रकार ' असा केलेला आहे; आसन बदललें तरी आलिंगन ढळत नाहीं. ' चित्रकर्मणः ' या ऐवजीं ' चित्तजन्मन ' हा पाठ स्वीकारला तर अर्थ बराच बदलतो. मदनाला ' चित्तजन्मन् ' अशी संज्ञा आहे. प्रेमामुळें प्रियकर प्रियेला क्षणभरही विसरत नाहीं. प्रेमाचा उद्भव चित्तात होतो, तें वर्णावर अवलंबून नसतें, मग वर्णाचा अर्थ काळागोरा घ्या, किंवा ब्राह्मण-क्षत्रियादि वर्ण घ्या. पीतांबर यागतो, या गाथेची नायिका चित्रवर्णनाच्या निमित्तानें आपली आसक्ति व्यक्त करीत आहे, तिचा अभिलाष हीनवर्ण पुरुषाबद्दल आहे, म्हणून तो निष्कर्ष काढतो कीं स्त्रियाचें नेहमीं रक्षण केलें पाहिजे, हा धर्म.

१. चित्तअम्मस्स. २ चित्तजन्मन

## ६१३ अडाणी : 613. Defloration.

अविहत्तसंधिबन्धं पढमरसुब्भेअपाणलोहिल्लो ।
उव्वेलिउं ण आणइ, खण्डइ कलिआमुहं भमरो ॥१३॥

[ अविभक्तसंधिबन्धं प्रथमरसोद्भेदपानलुब्धः ।
उद्वेल्लितुं न जानाति खण्डयति कलिकामुखं भ्रमरः ॥ ]

कळिका कशी उमलवावी हें भ्रमर जाणत नाहीं, मात्र तिच्या पहिल्या मकरन्दाचा आस्वाद घेण्यासाठीं तो लुब्ध व अधीर आहे. ज्यांचीं बंधनें परस्परांपासून विभक्त झालेलीं नाहींत अशीं कळीच्या पाकळ्यांचीं टोकें अडाणी भ्रमर निर्दयपणें तोडतो आणि तिचें मुख दुखवितो मात्र.

● मुग्धा व नवोढा नायिका आणि अविदग्ध व प्रथमरतिलालसान्ध नायक. कलिका-मधुप-वृत्तान्ताच्या निमित्तानें मुग्धेशीं आडदांडपणा न करण्याची नायकाला दूतीची सूचना.

## ६१४ मदनाचें शस्त्रागार : 614. Armoury.

दरवेविरोरुजुअलासु मंउलिअच्छीसु लुलिअचिहुरासु ।
पुरिसाइरीसु कामो पिआसु सज्जाउहो वसइ ॥१४॥

[ ईषद्वेपनशीलोरुयुगलासु मुकुलिताक्षीषु लुलितचिकुरासु ।
पुरुषायितशीलासु कामः प्रियासु सज्जायुधो वसति ॥ ]

१. अविभक्त. २. उद्वेलयितुं ३. मीलिअच्छीसु. ४. होइ. ५. मीलित.

मांड्या थोड्याशा थरकांपत आहेत, नेत्र मुकुलित आहेत, अंबाडा सैल झाला आहे, अशा पुरुषायित करणाऱ्या स्त्रियाचे ठिकाणीं मदनाचीं सर्व शस्त्रास्त्रें सज्ज असतात.

● प्रथमानुरागानन्तर पुरुषायिताला प्रोत्साहन.

## ६१५ नावडती अळणी : 615. Vapid.

जं जं ते ण सुहाअइ तं तं ण करेमि जं ममाअत्तम् ।
अहअं चिअ जं ण सुहामि, सुहअ ! तं किं ममाअत्तम् ॥१५॥

[ यद्यते न सुखायते तत्तन्न करोमि यन्ममायत्तम् ।
अहमेव यन्न सुखाये सुभग तर्कि ममायत्तम् ॥ ]

हे सुभग, जींमुळें तुला सुख होणार, नाहीं व जी करणें माझ्या आधीन आहे अशी कोणतीही गोष्ट मी करणार नाहीं; पण सध्यां माझ्या आधीन असें काहींच नाहीं. मग मी तुला कशी सुखविणार !

● मी तुझ्यावर अनुरक्त आहे, पण तूं अन्य स्त्रियाविषयीं आसक्त आहेस; अशा परिस्थितीत मी तुला सुख कसें देणार ?

## ६१६ गुरुजन : 616. Elders.

वाआरविसंवाअं सअलावअराणँ कुणइ हअलज्जा ।
सवणाणँ उणो गुरुसंणिहे वि ण णिरुज्झइ णिओअम् ॥१६॥

[ व्यापारविसंवादं सकलावयवानां करोति हतलज्जा ।
श्रवणयोः पुनर्गुरुसंनिधावपि न निरुणद्धि नियोगम् ॥ ]

या मेल्या लाजेमुळे अवयवांच्या व्यापारांत विसंवाद उत्पन्न होतो. गुरुजनांच्या समक्ष फक्त श्रवणाची क्रिया अनिरुद्धपणें करतां येते.

● गुरुजनांसमोर पत्नीनें पतीकडे पहावयाचेंही नसतें, मग बोलावयाचें वगैरे बाजूलाच राहिलें. दृष्टिक्षेपानीं मी प्रोत्साहन देऊं शकत नाहीं; पण तुम्ही बोलत राहा, तुमचा शब्द ऐकण्यासाठीं माझा जीव ओढ घेत आहे.

## ६१७ स्नेहमार्गः — 617. Encouragement.

[1]किं भणह मं, सहीओ : मा मर ! दीसिहइ सो जिअन्तीए।
कज्जालाओ एसो, सिणेहमग्गो उण ण होइ ॥१७॥

[ किं भणथ मां सख्यो मा म्रियस्व द्रक्ष्यते स जीवन्त्या।
कार्यालाप एष स्नेहमार्गः पुनर्न भवति ॥ ]

तूं मरूं नकोस, जगलीस तर त्याचें दर्शन होईल, असें मला कां सांगतां ? सख्यांनो, तुमचें बोलणें मतलबी आहे. हा कांहीं खऱ्या स्नेहाचा मार्ग नव्हे.

## ६१८ हरिणाक्षी : — 618. Gazelle.

एकल्लमओ दिट्ठीअ मइअ तह पुलइओ सअह्णाए[2] ।
पिअजाअस्स जह धणुं पडिअं[3] वाहस्स हत्थाओ ॥१८॥

[ एकाकी मृगो दृष्ट्या मृग्या तथा प्रलोकितः सतृष्णया।
प्रियजायस्य यथा धनुः पतितं व्याधस्य हस्तात् ॥ ]

१. पालिआं. २. सतण्हाए. ३. पालिअं.

एकाकी उभ्या असलेल्या हरिणाकडे हरिणीनें अशा तहानलेल्या नजरेनें पाहिलें कीं शिकाऱ्याला आपल्या प्रिय पत्नीच्या दृष्टिक्षेपाची आठवण झाली व त्याच्या हातांतून धनुष्य गळून पडलें

● हिंस्र व पामर व्याधाच्या हृदयात करुणा व स्नेह आहे, पण तूं मात्र निष्करुण व मन्दस्नेह आहेस.

## ६१९ लाली : 　　　619. Gigolo.

णलिणीसु भमसि, परिमलसि सत्तलं, मालइं पि णो मुअसि।
तरलत्तणं तुह अहो महुअर ! यदि पाटला हरइ ! ॥१९॥

[ नलिनीषु भ्रमसि परिमृद्नासि सप्तलां मालतीमपि नो मुञ्चसि।
तरलत्वं तवाहो मधुकर यदि पाटला हरति ॥ ]

मधुकर, तू नलिनीभोवतीं घुमतोस, नवमालिकेचें मर्दन करतोस आणि मालतीलाही सोडीत नाहींस. हा तुझा चंचलपणा पाटला हरण करील.

● या गाथेंत नमूद केलेलीं फुलें प्रातिनिधिक आहेत; विशेषनामें आहेत, विशेषणे आहेत. सर्वगुणसंपन्न पाटला तुझे समाधान करील, इतकेंच नव्हे, तुझें चाचल्य नष्ट करील किंवा, हे शठा, तूं इतका चंचल आहेस कीं ती तुझें समाधान करूं शकली तर तें एक आश्चर्यच होईल !

## ६२० वानगी : 　　　620. Sample.

दोअङ्गुलअकवालअपिणद्धरुविसेसणीलकञ्चुइआ।
दावेइ थणत्थलवण्णिअं व तरुणी जुअजणाणम् ॥२०॥

१. सप्तदलं यूथिकां. २. चुम्बसि ३. तव अहो आश्चर्यम्. ४. कञ्चुलिआ. ५. घण थण.

[ द्व्यङ्गुलककपाटापिनद्धसविशेषनीलकञ्चुकिका ।
दर्शयति स्तनस्थलवर्णिकामिव तरुणी युवजनेभ्य ॥ ]

तरुणीनें गडद निळ्या रंगाची कंचुकी धारण केली आहे. कंचुकीच्या आवरणातून दोन बोटें मोकळया राहिलेल्या फटींतून ती जणू आपल्या स्तनस्थलाचा नमुनाच तरुणांना दाखवीत आहे.

● यौवनाच्या बहरामुळें कञ्चुकी तडकली आहे. यौवनाला बन्धन रुचत नाहीं. कीं चोळीची बेतणी चटोरी आहे? भडक धारवाडी किंवा बुट्टीदार बनारसी खणाची चोळी असली तर तिचें प्रदर्शन करण्याचा मोह स्त्रियांना आवरत नाहीं निळी किंवा काळी चोळी शोभते ती गौरवर्णा असलीच पाहिजे वाणी तरी जास्त नमुना कोठें दाखवितो? आणि दाखवितो तो नमुना उंची मालाचाच असतो. येथें मात्र अशी लबाडी नाहीं ज्याचा नमुना पहावयास मिळतो तो माल योग्य किंमतींत मिळण्यासारखा असतो, अशी सूचना. पौतावर सागतो, कुलस्त्रियांनीं स्तनादि अवयव परक्यांना दिसणार नाहींत अशा रीतीनें अवगुंठित राखावेत, हा धर्म, आणि किंचित् बाह्यलक्षणावरून अंतरींचा भाव अनुमानता येतो, ही युक्ति

## ६२१ गळती : 621 Exposure.

रक्खेइ पुत्तअं मत्थएण ओच्छोअअं पडिच्छन्ती ।
अंसुहिँ पहिअघरिणी ओल्लिज्जन्तं ण लक्खेइ ॥२१॥

[ रक्षति पुत्रक मस्तकेन पटलप्रान्तोदक प्रतीच्छन्ती ।
अश्रुभि पथिकगृहिणी आर्द्रीभवन्त न लक्षयति ॥ ]

१. व्यङ्गुलकृतजालक व्यङ्गुलावकाश २. ओकोअअ (ओको गृह तदुदकम्) ओक्कोअअ, छोअअ ३ अच्छोदक

१ तिचा पति प्रवासाला गेलेला आहे. घरावरल्या छपरांतून पावसाचें पांणी जागोजाग गळत आहे. गळत्या धारेखालीं आपलें मस्तक धरून पथिकगृहिणी पुत्राचें रक्षण करते; पण स्वत:च्या अश्रूंनीं तो बिचारा ओलाचिंब होत आहे, हें कांहीं तिच्या ध्यानीं येत नाहीं

● पीतांबर सांगतो: जें व्हावयाचें तें होणारच असतें, त्यामुळें कर्मांत खंड पडूं देऊं नये, हा धर्म. गंगाधर सांगतो: प्रतीकारही कधीं कधीं अपकारक होतो.

६२२ समानगुण : 622. Redolence.

सरए सरम्मि पहिआ जलाइँ कन्दोट्टसुरहिगन्धाइं ।
धवलच्छाइँ सअण्हा पिअन्ति दइआणँ व मुहाइं ॥२२॥
[ शरदि सरसि पथिका जलानि नीलोत्पलसुरभिगन्धीनि ।
धवलाच्छानि सतृष्णाः पिबन्ति दयितानामिव मुखानि ॥ ]

शरद् ऋतूंत सरोवरांचें पांढरें स्वच्छ पाणी निळ्या कमळांच्या सुवासानें सुगंधित झालेलें असतें तहानलेले वाटसरू हें पाणी असें पितात कीं जणूं ते आपल्या दयितेच्या सुंदर व सुगंधी मुखाचाच आस्वाद घेत आहेत

● शरद् ऋतूच्या शोभेमुळें प्रवासी पतीला प्रियेची आठवण होईल व तो त्वरित परत येईल असें आश्वासन. स्वच्छ जलातलें नीलकमल पाहून त्याला तुझ्या डोळ्याची आठवण होईल. सरोवराच्या तीरावर संकेत ठरला होता, पण तेथें कोणी प्रवासी एकाएकीं येऊन उतरल्यामुळें संकेतभङ्गाची सूचना. अलंकारकौस्तुभात श्रीविश्वेश्वर पण्डित सांगतो: " अत्र पिबन्तीति मुखपक्षे उपचारः, नीलोत्पलसुरभीति समासभेदः । ' धवलाच्छानि, धवलाणि ' इत्यर्थकतया ' धवलच्छाइं ' इत्यत्र श्लेषः ॥ '

१. कन्दट, कदोट. २. वनितानाम्.

६२३ चिखल : 623. Mud.

अब्भन्तरसरसाओ उवरिं पव्वाअबद्धपङ्काओ ।
चङ्कम्मन्तम्मि जणे समुस्ससन्ति व्व रच्छाओ ॥२३॥

[ अभ्यन्तरसरसा उपरि प्रवातबद्धपङ्काः ।
चङ्क्रममाणे जने समुच्छ्वसन्तीव रथ्याः ॥ ]

रस्त्यांच्या पृष्ठभागावरील चिखल वाऱ्यामुळें जरासा वाळलेला असतो, पण त्याखालीं पाणी असतें. वाटसरू चालूं लागले म्हणजे रस्ते जणूं निःश्वास टाकतात.

● नायिका बाह्यतः रूक्ष दिसत असली तरी ती अंतर्यामीं सरस, अनुरक्त आहे. रस्त्यांत चिखल आहे म्हणून रेंगाळूं नको, असें दूतीचें आवाहन.

६२४ राजहंस : 624. Swans.

मुहपुण्डरीअछाआइ संठिआ उअह राअहंसे व्व ।
छणपिट्ठकुट्टणुच्छलिअधूलिधवले थणे वहइ ॥२४॥

[ मुखपुण्डरीकच्छायायां संस्थितौ पश्यत राजहंसाविव ।
क्षणपिष्टकुट्टनोच्छलितधूलिधवलौ स्तनौ वहति ॥ ]

सणासुदीसाठीं पीठ कुटतांना उडालेल्या कणांनीं तिचे धवल झालेले स्तन तिच्या झुकलेल्या मुखकमलाच्या छायेंत राजहंसांच्या जोडीसारखे दिसतात.

---

१. आश्यान, विशुष्क. २. चङ्क्रमति. ३. पन्थानः ४. सण. ५. घन.

● पंख खोंवरून व मान आवरून शांत बसलेला राजहंस तुम्ही पाहिला आहेत का ? आणि त्यांची जोडी — व तीही कमलांच्या छायेंत !

## ६२५ तृप्ति : 625. Satisfaction.

तह तेणवि सा दिट्ठा, तीअ वि तह तस्स पेसिआ दिट्ठी ।
जह दोण्ह वि समअं चिअ णिव्वुत्तरआइँ जाआइं ॥२५॥

[ तथा तेनापि सा दृष्टा तयापि तया तस्मै प्रेषिता दृष्टिः ।
यथा द्वावपि सममेव निर्वृत्तरतौ जातौ ॥ ]

त्यानें तिच्याकडे व तिनें त्याच्याकडे असा कांहीं दृष्टिक्षेप केला कीं नुसत्या नजरानजरीनें तत्क्षणीं दोघांचीहि प्रेमतृप्ति झाली.

## ६२६ ग्रीष्म : 626. Summer.

चैाउलिआपरिसोसण कुडंङ्गपत्तलणसुलहसंकेअ ।
सोहग्गकणॅअकसवट्ट गिम्ह ! मा कह वि झिज्जिहिसि ॥२६॥

[ स्वल्पखातिकापरिशोषण निकुञ्जपत्रकरण सुलभसंकेत ।
सौभाग्यकनककषपट्ट ग्रीष्म मा कथमपि क्षीणो भविष्यसि ॥ ]

ग्रीष्मा, तूं लहानसहान तळीं आटवितोस व कुञ्जांत पालवी निर्माण करतोस. यामुळें संकेत सुलभ होतात. तूं सौभाग्यसुवर्णाच्या कसोटीसारखा आहेस. कसेंहि करून तूं थोडासाही क्षीण होऊं नकोस.

---

१. द्वयोरपि सममेव निर्वृत्तरतानि जातानि । २. चाउली. ३. णिउंज. ४. कण्णअ. ५. वापिका.

● 'वाउलिआ' या देशी शब्दाचा अर्थ पीतांबरानें अल्पशाखालतिका असा दिलेला आहे.

## ६२७ मातीमोल : 627. Emerald.

**दुस्सिक्खिअरअणपरिक्खएहिँ घिट्ठोसि[1] पत्थरे तावा ।**
**जा तिलमेत्तं वट्टसि मरगअ का तुज्झ मुल्लकहा ॥२७॥**

[ दुःशिक्षितरत्नपरीक्षकैर्घृष्टोऽसि प्रस्तरे तावत् ।
यावत्तिलमात्रं वर्तसे मरकत का तव मूल्यकथा ॥

अडाणी रत्नपरीक्षकांनीं पारख करतां करतां कसोटीवर पाचू इतका घांसला कीं केवळ तिळाएवढा खडा राहिला. आतां त्याच्या किंमतीची गोष्ट कशाला ?

● अडाणी दुर्जनाच्या संगतीमुळें तुझे गुण मातीमोल झाले आहेत. अविवेकामुळें किंवा अहंकारामुळें स्वतःच्या अंगचे गुण पारखून घेता घेतां तूं इतकी झिजून गेली आहेस कीं तुझ्या मूळच्या अद्वितीय गुणाचा लवलेशही शिल्लक राहिलेला नाहीं. आता माझ्याकडे येऊन काय उपयोग ? किंवा : हे पाचकणी, तुझा आकार क्षुद्र असला तरी तुझ्या मोलाची या गुग्रामात कोणाला कल्पना येणार ? किंवा : हे रत्नपारख्या, हा खडा मौल्यवान् पाचूचा आहे; असा धसमुसळेपणा करूं नको; त्याची पारख कशी अलगद केली पाहिजे ?

## ६२८ बालवीर : 628. Young Leader.

**जइ चिन्तेइ परिअणो आसङ्कइ जह अ तस्स पडिवक्खो ।**
**बालेण वि गामणिणन्दणेण तह रक्खिआ पल्ली ॥२८॥**

१. घिट्ठोसि, घुट्ठोसि.

[ यथा चिन्तयति परिजन आशङ्कते यथा च तस्य प्रतिपक्षः ।
बालेनापि ग्रामणीनन्दनेन तथा रक्षिता पल्ली ॥ ]

पाटलाचा पुत्र वयानें ल्हान होता. खेड्याचें रक्षण त्याच्या हातून कसें होणार याविषयीं नोकर माणसांना काळजी वाटत होती. त्याच्या शत्रूंना वाटत होतें कीं आपल्यापुढे हा काय करणार ! पण बालवयांतही त्यानें खेड्याचें रक्षण अशा शिताफीनें केलें कीं यंव !

● टीकाकार सांगतात : खेड्यावर परचक्र आलें आहे, गांवकरी हाणामारी करीत आहेत, कोणी गस्त घालीत आहेत, अशा धादलींत कसें जमणार ?

## ६२९ शिकाऱ्याचा अभिमान : 629. Hunter.

अण्णेसु पहिअ ! पुच्छसु वाहअपुत्तेसु पुसिअचम्माइं ।
अम्हं वाहजुआणो हरिणेसु धणुं ण णामेइ ॥२९॥

[ अन्येषु पथिक पृच्छ व्याधकपुत्रेषु पृषतचर्माणि ।
अस्माकं व्याधयुवा हरिणेषु धनुर्न नामयति ॥ ]

पथिका, चितळ हरणाचें कातडें पाहिजे असेल तर दुसऱ्या कोणा तरी शिकाऱ्याच्या पोराला विचार. आमचा तरुण शिकारी हरणांवर धनुष्य धरीत नाहीं.

● चांगले शिकारी काळवीट मारतात, चितळ मारीत नाहींत. पथिकाला खरोखरीच हरणाचें कातडें हवें होतें कीं तो व्याधस्त्रीच्या साध्यासाध्यतेचा माग काढण्यासाठीं पथिकाचें सोंग घेऊन तिच्या मागोमाग जंगलांत आला होता ? कसेंहि असो, व्याधाच्या शौर्याचें वर्णन करून तिनें पथिकाला चिचक्वलें एवढें मात्र खरें. अलंकारकौस्तुभात उत्तर अलंकाराचें उदाहरण : 'उत्तरमात्रात्प्रश्नोन्नयने स्यादुत्तरं नाम ॥'

१. वाहकुडुम्बेसु. २. व्याधयुवान.

## ६३० भारवाहक : 630. Bearer.

गअवहुवेहव्वअरो पुत्तो मे एक्ककण्डविणिवाई।
तह सोण्हाइ पुलइओ जह कण्डकरण्डअं वहइ ॥३०॥

[ गजवधूवैधव्यकरः पुत्रो मे एककाण्डविनिपाती।
तथा स्नुषया प्रलोकितो यथा काण्डसमूहं वहति ॥ ]

माझा मुलगा पूर्वी हत्तिणींना वैधव्य आणीत असे व एकाच बाणांत श्वापद लोळवीत असे. अलीकडे सूनबाईनें त्याच्याकडे पाहिल्यामुळें आतां तो बाणाचा भार मात्र वाहतो.

## ६३१ पळपुटे : 631. Paltroonery.

विञ्झारुहणालावं पल्ली मा कुणउ, गामणी ससइ।
पच्चुज्जिविओ जइ कह वि सुणइ ता जीविअं मुअइ ॥३१॥

[ विन्ध्यारोहणालापं पल्ली मा करोतु ग्रामणीः श्वसिति।
प्रत्युज्जीवितो यदि कथमपि शृणोति तज्जीवितं मुञ्चति ॥ ]

पाटील आसन्नमरण असले तरी त्याच्या जीवांत जीव आहे तोंवर, गांवकऱ्यांनों, विन्ध्य पर्वतांत पळून जाण्याच्या गोष्टी करूं नका. पाटील शुद्धीवर आले व त्यांनीं हें ऐकलें तर मानभंगामुळें ते तावडतोब प्राण सोडतील.

१. करिणी. २. हअ. ३. विनडिओ, विलुलिओ. ४. वरण्डअं. ५ हत. ६. तथा कृतो, विघटितो, विलङ्घितः, विलुलितो, शोषितो. ७. भपण्डं. ८. पच्चुज्जीविओ. ९. प्रत्युज्जीवितो.

● परचक्राचें निवारण करताना पाटील जखमी झाला. यामुळें गांवकरी हादरले व संकटाला तोंड देण्याऐवजीं बगल देण्याच्या वाटाघाटी करूं लागले. त्यांना उद्देशून आमनायकमहिषीचे उद्गार; " अत्र ध्वनिकारादिमते वीररसस्य भयानकरसाङ्गतया गुणीभूतव्यङ्ग्यत्वम् दण्डाचार्यादिमते तु स्विद् अलंकारः । "

## ६३२ अखेरचा संदेश : 632. Mandate.

अप्पाहेइ मरन्तो पुत्तं पल्लीवई पअत्तेण ।
मह णामेण जह तुमं ण लज्जसे तह करेज्जासु ॥३२॥
[ शिक्षयति म्रियमाणः पुत्र पल्लीपतिः प्रयत्नेन ।
मम नाम्ना यथा त्वं न लज्जसे तथा करिष्यसि ॥ ]

मृत्युशय्येवर पडलेल्या पाटलानीं आपल्या पुत्राला मोठ्या कष्टानें अखेरचा संदेश दिला कीं माझ्या नावामुळें तुला लाज येणार नाहीं असें वर्तन ठेव.

● स्वतःच्या नावानें ओळखला जाशील अशी कर्तबगारी दाखव. फक्त माझा मुलगा म्हणून ओळखला जाऊं नको.

## ६३३ सौभाग्यालंकार : 633. Ornament.

अणुमरणपत्थिआए पच्चागअजीविए पिअअमम्मि ।
वेहव्वमण्डणं कुलवहूअ सोहग्गअं जाअम् ॥३३॥
[ अनुमरणप्रस्थितायाः प्रत्यागतजीविते प्रियतमे ।
वैधव्यमण्डनं कुलवध्वाः सौभाग्यकं जातम् ॥ ]

१. वहूएँ सोहग्गयं जायम्.

कुलवधूनें सती जाण्याची तयारी केली होती इकडे मृतवत् पडलेला तिचा प्रियतम एकाएकीं जिवत झाला. वैधव्यद्योतक असे जे अलंकार तिनें धारण केले होते तेच यामुळें सौभाग्यालंकार झाले

● दैव अनुकूल असलें म्हणजे जे अमङ्गल असतें तेंहि मङ्गल होतें, धीर सोडूं नको, अशी सूचना.

## ६३४ सुजलेला ओंठ : 634 Swollen Lip.

महुमच्छिआइ दट्ठं दट्ठूण मुहं पिअस्स सूणोट्ठम् ।
[1]ईसालुई पुलिन्दी रुक्खच्छाअं गआ अण्णम् ॥३४॥

[ मधुमक्षिकया दष्टं दृष्ट्वा मुखं प्रियस्योच्छूनोष्टम् ।
ईर्ष्यालुः पुलिन्दी वृक्षच्छायां गतान्याम् ॥ ]

मधमाशी चावल्यामुळें सुजलेला प्रियकराचा ओंठ पाहून भिल्लिणीला मत्सर वाटला व ती दुसऱ्या वृक्षाच्या छायेंत जाऊन बसली.

● तो बिचारा निरपराध होता. तिला अन्य स्त्रीचा संशय आला. गंगाधर सांगतो : नवऱ्याबरोबर भांडून ती तुझ्या भेटीसाठीं झाडाखालीं येऊन बसली आहे असा दूतीचा संदेश.

## ६३५ डोंगरगांव : 635. Mountain Village.

घण्णा वसन्ति णीसङ्कमोहणे बहलपत्तलवईम्मि ।
वाअन्दोलणओणविअवेणुगहणे गिरिग्गामे ॥३५॥

[ धन्या वसन्ति निःशङ्कमोहने बहलपत्रलवृतौ ।
वातान्दोलनावनामितवेणुगहने गिरिग्रामे ॥ ]

---

१. रुच्छलोट्ठ. २. ऊणोट्ठम् ३ वणम्मि ४. वने, ५. वातान्दोलनवलद्वेणु.

डोंगरगांवांत राहणारे लोक धन्य होत; तेथें दाट पालवीची कुंपणें व सोंसाट्याच्या वाऱ्यानें आंदोलन पावणारीं व वांकणारीं वेळूचीं गर्द बनें असल्यामुळें उघड्यावर निःशंकपणें सुरतसुख अनुभवतां येतें.

● मला अशा स्वच्छन्द व निःशङ्क मोहनाची उत्कण्ठा आहे, अशी सूचना.

## ६३६ कदम्बवनांत : 636. Love Nest.

पप्फुल्लघणकलम्बा णिद्धोअसिलाअला मुइअमोरा।
पसरन्तोज्झरमुहला ओसाहन्ते गिरिग्गामा ॥३६॥
[ प्रोत्फुल्लघनकदम्बा निर्धौतशिलातला मुदितमयूराः।
प्रसरन्निर्झरमुखरा उत्साहयन्ति गिरिग्रामाः ॥ ]

डोंगरगांवच्या गर्द राईतले कदम्ब फुलांनीं डंवरले आहेत, तेथें स्वच्छ शिलातल आहेत, मोर आनंदांत नाचत आहेत, निर्झर खळखळ वाहत आहेत; यामुळें मनाची उत्कण्ठा वृद्धिंगत होते.

● गंगाधर सांगतो : पहिल्यानें उद्दीपन, दुसऱ्यानें शयनस्थान, तिसऱ्यानें मनोविनोद व चवथ्यानें मणितादि ध्वनि सूचित केलेले आहेत.

## ६३७ उपचारचातुर्य : 637. Skill.

तह परिमलिआ गोत्रेण तेण हत्थं पि जा ण ओल्लेइ।
स च्चिअ धेणू एह्णि पेच्छसु! कुडदोहिणी जाआ ॥३७॥
[ तथा परिमलिता गोपेन तेन हस्तमपि या नार्द्रयति।
सैव धेनुरिदानीं प्रेक्षध्वं कुटदोहिणी जाता ॥ ]

१. उप्फुल्ल. २. घर. ३. मनोहरो इइ. ४. खडणा. ५. मृदिता.

पूर्वीचा गवळी धार काढू लागला म्हणजे त्याचा हातसुद्धां ओला होत नसे; पण यानें अशा कांहीं कौशल्यानें तिला दुहिली कीं तीच गाय आतां घागरभर दूध देऊं लागली.

● पाठभेद : खडणा= ( दे ) = खाटी = दूध देतांना त्रास देणारी, पळणारी, लाथ मारणारी, वासरालाही दूध न देणारी गाय किंवा म्हैस. ती नीरस आहे अशी मुणमुण लावण्यात अर्थ नाहीं; तुझ्या अंगीं कौशल्य असेल तर ती द्रवेल. नवोढा प्रारंभीं पतीविषयीं विरक्त होती, पण थोडक्याच दिवसात ती त्याच्यावर अनुरक्त झाली, हें पाहून तिच्या सखीनें काढलेले उद्गार. किंवा, नायकाच्या कामकलाचातुर्याची दूतीनें केलेली शिफारस. पीतांबर सांगतो: " गौः स्वर्गस्तत्पाति गोपो धार्मिकस्तेन तथा परिमलनं विमर्दोऽभ्यासोऽर्याद् धर्मे कृतो यथा सुखेन स्वर्गलाभो भवतीति धर्मः । "

## ६३८ तांबी : 638. Live Long.

धवलो जिअइ तुह कए, धवलस्स कए जिअन्ति गिट्ठीओ ।
जिअ तम्बे ! अम्ह वि जीविएण गोट्ठं तुमाअत्तम् ॥३८॥

[ धवलो जीवति तव कृते धवलस्य कृते जीवति गृष्टयः ।
जीव हे गौः अस्माकमपि जीवितेन गोष्ठं त्वदायत्तम् ॥ ]

ढवळा वैल जगतो तो तुझ्यासाठीं आणि प्रथम व्यालेली गाय त्याच्यासाठीं. तांबी, तू जिवत राहा; कारण आमचें व गोठ्याचें जीवन तुझ्यावर अवलंबून आहे.

● त्याच्यावर माझें प्रेम आहे आणि त्याचें तुझ्यावर, हें तुझें केवढें भाग्य! त्याच्या विरहामुळें आमची दुर्दशा झालेली आहे. आमची अवस्था कांहीही होवो, आम्ही मेलों तरी चालेल, तूं जिवंत राहा; आम्ही तुला

१. ताम्रे.

अनिष्ट चिंतीत नाहीं; कारण तुझ्यावर त्याचें व त्याच्यावर आमचें जीवन अवलंबून आहे. 'धवलो गवि वृषश्रेष्ठे पुमान्।' इति, 'अथ गृष्टिः सकृत्प्रसूतगवि' इति च मेदिनी। पीतांबर सागतोः 'परेषामुपकाराय जीवनमपि न गणनीयमिति नीतिः।'

## ६३९ मधूकः    639. Florescence.

अग्घाइ, छिवइ, चुम्बइ, ठेवइ, हिअअम्मि जणिअरोमञ्चो।
जाआकवोलसरिसं पेच्छइ! पहिओ महुअपुप्फम् ॥३९॥

[आजिघ्रति स्पृशति चुम्बति स्थापयति हृदये जनितरोमाञ्चः
जायाकपोलसदृशं पश्यत पथिको मधूकपुष्पम् ॥]

पहा, वाटसरू मधूक पुष्पाचा वास घेत आहे; त्याला स्पर्श करीत आहे; त्याचें चुंबन घेत आहे; तें आपल्या हृदयावर ठेवून रोमाञ्चित होत आहे; कारण मधूक पुष्पाच्या दर्शनानें त्याला त्याच्या पत्नीच्या गुबगुबीत गालाची आठवण झाली आहे.

● प्रेमामुळें सुंदर वस्तूंचे ठायीं प्रियेचें सादृश्य दिसतें. अलंकारकौस्तुभांत दीपक अलंकाराचें उदाहरण.

## ६४० क्षात:    640- Mountain Stream.

उअ! ओज्झिज्जइ मोहं भुअंगकित्तीअ कडअलग्गाइ।
ओज्झरधारामइलुएण मसिं वणगएण ॥४०॥

[पश्यार्द्रीक्रियते माघ भुजङ्गकृत्ती कटकलग्नायाम्।
निर्झरधाराभ्रजालुकेन शर्वे घनगजेन ॥]

१. अग्घिज्जइ, उज्झिहाइ, ओज्झिज्जइ. २. कन्तीएँ. ३. अर्द्यते, प्रस्फुते.

पहा, कड्याला चिकटून लोंबकळणारी सापाची कात ही निर्झराची धार असावी अशा समजुतीनें ( उन्हामुळें तापलेला ) हत्ती तींवर आपलें गण्डस्थळ टेंकून तें ओलें करण्याचा प्रयत्न करीत आहे.

● माध्यान्हाभिसारिकेची उक्ति. कीं अन्यत्र गेलेल्या नायिकेनें नदी-कांठच्या कातळावर काढून ठेवलेल्या ओलसर कञ्चुकावर निराश व संतप्त भुजङ्ग मस्तक टेंकीत आहे !

## ६४१ कोठें कमला, कोठें कवठी ! 641. Bad Exchange.

कमलं मुअन्त महुअर पिक्ककइत्थाणँ गन्धलोहेण ।
आलेक्खलड्डुअं पामरो व्व छिविऊण जाणिहिसि ॥४१॥

[ कमलं मुञ्चन्मधुकर पक्वकपित्थानां गन्धलोभेन ।
आलेख्यलड्डुकं पामर इव स्पृष्ट्वा ज्ञास्यसि ॥ ]

[1] मधुकर—पिकलेल्या कवठाच्या घमघमाटावर लुब्ध होऊन तूं कमलाला सोडलें आहेस. चित्रांतला लाडू खरा नसतो, हें त्याला हात लावून पाहीपर्यंत मूर्खाला समजत नाहीं; त्याचप्रमाणें प्रत्यक्ष स्पर्शानंतरच तुला ( कमळ व कवठ ) यांतला फरक समजून येईल.

● विदग्ध व गुणवान् नायिकेला सोडून निर्गुण व हीन पण बहराला आलेल्या अन्यसाधारणीकडे जाऊं इच्छिणाऱ्या अधम नायकाचा निषेध. कोमल कमलाचा मंद व मधुर सुगंध व कठीण कवठाचा कर्कश दर्प यांमधून निवड करणें विदग्धाला अवघड नाहीं; पण उधाणावर आलेल्या अधीराला उत्तम व अधम यामधला फरक अनुभवानंतरच्या पश्चात्तापापर्यंत कसा समजणार ? तुलनेसाठीं पहा:—' इह रूपमात्रसारे चित्रगते कनककह्लारे । न रसो नापि च गन्धो मधुकरबंधो वृथा भ्रमसि । '

१. दरपिक्क

६४२ मंगलाष्टक : 642. Wedding Song.

गिज्जन्ते मङ्गलगाइआहिँ वरगोत्तदिण्णअण्णाए ।
सोउं व णिग्गओ, उअह ! होन्तवहुआइ रोमञ्चो ॥४२॥

[ गीयमाने मङ्गलगायिकाभिर्वरगोत्रदत्तकर्णाया ।
श्रोतुमिव निर्गत: पश्यत भविष्यद्वधूकाया रोमाञ्चः ॥ ]

लग्नाचे वेळीं गायिका मंगल गीतें गात आहेत आणि जणू त्यामध्यें होणारा पतीच्या नावाचा उल्लेख ऐकण्याकरताच नवरमुलीच्या अंगावर रोमाञ्च उत्सुकतेनें उभे ठाकले आहेत.

● तिला तें नाव माहीत होतेंच, त्याचा पुन पुनरुच्चार ऐकण्याला ती उत्सुक होती. तिला तें नाव माहीत नसण्याचाही संभव आहे. तसें असलें तर तें जाणण्याची तिला उत्कण्ठा होती

६४३ बालव्यभिचारिणी : 643 Scandal.

मण्णे आअण्णन्ता आसण्णविवाहमङ्गलुग्गाइम् ।
तेहिँ जुअणेहिँ समं हसन्ति म वेअसकुडङ्गा ॥४३॥

[ मन्ये आकर्णयन्त आसन्नविवाहमङ्गलोद्गीतम् ।
तैर्युवभि सम हसन्ति मां वेतसनिकुञ्जा ॥ ]

माझ्या विवाहाचा दिवस जवळ आला आहे मैत्रिणी विवाहमङ्गल-गीतें गात आहेत, वेळूच्या वनांतील निकुञ्ज व ( तेथें मी ज्याच्याबरोबर क्रीडा केल्या ) ते तरुण मला हसत आहेत.

[1] मण्डङ्गीअ

● कुब्जावर डंवरलेलीं पांढरीं फुलें पाहून तीं हंसत आहेत असें तिला वाटलें. संकेतस्थानांना स्मरणशक्ति व वाचा आली व तीं आपल्या आठवणी सांगू लागलीं तर केवढा अनर्थ होईल ?

## ६४४ चतुर्थीमङ्गलः 644. Tears of Separation.

उअगअचउत्थिमङ्गलहोन्तविओअसविसेसलग्गेहिं ।
तीअ वरस्स अ सेअंसुएहिँ रुण्णं व हत्थेहिं ॥४४॥

[ उपगतचतुर्थीमङ्गलभविष्यद्वियोगसविशेषलग्नाभ्याम् ।
तस्या वरस्य च स्वेदाश्रुभी रुदितमिव हस्ताभ्याम् ॥ ]

चतुर्थीमङ्गलाचे वेळीं देवकार्य करतांना लवकरच होणाऱ्या वियोगाच्या कल्पनेनें वधूवरांनीं परस्परांचे हात विशेष घट्ट धरले; तेव्हां दोघांचेही हात घामानें ओले झाले; जणूं भावी विरहाचे भीतीनें ते अश्रु ढाळूं लागले.

## ६४५ नववधूः 645. Mystery.

ण अ दिट्ठिं णेइ, मुहं ण अ छिविउं देइ, णालवइ किं पि ।
तह वि हु किं पि रहस्सं णववहुसङ्गो पिओ होइ ॥४५॥

[ न च दृष्टिं नयति मुखं न च स्प्रष्टुं ददाति नालपति किमपि ।
तथापि खलु किमपि रहस्यं नववधूसंङ्गः प्रियो भवति ॥ ]

डोळ्याला डोळा भिडवीत नाहीं, मुखाला हात लावू देत नाहीं आणि शब्दही बोलत नाहीं. तरीही नववधूच्या समागमांत असें कांहीं रहस्य असतें कीं त्यामुळें तो प्रिय वाटतो.

१. पश्य. २. सार्थः

● बाल्य व यौवन, अज्ञान व ज्ञान, अपेक्षा व अनुभव यांच्या सीमारेषावर पदार्पण करीत असलेल्या नववधूवराच्या प्रथमसमागमातलें सौख्य व रहस्य अनिर्वचनीय असतें. पाडाला आलेल्या आम्र्यात आंबट-पणाची छटा असते. ही त्याची खोडी व गोडीही !

## ६४६ डावपेंच : 646. Flank Movement

अलिअपसुत्तवलन्तम्मि णेववरे, णवबहूअ वेवन्तो ।
संवेल्लिओरुसजमिअवत्थगण्ठिं गओ हत्थो ॥४६॥
[ अलीकप्रसुप्तवलमाने नववरे नववध्वा वेपमान ।
संवेष्टितोरुसयमितवस्त्रग्रन्थि गतो हस्त. ॥ ]

नववर झोंपेचें ढोंग करून बिछान्यावर पडला होता व नववधू त्याच्या शेजारीं ( अंग चोरून ) पडली होती ( जणू झोंपेंतच ) तो तिच्या बाजूला कुशीवर वळला. तेव्हा तिनें आपलें नेसतें वस्त्र मांड्यामोंवतीं घट्ट आवळून घेतलें आणि थरकापणारा हात निऱ्याच्या गाठींवर घट्ट धरून ठेवला.

● उत्कण्ठा व भीति, लज्जा व रति यांचें मधुर मिश्रण. बुडत्याला काडीचाही आधार, तसा नववधूला निरगाठीचा !

## ६४७ आलिंगन : 647. Embrace

पुच्छिज्जन्ती ण भणइ, गहिआ पप्फुरइ, चुम्बिआ रुअइ ।
तुण्हिक्का णववहुआ कआवराहेण उवऊढा ॥४७॥

१ णवरि. २ कम्पितोरु, सवलितोरु ३ पडिउच्छिआ पडिउत्थिआ, परिपुछिआ ण जम्पइ ४ प्फुरइ, विप्फुरइ ५ रुअइ ६ तुण्णिका ७ दइएण.

[ पृच्छमाना न भणति गृहीत्वा प्रस्फुरति चुम्बिता रोदिती ।
तूष्णीका नववधूः कृतापराधेनोपगूढा ॥ ]

तो अपराधी होता व नववधू स्तब्ध होती. काहीं विचारलें तर बोलेना, धरली तेव्हा उसळली, चुम्बन घेतलें तेव्हा रडूं लागली. मग त्यानें तिला जबरदस्तीनें बाहुपाशात घेतलें.

● तो अपराधी होता, हें तिला समजलें होतें; हें तिला समजलें आहे, हें त्याला उमजलें होतें; म्हणून तो तिचा अनुनय करीत होता. ती तोंड फिरवून बसली होती. मान फिरवीत होती, अंग घुसळीत होती. त्यानें तिला बलात्कारानें बाहुपाशात घेतलें, तेव्हा ती शांत झाली. जणूं तिला हें नकोच होतें ! मुग्धेच्या तरल स्वभावाची माहिती नसलेल्या व तिच्या संमतीसाठीं अडलेल्या नायकाला दूतीचा उपदेश, कीं अशा प्रसंगीं थोडी-बहुत धिंगामस्ती केल्याशिवाय चालतच नाहीं.

## ६४८ एकच तरुण : 648. Centre of Attraction.

तत्तो च्चिअ होन्ति कहा, विअसान्ति तहिं, तहिं समप्पेन्ति ।
किं, मण्णे, माउच्छा ! एक्कजुआणो इमो गामो ? ॥४८॥

[ ततै एव भवन्ति कथा विकसन्ति तत्रै तत्र समाप्यते ।
किं मन्ये मातृष्वसः एकयुवकोऽय ग्राम ॥ ]

मावशी, त्या गावात जेथें जावें तेथें एकाच तरुणाबद्दल चर्चा चालू असते आरंभीं त्याच्या गोष्टी, विस्तार त्याच्या चरित्राचा व शेवटही ह्याच विषयात. या गावात हा एकच एक तरुण आहे कीं काय !

---

१. णिंति. णेंति २. विअसति. ३ समत्याति ४ माउच्छा. ५ तत्रैव निगच्छन्ति ६. निर्याति ७ तत्रैव, तस्मिंस्तस्मिन्समर्प्यन्ते.

● कुग्रामनिंदा नाहीं. गावात हा एकच तरुण आहे असें नाहीं. अनेक तरुण आहेत, पण याच्यासारखा दुसरा कोणी नाहीं, असें अनेकांच्या अनुभवाला आलेलें असल्यामुळें हाच सार्वजनिक चर्चेचा विषय झालेला आहे.

६४९ प्रियवचन :　　649. Subjective.

जाणि वअणाणि अम्हे वि जम्पिओ, ताइँ जम्पइ जणो वि ।
ताइं चिअ तेण पजम्पिआइं हिअअं सुहावेन्ति ॥४९॥

[ यानि वचनानि वयमपि जल्पामस्तानि जल्पति जनोऽपि ।
तान्येव तेन प्रजल्पितानि हृदयं सुखयन्ति ॥ ]

आम्ही ज्या (सामान्य) गोष्टी बोलतों व लोकही ज्याचें (फटाळवाणें) चर्वितचर्वण करतात त्याच गोष्टी त्याच्या मुखातून सशब्द झाल्या कीं ( त्या असामान्य वाटतात व ) जीव कसा संतुष्ट होतो.

● वल्लभवचनाच्या वैशिष्ट्याचें विरहोत्कण्ठितेनें केलेलें अनुभवसिद्ध विवरण

६५० प्रियजन :　　650. Pleasure.

सव्वाअरेण मग्गह पिअं जणं जइ सुहेण वो कज्जम् ।
जं जस्स हिअअदइअं तं ण सुहं जं तहिं णत्थि ॥५०॥

[ सर्वादरेण मृगयध्व प्रिय जनं यदि सुखेन य कार्यम् ।
यद्यस्य हृदयदयितं तन्न सुखं यत्तेत्र नास्ति ॥ ]

१ जाइं　२ साहाएति　३ तत्थ सुहं एत्तय ण पि　४ सव्वादरेण
५ मार्गयत　६ यत्र तत्र, यत्तास्मिन्

( सपूर्ण ) सुख हवें असेल तर मनाजोगें माणूस आदरपूर्वक शोधून काढलें पाहिजे. आवडत्या माणसापासून मिळणार नाहीं असें सुखच नाहीं.

● सुख बाह्योपचारावर नव्हे, अंतःकरणाच्या प्रतिक्रियेवर अवलंबून असतें. तुझ्या अंगीं गुण आहेत; पण घरात त्याचें चीज होत नाहीं. प्रिय-जनाचा सादर स्वीकार कर, असें दूतीचें प्रोत्साहन.

## ६५१ लाडकी : 651. Favourite.

दीसन्तो दिट्ठिसुओ चिन्तिज्जन्तो मणवल्लहो, अत्ता ! ।
उल्लावन्तो सुइसुहो पिओ जणो णिच्चरमणिज्जो ॥ ५१ ॥

[ दृश्यमानो दृष्टिसुखश्चिन्त्यमानो मनोवल्लभः श्वश्रु !
उल्लप्यमानः श्रुतिसुखः प्रियो जनो नित्यरमणीयः ॥ ]

आवडतें माणूस दिसलें कीं दृष्टीला सुख होतें, त्याचें चिंतन केलें कीं मनाला आनंद होतो, त्याचें बोलणें ऐकलें कीं श्रवणसौख्य मिळतें. सासूबाई, प्रियजन नेहमींच रमणीय असतात.

● सुनेनें प्रसाधन केलेलें नव्हतें नवरा घरीं येताच ती तशीच त्याच्या खोलीकडे निघाली. सुनेच्या या वेंधळेपणामुळें सासूबाई रागावल्या. त्याना सुनेचें उत्तर मी त्यांची लाडकी आहे, कशीही असलें तरी त्यांना प्रिय आहे.

## ६५२ पोटार्थी : 652 Dethroned.

ठाणब्भट्ठा परिगलिअपीणआ उण्णईअ परिचत्ता ।
अम्हे उण ठेरपओहर व्व उअरे च्चिअ णिसण्णा ॥ ५२ ॥

१. भगिनि.

[ स्थानभ्रष्टाः परिगलितपीनत्वा उन्नत्या परित्यक्ताः ।
वयं पुनः स्थविरापयोधरा इवोदर एव निपण्णाः ॥ ]

आम्हीं स्थानभ्रष्ट झालों, आमची पुष्टि नष्ट झाली, उन्नतीनें आमचा त्याग केला. म्हातारीच्या स्तनांप्रमाणें आम्ही आतां पोटावर पडलों आहोंत.

● स्थानभ्रष्ट व माननष्ट व्यक्ति पोटासाठीं लाचार होते. मुजङ्गाचें धन संपल्यानंतर वेश्येनें त्याला अर्धचंद्र दिला. त्यानें पुन्हां द्रव्य मिळविलें व तो पुन्हा त्याच घरीं आला; पण आता तो तिच्या कन्येकडे आला होता. म्हणून म्हातारी कुंटीण म्हणते, ' आमचे यौवन ढळलें. आतां तुम्ही आमच्याकडे कशाला पहाल ! '

## ६५३ दिनपतिः 653. Day-Lord.

पच्चूमागअ ! रञ्जिअदेह ! पिआलोअ ! लोअणाणन्द ! ।
अण्णत्त खविअसव्वरि ! णहभूसण ! दिणवइ ! णमो दे ॥ ५२ ॥

[ प्रत्यूषागत रक्तदेह प्रियालोक लोचनानन्द ।
अन्यत्रक्षपितशर्वरीक नभोभूषण दिनपते नमस्ते ॥ ]

हे दिनपति सूर्या—तूं पहाटे उगवतोस; तुझा देह कसा लालबुन्द आहे; तुझें दर्शन अंतःकरणाला प्रिय व दृष्टीला आनंददायक वाटतें; तूं रात्र इतरत्र घालविनोस, तूं नभाचें भूषण आहेस; तुला नमस्कार असो.

● ध्वनिः हे दिनपति, पण दिवसा घरीं अरण्याच्या नवऱ्या—तूं सकाळीं घरीं उगवतोस, येथील लोकां इतरत्र उदयिकेच्या रंगाची चिन्हें तुझ्या देहावर बघतात, तूं पण दिवसांत सौंदर्य आहेस, तुझ्याजवळून आम्हांला केवळ

१ रत्तोअ, पल्लोअ २ णमिअ ३ नवरागरक्त ४. प्रेक्षणीय.
५ नणभूसन.

नेत्रसुखच प्राप्त होतें; तूं सान्या रात्री अन्य स्त्रियांच्या संगतींत घालवितोस; तूं अन्य स्त्रियांना भूषणें देतोस, किंवा त्यांनीं अर्पण केलेलीं नखक्षतादि भूषणें धारण करतोस. हे दिनपति, तुला दुरून नमस्कार. तुमचा आमचा संबंध फक्त नमस्कार करण्यापुरता. सरस्वतीकण्ठाभरणांत खण्डिता नायिकेचें उदाहरण.

६५४ पालथा घडा : 654. Inversion.

विवरीअसुरअ‍ेहेल ! पुच्छसि मह कीस गब्भसंभूइम् ? ।
ओअत्ते कुम्भमुहे जललवकणिआ वि किं ठाइ ? ॥ ५४ ॥
[ विपरीतसुरतलम्पट पृच्छसि मम किमिति गर्भसंभूतिम् ।
अपवृत्ते कुम्भमुखे जललवकणिकापि किं तिष्ठति ॥ ]

तुम्हांला विपरीत रताची हौस आहे. मग गर्भसंभव झाला का, असें मला कां विचारतां ! पालथ्या घड्यांत थेंबभर तरी पाणी राहील का ?

६५५ तरुण गोपी : 655. Suppression.

अच्चासण्णविवाहे समं जसोआइ तरुणगोवीहिं ।
वड्ढन्ते महुमहणे संबन्धा णिण्हुविज्जन्ति ॥ ५५ ॥
[ अत्यासन्नविवाहे समं यशोदया तरुणगोपीभिः ।
वर्धमाने मधुमथने संबन्धा निन्हूयन्ते ॥ ]

कृष्ण मोठा झाला व त्याच्या विवाहाचा विचार सुरू झाला तेव्हां तरुण गोपी यशोदेशीं असलेलें आपलें नातें लपवू लागल्या.

१. लेहड. २. उपडे ३. लुब्धक. ४. अवनते, अवलम्बिते. ५. चतुर.

● कारण कृष्ण सर्वांनाच हवा होता. निकटसंबंधाचे अभावीं विवाह-संबंध निष्प्रतिबन्ध व्हावा म्हणून गोपी नातीं लपवूं लागल्या; कीं कृष्णाशीं असलेला आपला संबंध त्या यशोदेपासून लपवूं लागल्या?

## ६५६ भग्नमनोरथ : 656. Erasure.

ज जं आलिहइ मणो आसावट्टीहि[१] हिअअफलअम्मि।
तं तं बालो व्व विही णिहुअं हसिऊण पम्हुसइ॥ ५६॥

[ यद्यदालिखति मेन आशावर्तिकाभिर्हृदयफलके।
तत्तद्बाल इव विधिर्निभृतं हसित्वा प्रोञ्छति॥ ]

आशेच्या वर्तिकांनीं हृदयाच्या फलकावर जीं जीं चित्रें मी नाना रंगांत रंगवलीं तीं तीं एकाद्या खट्याळ मुलाप्रमाणें खदखदां हंसून दैवानें निष्ठुरपणें एकाएकीं पुसून टाकलीं.

● वर्तिका = ब्रश. मुळांत वर्तिका हा शब्द अनेकवचनी असल्यामुळें चित्रें अनेकरंगी असलीं पाहिजेत.

## ६५७ पौर्णिमा : 657. Humiliation.

अणुहुत्तो करफंसो सअलअलापुण्ण[२]! पुण्णदिअहम्मि।
बीआसङ्गकिसङ्गअ! एण्हिं तुह वन्दिमो चलणे॥ ५७॥

[ अनुभूतः करस्पर्शः सकलकलापूर्ण पूर्णदिवसे।
द्वितीयासङ्गकृशाङ्ग इदानीं तव वन्दामहे चरणौ॥ ]

सकलकलापूर्ण चंद्रा—पौर्णिमेला तुझ्या करांचा स्पर्श मीं अनुभविला. आतां द्वितीयेमुळें तूं कृश झाला आहेस. आतां तुझ्या चरणांना मी वंदन करतें.

१. वंतीहिं, वत्तीए, वत्तीहिं. २. अन. ३. पल्लिभिः, वृत्तिभिः ४. प्रमुषति.

● चंद्राच्या अंगीं आहेत त्यांहून अधिक कला प्रियकराचे अंगीं आहेत. पूर्ण दिवस = पौर्णिमा किंवा शुभ दिवस = विवाहाचा मंगल दिवस. द्वितीया = तिथि किंवा सपत्नी. "सकलकलापूर्ण प्रियकरा–विवाहाच्या मंगल दिवशीं मीं तुझ्या कराचा स्पर्श अनुभविला. अन्य स्त्रीच्या संगामुळें तूं आतां कृश झाला आहेस. आता तुझ्या चरणांना मी वंदन करतें."

६५८ भ्रमंति : 658. Nomadic.

दूरन्तरिए वि पिए कह वि णिअत्ताइँ मज्झ णअणाइँ ।
हिअअं उण तेण समं अज्ज वि अणिवारिअं भमइ ॥ ५८ ॥

[ दूरान्तरेऽपि प्रिये कथमपि निवर्तिते मम नयने ।
हृदयं पुनस्तेन सममद्याप्यनिवारितं भ्रमति ॥ ]

प्रियकर दूर गेला तेव्हां मी मोठ्या कष्टानें त्याला अनुसरणारी माझी दृष्टि परतवली; पण माझें हृदय मला आवरलें नाहीं, तें अद्याप त्याच्या संगें भटकत आहे.

● दृष्टीला अंतराची व लज्जेची मर्यादा असते. हृदय मात्र अदृष्टाचेंही बन्धन जुमानीत नाहीं.

६५९ मग ? 659. What Then ?

तस्स कहाकण्टइए ! सद्दाअण्णणसमोसरिअकोवे ! ।
समुहालोअणकम्पिरि ! उवऊढा किं पवज्जिहिसि? ॥५९॥

[ तस्य कथाकण्टकिते शब्दाकर्णनसमपसृतकोपे ।
संमुखालोकनकम्पनशीले उपगूढा किं प्रपत्स्यसे ॥ ]

१. कण्डइए, कण्डइए. २. विलज्जिहिसि. ३. वा लज्जिष्यसे, विलायिष्यसि.

त्याची नुसती गोष्ट काढली कीं तुझें अंग रोमांचित होतें, त्याचा शब्द कानीं आला कीं तुझा कोप नाहींसा होतो. त्याला सन्मुख पाहिलें कीं तुझें सर्वांग सकंप होतें. मग त्यानें प्रत्यक्ष आलिंगन दिल्यावर काय होईल ?

## ६६० आधार : 660 Support.

भरणमिअणीलसाहग्गखलिअचलणद्धविहुअवक्खउडा ।
तरुसिहरेसु विहंगा कह कह वि लहन्ति संठाणम् ॥ ६० ॥
[ भरनमितनीलशाखाग्रस्खलितचरणार्धविधुतपक्षपुटा ।
तरुशिखरेषु विहगा: कथं कथमपि लभन्ते संस्थानम् ॥ ]

फळांच्या भारानें वाकलेल्या कृष्णवर्ण ओळसर फांद्यांच्या टोंकावरून पायांची अर्धी घसरू लागलीं म्हणजे पक्षी पंख फडफडवून स्वतःला सावरून धरतात आणि झाडाच्या शिखरावर कष्टानें कसाबसा आधार मिळवतात.

● संध्याकाळ झाली; त्या झाडाजवळ संकेत ठरविला आहे. त्वरित तयार हो व चल, अशी दूतीची सूचना.

## ६६१ नैसर्गिक : 661. Instinct.

अंहरमहुपाण धारिल्लिआइं जं च रमिओ सि सम्मिमेमम् ।
अमइ अलज्जिरि पहुसिविरिरि त्ति मा णाइ ! मण्णुहिसि ॥६१॥

१. पल्लाण, धारोव २. विहुअपक्खपुडा ३. पल्लाम. ४. अथवा
५. पोरीहआर ६. मण्णिहिसि

[ अधरमधुपानलालसया यच्च रमितोऽसि सविशेषम् ।
असती अलज्जाशीला बहुशिक्षितेति मा नाथ मंस्थाः ॥ ]

नाथ, अधररसाचें पान करण्याच्या लालसेनें मी तुम्हांला आवेशानें व विशेष प्रकारांनीं रमविलें; म्हणून मी स्वैरिणी किंवा निर्लज्ज आहे अथवा निढावलेली आहे असें समजू नका

● बहुशिक्षिता : पुष्कळ शिकलेली; येथें व्यभिचार करून कामशास्त्राचें सप्रयोग शिक्षण घेतलेली. सुशिक्षिता ही व्यभिचारणी असलीच पाहिजे हा सिद्धान्त सनातन आहे, वाटतो तितका अर्वाचीन नाहीं. जें अकृत्रिम व उत्कट असतें तें पूर्णतया आनदप्रद आणि सशास्त्रही असतें. प्रीतीचा निष्कपट, नि संकाच व नैसर्गिक आविष्कार हाच सशास्त्र शृंगारविलास. तो अंतः-प्रेरणेनें व्यक्त होतो. हें शिकावें लागत नाहीं, शिकून येत नाहीं. या गाथेचा पीताम्बराचा निष्कर्ष पाहा: " धार्मिकेण मधुपानादि न विधेयमिति धर्मः " 'अथवा' हा पाठभेद स्वीकारला तर या गाथेंत मद्यपानाचा निषेध केलेला आहे असेंही अनुमान काढता येईल.

## ६६२ इमानी कुत्रा : 662 Training

खाणेण अ पाणेण अ तह गहिओ मण्डलो अडअणाए ।
जह जारं अहिणन्दइ भुक्कइ घरसामिए एन्ते ॥ ६२ ॥

[ खादनेन च पानेन च तथा गृहीतो मण्डलोऽसत्या ।
यथा जारमभिनन्दति भुक्कति गृहस्वामिन्येति[2] ॥ ]

खायला प्यायला घालून स्वैरिणीनें कुत्रा असा ताब्यात ठेवला होता कीं तो घरधन्यावर भुंकतो आणि जाराचें स्वागत करतो.

---

१. साहित्यमीमांसेंतील पाठ रक्खामि सुअण येण अत्ता णिघेहि खानफाणेहिं । बकइ तिणेपिळिए रत्तिअक्लिब्लविअसुवतो ॥ २. आगते, आयाति

● कुत्रे भुंकतें तें आगंतुकाला भिवविण्यासाठीं किंवा अनाहूताच्या आगमनाची वर्दी देण्यासाठीं. भुंकणारें कुत्रें सहसा चावत नाहीं म्हणतात, पण यजमानावर भुंकणारें कुत्रें तिन्हाइताला डसल्यावाचून रहात नाहीं; म्हणून भुंकऱ्या कुत्र्यापुढें नेहमीं तुकडा टाकावा.

## ६६३ दुर्बल : 663. Exhaustion.

कण्डुन्तेण अकण्डं पल्लीमज्झम्मि विअडकोअण्डम् ।
पइमरणाहिँ वि अहिअं वाहेण रुआविआ अत्ता ॥ ६३ ॥
[ कण्डूयता अकाण्डे पल्लीमध्ये विकटकोदण्डम् ।
पतिमरणादप्यधिकं व्याधेन रोदिता श्वश्रूः ॥ ]

पित्याचें प्रचंड धनुष्य आपल्याला पेलावें म्हणून व्याध त्याचा दण्ड सर्वांसमक्ष तासू लागला; हें पाहून नवऱ्याच्या मृत्यूच्या वेळेपेक्षाही सासूबाई जास्त रडल्या.

● पुत्राच्या दौर्बल्यामुळें घराण्याची कीर्ति नष्ट होणार म्हणून व्याधाच्या मातेला दुःख झालें. काहीं टीकाकार सांगतात, हे अश्रू त्याच्या सासूचे होते आणि ते आनंदाश्रु होते, कारण त्याचें दौर्बल्य हा आपल्या मुलीनें त्याला पुरता फाजील केल्याचा पुरावा होय असें तिला वाटलें. कोणी सांगतात, हे त्याच्या सासूचे दुःखाश्रु होते; कारण व्याध अन्य स्त्रीच्या नादीं लागल्यामुळें दुबळा झाला आहे हें तिच्या ध्यानीं आलें होतें.

## ६६४ नखरा : 664. Coquetry.

अम्हे उज्जुअसीला, पिओ वि पिअसहि ! विआरपरिओसो ।
ण हु अण्णा का वि गई, वाहोहा कहँ पुसिज्जन्तु ? ॥ ६४ ॥

१. कडुतेन, कडुतेण. २. आश्चर्यता, दर्पता च दर्पं. ३. माता.

[ वयं ऋजुकशीलाः प्रियोऽपि प्रियसखि विकारपरितोषः।
न खल्वन्या कापि गतिर्बाष्पौघाः कथं प्रोञ्छ्यन्ताम् ॥ ]

आम्ही बाई आपल्या साध्याभोळ्या आहोंत, आणि प्रियकराला तर नखरा आवडतो. प्रियसखि, आतां आम्हांला रडण्याशिवाय दुसरी गति नाहीं; मग अश्रु पुसायचे कशाला ?

● तुझे मुख अश्रूंनी मलिन झालें आहे. जरा डोळे पुसशील कीं नाहीं ! या सखीच्या प्रश्नाला कुलस्त्रीचें उत्तर. अनुरंजनाचें कौशल्य असतीचे अंगीं नैसर्गिक असतें. संसार सुखी करण्याला स्त्रियांचें सतीत्व नेहमींच पुरें पडत नाहीं. हुंदका ऐकून पति परतला नाहीं तर त्याला पैंजणाचा झंकार ऐकवला पाहिजे ! पण हें सारें प्राचीन वा मध्ययुगीन, सनातनी वा सरंजामी !

६६५ हृदयरंजनः 665. Tint.

धवलो सि जइ वि सुन्दर ! तह वि तुए मज्झ रञ्जिअं हिअअम् ।
राअभरिए वि हिअए सुहअ ! णिहित्तो ण रत्तो सि ॥ ६५ ॥

[ धवलोऽसि यद्यपि सुन्दर तथापि त्वया मम रञ्जितं हृदयम् ।
रागभृतेऽपि हृदये सुभग निहितो न रक्तोऽसि ॥ ]

सुंदर व भाग्यवंत प्रियकरा, तूं धवल ( श्रेष्ठ ) आहेस, तरी तूं माझें हृदय रंगविलेंस; माझ्या आरक्त ( अनुरागपूर्ण ) हृदयांत मी तुझी स्थापना केली, तरी तूं मात्र आरक्त झाला नाहींस.

● प्राकृतांत 'धवल' या शब्दाचा अर्थ 'वृषभ' असाही आहे. प्रियकरा, सुंदर असलास तरी तूं शुद्ध नंदीबैल आहेस; माझ्या गुणाची तुला चव नाहीं. अलंकाररत्नाकरात तद्गुण अलंकाराचें उदाहरणः " अन्यधर्मस्वीकार-स्तद्गुणः। " अलंकारसर्वस्वात व काव्यप्रकाशांत अतद्गुणाचें उदाहरणः

१. उज्ज्वलशीलाः २. विकारविद्वेषी, विहारपरितोष. ३. प्रसार्यन्ते.

स्वमुत्सृज्य गुणं योगादत्युज्ज्वलगुणस्य यत्। वस्तु तद्गुणतामेति भण्यते स तु तद्गुणः ॥ १३७ ॥ तद्रूपाननहारश्चेदस्य तत्स्यादतद्गुणः। " अन्य वस्तूच्या गुणांचें ग्रहण केलें नाहीं म्हणून येथें हा अलंकार आहे. काव्यानुशासनात विरोधाचें उदाहरणः " अर्थानां विरोधाभासो विरोधः। (६·१२). " धवल प्रियकरानें तिचें हृदय आरक्त केलें आणि तिच्या रागभृत हृदयात राहूनही तो आरक्त झाला नाहीं, म्हणून विरोध.

## ६६६ प्रसाधनः 666. Essence of Blossom.

चञ्चुपुडाहअविअलिअसहआररसेण सित्तदेहस्स।
कीरस्स मग्गलग्गं गन्धन्धं भमइ भमरउलम् ॥ ६६ ॥

[चञ्चुपुटाहतविगलितसहकाररसेन सिक्तदेहस्य।
कीरस्य मार्गलग्नं गन्धान्धं भ्रमति भ्रमरकुलम् ॥]

पोपटानें चोंच मारल्यामुळें आंब्याच्या मोहोरांतून रस गळूं लागला व तो त्याच्या अंगावर पडल्यामुळें त्याचा देह सुगंधित झाला. पोपट उडूं लागला तेव्हां त्या गंधानें अंध झालेला भ्रमरांचा समूह त्याच्या मागोमाग भटकूं लागला.

● भ्रमर निसर्गतःच भ्रमणशील असतात. भ्रमरवृत्तीच्या पुरुषांचें प्रेम अस्थिर असतें. ते भरकण्याला मुलतात. धामान्धांना गुणावगुणांचा विवेक नसतो. पाठलाग निष्फल व निरर्थक असतो. प्रसाधनामुळें उज्ज्वल दिसणाऱ्या गुणहीनेला अनुसरणाऱ्या कामी पुरुषाला अनुलक्षून काढलेले उपहासोद्गार.

१. रसा. २. भगल.

## ६६७ रातांधळें : 667. Night Blindness

**एत्थ णिमज्जइ अत्ता, एत्थ अहं, एत्थ परिअणो सअलो ।**
**पन्थिअ ! रत्तीअन्धअ ! मा महँ सअणे णिमज्जिहिसि ।। ६७।।**

[ अत्र निमज्जति श्वश्रूरत्राहमत्र परिजनः सकलः ।
पथिक राज्यन्धक मा मम शयने निमङ्क्ष्यसि ॥ ]

• अहो पाहुणे, तुम्हांला रातांधळें आहे ना ! दिवसा उजेडीं नीट पाहून ठेवा. तेथें आत्याबाई झोपतात; मी येथें आणि नोकरमाणसें तिकडे. रात्रीं उठलांत तर वाट चुकून सरळ माझ्या बिछान्याकडे यायचेत, म्हणून आतांच सांगून ठेवतें.

[ ● रात्रीसाठीं निवाऱ्याला आलेल्या पथिकाचें नशीब उघडलें. निमंत्रण स्पष्ट आहे. सूचनेंतील रहस्य गुप्त राहावें किंवा व्यक्त झालें तर बचावाला सबब मोकळी असावी म्हणून त्याच्यावर रातांधळें लादण्यांत आलें असावें. सासू आहे खरी पण ती म्हातारी व बहिरी; दिवसभर काम केल्यामुळें थकलेलीं नोकरमाणसें डाराडूर झोंपतील, त्याची काळजी करण्याचें कारण नाहीं; घरात दुसरीं कोणीहि माणसें नाहींत; संकोच करूं नको, घाई करूं नको, रात्र आपलीच आहे ! वाच्य अर्थ निषेधपर व व्यङ्ग्य अर्थ प्रोत्साहनपर, याचें उदाहरण म्हणून ही गाथा ध्वन्यालोकात ऊध्दृत केलेली आहे. तेथील पाठ थोडा भिन्न ( निर्णयसागर : पृष्ठ २४ ) आहे: ' अत्ता एत्थ णिमज्जइ एत्थ अहं दिअसअं पलोएहि । मा पहिअ रत्तिअंधअ सेज्जाए महँ णिमज्जहिसि ।।' येथें नोकरमाणसाचा अभाव असून स्थळाचा तपशील दिवसा उजेडीं नीट पाहून ठेवण्याची सूचना आहे. गाथेची नायिका प्रोषितपतिका असून निषेधातच उपायाची योजना केलेली आहे. अलंकारमहोदधींत या गाथेंतील व्यङ्ग्यार्थाचें सूक्ष्म पृथक्करण केलेलें असून वक्तृ-बोद्धव्य-योगाचें उदाहरण म्हणून ही गाथा ऊध्दृत केलेली आहे. अलंकाररत्नाकरांत नियम

१ णमज्जइ, णिसज्जइ, णुमज्जइ, णिवसइ. २. रातइंध. ३. सेज्जाए.

अलंकाराचें उदाहरणः ' अन्यनिषेधार्थोऽपि विधिर्नियमः । ' तुलनेसाठीं पद्य ( ध्वन्यालोकः निर्णयसागरः पृ. १२७ ): अत्ता शेतेऽत्र वृद्धा परिणतवयसामग्रणीरत्र तातो । निःशेषागारकर्मश्रमशिथिलतनुः कुम्भदासी तथात्र ॥ अस्मिन्पापाहमेका कतिपयदिवसप्रोषितप्राणनाथा । पान्थायेत्थं कथितमवसरव्याहृतिव्याजपूर्वम् ॥

## ६६८ रवंथ : 668. Rumination.

परिओससुन्दराइं सुरएसु लहन्ति जाइँ सोक्खाइं ।
ताइं च्चिअ उण विरहे खाउग्गिण्णाइँ कीरन्ति ॥ ६८ ॥

[ परितोषसुन्दराणि सुरतेषु लभन्ते यानि सौख्यानि ।
तान्येव पुनर्विरहे खादितोद्गीर्णानि कुर्वन्ति ॥ ]

समाधान मिळाल्यामुळें मनोहर वाटणारीं अशीं जीं सुखें सुरतात स्त्रियाना प्राप्त होतात त्याचीं विरहकाळीं आठवण करून त्या रवंथ करीत असतात.

● 'विदग्ध स्त्रिया विरहात काळ कसा कंठतात ?' या सखीच्या प्रश्नाला नायिकेचें उत्तर. अधाशीपणानें खाल्लेलीं अन्नें पचनीं पडत नाहींत, तीं ओकून पहावीं लागतात, हा काहीं टीकाकाराचा अर्थ मूलानुसार असला तरी कसासाच वाटतो, कारण या ओकाऱ्या गर्भिणीच्या नाहींत. रवंथ ही क्रिया मानवाना अज्ञानें वारतींत करता येत नाहीं हें खरें, पण उपभोगिलेल्या सुखाची आठवण ही मानसिक क्रिया रवंथासारखीच आहे; त्यावरून आपलें मनुष्यत्व सूचित होतें, पशुत्व नव्हे, आणि स्मृतिसुखाहून विदग्ध सुख दुसरें कोणतें आहे ? प्रियजनाच्या सहवासात प्रेमाची ऊर मिळते;

१ गन्धाग्गिण्णिहाइ, दुक्खुग्गिण्णाइ २ कष्टोद्गालितानि, कष्टाग्निनिमानि, ३ गोद्गीर्णानि ४ उपभुक्तनिमानि कीर्यन्ते, भारितोद्गीर्णानि कीर्यन्ते

विरहांत मात्र उद्येसाठीं खांद्यांवरून ओंडक्यांनीं ओझीं वहावीं लागतात. याच अर्थाची आणखी एक गाथा उत्तरार्धांत आहे (क्र.: १००२) ती पहा.

## ६६९ फेंसाचा पुंजका : 669. Foam.

मग्गं च्चिअ अलहन्तो हारो पीणुण्णआणँ थणआणम् ।
उव्विग्गो भमइ उरे जमुणाणइफेणपुञ्जो व्व ॥ ६९ ॥

[ मार्गमिवालभमानो हारः पीनोन्नतयोः स्तनयोः ।
उद्विग्नो भ्रमत्युरसि यमुनानदीफेनपुञ्ज इव ॥ ]

(श्यामलेच्या) उच्च व पुष्ट स्तनांचे मध्यें रीघ न मिळाल्यामुळें उद्विग्न झालेला हार यमुनेच्या पाण्यावरील लाटांवर तरंगत वरखालीं होणाऱ्या फेंसाच्या पुंजक्यासारखा तिच्या वक्षःस्थळावर इतस्ततः रुळत आहे.

● यमुनाजल श्यामल असतें, त्यावर फेनपुञ्ज उठून दिसतो; हा हार मौक्तिकांचा आहे, म्हणून नायिका श्यामा आहे असें गृहीत धरलें आहे. गंगाधर सांगतो, या उद्गारांत स्तनमुखांची श्यामता ध्वनित आहे. पण्डित मथुरानाथ आणखी पुढे जाऊन सांगतात, यामुळें ती उपभोगयोग्य नाहीं असें प्रत्ययास आल्यामुळें नायक उद्विग्न आहे !

## ६७० बीजांकुर : 670. Heredity.

एक्केण वि वडबीअङ्कुरेण सअलवणराइमज्झम्मि ।
तह तेण कओ अप्पा जह सेसदुमा तले तस्स ॥ ७० ॥

१. उव्विअग्गो. २. पूर.

[ एकेनापि वटबीजाङ्कुरेण सकलवनराजिमध्ये।
तथा तेन कृत आत्मा यथा शेषद्रुमास्तले तस्य ॥ ]

वडाचा एकच बीजाङ्कुर, पण त्यानें रानांत असें रूप धारण केलें कीं इतर वृक्षांची कमाल वाढ त्याच्या बुन्ध्याइतकीही होऊं शकली नाहीं.

● जसें बीज तसा अंकुर, जसा अंकुर तसा विस्तार. महावंशप्रभ मूढ तरुणास उद्योगार्थ प्रोत्साहन. तूं एकाकी आहेस असें पाहून तुझ्या प्रतिपक्षीयानीं कितीहि उठावणी केली तरी तुझ्या आनुवंशिक सामर्थ्यापुढें ते निष्प्रभ ठरतील.

## ६७१ दारिद्र्य : 671. Selection.

जे जे गुणिणो, जे जे अ चाइणो, जे विडड्ढविण्णाणा।
दारिद्द! रे विअक्खण! ताणँ तुमं साणुराओ सि ॥ ७१ ॥

[ ये ये गुणिनो ये ये च त्यागिनो ये विदग्धविज्ञानाः।
दारिद्र्य रे विचक्षण तेषां त्वं सानुरागमसि ॥ ]

रे दारिद्र्या, जे जे गुणी, त्यागी व शास्त्रनिपुण त्या त्यांवर तुझें प्रेम असतें; इतका तूं गुणज्ञ व विचक्षण आहेस.

● पीतांबर सागती, कृपण धनिकाच्या अत्यल्प देणगीनें असंतुष्ट झालेल्या गणिकेचे हे उद्वेगोद्गार आहेत. तिनें दरिद्री पण गुणी, सात्त्विक व निपुण नायकाची लक्षणेनें प्रशंसा केली आहे.

## ६७२ चंद्रानना : 672. Digits of the Moon.

जइ कोत्तिओ सि सुन्दर! सअलतिहीचन्ददंसणसुहाणम्।
ता ससिणं मोइज्जन्तकञ्चुअं पेक्खसु मुहं से ॥ ७२ ॥

१. जाइणो. २. विअत्थ, विद्व, विड्ड.

[ यदि कौतुकिकोऽसि सुन्दर सकलतिथिचन्द्रदर्शनसुखानाम् ।
तन्मसृणं मोच्यमानकञ्चुकं प्रेक्षस्व मुख तस्याः ॥ ]

हे सुंदर, चंद्राच्या सर्व कलाचें लागोपाठ दर्शन व्हावें असें कुतूहल असेल तर हळू हळू कचुकी काढीत असलेल्या या स्त्रीच्या मुखाकडे पहा.

● ही कचुकी कुड्त्यासारखी, आगापीछा शिवलेली, डोईवरून ओढून काढण्याजोगी असली पाहिजे, म्हणजे टीकाकार सांगतात त्याप्रमाणें हनुवटीच्या पहिल्या कलेपासून पूर्ण मुखचंद्राचें क्रमाक्रमानें दर्शन होऊं शकेल. पण अशी संधि आली असता फक्त एका, म्हणजे मुखचंद्राकडेच पहात राहील तो एक मूर्ख !

६७३ पावसाळा : 673. Trackless

समविसमणिव्विसेसा समन्तओ मन्दमन्दसंआरा ।
अइरा होहिन्ति पहा मणोरहाणं पि दुल्लंघा ॥ ७३ ॥

[ समविषमनिर्विशेषाः समन्ततो मन्दमन्दसंचाराः ।
अचिराद्भविष्यति पन्थानो मनोरथानामपि दुर्लङ्घ्याः ॥ ]

लवकरच पावसाळा सुरू होईल आणि ( पाणी साचल्यावर ) सर्व उंचसखल जमीन सारखीच दिसू लागेल. त्यामुळें चालताना पावलें सभाळून हळू हळू टाकावीं लागतील आणि मार्ग मनोरथानाही दुर्गम होतील

● ध्वन्यालोकांत कालाच्या व्यञ्जकत्वाचें उदाहरण.

---

१. अइदीहा होन्ति २ अतिदीर्घा भवन्तीव

## ६७४ वेळूच्या बनांत : 674. Bamboo Grove.

अइदीहराइँ वहुए ! सीसे दीसान्ति वंसवत्ताइं ।
भणिए भणामिः अत्ता ! तुम्हाणॅ वि पण्डुरा पुट्ठी ॥७४॥
[ अतिदीर्घाणि वध्वाः शीर्षे दृश्यन्ते वंशपत्राणि ।
भणिते भणामि श्वश्रु युष्माकमपि पाण्डुरं पृष्ठम् ॥ ]

सासूबाई मला म्हणाल्या, सूनबाई, तुझ्या केंसांत बाबूंचीं लांबलांब पानें दिसत आहेत. तेव्हां मी म्हणालें, ( बांबूच्या पानानीं ) तुमचीही पाठ पांढरी झालेली दिसते आहे.

● दोघीहि सारख्याच. म्हणून काय झालें ? सुनेनें सासूचा असा उपहास करावा कीं काय ?

## ६७५ स्नेहचिन्हें : 675. Sign-Manual.

अत्थक्करूसणं खणपसिज्जणं अलिअवअणणिब्बन्धो ।
उम्मच्छरसंतावो पुत्तअ ! पअवी सिणेहस्स ॥ ७५ ॥
[ आकस्मिकरोपकरणं क्षणप्रसादनमलीकवचननिर्बन्धः ।
उन्मत्सरसंतापः पुत्रक पदवी स्नेहस्य ॥ ]

मुला, एकाएकीं रागावणें, क्षणांत प्रसन्न होणें, लटका अबोला धरणें, टोंचून बोलणें, हीं स्नेहाचींच लक्षणें आहेत.

● ती तुझ्याविषयीं विरक्त आहे किंवा ती तुझ्यावर क्रुद्ध आहे अशी गैरसमजूत करून घेऊं नको, अशी दूतीची अनभिज्ञ नायकाला सूचना.

१. सोण्हे. २. मात. ३. अत्तक्क. ४. रोसणं. ५. उम्मुच्छण. ६. प्रमथता. ७. उन्मूर्छन. ८. प्रकृति.

## ६७६ राजहंसी : 676. Choice.

पिज्जइ कण्णञ्जलिहिं जणरवमिलिअं वि तुज्झ संलावम्।
दुद्धं जणसंमिलिअं सा बाला राअहंसि व्व ॥ ७६ ॥

[ पिबति कर्णाञ्जलिभिर्जनरवमिलितमपि तव संलापम्।
दुग्धं जलसंमिलितं सा बाला राजहंसीव ॥ ]

दूध पाण्यात मिसळलें तरी राजहंसी नेमकें दूध तेवढेंच पितें; त्याचप्रमाणे गोंगाटांत विलीन झालेलें असलें तरी नेमकें तुझें तेवढेंच बोलणं बालेला ऐकूं येतें.

## ६७७ मरवा : 677. Scented Leaves.

अइ उज्जुए! ण लज्जसि पुच्छिज्जन्ती पिअस्स चरिआइं।
सव्वङ्गसुरहिणो मरुवअस्स किं कुसुमरिद्धीहि ? ॥ ७७ ॥

[ अयि ऋजुके न लज्जसे पृच्छन्ती प्रियस्य चारित्राणि।
सर्वाङ्गसुरभेर्मरुवकस्य किं कुसुमर्द्धिभिः ॥ ]

ऋजुके, प्रियकराच्या चरित्राबद्दल पुनः पुनः विचारणा करतांना तुला लाज कशी वाटत नाहीं? तो अंगप्रत्यंगाला सुगंध असणाऱ्या मरव्यासारखा आहे; त्याला फुलांच्या समृद्धीची काय जरूर?

## ६७८ धातुरंग : 678. Painted Hands.

मुद्धे! अपत्तिअन्ती पवालअङ्कुरअवण्णलोहिअए।
णिद्धोअधाउराए कीस सहत्थे पुणो धुअसि ? ॥ ७८ ॥

१. पिअइ, पिज्जइ. २. अतिऋजुके.

[ मुग्धेऽप्रत्ययन्ती प्रवालाङ्कुरवर्णलोहितौ ।
निर्धौतधातुरागौ किमिति स्वहस्तौ पुनर्धावयसि ॥ ]

मुग्धे ! तुझे हात प्रवालाङ्कुरासारखे लाल आहेत. ते तू पुन: पुन: का धूत आहेस ! त्यांना लावलेला कृत्रिम धातुरंग केव्हांच धुऊन गेलेला आहे; राहिला आहे तो त्यांचा नैसर्गिक रंग आहे. पण यावर तुझा विश्वासच नाहीं.

## ६७९ पांढरे ढग : 679. Cotton Pods.

उअ ! सिन्धवपव्वअसच्छहाइँ धुअतूलपुञ्जसरिसाइं ।
सोहन्ति सुअणु मुक्कोअआइं सरए सिअब्भाइं ॥ ७९ ॥

[ पश्य सैन्धवपर्वतसदृक्षाणि धुततूलपुञ्जसदृशानि ।
शोभन्ते सुतनु मुक्तोदकानि शरदि सिताभ्राणि ॥ ]

सुतनु, पहा; ज्यांतील पाणी पाझरून गेलेलें आहे असे हे शरद् ऋतूंतील पांढरे ढग मिठाच्या पर्वतासारखे, कापसाच्या कुणडुणल्या पुंजासारखे शोभत आहेत.

● भुजङ्ग देखणा व उच्चकुलोत्पन्न आहे, पण मिठाच्या डोंगरासारखा निरस व पांढऱ्या ढगासारखा निर्जल आहे. अशा निर्धनाविषयीं आसक्ति बाळगूं नको, अशी वेश्यामातेची सूचना. *

१. अप्रतिपद्यन्ती. २. स्निग्धलोहितौ. लोहितस्निग्धौ. १. शुभ्र. २. इच्छन्तीव गुराखी.

६८० कसाई : 680. Butcher.

आउच्छन्ति सिरेहिँ, विवलिएहिँ उअ ! खंडिएहिँ णिज्जन्ता ।
णिप्पच्छिमवलिअपलोइएहिँ महिसा कुडङ्गाइं ॥ ८० ॥

[ आपृच्छन्ति शिरोभिर्विवलितैः पश्य खड्गिकैर्नीयमानाः ।
निःपश्चिमवलितप्रलोकितैर्महिषाः कुञ्जान् ॥ ]

कसाई रेड्यांना वळून नेत आहेत. माना वळवून कुञ्जांकडे अखेरचें पाहून ते रेडेसुद्धां कुञ्जांचा निरोप घेत आहेत.

◉ रेड्याना सुद्धा त्याच्या तूर्त विश्रांतिस्थानाविषयीं एवढी आत्मीयता वाटते, आणि तूं ! जातांना तूं माझा निरोपही घेत नाहींस, एवढा तूं उदासीन झालास, तुला काय म्हणावें ? संकेतस्थानीं रेड्यांनीं अगर तत्सदृशांनीं धिंगाणा माडला आहे अशी सूचना.

६८१ अश्रुप्रमाधन : 681. Trickling Tears.

पुसउ मुहं ता पुत्ति ! अ वाहोअरणं विसेसरमणिज्जम् ।
मा एअं चिअ मुहमण्डणं त्ति सो काहिइ पुणो वि ॥ ८१ ॥

[ प्रोञ्छस्व मुखं तत्पुत्ति च बाष्पोपकरणं विशेषरमणीयम् ।
मा इदमेव मुखमण्डनमिति करिष्यसि पुनरपि ॥ ]

मुली, तुझ्या मुखावरून ओघळणारे अश्रु अलंकारांसारखे रमणीय दिसत आहेत. ते पुसून टाक आणि मुखमण्डनासाठीं असलें प्रसाधन पुन्हां करू नको.

१. खडिएहिँ, खण्डएहिं. २. तावत्सुदरि, तावापुत्रक, पुत्रिके. ३. बाष्पाचरण परिशये, बाष्पाभरण, बाष्पावतरण. ४. मातत्स्तवैव.

● अलंकार नाहींत म्हणून खिन्न होऊं नको. नैसर्गिक सौंदर्यामुळें तुला अलंकारांची किंवा प्रसाधनाची कांहीं जरूरी नाहीं. अश्रूंमुळें तूं इतकी सुंदर दिसतेस हें त्याच्या प्रत्ययास आलें तर तो तुला वारंवार-रडवील. अथवा, ती दरिद्री आहे, तिची अलंकाराची हौस पुरविलीस तर सुलसाध्य आहे, अशी दूतीची सूचना.

## ६८२ भांग : 682 Parting of the Hair.

मज्झे पअणुअपङ्कं अवहोवासेसु सोणचिक्खिल्लम्[1] ।
गामस्स सीससीमन्तअं[3] व रच्छामुहं जाअम् ॥ ८२ ॥

[ मध्ये प्रतनुक पङ्कमुभयोः पार्श्वयोः श्यानकर्दमम् ।
ग्रामस्य शीर्षसीमन्तमिव रथ्यामुख जातम् ॥ ]

मध्यें थोडा ओलसर चिखल असलेला व बाजूचा चिखल वाळलेला असा गावचा रस्ता भांगासारखा शोभतो.

● रस्ता दिरसांउजेडीं पाहून ठेवण्याची सूचना. नायिकेचा केशपाश विस्कटला होता, तिला याचें भान नव्हतें; भांग सारखा करण्याची दूतीची सूचना. एक टीकाकार सांगतो : शरत्कालात शत्रूची स्वारी होईल या धास्तीनें अमात्य राजाला मंधीचा सल्ला देत आहे. पारमार्थिक पंतारर सांगतो, विरक्ताना रस्ता व भांग सारखेच.

## ६८३ जांवई : 683. Son-in-Law.

अवरह्वागअजामाउअस्स[4] विउणेइ मोहणुक्कण्ठम्[5] ।
वहुआइ घरपलोहरमज्जणपिसुणो वलअसद्दो ॥ ८३ ॥

१. शाम, गाड २ उभयपार्श्वयो सरस. ३. शीमन्तक. ४. जामाद. ५. सुरतो.

[ अपराह्णागतजामातुर्द्विगुणयति मोहनोत्कण्ठाम् ।
वध्वा गृहपश्चाद्भागमज्जनपिशुनो वलयशब्दः ॥ ]

जांवई दुपारीं सासुरवाडीं आला तेव्हां त्याची पत्नी परसांत न्हात होती. तिच्या कांकणाचा शब्द ऐकून त्याची मोहनोत्कण्ठा द्विगुणित झाली.

● ' मज्जनं शयनमङ्गसंमार्जनं वा । ' घरांत सासू-सासरा वगैरे माणसें असल्यामुळें नवरा आंत येणार नाहीं व नवरा आलेला असल्यामुळें नायिका ओसरीकडे फिरकली नाहीं तर कोणाला संशय येणार नाहीं, म्हणून संध्याकाळपर्यंत वाडग्यात कोणाचाहि व्यत्यय येणार नाहीं, अशी उपनायकाला दूतीची सूचना.

## ६८४ लंगोट : 684. Wrestler.

जुज्झचवेडामोडिअजज्जरकण्णस्स जुण्णमल्लस्स ।
कच्छाबन्धो च्चिअ भीरुमल्लहिअअं समुक्खणइ ॥ ८४ ॥
[ युद्धचपेटामोटितजर्जरकर्णस्य जीर्णमल्लस्य ।
कक्षाबन्ध एव भीरुमल्लहृदयं समुत्खनति ॥ ]

मल्लयुद्धांत कानशिलांवर अनेक वेळां थपडा बसल्यामुळें ज्याचे कान चढलेले व फाटलेले आहेत अशा मल्लाला वृद्धावस्था आली तरी तो लंगोट चढवूं लागला कीं त्याचा आवेश पाहूनच भित्र्या-मल्लांची हिंमत उखडून जाते.

● भिऊं नको; तिचा नवरा नामवंत पहिलवान असला तरी आता तो म्हातारा झालेला आहे; त्याच्या अंगीं शक्ति नाहीं, फक्त आवेश आहे.

---

१. भज्ज.

## ६८५ नगारा :
## 685. Beat of Drum.

आणंत्तं तेण तुमं पइणो पहएण पडहसद्देण ।
मल्लि ! ण लज्जसि ? णच्चसि दोहग्गे पाअडिज्जन्ते ॥ ८५ ॥

[ आज्ञप्तं तेन त्वां पत्या प्रहतेन पटहशब्देन ।
मल्लि न लज्जसे नृत्यसि दौर्भाग्ये प्रकटीक्रियमाणे ॥ ]

हे मल्लपत्नि, तुझ्या पतीनें नगारा वाजवून तुझें दौर्भाग्य जाहीर केलें, तरी तुला लज्जा वाटत नाहीं ! तुझ्याविषयीं तो इतका विरक्त आहे, तरी तुझा नाच चालूच आहे !

● मल्लयुद्धांत त्याची सरशी झाली म्हणून नगारे वाजविण्यात येत आहेत. सखी सांगते, हे मल्लपत्नी, त्याचें यश हा तुझा पराभव, कारण त्यानें तुझ्याकडे लक्ष असतें तर त्यानें कुस्ती जिंकलीच नसती. पतीविषयीं विरक्त असलेली मल्लपत्नि अपमानित असली तरी प्रसन्नचित्त व कलेविषयीं अनुरक्त आहे, अर्थात् सुगसाध्य आहे, अशी कामुकाप्रत दूतीची प्रलोभनोक्ति.

## ६८६ गोडीगुलाबी :
## 686, Perverse.

मा वच्चह वीसम्भं इमाणँ बहुचाडुकम्मणिउणाणँम् ।
णिव्वत्तिअकज्जपरम्मुहाणँ सुणआणँ व खलाणम् ॥ ८६ ॥

[ मा व्रजत विस्रम्भमेषां बहुचाटुकर्मनिपुणानाम् ।
निर्वर्तितकार्यपराङ्मुखानां शुनकानामिव खलानाम् ॥ ]

१. आणवतेन. २. णच्चसि ३. आनन्दयन्ती त्वं पत्यु ४. पमुहे पहुइङ्करडभरियाणं. ५ इमाण ६. पहुसूत्रपटभृताना.

गोडीगुलाबी लावण्यात कुत्रीं पटाईत असतात; पण काम झालें न झालें तोंच पराङ्मुख होतात. खलपुरुष असेच असतात. तोंडपुजेपणात व तोंड फिरविण्यात ते निपुण असतात. त्याच्यावर विश्वास ठेवू नये.

## ६८७ अखंडित सौभाग्यवती : 687. Bitch.

अण्णग्गामपउत्था कड्ढन्ती मण्डलाणॅ रिञ्छोलिम् ।
अक्खण्डिअसोहग्गा वरिससअं जिअउ मे सुणिआ ॥ ८७ ॥

[ अन्यग्रामप्रस्थिता कर्षयन्ती मण्डलानां पङ्क्तिम् ।
अखण्डितसौभाग्या वर्षशतं जीवतु मे शुनी ॥ ]

दुसऱ्या गावाला जाताना जिनें आपल्यामागें कुत्र्यांची रांग ओढून नेली ती आमची अखंडितसौभाग्यवती कुत्री शंभर वर्षे जगो !

● परगावीं निघालेल्या स्वैरिणीचा उपहास. तिचे अनेक उपपति तिला पोंचविण्यासाठीं तिच्याबरोबर निघाले होते. हें दृश्य किती आधुनिक वाटतें ! अनोळखी माणसाची चाहूल लागताच भुंकून भुंकून साऱ्या वस्तीला जाग आणणारी कुत्रीं आता गहींत नाहींत, निश्चितपणें माझ्याकडे येण्यास आता अडचण नाहीं, अशी स्वैरिणीची सूचना. खरी अडचण कुत्र्याची नव्हती, तिच्याभोंवतीं घोंघावणाऱ्या व तिच्यावर नजर ठेवून असणाऱ्या उल्लू तरुणांचीच तिला धास्ती होती. गावभवानीच्या मागोमाग हे लोक गाडीतळावर किंवा परगावीं गेले आहेत, त्यांची धास्ती बाळगण्याचें कारण नाहीं, अशी सूचना.

## ६८८ गुरुजी : 688 Demonstrator.

सच्चं साहेसु देअर ! तह तह चडुआरएण सुणएण ।
णिव्वत्तिअकज्जपरम्मुहत्तणं सिक्खिअ कत्तो ? ॥ ८८ ॥

१ भवतु मण्डलिका २ सव्व ३. सहासु

[ सत्यं कथय देवर तथा तथा चाटुकारकेण शुनकेन ॥
निवर्तितकार्यपराङ्मुखत्वं शिक्षितं कस्मात् ॥ ]

भाउजी, खरें सांगा, तोंड चाटण्यांत तरबेज असलेला कुत्रा काम सपताच तोंड फिरवतो, हें त्याला कोणीं शिकवलें ?

● तुम्हीच ! लाडीगोडी लावून तुम्ही मला पातिव्रत्यापासून भ्रष्ट केलेंत आणि नतर खुसपट काढून पराङ्मुख झालांत, एवढेंच नव्हे, आपल्या रहस्याचा स्फोट करून माझी नाचक्की करविलीत, किती तुम्ही नीच !

## ६८९ समृद्धि : 689 Abundance

णिप्पण्णसस्सरिद्धी सच्छन्दं गाइ पामरो सरए ।
दलिअणवसालितण्डुलधवलमिअङ्कासु राईसु ॥ ८९ ॥

[ निष्पन्नसस्यऋद्धिः स्वच्छन्दं गायति पामरः शरदि ।
दलितनवशालितण्डुलधवलमृगाङ्कासु रात्रिषु ॥ ]

शरद् ऋतूतलें शुभ्र चांदणें काडलेल्या नव्या तांदळामारखें स्वच्छ दिसतें धान्याची समृद्धि झाल्यामुळें अशा चांदण्या रात्रीं गरीबगुर्दा स्वच्छंदानें गाणें गातो

● आता आम्हांला काय कमी आहे ! शिवाय घरात नवरा आहे आणि बाहेर चांदणें आहे, आज तरी नमणार नाहीं, अशी सूचना. किंवा, नवरा रानांत मळ्यावर आहे आणि घरांत रान मोकळें आहे, अशी सूचना शरद् ऋतूच्या अन्न समृद्धानेंही पामर मस्त होतो, अशी धान्यनिंदा सो पामर आहे तरी पहा कसा चांदण्यात आनंदानें गात आहे ! आणि तुम्ही— सधन असून व मी तुमच्या मर्जींत असून उगाच पडला आहांत, असा

१ शामदी २ सदन ३ कविता

उदासीन पतिनिधि. शेतातल्या सळ्यावर शुभ्र तांदळाची रास आहे आणि
आभाळातल्या सळ्यात चंद्र — जणू शुभ्र व शीतल, मंद व स्निग्ध प्रकाशाची
रास।

## ६९० मागोमा : 690 Track.

अलिहिज्जइ पङ्कअले हलालिचलणेण कलमगोवीए।
केआरसोत्तरुम्भणतंसट्ठिअ कोमलो चलणो ॥ ९० ॥

[ आलिख्यते पङ्कतले हलालिचलनेन कलमगोप्या ।
केदारस्रोतोवरोधतिर्यक्स्थित कोमलश्चरणः ॥ ]

गेल्या साली साळीच्या शेताची राखण करणाऱ्या स्त्रीची नाजूक
पावलें पाण्याच्या प्रवाहाच्या अवरोधामुळें वाकडीं पडलीं. चालू हंगामात
शेतकरी त्या अवीट उमटलेल्या तिरप्या आकृति नागरानें ओढलेल्या
रेषानीं पुसून टाकतो

● शेताची राखणदारीण मालकाला व शेतकऱ्यालाच नव्हे, वाटसरू-
नाही सुसाध्य असते अशी अनुभवसिद्ध समजूत होती व आहेही,
कारण अवसर, आडोसा व एकान्त हीं उपलब्ध असतात. म्हणूनच तर
गोफणवालीसारखीं सफल वा विफल प्रीतीचीं गाणीं आजही रचलीं
जातात आधुनिक नागरिका जाणून नकळ्यात तिरवें पाऊल टाकतात, असा
शिष्टाचा आरोप आहे, पण ही चाल फार पुरातन दिसत. पाठभेद सांगतो,
गोपीचीं पावलें इतकीं सुगंधित कीं त्याभोंवतीं अद्यून ही भ्रमर गुंजारव
करीत आहेत

१ अहिलिज्जइ २. कमलुल्लेहडालि, पउमालेहडालि ३ वलएण ४ सत्त,
सोत्त. ५ अभिलष्यते, अभिलीयते, आश्रीयते ६ पङ्कजलुब्धालिवलयेन
७ स्रोतोन्तरोधनतिर्यक्, स्रोतोरोधनतिर्यक् ८ व्यश

## ६९१ गोपी : 691. Last Chance.

दिअहे दिअहे सूसइ संकेअअभङ्गवड्ढिआसङ्का ।
आवण्डुरोणअमुही कलमेण समं कलमगोवी ॥ ९१ ॥

[ दिवसे दिवसे शुष्यति संकेतकभङ्गवर्धिताशङ्का ।
आपाण्डुरावनतमुखी कलमेन समं कलमगोपी ॥ ]

शेतांतलें भात पिकून वांकलें व पांढुरकें होऊं लागलें, आतां संकेतस्थान नष्ट होणार या धास्तीनें भाताबरोबर शेत राखण करणारीहि दिवसानुदिवस वाळूं लागली व तिचें कोमेजलेलें मुख अवनत झालें.

● पिकाची राखण हें मुख्यतः स्त्रियांचें काम. कापणीनंतर संकेतस्थान व राखणीचें निमित्त हीं नष्ट होणार म्हणून ती उद्विग्न झाली आहे. ही अपेक्षेची संधि आहे, अशी दूतीची सूचना. अलंकारकौस्तुभात सहोक्तीचें उदाहरणः ' सह समभिव्याहारात्सहोक्तिरुभयान्विते धर्मे । ' ' हाद्गिता-दिभिरप्यनवगम्यः प्रच्छन्नोयं प्रेमप्रकारः । ': सरस्वतीकण्ठाभरण.

## ६९२ पाइंत घाई : 692. Pretender.

णवकम्मिएण हंअपामरेण दट्ठण पाँउहारीओ ।
मोत्तव्वे जोत्तअपग्गहम्मि अवहासिणी मुक्का ॥ ९२ ॥

[ नवकर्मिणा पश्य पामरेण दृष्ट्वा भक्तहारिकाम् ।
मोक्तव्ये योक्त्रप्रग्रहेऽवहासिनी मुक्ता ॥ ]

१. ण अक्कंपिएण २ उअ ३ पाअवतीओ, पाणिहारिओ. ४. मोत्तु येज्जो त्ति ए अणुहम्मिअ वओगिणी मुक्का । ५. नेविअपण. ६. पादर्शि्रू. ७. कर्मणा पश्य, कर्मिरेण हत ८. पानीमभक्तहारिकाम्, भक्तापहारी. ९. मोक्तव्ये निपुणप्रग्रहे आगिनी, मोक्तव्ये योक्त्रप्रग्रहेऽवकाशिनी.

पहा, नवखा शेतकरी शेत नागरीत आहे. शिदोरीचा हारा आणणाऱ्या स्त्रीला पाहताच गरीब बिचारा इतका बावरला कीं जुवाचा कासरा सोडण्याऐवजीं त्यानें बैलाच्या वेसणीच सोटल्या !

● शेतकरी नवखा होता असें मुळात स्पष्ट सांगितलेलें असलें तरी खेडेगावात, शेतांच्या सान्निध्यात वावरणाराच्या हातून कधींही होणार नाहीं अशी ही चूक व घादल पाहून वाटतें कीं तो लटका शेतकरी असावा, शिदोरी आणणाऱ्या स्त्रीबरोबर संकेत ठरवून त्यानें त्रिदंडी सन्यासासारखा हा मजुराचा तात्पुरता पेशा घेतलेला असावा. या गोंधळामुळें बिचाऱ्याचा संकेत विफल झाला असावा असें दिसतें

## ६९३ नन्दीबैलः 693 Cuckold

दट्ठूण हरिअदीहं गोमे सण्ठाणं जूरए हालिओ ।
असईरहस्समग्गं तुसारधवले तिलच्छेत्ते ॥ ९३ ॥

[ दृष्ट्वा हरितदीर्घं प्रातर्वन्येभ्य कुध्यति हलिक ।
असतीरहस्यमार्गं तुषारधवले तिलक्षेत्रे ॥ ]

' दवामुळें तिळाचें शेत पाढुरकें दिसत होतें त्यातून रात्रीं कोणी स्वैरिणी गुप्तपणें गेलेली असल्यामुळें लावर हिरवीगार पाऊलवाट दिसत होती पहाटे शेतावर फेरी मारण्यास गेलेला शेतकरी हें दृश्य पाहून बैलावर चिडला.

● काहीं टीकाकार सागतात, ही नीहाराभिसारिका त्याचीच बायको होती, पण हें काहीं ह्या नन्दीबैलाच्या ध्यानात आलें नाहीं त्या मूर्खाला वाटलें कीं बैलांनींच आपलें शेत तुडवलें, म्हणून तो त्याच्यावरच रागावला

१ वण्ठाण जूरए, णइजूरए २ नातिखिद्यते प्रातर्वृषभान्निदयति

'णइजूरए'—'नातिखिद्यते' हा पाठ स्वीकारला तर अर्थ बदलतोः माणसाऐवजीं शेतांत जनावरें घुसलीं असतीं तर केवढें नुकसान झालें असतें, या विचारामुळें तो रागाला आला नाहीं.

## ६९४ घराची ओढ : 694. Yearning.

संकेल्लिओ व्व णिज्जइ खण्डं खण्डं कओ व्व पीओ व्व ।
वासागमम्मि मग्गो घरहुत्तसुहेण पहिएण ॥ ९४ ॥

[संकोचित इव नीयते खण्डं खण्डं कृत इव पीत इव ।
वर्षागमे मार्गो गृहभविष्यत्सुखेन पथिकेन ॥]

पावसाळ्याच्या प्रारंभीं घराकडे परतणारा प्रवासी घरीं पोंचल्या-नंतर प्राप्त होणाऱ्या सुखाच्या आशेनें जणूं रस्ता संकुचित वा खण्डित व्हावा अगर पिऊन टाकला जावा तसा (मार्गक्रमणाचे क्लेश न जुमानतां) झपाझप चालतो.

## ६९५ बहिरे व आंधळे : 695. Deaf and Blind.

धण्णा बहिरा अन्धा ते च्चिअ जीअन्ति माणुसे लोए ।
ण सुणंति पिसुणवअणं खलाणँ ऋद्धिं ण पेक्खन्ति ॥ ९५ ॥

[धन्या बधिरा अन्धास्त एव जीवन्ति मानुषे लोके ।
न शृण्वन्ति पिशुनवचनं खलानामृद्धिं न प्रेक्षन्ते ॥]

१. वाहद २. मणेण, सुहेण. ३. मंकलित, संपेल्लिन ४. गृहाभिमुखमनगा. ५. अद्धि

जे बहिरे आहेत व आंधळे आहेत ते धन्य आहेत; खरोखर, या मनुष्यलोकांत तेच जगतात, कारण त्यांना चहाडखोराचें घातकी बोलणें ऐकूं येत नाहीं किंवा नीचाची दुष्ट समृद्धि दिसत नाहीं.

● दुर्जनाची अभिवृद्धि पाहून उद्विग्न झालेल्याचे उद्गार. किंवा, पति आंधळा व बहिरा आहे, तरी गुणी आहे, शिवाय या शारीरिक वैगुण्यामुळें सपत्नींचा उपसर्ग नाहीं, म्हणून तो मला प्रिय आहे आणि मी सुखी आहे, असे साध्वीचे उद्गार.

६९६ निवारण : 696. Too Late.

एण्हि वारेइ जणो, तइआ मूइल्लओ, कहिं व्व गओ ।
जाहे विसं व जाअं सव्वङ्गपहोलिरं पेम्म ॥ ९६ ॥

[ इदानीं वारयति जनस्तदा मूलकः कुत्रापि वा गतः ।
यदा विषमिव जात सर्वाङ्गघूर्णित प्रेम ॥ ]

आता प्रेम सर्वाङ्गांत विषासारखें भिनलें आहे. आता त्याचें निवारण करूं पाहणारे मुळारंभीं काय दुसरीकडे गेले होते !

● सखि, त्याचे अवगुण आता कशाला सांगतेस ? आरंभीं सूचना देतीस तर मी मन आवरलें असतें. आतां प्रेम हृदयांत रुजलें. आता हें रोपटें उपटावयाचें, म्हणजे माझें हृदयच विदीर्ण करावयाचें.

६९७ घरजांवई : 697 Nonchalance.

कहँ ? तंपि तुइ ण णाअं, जह सा आसन्दिआणँ बहुआणम् ।
काऊण उच्चवाचिअं तुह दंसणलेहैला पडिआ ? ॥ ९७ ॥

१ मुखलिओ २ जनस्तद्ग्रामत ३ णेहला, लम्हडा, लेहडा

[कथ तदपि त्वया न ज्ञात यथा सा आसन्दिकाना बहूनाम् ।
कृत्वा उच्चासनिकां तव दर्शनलोलसा पतिता ॥ ]

तू जाऊ लागलास तेव्हा तुझें दर्शन घेण्याच्या लालसेनें खुर्चीवर खुर्ची ठेवून त्यावर ती उभी राहिली. या उतरंडीवरून ती कोसळली, हें तुला कसें कळलें नाहीं ?

● सपत्न सासर सोडून अपमानामुळें व्यथित झालेला घरजावई आपल्या दरिद्री पितृगृहीं जावयास निघाला तेव्हाचा हा प्रसंग आहे जाताना तो आपल्याला डोळे भरून अखेरचें पाहून घेईल अशी त्याच्या पत्नीची खुळी आशा होती. ही दृष्टिभेट टाळण्याचा त्याचा निग्रह होता, कारण तीमुळें आपला निश्चय ढळेल अशी त्याची खात्री होती. प्रीति व संपत्ति यांचें द्वंद्व सनातन आहे

६९८ सूचना : 698 Alarm.

चोराणँ, कामुआणँ अ पामरपहिआणँ कुक्कुडो वअंड ।
रे रमह, वहह, वाहयह, एत्थ, तणुआअए रअणी ॥ ९८ ॥

[चौराणांकामुकानां पामरपथिकानां कुक्कुटो वदति ।
रे रमत वहत वाहयत अत्र तन्वी भवति रजनी ॥ ]

चोर, कामुक व गरीब वाटसरू यांना पहाटे कोंबडा आरवून सांगतो कीं अरे, आता (चोरीचा माल) पळवा, (प्रेम) आवरतें घ्या व (ओझ्याचीं जनावरें) हाका, कारण रात्र क्षीण होत आहे

१. रम्मह २ वहह ३ एत्थ रमह वाहय ४ तणुइज्जइ ५ वर्षकाणां पापकानां ६ रमति ७ पन्थाः रमत वाहयत

६९९ प्रीतिसंगम : 699. Union.

अण्णोण्णकडक्खन्तरपेसिअमेलीणदिट्ठिपसराणम् ।
दो च्चिअ मण्णे कअमण्डणाइँ समअं पहसिआइं ॥ ९९ ॥

[ अन्योन्यकटाक्षान्तरप्रेषितमिलितदृष्टिप्रसरौ ।
द्वावपि मन्ये कृतकलहौ समकं प्रहसितौ ॥ ]

दोघेंही एकमेकांवर रुसलीं होतीं. अंतःप्रेरणेनें त्यांनीं एकमेकांकडे चोरून कटाक्ष टाकले ! त्यांच्या दृष्टीचें मीलन झालें, तेव्हां दोघेंही एकदम हंसलीं.

● अनुनयाचा आरंभ दुसऱ्यानें करावा अशी दोघांचीही इच्छा होती; कारण त्यांचा कलह कृत्रिम होता. हंसल्यानंतर त्यानीं एकमेकांना विचारलें असेल कीं अगादर कोण हंसलें आणि एकमेकांवर आरंभाचा आरोप केला असेल. मुळातील ' मन्ये ' या शब्दावरून वाटतें, या प्रसंगीं सखी हजर असून तिनें या प्रश्नाचें उत्तर दिलें असावें कीं दोघेंही जोडीनें हंसलीं; किंवा सखीच्या अनुरञ्जनासाठीं तिनें अशा प्रसंगाचें वर्णन केलेलें असावें. अमरुशतकातील समानार्थी वचन पहाः एकस्मिन् शयने पराङ्मुखतया वीतोत्तरं ताम्यतो रन्योन्यस्य हृदि स्थितेऽप्यनुनये संरक्षितोर्गौरवम् । दम्पत्योः शनकैरपाङ्गवलनान्मिश्रीभवच्चक्षुषोर्भग्नो मानकलिः सहासरभसव्यासक्तकण्ठग्रहम् ॥ १९ ॥ लेले-प्रत.

१ कलहसत्तायेसिअमेलिण, छलेच्छीअत्तुलग्गमेलीण, सिअमंतुलग्गमेलीण.
२. छलेप्रेक्षित.

## ७०० सायंमन्त्या · 700 Evening Oblation.

संझागहिअजलञ्जलिपडिमासंकन्तगोरिमुहकमलम् ।
अलिअं चिअ फुरिओट्ठं विअलिअमन्तं हरं णमह ॥ १०० ॥

[ संध्यागृहीतजलाञ्जलिप्रतिमासंक्रान्तगौरीमुखकमलम् ।
अलीकमेव स्फुरितोष्ठं विगलितमन्त्रं हरं नमत ॥ ]

( मावळत्या सूर्याला ) अर्घ्य देण्यासाठीं अञ्जलींत घेतलेल्या जलात गौरीच आरक्त मुखकमल प्रतिबिंबित झालेलें पाहून शंकराला मंत्राचा विसर पडला आणि ( प्रियेच्या सान्निध्यामुळें ) आपलें चित्त व्याकुळ झालें आहे हें कोणाच्या ध्यानीं येऊ नये म्हणून ( जणू आपण मनातल्या मनात मंत्र म्हणत आहोंत असें भासविण्यासाठीं ) ज्यानें उगाच ओठ हलविले त्याला नमस्कार असो.

● पहिल्या गाथेंतील प्रणाम उगवत्या सूर्याला अर्घ्य देणाऱ्या पशुपतीला व अखेरच्या गाथेंतील नमन मावळत्या सूर्याला अर्घ्य देणाऱ्या गौरीहराला संन्यासी टीकाकार सांगतात, शंकरालाही संध्योपासनेंत व्याकुलचित्त करणारा स्त्रीसङ्ग सर्वथा त्याज्य आहे ! आणि शृङ्गारी टीकाकार सांगतात, पहा, शंकर एवढा विरागी, तरी किती सहृदय ! गौरी सदैव संनिध असूनही प्रेमामुळें उपासनेचे वेळींही देवाधिदेव व्याकुलचित्त होतो, नाहीं तर, पत्नी पतीला म्हणते, तू ! एकान्तांत आणि प्रेमप्रसंगींही मनाप्रमाणें अनुरंजन करीत नाहींस !

● ● ●

---

१ मत्त

इअ सिरिहालविरइए पाउअकव्वम्मि सत्तसए ।
सत्तमसअं समत्त गाहाणँ सहावरमणिज्जम् ॥
[ इति श्रीहालविरचिते प्राकृतकाव्ये सप्तशते ।
सप्तमशत समाप्त गाथाना स्वभावरमणीयम् ॥ ]

● ● ●

एसो कइणामंकिअ गाहापडिबद्धवड्ढिआमोओ ।
सत्तसअओ समत्तो सालाहणविरइओ कोसो ॥
[ एष कविनामाङ्कितगाथाप्रतिबद्धवर्धितायाम ।
सप्तशतक समास शालवाहनविरचित कोष ॥ ]

● ● ●

● सगळें सातवें शतक हालाच्या नावावर खपतें. ही समजूत या गाथेवर आधारलेली आहे.

# ॥ गाथासप्तशती ॥

## उत्तरार्ध

• या भागात समाविष्ट केलेल्या गाथांपैकी क्र. ७०१ ते ९९४ या वेबर प्रतीवरून घेतलेल्या आहेत. त्यांचे मूळ येणेप्रमाणे : क्र. ७०१ व ७०२ या गाथा अनुक्रमें कुलनाथ व पीतांबर यांच्या हस्तलिखित प्रतींतील आहेत. क्र. ७०३ ते ७९३ या गाथा वेगवेगळ्या हस्तलिखितांतील आहेत. क्र. ७९४ ते ८०८ या साधारणदेवाच्या मुक्तावलींतील असून क्र. ८०९ ते ९४७ या तेलंग (१) व क्र. ९४८ ते ९५९ या तेलंग (२) या हस्तलिखित प्रतींतील आहेत. क्र. ९६० ते ९९४ या गाथा संस्कृत अलङ्कार-वाङ्मयांत गाथासप्तशतींतील म्हणून ऊधृत केलेल्या आहेत. वेबरनें आपल्या आवृत्तींत गाथांच्या संस्कृत छाया कोठेंही दिलेल्या नाहींत. उत्तरार्धांतील गाथांच्या ज्या छाया मला मिळाल्या त्या मी जागोजाग दिल्या आहेत. वेबर आवृत्तीवरून घेतलेल्या गाथांचे अखेरीस त्याचे इंग्रजी क्रमांक सुकावल्यासाठीं दिले आहेत. क्र. ९९५ ते १००६ या गाथा प्रबन्धचिंतामणींतून घेतलेल्या आहेत. या गाथा हालानें संपादन केल्याची कथा त्यात दिलेली आहे.

७०१ सखी : 701. Request.

सुहअ ! इअं मज्झ सही तुज्झ विओएण धारिउं पाणे।
सव्वह चिअ ण समत्थ त्ति बुज्झिउं विरम गमणाओ ॥ 703 ॥

सुभग, ही माझी सखी तुझ्या विरहांत प्राणधारण करण्यास सर्वस्वीं असमर्थ आहे, हें जाणून तूं प्रवासाला जाऊं नको.

७०२ प्रतिज्ञा : 702. Declaration.

गामारुह म्हि, गामे वसामि, णअरट्ठिइं ण आणामि।
णाअरिआणं पइणो हरेमि, जा होमि सा होमि ॥ 705 ॥

[ ग्रामारुहाऽस्मि ग्रामे वसामि नगरस्थितिं न जानामि।
नागरिकाणां पतीन् हरामि या भवामि सा भवामि ॥ ]

मी खेड्यांत जन्मलें व आजवरचें आयुष्य खेड्यांतच काढलें; यामुळें शहरी राहणीची मला माहिती नाहीं, तरी या शहरी स्त्रियांच्या पतींना मी नादीं लावीनच लावीन. तरच मी खरी, मग काय व्हावयाचें असेल तें होवो.

● छाया काव्यप्रकाशावरून. चंद्रालोकावरील गागाभट्टाच्या राकागम व्याख्येंतील समानार्थी गाथाः ग्राम्यास्मि नागरीवृत्तेरनभिज्ञापि तादृशी। रमणाना मानसानि नागराणा हराम्यहम् ॥ ( चौखम्बा प्रत : पृ. १३७ ). नगरच्या नारी, गोऱ्या पान, फुसक्या माल, लटका मान; रानची हौशी, बावनकशी, होशील खुशी, पडशील फशीं ! प्रतिशित स्पर्वेत नागरकांचा पाडाव व नागरिकांचा पराभव होणार, हें उघड आहे.

१. गम्मइरि अम्हि, गामरुहणि ( गामारि अम्हि ) गामे रहामि. २. वसम्मि. ३. पडिणो. ४. ग्राम्यास्मि, ग्रामे जाता.

## ७०३ फसवणूक :　　703. Character

ओसंर ! रोत्तुं चिअ णिम्मिआइँ मा पुससु मे हअच्छीइं ।
दंसणमेत्तुमइएहि जेहि सीलम् तुह ण णाअं ॥ 706 ॥

[ अपसर रोदितुमेव निर्मिते मा उत्पुंसय हते अक्षिणी मे ।
दर्शनमात्रोन्मत्ताभ्यां याभ्यां तव हृदयमेव रूपं न ज्ञातम् ॥ ]

जा, दूर सर; माझे हे जळ्ळे डोळे रडण्यासाठींच निर्माण झाले आहेत; ते पुसूं नको. तुझ्या नुसत्या दर्शनानें ते उन्मत्त झाले; मात्र त्याना तुझें शील समजलें नाहीं.

● छाया ध्वन्यालोकावरून. येथील पाठ थोडा वेगळा आहे. त्याचा अर्थ असा : माझे नेत्र तुझ्या शरीराचें रूप पाहून उन्मत्त झाले, त्यांना तुझ्या हृदयाचें रूप उमजलें नाहीं.

## ७०४ अधीर :　　704. Impatience.

रणरणअसुण्णाहिअओ चिंतंतो विरहदुब्बलं जाअं ।
अप्पुणिअणिअवसही सो वोलीणो गाममज्झेण ॥ 707 ॥

उत्कण्ठेमुळें त्याचें हृदय इतकें सुन्न आणि विरहामुळें इतकें दुबळें झालें होतें की खेड्यांतल्या वाटेवरून चालता चालता आपलें घर ओलांडून तो तसाच पुढें गेला.

१. अवसर २. रोहुं ३ दसणमेत्तुम्मत्तेहि. ४. हिअअं. ५. प्रोञ्छ, मार्जय. ६. दर्शनमात्रे प्रमत्ताभ्यां, मात्रोन्मादिताभ्यां ७. दुब्बलं, दुम्मअं, दोब्बलं. ८. अगणिअणिअवसह, आअब्बिअवसही, अप्पाविअणिअवसही.

● त्याला आपल्या घराचीही शुद्ध राहिली नाही. मग तो तसाच पुढे गेला, की त्याच्या घरधनिणीने त्याला परत बोलावून आणविले ? की तिची दासी या बुआजींना विसरभोळेपणा धनिणीच्या निदर्शनास आणीत आहे ?

७०५ बहुजन : 705. Majority.

सुअणो ण दीसइ च्चिअ खलबहुले डड्ढजीअलोअम्मि ।
जह काअसंकुला तह ण हंसपरिआरिआ पुहवी ॥ 710 ॥
[ सुजनो न दृश्यत एव खलबहुले दग्धजीवलोके ।
यथा काकसंकुला तथा न हंसपरिचारिता पृथ्वी ॥ ]

या दुष्ट जगांत नीच माणसेंच बहुसंख्य आहेत; येथे सज्जन क्वचितच आढळतात. पृथ्वी कावळ्यांनी भरलेली आहे. हंस मात्र क्वचितच दिसतात.

● ही गाथा पीतांबरानें दिलेली आहे. पहाः गाथासप्तशतीप्रकाशिका : क्रमांक ४०५ : संपादक श्री. जगदीशलाल शास्त्री. खलनायकाला उद्देशून तत नायिकेचे उद्गार; किंवा अभिसारिकेला धोक्याची सूचना. दृष्टान्तोक्ति.

७०६ सुयोग : 706. Fortunate.

जं मुच्छिआइ ण सुओ कलंबगंधेन तं गुणे पेडिअं ।
इअरा गज्जिअसद्दो जीएण विणा ण वोलन्तो ॥ 711 ॥
[ यन्मूर्च्छिता न च श्रुत. कन्दंबगन्धेन तद्गुणे पतितम् ।
इतरथा गर्जितशब्दो जीवेन विना न व्यतिक्रामेत् ॥ ]

१. त से गुणम्मि जाअ कलम्बगन्धेण ज गआ मोहम्। २ तत् तस्याः गुणविषये जात।

कदम्बाच्या सुगंधामुळें ती मूर्च्छित झाली आणि मूर्च्छेमुळें तिला मेघगर्जना ऐकू आली नाहीं. हा सुयोगच म्हटला पाहिजे. नाहींतर मेघगर्जना ऐकून तिचा अंतच झाला असता.

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून. कदम्बाच्या मादक सुगंधामुळें तिला मूर्च्छा आली, हा त्याचा दोष, पण तोच गुण ठरला; नाहींतर, तिला मेघगर्जना ऐकूं आली असती, यामुळें तिची विरहव्यथा तीव्र झाली असती आणि तिचा अंत झाला असता.

## ७०७ इंद्रधनुष्य : 707. Splendour.

पीणपओहरलग्गं दिसाणँ पवसन्तजलअसमअविइण्णं ।
सोहग्गपढमइण्हं पम्माअइ सरसणहवअं इन्दधणुम ॥ 712 ॥

[ पीनपयोधरलग्नं दिशां प्रसवज्जलदसमयवितीर्णम् ।
सौभाग्यप्रथमचिन्हं प्रम्लायति सरसनखपदमिन्द्रधनुः ॥ ]

( वर्षाकालांत स्वगृहीं राहून शरद् ऋतूचे आरंभीं ) प्रवासाला निघालेल्या पतीनें पत्नीच्या पुष्ट स्तनांवर केलेल्या व तिच्या सौभाग्याचें प्रथमचिन्ह असलेल्या नखक्षतांपुढें पावसाळ्याच्या अखेरीस आभाळांत दाटलेल्या मेघावर आधारलेल्या इंद्रधनुष्याची शोभा म्लान दिसते.

● ही गाथा श्री प्रवरसेनाच्या सेतुबन्धातील ( १.२४ ) आहे. या गाथेचा शृंगारिक अर्थ नीट लागत नाहीं, असें वेबर सांगतो. हा घोंटाळा शुद्ध पाठाच्या अभावीं झालेला असावा. अलंकारकौस्तुभातील व श्री रामदासाच्या सेतुबन्धावरील टीकावरून अर्थ स्पष्ट होतो. नायिकेच्या परस्परांना भिडलेल्या व पुष्ट स्तनांवर प्रवासाला निघालेल्या पतीनें उमटविलेलीं नखक्षतें

१. सणहपद्म्. २. हुणुं ३ प्रसवत् ४. विस्तीर्णम्.

आणि आकाशांत या पासून त्या क्षितिजापर्यंत पसरलेल्या पयोधरांवर प्रवासाला निघालेल्या पावसाळ्यानें प्रस्थविलेलें इंद्रधनुष्य यांच्या शोभेची तुलना पयोधराच्या द्वयर्थी आधारानें कवीनें केली आहे. अलंकारकौस्तुभांत रूपकाचें उदाहरणः " तद्रूपकं त्वभेदः स्यादुपमानोपमेययोर्यत्र । "

## ७०८ अगतिक : 706. Lost.

एत्ती मत्तम्मि थवा पुत्तीमत्तम्मि लअणा भत्ती ।
अगईअ अवत्थाए दिअहाइं भित्तरं तरइ ॥ 713 ॥

आज़वर स्तवन केलें; आतां इच्छापूर्ति झाली तर भक्ति कृश होईल; अशा अगतिक अवस्थेंत मी दिवस कसेबसे काढीत आहे.

● अर्थ नीट लागत नाहीं. एक टीकाकार सांगतो : ' एतेन यस्य यदुचितम् कर्म तस्य तत्परिशीलयतो वैरुप्यापत्तिरपि अलंकारायेति दर्शितम् । '

## ७०९ आग : 709. Red-Hot.

जं असरणो[३] व्व डड्ढो[२] गामो साहीणवहुजुआणो वि ।
संभमविसंठुलाणं[४] तं दुच्चरिअं तुह थणाणं ॥ 714 ॥

गांवांत अनेक तरुण होते; तरी गांवाला आग लागली तेव्हां कोणी त्राता नसल्यासारखें तें गांव पूर्णपणें जळून गेलें. हा तुझ्या स्तनांचा अपराध; कारण त्या वेळीं तुझें वक्षःस्थल उघडें पडलें होतें आणि त्यावरून तरुणांच्या नजरा हलेनातच.

१. मत्तम्मी, मंतामि. २. दड्ढो. ३. अशरण, अरक्षक. ४. सभ्रमविसंस्थितयोः

● तुझ्या निर्दोष व तेजःपुंज स्तनाचा हा दोष व कलंक; कारण त्याच्या दर्शनामुळे तरुणाच्या चित्तात संभ्रम उत्पन्न झाला. आग लागली होती एकीकडे आणि त्याना तिचा भडका दुसरीकडेच दिसत होता.

## ७१० चषकः — 710. Wine-Glass.

सो त्ति जुआ माणहणो, तुमं पि माणंस्स असहणा, पुत्ति !
मत्तच्छलेण गम्मउ सुराइ उवरिं पुससु हत्थं ॥ 715 ॥

मुली, हा तरुण मानी आहे आणि तुला तर कोणाचाही रागरोष सहन होत नाहीं. मद्याचा मद चढल्याच्या निमित्तानें तूं चषकाला तुझा हात लाव, (म्हणजे झालें.)

वेबर सांगतो, या गाथेचा अर्थ नीट लागत नाहीं. दूतीची कलहान्तरितेला किंवा कुट्टिनीची दुहितेला अनुनयाची प्रेरणा. मानखेदामुळे तूं मद्यपानाविषयीं उत्सुक नाहींस हें खरें, त्याच्या समाधानासाठीं तूं चषकाला तुरता हात लाव, त्याला एवढाही आविर्भाव अनुनयासारखा भासेल.

## ७११ केतकीः — 711. Thorns.

केअइगंधहगव्विआरअरंजिआहणोहिं !
कंठअसवलितणुतव छड्डिअमवलाण ॥ 716 ॥

केतकीनें आपल्या गंधानें मानिनींना व्याकुल केलें आणि त्याना जणूं आपलें वैशिष्ट्य अर्पण करून रोमांचित केलें व त्यांचा मान नष्ट केला.

---

१. मण्णस्स.

७१२ धुंद : 712. Flush.

अह सुअइ दिण्णपडिवक्खवेअणा पसिढिलेहिँ अंगेहिँ ।
णिव्वत्तिअसुरअरसाणुबंधसुहणिब्भरं वहुआ ॥ 717 ॥

[ अवस्वापिति दत्तप्रतिपक्षवेदनं प्रशिथिलैरङ्गैः ।
निवर्तितसुरतरसानुबन्धसुखनिर्भरं स्नुषा ॥ ]

रात्रीं सुरतसुखाचा मनमुराद आस्वाद घेतल्यामुळें सूनबाईची गात्रें शिथिल झालीं आहेत व सकाळ झाली तरी अजून त्या त्याच धुंदींत गाढ झोंपलो आहेत. यामुळें तिच्या सवती मत्सरग्रस्त झाल्या आहेत.

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून: ' निद्रारूपेण रक्षपक्षः । ' जणूं प्रतिपक्षाला वेदना देताना झालेल्या श्रमामुळेंच तिचीं गात्रें शिथिल झालेलीं आहेत. आम्हाला ठाउकी आहे, म्हणून इतका वेळ लोळत पडावयाचें कीं काय !

७१३ अधरक्षत : 713. Lip.

जइ तेण तुज्झ वअणं ण कअं, मह कारणेण अ, हआसे ।
सा कीम खण्डिअवडं णिआहरं दूइ ! दुम्मेसि ? ॥ 718 ॥

दूती, तू सांगतेस कीं तूं माझ्याविषयीं केलेल्या विनंतीचा त्यानें धिक्कार केला हें जर खरें, तर, दुष्टे, सांग, तूं आपला खण्डित अधर वारंवार का चावते आहेस ?

---

१. ओसुसई २. सोण्हा. ३. सपत्नी.

## ७१४ आकाशाच्या सरोवरांत : 714. Firmament.

निर्मलगगनतडागे तारागणकुसुममिते तिमिरे।
मिकरवोशलम् चरति मृगाङ्को मराल इव ॥ 719 ॥

निरभ्र आकाशाच्या निर्मळ सरोवरांत जणू ताऱ्यांचे पुष्पपुंज तरंगत आहेत आणि त्याच्या शांत पृष्ठभागावरून चंद्र जणू हंसाप्रमाणें भ्रमण करीत आहे.

● या गाथेचें शुद्ध प्राकृत अगर संस्कृत रूप उपलब्ध नाहीं. अभिसारिकेच्या उद्दीपनासाठीं दूतीचे उद्गार.

## ७१५ अनुमान : 715. Guesswork.

दिट्ठाइ[1] जं ण दिट्ठो, सरलसहावाइ जं च णालविओ।
उवआरो जं ण कओ तं चिअ कलिअं छइल्लेहिं ॥ 720 ॥

तिनें त्याला पाहिलें होतें, तरी तिनें त्याच्याकडे पाहिलें न पाहिल्यासें केलें, तिचा स्वभाव सरळ आहे, तरी तिनें त्याच्याशीं भाषण केलें नाहीं; एवढेंच काय, नुसतें अभिवादनही केलें नाहीं तरी यावरून काढावयाचें तें अनुमान चतुर लोक काढतातच

● अलंकारकौस्तुभांत विषम (विचित्र) अलंकाराचें उदाहरण: "सवन्धानुपपत्ती इष्टार्थानाप्त्यनिष्टसप्राप्ती। जन्यजनकयोभयगुणक्रियाविरोधे च विषमः स्यात्।" "इष्टमिष्यर्थमिष्टेपिणा क्रियमाणामिष्टप्रतिकूलार्थाचरणं विचित्रालंकारः।" वज्जालग्गांतील पाठ : सहसा जं ण दिट्ठो सरलसहावेहि

1. दिट्ठीअ.

जं ण आलत्तो । उवआरी जे ण कओ तं चिअ कलिअं छइल्लेहिं ॥
सहसा यन्न दृष्टः सरलस्वभावेन यन्नालपितः । उपकारो यन्न कृतस्तदेव कलितं छेकैः ॥

## ७१६ सीत्कारः 716. Symptoms.

अविरलणिग्गअपुलओ पअडिअकंपो पमुक्कसिक्कारो ।
हेमंते पहिअजणो सुरआसत्तो व्व पडिहाइ ॥ 721 ॥

हिंवाळ्यात प्रवासी थंडीमुळें कुडकुडत असतो, त्याचें अंग रोमांचित झालेलें असतें व त्याच्या मुखातून सी कार निघत असतात; वाटतें कीं तो जणू सुरतसुखाचाच आस्वाद घेत आहे.

● शीतार्तपथिकावस्थावर्णनाच्या निमित्तानें पथिकाला आवाहन.

## ७१७ अनुभवः 717. Experience.

बहुविहविलासभरिए सुरए लब्भंति जाइ सोक्खाइं ।
विरहम्मि ताइ पिअसहि ! खाउग्गिण्णाइ कीरंति ।। 722 ॥

प्रियसखी, विविध विलासानीं भरलेल्या सुरतात जीं सुखें मिळतात त्याची आठवण करून विरहांत रवथ करीत बसावें लागतें.

● जास्त झालें म्हणजे ओकाऱ्या सुरू होतात ! तुलनेसाठीं गाथा क्र. ६६८ पहा.

## ७१८ व्यूहः 718. Labyrinth.

सेउल्लणिअंबालग्गसण्हसिचअस्स मग्गमलहंतो ।
सहि ! मोहघोलिरो अज्ज तस्स हसिओ मए हत्थो ॥ 723 ॥

१ सेओद्द. २ श्लक्ष्ण, सण्हद्द, सोण्ह, सूक्ष्म ३ मूढभ्रमिरो.

सखि, घामामुळे माझें पातळ नितंबाना चिकटलें होतें आणि तो इतका अधीर झाला होता कीं त्याला मार्गच सापडेना; म्हणून मला भारी हंसूं आलें.

● साधारणदेवानें 'मग्गम्'–'मार्गम्' याचा अर्थ 'नीवीबन्धनकमम्' असा दिलेला आहे. नायिकेनें नीवी परिधान केलेली असावी असें दिसत नाहीं.

## ७१९ कर्णफुल : 719. Lotus.

दूईकज्जाअण्णणपडिरोहं मा करेहिइ इमं ति ।
उत्थंघेइ व तुरिअं तिस्सा कण्णुप्पलं पुलओ ॥ 724 ॥

दूतीनें प्रियकराचा निरोप सांगितला तेव्हां अंगावर फुललेल्या रोमाचामुळें तिच्या कानावरलें कमळ जरा उंच झालें. निरोप ऐकतांना आपण आड येऊ नये म्हणूनच जणूं तें बाजूला झालें.

● कीं कानात कुजबुजला जाणारा संदेश ऐकूं यावा म्हणून तेंही मान उचावून तो ऐकण्यासाठीं उत्सुकलें होतें !

## ७२० गोडबोली · 720. Sweet Tongue.

मा वच्चसु वीसम्भं पुत्तअ ! चडुआरओ इमो लोओ।
सुईवेहो कण्णस्स पेच्छ ! किं णिज्जइ पमाणं ? ॥ 725 ॥

[मा गच्छन विस्रम्भं पुत्रक चाटुकारकोऽयं लोकः ।
सूचीवेधः कर्णस्य पश्यत किं नीयते प्रमाणम् ॥ ]

१. दुइ दूई कज्जायण्णण, दूतीकार्याकर्णन. २. उत्थग्गेइ, उत्थिप्पेइ उत्क्षिप्यत इव. ३. पुलकः, पुरत ४. गच्छह. ५. विश्वासम्

मुला, या गोडबोल्याच्या शब्दावर विशेष विश्वास ठेवू नको. पहा, सुईनें पाडलेलें कर्णछिद्र पुढें कितीं मोठें होतें!

● छाया पीतांबराच्या टीकेवरून. प्रशंसेनें हुरळून जाऊं नको. वेश्या प्रथम तुझें चित्त विद्ध करील व नंतर तें विदीर्ण करील.

## ७२१ अमृत : 721. Urge.

**अमिअमअं चिअ हिअअं, हत्था तण्हाहरा सअण्हाणं।**
**चंदमुह ! कत्थ णिवसइ अमित्तदहणो तुह पआवो ? ॥726॥**

**[ अमृतमेव हृदय हस्तौ तृष्णाहरौ सतृष्णानाम् ।**
**चन्द्रमुख कुत्र निवसति अमित्रदहनस्तव प्रताप ॥ ]**

तुझें मुख चंद्रासारखें (शांतशीतल आहे); तुझ्या हृदयांत अमृत आहे. तुझ्या हस्तस्पर्शानें तृषार्तांची तहान भागते शत्रूंना दहन करणारा अग्नि तुझ्या ठायीं आहे अशी कीर्ति आहे. तो कोठें आहे ?

● छाया पीतांबरावरून पीतांबरानें व वेबरनें ' चंदमुहि ' ' चंद्रमुखि ' हा पाठ घेतला आहे. त्यावरून नीट अर्थबोध होत नाहीं. अलंकार-कौस्तुभात ' चंदमुह ' हाच पाठ घेतलेला आहे. विषादालंकाराचें उदाहरण : ' अभीष्टार्थविरुद्धलाभो विषादालंकार ।' टीकेंत श्री विश्वेश्वरपाण्डित सांगतात : ' अत्र हस्तस्य राजजनकत्व तस्य प्रतापजनकत्व । हस्तप्रतापनिष्ठ तृष्णा हरणदहन क्रिययोर्विरोधइति दिक् ।'

## ७२२ स्वप्नाध्याय : 722. Nightmare

**दिट्ठीअ जाव पसरो ताव तुमं सुहअ ! णिव्वुइं कुणसि ।**
**वोलीणदंसणो तह तवेसि जह होउंदिट्ठेण ॥ 727 ॥**

---

१ अमअ चिअ २. तह्हाहरासअह्हाण ३. चंद्रमुहि ४ अमित्तउहणो तुह वआवो ५ होतृदृष्टेन, होदुदिट्ठेण, दुट्ठसिविणेण, दुष्टस्वप्नेन.

सुभग, नजरेसमोर असतोस तोंवर तूं आनंदित करतोस आणि दृष्टि-आड झालास कीं त्रस्त करतोस. तुझें दर्शन स्वप्नातल्या ऋत्विजासारखें आहे.

● ऋत्विजाचें दर्शन शुभ, स्वप्नात मात्र त्याचें दर्शन अशुभ. स्वप्नाध्यायात सांगितलें आहे : " रक्ताम्बरधर: कृष्ण: स होता ऽप्रियदर्शन : । ददाति दारुणं दु:खं दृष्ट: स्पृष्टो हिनस्ति च ॥ " तू दृष्टिसमोर नसलास तरी चित्तचक्षूना तुझें दर्शन होतें, स्वप्नातील ऋत्विजदर्शनाप्रमाणें तें त्रस्त करतें या गाथेंतील उद्गार बौद्ध धर्माच्या प्रचाराचे द्योतक आहेत असें मानण्यास जागा आहे. त्यांना प्रत्यक्षातील होतृदर्शनही अप्रिय होतें.

## ७२३ अवस्था : 723. Crush.

काचित्कृतार्थाभिसारा सपत्नी श्रावयन्ती अभिसारगुप्तिम् आह : कुप्पासम् इति । कूर्पासान्तरे त्वं पाश्चिकम् ( ? ) भण ता· दु सबलाधिकारेण सॉ स्तनयोर्मम कृतावस्था । कूर्पासकश्चोल: कञ्चुलिकेति यस्य प्रसिद्धि ॥ 728 ॥

● मूळ गाथा मिळाली नाहीं. तीवरील टीका तेवढी वेवरनें दिली आहे. तीही अपूर्ण असल्यामुळें अर्थ नीट लागत नाहीं. अभिसार पूर्ण झालेली स्त्री सवतींना आपलें रहस्य सांगत आहे ही माझी चोळी पहा. तिच्या स्थितीवरून तुम्हांला माझ्या स्तनाच्या दुर्दशेची कल्पना करता येईल. ' कप्पास कुप्पास '— क्र. ८०५ आणि ही गाथा या एकच असाव्यात असें वाटतें.

## ७२४ मरला : 724 Delay

गज्जंति घणा पंथाणो वहुतणा अ, पसारिआ सरिआ ।
अज्ज वि उज्जुअसीले ! पइणो मग्गम् पलोएसि ॥ 729 ॥

मेघ गर्जना करूं लागले, रस्त्यांवर हिरवेंगार गवत उगवलें आणि नद्यांना पूर आले. सरले, अजूनहि पति परत येण्याची का तूं वाट पहात आहेस !

● पति परतण्याची वेळ टळली, माथ्यावर चंद्र ढळला की स्त्रिया अधीर होतात; येथें तर ऋतु टळला आहे ! सतीत्वाची प्रशंसा कीं असतीत्वाला प्रोत्साहन ? वज्जालग्गांतील पाठ व छाया: गज्जन्ति घणा भग्गा य पन्थया पसरियाउ सरियाओ । अज्ज वि उज्जुयसीले पियस्स पन्थं पलोएसि ॥ ६४८ ॥ गर्जन्ति घना भग्नाश्च पन्थानः प्रसृताः सरितः । अद्याप्युजुशीले प्रियस्य पन्थानं प्रलोकयसि ॥

## ७२५ शीतोष्ण : 725. Cold-Heat.

उण्हो त्ति समत्थिज्जइ डाहेण सरोरुहाण हेमंतो ।
चरिएहि णज्जइ जणो संगोवंतो वि अप्पाणम् ॥730॥

हिंवाळा कमळांना जाळतो. म्हणून तो उष्ण. स्वभाव लपवला तरी तो कृतीवरून ओळखता येतो.

● हेमंतनिर्देश्या निमित्तानें अभिसारस्थानभंगाची सूचना. पत्नीशीं गोड गोष्टी बोलून पतीनें अन्य स्त्रीसंग लपविण्याचा यत्न केला तरी ती त्याचें इङ्गित सहज ओळखूं शकते. आणि त्याच्या अपराधाचा पुरावा ? तिचा स्वत:चा दाह !

## ७२६ गौळण : 726. Milkmaid.

उवेहारिआइ[1] समअं पिंडारे[2] उअ ! कहं कुणंतम्मि ।
णवबहुआइ सरोसं सव्व च्चिअ वलआ मुक्का ॥ 731 ॥

१. उपहारिकया. २. पेंडारो.

दोहन करीत असलेल्या गवळणीशीं गवळीबुवा ( लाडीलाडे ) बोलत असलेले पाहून चिडलेल्या त्याच्या नववधूनें सारीं वांसरें मोकळीं सोडून दिलीं.

● आणि यामुळें उडालेल्या गोंधळांत त्याचें बोलणें तसेंच राहून गेलें ! सरस्वतीकण्ठाभरणांतील पाठ : पढमघरिणीअ समअं उअ पिअरे दरं कुणन्तम्मि । णववहुआइ सरोसं सव्व च्चिअ वच्छआ मुक्का ॥ प्रथम-गृहिण्या समकं पश्यामीरे भयं कुर्वति । नववध्वा सरोषं सर्वेऽपिच वत्सका मुक्ता ॥

## ७२७ उज्वला :

727. Bright.

**पज्जालिऊण अग्गिं मुहेणं पुत्तिएँ ! किणो समोसरासि ! ।**
**थणअलसपडिअपडिमा फुरंति ण छिवंति ते जाला ॥ 732 ॥**

मुलीं, तूं जरासा फुंकर घातलास आणि अग्नि एकदम प्रज्वलित झाला; लोच चमकून तूं इतकी दूर का सरकलीस ? ज्वाला कंप पावत आहेस हें खरें, पण त्या तुला स्पर्श करूं शकणार नाहींत. तुझ्या वक्षस्थलावर उमटलीं आहेत तीं फक्त त्यांचीं प्रतिबिंबें आहेत.

● कन्येचें सुग्रत्व व तिची कांति याची भुजंगप्रलोभनार्थ वेश्यामातेनें केलेली प्रशंसा; किंवा रन्धनकर्मांत व्यग्र असलेल्या स्त्रीला अनुकूल करण्या-साठीं कुट्टिनीचे उद्गार; किंवा नायकप्रलोभनार्थ पामर नायिकेच्या स्तनमंडलाच्या शोभेचें वर्णन.

## ७२८ कान :

728. Lobes

**अग्गिं अब्भुत्तंतीअ पुत्ति ! पडिमागआ कवोलम्मि ।**
**कण्णोलंबिअपल्लवलच्छि संधेइ ते जाला ॥ 733 ।**

१. सुहेण. २. पुत्ताऍ. ३ अब्भुट्ठंतीएँ, अभुअंतीएँ.

मुली, तू प्रज्वलित करीत असलेल्या अग्नीच्या ज्वालांचें प्रतिबिंब तुझ्या गालांवर उमटलें आहे. वाटते की या ज्वाला तुझ्या कानांच्या पाळ्यांची शोभा संवर्धित करीत आहेत.

७२९ आयता अंधार : 729. Darkness.

कह दे धूमंधारे अभुत्तणमग्गिणो समप्पिहइ ।
मुहकमलचुंबणालेहडम्मि पासट्ठिए दिअरे ॥ 734 ॥

सांग, धुरामुळें आयता अंधार झालेला असतांना विस्तव प्रज्वलित करण्याचा प्रयत्न कां करीत आहेस ? तुझ्या मुखकमलाचें चुंबन घेण्याला उत्सुक असलेला तुझा दीर जवळ आहे, ( तिकडे पाहिलें नाहींस का ? )

७३० अग्निप्रज्वलन : 730. Hurry.

आअंबच्छं पअलंतवाहमावद्धथणहरुक्कंपं ।
असमत्तं चिअ चिट्ठउ सिहिणो अब्भुत्तणमिणं ते ॥735॥

तुझे डोळे लाल झाले आहेत व त्यातून अश्रु वाहत आहेत. तुझे स्तन ( कञ्चुकींत ) घट्ट आवळलेले आहेत तरी कंप पावत आहेत. अजून तुझें अग्निप्रज्वलन पुरें झालें नाहीं.

● प्रियकराच्या भेटीची उत्कंण्ठा असली तरी गृहकृत्यें केलींच पाहिजेत.

१. आअंबउच्छं. २. विवलंन

## ७३१ पाहुणी : 731. Guest.

छणपाहुणिए त्ति किणो अज्ज वि णं भणइ अंगसंतावं ।
जाआ अम्ह घरिल्लअगुणेण घरसामिणि व्वेअ ॥ 736 ॥

ती आपली पाहुणी आहे, केवळ सणासाठीं आलेली आहे, असें हे सांगतात आणि यामुळें अंगाची लाही होते. घरधन्याच्या गुणांमुळें वाटतें कीं जणूं ही घरधनीण झालेली आहे.

● पाहुणीला संकोच वाटूं नये, अगदीं घरच्यासारखें वाटावें, म्हणून आपण तिचे कौतुक करतों, तिला नांवाजतों व घरच्याना नावें ठेवतों; आणि मग गृहिणींचा असा गैरसमज होतो !

## ७३२ चितारी : 732. Painter.

वण्णक्कमं ण आणासि, ठाणविसुद्धी वि दे ण णिव्वडिआ ।
चित्तअर ! तह वि मग्गासि भोइणिकुड्डम्मि आलिहिउं ॥ 737 ॥

चित्रकारा, जेथें चित्र काढावयाचें ती जागा शुद्ध कशी करावयाची हें तुला माहीत नाहीं. रगांचा क्रम तुला कळत नाहीं. तरीही तूं वाणिणीच्या भिंतीवर चित्रें काढावयाला मागतोस.

● भिंतीवर कोणते संस्कार केले असता ती चित्राचें रूप धारण करील याचें तुला ज्ञान नाहीं, रंग कोणत्या क्रमानें भरले असता चित्र चांगलें रंगतें याचा तुला अनुभव नाहीं, तरीही गावांतल्या उत्कृष्ट भिंतीवर चित्रें रंगविण्याची तुझी इच्छा आहे. ती कशी सफल होणार ? नगरशेटाणीचा तुला अभिलाष[१] आहे; पण तूं दुर्विदग्ध आहेस;' तिच्या घरांत प्रवेश कसा करून घ्यावयाचा, तिला कशी खुलवावयाची हें तुला माहीत नाहीं; परस्त्रियांना

१. गामिणि.

वश करण्याचा तुला अनुभव नाहीं; आणि तिच्या शरीरावर नखदंतांचीं चिन्हें खुलविण्याची तुला हौस आहे; हें कसें जमणार ?

## ७३३ मित्रमंडल : 733. Day-Moon.

विअलिअकलाकलावो चंदो मित्तस्स मंडलं विसइ ।
णिस्सारइ तादिसो च्चिअ, गअविहवं को समुद्धरइ ? ॥738॥

चंद्र एवढा सतेज व कलापूर्ण; पण सूर्य तळपत असतांना आकाशमंडलांत त्याचें तेज नष्ट होतें. ज्यांचें वैभव नष्ट झालेलें असतें त्यांचा उद्धार कोण करणार !

● मित्र = सूर्य व स्नेही. चंद्राच्या अंगीं सोळा कला तर कलावन्ताच्या अंगीं चौसष्ट. कलावन्ताचें माहात्म्य त्याच्या अंगच्या कलेच्या तेजावर आणि आश्रयदात्यांच्या औदार्यावर व रसिकाच्या प्रोत्साहनावर अवलंबून असतें. त्याचे मित्र श्रीमंत असतात, पण केवळ श्रीमंतांच्या बैठकींत त्याचें तेज पडत नाहीं. आश्रयदात्याच्या समोर आश्रितांचें तेज पडत नाहीं.

## ७३४ पुंड्या : 734. Old is Gold.

जो होइ रसाइसओ[1] सुविणट्ठाणं वि पुंडइच्छूणं[2] ।
कत्तो सो होइ रसो मोहासाणं अणिच्छूणं ॥ 740 ॥

पुण्ड्या ऊंस इतका सरस असतो तो सुकला तरी रसाळ व गोड लागतो. इतर उसांत एवढी गोडी कोठून येणार !

● गलितयौवनेवर अनुरक्त असलेल्याचा उपहास करणारास उत्तर.

---

१. रसातिशयो. २. पुण्ड्र-इक्षु, पुण्ड्रेक्षूणाम्.

७३५ पद्मिनी : 735 Inference.

जइ वि हु दिह्लिदिलिआ[1] तह वि हु मा पुत्ति ! णग्गिआ भमसु ।
छेआ णअरजुआणो माअं धूआइ लक्खंति[2] ॥ 741 ॥

पोरी, तूं अजून लहान आहेस हें खरें, पण आतां अशी नागवी हिंडू नको; शहरातले चावट तरुण मुलीवरून आईबद्दल अनुमान करतील.

● टीकाकार सांगतात कीं आपल्याही अंगीं पद्मिनीचे गुण आहेत असें तिची माता या उद्गारानीं ध्वनित करीत आहे.

७३६ अभय : 736. Boon.

गअ,गंडअ,गवअ,सरभ,सेरिह,सद्दूल, रिक्ख जाईणं ।
थणआ वाहवहूए अभअं दाउं व णिक्कंता ॥ 742 ॥

जंगलातल्या श्वापदाना अभय देण्यासाठींच जणूं व्याधस्त्रीचे स्तन पुढें सरसावले.

● व्याधस्त्री वयात आली म्हणून तिचा पति आणि त्याच्या नेतृत्वा-खालीं मृगयेला जाणारे व्याध तरुण शिकारीला जाईनासे झाले, म्हणून श्वापदाना अभय मिळालें. हत्ती, गेंडा, गवा, शरभ (अष्टपद सिंह), सैरिभ (रानरेडा), शार्दूल व अस्वल या श्वापदाचा या गाथेंतील उल्लेख मननीय आहे.

१. दिल्लदिलिआ, दुद्दिआ, मदविल्लिआ, विदिल्लिआ २ अनुमाति, लक्षयति लेक्खति

७३७ भृकुटि : 737. Limit

भिंउडीअ पुलोइस्सं, णिब्भच्छिस्सं, परम्मुही होस्सं ।
जं भणह तं करिस्सं सहीउ ! जइ तं ण पेच्छिस्सं ॥743॥

[ भृकुट्या प्रलोकयिष्ये निर्भर्त्स्ये पराङ्मुखी भविष्यामि ।
यद्भणत तत्करिष्ये सख्यो यदि तं न प्रेक्षिष्ये ॥ ]

तो आला कीं मी भुवईवर आठी चढवीन, त्याची निर्भर्त्सना करीन, त्याला पराङ्मुख होईन, सख्यानो, जें जें सागाल तें तें मी करीन, पण ( कोठवर ? ) त्याची माझी दृष्टादृष्ट झाली नाहीं तोंवर.

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून. मानधारणाचें शिक्षण देणाऱ्या सखीप्रत नायिकेचे उद्गार वेबरनें टीकेंत दिलेली आर्या 'सखि ! कुरु तावत् यत्ना मम मनसिजवेदनाप्रतीकारे । क्रोडीकृताऽपि पत्या न भवत्युपदेशयोग्या हि ॥'

७३८ प्रेम : 738. Welcome

जं केअवेण पेम्मं, जं च बला, जं च अत्थलोहेण ॥
जं उवरोहणिमित्तं, णमो णमो तस्स पेम्मस्स ॥ 744 ॥

प्रेमाला नमन असो. मग तें लबाडीमुळें निर्माण झालेलें असो किंवा बळजोरीमुळें, द्रव्यलोभामुळें किंवा प्रातिबन्धामुळें प्रेमाचे स्वागत असो, प्रेमाला नमन असो.

१ भिउड्डि २ वलुक्किस्स. ३ णिब्भुचुच्छिस्स ४ भर्त्सयिष्यामि

## ७३९ हेमंतरात्रि :　　739. Winter Nights.

कस्स ण सद्धा गरुअत्तणम्मि पइणो पसाअमाणस्स ।
जइ माणभञ्जणीओ ण होन्ति हेमन्तराईओ ॥ 745 ॥

आपण रुसावें व पतीनें आपल्याला प्रसन्न करण्याचा प्रयत्न करावा, असें कोणाला वाटत नाहीं ! पण काय करूं ! हिंवाळ्यातल्या रात्री मानभारणाला अनुकूल नाहींत.

● कारण थंडी किती ! रुसून पराङ्मुख होताच येत नाहीं.

## ७४० डोलकाठी :　　740 Mast

अव्वो तहिंतहिंचिअ गअणे भमिऊण वीसमंतेण ।
वोहित्तवाअसेण व्व हासिआ दड्ढपेम्मेण ॥ 746 ॥

[अहो तत्र तत्रैव गगने भ्रान्त्वा विश्रमता ।
प्रवहणवायसेनेव हासिता दग्धप्रेम्णा ॥]

समुद्रावर लांबवर भ्रमण करून आलेला कावळा पडावाच्या डोलकाठीवर पुन्हा येऊन बसतो. तशीच माझी स्थिति झालेली आहे. आणि हें दुष्ट प्रेम माझा उपहास करीत आहे.

● छाया वज्जालग्गावरून. माझी इच्छेनें आश्रयस्थान मनाधारी आहे असें नाहीं. पण काय करणार ? भटक भटक भटकून, पण दुसरीकडे निवारा मिळेना, म्हणून शेवट कावळ्याप्रमाणें मी या डोलकाठीकडे परतलें व तिला बिलगून आहे. आता माझें प्रेम माझाच उपहास करीत आहे, ही दुर्दैवाची परिसीमा.

१. वहित्तवायसेनेव. २ लज्जिता.

७४१ सफेती : 741. Whitewash.

दइए दुमसु तुमं चिअ मा परिहर पुनि ! पढमदुमियं ति ।
किं कुड्डं णिअमुहअंदकंतिदुमिअं ण लक्खेसि ? ।। 747 ॥

दयिताच्या स्वागताकरितां भिंतींना सफेती देण्याचें काम चालू ठेव. भिंती नुकत्याच रंगविलेल्या आहेत असें भासत आहे, कारण त्यांवर तुझ्या मुखचंद्राचा प्रकाश परावर्तित झालेला आहे.

७४२ अनङ्गबाण : 742. Cupid's Arrows.

विज्झंति तणुं, उवणेंति वेअणं पेयवाण खयमग्गे ।
अव्वो ! अइट्ठपुव्वो अणङ्गबाणाण माहप्पो ॥ 748 ॥

अहो, अनङ्गाच्या बाणांचा प्रभाव अद्वितीय आहे. त्याचें लक्ष्य ते विद्ध करतात, इतकेंच नव्हे, आसपास असतात त्यांनाही ते विद्ध व व्याकुल करतात.

७४३ धरिलेंस मनगट : 743. Grip.

आमोडऊण बलाउ हत्थं मज्झं गओ सि भो पहिअ ! ।
हिअआउ जइ अ णीहंसि सामत्थं तुज्झ जाणिस्सं ॥ 749॥

पथिका, जाता जाता तूं माझा हात जोरानें दाबलास आणि तसाच निघून गेलास. एवढ्या सहजासहजीं तूं माझ्या हृदयातूनही गेला असतास तर मी तुझ्या सामर्थ्याची वाखाणणी केली असती

१ आमोडिऊण बलणा मम हत्थं (भुवनपाल) २. णिव्वेहसि, निर्वैस्यसि पलायिष्यसे

[ द्वौ मार्गौ भुवनतले मानिनि मानोन्नताना पुरुषाणाम् ।
अथवा प्राप्नुवन्ति श्रियमथवा भ्रमन्तः समाप्यन्ते ॥ ]

मानिनी, या जगांत अभिमानी पुरुषांना दोनच मार्ग मोकळे असतात; एक यशप्राप्तीचा आणि दुसरा (अपेशी झाल्यास) भ्रमंतीचा.

● छाया वज्जालग्गावरून.

७४७ अंतर्हेतु : 747. Long Wave.

कत्तो कमलाण रई कत्तो कुमुयाण सीअलो चंदो ? ।
तह सज्जणाण णेहो ण चलइ दूरट्ठिआणं पि ॥ 753 ॥

प्रियकर व प्रेयसी यांमध्यें स्थलाचें अंतर कितीही असलें तरी तें प्रीतीच्या आड येत नाहीं. कुठें सूर्य व कुठें कमळ; कुठें शीतल चंद्र व कुठें कुमुद !

● वज्जालग्गातील पाठः कत्तो उग्गमइ रवी कत्तो वियसन्ति पङ्कयवणाई / सुयणाण जत्थ नेहो न चलइ दूरट्ठियाणं पि ॥ ८० ॥ कुत उग्दच्छति रविः कुतो विकसन्ति पङ्कज वनानि । सुजनाना यत्र स्नेहो न चलति दूरस्थितानामपि ॥ ]

७४८ आत्मसमर्पण : 748. Self Immolation.

हा हा किं तेण कयं मालइविरहम्मि पुत्ति ! भसलेणं ? ।
कंकेल्लिकुसुममज्झे जलणो त्ति समप्पिओ अप्पा ॥ 754 ॥

मुली, मालतीच्या विरहामुळें उद्विग्न झालेल्या भ्रमरानें काय केलें तें कळलें का ? त्यानें अशोकाच्या लालभडक फुलांच्या ज्वालेंत आत्मसमर्पण केलें.

● अशोकाचीं मदक फुलें पाहून ह्या अग्निज्वाला आहेत असें वाटल्यामुळें आत्मसमर्पणासाठीं भ्रमरानें त्यांच्याकडे धांव घेतली, पण तींही फुलेंच आहेत असें त्याच्या प्रत्ययास आलें. सुग्री, हा पुरुषाचा धर्मच आहे. आपल्याला वाटतें आपल्या विरहानें ते आत्मत्याग करतील, पण नाहीं, ते सरळ दुसरीकडे जातील !

## ७४९ संभ्रम : 749. Delirium.

दंसरसेसो वि हु महुअरेण मुक्को, ण मालईविडवो ।
दरविअसियकलियामोयवहलिमं संभरंतेण ॥ 755 ॥

[ध्वाङ्क्षरसैषोऽपि खलु मधुकरैर्मुक्तो न मालतीविटपः ।
दरविकसितकलिकामोदबाहुल्यं संस्मरद्भिः ॥]

मालतीच्या नुकत्याच उमललेल्या कळ्यांच्या सुकुमार सौंदर्यानें व सुगंधानें भ्रमराला संभ्रम झाला आणि पूर्णविकसित फुलांतील मधूचा आस्वाद घेण्याचें सोडून तो मालतीच्या वेलीभोंवतीं भ्रमू लागला.

● छाया घज्जाल्गावरून प्रत्यक्ष आस्वादापेक्षां अपेक्षित आस्वाद अधिक आकर्षक असतो. सुंदर, सुगंधित व सुकुमार अशी मालतीची कळी पाहून त्याला वाटलें कीं येथें अधिक व मधुर मधु प्राप्त होईल. तो त्या वेळीं ज्या फुलातल्या मधूचा आस्वाद घेत होता तें मधुपूर्ण होतें, पण मालतीच्या कलिकेइतकें देखणें व ताजेतवानें नव्हतें. म्हणून अरु, चपळ व अदूरदर्शी भ्रमरानें त्याचा त्याग केला. गदर्भावरून वाटतें कीं निदान मधूप्राप्तीपुरती मालतीकलिकेनें भ्रमराची निराशा केली असावी. सौंदर्य व सौकुमार्य यांचें गुणांशीं सहकार्य असतेंच असें नाहीं.

७५० पातळांगी : 750. Mensuration.

समुहागयपवोलंतम्मि सा तुमे अपंडिर्यगसंठाणा ।
रुंदं वि गामरच्छं णिंदइ तणुअं च अप्पाणं ॥ 756 ॥

तूं तिच्या समोरून आलास व तिच्या अंगाला आपला स्पर्शही न होऊं देतां निघून गेलास, तेव्हां तिनें गावांतल्या रस्त्यांच्या रुंदीचा व स्वतःच्या सडपातळपणाचा निषेध केला.

७५१ चंचल : 751. Fickle.

सममच्छंति, णिअत्तंति, पसरिया रणरणंति तहियहं ।
चलचित्त ! तुज्झ लग्गा मणोरहा तीएँ हिययम्मि ॥ 757 ॥

हे चलचित्त, तुझ्याविषयीं तिच्या हृदयांत कामना उद्भवते न उद्भवते तोंच तिचें चित्त उद्विग्न होतें आणि तिचे मनोरथ नष्ट होतात.

● तिच्या अंतःकरणांत अनुराग आहे, पण तुझी वृत्ति चंचल असल्यामुळें तीही स्वतःचें मन स्थिर करण्यास असमर्थ आहे आणि म्हणून उद्विग्न आहे, असा दूतीचा संदेश.

७५२ वणवा : 752. Forest Fire.

डहिऊण सयलरण्णं अग्गी समविसमलंघणुव्वायो ।
तडलंघंतसणेहिं तिसिय व्व णाई समोसरइ ॥ 758 ॥

१. उद्भ्रान्त-भ्रांत. २. सुमुहागय. ३. अपडिय, अपत्तअंगसंसग्ग. ४. अघटितागसंधाना असप्राप्तागसंसर्गा.

सगळें अरण्य जाळण्यासाठीं उंचसखल जमिनीवरून उड्या मारण्याच्या श्रमामुळें थकलेला वणवा अखेरीस जणूं तहान भागविण्यासाठीं नदीतीरीं आला व त्यानें तिच्या कांठावरील गवतावर अंग टाकून दिलें.

## ७५३ अट्टल : 753. Arrant.

सं च्चिय रामेउ तुमं पंडिय ! गिच्चें, अलं म्ह रमिएण ।
सब्भावब्राहिराइं जा जाणइ अट्टमट्टाइं ॥ 759 ॥

हे पण्डित, तुला रमविण्याचे मार्ग जिला माहीत आहेत तिच्याकडे तूं जा आणि तिच्याशीं खुशाल प्रेमचेष्टा कर; आमच्याकडे मुळींच येऊ नकोस. प्रेमाचीं ढोंगं करण्यांत तूं अट्टल आहेस हें आम्हांला माहीत आहे.

● नेहमीं बाह्योपचारांची प्रशंसा करणाऱ्या वेश्यानुरक्त पतीच्या लटक्या अनुनयामुळें उद्विग्न झालेल्या पत्नीचे उपालंभोद्गार.

## ७५४ चहाडी : 754. Report.

रअणायरस्स साहेमि नम्मए ! अज्ज मुक्कदक्खिण्णा ।
वेडिसलयाहरंतेण मिलिया जं सि पूरेण ॥ 760 ॥

नर्मदे, शिष्टाचार बाजूला ठेवून मी आज रत्नाकराला भेटेन आणि पूर आला होता तेव्हा वेताच्या बेटांत तूं काय काय प्रेमचेष्टा केल्यास तें सारें त्याला सांगेन.

१. पण्डित. २. इत्थिएँ, इदिएँ. ३. अट्टमट्टादि, उपचारविशेषान्. ४. काहेमि, काहेसिमि, कथयिष्यामि. ५. वेतसलतागृहान्तम्.

● रत्नाकर हा नर्मदेचा पति. पूर आला होता तेव्हां तिचें पाणी कांठावरल्या वेताच्या जाळींत घुसलें व तेथें क्षुद्र, सळसळत्या ओढ्याशीं तिचा संगम झाला. नर्मदाकांठीं वेताच्या बेटांत संकेतस्थान ठरलें होतें, पुरामुळें तें उध्वस्त झालें, म्हणून नायिकेचा संताप झाला.

## ७५५ संगोपन: 755. Prudence.

रक्खइ अणण्णहियओ जीवं पिव महुअरो पयत्तेण।
दंरणेंतदीविदाढग्गसच्छहं मालईमउलम् ॥ 761 ॥

चिरयाच्या नुकत्याच निघालेल्या दाढेच्या अग्रासारख्या दिसणाऱ्या मालतीच्या कळीचें मधुकर अनन्य भावानें, जीव लावून रक्षण करतो; एवढ्याचसाठीं कीं ती उमलताच तिच्यांतील मधूचा आस्वाद घेण्यांची संधि मिळावी.

● उपजीविकेसाठीं किंवा उपभोगासाठीं, भविष्यावर दृष्टि ठेवून, एका बालिकेचें पालनपोषण करणाऱ्या लम्पटास अनुलक्षून हे उद्गार काढलेले आहेत असें टीकाकार सांगतात.

## ७५६ दुर्जन: 756. Wicked.

तह णेहलालियाण वि अवाहिरिल्लाण सयलकज्जेसु।
जं कसणं होइ मुहं, तं भणइ किं पईचाणं ॥ 762 ॥

कितीही स्नेहानें लालपालन केलें तरी दुर्जन नेहमीं असंतुष्ट असतात. नेहमीं तेल घालींत राहिलें तरी दीपज्योतीचें मुख काळें नसतें का ?

---

१. दरनिग्गअदिवि. २. गज. ३. प्रदीपानाम्

७५७ तृपार्त : 757. Thirst.

तिसिया पियउ त्ति मओ, मओ वि तिसिओ मई करेऊण ।
इय मयमिहुणं तिसियं पियइ ण सलिलं सिणेहेण ॥ 763 ॥

मृगाला वाटतें कीं मृगी अधिक तृषित आहे, तिनें अगोदर पाणी प्यावें; आणि तिला वाटतें कीं तोच अधिक तृपार्त आहे व त्यानेंच अगोदर पाणी प्यावें; म्हणून एकमेकांवरील प्रेमामुळें दोघेंही पाणी प्यालीं नाहींत.

७५८ आह्वान : 758. Challenge.

तुह सामलि ! धवलचलंततरलतिक्खग्गलोयणब्रलेण ।
मयणो पुणो वि इच्छइ हरेण सह विग्गहारंभं ॥ 764 ॥

' श्यामलेचे डोळे स्वच्छ व तेजस्वी आहेत आणि तिची नजर चंचल व तीक्ष्ण आहे. तिची दृष्टि पाहून वाटतें कीं जणूं मदनाला शंकराबरोबरचें युद्ध पुन्हां आरंभावयाचें आहे.

● तुलनेसाठीं पाहा : (मेघदूत) मत्वा देवं धनपतिसुखं यत्र साक्षाद्वसन्तं । प्रायश्चापं न वहति भयान्मन्मथः षट्पदज्यम् ॥ सभ्रूभङ्ग प्रहितनयनैः कामिलक्ष्येष्वमोघैः । तस्यारम्भश्चतुरवनिता विभ्रमैरेव सिद्धः ॥ ७९ ॥

७५९ गोंडा : 759. Servility.

सुहय ! सुहं चिय कुडालि व्व पेहुणो णिग्गयस्स चडुवस्स ।
जणरंजणिग्गहो ते घरम्मि सुणहो अतिहिवंतो ॥ 765 ॥

सुभग, पहा, तुझ्या घरांतून बाहेर पडणान्यांशीं कुत्रा कसा आनंदानें व आपुलकीनें शेपटी हलवून लाडीगोडी लावीत आहे.

## ७६० तोंडघशीं : 760. Slip.

णिवडिहिसि, सुण्णहियए ! जलहरजलपंकिलम्मि मग्गम्मि ।
उप्पेक्खागयपिययमहत्थे हत्थं पसारेंती ॥ 765 ॥

मनोमय प्रियकराचें स्वागत करण्यासाठीं ती हात पसरून पुढें झाली आणि पावसामुळें निसरड्या झालेल्या मार्गावर पाय घसरून तोंडघशीं पडली. शून्यहृदये, तुझीही तशीच अवस्था होईल.

## ७६१ उत्संग : 761. Endearment.

उच्छंगियाएँ पइणा अहिसारणपंकमलिणपेरंते ।
आसण्णपरियणो च्चिअ सेअ च्चिय धुवइ से पाए ॥ 767 ॥

मार्गावरील चिखलामुळें अभिसारिकेचे चरण मलिन झाले होते. प्रियकरानें तिला मांडीवर घेतलें तेव्हां तिला इतका घाम आला कीं त्यामुळें तिचे पाय आपोआप स्वच्छ धुतले गेले

## ७६२ झंप : 762. Jump.

जइ लंघेसि परवइं निययवइं भरसहं पि मोत्तूणं ।
तह मण्णे, कोहलिए ! अज्जं कल्लं पि फुड्डिहसि[1] ॥ 768 ॥

---

१. निपतिष्यसि.

. कोहाळ्याचा वेल ज्या कुंपणावर चढविलेला होता तें चांगलें मजबूत होतें. तरी तें ओलांडून त्यानें पलीकडच्या कुंपणावर झेंप घेतली. तेव्हा कोहळा तुटून खालीं पडला व फुटला. सांभाळ, तुझीही तशीच अवस्था होईल.

● शेजाऱ्याशीं किंवा शेजारणीशीं संधान बांधणाऱ्या पतीला किंवा पत्नीला, प्रियकराला किंवा प्रेयसीला उद्देशून हे उद्गार काढलेले आहेत. कोहलिए याचा अर्थ कुतूहली असाही घेता येईल. वई म्हणजे कुंपण किंवा पति. अर्थ किती आधुनिक !

## ७६३ रानउंदीर : 763. Rats

अणुसोयइ हलियवहू रइकिरणोलुग्गपंडुरच्छायं ।
रेण्णुंदुरदंतुक्खुत्तविसमवलियं तिलच्छेत्तं ॥ 769 ॥

उन्हाच्या कडाक्यामुळें तिळाचें शेत म्लान झालें आणि रानातल्या उंदरांनीं तें कुरतडलें. हें पाहून शेतकऱ्याची पत्नी दु:खित झाली.

● पीक बुडालें म्हणून नव्हे, संकेतस्थान नष्ट झालें म्हणून.

## ७६४ शेकोटी : 764. Warming Fire

ओवोलअम्मि सीआलुआणं वइमूलमुछिहंताणं ।
डिंभाण कलिंचयराग्डाण सुण्णो जलइ अग्गी ॥ 770 ॥

थंडीने कुडकुडणाऱ्या मुलांनीं ओवऱ्यांत काटक्याची शेकोटी पेटविली आहे. पण ती कांहीं त्यांना पुरेशी ऊब देत नाही.

१. रण्णुंदुर, आरण्योन्दुर. २ आहारयधपाराउयाण ३ वाटीप्रान्ते शीतार्दनाम् ४. कणिवअ, शिशिरवअ, शुद्धेन्धनम्याहृतानाम्

७६५ आश्रय : 765. Rags.

मा ! मा ! मुय परिहासं ! देअर ! अणहोरणा वराई सा ।
सीयम्मि वि पासिज्जइ, पुणो वि एसिं कुणसु छायं ॥ 771 ॥

[ मा मा मुञ्च परिहासं देवर अप्रावरणा वराकी सा ।
शीतेऽपि प्रस्विद्यति पुनरपि अस्या कुरु छायाम् ]

हे देवर, नको नको, भावजयीचा असा उपहास करूं नकोस. बिचारीच्या अंगावर धड वस्त्रही नाहीं; आणि हिंवाळा आहे, तरीहि ( तुझ्या सान्निध्यामुळें ) ती घामाघूम झाली आहे, तिला आश्रय दे.

● छाया पीताम्बरावरून. तिला हंसूं नको, तिचें हंसें होऊं देऊं नको. तिला सावली कर. दीर व भावजय याचा अनुराग ओळखणारी वृद्धा सांगते, आणखी हें पहा, तिच्यासाठीं एक छान पातळ घेऊन ये.

७६६ मच्छरदाणी : 766. Bed Curtain.

किं तस्स पारएणं किमग्गिणा किं च गब्भहरएण ।
जस्स णिसम्मइ उअरे उण्हायतत्थणी जाया ? ॥ 772 ॥

ज्याची जाया पतीच्या छातीला आपले ऊबदार स्तन भिडवून झोंपते त्याला शीतनिवारणासाठीं पांघरूण, शेकोटी किंवा मच्छरदाणी यांची काय जरूर ?

७६७ हिंवाळा : 767. Nature.

कमलायराण उण्हो हेमंतो, सीअलो जणवयस्स ।
को किर भिण्णसहावं जाणइ परमत्थयं लोए ? ॥ 773 ॥

हिंवाळा हाच कमळाचा उन्हाळा; इतराना मात्र तो शीतल वाटतो. वस्तूंच्या स्वभावातील भिन्नतेचें रहस्य कोण जाणूं शकतो !

● सर्वांशीं तो खेळीमेळीनें वागतो, तुझ्याशींच एवढा उदासीन का? या सखीच्या प्रश्नाचें उत्तर. विशिष्ट परिस्थितींत समृद्धि व विनाश हे स्वभावभेदाचे परिणाम आहेत. निसर्गाचें रहस्य कोणाला उलगडणार ?

७६८ हेमंत : 768. Shiver.

हेमंते हिमरअधूसरस्स ओअसंरणस्स पहियस्स ।
सुमरियजायामुहसिज्जिरस्स सीयं चिअ पणट्ठं ॥ 774 ॥

( हेमंताच्या रात्रीं ) पथिकाच्या अंगावर पांघरूण नव्हतें; हिमरजानीं त्याचें शरीर धूसर झालें होतें. त्याला पत्नीच्या मुखाची आठवण झाली आणि लगेच ( त्याच्या अंगात ऊब आली व ) त्याला घाम आला

७६९ चरक व तरुण : 769. Manhandling.

उवइसइ लडियाण, कड्ढेइ रसं, ण देइ सोत्तुं जे ।
जंतस्स जुव्वणस्स य ण होइ इच्छु च्चिय सहावो ॥775॥

ललनानो, हा उपदेश ध्यानात ठेवा. उसाचा चरक आणि यौवन याचा स्वभाव सारखा; तावडींत सापडेल त्याला ते रसासाठीं पिळून काढतात, कोणाचें कांहीं ऐकत नाहींत. बिचारा ऊंस, पिळला जातो !

● वेबर सांगतो, गाथेचा पाठ भ्रष्ट असल्यामुळें अर्थ नीट लागत नाहीं. उसाचा चरक व तरुण यांची तुलना आणि त्यांच्या स्वभावाबद्दल

१. अप्रावरणस्य.

द्वारा हा गाथेचा विषय आहे; दोघेही खोटाडे व निर्दय, त्यांच्या आहारीं जाऊं नये, असा आशय आहे. ' ण देई सोत्तुं ' म्हणजे कोणाचें ऐकत नाहींत, कोणाला जुमानीत नाहींत, बोलणें ऐकूं देत नाहींत, कीं सारखी चिरचिर लावून किंवा वटवट करून झोंप येऊं देत नाहींत ! ' सोत्तुं ' व ' इच्छुच्चिय ' यांचे मूळ पाठ ' सत्तं '=' सत्त्वं ' आणि ' मिच्छच्चिय '= ' मिथ्या एव ' असें असणें शक्य आहे. चरक व तरुण, दोघेही निर्दय; तावडींत सांपडेल तें पिळून काढतील, चिपाड करून फेंकून देतील. दोघेही खोटाडे, आवाहन करतील व आश्वासन देतील, हातीं लागलेल्याला भरपूर उपद्रव देतील, सत्व मात्र देणार नाहींत. त्यावर विश्वास ठेवूं नये, त्यांच्या आहारीं जाऊं नये. दोघेही जसे निर्दय तसेच अरसिक. चरक एवढा रस काढतो, पण स्वतः द्रवत नाहीं; तरुण एवढा अधीर कीं आस्वाद घेण्यालाही थवकत नाहीं. या निमित्तानें वेश्यामाता, •वृद्धा नारी किंवा सराईत सखी एकाद्या वयस्क कामुकाची मलावण करीत आहे कीं काय !

## ७७० चिपाड : 770. Hag-

बहुएहि जंपिएहिँ सिट्ठं अम्ह सव्वहे करेऊण ।
सद्दो च्चिय से भद्दो भोईणिजंते रसो ण त्थि ॥ 776 ॥

पुष्कळांनीं अगदीं शपथेवर शेटाणीची प्रशंसा केली होती. तिचा शब्द मधुर आहे खरा पण ती अगदीं रूक्ष आहे.

● अविदग्ध ग्रामप्रधानमहिलेची निंदा; ' जंतिएहिँ '=' यंत्रवाहकैः ' ( नानाबन्धसुरतज्ञैः ): पुष्कळ गुन्हाळवाल्यांनीं तिच्या चरकाची प्रशंसा केली होती; त्याचा आवाज दंद आहे खरा, पण अनेक हंगामात वापर झाल्यामुळें त्याचीं चाकें आता इतकीं ढिलीं झालीं आहेत कीं तो रस काढण्याला निरुपयोगी झाला आहे. अनेक विदग्धांनीं तिच्या रसिकतेची

१. जंतिएहिँ २. कथित ३ शपथ. ४. रुदो. ५. ग्रामणियन्त्रे.

प्रशंसा केली होती, तिचा शब्द मधुर आहे पण बोलणें नीरस आहे. उसाचें चिपाड झाल्यावर त्यांतून रस कसा निघणार?

## ७७१ वसंतागम : 771. Approaching Summer.

पढमं चिय माहवपट्ठ्यं व घेनूण डाहिणो वाओ।
अंकोल्लपढमवत्तं पहिंडिओ गामरच्छासु ॥ 777 ॥

दक्षिणेकडला वारा नववस्त्रधारी वसताला घेऊन येत आहे. पहा, अंकोल्लाना नवी पालवी फुटत आहे आणि सुकलेलीं पानें तुटून गावांतल्या रस्त्यावरून उडत आहेत.

● नव्या केरसुणीनें केर चागला निघतो, ही म्हण वेबरनें टांकित दिली आहे.

## ७७२ अंकोळकळी : 772. Buds.

सो माणो पियमुहअंददंसणे कह थिरो घरिज्जिहइ।
अंकोल्लकोरओण वि जो फुंट्टमुहाण वीहेइ ॥ 778 ॥

अंकोळाच्या उमलत्या कळ्या पाहूनच तुझें मन डळमळूं लागलें आहे मग प्रियकराच्या मुखचंद्राचें दर्शन झाल्यानंतर तुझा मान कसा धारण करतां येणार?

## ७७३ प्रियदर्शन : 773. Reflux.

कारणगहिओ वि मए माणो एमेअ जं समोसरियो।
अत्थेक्कफुल्ल अंकोल्ल! तुज्झ तं मत्थए पडउ ॥ 779 ॥

१. अकोट. २ कोरकाना, वारयाण ३ फुट्टियियाण, स्फुटमुखानाम्. ४. समप्रसृत ५ अत्येक्क, अद्दक्क, अकस्मात्, अतर्कित.

मी रुसलें होतें, त्याला कारण सबळ होतें. पण अवेळीं उमललेली अकोळाची कळी अकस्मात् दिसली आणि धारण केलेला मान एकाएकीं ओसरला. कालिके, ह्याचा दोष तुझ्या मस्तकावर.•

● ही कळी उमलली व ती फळी खुलली. रुसणें लटकें आणि शापही लटका.

## ७७४ स्वागतोत्सव : 774. Procession.

रंजेहे, देह रूवं, रएह कुसुमाइ, देह विच्छिरिं ।
ण वि तह पुहवीसस्स वि हलहलओ जह वसंतस्स ॥780॥

प्रसाधन करून आणि अलंकार व पुष्पमाला धारण करून लोक पृथ्वीशाच्या स्वागतासाठीं सज्ज होतात, पण, वसंतागमनाचे वेळीं असतो तेवढा उत्साह या स्वागतोत्सवांत दिसत नाहीं.

● कारण वसंतोत्सवात नैसर्गिक प्रेरणांचा उत्साह असतो आणि राजाच्या स्वागतोत्सवात कृत्रिमाचा आविष्कार असतो. मान धारण करून वसंतोत्सव विफल करूं नकोस, अशी नायिकेची विनवणी.

## ७७५ मुंगुस : 775. Tender Leaves.

सिसिरे वणदवडड्ढं वसंतमासम्मि उअह संभूयं ।
मंकुसकण्णसरिच्छं दीसइ पत्तं पलासस्स ॥ 781 ॥

शिशिर ऋतूतल्या वणव्यात जळून गेलेल्या पळसाच्या फांद्यावर आता वसंतात पुन्हा कोंवळी पालवी फुटली आहे. हीं पानें मुंगसाच्या कानांसारखीं दिसत आहेत.

१. सज्जेह २. तुर्यम्, द्रुतम्. ३ पृथ्वीशस्यापि. ४. मंगुस

● जंगलांत जेथें पलाशवृक्षांची समृद्धि आहे तेथें संकेतस्थान ठरविल्याची सूचना. शिशिरात पानें गळतात, वसंतांत पालवी फुटते. हा सृष्टीचा नियम आहे. मनुष्याच्या वैभवाचा क्षय होतो किंवा वृद्धि होते, हाही जीवनाचा क्रम आहे. म्हणून कोणी कधीं उद्विग्न होऊं नये. नायकाचें वैभव नष्ट झालें होतें, पण आता त्याला तें पुन्हा प्राप्त झालें आहे, अनमान करूं नको, अशी नायिकेला सूचना. महाभारतात (७-१९४२) शिशिरांतील वणव्याचें वर्णन आढळतें. 'दावं दग्ध्वा यथा शान्तं पावकं शिशिरात्यये।' शिशिर म्हणजे माघ व फाल्गुन हे महिने. फाल्गुनात वणवे लागलेले अनेक वेळा दिसतात.

## ७७६ ब्रह्मा : 776. Creator.

दूरपइण्णपरिमलं सपल्लव सुद्धपुप्फपंगुरणं।

अंगच्छित्तं पिव वम्महेण दिण्णं महुसिरीए ॥ 782 ॥

सुंदर, सपल्लव आणि दूरवर सुगंध दरवळणाऱ्या पुष्पांचीं वस्त्रें मदनानें मधुश्रीला अर्पण केलीं आणि जणूं ब्रह्मदेवाचें कर्तृत्व दाखविलें.

● फुलांना जशी पालवी तशा वस्त्रांना पदर. वसंतातलीं पुष्पें विशेष उन्मादक असतात.

## ७७७ मंजिरी : 777. Pedicle.

कारणगहिअं वि इमा माणं मोएइ माणिणिअणस्स।

सहयारमंजरी पियसहि व्व कण्णे समल्लीणा ॥ 783 ॥

१. प्रकीर्ण, वितीर्ण. २. समालीणा, समुल्लीणा, समाश्रिता, सल्ग्ना.

रुसल्याचें धारण कितीही गंभीर असलें तरी प्रियसखीप्रमाणेंच आम्रमंजिरी कानाला लागली कीं मानिनींचा मान नष्ट होतो.

● वसंतात मानधारणाचें ढोंगही करता येत नाहीं. प्रियसखीच्या मधुर वचनांनीं प्रेयसी प्रसन्न होते, त्याचप्रमाणें आम्रमंजिरीच्या सुगंधामुळें राग नष्ट होऊन अनुराग निर्माण होतो.

## ७७८ सांत्वनः 778 Consolation.

अज्जं चिय छणदिहओ, मा पुत्ति ! रुएहि, एहइ पिओ त्ति ।
सुण्हं आसासंती पडियत्तमुही रुअइ सासू ॥ 784 ॥

"मुली, आज सणाचा दिवस आहे, रडूं नको; तुझा पति आज खास परत येईल," असें आश्वासन देऊन सासूनें सुनेचें सांत्वन केलें आणि नंतर ती स्वत च मुख फिरवून रडूं लागली.

## ७७९ पाग्या: 779 Dwarf.

दियहे दियहे णिवडइ गिहवइधूआ णिहेण, माउच्छा !
संगहणइ चि वाअउ वसुहारा खुज्जसहयारे ॥ 785 ॥

मावशी, खुजा आम्रवृक्ष पाण्यावर वाढेना, म्हणून घरधन्याची मुलगी त्याभोंवतालचें अळें रोज तुपानें भरते.

● वेबर सांगतो, या गाथेचा अर्थ नीट लागत नाहीं. खुजट आम्रवृक्ष वाढीला लागावा, त्याला लवकर मोहोर यावा, म्हणून घरधन्याची मुलगी कृत्रिम उपाय करीत आहे, पण अजून काहीं मोहरत नाहीं. वयांत आलेला

आवा हेमंतांत थंडीनें कांकडला कीं त्यावर शहाऱ्यांसारखा मोहोर येतो, शिशिरांत तो बहरतो व वसंतात फलद्रूप होतो. खुजट झाड आपलें म्हटलें, तुषानें शिपडलें म्हणून तें बहरलें, असें कधीं झालें ? ह्या गायेंतला लाडावलेला खुजा आंबा हा घरजांवई असावा.

## ७८० शृंखला : 780. Irons.

आउच्छणोवऊहणकंठसमोसारियबाहुलइयाए ।
वलयाइ पहियचलणे वहूएँ णियलाइ व पडंति ।। 786 ।।

पति प्रवासाला जाणार होता. पत्नीनें त्याच्या गळ्याभोंवतीं आपल्या बाहुलतिकांचा विळखा घातला. मिठी सुटली तेव्हां तिच्या मनगटावरील बांगड्या ओघळल्या आणि त्या पतीच्या चरणांजवळ पडल्या. जणू आपल्या पायांत शृंखलाच पडल्या आहेत असें त्या भटक्याला वाटलें.

## ७८१ पाश : 781. Trap.

उड्डियपासं तणछण्णकंदरं णिहुअसंठियावक्खं ।
जूहाहिव ! परिहर गुहमेत्तसरीयं कल.... ।। 787 ।।

● येवर सागतो, गाथा भ्रष्ट व त्रुटित असल्यामुळें अर्थबोध होत नाहीं. आशय असा : "हे यूथाधिप, खड्ड्यांत रुतलेल्या हत्तिणीची किंवा छाव्याची सुटका करण्यासाठीं तिकडे जाऊं नको. ही हत्तीण खरी नाहीं; पेंढा भरलेली आहे; एवढेंसुद्धा तुला ओळखतां येत नाहीं ! तिच्या शेजारीं विवर आहे व त्यात हत्ती पकडण्यासाठीं पाश लावलेले आहेत. आजूबाजूला

१. आपुच्छणो. २. बाहुलइआए.

गवत पसरल्यामुळें विवर गुप्त आहे. तिकडे फिरकलाउ तर पाशांत सांपड- शील. " हत्ती पकडण्यासाठीं जंगली लोक या युक्तीचा अवलंब करतात.

## ७८२ मावळ : 782. Hills & Dales.

गुणसालिणो वि करिणो होहइ जूहाहिवत्तणं कत्तो ।
णवसालिकवललोहिल्लिआएँ विंझं मुअंतस्स ।। 788 ।।

या हत्तीचे अंगीं अनेक गुण आहेत, हें खरें, पण कोंवळें भात खाण्याच्या लालसेनें विंध्य पर्वताचा त्याग करून तो मावळाकडे वळला, असा हत्ती आपल्या कळपाचा पुढारी कसा होऊं शकेल ?

## ७८३ दैवयोग : 783. Highborn.

विहिणा अणुज्जुएणं पुत्तय ! जाओ कुलम्मि पढमम्मि ।
जाइविसुद्धो भद्दो वि बंधण पावइ खणम्मि ।। 789 ।।

पुत्रा, दैवाची गति सरळ नसते; ( दैवावर कधीं विसंबूं नको. ) उच्च कुलात जन्मलेला, सद्वर्तनी, सद्गुणी व भव्य असा पुरुषहीं क्षणार्धात बंधनांत पडूं शकतो.

● हत्तिणीचा पुत्राला उपदेश. उच्च वंशालाच विशेषेंकरून बंधनें भोगावीं लागतात, धनुष्यासाठीं उत्तम वेळू निवडून काढण्यात येतात आणि राजाच्या स्वारीसाठीं उत्तम गज. हीं क्षत्रियाचीं भूषणें व कौतुकाचे विषय, पण गुलामगिरीचीं प्रतीकेंही.

१ अनृजुक

७८४ ज्वलत्-जाल : 784. Flame Trap

चउपासदिण्णहुयवहविसमाहः हवेढणापिउलं।
णिव्वाहेउं जाणइ जूहं जूहाहिवो च्चेव ॥ 790 ॥

हत्तींचा कळप चोहोंबाजूंनीं वणव्यांनीं वेढला गेला म्हणजे त्याचा पुढारीच त्यांना त्यांतून सुरक्षितपणें बाहेर काढूं शकतो.

● जंगलात वणवे पेटवावयाचे व त्यांमुळें भेदरून सैरावैरा पळणाऱ्या हत्तींना जाळ्यात पकडावयाचें, ही हत्ती पकडण्याची रानटी पद्धत या काळांत प्रचलित असावी असें या उल्लेखावरून वाटतें.

७८५ पुढारी : 785. Leadership.

अल्लग्गकवोलेण वि गयमइणा पत्तदसावसणम्मि।
अज्ज वि माएँ सणाहं गयवइजूहं धरंतेण ॥ 791 ॥

हत्तीच्या छाव्याचें गंडस्थळ मदानें ओलें झालें होतें, तरी संकटकाळीं त्यानें आपल्या कळपाचें रक्षण करून पुढारीपण मिळविलें

● मद आलेला असताना हात्तणींचा अनुनय करण्याची नैसर्गिक प्रवृत्ति आवरून त्यानें आपल्या जथ्याचें रक्षण केलें; म्हणूनच त्याला कळपाचें नेतृत्व मिळालें.

७८६ मदस्राव : 786. Debility.

ण वि तह दूमेइ मण गयस्स बन्धो वि करिणिविरहो वि।
दाणविओयविमुहिए जह भमरउले भमन्तम्मि ॥ 792 ॥

हत्तीणीच्या विरहाचा संताप किंवा बंधनाची धास्ती यामुळें होत नाहीं एवढा त्रास हत्तीला मदस्राव नष्ट झाल्यामुळें भोंवती भ्रमरांचे थवे घोंगावेनासे झाले म्हणजे होतो.

## ७८७ तरवार: 787. Sword.

गामम्मि मोहणाइं दिण्णे खग्गे व्व चोरहित्थाइं।
गहवइणो णामेणं कियाइ अण्णेण वि जणेण ॥ 793 ॥

घरधन्याचें नुसतें नांव ऐकलें कीं गावकऱ्यांना दरारा वाटतो आणि त्यानें तरवार उपसली कीं लगोलग चोरांची पागापाग होते.

## ७८८ सौदा: 788. Exchange.

मलिणाइं अंगाइं, बाहिरलोएण मसलुद्धेण।
हिययं हियएण विणा ण देइ वाही, भमइ हट्टं ॥ 794 ॥

व्याधस्त्रीचें शरीर मलिन आहे आणि ती बाजारात भटकत आहे, तरीही हृदयाच्या मोबदल्याशिवाय ती आपलें हृदय कोणालाही देणार नाहीं; मग तो मासलुब्ध असला किंवा त्याच्या अंगावर राठ केस असले तरी तिला पर्वा नाहीं.

● अर्थ नीट लागत नाहीं. प्रीती बाजारात मिळत नाहीं हें तिला माहीत आहे. बाजाराला आलेल्यामध्यें ती स्वतःला लायक असा पुरुष शोधीत आहे, मग तो जंगली असो किंवा लोलुप असो.

## ७८९ नांगऱ्याचें बळ: 789. Sparks.

कढिणखरवीरपेल्लणहलं व पत्थरविणिग्गयग्गिकणे।
चचलोआयरियवहे कसरा वि सुहेण वच्चंति ॥ 795 ॥

जमीन कितीही खडकाळ असली तरी तींत प्रथम नांगरट करणाराच्या हातांत बळ असलें म्हणजे ठिणग्या उडाल्या तरी जमीन नांगरली जाते समर्थांनीं पाडलेल्या पाऊलवाटेनें नंतर दुर्बळांनाही जातां येतें.

● जमिनींतल्या दगडांवर नांगराचा फाळ घासला कीं ठिणग्या उडतात.

७९० भ्रमर-भ्रमण : 790. Nail-Polish.

णक्खमऊहेसु खणं, कुसुमेसु खणं, खणं किसलएसु ।
हत्थेसु खणं कुसुमोच्चियाइ लोडाविया भसला ।। 796 ।।

आतां हिच्या चमकदार नखांभोंवतीं, तर नंतर त्या फुलांभोंवतीं; क्षणांत या वेलीभोंवतीं, तर क्षणांत फुलें खुडणाऱ्या स्त्रीच्या हातांभोंवतीं, असे भ्रमर भ्रमण करतात.

● त्या काळींही स्त्रिया नखांवर चमकदार रंग चढवीत असत हें नक्की.

७९१ धडधड : 791. Excitement.

छेत्तम्मि जेण रमिया, ताओ किर तस्स चेअ मंदेइ ।
जइ तीअ इमं णिसुयं, फुट्टइ हिययं हरिसयाए ।। 797 ।।

त्यानें शेतांत तिचा उपभोग घेतला होता. त्याचें हृदय कामाग्नीनें पुन्हा संतप्त झालें, हें तिला समजलें, तेव्हां आनंदानें तिचें हृदय धडधडूं लागलें.

१. दोलाइया, दोलायिता.

७९२ धग : 792. Heat.

हियर्य णियामि कढिणं..पा हासेग घडियं मे ।
विरहाणलेण तत्तं रसासित्तं अंतिता फुडइ ॥ 798 ॥

माझें हृदय मला आवरत नाहीं; हर्षामुळें हृदय फुटेल असें वाटतें. विरहाच्या धगीमुळें तापलेल्या हृदयावर एकाएकीं प्रेमरसाचे बिंदु पडल्यामुळें तें तडकेल कीं काय, अशी मला धास्ती वाटते.

७९३ सिंचन : 793. Libation.

अण्णे ते किल सिहिणो मिणरससेएण हुंति विच्छाया ।
आसाइयरससेओ होइ विसेसेण णेहजो दहणो ॥ 799 ॥

विस्तवावर पाणी ओतलें कीं तो विझतो, परंतु शृंगाररसाच्या सिंचनानें प्रेमाग्नि अधिकच प्रज्वलित होतो.

७९४ घिरीट : 794. Siesta.

अंतो णिभुअद्विअपरिअणाइ ओरुद्धदारणआइ ।
गिम्हे घोरङ्घग्घरस्वेण घोरन्ति व घराइं ॥ 800 ॥

ग्रीष्मातील दुपारच्या उन्हाच्या तापामुळें लोकांनीं आपआपल्या घरांचीं दारें लावून घेतलीं आहेत; वाटतें कीं जणूं साऱ्या घरांनीं आपआपले डोळेच मिटून घेतले आहेत. घरोघर सारे लोक दुपारची झोंप घेत आहेत. कोठें कोठें घिरीटाची घरघर चाललेली आहे; ती ऐकून वाटतें कीं जणू सारीं घरेंही घोरत आहेत.

● ग्रीष्ममाध्यान्हाभिसारिकेला दूतीचें प्रोत्साहन व आश्वासन. तुझें साहस कोणाच्याही नजरेस येणार नाहीं, भिऊं नको; फक्त पाय उचल, म्हणजे ते पोळणार नाहींत आणि कोणी जागें होण्याच्या आंत आपण जागीं पोंचूं.

## ७९५ जिह्वास्पर्श : 795. Tongue Touch.

जीहाइ परं लिम्भइ, दंतोट्ठेणं ण तीरए गहिउं ।
अहरो व्व सव्वणो गोहणेण पढमो तणुच्छेओ ॥ 801 ॥

गवताचे कोंवळे कोंब ओठांत धरण्याजोगे किंवा दांतांनीं कुरतडण्या-एवढे वाढलेले नसल्यामुळें गाई त्यांवरून जीभ फिरवीत आहेत, दंतव्रण झालेल्या ओंठांवरून जीभ फिरवावी त्याप्रमाणें.

● वस्तु उपचारांनीं उपभोग्य करावी लागते आणि उपभोगयोग्य झाली तरी ती उपचारांच्या परंपरेनें सज्ज करावी लागते.

## ७९६ कुंपणापलीकडे— 796. Beyond the Fence.

जइ वेड्डीहि ण माअसि जइ इच्छसि परवइं पि लंघेउं ।
तइ णूणं कोहलिए ! अज्जं कल्लिं व फुल्लिहिसि ॥ 802 ॥

कोहाळ्याचा वेली फुलें फळें धरूं लागली म्हणजे तिच्या वाढीला तिची वई पुरत नाहीं आणि कुंपण ओलांडून पलीकडे झेंप घेण्याची तिला इच्छा होऊं लागते. सखि, त्याचप्रमाणें आज नाहीं उद्यां, तुला बहर येईल आणि तूंही तसेंच धरशील.

● तुलनेसाठीं पहा : गाथा क्र. ७६२.

१. लिहइ, लिखते. २. तृणोच्छेदः

७९७ कृशकटि : 797. Slender.

विलासिणिगुरुणिअंबो तीरउ चलणेहि दोहि उव्वहिउं ।
एआई उण मज्झो थणभारं कइ णु उव्वहइ ? ॥ 803 ॥

विलासिनीच्या विशाल नितंबाचा भार तिचे दोन चरण तोलू शकतील, पण एकाच एका नाजुक कमरेला पृथुल अशा दोन स्तनांचा भार कसा सहन होईल ?

७९८ चांदणें : 798. Courtyard.

वारिज्जन्ती णवकोमुइ त्ति मा पुत्ति ! अंगणे सुवसु ।
मा ते अंपुसिआओ चण्डो त्ति मुहं गसिज्जिहिइ ॥ 804 ॥

माझ्या मुली–माझें ऐक; उघड्या अगणांत झोपूं नको. आज पौर्णिमा आहे. तुझें मुख हाच चद्र आहे असें राहूला भासेल व तो तुला ग्राशील !

● स्त्रियांनीं, विशेषतः अनुभवामुळें ज्यांची झोंप सावध झालेली नाहीं अशा तरुणींनीं अंगणात किंवा उघड्यावर झोंपूं नये; झोंपल्यास त्यांना यक्ष-किन्नर झपाटतात, अशी जुन्या लोकाची -भोळी समजूत होती. यक्ष-किन्नराची हमी कोण घेणार ? कधीं ते मनुष्यरूपानेंहि हिंडत असतात. गाढ झोंपेंत शरीरावर मनाचा ताबा नसतो आणि अशा वेळीं काय होईल व होणार नाहीं, याचा भरंवसा कोण देणार ?

७९९ मधुबोल : 799. Sweet Words.

सुव्वंतो आसि परंपराइ, कहकह वि दिट्ठिमिलिओ सि ।
दे सुहअ ! किं पि जंपसु, पिअंतु कण्णाइ मे अमिअं ॥805॥

१. अज्जाए, वध. २ थणजुअभार.

आजवर अनेक वेळा, अनेकांच्या तोंडून, मी तुझ्याबद्दल अनेक गोष्टी ऐकल्या आहेत. आज प्रथमच तुझी माझी दृष्टिभेट झाली. सुभग–बोल, कांहीं तरी बोल; आतां माझ्या कानांना अमृताचा लाभ होऊं दे.

## ८०० वाट पाहतांना तनु माझी सुकली : 800. Vigil.

**विरहकिसिआ वराई, दिणाइ आसण्णगिम्हपरिणामाइं ।**
**कढिणहिअओ पवासी, ण आणिमो कह समप्पिहिइ ।।806।।**

विरहामुळें बिचारी अत्यंत कृश झाली आहे. ग्रीष्म ऋतु जवळ आल्यामुळें दिवस दीर्घ होत आहेत आणि तिचा कठिण हृदयी प्रवासी प्रियकर अद्याप परत आलेला नाहीं; याचा शेवट कसा होणार तेंच मला समजत नाहीं.

## ८०१ प्रसीद : 801. Solicitation.

**रोआविण म्ह माए ! अंगणपाहिएअ दरपसुत्तेण ।**
**परिवत्तसु माणिणि माणिणि त्ति सिविणे भणन्तेण ।।807।।**

[1] अंगणात झोंपलेला प्रवासी स्वप्नांत पुटपुटला, ' मानिनी, मानिनी, प्रसन्न हो. ' आई ग, त्यानें माझ्या डोळ्यांत पाणी आणलें.

● परक्या घरीं, अंगणात पथारी. पथारी पसरण्यासाठीं त्याला अंगणात जागा देण्यात आली ती परकेपणा व्यक्त करण्याकरिता ? कीं सोयीसाठीं ? कारण घरात मायलेकीच दिसतात. प्रवासी पुटपुटला तें कोणाला उद्देशून ?

१. श्रूयमाणो आशी. परंपरया.

झोंप व स्वप्न हीं खरीं होतीं कीं लटकीं ? तो पुटपुटला तें तिला कसें ऐकूं गेलें ? ती जवळपास घोंटाळत होती कीं काय ? तिच्या अंतःकरणांत अनुराग होता म्हणूनच तिच्या डोळ्यांत पाणी आलें; तृप्तीमुळें कीं अतृप्तीमुळें !

## ८०२ चंद्रधनुष्य : 802. Moon-Bow.

माणंसिणीअ पइणा णअणकवोलाहरप्पहाभिण्णा ।
उज्जुअसुरचावणिहा वाहोआरा चिरं दिट्ठा ॥ 808 ॥

रुसलेल्या पत्नीच्या ( उज्ज्वल ) गालांवरून ओघळणाऱ्या अश्रूंवर पतीची दृष्टि खिळून राहिली; कारण त्यांमध्यें तिच्या डोळ्यांचा ( गडद निळा ), गालांचा ( फिका पांढुरका ) व ओंठांचा ( लालसर ) रंग प्रतिबिंबित झालेला दिसला आणि जणूं चंद्रधनुष्य प्रकटलें आहे असें भासलें.

● अलंकारकौस्तुभांत तद्गुणाचें उदाहरण : "परकीयगुणतिरोहितगुणस्य भानं तु तद्गुणः प्रोक्तः ।"

## ८०३ नागमोडी : 803. Scotched Snake.

सरहसविणिग्गआइ वि इच्छाइ तुमं ण तीअ सच्चविओ ।
सीसाहअवलिअभुअंगवंकरच्छे हअग्गामे ॥ 809 ॥

डोकें ठेचल्यामुळें वळवळ करणाऱ्या सापासारखा या भिकार खेड्यांतला रस्ता नागमोडी आहे. तुझ्या दर्शनासाठीं त्यावरून ती लगबगीनें जाऊन आली. पण तिला तूं दिसला नाहींस.

१. सहसा. २. हुभग.

८०४ चांडाल : 804. Behind the Bars.

सा तुह विरहे णिक्किव ! संधारिज्जइ सहीहि णिउणाहि ।
चंडालहत्थगअसउणिअ व्व जीए णिरालम्बा ।। 810 ।।

निष्ठुरा, तिला कोणाचाही आधार नाहीं. केवळ निपुण मैत्रिणींच्या आश्वासनांवर विसंबून तुझ्या विरहांत ती जीव धरून राहिली आहे. चांडालाच्या हातीं सांपडलेल्या मैनेसारखी तिची अवस्था झाली आहे.

● चाण्डाल कोण ? निष्ठुर नायक कीं नायिकेला प्रतिबंधांत ठेवणारा तिचा पति ?

८०५ चोळी : 805. Cotton Pad.

कप्पासं कुप्पासम्तरम्मि तइ खित्तमिचि भणिऊण ।
अत्ता ! वलाहिरेणं थणाण मह कारिआवत्था ।। 811 ।।

तूं माझा कापूस चोळींत लपवलास अशी माझ्यावर तोहमत घेऊन, आत्याबाई–अहीरानें बलात्कारानें माझे स्तन धरले आणि माझी अशी अवस्था केली.

● या गाथेचा समावेश असती-व्रज्येत केलेला असल्यामुळें झाल्या प्रकाराला तिचा विशेष विरोध असावा असें वाटत नाहीं. अहीराच्या आवेशातिरेकाचीं अवशिष्ट चिन्हें सासूनें पाहिलीं असावींत असा अंदेशा आल्यामुळेंच तिनें हें स्पष्टीकरण केलें असावें. राकणदार आडदांड अहीर असला तरी असा संशय घेण्याइतका चतुर दिसतो. ' तूं माझ्या अंगावर कापूस फेंकलास ' अशी त्यानें तोहमत घेतली, असाही अर्थ होईल.

८०६ असतुष्ट : 806. Dissatisfaction

गाईउ पंचखारिम्भरीउ, चत्तारि पक्कलवइल्ला।
संपण्णं वालावल्लरअं, सेवा सिवं कुणउ ॥ 812 ॥

पाच घागरी दूध देणारी गाय, चार पुष्ट बैल व सुपीक शेत, याचें आकर्षण एकाद्या सेवकाला वाटेल, आम्हास वाटणार नाहीं.

● वेबर सागतो, या गाथेचा अर्थ नीट लागत नाहीं. त्यानें साधारण-देवाच्या टीकेंतील उतारा दिला आहे :' प्रणमत्युन्नतिहेतोर्जीवनहेतोर्वि मुञ्चति प्राणान् । दुःखीयति सुखहेतो, को मूढः सेवकादन्यः ॥ ( हितोपदेश आपटे प्रतः २.२७ ). मूळ गाथेंतील उद्गार पुरुषाचेच आहेत असें नाहीं.

८०७ काळी मोहोर : 807. Seal.

अणुराअरअणभरिअं कंचणकलस व्व तरुणिथणवट्टं।
तस्स चिअ मुहम्मि किआ मसिमुद्दा मअणराएण ॥ 813 ॥

तरुणीचे स्तन प्रेमाच्या रत्नांनीं भरलेल्या सुवर्णकुंभासारखे आहेत. वाटतें कीं जणू त्याच्या मुखावर मदनराजानें काळ्या मोहोरा केल्या आहेत.

● गर्भिणीचीं स्तनाग्रे कृष्णवर्ण होतात. स्तनाच्या मुखावर मदन-राजानें काळी मोहोर केल्यामुळें त्यातली अनुरागरत्नें आता प्रकट होणार नाहींत, तिची प्रीति आता अप्राप्य आहे, अशी सूचना.

८०८ वैद्यराज : 808. Physician.

विज्ज ! पिआसा वड्ढइ, घणताओ, खणखणम्मि रोमंचो।
हिअए ण मोहं अण्णं, मज्जापत्थेहि तेजिआ पाणा ॥814॥

१. मारि २ त्यणतट्ट

वैद्यराज, तिला सारखी तहान लागत आहे; अंगाची सारखी लाही होत आहे; क्षणाक्षणाला अंगावर काटा उभा रहात आहे; अन्नावर मुळीच वासना नाहीं; जीव सारखा कासावीस होत आहे. ( यांतून तुम्हीच तिला वांचवाल. )

● विज्ज=वैद्य किंवा विज्ञ. हे विज्ञ, तुझी प्रिया तुझ्यासाठीं तहानली आहे-वगैरे.

८०९ अरसिक : 809. Conviction & Sentence.

गाहाण अ गेआण अ तंतीसद्दाण पोढमहिलाण ।
ताणं सो च्चिअ दण्डो, जे ताण रसं ण आणंति ॥815॥

ज्याला कवितेची गोडी नाहीं व संगीताची आवड नाहीं आणि प्रौढ महिलांच्या स्वरांतील माधुरी रुचत नाहीं त्याला त्याचें अरसिकत्व हीच शिक्षा.

● त्यानें कोणताही गुन्हा केला तरी त्याबद्दल त्याला वेगळी शिक्षा करण्याचें कारण नाहीं. जीवनांतल्या आनंदाची जो उपेक्षा करतो त्याला जीवनापासून अपेक्षा तरी कोणत्या असणार ? त्याचें अरसिकत्व हीच त्याला शिक्षा, जीवन जगणें हीच त्याला शिक्षा.

८१० श्री : 810. Inquisitive.

विवरीअरअम्मि सिरी बम्हं दट्ठूण णाहिकमलत्थं ।
हरिणो दाहिणनअणं रसाउला झत्ति ढक्केइ ॥ 816 ॥

[ विपरीतरते लक्ष्मीर्ब्रह्माणं दृष्ट्वा नाभिकमलस्थं ।
हरेर्दक्षिणनयनं रसाकुला झटिति छादयति ॥ ]

विपरीत रत करीत असतांना विष्णूच्या नाभिकमलांत बसलेला ब्रह्मदेव लक्ष्मीला दिसला. तेव्हां तिनें त्वरा करून हरीचा उजवा डोळा झांकला.

● विष्णूचा उजवा डोळा मिटला म्हणजे सूर्यास्त होतो आणि सूर्यास्त झाला म्हणजे कमळाच्या पाकळ्या मिटतात. आपला विलास ब्रह्मदेवाला दिसूं नये म्हणून लक्ष्मीनें एवढी घाई केली. नाभिकमल व त्यांत बसलेला चतुर्मुख ब्रह्मदेव यांची अडचण लक्ष्मीनें कशी सोसली असेल—हरि जाणे!

## ८११ महात्मे : 811. The Great.

लडहविलआण लोअण कडक्खविक्खेवजणिअसंदावा ।
झिज्जन्ति महासत्ता, चित्तुव्वेअणसहा होंति ॥ 817 ॥

सुंदर स्त्रियांच्या लाडिक नेत्रकटाक्षांनीं महात्म्यांनाही वेदना होतात; पण त्या ते सहन करतात आणि त्यांमुळें क्षीण मात्र होतात.

## ८१२ सदुपदेश : 812. Good Counsel.

तह हस जह ण हसिज्जसि, तह जंप जहा परप्पिअं होइ ।
तह जिअ जह लहसि जसं, तह मर जह ण उण संभवसि ॥818॥

असें हंसावें कीं आपलें हंसें होणार नाहीं; असें बोलावें कीं आपण लोकांना प्रिय व्हावें; असें जगावें कीं ज्यामुळें यश प्राप्त होईल; असें मरावें कीं पुन्हा जन्मच घ्यावा लागणार नाहीं.

## ८१३ अडचण : 813. Tarry a While.

छप्पअ गम्मसु सिसिरं पासाकुसुमेहि ताव, मा मरसु ।
जीअन्तो दच्छिहिसि अ पुणो वि रिद्धिं वसंतस्स ॥ 819 ॥

१. कटवर.

भ्रमरा, कुसुमांच्या मिटलेल्या पाकळ्यांच्या बंधनांत तूं हिंवाळ्याचा काळ कसा तरी काढ. जगला वाचलास तर वसंताची समृद्धि तुला पहावयास मिळेल.

● आज अडचण आहे, पुन्हां केव्हां तरी पाहूं, तिला सवड असेल तेव्हां मी तिला घेऊन येईन; दूतीची सूचना व आश्वासन. पति अकस्मात् घरीं परत आल्यामुळें उपपतीला राजणांत लपविल्याची कथा स्त्रीवेदांत आहे. येथें नायकाला फुलझाडाच्या ताटव्यात तर लपविला नसेल ! पासाकुसुम = पाशकुसुम, पुष्पविशेष. वज्जालग्गातील पाठ व छाया: छप्पय गमेसु कालं वासवकुसुमाइ ताव मा मुयसु । मन्न नियंतो पेच्छसि पउरा रिद्धी वसन्तस्स ॥ ६११ ॥ षट्पद गमयस्व कालं वासवकुसुमानि तावन्मा मुञ्च । मन्ये जीवन् पश्यसि प्रचुरर्द्धीर्वसन्तस्य ॥ ]

## ८१४ गजेंद्र : 814. Elephant

सव्वत्थ होइ ठाणं रासहमाहिसाण मेसवुसहाणं ।
भद्दगइंदाणमहो महावणं अहव महाराओ ॥ 820 ॥

गाढव, रेडा, मेंढा व बैल यांना कोठेंही राहता येतें. भद्र गज राजाला मात्र फक्त महावनांत किंवा महाराजाकडे स्थान मिळतें.

● श्रेष्ठांचा स्नेह करावा तो त्यांच्या श्रेष्ठत्वासाठीं, उपयुक्ततेसाठीं नव्हे. वज्जालग्गातील पाठ व छाया : गोमहिसतुरङ्गाणं पयण सव्वाण जुज्जए ठाणं । दड्ढगइन्दाण पुणो अह विञ्झो अह महाराओ ॥ १८९ ॥ गोमहिषतुरङ्गाणां पयणां सर्वाणा युज्जते स्थानं । दग्धगजेंद्राणा पुनोऽथ विन्ध्योऽथ महाराजः ॥

## ८१५ सतीचा टेंभा : 815. Tower of Purity.

अव्वो ! ण आमि छेत्तं रज्जउ साली वि कीरणिवहेहिं ।
जाणन्ता अवि पहिआ पुच्छन्ति पुणो पुणो मग्गं ॥ 821 ॥

१. आमि. २. छित्त, छेत्त. ३. इरणवंतेहि ४. मग्गं.

अं हं, मी यापुढें शेतांत राखणीला जाणार नाहीं; मग पोपटांनीं सारें भात खाऊन टाकलें तरी चालेल; कारण सारे वाटसरू रस्ता माहीत असून सुद्धां मार्ग कोणीकडून आहे असें पुन्हां पुन्हां मलाच विचारीत असतात.

● शेतांत राखणीला जा, असें आईनें सांगितलें, त्याला कन्येचें उत्तर. स्वतःच्या सतीत्वाचें प्रकटन; किंवा स्वदोषनिरसन; किंवा स्वरूपकीर्तन ! पण लोक विचारीत होते तो रस्ता जाण्याचा कीं येण्याचा ! कीं माचीचा ? कीं तिच्या घराचा ?

## ८१६ दयित दर्शन : 816. Lover.

अत्थक्कागअदिट्ठे[1] वहुआ जामादुअम्मि[2] गुरुपुरओ[3] ।
जूरइ णिवडंताणं[4] हरिसविअंसंतवलआणं[5] ॥ 822 ॥

[ अकस्मादागतहृदये वधूका दयिते गुरुपुरतः ।
क्रुध्यति विगलद्भ्यो हर्षविकसद्भ्यो वलयेभ्यः ॥ ]

नवा अकस्मात् घराकडे येत असलेला पाहून वधूला इतका आनंद झाला कीं तिच्या हातांतलीं कांकणें ओघळलीं. त्यावेळीं गुरुजन आजूबाजूला होते, त्यांचा तिला राग आला.

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून. तेथील पाठ वेगळा आहे व तो गाथाविषयाला अधिक पोषक आहे.

## ८१७ सुलोचना : 817. Black in White.

अच्छीहि तुज्झ सुंदरि ! बाहिरधवलेहि मज्झकसणेहि ।
एएहि को ण दमिओ पिसुणेहि व कण्णलग्गेहि ? ॥ 823 ॥

१. अद्धक्क. २. हिअए. ३. दइअम्मि. ४. जण. ५. विअलंताणं. ६. विसट्टाण. ७. निपतद्भ्यो.

सुंदरि, तुझ्या आकर्ण नेत्रांचे बाह्यांग पांढरे शुभ्र आहे आणि अंतरंग काळेभोर आहे चहाडखोर असेच असतात, बाह्यतः साधु व अंतर्यामी खल. ते केव्हांही प्रभूच्या कानांशीं लागू शकतात. त्यांच्याप्रमाणें तुझे नेत्र कोणाला वश करणार नाहींत !

८१८ बिंब-प्रतिबिंब : 　　818. Illusion.

**एह ! इमीअ, णिअच्छह ! विम्हिअहिअआ सही पुलोएइ ।**
**अद्दाअम्मि कवोलं कवोलपट्टम्मि अद्दाअम् ॥ 824 ॥**

ए, इकडे ये, हें बघ; तो आरशांत स्वतःचें सौंदर्य न्याहाळीत आहे. आरशांत तिच्या गालाचें प्रतिबिंब दिसत आहे आणि तिच्या गालावर आरशाचें, हें पाहून तिच्या मैत्रिणी चकित झाल्या आहेत.

८१९ चिमुरडी : 　　819. Anticipation.

**कइआ जाआ ? कइआ णु सिक्खिआ, माइआ ! हअकुमारी ?**
**तं तं जाणइ सव्वं, जं जं महिलाओ जाणन्ति ॥ 825 ॥**

बाई, बाई, हिचें वय केवढें आणि हें सारें ही शिकली तरी कधीं ! [illegible]णि ह्या वयांत हें सारें शिकवलें तरी कोणी ! एवढीशी चिमुरडी पोर, [illegible]ग प्रौढ स्त्रियांना अनेक वर्षांच्या अनुभवानें जें समजतें तें सारें [illegible]ला ठाऊक आहे.

८२० ग्रामभूषण : 　　820. Village Beauty.

**रोंणपिट्ठधूसरत्थणि ! महुमअतंबच्छि ! कुवलआभरणे ! ।**
**कण्णगअचूअमंजरि ! पुत्ति ! तुए मंडिओ गामो ॥ 826 ॥**

१. छन. २. मधुक. ३. कुभ.

मुग्धे, सणासाठीं पीठ कुटल्यामुळें तुझे स्तन धूसर झाले आहेत, मद्याचें सेवन केल्यामुळें तुझे नेत्र आरक्त झाले आहेत. अल्कारार्थ तूं कमळें धारण केलीं आहेस आणि कानावर आम्याच्या मोहोराची मंजिरी ठेवली आहेस. सुंदरि, तू आपल्या गात्राला शोभा आणली आहेस.

८२१ अधर : 821. Lower Lip.

मग्गिअलद्धे वलंमोडिचुंबिए अप्पणेण उवणीडे ।
एक्कम्मि पिआ अहरे अण्णण्णा होंति रसहेआ ॥ 827 ॥

जो वारवार शोधण्यात येतो व अधूनमधून सापडतो, सापडला ( म्हणजे ) जो वलात्कारानें चुंबिला जातो आणि जो कधीं कधीं स्वयस्फूर्तानें पुढें येतो तो तुझा प्रिय अधर, तो एकच एक असला तरी त्यापासून अनेक रसाची प्राप्ति होते

८२२ तृप्त : 822 Rapture

उप्फुल्लोअणेणं कवोलवोसट्टमाणसेएणं ।
अहणतेण वि भणिआ मुहेण से कज्जणिव्वुत्ती ॥ 828 ॥

तिनें शब्दानें सांगितलें नाहीं; पण तिचे प्रफुल्ल डोळे आणि गालावरून ओघळणारे स्वेदबिंदु प्रकट करतात कीं ती तृप्त झालेली आहे.

८२३ प्रेमचिन्ह : 823 Love in Disguise

जत्थ ण उज्जागरओ, जत्थ ण ईसा विसूरणं माणो ।
सब्भावचाडुअ जत्थ ण त्थि, णेहो तर्हि ण त्थि ॥ 829 ॥

१ वलॅमोड २ विसर्पमाण ३ हणिआ

[यत्र नास्त्युज्जागरको यत्र नेर्ष्याखेदौ मान‌। ।
सद्भाववचाटुकं यत्र नास्ति स्नेहस्तत्र नास्ति ॥]

जेथें जागरणें नाहींत व भांडणे नाहींत, असूया नाहीं व रुसवा नाहीं किंवा सद्भावपूर्ण मधुर शब्द नाहींत, तेथें स्नेहही नाहीं.

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून.

## ८२४ पत्र व चित्र : 824 Spherical Painting

मह पडणा थणजुअले पत्तं लिहिअं ति गव्विआ कीस ? ।
आलिहइ महं पि पिओ जइ से कंपो ण्णिअ ण होइ ॥830॥

तुझ्या वक्ष स्थलावर तुझ्या पतीनें ( प्रेम ) पत्र लिहिलें म्हणून तू एवढी चढून जाऊं नकोस. माझ्यावरील (प्रेमामुळें) माझ्या पतीचा हात थरथरत नसता तर त्यानें माझ्या स्तनावर प्रेमचित्र रंगवलें असतें.

## ८२५ विदीर्ण : 825 Disaster.

कण्णे पडिअं, हिअए पडिअं चिअ, ओ मए अभग्गाए ।
जामि त्ति तुज्झ वअण-ण्णि व ण सहिअं ! पवासरस॥831॥

मी प्रवासाला जाणार हे तुझे शब्द कानीं पडले आणि माझें हृदय विदीर्ण झालें. मीच दुर्दैवी असें कोणतें दु ख आहे की जें मी सहन केलें नाहीं ( म्हणून तू त्यात ही भर घालीत आहस ? )

## ८२६ पृथुलनितम्बिनी : 826 Gravitation

समपयपत्थिअस्स वि पहिअस्स खलंति पुडमदिअहम्मि ।
हिअअट्ठिअजाआगुरुणिअम्बहारेण व पआइ ॥ 832 ॥

पथिकाचा प्रवास नुकताच सुरू झाला आहे आणि तो ज्या प्रदेशांतून जात आहे तो सपाट आहे, तरीही त्याचीं पावलें (दमल्यासारखीं) अडखळत आहेत, कारण त्याच्या हृदयात अधिष्ठित असलेल्या त्याच्या पृथुलनितंबिनी पत्नीचा भार जणू त्याला वाहावा लागत आहे.

## ८२७ गोत्राक्षर: 827 Repetition

सदेसो वि ण लिहिओ लेहे पहिएण कत्थ घरतत्ती ?।
अणरअलिहिअगेहिणिगोत्तक्खरपूरिए पत्ते ॥ 833 ॥

प्रवासी पतीनें पत्नीला पत्र पाठविलें, त्यात सदेश असा काहींच नव्हता. मग घरची स्थिति कशी काय आहे याची चौकशी त्यांत कोठून असणार? त्यानें त्या पत्रात फक्त आपल्या गृहिणीचें नांव पुन पुन लिहून पत्र भरून काढलें होतें

## ८२८ घामाघूम: 828 Real Unreality.

उप्पेक्खागअदइअंगसंगमुच्चालिअविउणसेआए।
वोलीणो वि ण णाओ पउत्थपइआइ हेमन्तो ॥ 834 ॥

तिचा पति प्रवासी होता, तरी विरहाचा हिंवाळा केव्हा सपला हें तिच्या लक्षातही आलें नाहीं, कारण तिनें मनोमय प्रियकर निर्माण केला होता आणि ती सारखी त्याच्या सहवासात असल्यामुळें तिचें शरीर नेहमींच घामाघूम झालेलें असे

## ८२९ स्वप्नसुख: 829. Dream

सिविणअलद्धपिअअमपुलइउग्गमभिण्णभरेहि अंगेहिं।
परिरम्भणे सुहाइ पावउ, मा णं पओहेह ॥ 835 ॥

ती स्वप्नात प्रियकराच्या आलिंगनाचें सुख अनुभवीत आहे, त्यामुळें तिचीं गात्रें पुलकित झालीं आहेत. तिला कोणी जागी करूं नका.

● मेघदूतात ( पराजपे प्रत : क्र. ९४ ) यक्ष मेघाला सांगतो, ' माझी प्रिया झोंपलेली असली तर तिची निद्रा मोडूं नको; कदाचित् त्या वेळीं स्वप्नात ती माझ्या आलिंगनाचें सुख अनुभवीत असेल.'

## ८३० निःश्वास : 830. Suspiration.

विज्झावेइ पईवं अब्भुद्वतीएँ पहिअजाआए ।
पिअअमचिओअदीहरणीसहणीसासरिञ्छोली ॥ 836 ॥

प्रवासी पतीच्या दीर्घ विरहामुळें दुर्बल झालेली त्याची पत्नी सारखे नि.श्वास टाकते. यामुळें तो दिवा पेटवूं लागली कीं त्याची ज्योत विझून जाते.

## ८३१ तीर्थ : 831.Holy Water.

जं पीअं मंगलवामणाएँ पत्थाणपढमदिअहम्मि ।
पाहसलिलं ण चिट्ठइ तं चिअ विरहे रुअंतीए ॥ 837 ॥

पति प्रवासाला गेला त्या दिवशीं तिने मंगल पात्रातल तीर्थ घेतलें. तेव्हांपासून बाहेरलें असें पाणी ती प्यालीच नाहीं; कारण विरहांत तिचे अश्रु कधीं थांबलेच नाहीत.

## ८३२ निस्तेज : 832 Pallid.

उअप्ठाणिच्छाआ सव्वं उण परिअणं रुआवेइ ।
आअंबिरेहि अज्झा फुसिअपरुण्णेहि अच्छीहि ॥ 838॥

आर्येचें मुख निस्तेज झालें आहे; रडून रडून आणि अश्रु पुसून डोळे लाल झाले आहेत. ती भोंवतालच्या परिजनांनाही रडवीत आहे.

## ८३३ शिरीष : 833 Evening Breeze.

जइ दिअहविरामो णवसिरीसगंधुध्दुराणिलग्घविओ ।
पहिअघरिणीअ ण तहा तवेइ तिव्वो वि मज्झण्हो ॥ 839 ॥

शिरीष कुसुमांनीं सुगंधित झालेल्या संध्याकाळच्या वाऱ्यामुळें विरहिणीला होतो तेवढा ताप भर दुपारच्या कडक उन्हानें होत नाहीं.

## ८३४ कल्पित कथा : 834.Tales of Imagination.

चिरपवसिअदइअकहा णिउणाहि सहीहि विरहसहणत्थम् ।
अलिआ अवि अवराहा वहूएँ कमसो कहिज्जंति॥ 840 ॥

पुष्कळ दिवस प्रवासाला गेलेल्या दयिताच्या वधूला विरह सहन करतां यावा म्हणून तिच्या निपुण मैत्रिणी प्रवासी प्रियकरांच्या कल्पित कथा तिला क्रमशः सांगतात.

## ८३५ लेखणी : 835 Pen.

जं जं पउत्थपइआ पिअअमणामक्खरं लिहइ लेहे ।
तं तं तल्लेहणिआणुमारगलिओ पुमइ सेओ ॥ 841 ॥

प्रवासी पतीचा स्त्री त्याला लिहावयाच्या पत्रांत ज्या ज्या वेळीं त्याच्या नांवाचीं अक्षरें लिहिते त्या त्या वेळीं तिला घाम येतो व तो लेखणीवरून ओघळल्यामुळें लेख अस्पष्ट होतो.

<u>८३६ ध्यान :</u> 836. Meditation.

अच्छउ णिमीलिअच्छी, मा मा वारेह, पिअअमासाए ।
तेण विणा किं पेच्छउ उम्मिल्लेहिं वि अच्छीहिं ॥ 842 ॥

प्रियकराचो भेट व्हावी म्हणून ती डोळे मिटून ध्यानस्थ बसली आहे. तिचें निवारण करूं नका; तिनें डोळे उघडलेच तर ती प्रियकराशिवाय कोणाकडे पाहणार !

<u>८३७ विरहगीत :</u> 837. Song of Separation.

दीहुण्हा णीसासा, रणरणओ रुज्जगग्गिरं गेअं ।
पिअविरहे जीविअवल्लहाण एसो च्चिअ विणोओ ॥ 843 ॥

अंतर्यामी व्याकुळ झालेल्या व दीर्घ निःश्वास टाकणाऱ्या विरहिणी रुदनामुळे रुद्ध झालेल्या स्वरांत विरहगीतें गातात. ज्यांना जगण्याची इच्छा असते त्या या उपायानें विरहाचा काळ कंठतात आणि तगतात.

<u>८३८ मागणी :</u> 838. Entreaty.

जइ देव्व ! तं पसण्णो मा करिहिसि मज्झ माणुसं जम्म ।
जइ जम्मं, मा पेम्मं, जइ पेम्मं, मा जणे दुलहे ॥ 844 ॥

देवा, तूं मजवर प्रसन्न असलास तर माझी मागणी ऐक; मग पुन्हा मनुष्यजन्म देऊं नकोस. दिलासच तर कोणाच्या प्रेमांत गुंतूं नयेस आणि प्रेम करायचेंच असलें तर निदान तें असाध्य अशा व्यक्तीवर जडूं देऊं नयेस.

० वेवरने टीकेंत समानार्थी गाथा दिली आहे : रे संकर ! मा सिजषि, अह सिजसि, मा देहि माणुस जम्म । अह जम्मं मा पेम्मं, अह पेम्मं मा विओअ म्हे ।। अलंकाररत्नाकरात अतिशय अलकाराचें उदाहरण.

## ८३९ उन्हाळ्यांतल्या रात्री : 839. Summer Nights.

राईण भणइ लोओ जा किल गिम्हम्मि होंति मडहाओ ।
मह उण दइएण विणा ण आणिमो कीस वड्ढन्ति ।। 845 ।।

लोक सांगतात कीं उन्हाळ्यातल्या रात्री लहान असतात; पण अनुभव मात्र असा आला कीं प्रियकराच्या विरहात त्या फार मोठ्या होतात.

## ८४० अयन : 840. Solstice.

एक्के अअणे दिअहा, वीए रअणीओं होन्ति दीहाओ ।
विरहाअणो अपुव्वो, एत्थ दुवे च्चेअ वड्ढन्ति ।। 846 ।।

एका अयनात दिवस मोठे असतात आणि दुसऱ्या अयनात रात्री; पण विरहाच्या वर्षाचें वैशिष्ट्य असें कीं त्यातील दोन्ही अयनातील दिवस व रात्रीही मोठ्या असतात

## ८४१ रसायन : 841 Aphrodisiac.

चिरजीवित्तणकंखिरि ! मा तम्म, रसाअणेहि अथिरेहि ।
विरहं पवज्ज, जाअंति जेग जुअदीहरा दिअहा ।। 847 ।।

चिरकाळ जगण्याची इच्छा करणाऱ्या स्त्रिये, चित्त अस्थिर करणाऱ्या रसायनांचें विरहकाळांत सेवन करावें, म्हणजे दिवस युगासारखे दीर्घ होतात आणि पुष्कळ दिवस जगल्याचें श्रेय मिळतें.

## ८४२ शेजारीण : 842. Neighbour.

रुअइ रुअंतीए मए, ओह्लिदिणे गणइ, झिज्जइ अई व ।
पिअविरहे मामि ! सअज्झिआएँ णेहो च्चिअ अपुव्वो ॥848॥

माझ्या प्रियकराच्या विरहामुळें मी रडतें, तशीच माझी शेजारीणही रडते; विरहाचे दिवस माझ्याप्रमाणें तीही मोजते; माझ्याबरोबर तीही कृश होते; खरोखर, तिचा स्नेह अपूर्व आहे.

● सहृदयतेनें कारण शेजसंबंध, केवळ शेजारधर्म हें नसावें.

## ८४३ गळामिठी : 843. Caress.

कण्ठग्गहणेण सअज्झिआएँ अव्भागओवआरेण ।
वहुआएँ पइम्मि वि आगअम्मि सामं मुहं जाअं ॥ 849 ॥

तिकडे शेजारणीनें प्रियकर घरीं येतांच त्याच्या गळ्यांत विळखा घातला हें दृश्य पाहून इकडे वधूचें मुख म्लान झालें; तरी बरें तिचा पति घरींच होता !

## ८४४ मृणालिनी : 844. Torment.

चंदो वि चंदवअणे ! मुणालवाहालए ! मुणालाइं ।
इंदीवराइ इंदीवरच्छि [1] तावेन्ति तुह विरहे ॥ 850 ॥

[1] पद्मादिभार.

चंद्रानने, तुझें मुख चद्रासारखें आहे; तुझे नेत्र नीलकमळांसारखे आहेत आणि बाहुलता कमळाच्या देंठांसारख्या आहेत. यामुळें तुझ्या विरहांत चंद्र, मृणाल व कमळें तापदायक वाटतात.

८४५ आज्ञाधारक : 845. Obedient.

गुरुअणपरवस पिअ ! किं भणामि तुह मंदभाइणी अहअं ।
अज्ज पवासं वच्चसि, वच्च, सअं चेअ मुणेसि करणिज्जं ॥851॥

[ गुरुजनपरवश प्रिय किं भणामि त्वां मन्दभागिनी खल्वहम् ।
अद्य प्रवासं व्रजसि व्रज स्वयमेव श्रोष्यसि करणीयम् ॥ ]

प्रियकर, तुम्ही वडीलधाऱ्यांच्या आधीन आहात. मी मन्दभागिनी; मी तुम्हांला काय सांगणार ? आज तुम्ही प्रवासाला निघणार आहांत ना ? जा, खुशाल जा; इकडे मी काय करीन किंवा काय होईल तें तुमच्या कानीं येईलच.

● छाया काव्यप्रकाशावरून. कालाधिष्ठित अर्थव्यञ्जकतेचें उदाहरण. ही गाथा उदाहरणचंद्रिकेंतील असल्याचें काव्यप्रदीपकारानें नमूद केलें आहे.

८४६ वसुन्धरा : 846. Wide World.

विस्थिण्णं महिवेढं, विउलणिअम्बाओ पीणथणिआओ ।
लब्भन्ति विसालच्छीओ सुहअ ! जुवईओ मा तम्म ! ॥852॥

सुभग, पृथ्वी विशाल आहे. विपुलनितंबिनी, पृथुलस्तनी व विशालाक्षि अशा अनेक तरुणी तुला भेटतील; ( ही प्राप्त होत नाहीं, म्हणून ) उगाच खिन्न होऊं नको.

● बहुरत्ना वसुंधरा.

१ वच्चसि. २ सुणसि.

### ८४७ आत्मनिंदा : 847. Self Reproach.

कज्जं विणा वि विअलंतपेम्मराअं तुमं णिअच्छन्ती ।
हिअआसंकिअणिजदोसदुम्मणा तामइ वराई ॥ 853 ॥

कांहीं कारण नसतां तुझ्या प्रीतींत अंतर पडल्यामुळें आपलेच कांहीं तरी चुकलें असेल अशा समजुतीनें बिचारी दुःखित झाली आहे व स्वतःलाच दोष लावून घेत आहे. ती तुझ्या दर्शनासाठीं उत्सुक आहे.

### ८४८ हेलपाटा : 818. Bewildered.

दूई ण एइ, चंदो वि उग्गओ, जामिणी वि वोलेइ ।
सव्वं सव्वत्तो च्चिअ विसंठुलं, कस्स किं भणिमो ?॥854॥

चंद्र उगवला, रात्र उलटत आहे; भोंवतालचें वातावरण अस्थिर झालें आहे. दूती अद्याप परत आली नाहीं. माझी व्याकुळता मी कोणाला आणि कशी सांगूं !

### ८४९ हेलकावा · 849. Twixt Life & Death.

दूई गआ चिराअइ, किं सो मह पास मेहिइ ण वे त्ति ।
जीविअमरणन्तरमज्झिआएँ अंदोलए हिअअं ॥ 855 ॥

दूती गेली त्याला कितीतरी वेळ झाला ! पाहूं प्रियकर येतो की नाहीं या विचारानें माझें हृदय आंदोलित पावत आहे, जणूं जीवन व मरण यामध्यें हेलकावत आहे.

८५० चेष्टा : 850 Teaser.

सो णा गओ त्ति पेच्छह परिहासुल्लाविरीएँ दूईए ।
णूमंतीअ पहरिसो ओसट्टइ गण्डपासेसु ॥ 856 ॥

'बघ, तो आता येणारच नाही,' असें दूतीनें तिला चेष्टेनें सांगितलें; पण हें सांगताना लपवून ठेवलेला आनंद जणू दूतीच्या गालांवरून ओसंडत होता.

८५१ सवाल : 851. Questions

कह णु गआ ? कह दिट्ठो ? किं भणिअं ? किं व तेण पडिभणिअं ?।
एअ चिअ ण समप्पइ पुणरुत्तम् जंपमाणीए ॥ 857 ॥

[ कथं नु गता कथं दृष्टः किं भणितं किं च तेन प्रतिपन्नम्
एवमेव न समाप्यते पुनरुक्तं जल्पमानायाः ॥ ]

अग, तू गेलेस कशी ? भेट कुठें झाली ? तू काय म्हणालीस ? मग त्यानें काय उत्तर दिलें ? तिचे प्रश्न संपेनातच आणि नंतर ती तेच तेच प्रश्न पुन पुन विचारू लागली

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून

८५२ उत्सुक : 852 Trepidation

दूईमुहअच्छुलोइरीएँ किं भणिहिइ त्ति अज्झाए ।
पिअसंगमललिअमणोरहाएँ हिअअं थरथरेइ ॥ 858 ॥

प्रियकराच्या समागमाविषयींच्या मनोहर कल्पना तिच्या मनांत रंगत होत्या. संकेत ठरविण्यासाठीं गेलेली दूती परत आली तेव्हा तिच्या मुखचंद्राकडे पाहून तिनें काय निरोप आणला असेल याचा ती अंदाज करूं लागली तेव्हा आर्येचें हृदय थरारलें.

## ८५३ असंबद्ध : 853. Incoherent.

अप्पाहिआइ तुह तेण जाइ ताई मए ण मुणिआइ ।
अज्जुण्हस्सासपरिक्खलंतविसमक्खरपआइं ॥ 859 ॥

तुला पोंचविण्यासाठीं कांहीं निरोप त्यानें मला सांगितला खरा, पण मला कांहीं तो समजला नाहीं, कारण ऊष्ण निःश्वासामुळें त्याचा कण्ठ रुद्ध झाला होता आणि तो जें बोलला तें अगदीं असंबद्ध होतें.

## ८५४ दूती गेली, मवत आली : 854. Treachery.

साहेन्ती सहि ! सुहअं खणे खणे दूमिआ सि मज्झ कए ।
सब्भावणेहकरणिज्जसरिसअं दाव विरइअं तुमए ॥ 860 ॥

[ साधयन्ती सखि सुभगं क्षणे क्षणे दूनासि मत्कृते ।
सद्भावस्नेहकरणीयसदृशं तावद् विरचितं त्वया ॥ ]

माझ्या भाग्यशाली प्रियकराला माझ्यासाठीं अनुकूल करण्याकरितां दे किती त्रास सहन केलास [१] सखी, सद्भाव व स्नेह यांना साजेल असेच वर्तन तू केलेंस.

---

१. साधती, वशंती.

● छाया वाग्व्यानुशासनावरून. सखी गेली ती दूती म्हणून आणि परत आली ती सवत होऊन. मैत्रीण होती ती वैरीण झाली, हें उमजलें अपराधाच्या खाणाखुणावरून. हीं चिन्हें लपविण्याची कितीही खटपट केली तरी जाणत्याना तीं पटतातच.

## ८५५ अद्वैत :

## 855. Identity.

जं तुह कज्जं तं चिअ कज्जं मज्झ त्ति जं सआ भणसि ।
ओ दूइ सच्चवअणे ! अज्ज सि पारं गआ तस्स ॥ 861 ॥

सखी, आजवर आपण एकमेकींमध्यें मुळींच भेदभाव मानला नाहीं. जें काम माझें तें तुझें आणि जें तुझें तें माझें, अशा आपण वागलों. ( म्हणूनच मी तुला दूती म्हणून पाठविलें. ) दूती, आता खरें सांग, ( माझ्या प्रियकराशीं तू आतां रममाण होऊन आली आहेस कीं नाहीं ? ) आज आपल्या प्रेमाची पराकाष्ठा झाली.

## ८५६ युद्धस्य कथा :

## 856. Twig.

पावलअपहरुत्तत्थोएँ तं कअं हलिअवहुआए ।
जं अज्ज वि जुवइजणो घरे घरे सिक्खिउं महइ ॥ 862 ॥
[ पतिनामग्रहणपूर्वकप्रहारतुष्ट्या तत्कृतं किमपि हलिकस्नुषया ।
यदद्यापि युवतिजनो गृहे गृहे शिक्षितुं भ्रमति ॥ ]

वेलीच्या फांकानें शेतकरी पत्नीला फोडून काढूं लागला; त्याच्या आवेशामुळें बिचारी घाबरून गेली. पुढें जें जें झालें तें जाणण्याची व शिकण्याची इच्छा घरोघरींच्या तरुणींना असते.

१. इद्धाइ. २. सोण्हाए.

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून. आदित्यमीमांसेतील पाठः द्रवणदळ-अपहजजद्दाणतक्कअं किंचिहलिअसुण्हए। अज्जज्जविंदुवइजणो घरे घरे सिक्खउम्मइइ ॥

## ८५७ हरिद्रा :

## 857. Under the Tree.

धण्णो सि रे हलिद्अ ! हलिअसुआपीणथणभरुच्छंगे।
पेच्छन्तस्स वि पइणो जह तुह कुसुमाइ णिवडन्ति ॥ 863 ॥

हरिद्रा वृक्षा, तूं धन्य आहेस. कारण तुझीं पानें प्रथम शेतकऱ्याच्या मुलीच्या पुष्ट स्तनावर पडतात आणि नंतर तिच्या मांडीवर विश्राति घेतात; आणि हें सारें पतींच्या देखत.

● हरिद्रावृक्षाखालीं तिचा पति शेतकऱ्याच्या मुलीला घेऊन बसला होता. पतीचा अपराध दिसल्यावर पत्नीनें काढलेले उद्गार. टीकाकार सांगतात, हीही तिकडे संकेतासाठींच गेली होती. हिचा अपराध लपला आणि त्याचा उघडकीस आला.

## ८५८ इंद्र :

## 858. Idol.

सच्चं चिअ कट्ठमओ सुरणाहो, जेण हलिअधूआए।
हत्थेहि कमलदलकोमलेहि छित्तो ण पल्लविओ ॥ 864 ॥

[ सत्यमेव काष्ठमयः सुरनाथो येन हालिकदुहित्रा ॥
हस्तैः कमलदलकोमलैः स्पृष्टो न पल्लवितः ॥ ]

खरोखर, हा इंद्र अगदीं लाकडासारखा आहे, शेतकऱ्याच्या मुलीनें आपल्या कमळकोमळ करांनीं त्याला स्पर्श केला, तरी त्याला पालवी फुटली नाहीं.

१ छित्तो.

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून. हें दैवत जागृत असतें तर तिच्या स्पर्शानें निर्जीव मूर्तीही सजीव झाली असती, मृत काष्ट पल्लवित झालें असतें.

## ८५९ सहगमन : 859. In Death We Meet

एमेअ अकअपुण्णा अप्पत्तमणोरहा विवज्जिस्सम् ।
जणवाओ वि ण जाओ, तेण समं हलिअउत्तेण ॥ 865 ॥

[ एवमेवाकृतपुण्याप्राप्त मनोरथा विपत्स्ये ।
जनवादोऽपि न जातस्तेन समं हलिकपुत्रेण ॥ ]

शेतकऱ्याच्या मुलाबरोबर मी कोणतेंही सुख भोगलें नाहीं. माझे मनोरथ अतृप्त राहिले, तरीही मी सहगमन करणार. त्याच्यावर माझें प्रेम होतें असा बोभाटाही झालेला नाहीं. आतां हें सार्‍यांना समजलें तरी कोणाला अपवाद घेतां येणार नाहीं.

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून.

## ८६० कुलस्त्री : 860. Wife

लज्जापज्जत्तपसाहणाइ परतत्तिणिप्पिवासाइं ।
अविणअदुम्मेहाइं धण्णाण घरे कलत्ताइं ॥ 866 ॥

[ लज्जापर्याप्तप्रसाधनानि परतृप्तिनिष्पिपासानि ।
अविनयदुर्मेधांसि धन्यानां गृहे कलत्राणि ॥ ]

लज्जा हेंच कुलस्त्रियांचें प्रसाधन होय. पतींशिवाय इतर पुरुषांबद्दल त्या निरभिलाष असाव्यात. अविनयाच्या मूर्खपणापासून त्या अलिप्त असाव्यात. अशा स्त्रिया धन्य होत आणि त्यांचीं घरेंही.

१. चिता, भर्त्.

● छाया दशरूपावरून. गृहकार्यपराङ्मुख, निर्लज्ज, चपल, अविनीत वधूला सासूचा उपदेश. कुलस्त्रियांचा शृंगार उद्धत नसावा; इतरांना प्रसन्न करून घेण्याची इच्छा त्यांना नसावी; त्यांचें अंतःकरण मोहांपासून अलिप्त असावें. अशा स्त्रिया धन्य होत; त्यांचे पति सुखी असतात.

## ८६१ कौटुम्बिक सौख्य :　　861. Happiness.

हसिअमविआरमुद्धं, भमिअं विरहिअविलाससच्छाअं ।
भणिअं सहावसरलं, धण्णाण घरे कलत्ताणं ॥ 867 ॥

[ हसितमविकारमुग्धं भ्रमितं विरहितविलाससुच्छायम् ।
भणितं स्वभावसरलं धन्यानां गृहे कलत्राणाम् ॥ ]

ज्या घरांतील स्त्रिया निर्विकारपणें हंसतात, निष्पापपणें हिंडतात, मोकळ्या मनानें बोलतात व अकृत्रिमपणें वागतात तीं कुटुंबें खरोखर धन्य होत.

● छाया दशरूपकावरून. तुझें हंसणें छद्मी आहे, बोलणें बोचक आहे, वागणें कृत्रिम आहे; तुझें अंतःकरण स्वच्छ नाहीं, तुझा स्वभाव सरळ नाहीं; मग तुझ्यापासून मला सुख कसें लाभणार ?

## ८६२ आख्यानांतील नायिका :　　862. Envy.

पडणा वण्णिज्जन्ते अक्खाणअसुंदरीएँ रूवम्मि ।
ईसामच्छरगरुअं घरिणी हुंकारअं देइ ॥ 868 ॥

पति पत्नीला आख्यान सांगत होता. गोष्टींतल्या नायिकेच्या सौंदर्याचें त्यानें वर्णन केलें तेव्हां त्याच्या पत्नीनें ईर्ष्येनिसरानें भरलेला हुंकार दिला.

१ विकार. २ स्वभावसरलम्.

## ८६३ कुलस्त्रीचा क्रोध : 863. Anger.

वाहिज्जन्ति ण कस्स वि, रोत्तूणं णेअ पाअडिज्जन्ति ।
माणविआरा कुलपालिआएँ हिअए विलावेन्ति ॥ 869 ॥

कुलस्त्रीचा क्रोध कोणाजवळ बोलून दाखविला जात नाहीं; तो रुदनाच्या रूपांतही प्रकट होत नाहीं; तो तिच्या हृदयांतच विरून जातो.

• ● अपराधी पतीवर क्रुद्ध झालेल्या स्त्रीला सखीचा उपदेश. बोलूं नको, रडूं नको, पतीच्या अपराधाची वाच्यता होईल असें कांहीही करूं नको.

## ८६४ विरहिणी : 864. Disconsolate.

अहिअं सुण्णाइं णिरंजणाइं चइरिक्करुण्णपुसिआइं ।
विरहुक्कण्ठं कुलपालिआइ साहन्ति अच्छीइं ॥ 870 ॥

तिनें डोळ्यांत अंजन घातलेलें नाहीं, एकान्तात रडून रडून तिचे डोळे कोरडे झालेले आहेत, सुजलेले आहेत, तिची दृष्टि शून्य आहे. कुलीन विरहिणीची उत्कण्ठा व दुःख ते व्यक्त करतात.

## ८६५ कुलबालिका : 865. Alibi.

कुलपालिआएँ पेच्छह ! जोव्वणलाअण्णविब्भमविलासा ।
पवसन्ति व्व पवसिए, एन्ति व्व पिए घरं एन्ते ॥ 871 ॥

[ कुलपालिकायाः पेक्षध्वं यौवनलावण्यविभ्रमविलासाः ।
प्रवसन्तीव प्रवसिते आगच्छन्तीव प्रिये गृहमागते ॥ ]

१. पालिआए. २. विलाप्यन्ते, विलीयन्ते.

ही कुलीन स्त्री पहा; पति प्रवासाला जातो तेव्हां तिचें यौवन व लावण्य आणि विभ्रम व विलास त्याच्याबरोबर जातात आणि तो घरीं परतला कीं त्याच्याबरोबर परत येतात.

छाया दशरूपकावरून. कुलीन विरहिणींचे विभ्रम दृष्टीस पडत नाहींत, इतकेंच नव्हे, त्या तरुण व सुंदर आहेत किंवा कसें, याचाही संभ्रम पडतो. वज्जालग्गातील (क्र. ४६७) पाठ : दुसरी ओळ : सव्वे वि अगमचलिया पियम्मि कयनिच्छए गन्तुं ॥ सर्वेऽप्यप्रचलिताः प्रिये कृतनिश्चये गन्तुम् ॥

## ८६६ पतिव्रता : 866. Tipsy.

पइपुरओ च्चिअ रभसेण चुम्बिओ देअरो अडअणाए ।
महु चअणं मइरागंधिअं ति हाआ तुहं भणइ ॥ 872 ॥

'तुमचे भाऊ म्हणतात कीं माझ्या तोंडाला अजून मद्याचा वास येत आहे. भाऊजी, तुम्हीच वास घेऊन पहा आणि सांगा,' असें बोलून स्वैरिणीनें आपल्या पतीच्या देखत दीराचें आवेशानें चुंबन घेतलें.

## ८६७ असती : 867. Propaganda.

तह अडअणाएँ रुण्णं पइमरणे बाहरुद्धकण्ठीए ।
अणुमरणसंकिणो जह जारस्स वि संकिअं हिअअं ॥ 873 ॥

नवरा मेला तेव्हां असतीनें रुद्ध कण्ठानें एवढा आक्रोश केला कीं या दुःखानें ही मरते कीं काय अशी तिच्या जारालाही धास्ती वाटली.

## ८६८ थरकांप : 868. Flutter.

वाणीरकुडुंगुड्डीणसउणिकोलाहलं सुणंतीए ।
घरकम्मवावुडाए वहूएँ सीअन्ति अंगाइं ॥ 874 ॥

[ वानीरकुञ्जोड्डीनशकुनिकोलाहलं शृण्वन्त्याः ।
गृहकर्मव्यापृताया वध्वाः सीदन्त्यङ्गानि ॥ ]

घरकामात व्यग्र असलेल्या वधूनें वेळूच्या कुञ्जांतला पोपटाचा फडफडाट व चीत्कार ऐकला आणि तिचें अंग घरकापलें.

● छाया काव्यप्रकाशावरून. चंद्रालोकावरील राकागम व्याख्येंत व्यञ्जनेचें उदाहरण. साहित्यदर्पणात सांगितलें आहे : ' भ्रातृवधूं प्रति ननान्दुरुपहास-च्छलेनोक्तिरियम् । ' काव्यप्रदीपकार सांगतातः ' अत्र दत्तसंकेतः कश्चिल्लता-गहनं प्रविष्ट इति व्यङ्ग्यम् । ' वधूनें वेळूच्या वनात संकेत दिला होता; पण घरकामामुळें तिला तिकडे जाता आलें नाहीं, प्रियकराच्या चाहुलीमुळें पोपटांनीं केलेला चीत्कार कानीं आला तेव्हा संकेतभङ्गामुळें ती शहारली.

## ८६९ सासुरवासी : 869. Respite.

णोल्लेइ अणोल्लमणा अत्ता म घरभरम्मि सअलम्मि । [1]
खणमेत्तं जइ संझाएँ णवर ण व होइ वीसामो ॥ 875 ॥

[ नुदत्यनार्द्रमनाः श्वश्रूर्मां गृहभारे सकले ।
क्षणमात्रं यदि सन्ध्यायां भवति न वा भवति विश्रामः ॥ ]

खाष्ट सासू दिवसभर माझ्याकडून घरकाम करून घेत असते; क्षण.चीही उसंत मिळत नाहीं. संध्याकाळीं मात्र अगदीं थोडा वेळ विश्रांति मिळते न मिळते.

● छाया काव्यप्रकाशावरून. सून शेजारणीशीं बोलत आहे. विषय नेहमीं-चाच, सासुरवासाचा. बोलता बोलतां सध्याकाळीं संकेत ठरविण्याची सूचना. अलंकाररत्नाकरांत सूक्ष्मालंकाराचें उदाहरणः '' सूक्ष्मार्थस्य सूचनं सूक्ष्मम् । '

१ अणर.

## ८७० माझ्या माहेरीं : .870. Tryst.

ठाणे ठाणे चलिआ, वलणे वलणे सवेडसकुडंगा ।
ण गओ सि अम्ह गामं दिअर ! ण दिट्ठा तुए मुरला ॥876॥

भाउजी, तुम्ही अजून आमच्या गांवीं गेलां नाहीं आणि आमची मुरला नदी पाहिली नाहीं. तिला किती किती वळणें आहेत आणि प्रत्येक वळणाशीं बांबूचीं बेटें आहेत.

● माझ्यावरोबर चला, तीं सारीं ठिकाणें मी तुम्हांला दाखवीन. अशीं सोईस्कर ठिकाणें तिच्या सासरच्या गावीं नसावींत; असलीं तरी तीं अद्याप तिला माहीत नसावींत; भाऊजींनीं तरी तीं तिला दाखवावींत की नाहीं ?

## ८७१ स्वयंसिद्धा : 871. Ready & Willing.

महुएहि किं व चालेअ ! हरसि णिअंबाहि जइ वि मे सिअअं ।
साहामि कस्स रण्णे ? दूरे गामो, अहमेक्का । 877 ॥

[ मधुकैः किं वा पान्थ यदि हरसि निवसनं नितम्बात् ।
शंसामि कस्यारण्ये ग्रामः दूरेऽहमेकाकिनी ॥ ]

वेड्या, माझ्याजवळचीं मधुकाचीं फुलेंच काय नितंबांवरलें नेसतें वस्त्र जरीं ओढलेंस तरीं मी सांगणार कोणाला ? येथून गांव फार दूर आहे आणि येथें मी अगदीं एकटी आहे.

● छाया काव्यानुशासनावरून. साहित्यमीमांसेतील पाठ : मह एहि किंव पन्थअ जइ रहसि णिअस्सणं णिअं वा । ओद्दो साहेमि कस्सरणे गामो दूर्ड अहं एक्का ॥

---

१. पथिक. २. णिअंसण. ३. पुरओ. ४. कथयामि कस्य पुरतो.

## ८७२ स्वर्गनिर्माण : 872. Heaven in Hell

कालक्खरदूसिक्खिअ धम्मिअ ! रे णिंवकीडअसरिच्छ !
दोण्ण वि णिरअणिवासो समअं जइ होई तहि होदु ॥ 878 ॥

[ कालाक्षरदुःशिक्षित बालक रे लग मम कण्ठे ।
द्वयोरपि नरकनिवासः समकं यदि भवति तद्भवतु ॥ ]

हे धार्मिक, तूं दुःशिक्षित आहेस. तूं लिंबावरल्या किड्यासारखा आहेस. काय व्हावयाचें असेल तें होऊं दे; नरकांत जाऊं, पण दोघेही बरोबर जाऊ.

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून. तेथील पाठ थोडा वेगळा आहे: कालक्खरदुस्सिक्खिअ बालअ रे लग्ग मज्झ कण्ठम्मि । दोण्ह वि णरअणिवासो समअं जइ होइ ता होउ ॥ गाथाकाराचा तथाकथित धार्मिकांवर व धरर्लोभड्यांवर विशेष रोष आहे. भोजदेवाचा टीकाकार जगद्धर सांगतो: बालक, तूं स्वतःला सुशिक्षित म्हणवितोस, पण तूं पक्क अक्षरें गिरविलीं आहेस; तूं शास्त्राचें अध्ययन केलें आहेस, पण तुला ज्ञानाचें रहस्य समजलेलें नाहीं. काय म्हणतोस ? ' परस्य दारान्मनसापि नेच्छेत् । ' तूं सुशिक्षित नाहींस, दुःशिक्षित आहेस. तूं शास्त्राचें कोरडें अध्ययन केलें आहेस. मी तुला जीवनाचें रहस्य शिकवितें. ये, माझ्या गळ्यांत मिठी घाल, मग तुला शास्त्रवचनाची आठवणही होणार नाहीं. काय होईल ? आपण दोघेही नरकात जाऊं ? हरकत नाहीं; तेथेही आपण स्वर्ग निर्माण करूं !

## ८७३ दाटकाळें : 873. Gathering Clouds

पंथअ ! ण एत्थ संथरमत्थि मणं पत्थरत्थले गामे ।
उण्णअपओहरे पेक्खिऊण जइ वसइ ता वसतु ॥ 879 ॥

[ पथिक नात्र संस्तरमस्ति मनाक् प्रस्तरस्थले ग्रामे।
उन्नतपयोधरं प्रेक्ष्य यदि वससि तद्वस ॥]

पथिका, हें खेडें खडकाळ आहे. तुला झोंपण्यासाठीं येथें बिछाना मिळणार नाहीं; पण आभाळांत ढग जमूं लागले आहेत ते पहा आणि तुला येथें मुक्काम करावयाचा असेल तर रहा बापडा.

● छाया काव्यप्रकाशावरून. स्वयंदूती नायिका. संध्याकाळीं मुक्कामासाठीं जागा शोधणाऱ्या पांथस्थाला उद्देशून असच्चरितेचे उद्गार; खेड्यातल्या गावढळांना त्याचें रहस्य कसें समजणार ? उन्नत पयोधर आभाळात आहेत, तसेच येथेंही आहेत; मात्र आम्हां गरीबांचे घरीं बिछाना नाहीं; पटत असेल तर पथारी पसरा. वज्जालग्गातील पाठः कह लब्भइ सत्थरयं (स्वस्थरतं) अम्हाण य पहिय पामरघरम्मि। उन्नयपओहरे पेच्छिऊण जइ वससि ता वससु ॥ ४९४ ॥ साहित्यदर्पणात 'वस्तुरूपशब्दशक्त्युद्भवाचें उदाहरण. काव्य-प्रदीपकार सांगतात: "स्वयंदूती 'द्व्यर्थैः पदैः पिशुनयेच्च रहस्यवस्तु' इति कामशास्त्रस्थितिमनुसृत्य पथिकमाह–पन्थिअ इति।"

## ८७४ आत्मार्पण :　　874. Pitcher.

विहलक्खंणं तुमं सहि ! दट्ठूण कुडेण तरलतरदिट्ठिं।
वारप्फंसमिसेणं अ अप्पा गरुओ त्ति पाडिय विहिण्णो ॥ 880 ॥

[ विह्वलां खलां त्वां सखि दृष्ट्वा कुडेन तरलतर दृष्टिम्।
द्वारस्पर्शमिषेण आत्मा गुरुक इति पातयित्वा विभिन्नः ॥

सखि, श्रमानें तूं व्याकुळ झाली आहेस आणि तुझी नजर भिर-भिरत आहे, हें तुझ्या माथ्यावरल्या घड्याच्या लक्षात आलें. आपण फार जड आहोंत हें जाणून तुझा भार हलका करण्यासाठीं दाराचा धक्का लागल्याचें निमित्त साधून तो आपण होऊन भग्न झाला.

१ विहलपल. २. मिसेण. ३. विशृङ्खलां.

● छाया काव्यप्रकाशावरून. थोड्या वेळापूर्वी पाणवठ्यावर तिनें ज्याची वाट पाहिली होती तो घराजवळ घुटमळताना दिसताच तिची नजर भिर-भिरली, मानेचा तोल गेला व घडा दाराच्या बाहीवर आपटून फुटला. घडा तिच्या माथ्यावर होता, म्हणून त्याला तिच्याहून उंचावरचें दिसत होतें. घरात खाष्ट सासू असल्यामुळें आत्मार्पणाशिवाय तिला पुन्हा पाण-वठ्यावर जाण्याची संधि मिळणार नाहीं हें जाणून तो आपण होऊन कलंडला ! अलंकाररत्नाकरात अपन्हुति व उत्प्रेक्षा अलंकाराचें उदाहरण.

## ८७५ सबब : 875. Voluntary Statement.

अइपिउंलं[1] जलकुम्भं घेत्तूण समागअम्हि सहि तुरियम् ।
समसेअसलिलणीससणीसहा वीसमामि खणम् ॥ 881 ॥

[ अतिपृथुलं जलकुम्भं गृहीत्वा समागताऽस्मि सखि त्वरितम् ।
श्रमस्वेदसलिलनिःश्वासनिःसहा विश्राम्यामि क्षणम् ॥ ]

सखे, पाण्याचा हा फार मोठा भरला घडा घेऊन मी घाईघाईनें येथवर आलें; या श्रमामुळें मी दमलें आहे; मला घाम आला व धाप लागली आहे. क्षणभर येथेंच बसून मी विश्रांति घेतें.

● छाया काव्यप्रकाशावरून. तूं एवढी धामाधूम कशानें झालीस, हें कांहीं तिला कोणी विचारलें नव्हतें. वाटेंत भेटलेल्या सखीला हें तिनें आपण होऊन सांगितलें आहे; कारण श्रमाच्या सबबींखालीं दिला आपल्या चोरट्या प्रेमव्यवहाराचीं बाह्य चिन्हें छपवायचीं होतीं. या गाथेंत वक्त्रीचें वक्र चारित्र्य व्यङ्ग्य धर्तीनें सूचित केलेलें आहे.

१. विउलं. २. विव्हल.

## ८७६ गुप्तप्रेम : 876. Secret Love.

अणुमरणे हसइ जणो, रोत्तुं वि ण लब्भइ जहेच्छं।
ता एत्थ किं करिस्सं चोरिअरमणे विवज्जन्ते ? ॥ 882 ॥

प्रियकर मरण पावला–तरी मला मन मोकळें करून रडतांही येत नाहीं; कारण त्याची माझी प्रीति गुप्त होती; त्याच्या नांवानें मी सती गेलें तर लोक मला हसतील. मी करूं तरी काय !

## ८७७ मनकवडे : 877. Telepathy.

मा पुत्ति ! वंकभणिअं जंपेसु पुरओ तुमं छइल्लाणं ।
हिअएण जं च भणिअं, तं पि हआसा विआणन्ति ॥ 883 ॥

मुली, या चतुर लोकांसमोर सांकेतिक बोलूं नको. हे इतके हुषार आहेत कीं ते मनांतले विचारही ओळखतात.

● वज्जालग्गातील पाठ व छाया: मा पुत्ति वङ्कवङ्कं जम्पसु पुरओ छइल्लोयाणं हिअए। जं च निहित्तं तं पि हयासा मुणन्ति सुबुद्धीए ॥ २८२ ॥ मा पुत्रि वक्रवक्रं जल्प पुरतः छेकलोकानां हृदये। यच्च निहितं तदपि हताशा जानन्ति स्वबुध्द्या ॥

## ८७८ वक्रोक्ति : 878. Warning.

वंकभणिआइ कत्तो, कत्तो अद्धच्छिपेच्छिअव्वाइ ?।
ऊसासिउं पि ण तीरइ छेउज्जाणिवारिए गामे ॥ 884 ॥

येथें व्यङ्ग्य उक्तीचा काय उपयोग ! येथें अर्धोन्मीलित दृष्टीनें पहावयाचें तरी कसें ! चतुर माणसांनीं भरलेल्या या गावात निःश्वासाचीही चोरी.

---

१. चउल छइल्लबहुले हआगामे.

● मैत्रिणीनें विचारलें, येथें आल्यापासून तुला एवढी विरक्ति कशी आली ? या प्रश्नाचें उत्तर.

## ८७९ पुतळा :

879. Renewal.

तत्थ वि होंति सहीओ पुत्तलि ! मा रुवसु जत्थ दिण्णा सि ।
तत्थ वि णिउंजलीला, तत्थ वि गिरिवाहिणी गोला ॥ 885 ॥

पुतळा–तू रडतेस कशाला ? तुला जेथें दिलेली आहे तेथेंहि तुला मैत्रिणी मिळतील, आणि निकुञ्जांत क्रीडा करतां येईल. डोंगरांतून वाहणारी गोदावरी तेथेंही आहेच.

● प्रथम सासरीं जाणाऱ्या वधूला माहेरगावच्या मैत्रिणींचें आश्वासन. पुतळा हें विशेषनाम पुत्तलि, पुत्री यावरून आलें असावें.

## ८८० अधरव्रण :

880. Sore

कस्स व ण होइ रोसो दट्ठूण पिआऍ सव्वणं अहरम् ।
सभमरकमलग्घाइरि ! वारिअवामे ! सहसु एण्हिं ॥ 886 ॥

[कस्यैव न भवति दोषो दृष्ट्वा प्रियायाः सव्रणमधरम् ।
सभ्रमरपद्माघ्राणशीले वारितवामे सहस्वेदानीम् ॥ ]

प्रियेच्या अधरावरील व्रण पाहून कोणाला राग येणार नाहीं ? आंत भ्रमर असलेलें कमल तिनें हुंगलें, तेव्हां त्यानें तिच्या ओंठाचा चावा घेतला.

● छाया अलंकाररत्नाकरावरून. शोभाकरमित्रानें व्याजोक्तीचें उदाहरण म्हणून ही गाथा उध्दृत केली आहे. ' उद्भेदप्रच्छादनं व्याजोक्तिः । ' संशय

१ पद्ममाघ्राणि.

व्यक्त झाला न झाला तोंच समयसूचक सखीला ऐन वेळीं भुग्याची सबब सुचली.

## ८८१ आपद्धर्म : 881. In Default.

छप्पत्तिआ वि खज्जइ णिप्पत्ते पुत्ति ! एत्थ को दोसो ? ।
णिअपुरिसे वि रमिज्जइ परपुरिसविवज्जिए गामे ॥ 887 ॥

मुली, दुसरीं पानें मिळत नाहींत तेव्हा पट्पर्णालाही पान मानावें लागतें. त्यांत दोष नाहीं. एकाद्या गांवांत परपुरुष प्राप्त होण्यासारखा नसला तर पतीशीं रममाण होण्यांत कांहीं दोष नाहीं.

● पाइअसद्दमहण्णवात ' छप्पत्तिआ ' या देशी शब्दाचा अर्थ ' चपाती, रोटी, फुलका ' असा दिलेला आहे. पक्वान्नांचे अभावीं रोजच्या चपातीवर भागविण्यात दोष नाहीं, असा अर्थ होऊं शकेल.

## ८८२ परपुरुष : 882. Presumption.

अमुणिअपरपुरिससुहो जंपउ जं किं पि अण्णओ लोओ ।
णिअपुरिसेहि वि अम्हे परपुरिसो त्ति च्चिअ रमामो ॥ 888 ॥

परपुरुषाचें सुख ज्यानीं अनुभविलेलें नाहीं त्यांना काय म्हणावयाचें असेल तें म्हणूं द्या. आम्हाला तर रतिप्रसंगीं पतीलाही परपुरुष कल्पिल्यावांचून समाधान होत नाहीं.

## ८८३ मंडईत चकर : 883. Shopping.

माए ! घरोवअरणं अज्ज खु ण त्थि त्ति साहिअं तुमए ।
ता भण किं कराणिज्जं ? एमेअ ण वासरो ठाइ ॥ 889 ॥

[मातर्गृहोपकरणमद्य खलु नास्तीति साधितं त्वया।
तद्भण किं करणीयमेवमेव न वासरः स्थायी ॥]

आई, घरांतलें सामानसुमान सपलें आहे असें तूं म्हणत होतीस ना? सांग, काय करावयाचें आहे तें लवकर सांग, कारण आतां दिवस फार वेळ राहणार नाहीं.

● छाया काव्यप्रकाशावरून. भाजीपाला, लाकूडफाटा आणावयाच्या निमित्तानें संध्याकाळीं भटकण्यासाठीं मुलीला बाहेर पडावयाचें होतें, त्याकरिता तिनें आज्ञाधारक कामरूपणाचा आविर्भाव धारण केला आहे.

## ८८४ गोयूथिका : 884. Frenzy.

सच्छंदरमणदंसणसंवड्ढिअगरुअवम्महविलासम्।
सुविअड्ढवेसविलआ रमिअं को वण्णिउं तरइ? ॥ 890 ॥

विदग्ध वेश्याच्या संभोगामुळें होणाऱ्या आनंदाचें वर्णन कोण करूं शकणार? भोंवतालीं चाललेल्या विलासक्रीडामुळें त्यांचें रतिकौशल्य अधिकच उत्तेजित होतें.

● एक पुरुष अनेक स्त्रियाशीं क्रीडा करीत आहे, किंवा, सामुदायिक रतीचा प्रसंग आहे, अशा वेळीं सर्वांचें कौशल्य वृद्धिंगत होतें, असा कामशास्त्रज्ञाचा अभिप्राय आहे. या गाथेतील वर्णन गोयूथिकेचें असावें.

## ८८५ उच्छृंखल : 885. Profligacy.

सामण्णसुंदरीणं विब्भममावहइ अविणओ च्चेअ।
धूमो वि ह पज्जालिआणं महुरो होइ सुराभिदारूणं ॥ 891 ॥

[1] सीविदग्धवेश्यावनिता.

[ सामान्यसुंदरीणां विभ्रममावहत्यविनय एव ।
धूम एव प्रज्वलितानां बहु मतः सुरभिदारूणाम् ॥ ]

सौंदर्य सामान्य असलें तरी नखरेबाज निर्लज्जपणा भरपूर असला म्हणजे स्त्रिया विशेष आकर्षक दिसतात. चंदनाच्या खोडापेक्षां त्याच्या धुराचाच सुगंध दूरवर दरवळतो.

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून. 'सामान्य-सुंदरी' हा प्रयोग वेश्यांना उद्देशून केलेला असावा. निर्लज्ज स्त्रिया कामाग्नीनें चेतल्या म्हणजे बेफाम आविर्भावामुळें त्यांची आकर्षकता विशेष वृद्धिंगत होते.

## ८८६ पराशरसूत्र : 886. Aphorisms.

अव्वो ! कालस्स गई, सो वि जुआ सरसकव्वदुल्ललिओ ।
पढइ परासरसद्दं अम्हे वि णिअं पइं गमिमो ॥ 892 ॥

काळाचा महिमा अगाध आहे; पहा : रसभरित काव्यें लिहिणारा हा तरुण आता पराशरसूत्राचें अध्ययन करीत आहे आणि आम्ही, आम्ही आमच्या पतींकडे वळत आहोंत.

## ८८७ मानदेवता : 887. Adoration.

पणमह माणस्स, हला ! चलणे, किं देवएहि अण्णेहिम् ?
जस्स पसाएण पिओ घोलेइ पाअन्तपासेसु ॥ 893 ॥

सख्यानों, मानदेवतेची आराधना करा. काय करावयाच्या आहेत इतर देवता ? या देवतेच्या कृपाप्रसादानें प्रियकर आपल्या पायाशीं लोळण[1] घेत येतो.

1 लोळवा.

८८८ रुसवा : 888. Sulk.

अणुणअपसरं पाअपडनूसवं रभसचुम्बणसुहेल्लिं ।
एआइ अ अण्णाइ अ अवसो व्व कओ फलइ माणो ॥894॥

अनुनयाचा विस्तार, पादवंदनाचा उत्सव, आवेशपूर्ण चुंबनांची सुखद क्रीडा हीं व अशीं अनेक अन्य फळें रुसव्याला येतात; मग तीं अपेक्षित असोत वा नसोत.

८८९ अस्त्र : 889. Infallible.

जइ पुत्तलि ! बहुएहिं अणुणअसोक्खेहि आत्थि दे कज्जं ।
ताव रुअ, गेण्ह माणं, खणमेत्तं तम्मि सुहआम्मि ॥ 895 ॥

मुली, अनुनयामुळें प्राप्त होणाऱ्या बहुविध सुखांची अपेक्षा असेल तर तूं अश्रूंचें अस्त्र काढ, मान धारण कर, म्हणजे तीं तुला क्षणार्धात प्राप्त होतील.

८९० अपूर्व : 890. Extraordinary.

आणा अणालवंतीएँ कीरए, दीसए पराहुत्तो ।
णिंताम्मि णीससिज्जइ, पुत्ति ! अपुव्वो क्खु दे माणो ॥896॥

प्रियकराशीं तूं बोलत नाहींस, पण त्याच्या मर्जीप्रमाणें वागतेस; तो पराङ्मुख झाला कीं त्याच्याकडे टक लावून पाहतेस आणि तो बाहेर गेला कीं सारखे उसासे टाकतेस. मुली, तुझा रुसवा कांहीं अपूर्वच दिसतो

● यशा अर्थवट उपायांनी तूं त्याला पठणीवर निरा शरण आणूं शकणार नाहीस.

८९१ निश्चय :　　891. Resolution.

जं जं भणह, सहीओ ! आम करिस्साम सव्वहा तं तं ।
जइ तरह रुंभिउं मह धीरं समुहागए तम्मि ॥ 897॥

[ यद् भणथ तत् सख्य आम करिष्यामि तत् यथा सर्वम् ।
यदि त्वरध्वं रोध्दुं मे धैर्यं संमुखागते तस्मिन् ॥ ]

सख्यांनो, तुम्ही जें जें सांगाल तें तें मी करीन; पण प्रियकर समोर आला म्हणजे माझा निश्चय डगमगणार नाहीं असा कांहीं उपाय काढा.

● छाया काव्यानुशासनावरून. अनुमान ( प्रश्नादप्युत्तरं यत्र ) किंवा परिसंख्या ( पृष्टेऽपृष्टे वा अन्यापोहपरोक्तिः ) अलंकार.

८९२ मतवाला :　　892. Gallant.

अच्छिअइ दिट्ठिणिब्भच्छिओ वि, विहुओ वि लग्गए सिअए ।
पइओ वि चुम्बइ घला, अलज्जए कह णु कुप्पिस्सम् ? ॥899॥

( त्यानें दूर व्हावें म्हणून ) त्याच्याकडे रागानें पाहिलें कीं तो उलट माझ्या आणखी जवळ येतो; दूर लोटलें कीं वस्त्राला झटू लागतो; आणि फटकारलें कीं चुम्बनच घेतो. सांग, अशा निर्लज्जावर रागावूं तरी कशी ?

८९३ हिम :　　893.Snow.

हिमजोअचुणहरथाओ ˘ जस्स दप्पं कुणन्ति राईओ ।
कह तस्स पिअस्स मए तीरइ माणो हला ! काउम् ? ॥899 ॥

सखे, हिंवाळ्यांतल्या रात्रीच्या थंडीमुळें उद्भट झालेल्या प्रियकरावर मी कशी रुसूं ?

● कारण हिंवाळ्यांतल्या रात्री मोठ्या आणि थंडीमुळें अंगांत हुडहुडी भरलेली. वेबर सांगतो, दक्षिणेंत जन्मलेल्या या गायेंतील 'हिमयोगचूर्ण' हा प्रयोग अगदीं विलक्षण आहे; कारण येथें बर्फ पडत नाहीं. प्राचीन काळीं येथें दाट जंगल होतें, अर्थात् पाऊस व थंडी यांचें प्रमाण अधिक असलेंच पाहिजे. पाण्यावर बर्फाचा तवंग येण्याइतकें कडक हिंव इकडे अलीकडेही अधून मधून पडतें.

## ८९४ गेंडा : 894. Rhino.

किं भणह मं, सहीओ ! करेहि माणं ति, किं थ माणेण ?।
सब्भावबाहिरे तम्मि मज्झ माणेण वि ण कज्जम् ॥ 900 ॥

सख्यांनो, काय सांगतां काय ? मी ! आणि त्याच्यावर रुसूं ! आणखी रुसण्याचा उपयोग काय ? त्याच्या अंगीं सद्भाव नाहीं आणि रसिकताही नाहीं. अशावर रुसायचें कसें ? आणि कशासाठीं ?

## ८९५ विसंगति : 895. Absurd.

जइआ पिओ ण दीसइ भणह हला ! कस्स कीरए माणो ?।
अह दिट्ठम्मि वि माणो ? ता तस्स पिअत्तणं कत्तो ? ॥ 901 ॥

[यदा प्रियो न दृश्यते भणत हला कस्य क्रियते मानः ।
अथ दृष्टेऽपि मानस्तत्तस्य प्रियत्वं कुतः ]

सखे, प्रियकर दृष्टीसमोरे नसतो तेव्हा कोणावर रुसायचें ! आणि तो दृष्टीसमोर असतो तेव्हां त्याच्यावर कसें रुसायचें ? आणि अशा वेळीं रुसायचें तर तो प्रियकर कसला ?

● छाया सरस्वतीकंठाभरणावरून.

## ८९६ मात्रा :　　　　896. Accused.

जाणिमि कआवराहं, जाणिमि अलिआइ भणइ सअलाइ।
अणुणेंते उण जाणे कआवराहं व अप्पाणं ॥ 902 ॥

तो अपराधी आहे, हें मला माहीत आहे. ( आपण निर्दोषी आहोंत, असें ) तो सागतो, तें खोटें आहे, हेंही मला ठाऊक आहे. पण तो माझें सात्वन करूं लागतो, तेव्हा मात्र वाटू लागतें कीं खरी अपराधी मीच आहे.

## ८९७ सराईत गुन्हेगार :　　　　897. Habitual Offender.

अवराहसहस्साइं भरिमो हिअएण तम्मि अदिट्ठे[1]।
दिट्ठम्मि उण, पिअसही ! एक्कं पि हु णं ण संभरिमो ॥903॥

तो समोर नसतो तोंपर्यंत त्याचे सहस्रावधि अपराध माझ्या मनांत थैमान घालीत असतात. पण त्याची माझी दृष्टभेट झाली कीं त्या अनंत अपराधांपैकीं एकही मला आठवत नाहीं.

१. अदृंसण.

८९८ सान्निध्य : 898. Freedom of Speech.

**भण भण जं जं पडिहाइ तुज्झ, तं तं सहामिमो अम्हे ।**
**असहत्तणं च जीअं च वल्लमे दोइ ण घडंति ॥ 904 ॥**

बोल, बोल, काय वाटेल तें बोल तें; सारें आम्ही सहन करूं. सहनशीलतेचा अभाव आणि प्रियकराचें सान्निध्य यांचा सहवास अशक्य आहे.

८९९ परकायाप्रवेश : 899. Transmigration.

**एअं चिअ मह णामं? भण भण दे सुहअ ! किं विलक्खो सि? ।**
**पडिहाइ जं ण तुज्झ वि, ममं पि किं तेण णामेण ॥ 905 ॥**

अस्सें, हें माझें नाव आहे काय? बोल, बोल; कां? गोंधळलास का? सुभग, माझें नांव तुला आवडत नसलें तर मलाही त्याचा त्याग करतां येईल.

● गोत्रस्खलन. त्यानें तिला भलत्याच नांवानें हांक मारली. तें लक्षांत आलेंच नाहीं अशी बतावणी करून तिनें आश्वासन दिलें कीं तूं तुझ्या आवडीचें नांव मला ठेवलेंस, तें मलाही फार आवडलें. एवढ्यानें तुझें समाधान होईल ना ! सहनशील, वाग्दत्तेहून सहनशील.

९०० धुंदी : 900. Stupor.

**सुहअ ! मुहुत्तं सुप्पउ, जं ते पडिहाइ तं पि भण्णिहिसि ।**
**अज्ज ण पेच्छंति तुहं णिद्दागरुआइ अच्छीइ ॥ 906 ॥**

सुभग, जागरणामुळें डोळे जड झालेले असल्यामुळें तुला अजून नीट दिसत नाहीं आणि धट बोलतांही येत नाहीं. आणखी थोडी झोंप घे आणि मग जें वरें दिसेल तें बोल

१ एअं चिअ एम छो?

## ९०१ प्रतिकार :　　901. Retaliation.

मा वेलवेसु बहुअं पुत्तअ ! अलिएहि गोत्तेहि ।
एसा वि जाणइ च्चिअ परिहासुम्मिस्सभणिआइं ॥907॥

मुला, तू तुझ्या पत्नीला भलत्याच नांवानें हांक मारीत आहेस. तिला अशी चिडवूं नकोस. तुझी चेष्टा करण्याइतकी बुद्धि तिलाही आहे

● खरा प्रकार आईनें ओळखला होता, पण ही सारी चेष्टामस्करी चाललेली आहे अशी आपली समजूत झाली असल्याची बतावणी करून या अनुचित प्रसंगाला ती वेगळें वळण लावण्याचा प्रयत्न करीत आहे.

## ९०२ चण्डिका :　　902. Fury.

अइ चण्डि ! किं ण पेच्छसि ? जइ सो वाहरइ अण्णगोत्तेण ।
अह दे इच्छइ मच्छरपणच्चिअच्छं मुहं दट्ठुं ॥ 908 ॥

हे चंडिके, मत्सरानें ग्रस्त झालेल्या व गरगर फिरणाऱ्या डोळ्यांमुळें तुझ्या मुखाला येणारी शोभा पाहण्याच्या इच्छेनें त्यानें तुला मुद्दाम दुसऱ्याच नांवानें संबोधिलें, हें तुला कसें कळत नाहीं !

## ९०३ टकमक :　　903. Gaze.

णेआरिज्जसि, मुद्धे ! गोत्तक्खलिएहि मा खु तं रुससु ।
किं व ण पेच्छइ अण्णाइ एद्दहमेत्तेहि अच्छीहिं ॥ 909 ॥

वेडे, त्यानें तुला अन्य नावानें हांक मारली म्हणून एवढें का रडावयाचें ? तो डोळे विस्फारून तुझ्याकडे टकमक पहात आहे, तें तुला दिसलें नाहीं का ?

## ९०४ मंचक : 904. Couch.

सोत्तुं सुहं ण लब्भइ, अव्वो पेम्मस्स वंकविसमस्स ! ।
दुग्घडिअमंचअस्स व खणे खणे पाअपडणेण ॥ 910 ॥

प्रेमाची गति वक्र आणि विषम असते. तो ( माझी मनधरणी करण्यासाठीं ) क्षणोक्षणीं व जागोजाग माझ्या पाया पडला, यामुळें मंचकावरील शय्या (प्रेमाच्या मार्गाप्रमाणें) उंचसखल झाली. यामुळें दोन घटका सुखानें झोंप घेईन म्हटलें तर तें कांहीं जमत नाहीं.

## ९०५ विन्मुख : 905. Confusion.

एक्कसअणम्मि सुमुही विमुही गरुएण माणबंधेण ।
सिविणकलहम्मि होंती परम्मुही सम्मुही जाआ ॥ 911 ॥

आम्ही दोघें एकाच आथरुणावर झोंपलों होतों, पण सुमुखि माझ्यावर खूप रागावलेली असल्यामुळें माझ्याकडे पाठ करून झोंपली होती. नतर स्वप्नातही ती माझ्याशीं भांडली; त्यावेळीं तिनें पुन्हां कुशी पालटल्यामुळें ती विन्मुख होती, ती आयतीच सन्मुख झाली !

● आणि मग ? मग काय विचारता ? स्वप्नातही मी तुमच्याशीं भांडलें व त्यामुळें तोंड फिरवलें हें जागी झाल्यावर तिनेंच त्याला सांगितलें असलें पाहिजे !

## ९०६ संवय : *906. Habit.

वड्ढउ ता तुह गव्वो, भण्णसि रे जह विहंडणं वअणं।
सच्चं ण एइ णिद्दा तुए विणा, देहि ओआसं ॥ 912 ॥

वाढूं दे, तुझा उद्धटपणा आणखी वाढूं दे. बोल, मनाला येईल तें बोल. पण हें पहा, तूं शेजारीं असल्याशिवाय मला झोंपच येत नाहीं; तुझ्या बिछान्यावर मला थोडीशी जागा दे.

## ९०७ अंकुर : 907. Germination.

कअविच्छेओ सहिभंगिभणिअसब्भाविआवराहाए।
झत्ति आपल्लवइ पुणो णअणकवोलेसु कोवतरू ॥ 913 ॥

तिच्या सखीनें तुझा अपराध तिला अलंकारिक भाषेंत सांगितला, तरी तिला त्याची स्पष्ट जाणीव झाली. तिच्या रागाचा वृक्ष उन्मळून पडला होता, त्याला एकाएकीं नवे अंकुर फुटले आणि तिचा क्रोध तिच्या नेत्रांत व गालांवर व्यक्त झाला.

## ९०८ अश्रुसिंचन : 908. Rejuvenation.

उम्मूलम्मि व हिअअं अणुणिज्जंतीऒ माणवंतीओ।
संभरिअमण्णुणिब्भरवाहभरोरुंभिअमुहीओ ॥ 914 ॥

मानिनीचा अनुनय केला जात असतांना प्रियकराच्या अपराधांच्या आठवणीमुळें तिच्या डोळ्यांतून अश्रु वहात आहेत आणि त्यांच्या सिंचनामुळें तिच्या हृदयांतील प्रीतीला नवे अंकुर फुटत आहेत.[1]

1. हण्णसि.

## ९०९ बोभाटा : 909. Notoriety.

ण वि तह तक्खणसुअमण्णुदुक्खविअणाओ वि रुवंति ।
जह दिट्ठम्मि पिअअमे अणुणिज्जंतीओ तरुणीओ ॥ 915 ॥

प्रियकराच्या दुर्वर्तनाचा बोभाटा कानीं येतो त्यावेळीं होतें त्याहून अधिक दु.ख त्यानंतर तो दृष्टीस पडतो व अनुनय करू लागतो तेव्हां स्त्रियांना होतें आणि त्याची चीड येते.

● कारण त्यावेळीं त्यांना त्याच्या खोटेपणाचा प्रत्यय येतो आणि आपल्या जीवनाच्या वैफल्याची जाणीव होते.

## ९१० लत्ताप्रहार : 910. Kick.

हिअए रोसुक्खित्तं पाअपहारं सिरेण पत्थंतो ।
ण हओ दइओ माणंसिणीएँ, थोरंसुअं रुण्णं ॥ 916 ॥

[ हृदये रोपोद्गीर्णं पादप्रहारं शिरसि प्रार्थयमानः ।
तथैवेति प्रियो मनस्विन्या स्थूलाश्रु रुदितं ॥ ]

( तीं त्याच्यावर इतकी चिडली होती कीं ) मनातल्या मनांत तिनें त्याचें मस्तक लाथेच्या ठोकरीनें आभाळांत उडविलें होतें; पण प्रियकरानें तिच्या पायांवर डोकें ठेवून प्रत्यक्ष लत्ताप्रहाराची याचना केली तेव्हां तिनें तें ठोकरलें नाहीं किंवा दूर लोटलें नाहीं; एवढेंच नव्हे, तर तिच्या डोळ्यांतून टपोरे अश्रु ओघळू लागले

● छाया वज्जालग्गावरून.

---

१. रोसुग्घुण्णं.

## ९११ मदिराचषक : 911. Wine-Glass.

पिअअमविइण्णचसअं अचक्खिअं पिअसहीएँ देंतीए ।
अभणंतीएँ वि माणंसिणीएँ कहिओ च्चिअ विरोहो ॥ 917 ॥

चषकांतील मदिरेचा आस्वाद घेण्यापूर्वीच प्रियकरानें तो प्रियसखीच्या हातीं दिला; तेव्हां मानिनी एक शब्दही बोलली नाहीं आणि केवळ मौनानें तिनें त्याच्या अनुनयाला असलेला आपला विरोध प्रकट केला.

● तिच्या हातीं चषक देतांना तोही कांहीं बोलला नव्हता, पण या कृतीनें त्यानें तिला विनंति केली कीं पहिला घोट तूं घे, नंतर मी घेईन; तिला तें मानवलें नाहीं.

## ९१२ लभ्यांश : 912. Recompense.

वच्चिहिइ सो घरं से, लहिहिइ ओआसमेहिइ सआसं ।
भणिहिइ जं भणिअव्वं, पच्चुत्तं किं णु पाविहिइ ? ॥ 918 ॥

ती त्याच्या घरीं जाईल, संधि साधील आणि जें कांहीं सांगावयाचें आहे तें सांगेल; तिला प्रत्युत्तर काय मिळेल बरें ?

## ९१३ चंद्रकला : 913. Waning Moon.

तणुआइआ वराई दिअहे दिअहे मिअंकलेहॅ व्व ।
वहलपओसेण तुए णिसंस ! अंधारिअमुहेण ॥ 919 ॥

निर्दया, तुझ्या मनांत तिच्याविषयीं गाढ द्वेष भरलेला आहे आणि ती सन्निध असतांना तुझें मुख काळवंडलेलें असतें. हें पाहून विचारी दिवसानुदिवस ( कृष्णपक्षींच्या ) चंद्रकलेप्रमाणें झुरत आहे.

## ९१४ विशालाक्षि : 914. Phase.

दावंतेण तुह मुहं सुमआभंगम्मि होन्त णवसोहं ।
अकएण उंवकअं अज्ज मणुआ मज्झ, पसिअच्छि ।। 920 ।।

तूं आज माझ्यावर निष्कारण रागावलीस, पण त्यामुळें मला एक अनपेक्षित लाभ झाला. हे विशालाक्षि, क्रोधाविष्ट झाल्यामुळे तूं भृकुटिभङ्गानें सज्ज असा दृष्टिक्षेप केलास तेव्हां मला एक अभिनव आकर्षक अशी शोभा दिसली.

## ९१५ भृकुटिभंग : 915. Pose.

भिउडी ण कआ, कडुअं णा लविअं, अहरअं ण पज्जुट्टं ।
उवऊहिआ ण रुण्णा - एएणवि जाणिमो माणं ।। 921 ।।

मी तिला आलिंगिलें, तेव्हां तिनें भुंवई चढविली नाहीं, कटु वचनें केलीं नाहींत, ओंठ उडवले नाहींत किंवा अश्रु ढाळले नाहींत. यावरूनच मी ओळखलें कीं ती रुसली आहे.

## ९१६ अबोली : 916. Dumb.

किं पि ण जंपसि कामं, भणिअं च करेसि तं तहा तुरिअं ।
हिअअं रोसुग्घेअं ति तुज्झ विणओ च्चिअ कहेइ ।। 922 ।।

कामाशिवाय बोलत नाहींस व सांगितलेलें काम त्वरित करतेस. तुझा हा विनयच सांगतो कीं तुझ्या हृदयातला क्रोध अद्याप नष्ट झालेला नाहीं.

## ९१७ हा राग सोड, सोड : 917. Displeased.

परिपुंच्छिआ ण जंपसि, चुंबिज्जंती बला मुहं हरासि ।
परिहासमाणविमुहे ! पसिअच्छि ! मणं म्ह दूमेसि ॥ 923 ॥

काहीं विचारलें तर तूं बोलत नाहींस, बलात्कारानें चुंबन घेतलें तर ओंठ चुकवतेस. हे विशालाक्षि,[१] रुसव्यामुळें तूं विन्मुख झाली आहेस आणि यामुळें आम्हाला पीडा होत आहे.

## ९१८ यौवन : 918. Passing Show.

अइ पीणत्थण उत्थंभिआणणे ! सुअणु सुणसु मह वअणं ।
अथिरम्मि जुज्जइ ण जोव्वणम्मि माणो पिए काउं ॥ 924 ॥

हे सुतनु, पीनस्तनी, उन्मुखि, माझें वचन ऐक. तारुण्य अस्थिर आहे, म्हणून प्रियकरावर रुसणें योग्य नाहीं.

## ९१९ शिशिरयामिनी : 919. Long Nights.

तरलच्छि ! चंदवअणे ! थोरत्थणि ! करिअरोरु ! तणुमज्झे ! ।
दीहा ण समप्पइ सिसिरजामिणी, कह णु दे माणो ॥ 925 ॥

तुझें मुख चंद्रासारखें आहे, कटि सूक्ष्म आहे आणि माझ्या हत्तीच्या सोंडेसारख्या आहेत. तुझे स्तन थोर आहेत. हिंवाळ्यांतल्या दीर्घ रात्री अद्याप संपलेल्या नाहींत. तूं मान का सोडीत नाहींस !

---

१. उच्छिआ, उत्थिआ. २. प्रसृताक्षि.

## ९२० भुजंग : 920. Cobra.

सुहआ वि सुंदरी वि हु तरुणी वि हु माणिणि त्ति आ पुत्ति !।
चंदणलंट्ठि व्व हुअंगदूमिआं किं णु दूमेसि ॥ 926 ॥

तूं तरुण आहेस, सुंदर आहेस, तुझें वय सुखोपभोगांचे आहे. चंदनाच्या झाडाभोंवतीं भुजंगाचा विळखा असावा तसा तुझ्या ठायीं मानानें प्रवेश केला आहे. तूं मान धारण करून आमचा छळ कां करतेस ?

## ९२१ सफल : 921. What Else?

पडिवक्खस्स वि पुरओ समुहं भणिआ सि तेण : पसिअ त्ति ।
अवलंबिअस्स माणिणि ! माणस्स अ किं फलं अण्णं ॥ 927 ॥

सवतींच्या देखत त्यानें ' प्रसन्न हो ' म्हणून तुझी प्रार्थना केली. मानिनि, मानधारणापासून तुला आणखी कोणत्या फळाची अपेक्षा आहे ?

## ९२२ उमाळा : 922. Masquerade.

कंट्ठेसि चलिअवलए हत्थे, मुंचेसि अहमुही बाहम् ।
पडिरुंभसि णीसासे, बहुअं ते माणविण्णाणम् ॥ 928 ॥

तूं मान खालीं घालून अश्रु ढाळीत आहेस, हुंदके दाबून टाकीत आहेस; तुझ्या हातांतली कंकणें गळून पडत आहेत. तूं रुसली आहेस—आणि हें लपविण्याचा तूं कितीही प्रयत्न केलास तरी तो व्यर्थ आहे.

---

१. लतेव. २. तापिता. ३. ढकेसि, ढक्केसि. ४. प्रतिरुणत्सि.

## ९२३ अवडंबर : 923. Ostentation.

कज्जं विणा वि कअमाणडंबरा पुलअभिण्णसव्वंगी ।
उज्जल्लालिंगणसोक्खलालसा पुत्ति ! मुणिआ सि ॥929॥

मुली, तूं हें रुसव्याचें अवडंबर कां मांडलें आहेस ! पहा, तुझें शरीर रोमांचांनीं पुलकित झालेलें आहे आणि तुला आलिंगनसुखाची तीव्र इच्छा झालेली आहे असें स्पष्ट दिसत आहे.

## ९२४ स्वप्नांतही अप्राप्य : 924. Misfortune.

हंहो ! किं व ण दिट्ठं हला ! मए जीविअं धरन्तीए ।
सो मं अणुणेइ पिओ अहं पि अणुणिज्जिमि हआसा ॥930॥

सखि, मी दुर्दैवी; मी जीव धरून राहिलें आहे आणि मी काय काय पाहिलें नाहीं ! प्रियकर माझा अनुनय करीत आहे आणि मी अनुनय करून घेत आहे !

● विरहजन्य निद्रानाशामुळें हें सुख मला आतां स्वप्नांतही मिळत नाहीं.

## ९२५ बहुवल्लभ : 925. Competition.

तो सोक्खं, ताव रई, ता रणरणअस्स ण त्थि ओआसो ।
जा दुक्लेवरुणिहाणे ण होइ बहुवलहे पेम्मं ॥ 931 ॥

ज्याला पुष्कळ प्रियकरणी आहेत अशा वल्लभावर जोंवर आपलें प्रेम जडलेलें नाहीं तोंवरच आनंद व सौख्य हीं प्राप्त होतात आणि हळहळीला अवसर मिळत नाहीं. बहुवल्लभांवर प्रेम हें दुःखाचें भाण्डार !

## ९२६ अंतर्ज्ञानी : 926. Mediation.

माणहरिएहि गंतुं ण तीरए, सो ण एइ अवराही ।
को वि अपत्थिअमुणिणो णेज्जं मंतं व आणेज्ज ॥ 932 ॥

मी मान धारण केलेला असल्यामुळें मनधरणी करण्याकरितां प्रियकराकडे जाऊं शकत नाहीं आणि तो अपराधी असल्यामुळें आपण होऊन इकडे येत नाहीं, मनकामना जाणण्याचें अंतर्ज्ञान असलेला कोणी त्याला इकडे आणील काय ?

● अर्थ नीट लागत नाहीं.

## ९२७ स्फटिकपात्र : 927. Crystal Glass.

उव्वहइ दइअगहिआहरोट्ठझिज्जंतकोवगअराअं ।
पाणोसरन्तमइरं व फलिहचसअं मुहं बाला ॥ 933 ॥

तरुणीच्या मुखावरील रागाची लाली ओसरली आहे – कारण प्रियकरानें तिचा अधर धरून जणुं स्फटिकपात्रातली आरक्त मदिरा पिऊन टाकली आहे !

## ९२८ आवेश : 928. Assault.

गाढालिंगणरभसुज्जुअम्मि दइए लहुं समोसरइ ।
माणंसिणीएँ माणो पेल्लणभीओ व्व हिअआहि ॥ 934 ॥

[ गाढालिङ्गनरभसोद्यते दयिते लघु समुपसर्पति ।
मनस्विन्या मानः पीडनभीत इव हृदयात् ॥ ]

१. स्फटिक. २. पीलनभीअव्व

प्रियेला गाढ आलिंगन देण्यासाठीं प्रियकर आवेशानें सरसावला तेव्हां जणूं चेंगरून जाण्याच्या धास्तीनें प्रियेच्या हृदयांतील मान एकाएकीं ओसरला.

● छाया काव्यप्रकाशावरून. उत्प्रेक्षेचें उदाहरण.

## ९२९ मानपर्वत :　　　　929 Thunderbolt

तुङ्गो थिरो विसालो जो सहि ! मे माणपव्वओ रइओ।
सो दइअदिट्ठिवज्जासणीएँ घाए वि ण पहुंतो ॥ 935 ॥

तुङ्गः स्थिरो विशालो यो रचितो मानपर्वतस्तस्या।
स दयि दृष्टिवज्राशनेर्घातमेव न प्राप्तः ॥

सखि; उंच, स्थिर व विशाल असा मानाचा पर्वत मी उभारला आहे खरा, पण प्रियकराच्या एका दृष्टिक्षेपाच्या वज्रपातानें त्याचें चूर्ण होऊन जाईल.

● छाया वज्जालग्गावरून.

## ९३० चलविचल :　　　　930. Agitation.

सहि ! विरइऊण माणस्स मज्झ धीरत्तणेण ओआसं।
पिअअमदंसणविहंलक्खणम्मि सहसे त्ति तेण ओसरिअं ॥ 936 ॥

[ सखि विरचय्य मानस्य मम धीरत्वेनाश्वासम् ।
प्रियदर्शनविश्र्टंद्खलक्षणे सहसैव तेनापसृतम् ॥ ]

१. आसायम्. २. विहलंखलम्गणम्मि. ३. विम्हलक्षणे.

सखि, मी मोठ्या धीरानें मान धारण केला होता, पण प्रियकराचें दर्शन झालें तेव्हां एवढी चलबिचल झाली कीं माझा मान एकाएकीं ओसरला.

● छाया काव्यप्रकाशावरून. उत्प्रेक्षा वा विभावना.

## ९३१ श्याम : 931. Wounds and Scars.

णहपअपसाहिअंगो णिद्दाघुम्मंतलोअणो ण तहा ।
जह णिव्वणाहरो सामलंग ! दूमेसि मह हिअअं ॥ 937 ॥

[ नखमुखप्रसाधिताङ्गो निद्राघूर्णल्लोचनो न तथा ।
यथा निर्व्रणाधरः श्यामलाङ्ग दूनयसि मम हृदयम् ॥ ]

हे श्याम, तुझ्या अंगावरील नखक्षतांचें प्रसाधन किंवा जागरणामुळें घुमणारे तुझे लोचन पाहून माझें मन व्यथित होत नाहीं; पण तुझ्या ओठावर व्रण नाहीं असें दिसलें कीं माझें हृदय विदीर्ण होतें.

● छाया काव्यानुशासनावरून. कोणावरही का होईना, जोंवर तूं प्रेम करीत आहेस, तोंवर तुला पुन्हा प्राप्त करून घेण्याची मला आशा वाटते. माझ्या मनात मत्सर नाहीं, आशा आहे, धीर आहे. तूं विरक्त झालास तर मात्र माझा धीर तग धरणार नाहीं.

## ९३२ प्रतिबिंब: 932. Replica.

पच्चक्खमंतुकारअ ! जइ चुंबसि मे इमे हअकवोले ।
ता मज्झ पिअसहीए विसेसओ कीस तण्हाओ ? ॥ 938 ॥

१. मुद्र.

निर्लज्जा, तुझा अपराध प्रत्यक्षपणें माझ्या प्रत्ययास आला आहे. इकडे तूं माझ्या दुर्दैवी गालाचें चुंबन घेतलेंस आणि तिकडे माझ्या प्रिय सखीचे गाल ओले झाले; तुमचें एकमेकांवर प्रेम नसते तर असें कां होतें !

● नायिकेच्या आरसपानी गालावर पलीकडे उभ्या असलेल्या सखीच्या मुखाचें प्रतिबिंब उमटलें होतें, त्याचें तो चुंबन घेत होता. नायकाचें शाठ्य विदग्ध सखीच्या ध्यानांत आलें तेव्हां ती घामाघूम झाली आणि तिची ही अवस्था दृष्टोत्पत्तीस आली तेव्हां नायिका मत्सरग्रस्त झाली.

## ९३३ गाल : 933. Cheek.

तइआ मह गंडत्थलणिमिअं दिट्ठिं ण णेसि अण्णत्तो ।
एण्हिं स च्चेअ अहं ते अ कवोला ण सा दिट्ठी ॥ 939 ॥

[ तदा मम गण्डस्थलनिमग्नां दृष्टिं न नयस्यन्यत्र ।
इदानीं सैवाऽहं तौ च कपोलौ न सा दृष्टिः ॥ ]

तेव्हां तुझी अनिमिष नजर माझ्या गालावर एकाग्र झाली होती. आतां मी तीच आहे आणि माझे गालही तेच आहेत, पण त्यांकडे तुझी दृष्टि वळत ही नाहीं.

● छाया काव्यप्रकाशावरून. त्याची नजर तेव्हां हिच्या गालावर एकाग्र झाली होती कारण त्यावेळीं त्यांवर तिच्या सखीचें प्रतिबिंब उमटलें होतें. बिंब अप्राप्य असलें म्हणजे प्रतिबिंबावर तहान भागवावी लागते. आतां प्रतिबिंबही नव्हतें, म्हणून ही अनासक्ति.

## ९३४ पर्यवसान : 934. Sequence.

ताणँ गुणग्गहणाणं ताणुक्कंठाणँ तस्स पेम्मस्स ।
ताणँ भणिआणँ सुंदर ! ईरिसअं जाअमवसाणँ ॥ 940 ॥

[तेषां गुणग्रहणानां तासामुत्कण्ठानां तस्य प्रेम्णः ।
तेषां भणितानां सुन्दर ईदृशं जातमवसानम् ॥]

तें गुणग्रहण, तीं उत्कण्ठा, ती प्रीति आणि तीं वचनें – हे सुंदर, त्या सर्वांचें पर्यवसान हें असें झालें !

● छाया काव्यप्रकाशावरून.

## ९३५ मनधरणी : 935. Propitiation.

अलिअकुविअं पि कअमंतुअं व म जेसु सुहअ ! अणुणेंतो ।
ताण दिअहाण हरणे रुआमि, ण उणो अहं कुविआ ॥ 941 ॥

पूर्वी मी रुसण्याचें ढोंग करीत असें, माझा रुसवा खरा नाहीं हें माहीत असूनही तू जीव तोडून माझा अनुनय करीत असस आणि मी मान सोडीत नसे; त्या दिवसाची आठवण होऊन मला रडूं येत आहे. प्रियकरा, आतां तूं राग सोड आणि माझ्याकडे परत ये.

● तुझ्या अपराधामुळें मी आता तुझ्यावर खरोखरीच रागावलें आहे,तरीही मीच तुझी मनधरणी करीत आहे. प्रियकरा, तूं कितीही अपराध केलेस तरी मी तुझ्यावर रागावणार नाहीं किंवा कोणत्याही निमित्तानें रुसणार नाहीं; फूं माझा त्याग करूं नको म्हणजे झालें.

## ९३६ अपराध : 936. Offence.

आम, तुह णावराहो, पिअअम ! मे लोअणाण इह दोसो ।
माणासहम्मि चडुलेहि वासिओ जेहि हिअअम्मि ॥ 942 ॥

१. फणीतानाम् सुंदर न हि सदृश एव अवसाद ।

प्रियतम, तुझा काहीही अपराध नाही; अपराध माझ्या डोळ्यांचा, की त्यांनी मान माहीत नसलेल्या माझ्या हृदयांत तुझ्यासारख्या चंचल वृत्तीच्या व्यक्तीला प्रवेश करू दिला. दुर्दैव माझें की तुझ्यावर माझें प्रेम आहे

<u>९३७ अबोल :</u> 937. Grievance.

को सुहअ ! तुज्झ दोसो ? हअहिअअं णिट्ठुरं मज्झ ।
पेच्छसि अणिमिसणअणो जंपसि विणअं ण जंपसे पिट्ठं ॥943॥

सुभग, तुझा काय दोष ? माझेंच दुष्ट हृदय निष्ठुर आहे. तूं अनिमिष नजरेनें पाहतोस, विनयानें बोलतोस; पण कांहीं विचारलें की त्याबद्दल मात्र बोलत नाहीस.

<u>९३८ नाटक :</u> 938. Histrionics.

वच्च ! मह च्चिअ एक्काएँ होंतु णीसासरोइअव्वाइं ।
मा तुज्झ वि तीएँ विणा दक्खिण्णहअस्स जज्जंतु ॥ 944 ॥
[ व्रज ममैवैकस्य भवन्तु निःश्वासरोदितव्यानि ।
मा तवापि तया विना दाक्षिण्यहतस्य जनिषत ॥ ]

माझे अश्रू व हुंदके माझ्या स्वत ष्यासाठींच आहेत; ते माझ्या-पुरतेच राहूं द्या. तुम्ही जा, मन मानेल तिकडे जा; मला औपचारिक दाक्षिण्याची जरूर नाही.

• छाया पन्यासीपायन्त. गोवर्धनाचार्यांमुळे [illegible] हलेल्या सौवराची [illegible] निर्भर्त्सना. [illegible] विषासापेक्षा उदाहरणः ' अनिष्टविधानं विध्याभासः ।

९३९ विट : 939. Pimp.

अणुवत्तंतो अम्हारिसं जणं आहिजाईए ।
चिंतेसि उणो हिअए अणाहिजाई सुहं जंअइ ॥ 945 ॥

छातीवर हात ठेवून सांग, असेंच आहे कीं नाहीं ? वैदग्ध्याचा आव आणून आमच्यासारख्यांच्या व्यवसायाचा तूं चांगला फायदा घेत असलेमुळें स्वतः सपन्न नाहींस तरी तुला जीवनाची चिंता नाहीं.

९४० ललाट-लेख : 940. Finger Prints.

हुं ! निल्लज्ज ! समोसर ! तं चिअ अणुणेसु, जीएँ दे एअं ।
पाअंगुट्ठालत्तअरसेण तिलअं विणिम्मविअं ॥ 946 ॥

[ हु निर्लज्ज समपसर तामेवानुनय यस्यास्त एतत् ।
पादाग्राङ्गुष्ठालक्तकेन तिलकं विनिर्मितम् ॥ ]

हुंः, निर्लज्जा, बस कर. जिच्या पादांगुष्ठावरील अळित्याच्या स्पर्शानें तुझ्या ललाटावर हा तिलक उमटला तिचाच अनुनय कर.

● छाया सरस्वतीकण्ठाभरणावरून. ईर्ष्येचें उदाहरणः 'ईर्ष्यामाहुः समानेषु मानदानाधमर्षणम् ॥' अळित्याच्या छटेवरून तिनें त्याच्या अपराधाप्रमाणेंच त्याचें रहस्यही ओळखलें कीं काय ?

९४१ ती, ती, ती : 941. Favouritism.

सा वसइ तुज्झ हिअए, स च्चिअ अच्छीसु, सा अ सिविणेसु ।
अम्हारिसाण सुंदर ! ओआसो कत्थ पावाण ? ॥ 947 ॥

१. अनाभिजात्या सुखं जीयते. २. वअणेसु.

[सा वसति तव हृदये सैवाक्ष्णोः सैव वचनेष्वु ।
अस्मादृशीनां सुन्दर अवकाश : कुत्र पापानाम् ॥ ]

ती तुझ्या हृदयांत ठाण मांडून बसली आहे. तुझ्या डोळ्यांत तीच दिसते. तुझ्या बोलण्यांतही वारंवार तिचाच उल्लेख येतो. स्वप्नांतही तुझ्याबरोबर तीच असते. हे सुंदर, सांग आमच्यासारख्या पापिणींना कोठें जागा आहे ?

● छाया काव्यप्रकाशावरून. काव्यप्रकाशांत व काव्यप्रदीपांत विशेष अलंकाराचें उदाहरण. अलंकाररत्नाकरांतील व्याख्या : ' अनाधारमाधेयमेकमनेक गोचरं सम्भावितादधिकस्य विरुद्धस्य वा सम्पत्तिश्च विशेषः । '

## ९४२ सुशिष्या : 942. Pupil.

तण्हा मे तुज्झ पिअत्तणस्स, कह तं ति णो हि जाणामो ।
दे सुहअ ! तुमं चिअ सिक्खवेसु जह दे पिआ होमि ॥ 948 ॥

हे सुभग — तुझें प्रेम संपादन करण्याची माझी इच्छा आहे, पण तें कसें मिळवावें तें मला कळत नाहीं. प्रियकरा, मी तुझी प्रिया कशी होऊं शकेन तें तूच मला शिकव.

## ९४३ पुष्पा : 943 Lust.

मलिणवसणाण किअवणिआणं आपंडुगंडपालीणं ।
पुष्फवईआण कामो अंगेसु कआउहो वसइ ॥ 949 ॥

पुष्पवतीची वस्त्रें मलिन असतात, ती दूर दूर असते व तिचे गाल फिकट असतात; तरी जणुं तिच्या अंगप्रत्यंगांत अनंग सर्व आयुधांसह सज्ज होऊन वास करतो.

● साहित्यमीमांसेतील पाठः मळिणवसणाणकअवे णिआण आपस्सु णीढ पाडीण । पुप्फवईअण कामो अग्गे सुयकाउहो वसइ ॥

## ९४४ तीन दिवस : 944. Cross Objection.

पुप्फवइअ म्हि, बालअ ! मा चिवसु ! अदीहराउसो होसि ।
अज्ज चेअ मरिज्जउ ! मअच्छि ! किं कालहरणेण ॥ 950 ॥

तीः—वेड्या, (माझी प्राप्ति एवढ्यात होणार नाहीं); मी पुष्पवती आहे; मला शिवूं नको, नाहींतर तुझें आयुष्य क्षीण होईल.

तो.—हरिणाक्षी, मी आजच मेलों तरी चालेल — पण कालहरण करूं नको

## ९४५ अलका : 945. Curls.

वाणिअअ ! हत्थिदंता कत्तो अम्हाण वग्घकत्तीओ ।
जाव लुलिआलअमुही घरम्मि परिसक्कए सोण्हा [१] ॥ 951 ॥

[ वाणिजक हस्तिदन्ताः कुतोऽस्माकं व्याघ्रकृत्तयः ।
यावल्लुलितालकमुखी गृहे प्रतिवसति स्नुषा ॥ ]

वाणीबुवा, आता आमच्याकडे हस्तिदंत किंवा व्याघ्रचर्म कसें मिळणार ? भुरभुरत्या कुरळ्या केसांच्या नव्या सूनबाई घरात आल्या आहेत ना !

● छाया काव्यप्रकाशावरून. अलंकारमहोदधींत उत्तर अलंकाराचें उदाहरण : " तदुत्तरं भवेत् यत्र प्रश्नोऽयनमुत्तरात् । असकृद् वा सति प्रश्ने

१. मज्झए, सुक्कए, वट्टए.

यत्रासम्भाव्यमुत्तरम् ।। " अलंकाररत्नाकरात नियमाचें उदाहरणः ' अन्य-निषेधार्थोऽपि विधिर्नियमः । ' वज्जालग्गांतील पाठ व छाया : ' उत्तुङ्ग थोर पणवट्टसालसा जं वहू सुवइ । ' उत्तुङ्ग पृथुस्तनपृष्ठसालसा यद्वधूः स्वपिति । '

## ९४६ हंसीः

## 946. Swanny.

गण्हंति पिअअमाण वअणाहि हंसीओ विसलअद्धाइ ।
हिअआइ व कुसुमाउहबाणकआणेअरंधाइ ॥ 952 ॥

हंसी प्रियकराच्या चोंचीतून कमलाचे तंतु काढीत नसून जणूं कुसुमायुधाच्या शरांनीं विद्ध झालेल्या त्याच्या हृदयाचेच ग्रहण करीत आहे.

● साहित्यमीमांसेतील पाठः ' गण्हंति पिअअमावि अ अमोअरअणाहि विसलअद्धाइं । हिअआइं वि कुसुमाउहबाणकआणेअरद्धाइं ॥ '

## ९४७ हंस :

## 947. Exaltation.

हंसाण सरेहिं सिरी, सारिज्जइ अह सराण हंसेहिं ।
अण्णोण्णं चिअ एए अप्पाणं णवर गरुअंति ॥ 953 ॥

[ हंसानां सरोभिः श्रीः सार्यते अथ सरसां हंसैः ।
अन्योन्यमेवैते आत्मानं केवलं गरयन्ति ॥ ]

हंसांमुळे सरोवराची शोभा वृद्धिंगत होते आणि सरोवरामुळे हंसांची. ती परस्परांच्या शोभेत भर घालतात आणि स्वतःचाही गौरव वाढवितात.

● छाया काव्यप्रकाशावरून. काव्यप्रदीपांत अन्योन्य अलंकाराचें उदाहरण : ' क्रियया तु परस्परम् । वस्तुनोर्जननेऽन्योन्यम् । '

१. गरुयावन्ते, २. गुरू इति.

## ९४८ आंतबाहेर : 947. In & Out.

अणुदिअहकआभोआ जह जह थणआ विणिंति कुमॅरीए ।
तह तह लद्धोआसो व्व वम्महो हिअअमाविसइ ॥ 954 ॥

कुमारीचे स्तन वृद्धिंगत होऊन जों जों बाहेर येत आहेत तों तों मन्मथ संधि साधून तिच्या हृदयांत प्रवेश करीत आहे.

● स्तूपाच्या अंतर्यामीं पवित्र वस्तु असते तशी स्तनांच्या अंतर्यामीं हृदयांतली प्रीति !

## ९४९ पुष्पसंकेत : 949. Notation.

केसा पण्डुरछाआ असईसंगेण चम्म जज्जरिअं ।
विच तुह सोहग्गं ! गोदा दूइत्तणं कुणई ॥ 955 ॥

उनाड स्त्रियांच्या संगतींत माझे केस पिकले आणि शरीर जर्जर झालें. पण तुझ्या सद्भाग्यासारखें दृश्य मी आजवर पाहिलें नाहीं. प्रत्यक्ष गोदावरी तुझें दूतीकर्म करीत आहे.

● परिस्थितीच्या प्रभावामुळें पुष्पें अर्पण करणें अगर संकेत ठरविणें अशक्य होतें; म्हणून गोदावरीच्या पात्रांत फुलांचा द्रोण सोडून त्यानें किंवा तिनें प्रेम व्यक्त केलें किंवा संकेत ठरविला. प्राचीन व मध्ययुगीन वाङ्मयांत पुष्पसंकेत विख्यात आहे. फुलांचा पुडा पात्रांत सोडतांना पहाणारांना वाटलें कीं कांहीं व्रत चाललें आहे व तो उचलून घेतांना पाहणारांना वाटलें कीं तो यदृच्छेनें वाहत आलेला आहे. वास्तवतः विसंगत अशा ह्या घटनांच्या अंतर्यामींची संगति जाणत्यांनीं ओळखली

## ९५० मन्दभागिनी : 950. Circumstantial Evidence.

णिण्णिद्दं दोब्बल्लं चिंता अलसत्तणं सणीससिअं ।
मह मंदभाइणीए कए सहि ! तुमं वि अहह ! परिभवइ ।। 956 ।।

[ औन्निद्र्यं दौर्बल्यं चिन्ताऽलसत्वं सनिःश्वसितम् ।
मम मन्दभागिन्याः कृते सखि अहह त्वामपि परिभवति ।। ]

सखि — तुला ( काल रात्रीं ) जागरण घडल्यासारखें दिसतें. लाल डोळे, दुबळें शरीर, व्यग्र मुद्रा आणि आळसलेली हालचाल; शिवाय तूं दीर्घ उसासे टाकीत आहेस. अरेरे — आणि हें सारें माझ्यासाठीं — या मन्दभागिनींसाठीं !

● छाया काव्यप्रकाशावरून. सङ्केत ठरविण्यासाठीं नायिकेनें दूतीला प्रियकराकडे पाठविलें—आणि मधल्यामध्यें दूतीच नायकाशीं रममाण होऊन काहीं सबब घेऊन परत आली, तिला उद्देशून नायिकेचे उद्गार. निरोप नेण्याआणण्याचे श्रम नाहीं तरी तिला झालेलेच होते, त्याबद्दल आभार आणि तिच्या अपकृत्याबद्दल निर्भर्त्सना.

## ९५१ गृहपतिदुहिता : 951. Hypnotism.

णिअदइअदंसणूसुअं पंथिअ ! अण्णेण वच्चसु पहेण ।
घरवइधूआ दुल्लंघवाउरा ठाइ हअगामे ।। 957 ।।

[ निजदयितादर्शनोत्क्षिप्त पथिकान्येन व्रज पथा ।
गृहपतिदुहिता दुर्लङ्घ्यवागुरेह हतग्रामे ।। ]

१ ओणिद्द २ उस्सिअ ३. धूआ ४ उत्सुक.

पथिका, तूं तुझ्या पत्नीच्या दर्शनासाठीं उत्सुक झाला आहेस. तूं दुसऱ्या मार्गानें जा. या दुष्ट गावातल्या गृहपतीला एक मुलगी आहे. तिच्या जाळ्यातून निसटणें तुला अशक्य होईल.

● छाया काव्यानुशासनावरून. साहित्यमीमांसेतील पाठ : णि अदइ दंसणक्खित्तपथ्यहिअअण्णेण मच्छमुवहेण । गहवइधू आ दुल्लुग्धमा उरा इइ अअं गामे ॥

## ९५२ वृषभ : 952. Bull.

आसाइअमण्णाएण जेत्तिअं, ता तुइ ण बहुआ धिई ।
उवरमसु वुसह ! एण्हि, रक्खिज्जइ गेहवइखेत्तं ॥ 958 ॥

[ आस्वादितमज्ञातेन यावत्तावदेव व्रीहीणाम् ।
उपरम वृषभेदानीं रक्ष्यते गृहपतिक्षे म् ॥ ]

वृषभा, तूं या शेतात कोणालाही नकळत आडमार्गानें येऊन तांदूळ खात असतोस. आता तूं परत जा; कारण मालक शेतांत राखणीला आहे.

● छाया सरस्वतीकंठाभरणावरून. प्राचीन संस्कृत वाङ्मयात क्षेत्र हा शब्द स्त्री, पत्नी या अर्थानें अनेकदा योजलेला आढळतो. शेत धन्याच्या मालकीचें, केवळ कसणाऱ्याच्या मालकीचें नव्हे, त्याचप्रमाणें स्त्री पतीच्या मालकीची. गुंड शेतकरी शेजाऱ्याच्या शेतांत बहुधा त्याच्या गैरहजेरींत बैल घालून अतिक्रमण करतो, तोच न्याय येथेंही. परक्षेत्रांत आडमार्गानें घुसणाऱ्या वृषभाच्या निमित्तानें उपपतीला सूचना कीं धनी घरीं आहे, आल्या मार्गानें परत जा. कीं शेतात बैल घुसल्याची हूल उठवून धरधन्याला रानात रवाना करण्याची ही युक्ति आहे ! छायेचा भिन्न पाठः अस्वादितमज्ञातेन यावत्तावतैव बन्धय धृतिम् । उपरमस्व वृषभान रक्षयित्वा गृहपतिक्षेत्रम् ॥

